# मत्तयाने लिहिलेले शुभवर्तमान

## येशूचा कुलवृत्तांत
*(लूक 3:23-38)*

1 येशू ख्रिस्ताचा कुलवृत्तांत येणेप्रमाणे: तो दाविदाच्या
कुळात जन्मला. दावीद अब्राहामाच्या कुळातील
होता.

2 अब्राहाम इसहाकाचा पिता होता.
इसहाक याकोबाचा पिता होता.
याकोब यहूदा व त्याच्या भावांचा पिता होता.
3 यहूदा पेरेस व जेरहाचा पिता होता.
(त्यांची आई तामार होती.)
पेरेस हेस्रोनाचा पिता होता.
हेस्रोन रामाचा पिता होता.
4 रामा अम्मीनादाबाचा पिता होता.
अम्मीनादाब नहशोनाचा पिता होता.
नहशोन सल्मोनाचा पिता होता.
5 सल्मोन बवाजाचा पिता होता.
(बवाजाची आई राहाब होती.)
बवाज ओबेदचा पिता होता.
(ओबेदची आई रूथ होती)
ओबेद इशायचा पिता होता.
6 इशाय दावीद राजाचा पिता होता.
दावीद शलमोनाचा पिता होता.
(शलमोनाची आई पूर्वी उरीयाची पत्नी होती.)
7 शलमोन रहबामचा पिता होता.
रहबाम अबीयाचा पिता होता.
अबीया आसाचा पिता होता.
8 आसा यहोशाफाटाचा पिता होता.
यहोशाफाट योरामाचा पिता होता.
योराम उज्जीयाचा पिता होता.
9 उज्जीया योथामचा पिता होता.
योथाम आहाजचा पिता होता.
आहाज हिज्कीयाचा पिता होता.
10 हिज्कीया मनश्शेचा पिता होता.
मनश्शे आमोनचा पिता होता.
आमोन योशीयाचा पिता होता.
11 योशीया यखन्या व त्याचे भाऊ यांचा पिता होता.
(जेव्हा यहूदी लोकांना गुलाम म्हणून
बाबेलास नेण्यात आले तेव्हा हे झाले.)
12 त्यांना बाबेलला नेण्यात आल्यानंतरचा
कुळवृत्तांत येणेप्रमाणे:
यखन्या शल्तीएलचा पिता होता.
शल्तीएल जरूब्बाबेलचा पिता होता.
13 जरूब्बाबेल अबीहूदचा पिता होता.
अबीहूद एल्याकीमचा पिता होता.
एल्याकीम अज्जुराचा पिता होता.
14 अज्जुर सादोकचा पिता होता.
सादोक याखीमचा पिता होता.
याखीम एलीहूदचा पिता होता.
15 एलीहूद एलाजारचा पिता होता.
एलाजार मत्तानचा पिता होता.
मत्तान याकोबाचा पिता होता.
16 याकोब योसेफाचा पिता होता.
योसेफ मरीयेचा पती होता.
मरीया येशूची आई होती.
येशूला ‘ख्रिस्त’* म्हटले आहे.

17 याप्रमाणे अब्राहामापासून दाविदापर्यंत चौदा पिढ्या
झाल्या आणि दाविदापासून बाबेलच्या बंदीवासापर्यंत चौदा
पिढ्या झाल्या. बाबेलच्या बंदिवासापासून ख्रिस्ताच्या
जन्मापर्यंत चौदा पिढ्या झाल्या.

## येशू ख्रिस्ताचा जन्म
*(लूक 2:1-7)*

18 येशू ख्रिस्ताच्या आईचे नाव मरीया होते आणि येशू
ख्रिस्ताचा जन्म अशाप्रकारे झाला. मरीयेचे योसेफशी लग्न
ठरले होते. परंतु त्या अगोदरच ती पवित्र आत्म्याच्या
सामर्थ्याने गर्भवती आहे असे दिसून आले. 19 तिचा भावी
पती योसेफ चांगला मनुष्य होता. तिची लोकांमध्ये बदनामी
होऊ नये म्हणून त्याने गुपचूप तिला सूटपत्र देण्याचा विचार
केला. 20 पण असे विचार त्याच्या मनात घोळत असतानाच
देवाच्या दूताने स्वप्नात त्याला दर्शन दिले आणि सांगितले,
“दाविदाच्या वंशातील योसेफा, *मरीयेशी लग्न करण्यास

---

**ख्रिस्त** “अभिषिक्त” (मशीहा) किंवा देवाने निवडलेला.

**दावीदाच्या वंशातील योसेफा** दाविदाच्या घराण्यातील पुरुष इस्राएलाचा दुसरा राजा (ख्रिस्तापूर्वी सुमारे 1000 वर्ष)

अनमान करू नकोस कारण तिला होणारे मूल पवित्र
आत्म्यापासून* होणार आहे. 21त्याचे नाव तू येशू* ठेव.
कारण तो त्याच्या लोकांची पापापासून सुटका करील."
22हे सर्व यासाठी घडले की, प्रभुने संदेष्ट्यांच्या द्वारे जे
सांगितले होते, त्याची पूर्तता व्हावी. 23"कुमारी गर्भवती
होईल, ती एका मुलाला जन्म देईल आणि ते त्याला
'इम्मानुएल' म्हणजे 'आमच्याबरोबर देव आहे' असे
म्हणतील."
24जेव्हा योसेफ जागा झाला तेव्हा देवदूताने जशी त्याला
आज्ञा केली होती तसेच त्याने केले. त्याने मरीयेशी लग्न
केले. 25पण तिने मुलाला जन्म देईपर्यंत त्याने तिला जाणले
नाही. आणि योसेफने त्याचे नाव येशू ठेवले.

## ज्ञानी लोक येशूला भेटण्यास येतात

2 यहूदीयातील बेथलहेम गावात येशूचा जन्म झाला.
त्यावेळी हेरोद राजा राज्य करीत होता. येशूच्या
जन्मानंतर पूर्वेकडून काही ज्ञानी लोक यरुशलेमाला आले.
2आणि त्यांनी विचारले, "यहूद्यांचा नुकताच जन्मलेला
राजा कोठे आहे? कारण त्याचा जन्म सूचित करणारा
तारा आम्ही पूर्व दिशेस पाहिला म्हणून त्याला नमन
करण्यास आलो आहोत."
3हे ऐकून हेरोद राजा तसेच यरुशलेम नगराचे रहिवासी
घाबरून गेले.
4मग त्याने यहूदी लोकांचे सर्व मुख्य याजक व
नियमशास्त्राचे शिक्षक यांना बोलाविले आणि विचारले
की, "ख्रिस्ताचा जन्म कोठे होणार होता?" 5त्यांनी उत्तर
दिले, "यहूदीयातील बेथलहेम गावात. कारण देवाच्या
संदेष्टयांनी त्याविषयी असे लिहिले आहे की:

6'हे बेथलहेमा, यहूद्यांच्या भूमिप्रदेशा, तू यहूद्यांच्या
राज्यकर्त्यांमध्ये कनिष्ठ आहेस असे मुळीच नाही कारण
माझ्या इस्राएल लोकांचा सांभाळ करील, असा राज्यकर्ता
तुझ्यातून येईल.'" *मीखा* 5:2

7मग हेरोदाने पूर्वेकडील ज्ञानी लोकांची गुप्तपणे भेट
घेतली आणि तारा दिसल्याची नक्की वेळ माहीत करून
घेतली. 8नंतर त्याने त्यांना बेथलहेमला पाठविले. हेरोद
त्यांना म्हणाला, "तुम्ही जाऊन त्या बालकाचा नीट शोध
करा. आणि तुम्हांला ते सापडल्यावर मला सांगायला या.
म्हणजे मी सुद्धा जाऊन त्याला नमन करू शकेन."
9ज्ञानी लोकांनी राजाचे म्हणणे ऐकले व ते निघाले.
त्यांनी जो तारा पूर्वेला पाहिला होता तोच त्यांना परत
दिसला. ज्ञानी लोक त्या ताऱ्याच्या मागे गेले. जेथे बाळ
होते ते ठिकाण येईपर्यंत तारा त्यांच्यासमोर जात होता.
मग त्या ठिकाणावर तो थांबला. 10ज्ञानी लोकांना ते
पाहून फार आनंद झाला. 11ज्ञानी लोक बाळ होते त्या
गोठ्यात आले. त्यांनी बाळ व त्याची आई मरीया हिला
पाहिले. त्यांनी लवून त्या बालकाला नमन केले. नंतर
त्यांनी बाळासाठी आणलेल्या भेटवस्तु काढल्या. त्यांनी
बाळाला सोने, ऊद व गंधरस ह्या बहुमोल वस्तु दिल्या.
12पण देवाने स्वप्नाद्वारे त्या ज्ञानी लोकांना सावध केले
आणि हेरोदाकडे परत जाऊ नका असे सांगितले. तेव्हा ते
ज्ञानी लोक वेगव्व्या मार्गाने आपल्या देशास परतले.

## येशूचे आईवडील त्याला इजिप्तला घेऊन जातात

13ज्ञानी लोक गेल्यानंतर, प्रभूचा दूत स्वप्नात येऊन
योसेफाला म्हणाला, "ऊठ! बालकाला आणि त्याच्या
आईला घेऊन निसटून इजिप्त देशास जा. कारण बाळाचा
घात करण्यासाठी हेरोद त्याचा शोध घेणार आहे, तेव्हा
मी तुला धोका टळल्याची सूचना देईपर्यंत इजिप्तमध्येच
राहा."
14तेव्हा तो उठला व रात्रीच बाळाला व त्याच्या आईला
घेऊन इजिप्त देशास गेला. 15आणि हेरोद मरेपर्यंत तेथेच
राहिला. प्रभु देवाने संदेष्टट्याच्या द्वारे सांगितले होते की,
'मी माझ्या मुलाला इजिप्त देशातून बोलाविले आहे'* ते
पूर्ण व्हावे म्हणून असे झाले.

## बेथलहेमातील मुलांची हेरोदाकडून कत्तल

16तेव्हा ज्ञानी लोकांनी आपल्याला फसविले, हे पाहून
हेरोद अतिशय रागावला. त्याने ज्ञानी लोकांकडून त्या
बालकाच्या जन्माची वेळ नीट समजून घेतली होती.
त्यानुसार बालक जन्मल्याला आता दोन वर्षे उलटली
होती. म्हणून त्याने माणसे पाठवून बेथलहेम व त्याच्या
आसपासच्या प्रदेशातील दोन वर्षांच्या व त्याहून कमी
वयाच्या मुलांची कत्तल करण्याची आज्ञा केली.
17यिर्मया संदेष्ट्यांच्या द्वारे देवाने जे सांगितले होते ते
अशा प्रकारे पूर्ण झाले. ते वचन असे होते :

18"रामा येथे आकांत ऐकू आला. दु:खदायक रडण्याचा
हा आकांत होता. राहेल आपल्या मुलांसाठी रडत आहे,
पण तिचे सांत्वन करणे अशक्य झाले कारण तिची मुले
मरण पावली आहेत."

*यिर्मया* 31:15

## योसेफ आणि मरीया इजिप्तहून परत येतात

19हेरोद मेल्यानंतर प्रभुचा दूत स्वप्नात योसेफाकडे
आला. योसेफ जेव्हा इजिप्तमध्ये होता तेव्हा हे घडले.

---

**पवित्र आत्मा** देवाचा आत्मा, ख्रिस्ताचा आत्मा आणि कैवारी. देव आणि ख्रिस्त यांच्यासह तो जगातील लोकांमध्ये देवाचे काम करतो.

**येशू** या नावाचा अर्थ "तारण."

**मी आपल्या ... आहे** होशेय 11:1

20दूत म्हणाला, “ऊठ! बाळाला आणि त्याच्या आईला
घेऊन इस्राएल देशास जा. जे लोक बाळाला मारू पाहत
होते ते आता मेले आहेत.”

21मग योसेफ बाळाला आणि त्याच्या आईला घेऊन
इस्राएल देशास गेला. 22हेरोदाच्या मृत्यूनंतर त्याच्या जागी
त्याचा मुलगा अर्खेलाव यहूदाचा राजा झाला आहे असे
जेव्हा योसेफाला समजले, तेव्हा तो तेथे जाण्यास घाबरला.
पण स्वप्नात त्याला ताकीद मिळाल्याने तो तेथून निघाला
आणि गालील प्रदेशात आला. 23योसेफ नासरेथ नावाच्या
गावात गेला आणि तेथे राहिला. ख्रिस्त नासरेथकर म्हटला
जाईल, असे जे देवाने संदेष्ट्यांच्या द्वारे सांगितले होते ते
पूर्ण व्हावे म्हणून हे झाले.

## बाप्तिस्मा करणाऱ्या योहानाचे कार्य

***(मार्क 1:1-8; लूक 3:1-9, 15-17; योहान 1:19-28 )***

3 त्या दिवसांत बाप्तिस्मा करणारा योहान आला आणि
यहूदीयाच्या वैराण प्रदेशात उपदेश करू लागला; तो
म्हणाला, 2“तुमची अंत:करणे व जीवने वाईटपणाकडून
चांगुलपणामध्ये बदला कारण स्वर्गाचे राज्य जवळ येत
आहे.” 3यशया हा संदेष्टा ज्याच्याविषयी बोलत होता तो
हाच बाप्तिस्मा करणारा योहान. त्याविषयीचे यशयाचे
भविष्य असे होते:

“वैराण प्रदेशात एक मनुष्य ओरडून सांगत आहे; ‘प्रभु
देवासाठी मार्ग तयार करा; त्याच्या वाटा सरळ करा.’”

*यशया* 40:3

4योहानाचे कपडे उंटाच्या केसांपासून बनविलेले होते.
कातड्याचा कमरपट्टा त्याच्या कमरेभोवती होता. अन्न
म्हणून योहान टोळ आणि रानमध खात असे. 5लोक
योहानाचा उपदेश ऐकण्यास जात होते. यरुशलेम, सर्व
यहूदीया प्रांत आणि यार्देन नदीच्या भोवतालच्या प्रदेशातून
लोक येत होते. 6आपण केलेली पापे लोक त्याला सांगत
होते आणि योहान त्यांना यार्देन नदीत बाप्तिस्मा* देत
होता.

7योहान जेथे लोकांना बाप्तिस्मा देत होता तेथे अनेक
परूशी* आणि सदूकी* आले. जेव्हा योहानाने त्यांना
पाहिले तेव्हा तो त्यांना म्हणाला, “अहो, सापाच्या पिल्लांनो,
देवाचा जो राग ओढवणार आहे त्याच्यापासून दूर पळण्याचे
तुम्हांला कोणी सुचविले? 8म्हणून पश्चात्तापास योग्य अशी
फळे द्या. 9आणि ‘अब्राहाम माझा पिता आहे,’ अशी
फुशारकी तुम्हांला मारता येईल असे समजू नका; मी
तुम्हांस सांगतो की, देव अब्राहामासाठी या दगडापासून
मुले निर्माण करू शकतो. 10झाडे तोडण्यासाठी कुऱ्हाड
तयार आहे. चांगले फळ न देणारे प्रत्येक झाड कापून
अग्नीत टाकले जाईल. 11“तुम्ही तुमची अंत:करणे आणि
जीवने वाईटाकडून चांगल्याकडे बदलली आहेत हे
दर्शविण्यासाठी मी तुमचा बाप्तिस्मा पाण्याने करतो, पण
माझ्यानंतर माझ्यापेक्षाही महान असा एक येत आहे, ज्याच्या
वहाणा उचलण्याची सुद्धा माझी लायकी नाही. तो पवित्र
आत्म्याने आणि अग्नीने तुमचा बाप्तिस्मा करील. 12तो
धान्य निवडायला येईल. तो भुसा बाजूला काढील व धान्य
वेगळे करील. तो चांगले धान्य कोठारात साठविल व जे
चांगले नाही ते जाळून टाकील. तो भुसा कधीही न
विझणाऱ्या आगीमध्ये जाळून टाकील.”

## योहान येशूचा बाप्तिस्मा करतो

***(मार्क 1:9-11; लूक 3:21-22 )***

13तेव्हा येशू गालीलाहून यार्देन नदीकडे आला. त्याला
योहानाच्या हातून बाप्तिस्मा घ्यायचा होता. 14पण त्याला
थोपवीत योहान म्हणाला, “खरे तर मी आपल्या हातून
बाप्तिस्मा घ्यायचा असे असता आपण माझ्याकडे बाप्तिस्मा
घ्यायला आलात हे कसे?”

15येशूने त्याला उत्तर दिले, “आता असेच होऊ दे.
देवाची इच्छा हीच आहे म्हणून आपण असेच केले पाहिजे.”
तेव्हा योहान येशूचा बाप्तिस्मा करण्यास तयार झाला.

16येशूचा बाप्तिस्मा झाला आणि तो पाण्यातून वर आला,
तेव्हा आकाश उघडले, आणि देवाचा आत्मा एखाद्या
कबुतराप्रमाणे आपणावर उतरताना त्याला दिसला. 17त्याच
वेळी आकाशातून वाणी झाली की, “हा माझा पुत्र मला
परमप्रिय आहे, त्याच्याविषयी मी संतुष्ट आहे.”

## येशूची परीक्षा

***(मार्क 1:12-13; लूक 4:1-13 )***

4 मग पवित्र आत्म्याने येशूला रानात नेले. मोहात पाडून
सैतानाने त्याची परीक्षा घ्यावी म्हणून त्याला तेथे
नेण्यात आले. 2चाळीस दिवस आणि चाळीस रात्री येशूने
काहीच खाल्ले नाही. त्यानंतर त्याला खूप भूक लागली.
3तेव्हा सैतान येशूची परीक्षा घेण्यासाठी त्याच्याकडे आला
व म्हणाला, “जर तू देवाचा पुत्र आहेस तर ह्या दगडांना
भाकरी होण्याची आज्ञा दे.”

4येशूने उत्तर दिले, “असे लिहिले आहे की, ‘मनुष्य
केवळ भाकरीने जगेल असे नाही तर देवाच्या तोंडून
निघणाऱ्या प्रत्येक शब्दाने जगेल.’” *अनुवाद* 8:3

---

**बाप्तिस्मा** ह्या ग्रीक शब्दाचा अर्थ डुबविणे बुडविणे, एखादी व्यक्ति किंवा वस्तु अत्यल्प काळासाठी पाण्याखाली घालणे.

**परूशी** यहूदी धर्ममतातील एक गट. (तेच यहूदी धर्माचे नियम व रीतिरिवाज यांचे काटेकोर पालन करतात असा त्यांचा दावा असे.

**सदूकी** यहूदी धर्मातील एक अग्रेसर गट. जुन्या करारातील केवळ पाहिल्या पांच पुस्तकांचाच स्वीकार करणारे, मृत्युनंतर लोक पुन्हा जीवन नाही असा त्यांचा विश्वास असे.

[5]मग सैतानाने त्याला पवित्र नगरात (यरुशलेमात) नेले. सैतानाने येशूला मंदिराच्या कंगोऱ्यावर उभे केले. [6]आणि त्याला म्हटले, "जर तू देवाचा पुत्र आहेस तर खाली उडी टाक. कारण असे लिहिले आहे की,

'देव त्याच्या दूतांना तुझ्यासाठी आज्ञा करील आणि तुझे पाय खडकावर आपटू नयेत म्हणून ते तुला हातांवर झेलतील.'" *स्तोत्र* 91:11-12

[7]येशूने त्याला उत्तर दिले, "असे सुद्धा लिहिले आहे की,
'देव जो तुझा प्रभु याची परीक्षा पाहू नको.'"
*अनुवाद* 6:16

[8]मग सैतानाने येशूला एका खूप उंच पर्वतावर नेले. त्याने येशूला जगातील राज्ये आणि त्यांतील सर्व वैभव दाखविले. [9]सैतान म्हणाला, "जर तू पाया पडून मला नमन करशील तर मी हे सारे तुला देईन."'
[10]तेव्हा येशू त्याला म्हणाला, "अरे सैताना, माझ्यापासून दूर हो! कारण असे लिहिले आहे की

'देव जो तुझा प्रभु त्याचीच उपासना कर आणि केवळ त्याचीच सेवा कर.'" *अनुवाद* 6:13

[11]मग सैतान येशूला सोडून निघून गेला आणि देवदूत येऊन त्याची देखभाल करू लागले.

## येशू गालीलात त्याच्या कामाचा प्रारंभ करतो
### *(मार्क 1:14-15; लूक 4:14-15)*

[12]नंतर योहानाला तुरूंगात टाकले आहे हे ऐकून येशू गालीलास परतला. [13]परंतु तो नासरेथ येथे राहिला नाही, तर गालील सरोवराजवळील कफर्णहूम नगरात जाऊन राहिला. जबुलून व नफताली ह्या प्रदेशांना लागूनच कफर्णहूम नगर आहे. [14]यशया ह्या संदेष्ट्याने पूर्वी जे सांगितले होते ते पूर्ण व्हावे यासाठी हे झाले. यशयाने वर्तविलेले भविष्य असे होते:

[15]'जबुलून आणि नफताली प्रांत समुद्राकडे येणारे मार्ग, यार्देन नदीपलीकडचा प्रदेश व यहूदीतरांचा गालील यांमधील—
[16]अंधारात वावरणाऱ्या लोकांनी मोठा प्रकाश पाहिला. मरणाचे सावट असलेल्या प्रदेशात राहणाऱ्या लोकांसाठी प्रकाश अवतरला." *यशया* 9:1-2

[17]त्यावेळेपासून येशू उपदेश करू लागला व म्हणू लागला की, "पश्चात्ताप करा, कारण स्वर्गाचे राज्य जवळ आले आहे."

## येशू काही शिष्य निवडतो
### *(मार्क 1:16-20; लूक 5:1-11)*

[18]नंतर तो गालीलच्या सरोवराजवळून जात असता त्याने पेत्र म्हटलेला शिमोन व त्याचा भाऊ अंद्रिया या दोघांना पाहिले. ते कोळी होते. ते जाळे टाकून मासे धरीत होते. [19]तो त्यांना म्हणाला, "तुम्ही माझ्यामागे या म्हणजे मी तुम्हांला माणसे धरणारे करीन." [20]मग ते मागेपुढे न पाहता लगेच जाळे टाकून देऊन ते त्याच्या मागे चालू लागले. [21]तेथून पुढे चालत जात असता त्याने दुसरे दोघे भाऊ म्हणजे जब्दीचा मुलगा याकोब व त्याचा भाऊ योहान यांना त्यांचे वडील जब्दी याच्याबरोबर नावेत आपली जाळी नीट करताना पाहिले. आणि त्याने त्यांना बोलावले. [22]तेव्हा ते आपली नाव व आपले वडील यांना सोडून त्याच्या मागे गेले.

## येशू लोकांना शिकवितो आणि बरे करतो
### *(लूक 6:17-19)*

[23]येशू गालील प्रांतात सगळीकडे गेला. येशूने सभास्थानात जाऊन शिकविले व स्वर्गाच्या राज्याची सुवार्ता सांगितली. येशूने लोकांचे सर्व रोग व दुखणी बरी केली. [24]येशूविषयीची बातमी सर्व सूरीया देशभर पसरली; मग जे दुखणेकरी होते, ज्यांना नाना प्रकारचे रोग व आजार होते, ज्यांना भूतबाधा झाली होती, जे फेफरेकरी व पक्षाघाती होते अशा सर्वांना लोकांनी त्याच्याकडे आणले आणि त्याने त्यांना बरे केले. [25]मग गालील व दकापलीस, यरुशलेम व यहूदीया येथून व यार्देनेच्या पलीकडून आलेल्या लोकांचे मोठे समुदाय त्याच्यामागे चालले.

## येशू लोकांना शिकवितो
### *(लूक 6:20-23)*

5 येशूने तेथे पुष्कळ लोक पाहिले. म्हणून येशू डोंगरावर गेला आणि खाली बसला, मग त्याचे शिष्य त्याच्याजवळ आले. [2]आणि त्याने त्यांना शिकविण्यास सुरुवात केली. तो म्हणाला,

[3]"जे आत्म्याने दीन ते धन्य, कारण स्वर्गाचे राज्य त्यांचे आहे.
[4]जे शोक करतात ते धन्य, कारण त्यांचे सांत्वन करण्यात येईल.
[5]जे नम्र ते धन्य, कारण त्यांना वचनदत्त भूमीचे वतन मिळेल.
[6]ज्यांना नीतीने वागण्याची तहान व भूक लागली आहे ते धन्य, कारण ते तृप्त होतील.
[7]जे दयाळू ते धन्य, कारण त्यांच्यावर दया करण्यात येईल.
[8]जे अंत:करणाचे शुद्ध ते धन्य कारण ते देवाला पाहतील.

[9]जे शांति करणारे ते धन्य, कारण त्यांना देवाची मुले
म्हटले जाईल.
[10]नीतिमत्त्वासाठी ज्यांचा छळ झाला आहे ते धन्य कारण
स्वर्गाचे राज्य त्यांचे आहे.

[11]"जेव्हा माझ्यामुळे लोक तुमची निंदा करतील, तुमचा
छळ करतील व लबाडीने तुमच्याविरूद्ध सर्व प्रकारचे
वाईट बोलतील तेव्हा तुम्ही धन्य आहात. [12]आनंद करा
आणि उल्हास करा कारण स्वर्गात तुमचे प्रतिफळ मोठे
आहे; कारण जे संदेष्टे तुमच्यापूर्वी होते त्यांचा त्यांनी
तसाच छळ केला.

## तुम्ही मिठासारखे तसेच प्रकाशासारखे आहात
### *(मार्क 9:50; लूक 14:34-35)*

[13]"तुम्ही पृथ्वीचे मीठ आहात, पण जर मिठाचा
खारटपणा गेला तर ते पुन्हा खारट बनवता येणार नाही व
ते निरुपयोगी बनेल. ते फेकून देण्याच्या लायकीचे बनेल.
माणसे ते पायदळी तुडवतील.
[14]"तुम्ही जगाचा प्रकाश आहात; डोंगरावर वसलेले
नगर लपत नाही. [15]आणि दिवा लावून तो कोणी
भांड्याखाली लपवून ठेवीत नाही. उलट तो दिवठणीवर
ठेवतात म्हणजे तो दिवा घरातील सर्वांना प्रकाश देतो.
[16]"तशाच प्रकारे तुम्ही सुद्धा इतरांच्यासाठी प्रकाश असले
पाहिजे. यासाठी की त्यांनी तुमची चांगली कामे पाहावी
आणि तुमचा पिता जो स्वर्गात आहे त्याचे गौरव करावे.

## येशू आणि जुन्या करारातील संदर्भ

[17]"मी नियमशास्त्र किंवा संदेष्ट्याचे लिखाण रद्द
करायला आलो आहे असे समजू नका. मी ते रद्द करायला
नाही तर परिपूर्ण करायला आलो आहे. [18]मी तुम्हांला
सत्य तेच सांगतो की, आकाश आणि पृथ्वीचा शेवट
होईपर्यंत नियमशास्त्रातील एका शब्दात देखील फरक
होणार नाही. [19]म्हणून प्रत्येक व्यक्तीने लहानातील लहानाने
सुद्धा आज्ञा पाळावी व जर त्याने पाळली नाही व इतरांनाही
तसे करण्यास शिकविले नाही तर तो स्वर्गाच्या राज्यात
लहान गणला जाईल, पण जो आज्ञा पाळील व इतरांना
तसे करण्यास शिकवील त्याला स्वर्गाच्या राज्यात मोठे
गणले जाईल. [20]कारण मी तुम्हांस सांगतो की परूशी
आणि नियमशास्त्राचे शिक्षक यांच्या नीतिमत्त्वापेक्षा तुमचे
नीतिमत्त्व अधिक चांगले असल्याशिवाय तुम्ही स्वर्गाच्या
राज्यात जाणारच नाही.

## रागासंबंधी येशूची शिकवण

[21]"तुम्ही ऐकले असेल की, फार पूर्वी आपल्या लोकांना
असे सांगण्यात आले होते की, 'खून करू नका व जो
कोणी खून करतो तो न्यायदंडास पात्र ठरेल.'* [22]पण मी
तुम्हांस सांगतो की, जर एखादा आपल्या भावावर रागावला
असेल तर तो न्यायदंडास पात्र ठरेल. पुन्हा जो आपल्या
भावाला, अरे वेड्या, असे म्हणेल तो न्यायसभेच्या दंडास
पात्र ठरेल. आणि जो त्याला मूर्ख म्हणेल तो नरकातील
अग्नीच्या शिक्षेस पात्र ठरेल.
[23]"म्हणून तू आपले दान अर्पण करण्यासाठी वेदीजवळ
आणले असता जर तुझ्या भावाच्या मनात तुझ्याविरुद्ध
काही आहे असे तुला तेथे आठवले, [24]तर देवाला देण्यासाठी
आणलेले दान तेथेच वेदीपुढे ठेव. प्रथम जाऊन आपल्या
भावाबरोबर समेट कर आणि नंतर येऊन आपले दान दे.
[25]वाटेत तुझा वादी तुझ्याबरोबर आहे तोच त्याच्याशी
लगेच सलोखा कर नाहीतर कदाचित वादी तुला
न्यायाधीशाकडे नेईल व न्यायाधीश अधिकाऱ्याकडे नेईल
आणि अधिकारी तुला तुरुंगात टाकील. [26]मी तुला खरे
सांगतो तू शेवटचा पैसा देईपर्यंत तुझी सुटका मुळीच होणार
नाही.

## लैंगिक पापाविषयी येशूची शिकवण

[27]"'व्यभिचार करू नको'* असे पूर्वी सांगितल्याचे
तुम्ही ऐकले आहे, [28]परंतु मी तुम्हांस सांगतो की, जो
कोणी एखाद्या स्त्रीकडे वाकड्या नजरेने पाहतो त्याने
आपल्या मनात तिच्याशी व्यभिचार केलाच आहे. [29]जर
तुझा उजवा डोळा तुला पाप करायला प्रवृत्त करतो तर तो
काढून टाक व फेकून दे. संपूर्ण शरीर नरकात जाण्यापेक्षा
शरीराचा एखादा अवयव गमावलेला बरा. [30]जर तुझा
उजवा हात तुला पापास प्रवृत्त करतो, तर तो तोडून फेकून
दे, कारण संपूर्ण शरीर नरकात जाण्यापेक्षा शरीराचा एक
अवयव गमावलेला बरा.

## घटस्फोटाविषयी येशूची शिकवण
### *(मत्तय 19:9; मार्क 10:11-12; लूक 16:18)*

[31]"'जर एखादा मनुष्य आपल्या पत्नीला घटस्फोट देतो
तर त्याने तिला घटस्फोटाची लेखी सूचना द्यावी.'* असे
सांगितल्याचे तुम्ही जाणता. [32]पण मी तुम्हांला सांगतो की,
जो कोणी आपल्या पत्नीला व्यभिचाराच्या कारणाशिवाय
इतर कारणामुळे टाकून देतो, तो तिला व्यभिचार करण्यास
प्रवृत्त करतो आणि जो कोणी अशा घटस्फोटित स्त्रीशी
विवाह करतो तो व्यभिचार करतो.

## शपथ घेण्याविषयी येशूची शिकवण

[33]"'जेव्हा तू शपथ घेतोस तेव्हा ती तोडू नको. जी
शपथ देवाला वाहिली आहे ती खरी कर,'* असे

---

**खून करू ... ठरेल** निर्गम 20:13; अनुवाद 5:18

**व्यभिचार करू नको** निर्गम 20:14; अनुवाद 5:18

**जर ... द्यावी** अनुवाद 24:1

**जेव्हा ... कर** लेवीय 19:12; गणना 30:2; अनुवाद 23:21

सांगितल्याचे तुम्ही ऐकले आहे. 34परंतु मी तुम्हांला सांगतो
की, शपथ वाहूच नका; आकाशाची शपथ वाहू नका
कारण ते देवाचे आसन आहे. 35पृथ्वीचीही शपथ वाहू
नका कारण ती त्याच्या पायाचे आसन आहे; आणि
यरुशलेमाचीही शपथ वाहू नका, कारण त्या नगरीचा
राजा देव आहे.
36आपल्या मस्तकाचीही शपथ वाहू नका, कारण त्याचा
एखादा केसही पांढरा किंवा काळा होणे तुमच्या हाती
नाही. 37म्हणून तुमचे बोलणे 'होय' तर होय किंवा 'नाही'
एवढेच असावे. त्यापेक्षा जास्त जर असेल तर ते सैतानापासून
आहे.

## सुडासंबंधी येशूची शिकवण
### *(लूक 6:29-30)*

38"तुम्ही ऐकले आहे की असे सांगितले होते,
'डोळ्याबद्दल डोळा आणि दाताबद्दल दात.'* 39पण मी
तुम्हांला सांगतो, जो दुष्ट आहे त्याला अडवू नका, जर
कोणी तुमच्या उजव्या गालावर तुम्हांला मारील
त्याच्यासमोर दुसराही गाल पुढे करा. 40आणि जो कोणी
फिर्याद करून तुमचा अंगरखा घेऊ पाहतो त्याला तुमचा
झगाही द्या. 41जर कोणी तुम्हांला सक्तीने त्याच्याबरोबर
कांही अंतर घेऊन जाऊ इच्छितो तर त्याच्याबरोबर त्याच्या
दुप्पट अंतर जा. 42जो तुमच्याजवळ मागतो त्याला द्या
आणि जो तुमच्याकडून उसने घेऊ इच्छितो त्याला नकार
देऊ नका.

## सर्वांवर प्रेम करा
### *(लूक 6:27-28, 32-36)*

43"असे सांगितले होते की, 'आपल्या शेजाऱ्यावर प्रेम
करा* आणि आपल्या शत्रूचा द्वेष करा' असे तुम्ही ऐकले
आहे. 44पण मी तुम्हांला सांगतो, तुमच्या शत्रूवर प्रेम
करा. तुमचे जे वाईट करतात त्यांच्यासाठी प्रार्थना करा.
45जर तुम्ही असे कराल, तर तुम्ही तुमच्या स्वर्गातील
पित्याचे खरे पुत्र व्हाल. तुमचा पिता चांगल्यावर आणि
वाईटावर अशा दोघांवरही सूर्य उगवितो. चांगल्यावरही
आणि वाईटावरही पाऊस पाडतो. 46कारण जे तुमच्यावर
प्रीति करतात त्यांच्यावर तुम्ही प्रीति करीत असाल तर
तुम्हांला प्रतिफळ मिळणार नाही. जकातदारही असेच
करतात.
47आणि जर तुम्ही तुमच्या मित्रांशी चांगले वागत असाल
तर तुम्ही इतरांपेक्षा फार चांगले आहात असे समजू नका.
देवाला न मानणारे लोकही असेच करतात. 48म्हणून
जसा तुमचा स्वर्गातील पिता परिपूर्ण आहे तसे तुम्हीही
परिपूर्ण व्हा.

## दान देण्याविषयी येशूची शिकवण

6 "जेव्हा तुम्ही चांगली कृत्ये करता तेव्हा ती गाजावाजा
न करता करा. लोकांच्या नजरेत भरावी म्हणून
जर तुम्ही सत्कृत्ये करणार असाल तर लक्षात ठेवा,
तुमच्या स्वर्गातील पित्याकडून तुम्हाला तुमचे प्रतिफळ
मिळणार नाही.
2"जेव्हा तुम्ही गरिबांना देता तेव्हा त्याचा गाजावाजा
करू नका. मी खरे तेच सांगतो. ढोंगी लोक तसेच करतात.
दान देण्यापूर्वी कर्णा फुंकून लोकांचे लक्ष वेधून घेतात.
सभास्थानात व रस्त्यावर ते जाहीरपणे अशी कामे करतात,
कारण इतर लोकांनी त्यांना मोठेपणा द्यावा अशी त्यांची
इच्छा असते. मी तुम्हांस सांगतो की, ते आपले प्रतिफळ
भरून पावले आहेत. 3म्हणून जेव्हा तुम्ही गरिबाला द्याल,
तेव्हा गुपचूप द्या. तुमचा उजवा हात काय करतो हे तुमच्या
डाव्या हाताला कळू नये. 4दान गुप्त असावे, कारण तुमच्या
पित्याला ते कळते व तो त्याचे फळ देतो.

## प्रार्थनेविषयी येशूची शिकवण
### *(लूक 11:2-4)*

5"जेव्हा तुम्ही प्रार्थना करता तेव्हा ढोंग्यांसारखे होऊ
नका. कारण आपण लोकांस दिसावे म्हणून सभास्थानांमध्ये
व रस्त्याच्या कोपऱ्यांवर उभे राहून प्रार्थना करणे त्यांना
आवडते. मी तुम्हांला खरे सांगतो की, त्यांना आपले
प्रतिफळ मिळाले आहे. 6पण तुम्ही जेव्हा प्रार्थना करता
तेव्हा आतल्या खोलीत जा, दार लावून घ्या, व जो तुमचा
पिता गुप्त आहे त्याची प्रार्थना करा. मग तुमचा पिता,
ज्याला कोणी पाहू शकत नाही तो तुम्हांला प्रतिफळ
देईल.
7"आणि जेव्हा तुम्ही प्रार्थना करता तेव्हा ज्यांना देव
माहीत नाही अशासारखे होऊ नका. ते निरर्थक बडबड
करतात. कारण आपण फार बोलल्याने आपले म्हणणे
ऐकले जाईल असे त्यांना वाटते. 8त्यांच्यासारखे होऊ
नका. तुम्हाला कशाची गरज आहे हे तुम्ही सांगण्यापूर्वी
तुमच्या पित्याला ठाऊक असते. 9म्हणून जेव्हा तुम्ही
प्रार्थना करता, तेव्हा तुम्ही अशी प्रार्थना करावी:

'हे आमच्या स्वर्गातील पित्या, तुझे नाव पवित्र मानले
जावो.
10तुझे राज्य येवो; जसे स्वर्गात तसे पृथ्वीवरही तुझ्या
इच्छेप्रमाणे होवो. 11आमची रोजची भाकर आज आम्हांला
दे. 12जसे आमच्याविरूद्ध केलेल्या वाईटाची आम्ही क्षमा
करतो तसे आम्ही केलेल्या पापांची आम्हाला क्षमा कर,
13आम्हांला परीक्षेत आणू नकोस तर आम्हांला त्या
दुष्टापासून सोडीव.'

14कारण जर तुम्ही इतरांच्या चुकांची क्षमा कराल तर
तुमचा स्वर्गातील पिताही तुम्हांला क्षमा करील; 15पण

---

**डोळ्याबद्दल ... दात** निर्गम 21:24 लेवीय 24:20

**आपल्य ... करा** लेवीय 19:18

जर तुम्ही इतरांच्या चुकांची क्षमा करणार नाही, तर तुमचा पिताही तुम्हांला क्षमा करणार नाही.

### उपासाविषयी येशूची शिकवण

16“जेव्हा तुम्ही उपास करता तेव्हा तुम्ही ढोंग्यांसारखे चेहरा उदास करू नका. कारण आपण उपास करीत आहोत हे लोकांना दिसावे म्हणून ते आपली मुखे उदास करतात. मी तुम्हांला खरे सांगतो. त्यांना त्यांचे प्रतिफळ मिळाले आहे.

17तुम्ही जेव्हा उपास करता तेव्हा आपल्या डोक्याला तेल लावा आणि आपले तोंड धुवा. 18यासाठी की, तुम्ही उपास करता हे लोकांना दिसू नये तर तुमच्या गुप्त पित्याला दिसावे. मग तुमचा गुप्त पिता तुम्हांला प्रतिफळ देईल.

### पैशापेक्षा देव अधिक महत्त्वाचा आहे
### *(लूक 12:33-34; 11:34-36; 16:13)*

19“येथे पृथ्वीवर स्वत:साठी संपत्ती साठवू नका. येथे कसर व जंग लागून तिचा नाश होईल. आणि चोर घर फोडून ती चोरून नेतील. 20म्हणून स्वर्गात आपणासाठी संपत्ती साठवा. 21जेथे तुमचे धन आहे तेथे तुमचे मनही लागेल. 22डोळा शरीराचा दिवा आहे. म्हणून जर तुमचे डोळे चांगले असतील तर तुमचे सर्व शरीर प्रकाशमय होईल. 23पण जर तुमचे डोळे वाईट असतील, तर तुमचे सर्व शरीर पापाने अंधकारमय होईल. जर तुम्हाठायी असणारा अंधकार वास्तविक अंधकार आहे, तर खरोखरचा अंधार कितीतरी अंधकारमय असेल.

24““कोणालाही दोन धन्यांची चाकरी एकावेळी करणे शक्य नाही. तो एकाचा तिरस्कार करील तर दुसऱ्याशी निष्ठा राखील. किंवा तो एका धन्याचे ऐकेल व दुसऱ्याचे ऐकणार नाही. तसेच तुम्हांला देवाची आणि पैशाची (धनाची) सेवा एकाच वेळी करता येणार नाही.

### देवाच्या राज्याला प्रथमस्थान द्या
### *(लूक 12:22-34)*

25“म्हणून मी तुम्हांला सांगतो की, काय खावे आणि काय प्यावे अशी आपल्या जीवाविषयी, किंवा काय पांघरावे अशी आपल्या शरीराविषयी चिंता करू नका. जीव अन्नापेक्षा अधिक महत्त्वाचा आहे आणि शरीर वस्त्रापेक्षा अधिक महत्त्वाचे आहे.

26आकाशातील पाखरांकडे पाहा. ती पेरीत नाहीत वा कापणी करीत नाहीत किंवा गोदामात साठवूनही ठेवीत नाहीत, तरी तुमचा स्वर्गातील पिता त्यांना खावयास देतो आणि तुम्ही त्यांच्यापेक्षा अधिक मौल्यवान आहात, हे तुम्हांला माहीत आहे.

27आणि चिंता करून आपले आयुष्य थोडे देखील वाढवणे कोणाला शक्य आहे का?

28“आणि तुम्ही वस्त्राविषयी का काळजी करता? रानातील फुले पाहा, ती कशी वाढतात? ती कष्ट करीत नाहीत, आणि ती कातीतही नाहीत, 29तरी मी तुम्हांला सांगतो की, शलमोन राजादेखील त्याच्या भर ऐश्वर्याच्या काळात यांतील एखाद्या प्रमाणेही सजू शकला नव्हता. 30तर अहो अल्पविश्वासी लोकांनो, आज आहे तर उद्या भट्टीत पडते, अशा रानफुलांना जर देव असा पोशाख घालतो तर त्याहीपेक्षा विशेष असा पोशाख तुम्हांला घालणार नाही काय? 31चिंता करू नका आणि असे म्हणू नका की, ‘आम्ही काय खावे?’ किंवा ‘आम्ही काय प्यावे?’ किंवा ‘आम्ही काय पांघरावे?’ 32सर्व लोक ज्यांना देव माहीत नाही, ते सुध्दा या गोष्टी मिळविण्याचा प्रयत्न करतात, काळजी करू नका. कारण तुमच्या स्वर्गातील पित्याला तुम्हांला या गोष्टींची गरज आहे हे माहीत आहे. 33तर पहिल्यांदा तुम्ही देवाचे राज्य व त्याचे नीतिमत्त्व मिळविण्याचा प्रयत्न करा म्हणजे त्याबरोबर या सर्व गोष्टीही तुम्हांला मिळतील. 34म्हणून उद्याची चिंता करू नका. कारण प्रत्येक दिवस काही ना काही चिंता घेऊनच उगवतो. म्हणून उद्याची चिंता उद्यासाठी दूर ठेवा.

### इतरांचा न्याय करण्याविषयी येशूची शिकवण
### *(लूक 6:37-38, 41-42)*

7 “तुमचा न्याय करण्यात येऊ नये म्हणून तुम्ही इतरांचा न्याय करू नका. 2कारण ज्या न्यायाने तुम्ही इतरांचा न्याय करता त्याच न्यायाने तुमचा न्याय केला जाईल, आणि ज्या मापाने तुम्ही माप घालता त्याच मापाने तुम्हांला परत माप घालतील. 3तू आपल्या डोळ्यातील मुसळ लक्षात न घेता आपल्या भावाच्या डोळ्यातील कुसळ का पाहतोस? 4किंवा ‘तुझ्या डोळ्यातील कुसळ मला काढू दे’ असे तुझ्या भावाला कसे म्हणू शकतोस? कारण पाहा, तुझ्या डोळ्यात तर मुसळ आहे. 5अरे ढोंग्या, पहिल्यांदा तू आपल्या डोळ्यातील मुसळ काढ म्हणजे तुझ्या भावाच्या डोळ्यातील कुसळ काढायला तुला स्पष्ट दिसेल.

6“जे पवित्र ते कुत्र्यांना टाकू नका, ती उलटून तुम्हांला फाडतील आणि आपले मोती डुकरांपुढे टाकू नका; टाकाल तर ती त्यांना पायदळी तुडवतील.

### तुमच्या सर्व गरजा देवाला सांगा
### *(लूक 11:9-13)*

7“मागा म्हणजे तुम्हांला ते देण्यात येईल; शोधा आणि तुम्हांला ते सापडेल; ठोका आणि तुमच्यासाठी दार उघडले जाईल. 8कारण प्रत्येकजण जो मागतो त्याला मिळते, जो शोधतो त्याला सापडते, आणि जो ठोकावतो, त्याच्यासाठी दार उघडले जाते.

9“तुमच्यापैकी असा कोण मनुष्य आहे की, जो आपल्या मुलाने भाकर मागितली तर त्याला दगड देईल? 10किंवा मासा मागितला, तर त्याला साप देईल? 11वाईट असूनही

जर तुम्हांला आपल्या मुलांना चांगल्या गोष्टी देण्याचे कळते
तर तुमच्या स्वर्गातील पित्याकडे जे मागतात, त्यांच्या गरजा
तो किती चांगल्या प्रकारे भागवील?

## अति महत्त्वाचा नियम

12"यासाठी ज्या गोष्टी लोकांनी तुमच्यासाठी कराव्या
असे तुम्हांला वाटते त्या सर्व गोष्टी तुम्हीही त्यांच्यासाठी
करा. कारण नियमशास्त्राच्या व संदेष्टेयांच्या शिकवणीचे
सार हेच आहे.

## स्वर्गाकडे जाणारा मार्ग आणि नरकाकडे जाणारा मार्ग
## *(लूक 13:24)*

13"अरुंद दरवाजाने आत जा. कारण नाशाकडे जाण्याचा
दरवाजा रूंद आहे, व मार्ग पसरट आहे. आणि त्यातून
आत जाणारे पुष्कळ आहेत. 14पण जीवनाकडे जाण्याचा
दरवाजा अरूंद व मार्ग अडचणीचा आहे, आणि फारच
थोडयांना तो सापडतो.

## लोक काय काय करतात ते पाहा
## *(लूक 6:43-44; 13:25-27)*

15"खोट्या संदेष्ट्याविषयी सावध असा. ते गरीब मेंढराचे
रूप घेऊन तुमच्याकडे येतात. पण प्रत्यक्षात ते क्रूर
लांडग्यांसारखे आहेत. 16त्यांच्या करणीवरून तुम्ही त्यांस
ओळखाल. ज्याप्रमाणे काटेरी झाडाला द्राक्षे लागत नाहीत,
किंवा रिंगणीच्या झाडाला अंजिरे येत नाहीत, त्याचप्रमाणे
वाइटाला चांगले फळ येत नाही. 17प्रत्येक चांगले झाड
चांगली फळे देते, पण वाईट झाड वाईट फळे देते. 18चांगल्या
झाडाला वाईट फळे येणार नाहीत, आणि वाईट झाडाला
चांगली फळे येणार नाहीत. 19जे झाड चांगले फळ देत
नाही ते तोडण्यात येते व अग्नीत टाकले जाते. 20म्हणून
अशा धोकेबाज लोकांना तुम्ही त्यांच्या फळांवरून
ओळखाल. 21जो कोणी मला वरवर 'प्रभु, प्रभु' म्हणतो,
तो प्रत्येक जण स्वर्गाच्या राज्यात जाईलच असे नाही तर
माझ्या स्वर्गातील पित्याच्या इच्छेप्रमाणे जो वागेल तोच
स्वर्गाच्या राज्यात जाईल. 22त्या दिवशी मला अनेक जण
म्हणतील, 'हे प्रभु, आम्ही तुझ्या नावाने भूते काढली व
तुझ्या नावाने पुष्कळ चमत्कार केले. 23तेव्हा मी त्यांना
स्पष्ट सांगेन की, मी तुम्हांला ओळखत नाही, अहो दुराचार
करणाऱ्यांनो, माझ्यापासून चालते व्हा.

## शहाणा मनुष्य व मूर्ख मनुष्य
## *(लूक 6:47-49)*

24"जो कोणी माझ्या सांगण्याप्रमाणे आचरण करतो तो
शहाण्या माणसासारखा आहे; अशा सुज्ञ माणसाने आपले
घर खडकावर बांधले. 25मग जोराचा पाऊस झाला आणि
पूर आला. जोराचा वारा आला. वादळात घर सापडले,
पण ते पडले नाही. कारण त्याचा पाया खडकावर बांधला
होता. 26जो कोणी माझे हे शब्द ऐकून त्याप्रमाणे आचरण
करीत नाही तो कोणा एका मूर्ख माणसासारखा आहे;
त्याने आपले घर वाळूवर बांधले. 27मग जोराचा पाऊस
आला आणि पूर आला. जोराचा वारा सुटला. वादळवाऱ्यात
ते घर सापडले आणि कोसळून पडले."

28जेव्हा ह्या बोधकथा सांगण्याचे येशूने संपविले तेव्हा
लोकांचा समुदाय त्याच्या शिकवण्याने थक्क झाला.
29कारण येशू त्यांना त्यांच्या धर्मशिक्षकांप्रमाणे नव्हे, तर
अधिकारवाणीने शिकवीत होता.

## येशू एका आजारी माणसाला बरे करतो
## *(मार्क 1:40-45; लूक 5:12-16)*

8 येशू डोंगरावरून खाली आला. पुष्कळ लोक
त्याच्यामागे चालत होते. 2तेव्हा एक कुष्ठरोग झालेला
मनुष्य त्याच्याकडे येऊन वाकून त्याच्या पाया पडून
म्हणाला, "प्रभु, तुमची इच्छा असेल तर तुम्ही मला शुद्ध
करण्यास समर्थ आहात."

3मग येशूने आपला हात पुढे करून त्याला स्पर्श केला
व म्हटले, "तू शुद्ध व्हावेस अशी माझी इच्छा आहे;"
आणि ताबडतोब तो कुष्ठरोगी बरा झाला. 4"हे जे घडले
ते कुणाला सांगू नकोस, तर जाऊन स्वत:ला याजकांना
दाखव आणि तू कुष्ठरोगमुक्त झालास ह्याचे प्रमाण म्हणून
मोशेने ठरवून दिलेले अर्पण वाहून टाक. ह्यामुळे तू शुद्ध
झाल्याचे लोकांना कळेल."

## येशू सेनाधिकाऱ्याच्या नोकराला बरे करतो
## *(लूक 7:1-10; योहान 4:43-54)*

5येशू कफर्णहूम शहरास गेला. जेव्हा त्याने शहरात
प्रवेश केला, तेव्हा एक सेनाधिकारी त्याच्याकडे आला
6आणि विनंती करू लागला की, "प्रभु, माझा नोकर
पक्षाघाताने खूपच त्रासलेला आहे व तो माझ्या घरात
पडून आहे."

7येशू त्याला म्हणाला, "मी येऊन त्याला बरे करीन."

8तेव्हा सेनाधिकारी म्हणाला, "प्रभु, आपण माझ्या घरी
यावे इतकी माझी योग्यता नाही. आपण फक्त शब्द बोला
म्हणजे माझा नोकर बरा होईल. 9कारण मी स्वत: दुसऱ्या
अधिकाऱ्यांच्या हाताखाली काम करतो आणि माझ्या
हाताखाली देखील अनेक शिपाई आहेत. मी एखाद्याला
'जा' म्हणतो आणि तो जातो आणि दुसऱ्याला 'ये' म्हटल्यावर
तो येतो. मी माझ्या नोकराला 'अमूक कर' असे सांगतो
आणि तो ते करतो."

10येशूने जेव्हा हे ऐकले तेव्हा त्याला आश्चर्य वाटले
आणि जे त्याच्यामागून चालत होते, त्यांना तो म्हणाला,
"मी तुम्हांला खरे सांगतो, इस्राएलात इतका मोठा विश्वास
असलेला एकही मनुष्य मला आढळला नाही. 11मी तुम्हांला
सांगतो, पुष्कळ जण पूर्वेकडून आणि पश्चिमेकडून येतील
आणि अब्राहाम, इसहाक व याकोब यांच्यासह स्वर्गाच्या

राज्यात मेजासभोवती मेजवानीसाठी बसतील. 12परंतु जे खरे वारस आहेत, ते बाहेरच्या अंधारात टाकले जातील. तेथे रडणे व दात खाणे चालेल"

13मग येशू सेनाधिकाऱ्याला म्हणाला, "जा! तू जसा विश्वास धरलास तसे होईल." आणि त्याच क्षणी त्याचा नोकर बरा झाला.

## येशू अनेकांना बरे करतो
### *(मार्क 1:29-34; लूक 4:38-41)*

14मग येशू पेत्राच्या घरी आला. तेथे पेत्राची सासू तापाने आजारी पडली आहे, असे येशूने पाहिले. 15त्याने तिच्या हाताला स्पर्श केला तेव्हा तिचा ताप निघाला. मग ती उठून त्याची सेवा करू लागली. 16त्या संध्याकाळी लोकांनी भूतबाधा झालेल्या पुष्कळ लोकांना त्याच्याकडे आणले येशूने शब्द बोलून ती भुते घालविली व सर्व प्रकारच्या रोग्यांना बरे केले 17यशया संदेष्ट्यांच्या द्वारे जे सांगितले होते ते पूर्ण व्हावे म्हणून असे झाले. यशयाने असे म्हटले होते:

"त्याने आमच्या व्याधी स्वत:वर घेतल्या, त्याने आमचे रोग वाहिले." *यशया* 53:4

## येशूला अनुसरणे
### *(लूक 9:57-62)*

18आपल्या भोवती खूप लोक आहेत हे येशूने पाहिले तेव्हा त्याने त्यांना सरोवराच्या पलीकडे जाण्याची आज्ञा केली. 19मग एक नियमशास्त्राचा शिक्षक त्याच्याकडे आला आणि म्हणाला, "गुरुजी, आपण जेथे जाल तेथे मी आपल्या मागे येईन."

20येशू त्याला म्हणाला, "कोल्ह्यांना राहायला बिळे आणि आकाशातील पाखरांना घरटी आहेत, परंतु मनुष्याच्या पुत्राला डोके सुध्दा टेकावयास जागा नाही."

21मग येशूच्या शिष्यांपैकी आणखी एक जण येशूला म्हणाला, "प्रभु, पहिल्यांदा मला जाऊ द्या व माझ्या वडिलांना पुरून येऊ द्या. "

22पण येशू त्याला म्हणाला, "तू माझ्या मागे ये. जे मेलेले आहेत त्यांना त्यांच्या मेलेल्यांना पुरू दे."

## येशू वादळ थांबवितो
### *(मार्क 4:35-41; लूक 8:22-25)*

23मग येशू नावेत गेल्यावर त्याच्यामागून त्याचे शिष्य नावेत गेले. 24अचानक, समुद्रात इतके मोठे वादळ झाले की, नाव लाटांमध्ये पूर्णपणे गुरफटून गेली. आणि येशू तर नावेत झोपला होता. 25तेव्हा शिष्य त्याच्याकडे गेले आणि त्यांनी त्याला जागे केले व म्हटले, "प्रभु, आम्हांला वाचवा. आपण बुडत आहोत."

26येशूने उत्तर दिले, "तुम्ही विश्वासात किती उणे आहात रे? तुम्ही का घाबरता?" मग त्याने उठून वारा व लाटा यांना अधिकारवाणीने शांत होण्यास सांगितले. वारा थांबला. समुद्र अगदी शांत झाला. 27तेव्हा लोकांना मोठे आश्चर्य वाटले, ते म्हणाले, "हा कोणत्या प्रकारचा मनुष्य आहे? वारा व समुद्र देखील त्याचे ऐकतात."

## येशू दोन माणसांमधून भूते काढतो
### *(मार्क 5:1-20; लूक 8:26-39)*

28मग येशू समुद्राच्या पलीकडे असलेल्या गरदेकरांच्या देशात आला, तेव्हा दोन भूतबाधा झालेली माणसे स्मशानातून येशूकडे आली. ही माणसे स्मशानातील कबरांमध्ये राहत होती. ती फार भेसूर होती, त्यामुळे कोणीही त्यांच्या वाटेला जात नसे. 29ती दोघे येशूकडे आली व म्हणाली, "देवाच्या पुत्रा, तुला आमच्याकडून काय पाहिजे? नेमलेल्या वेळेपूर्वीच तू आम्हांला शिक्षा करायला आलास काय? "

30त्या ठिकाणापासून थोड्या अंतरावर डुकरांचा एक कळप चरत होता. 31ती भुते त्याला विनंती करून लागली, ती म्हणाली, "जर तू आम्हांला ह्यांच्यामधून काढून टाकणार असशील तर आम्हांला त्या डुकरांच्या कळपात जाऊ दे. 32तेव्हा तो त्यांना म्हणाला, "जा." मग ती त्यांच्यामधून निघून डुकरांमध्ये गेली. तेव्हा तो संपूर्ण कळप कड्यावरून खाली धावत जाऊन पाण्यात बुडाला. 33मग त्यांना चारणारे पळाले व त्यांनी नगरात जाऊन सर्वांना हे वर्तमान, तसेच भूतबाधा झालेल्यांचे काय झाले तेही सांगितले. 34तेव्हा सर्व शहर येशूला भेटायला निघाले; आणि जेव्हा त्यांनी त्याला पाहिले तेव्हा येशूने त्यांच्या प्रदेशातून निघून जावे अशी विनंती त्यांनी त्याला केली.

## येशू एका पक्षाघाती मनुष्याला बरे करतो
### *(मार्क 2:1-12; लूक 5:17-26)*

9 येशू नावेत चढला व परत आपल्या नगरात गेला. 2तेव्हा काही लोकांनी पक्षघात झालेल्या मनुष्याला येशूकडे आणले. तो मनुष्य बाजेवर पडून होता. येशूने त्यांचा विश्वास पाहून त्या पक्षघाती मनुष्याला म्हटले, "तरुण मुला, काळजी करू नकोस. तुझ्या पापांची क्षमा झाली आहे." 3नियमशास्त्राच्या काही शिक्षकांनी हे ऐकले आणि ते आपसात म्हणाले, "हा मनुष्य तर ईश्वराची निंदा करीत आहे."

4त्यांचे विचार ओळखून येशू म्हणाला, "तुमच्या अंत:करणात तुम्ही वाईट विचार का करता? 5कारण, तुझ्या पापांची क्षमा झाली आहे असे म्हणणे, किंवा उठून चालू लाग, असे म्हणणे यातून कोणते सोपे आहे? 6परंतु तुम्ही हे समजून घ्यावे की, मनुष्याच्या पुत्राला, पृथ्वीवर पापाची क्षमा करण्याचा अधिकार आहे." मग येशू त्या पक्षघाती मनुष्याला म्हणाला, "ऊठ! आपला बिछाना घे

आणि घरी जा." 7मग तो उठून आपल्या घरी गेला.
8लोकांनी हे पाहिले व ते थक्क झाले आणि ज्या देवाने
मनुष्यास असा अधिकार दिला त्याचा त्यांनी गौरव केला.

## येशू मत्तयाची निवड करतो
### *(मार्क 2:13-17; लूक 5:27-32)*

9मग येशू तेथून पुढे निघाला, तेव्हा त्याने मत्तय नावाच्या
माणसाला जकातीच्या नाक्यावर बसलेले पाहिले. तेव्हा
येशू त्याला म्हणाला, "माझ्यामागे ये." तेव्हा तो उठून
त्याच्यामागे गेला. 10येशू मत्तयाच्या घरी जेवत असता,
पुष्कळ जकातदार व पापी आले आणि येशू व त्याचे
शिष्य यांच्याबरोबर जेवायला बसले.

11परूशांनी ते पाहिले. त्यांनी येशूच्या शिष्यांस विचारले,
"तुमचा गुरू जकातदार व पापी यांच्याबरोबर का जेवतो?"
12येशूने त्यांना हे बोलताना ऐकले, तो त्यांना म्हणाला,
"जे निरोगी आहेत त्यांना वैद्याची गरज नाही तर जे आजारी
आहेत त्यांना आहे. 13मी तुम्हांला सांगतो, जा आणि याचा
अर्थ काय ते शिका: 'मला यज्ञपशूंची अर्पणे नकोत, तर
दया हवी.' मी नीतिमान लोकांना नव्हे, तर पापी लोकांना
बोलावण्यास आलो आहे."*

## येशू इतर धार्मिक यहुद्यांसारखा नाही
### *(मार्क 2:18-22; लूक 5:33-39)*

14मग योहानाचे शिष्य त्याच्याकडे आले आणि त्यांनी
त्याला विचारले, "आम्ही व परूशी पुष्कळ वेळा उपास
करतो. पण तुझे शिष्य उपास करीत नाहीत. ते का?"

15येशूने त्यांना उत्तर दिले, "नवरा मुलगा (वर) सोबत
असताना त्याचे वऱ्हाडी दुःखी कसे राहतील? अशी वेळ
येईल जेव्हा नवऱ्या मुलाला त्यांच्यापासून दूर केले
जाईल तेव्हा ते उपास करतील. 16कोणी नव्या कापडाचे
ठिगळ जुन्या कापडाला लावीत नाही, कारण ते ठिगळ
त्या कापडापासून निघून जाईल व छिद्र अधिक मोठे
होईल. 17तसेच नवा द्राक्षारस जुन्या कातडी पिशवीत कोणी
घालीत नाहीत, घातला तर पिशव्या फुटतात व त्यांचा
नाश होतो. म्हणून लोक नवा द्राक्षारस नव्या पिशव्यात
घालतात, तेव्हा दोन्हीही चांगले राहतात."

## येशू मृत मुलीला जीवंत करतो आणि आजारी स्त्रीला बरे करतो
### *(मार्क 5:21-43; लूक 8:40-56)*

18येशू या बोधकथा सांगत असता यहुद्यांच्या सभास्थानाचा
एक अधिकारी त्याच्याकडे आला व येशूच्या पाया पडून
म्हणाला, "माझी मुलगी आताच मेली आहे. परंतु आपण
येऊन आपल्या हाताचा स्पर्श केला तर ती पुन्हा जिवंत
होईल."

19तेव्हा येशू व त्याचे शिष्य त्या सेनाधिकाऱ्याबरोबर
निघाले. 20वाटेत बारा वर्षांपासून रक्तस्राव असलेली एक
स्त्री मागून येऊन येशूच्या जवळ पोहोंचली व त्याच्या
वस्त्राला शिवली. 21कारण तिने आपल्या मनात म्हटले,
"मी केवळ त्याच्या वस्त्राला शिवले तरी बरी होईन."
22तेव्हा येशू मागे वळून तिला पाहून म्हणाला, "बाई काळजी
करू नकोस! तुझ्या विश्वासाने तुला बरे केले आहे."
आणि ती स्त्री त्याच क्षणी बरी झाली.

23मग येशू त्या यहुदी सभास्थानाच्या अधिकाऱ्याच्या
घरात आला. तेव्हा त्याने बासरी वाजविणाऱ्या व गोंधळ
करणाऱ्या जमावाला पाहिले. 24येशू म्हणाला, "जा, मुलगी
मेलेली नाही, ती झोपेत आहे." तेव्हा लोक येशूला
हसले. 25मग त्या जमावाला बाहेर पाठविल्यावर त्याने
आत जाऊन तिचा हात आपल्या हातात घेतला आणि ती
मुलगी उठली. 26आणि ही बातमी त्या प्रांतात पसरली.

## येशू आणखी लोकांना बरे करतो

27तेव्हा येशू तेथून जात असता दोन आंधळे त्याच्यामागे
ओरडत चालले. म्हणू लागले, "दाविदाच्या पुत्रा, आम्हांवर
दया करा."

28येशू आत गेला तेव्हा ते आंधळेही आत गेले. त्याने
त्यांना विचारले, "मी तुम्हांला दृष्टि देऊ शकेन असा
तुमचा विश्वास आहे का?"

"होय, प्रभु," त्यांनी उत्तर दिले.

29मग त्याने त्यांच्या डोळ्यांना स्पर्श केला आणि म्हणाला,
"तुमच्या विश्वासाप्रमाणे तुमच्या बाबतीत घडो." 30आणि
त्यांना पुन्हा दृष्टि आली. येशूने त्यांना सक्त ताकीद दिली,
"पाहा, हे कोणाला कळू देऊ नका." 31परंतु ते बाहेर
गेले आणि त्यांनी त्या प्रदेशात सगळीकडे ही बातमी
पसरविली. 32मग ते दोघे निघून जात असताना लोकांनी
एका भूतबाधा झालेल्या माणसाला येशूकडे आणले. 33जेव्हा
येशूने त्यामधून भूत काढून टाकले तेव्हा पूर्वी मुका
असलेला तो मनुष्य बोलू लागला. लोकांना ह्याचे आश्चर्य
वाटले व ते म्हणाले, "इस्राएलमध्ये याआधी असे कधीही
झालेले पाहण्यात आले नाही."

34परंतु परूशी म्हणाले, "हा भूतांच्या अधिपतीच्या
साहाय्याने भुते काढतो."

## येशूला असहाय लोकांविषयी कळवळा वाटतो

35येशू त्यांच्या सभास्थानांमध्ये शिक्षण देत व राज्याचे
शुभवर्तमान गाजवीत आणि सर्व प्रकारचे रोग व सर्व
प्रकारचे आजार बरे करीत सर्व नगरातून व सर्व खेड्यातून
फिरला. 36आणि जेव्हा त्याने त्रासलेल्या असहाय लोकांचे
समुदाय पाहिले तेव्हा त्याला त्यांचा कळवळा आला. कारण
मेंढपाळ नसलेल्या मेंढरांसारखे ते कष्टी व पांगलेले होते.
37तो आपल्या शिष्यांस म्हणाला, "पीक खरोखर फार
आहे, पण कामकरी थोडे आहेत. 38म्हणून तुम्ही पिकाच्या

---

**मला ... आहे** होशेय 6:6

प्रभूची प्रार्थना करा यासाठी की, त्याने आपल्या पिकाची
कापणी करायला कामकरी पाठवावेत."

## येशू त्याच्या प्रेषितांना उपदेश करायला पाठवितो
### (*मार्क 3:13-19; 6:7-13; लूक 6:12-16; 9:1-6*)

10 येशूने आपल्या बारा शिष्यांना आपल्याजवळ
बोलाविले, आणि त्याने त्यांना भुते घालविण्याचा
अधिकार दिला. तसेच प्रत्येक आजार व दुखणी बरे
करण्याचा अधिकार दिला. 2बारा प्रेषितांची नावे अशी
आहेत: पेत्र (ज्याला शिमोन म्हणत), आणि त्याचा भाऊ
अंद्रिया, जब्दीचा मुलगा याकोब व त्याचा भाऊ योहान,
3फिलीप्प व बर्थलमय, थोमा आणि जकातदार मत्तय,
अल्फीचा मुलगा याकोब व तद्दय, 4शिमोन कनानी व
पुढे ज्याने त्याचा विश्वासघात केला तो यहूदा इस्कार्योत.
5या बाराजणांना पुढील सूचना देऊन पाठविण्यात आले:
"यहुदीतर लोकांमध्ये जाऊ नका व शोमरोनी लोकांच्या
कोणत्याही नगरात प्रवेश करू नका. 6तर त्याऐवजी
इस्राएलच्या हरवलेल्या मेंढरांकडे जा. 7तुम्ही जाल तेव्हा
हा संदेश जाहीर करा: 'स्वर्गाचे राज्य जवळ आले आहे'
8रोग्यांना बरे करा, मृतांना उठवा. कुष्ठरोग्यांना शुद्ध
करा, भुते काढा, तुम्हांला फुकट मिळाले आहे म्हणून
फुकट द्या. 9तुमच्या कमरेला सोने, चांदी किंवा तांबे घेऊ
नका. 10सोबत पिशवी घेऊ नका, तुमच्या प्रवासासाठी
फक्त तुमचे अंगावरचे कपडे असू द्या व पायातील वहाणा
असू द्या. अधिकचे वस्त्र किंवा वहाणा घेऊ नका. काठी
घेऊ नका, कारण काम करणाऱ्याच्या गरजा भागणे
आवश्यक आहे. 11ज्या कोणत्याही नगरात किंवा खेड्यात
तुम्ही जाल, तेथे कोण योग्य व्यक्ति आहे याचा शोध करा
आणि तेथून निघेपर्यंत त्या व्यक्तीच्या घरी राहा. 12त्या
घरात प्रवेश करतेवेळी 'येथे शांति नांदो' असे म्हणा.
13जर ते घर खरोखर योग्य असेल तर तुमची शांति तेथे
राहील पण जर ते घर योग्य नसेल तर तुमची शांति
तुमच्याकडे परत येईल. 14आणि जो कोणी तुम्हांला
स्वीकारणार नाही किंवा तुमचे शब्द ऐकणार नाही तेव्हा
त्याच्या घरातून किंवा नगरातून बाहेर पडताना तुम्ही
आपल्या पायाची धूळ झटकून टाका. 15मी तुम्हांला खरे
सांगतो. न्यायाच्या दिवशी त्या नगरापेक्षा सदोम आणि
गमोराला अधिक सोपे जाईल.

## येशू छळाविषयी सावध करतो
### (*मार्क 13:9-13; लूक 21:12-17*)

16"लांडग्यांमध्ये जसे मेंढरास पाठवावे तसे मी तुम्हांस
पाठवीत आहे, म्हणून तुम्ही सापांसारखे चतुर आणि
कबुतरांसारखे सरळ स्वभावी असा. 17माणसांविषयी सावध
असा, कारण ते तुम्हांला न्यायसभेच्या स्वाधीन करतील
आणि त्यांच्या सभास्थानांमध्ये ते तुम्हांला फटके मारतील.
18माझ्यामुळे ते तुम्हांला राज्यपाल व राजे यांच्यासमोर
आणतील. तुम्ही त्यांच्यापुढे व यहूदीतर लोकांसमोर
माझ्याविषयी सांगाल. 19जेव्हा तुम्हांला अटक करतील
तेव्हा काय बोलावे किंवा कसे बोलावे याविषयी काळजी
करू नका. त्यावेळेला तुम्ही काय बोलायचे ते सांगितले
जाईल. 20कारण बोलणारे तुम्ही नसून तुमच्या पित्याचा
आत्मा तुमच्याद्वारे बोलेल.
21"भाऊ आपल्या भावाविरुद्ध व पिता आपल्या
मुलाविरुद्ध उठेल आणि त्याला विश्र्वासघाताने मारण्यास
सोपवून देईल. मुले आईवडिलांविरुद्ध उठून त्यांना जिवे
मारण्यास देतील. 22माझ्यामुळे सर्व तुमचा द्वेष करतील.
पण शेवटपर्यंत जो टिकेल तोच तरेल. 23एका ठिकाणी
जर तुम्हांला त्रास दिला जाईल, तर दुसरीकडे जा. मी
तुम्हांला खरे सांगतो मनुष्याचा पुत्र येईपर्यंत इस्राएलच्या
सर्व गावांमध्ये तुमचे असे फिरणे संपणार नाही.
24"विद्यार्थी त्याच्या शिक्षकापेक्षा वरचढ नाही, किंवा
नोकर मालकाच्या वरचढ नाही. 25विद्यार्थी आपल्या
शिक्षकासारखा व नोकर आपल्या मालकासारखा होणे,
इतके पुरे. जर घराच्या धन्याला त्यांनी बालजबूल म्हटले
तर घरातील इतर माणसांना ते किती वाईट नावे ठेवतील!"

## लोकांचे नको तर देवाचे भय बाळगा
### (*लूक 12:2-7*)

26"म्हणून त्यांना भिऊ नका, कारण उघडे होणार
नाही असे काही झाकलेले नाही आणि कळणार नाही
असे काही गुप्त नाही. 27जे मी तुम्हांला अंधारात सांगतो
ते तुम्ही प्रकाशात बोला, आणि कानात सांगितलेले जे
तुम्ही ऐकता ते तुम्ही छपरावरून गाजवा. 28जे शरीराला
वधतात पण आत्म्याचा वध करू शकत नाहीत त्यांना
भिऊ नका, तर त्यापेक्षा आत्म्याला व शरीराला जो मारू
शकतो व नरकात टाकू शकतो त्याला भ्या. 29दोन चिमण्या
एका पैशाला विकत नाहीत का? तरीही तुमच्या पित्याच्या
इच्छेशिवाय त्यातील एकही जमिनीवर पडणार नाही.
30"आणि तुमच्या डोक्यावरचे केससुद्धा त्याने मोजलेले
आहेत. 31म्हणून घाबरू नका. पुष्कळ चिमण्यांपेक्षा तुम्ही
अधिक मौल्यवान आहात.
32"जो कोणी मनुष्यांसमोर मला स्वीकारील त्याला
मीसुद्धा माझ्या स्वर्गातील पित्यासमोर स्वीकारीन. 33पण
जो कोणी मनुष्यांसमोर मला नाकारील त्याला मी सुद्धा
माझ्या स्वर्गातील पित्यासमोर नाकारीन.34असे समजू नका
की मी पृथ्वीवर शांति करायला आलो आहे; मी शांति
स्थापित करायला आलो नाही तर तलवार चालवायला
आलो आहे. 35–36मी फूट पाडायला आलो आहे,

'म्हणजे मुलाला त्याच्या पित्याविरुद्ध आणि मुलीला
तिच्या आईविरुद्ध सुनेला तिच्या सासूविरुद्ध उभे करायला
आलो आहे. सारांश मनुष्याच्या घरचीच माणसे त्याचे शत्रू
होतील.' *मीखा 7:6*

37“जो माझ्यापेक्षा स्वत:च्या पित्यावर किंवा आईवर अधिक प्रीति करतो, तो मला योग्य नाही. जो माझ्यापेक्षा आपल्या मुलावर, मुलीवर अधिक प्रीति करतो, तो मला योग्य नाही. 38जो आपला वधस्तंभ घेऊन माझ्यामागे येण्याचे नाकारतो, तो मला योग्य नाही. 39जो आपला जीव मिळवितो तो त्याला गमावील पण जो माझ्याकरिता आपला जीव गमावतो तो त्याला मिळवील. 40जी व्यक्ति तुम्हांला स्वीकारते ती व्यक्ति मला स्वीकारते आणि ज्या पित्याने मला पाठविले त्यालाही स्वीकारते. 41जो कोणी संदेष्ट्यांचा स्वीकार त्याच्या संदेशाच्या सेवेमुळे करतो, त्याला संदेष्ट्याचे प्रतिफळ मिळेल, आणि जो धार्मिकाचा स्वीकार त्याच्या धार्मिकतेसाठी करतो, त्याला धार्मिकाचे प्रतिफळ मिळेल. 42मी तुम्हांला खरे सांगतो की, जो कोणी शिष्यांच्या नावाने या लहानातील एकाला केवळ प्यालाभर थंड पाणी प्यायला देईल तो आपल्या प्रतिफळाला मुळीच मुकणार नाही.”

## येशू आणि बाप्तिस्मा करणारा योहान
### *(लूक 7:18-35)*

11 येशूने त्याच्या बारा शिष्यांना ह्या गोष्टी सांगण्याचे संपविल्यावर तो तेथून निघाला आणि गालील प्रांतातील गावांमध्ये फिरून शिकवू आणि उपदेश करू लागला. 2बाप्तिस्मा करणारा योहान तुरूंगात होता. त्याने ख्रिस्त करीत असलेल्या गोष्टींविषयी ऐकले. तेव्हा योहानाने काही शिष्यांना येशूकडे पाठविले. 3आणि त्याला विचारले, “जो येणार होता, तो तूच आहेस? किंवा आम्ही दुसऱ्याची वाट पाहावी?”

4येशूने उत्तर दिले, “जे तुम्ही ऐकता व पाहता ते योहानाला जाऊन सांगा. 5आंधळे पाहू शकतात. पांगळे चालतात. कुष्ठरोगी शुद्ध केले जातात, बहिरे ऐकतात, मेलेले उठविले जातात व गरिबांना सुवार्ता सांगण्यात येते. 6धन्य तो पुरुष जो माझ्यामुळे अडखळत नाही.”

7मग ते जात असता येशू योहानाविषयी लोकांशी बोलू लागला, “तुम्ही वैराण प्रदेशात काय पाहायला गेला होता? वाऱ्याने हलविलेला बोरू काय? 8तुम्ही काय पाहायला गेला होता? तलम वस्त्र घातलेल्या माणसाला पाहायला गेला होता काय? तलम वस्त्र घालणारे राजांच्या राजवाड्यात असतात. 9तर मग तुम्ही बाहेर कशाला गेला होतात? संदेष्ट्याला पाहायला काय? होय. मी तुम्हांला सांगतो, आणि संदेष्ट्यांपेक्षा अधिक असा योहान होता. 10त्याच्याविषयी असे लिहिण्यात आले आहे:

‘पाहा, मी माझ्या दूताला तुझ्यापुढे पाठवितो तो तुझ्यासाठी मार्ग तयार करील.’ *मलाखी* 3:1

11मी तुम्हांला खरे सांगतो की, स्त्रियांपासून जन्मलेल्यांमध्ये बाप्तिस्मा करणारा योहान याच्यापेक्षा मोठा असा कोणी झाला नाही, तरीही स्वर्गाच्या राज्यात जो अगदी लहान आहे तो त्याच्यापेक्षा मोठा आहे. 12बाप्तिस्मा करणाऱ्या योहानाच्या काळापासून आतापर्यंत लोक स्वर्गाच्या राज्याचा स्वीकार व प्रसार प्रभावीपणे करीत आहेत. 13कारण योहानापर्यंत सर्व संदेष्टे व नियमशास्त्र यांनी संदेश दिले. 14आणि जर तुम्ही ते स्वीकारण्यास तयार असाल तर येणारा एलीया तो हाच आहे. 15ज्याला ऐकायला कान आहेत तो ऐको.

16“या पिढीला मी कोणती उपमा देऊ? जी मुले बाजारात बसून आपल्या सोबत्यांना हाक मारतात त्यांच्यासारखी ही पिढी आहे. 17ती म्हणतात,

‘आम्ही तुमच्यासाठी संगीत वाजविले तरी तुम्ही नाचला नाहीत, आम्ही विलाप केला तरी तुम्ही ऊर बडवून घेतले नाही.’

18योहान काही न खाता व पिता आला, पण ते म्हणतात ‘त्याला भूत लागले आहे’, 19इतरांप्रमाणेच मनुष्याचा पुत्र खात पीत आला. लोक म्हणतात, ‘पाहा हा किती खातो? किती पितो? जकातदार व पापी लोकांचा मित्र,’ परंतु ज्ञानाची योग्यता त्याच्याद्वारे घडणाऱ्या योग्य गोष्टींमुळे ठरते.”

## जे विश्वास ठेवीत नाहीत त्यांच्यापासून येशू लोकांना सावध करतो
### *(लूक 10:13-15)*

20तेव्हा ज्या नगरांमध्ये त्याने सर्वात जास्त चमत्कार केले होते त्या नगरांतील लोकांनी पश्चात्ताप केला नाही, म्हणून येशूने त्यांना दोष दिला. 21“हे खोराजिना, तुझा धिक्कार असो! हे बेथसैदा तुझा धिक्कार असो! कारण तुमच्यामध्ये जी पराक्रमाची कृत्ये करण्यात आली ती जर सोर व सिदोन यांच्यामध्ये केली असती तर त्यांनी त्वरेने पूर्वीच गोणपाट नेसून व अंगाला राख फासून पश्चात्ताप केला असता. 22पण मी तुम्हांला सांगतो की, न्यायाच्या दिवशी सोर व सिदोन यांना तुमच्यापेक्षा अधिक सोपे जाईल. 23आणि तू कफर्णहूमा, तू आकाशापर्यंत उंच होशील काय? तू नरकापर्यंत खाली जाशील, कारण जे चमत्कार तुझ्यामध्ये करण्यात आले ते जर सदोमात करण्यात आले असते तर ते शहर आतापर्यंत टिकले असते. 24पण मी तुम्हांस सांगतो की, न्यायाच्या दिवशी तुमच्यापेक्षा सदोम नगराला सोपे जाईल.”

## येशू त्याच्या लोकांना विश्रांति देतो
### *(लूक 10:21-22)*

25मग येशू म्हणाला, “हे पित्या, आकाशाच्या व पृथ्वीच्या प्रभु मी तुझे उपकार मानतो. कारण तू या गोष्टी ज्ञानी व

बुद्धिमान लोकांपासून गुप्त ठेवून बालकांना प्रकट केल्या.
26होय पित्या, तू हे केलेस, कारण खरोखर तुला असेच
करायचे होते. 27माझ्या पित्याने मला सर्व काही दिले
आहे. आणि पित्यावाचून कोणी पुत्राला ओळखीत नाही,
आणि पुत्रावाचून व ज्याला प्रगट करायची पुत्राची
इच्छा आहे त्याच्याशिवाय कोणीही पित्याला ओळखीत
नाही. 28जे थकलेले व ओझ्याने लादलेले असे सर्व तुम्ही
मजकडे या आणि मी तुम्हांला विश्रांति देईन. 29माझे जू
आपणांवर घ्या; माझ्यापासून शिका, म्हणजे तुमच्या
आत्म्यास विश्रांति मिळेल. 30कारण माझे जू सोपे आहे
आणि माझे ओझे हलके आहे.”

### काही यहूदी येशूवर टीका करतात
***(मार्क 2:23-28; लूक 6:1-5)***

12 त्या दिवशी म्हणजे शब्बाथ* दिवशी येशू धान्याच्या
शेतातून चालला होता. शेतात पीक उभे होते.
येशूच्या शिष्यांना भूक लागली होती, म्हणून ते कणसे
मोडून खाऊ लागले. 2जेव्हा परूश्यांनी हे पाहिले, तेव्हा
ते येशूला म्हणाले, “पाहा, तुमचे शिष्य शब्बाथ दिवशी जे
करू नये ते करीत आहेत.” 3तेव्हा त्याने त्यांना म्हटले,
“दाविदाला व त्याच्याबरोबरच्या माणसांना भूक लागली
तेव्हा त्याने काय केले, हे तुम्ही वाचले आहे काय?
4देवाच्या मंदिरात तो गेला आणि त्याने व त्याच्या बरोबर
असलेल्या लोकांनी समर्पित केलेल्या भाकरी खाल्ल्या.
असे करणे नियमशास्त्राच्या विरुद्ध होते. फक्त याजकांनाच
ती भाकर खाण्याची परवानगी होती. 5आणि तुम्ही
नियमशास्त्र वाचले आहे की, प्रत्येक शब्बाथाच्या दिवशी
मंदिरातील याजक मंदिरात शब्बाथ पवित्र पाळण्याविषयीचा
नियम मोडीत असत परंतु ते तसे करू शकत असत. 6मी
तुम्हांला सांगतो की, मंदिरापेक्षा महान असा कोणीतरी
येथे आहे. 7पवित्र शास्त्र म्हणते, ‘मला यज्ञपशूंची अर्पणे
नकोत, तर मला दया हवी.’* याचा खरा अर्थ तुम्हांला
समजला असता तर तुम्ही या निर्दोष लोकांना दोष लावला
नसता. 8कारण मनुष्याचा पुत्र शब्बाथाचा प्रभु आहे.”

### येशू हात वाळलेल्या माणसाला बरे करतो
***(मार्क 3:1-6; लूक 6:6-11)***

9येशूने ते ठिकाण सोडले व यहूद्यांच्या सभास्थानात तो
गेला. 10सभास्थानात हात वाळलेला एक मनुष्य होता.
काही यहूद्यांनी येशूवर काही दोषारोप करता यावा या
हेतूने त्याला विचारले, “शब्बाथ दिवशी रोग बरे करणे
योग्य आहे काय?” 11येशूने त्यांना उत्तर दिले, “जर
तुमच्यापैकी एखाद्याकडे मेंढरू असेल व शब्बाथ दिवशी
ते खड्ड्यात पडले, तर तो त्याला वर काढणार नाही
काय? 12तर मग मनुष्य मेंढरापेक्षा कितीतरी अधिक
मौल्यवान आहे. म्हणून नियमशास्त्र लोकांना शब्बाथ
दिवशी चांगले करण्याची मोकळीक देते.”
13मग येशू त्या वाळलेल्या हाताच्या मनुष्याला म्हणाला,
“तुझा हात पुढे सरळ कर”. त्या मनुष्याने हात लांब केला
व तो हात बरा झाला आणि दुसऱ्या हातासारखाच चांगला
झाला. 14नंतर परुश्यांनी बाहेर जाऊन त्याला कसे मारावे
याविषयी मसलत केली.

### येशू देवाचा निवडलेला सेवक

15परूशी काय करीत आहेत ते येशूला माहीत होते.
म्हणून येशू तेथून गेला. पुष्कळ लोक येशूच्या मागे निघाले
व त्याने जे कोणी रोगी होते, त्या सर्वांना बरे केले.
16आणि त्याने त्यांना निक्षून सांगितले की, ‘तो कोण
आहे, हे इतरांना सांगू नका.’ 17यशया संदेष्ट्याच्या द्वारे जे
सांगितले गेले होते ते पूर्ण होण्यासाठी त्याने असे म्हटले.

18“हा माझा सेवक, याला मी निवडले आहे. मी त्याजवर
प्रीति करतो, आणि त्याच्याविषयी मला संतोष वाटतो. मी
आपला आत्मा त्याच्यावर ठेवीन, आणि तो यहूदीतरांसाठी
योग्य न्यायाची घोषणा करील.
19तो वाद घालणार नाही किंवा ओरडणार नाही;
रस्त्यावर लोक त्याचा आवाज ऐकणार नाहीत
20वाकलेला बोरू तो मोडणार नाही आणि मंदावलेली
वात तो विझविणार नाही. योग्य निर्णयाचा विजय होईपर्यंत
तो असे करील.
21सर्व लोक त्याच्यावर आशा ठेवतील.”

*यशया* 42:1-4

### येशूचे सामर्थ्य देवाकडून आहे
***(मार्क 3:20-30; लूक 11:14-23; 12:10)***

22मग काही माणसांनी एकाला येशूकडे आणले. तो
मनुष्य आंधळा व मुका होता व त्याच्यामध्ये भूत होते.
येशूने त्या माणसाला बरे केले व तो बोलू लागला व पाहू
लागला. 23सर्व लोक चकित झाले, ते म्हणाले, “हा
दाविदाचा पुत्र असेल काय?” 24परुश्यांनी लोकांना हे
बोलताना ऐकले. परूशी म्हणाले, “भुते काढण्यासाठी
येशू बालजबूल सैतानाचे सामर्थ्य वापरतो आणि बालजबूल
हा तर भुतांचा प्रमुख आहे.”
25परूशी कसला विचार करीत आहेत ते येशूला जाणवत
होते. म्हणून येशू त्यांना म्हणाला, “आपसात लढणारी
राज्ये नाश पावतात व फूट पडलेले शहर किंवा घर
टिकत नाही. 26आणि जर सैतानच सैतानाला काढतो तर
त्यांच्यात मतभेद आहे, त्यांच्यात फूट आहे मग त्याचे
राज्य कसे टिकेल? 27आणि मी जर बालजबुलाच्या

---

**शब्बाथ** यहूदी कॅलेंडरप्रमाणे आठवड्याचा सातवा दिवस. यहूदी लोकांकरिता तो एक विशेष धार्मिक दिवस समजला जात असे.

**मला ... दया हवी** होशेय 6:6

सहय्याने भुते काढतो तर तुमची मुले कोणाच्या सामर्थ्याने
भुते काढतात. म्हणून तुमचे स्वत:चे लोक तुम्हांला चूक
ठरवितील. 28परंतु मी जर देवाच्या साहाय्याने भुते काढतो
तर देवाचे राज्य तुमच्यापर्यंत आले आहे हे निश्चित समजा.
29“किंवा एखाद्या बलवान मनुष्याच्या घरात शिरून,
त्याच्या घरातील सर्व वस्तूंची चोरी जर कोणाला करायची
असेल तर प्रथम त्या बलवान मनुष्याला तो बांधून टाकील
व मग तो चोरी करील. 30एखादा मनुष्य जर माझे समर्थन
करीत नसेल, तर तो माझ्याविरुद्ध आहे. जो मनुष्य
माझ्याबरोबर काम करीत नाही तो माझ्याविरुद्ध काम
करीत आहे. 31म्हणून मी तुम्हांला सांगतो, मनुष्यांना ते
करीत असलेल्या सर्व पापांची क्षमा करण्यात येईल. ते जे
काही वाईट बोलतील त्याबद्दलही क्षमा करण्यात येईल
पण जर कोणी पवित्र आत्म्याविरुद्ध बोलेल, तर त्याला
क्षमा करण्यात येणार नाही. 32एखादा मनुष्य जर मनुष्याच्या
पुत्राविरुद्ध काही बोलेल तर त्याला क्षमा करण्यात येईल
पण जो कोणी पवित्र आत्म्याविरुद्ध बोलेल त्याला क्षमा
होणार नाही. त्याला या काळीही क्षमा होणार नाही व
भविष्यातही होणार नाही.

### ज्या गोष्टी तुम्ही करता त्या तुम्ही कोण आहात हे दाखवितात
### *(लूक 6:43-45)*

33“जर तुम्हांला चांगले फळ हवे असेल, तर झाड
चांगले करा. जर तुम्ही झाड चांगले करणार नाही, तर
फळही चांगले येणार नाही. कारण झाड त्याच्या फळावरून
ओळखले जाते. 34अहो सापाच्या पिल्लांनो, तुम्ही वाईट
असता तुम्हांला चांगल्या गोष्टी कशा बोलता येतील? जे
अंत:करणात आहे तेच तोंडावाटे बाहेर पडते. 35चांगला
मनुष्य आपल्या चांगल्या भांडारातून चांगल्या गोष्टी काढतो
आणि वाईट माणूस आपल्या वाईट भांडारातून वाईट गोष्टी
काढतो. 36आणखी मी तुम्हांस सांगतो की. जो प्रत्येक
व्यर्थ शब्द लोक बोलतील त्याचा हिशेब ते न्यायाच्या
दिवशी देतील. 37कारण तू आपल्या बोलण्यावरून न्यायी
ठरशील आणि आपल्या बोलण्यावरूनच दोषी ठरशील.”

### यहूदी लोक येशूकडे पुरावा मागतात
### *(मार्क 8:11-12; लूक 11:29-32)*

38काही नियमशास्त्राचे शिक्षक व परूशी यांच्यापैकी
काही जणांनी येशूला म्हटले, “गुरूजी, तुमच्या हातून एखादे
चिन्ह पहावे अशी आमची इच्छा आहे.”
39येशूने उत्तर दिले, “जे लोक देवाशी प्रामाणिक नाहीत,
पापी आहेत असे लोक पुराव्यासाठी चमत्कार पाहू
इच्छितात. पण योना संदेष्ट्याशिवाय दुसेर चिन्ह तुम्हांला
मिळणार नाही. 40कारण योना जसा तीन दिवस व तीन
रात्री माशाच्या पोटात होता तसा मनुष्याचा पुत्र तीन दिवस
व तीन रात्री पृथ्वीच्या पोटात राहील. 41जेव्हा तुमच्या
पिढीचा न्याय होईल, तेव्हा निनवेचे लोक उभे राहतील,
तुमच्याविरूद्ध साक्ष देतील आणि तुम्हांला दोष देतील.
कारण त्यांनी योनाच्या उपदेशावरून पश्चात्ताप केला.
आणि आता तर तुमच्यामध्ये योनापेक्षा महान असा कोणी
एक येथे आहे. 42न्यायाच्या दिवशी दक्षिणेची राणी* या
पिढीबरोबर उभी राहून हिला दोषी ठरवील. कारण
शलमोनाचे ज्ञान ऐकायला ती पृथ्वीच्या शेवटापासून आली.
आणि शलमोनापेक्षा महान असा कोणी येथे आहे!

### सध्याचे लोक पापी आहेत
### *(लूक 11:24-26)*

43“जेव्हा अशुद्ध आत्मा माणसाला सोडून बाहेर निघून
जातो तेव्हा तो पाणी नसलेल्या ठिकाणाहून विसावा शोधीत
फिरतो पण तो त्याला मिळत नाही. 44तेव्हा तो म्हणतो,
‘जेथून मी आलो त्या माझ्या घरात मी परत जाईन’ आणि
जेव्हा तो परत येतो तेव्हा ते घर रिकामे असलेले तसेच
स्वच्छ व नीटनेटके असे त्याला दिसते. 45नंतर तो जाऊन
आपल्यापेक्षा वाईट असे दुसरे सात आणखी आत्मे
आपल्याबरोबर घेतो व ते आत शिरून त्याला झपाटतात
व त्याच्यात राहतात. मग त्या माणसाची शेवटची स्थिति
पहिल्यापेक्षा वाईट होते. तसेच आजच्या ह्या पापी पिढीचे
होईल.”

### येशूचे अनुयायी हेच त्याचे कुटुंब
### *(मार्क 3:31-35; लूक 8:19-21)*

46तो लोकांशी बोलत असता, त्याची आई व त्याचे
भाऊ त्याच्याशी बोलण्यासाठी बाहेर वाट पाहत उभे होते.
47तेव्हा कोणी तरी त्याला म्हणाले, “तुमची आई व भाऊ
बाहेर उभे आहेत. ते तुमच्याशी बोलण्याची वाट पाहत
आहेत.” 48त्याच्याशी बोलणाऱ्याला त्याने उत्तर दिले,
“कोण माझी आई? कोण माझा भाऊ?” 49मग तो आपल्या
शिष्यांकडे हात करून म्हणाला, “पाहा हे माझे आई व
माझे भाऊ आहेत. 50कारण माझ्या स्वर्गीय पित्याच्या
इच्छेनुसार जे वागतात, तेच माझे भाऊ, बहीण आणि
आई आहेत.”

### बी पेरणाऱ्याची बोधकथा
### *(मार्क 4:1-9; लूक 8:4-8)*

13 त्याच दिवशी येशू घराबाहेर पडून सरोवराच्या
काठी जाऊन बसला. 2पुष्कळ लोक
त्याच्याभोवती जमले, म्हणून येशू नावेत जाऊन बसला व
सर्व लोकसमुदाय किनाऱ्यावर उभा राहिला. 3तेव्हा त्याने
त्यांना गोष्टीरूपाने बोध केला. तो म्हणाला, “एक शेतकरी
बी पेरायला निघाला. 4तो पेरीत असता काही बी रस्त्यावर
पडले, पक्षी आले व त्यांनी ते खाऊन टाकले. 5काही बी

---

**दक्षिणेची राणी** शबाची राणी 1 राजे 10:1-13

खडकाळ जमिनीवर पडले, तेथे पुरेशी माती नव्हती. तेथे बी फार झपाट्याने वाढले. पण जमीन खोलवर नव्हती,
[6]म्हणून जेव्हा सूर्य उगवला तेव्हा रोपटे वाळून गेले. कारण त्याला खोलवर मुळे नव्हती.
[7]काही बी काटेरी झुडपावर पडले. काटेरी झुडूप वाढले आणि त्याने रोपाची वाढ खुंटविली.
[8]काही बी चांगल्या जमिनीवर पडले, ते रोप वाढले व त्याला धान्य आले. आणि कोठे शंभरपट, कोठे साठपट, कोठे तीसपट असे त्याने पीक दिले.
[9]ज्याला ऐकायला कान आहेत तो ऐको!"

## येशूने बोधकथांचा वापर का केला
***(मार्क 4:10-12; लूक 8:9-10)***

[10]मग शिष्य त्याच्याजवळ आले आणि त्यांनी विचारले, "तुम्ही त्यांना गोष्टीरूपाने बोध का करता?"

[11]तेव्हा त्याने उत्तर दिले, "स्वर्गाच्या राज्याची रहस्ये तुम्ही समजू शकता, पण त्यांना ते समजणार नाही.
[12]कारण ज्या कोणाजवळ आहे त्याला दिले जाईल व ते त्याला पुष्कळ होईल, परंतु ज्या कोणाकडे नाही त्याच्याजवळ जे असेल ते देखील त्याकडून काढून घेतले जाईल.
[13]म्हणून मी त्यांना गोष्टीरूपाने बोध करतो; कारण ते पाहत असताना ही त्यांना दिसत नाही आणि ऐकत असतांनाही त्यांना समजत नाही.
[14]तेव्हा हे लोक दाखवून देत आहेत की, त्यांच्यासंबंधी यशयाने पूर्वी जे लिहून ठेवले ते खरे आहे. ते असे :

'तुम्ही लक्ष द्याल, ऐकाल पण तुम्हांला समजणार नाही, तुम्ही पाहाल आणि निरीक्षण कराल पण तुम्हांला काहीच दिसणार नाही

[15]कारण या लोकांचे अंत:करण कठीण झाले आहे त्यांना कान आहेत पण ऐकू येत नाही. त्यांनी आपले डोळे मिटले आहेत. यासाठी की, या लोकांनी आपल्या डोळ्यांनी पाहू नये, आपल्या कानांनी ऐकू नये आपल्या अंत:करणाने समजू नये व मागे फिरू नये, आणि मी त्यांना बरे करू नये.' *यशया* 6:9-10

[16]पण तुमचे डोळे धन्य आहेत कारण ते पाहतात, तुमचे कान धन्य आहेत कारण ते ऐकतात.
[17]मी तुम्हांला खरे सांगतो, तुम्ही ज्या गोष्टी पाहत आहा त्या पाहण्यासाठी अनेक संदेष्टे व नीतिमान लोक आतुरतेने वाट पाहत होते. तरी त्यांना त्या पाहता आल्या नाहीत, आणि तुम्ही ज्या गोष्टी ऐकत आहात त्या ऐकण्याची त्यांची खूप इच्छा होती तरी त्यांनी त्या ऐकल्या नाहीत.

## येशू बीयांविषयी स्पष्टीकरण करतो
***(मार्क 4:13-20; लूक 8:11-15)***

[18]"पेरणाऱ्याच्या बोधकथेचा अर्थ काय हे समजून घ्या;
[19]कोणी राज्याची गोष्ट ऐकतो पण ती त्याला समजत नाही, तेव्हा तो दुष्ट (सैतान) येतो व त्याच्या अंत:करणात पेरलेले ते घेतो, वाटेवर पेरलेला तो हाच आहे.
[20]खडकाळ जागेवर पेरलेला तो असा आहे की, तो वचन ऐकतो व लगेच आनंदाने स्वीकारतो.
[21]तरी त्याच्यामध्ये मूळ नसल्याने तो थोडा काळच टिकतो आणि वचनामुळे संकट आले किंवा कोणी छळ केला, व त्रास झाला म्हणजे तो लगेच अडखळतो.
[22]आणि काटेरी झाडांमध्ये पेरलेला असा आहे की, तो वचन ऐकतो पण जगिक गोष्टीविषयीचा ओढा, संपत्तीचा मोह ही वचनाला वाढू देत नाहीत आणि तो निष्फळ होतो.
[23]चांगल्या जमिनीवर पेरलेला असा आहे की, तो वचन ऐकतो, ते समजतो व तो निश्चितपणे पीक देतो. कोणी शंभरपट, कोणी साठपट, कोणी तीसपट असे पीक देतो."

## गहू आणि निदण यांची बोधकथा

[24]नंतर येशूने त्यांना दुसरी बोधकथा सांगितली. तो म्हणाला, "स्वर्गाचे राज्य हे एखाद्या मनुष्याने आपल्या शेतात चांगले बी पेरण्यासारखे आहे.
[25]पण लोक झोपेत असता त्या मनुष्याचा शत्रू आला व गव्हामध्ये निदण पेरून गेला.
[26]पण जेव्हा रोपे वाढली व दाणे आले तेव्हा निदणही दिसू लागले.
[27]मग त्या माणसाचे नोकर त्याच्याकडे आले व म्हणाले, 'मालक, आपण आपल्या शेतात चांगले बी पेरले ना? मग त्यात निदण कोठून आले?'
[28]तो त्यांना म्हणाला, 'कोणीतरी शत्रूने हे केले आहे.' त्याच्या नोकरांनी विचारले, 'आम्ही जाऊन ते उपटून टाकावे अशी आपली इच्छा आहे काय?'

[29]"पण तो मनुष्य म्हणाला, 'नको, तुम्ही निदण जमा करीत असताना त्याबरोबर कदाचित गहूही उपटाल.
[30]कापणीपर्यंत दोन्ही बरोबर वाढू द्या. मग कापणीच्या वेळेस मी कापणाऱ्यास सांगेन की पहिल्याने निदण जमा करा व जाळण्यासाठी त्याच्या पेंढ्या बांधा. पण गहू माझ्या गोदामात साठवा.'"

## येशूच्या आणखी काही बोधकथा
***(मार्क 4:30-34; लूक 13:18-21)***

[31]मग येशूने त्यांना आणखी एक बोधकथा सांगितली. तो म्हणाला, "स्वर्गाचे राज्य मोहरीच्या दाण्यासारखे आहे; तो एका माणसाने घेऊन आपल्या शेतात पेरला.
[32]मोहरीचा दाणा सर्व दाण्यांहून लहान आहे, पण तो त्याचे झाड मात्र खूप मोठे येते. इतके की, आकाशातील पाखरे येऊन त्याच्या फांद्यांवर राहतात."

[33]मग येशूने लोकांना आणखी एक दाखला सांगितला: "स्वर्गाचे राज्य खमिरासारखे आहे. ते एका स्त्रीने घेतले व तीन मापे पिठामध्ये ठेवले तेव्हा ते सर्व पीठ फुगले."

[34]लोकांना बोध करण्यासाठी येशूने नेहमीच गोष्टींचा उपयोग केला.

35ते यासाठी की, संदेष्ट्यांनी जे सांगितले होते ते पूर्ण व्हावे. ते असे की :

“गोष्टी सांगायला मी आपले तोंड उघडीन, जगाच्या स्थापनेपासून गुप्त राहिलेल्या गोष्टी मी बोलेन.”

*स्तोत्र. 78:2*

## येशू बोधकथा समजावून सांगतो

36मग येशू लोकांना सोडून घरात गेला. त्याच्याकडे त्याचे शिष्य आले आणि म्हणाले, “शेतातील निदणाची बोधकथा आम्हांला नीट समजावून सांगा.”

37येशूने उत्तर दिले, “शेतामध्ये चांगले बी पेरणारा हा मनुष्याचा पुत्र आहे. 38आणि शेत हे जग आहे. चांगले बी हे देवाच्या राज्यातील मुले आहेत आणि निदण हे दुष्टाचे (सैतानाचे) मुलगे आहेत. 39हे निदण पेरणारा शत्रू हा सैतान आहे आणि कापणी या काळाची समाप्ति आहे व कापणी करणारे देवदूत आहेत. 40“म्हणून जसे निदण गोळा करून अग्नीत टाकतात त्याप्रमाणे या काळाच्या शेवटी होईल. 41मनुष्याचा पुत्र आपल्या दूतांना पाठवील आणि ते त्याच्या राज्यातून अडखळण करणाऱ्या सर्व गोष्टी आणि अन्याय करणारे यांना बाजूला काढतील 42आणि त्यांना अग्नीच्या भट्टीत टाकतील. तेथे रडणे व दात खाणे चालेल. 43तेव्हा नीतिमान लोक आपल्या पित्याच्या राज्यात सूर्यासारखे प्रकाशतील. ज्याला ऐकायला कान आहेत तो ऐको!

## गुप्त ठेवी आणि मोती यांच्या बोधकथा

44“स्वर्गाचे राज्य हे जणू काय शेतामध्ये लपवून ठेवलेल्या ठेवीसारखे आहे. एके दिवशी एका मनुष्याला ती ठेव सापडली. त्यामुळे त्या मनुष्याला खूप आनंद झाला. तो ती गुप्त ठेव पुन्हा त्याच शेतात लपवून ठेवतो व आपले सर्व काही विकून ते शेत विकत घेतो.

45“आणखी, स्वर्गाचे राज्य चांगल्या मोत्याचा शोध घेणाऱ्या व्यापाऱ्यासारखे आहे, 46एक दिवस त्याला एक अत्यंत सुंदर मोती सापडतो. तेव्हा तो जाऊन आपले सर्व काही विकतो आणि ते मोती विकत घेतो.

## माशाच्या जाळ्याविषयीची बोधकथा

47“तसेच, स्वर्गाचे राज्य पाण्यात टाकलेल्या जाळ्यासारखे आहे. जाळ्यात सर्व प्रकारचे मासे सापडतात. 48ते भरल्यावर माणसांनी ते ओढून किनाऱ्यावर आणले व बसून जे चांगले ते भांड्यात भरले व जे वाईट ते फेकून दिले. 49या काळाच्या शेवटी असेच होईल. देवदूत येतील आणि वाईटांना नीतिमान लोकांतून वेगळे करतील. 50वाईट लोकांना अग्नीत फेकून देण्यात येईल. तेथे रडणे व दात खाणे चालेल. 51येशूने शिष्यांना विचारले, “तुम्हांला या सर्व गोष्टी समजल्या काय?” तेव्हा ते म्हणाले, “होय.”

52तेव्हा त्याने त्यांना म्हटले, “प्रत्येक नियमशास्त्राचा शिक्षक ज्याला स्वर्गाच्या राज्याविषयी शिकविण्यात आले आहे तो घरमालकासारखा आहे. त्याच्याकडे अनेक जुन्या व नव्या गोष्टी घरातील तिजोरीत ठेवलेल्या आहेत.”

## येशू आपल्या गावी जातो
## *(मार्क 6:1-6; लूक 4:16-30)*

53येशूने लोकांना बोध करण्याचे व गोष्टी सांगून शिकविण्याचे संपवल्यानंतर तो निघून गेला. 54त्याने आपल्या गावी येऊन त्यांच्या सभास्थानामध्ये असे शिकविले की, ते चकित होऊन म्हणाले, “हे ज्ञान व ही सामर्थ्याची कृत्ये याला कशी आली? 55हा त्या सुताराचा मुलगा ना? याच्या आईला मरीया म्हणतात ना? आणि याकोब व योसेफ आणि शिमोन व यहूदा याचे भाऊ आहेत ना? 56याच्या सर्व बहिणी आपल्यात आहेत ना? मग याला या सर्व गोष्टी कशा आल्या असे ते त्याच्याविषयी गोंधळात पडले.” 57त्यांनी त्याला मानण्याचे नाकारले.

पण येशू त्यांना म्हणाला, “इतर लोक संदेष्ट्याचा सन्मान करतात. पण त्याच्या स्वतःच्या गावात किंवा घरात त्याचा सन्मान होत नाही.” 58तेथील लोकांच्या अविश्वासामुळे त्याने तेथे जास्त चमत्कार केले नाहीत.

## हेरोद येशूविषयी ऐकतो
## *(मार्क 6:14-29; लूक 9:7-9)*

14 त्या वेळी हेरोदाने* येशूविषयी बातमी ऐकली. 2तेव्हा त्याने आपल्या सेवकांना म्हटले, “येशू हा बाप्तिस्मा करणारा योहान आहे. तो मेलेल्यातून उठला आहे. त्यामुळेच तो हे चमत्कार करीत आहे.”

## बाप्तिस्मा करणारा योहान कसा मारला गेला

3हेरोदाने आपला भाऊ फिलिप्प याची पत्नी हेरोदिया हिच्यामुळे योहानाला अटक करून तुरूंगात टाकले होते. 4कारण योहान त्याला सांगत होता, “तू हेरोदियाला ठेवणे योग्य नाही,” 5हेरोद त्याला मारावयास पाहत होता, पण तो लोकांना भीत होता कारण लोकांचा असा विश्वास होता की, योहान संदेष्टा आहे.

6हेरोदाच्या वाढदिवशी हेरोदियाच्या मुलीने दरबारात नाच करून हेरोदाला संतुष्ट केले. 7त्यामुळे त्याने शपथ वाहून ती जे काही मागेल ते देण्याचे अभिवचन तिला दिले. 8तिच्या आईच्या सांगण्यावरून ती म्हणाही, “मला येथे तबकात बाप्तिस्मा करणारा योहान याचे शीर द्या” 9हेरोद राजाला फार वाईट वाटले. तरी त्याने आपल्या शपथपूर्वक दिलेल्या वचनामुळे व आमंत्रित लोकांमुळे ते द्यावे अशी आज्ञा केली. 10आणि त्याने तुरूंगात माणसे पाठवून योहानाचे शीर तोडले. 11मग त्यांनी त्याचे शीर

---

**हेरोद** हेरोद अन्तीपस. महान हेरोदाचा मुलगा

तबकात घालून त्या मुलीला आणून दिले. तिने ते आपल्या
आईकडे आणले. 12मग त्याच्या शिष्यांनी येऊन त्याचे
प्रेत उचलून नेले व त्याला पुरले. आणि त्यांनी जाऊन जे
घडले ते येशूला सांगितले.

### येशू पाच हजारांहून अधिक लोकांना जेवू घालतो
***(मार्क 6:30-44; लूक 9:10-17; योहान 6:1-14)***

13मग ते ऐकून येशू तेथून नावेत बसून निघून गेला व
नंतर नावेतून उतरून माळरानावर एका निवांत व एकाकी
जागी गेला. लोकांनी हे ऐकले तेव्हा ते पायी त्याच्याकडे
गेले. 14मग तो किनाऱ्यावर आला, जेव्हा त्याने मोठा
लोकसमुदाय पाहिला. तेव्हा त्याला त्यांच्याबद्दल कळवळा
वाटला. म्हणून जे आजारी होते त्यांना त्याने बरे केले.
15मग संध्याकाळ झाल्यावर त्याचे शिष्य त्याच्याकडे आले
आणि म्हणाले, “ही माळरानावरची उजाड जागा आहे
आणि भोजन वेळ होऊन गेली आहे. लोकांनी गावामध्ये
जाऊन स्वत:करिता अन्न विकत घ्यावे म्हणून त्यांना
पाठवून द्या.” 16परंतु येशू त्यांना म्हणाला, “त्यांना जाण्याची
गरज नाही. तुम्हीच त्यांना खायला द्या.”
17तेव्हा ते त्याला म्हणाले, “पाच भाकरी व दोन मासे
याशिवाय येथे आमच्याजवळ काहीच नाही.” 18तो म्हणाला,
“त्या इकडे आणा.” 19मग लोकांना गवतावर बसण्याची
आज्ञा केल्यावर त्याने त्या पाच भाकरी व दोन मासे
घेऊन वर आकाशाकडे पाहून त्यावर आशीर्वाद मागितला.
नंतर त्याने भाकरी मोडून शिष्यांना दिल्या व शिष्यांनी
लोकास दिल्या. 20ते सर्व जेवून तृप्त झाले. मग त्या
उरलेल्या तुकड्यांच्या त्यांनी बारा टोपल्या भरून घेतल्या.
21जेवणाऱ्यांमध्ये स्त्रिया व मुले मोजली नाहीत, पुरुष मात्र
पाच हजार होते.

### येशू सरोवरावरून चालतो
***(मार्क 6:45-52; योहान 6:15-21)***

22मग तो स्वत: लोकसमुदायास निरोप देईपर्यंत त्याने
शिष्यांना नावेत बसून लगेच आपल्यापुढे पलीकडे जाण्यास
सांगितले. 23लोकांना पाठवून दिल्यावर तो प्रार्थना
करण्यास एकांत ठिकाणी डोंगरावर गेला, रात्र झाली
तेव्हा तो तेथे एकटाच होता. 24पण त्यावेळी नाव
किनाऱ्यापासून बऱ्याच अंतरावर होती व ती लाटांनी
हेलकावत होती, कारण वारा समोरून वाहत होता.
25मग पहाटेच्या वेळी तो पाण्यावरून चालत शिष्यांकडे
आला. 26शिष्य त्याला पाण्यावरून चालताना पाहून घाबरून
गेले, त्यांना वाटले, भूतबीत आहे की काय म्हणून ते
“भूत, भूत” असे ओरडू लागले.
27पण येशू लगेच त्यांना म्हणाला, “काळजी करू नका!
मी आहे! भिऊ नका.”
28पेत्र म्हणाला, “प्रभु जर तो तूच आहेस तर मला
पाण्यावरून तुझ्याकडे यायला सांग.”
29येशू म्हणाला, “ये.”
मग पेत्र नावेतून पाण्यात उतरला व पाण्यावरून चालत
येशूकडे जाऊ लागला. 30पण तो पाण्यावरून चालत
असतानाच वारा व लाटा पाहून तो भ्याला आणि बुडू
लागला. बुडताना ओरडला, “प्रभु, मला वाचवा.”
31आणि लगेच येशूने आपला हात पुढे करून त्याला
धरले व म्हटले, “अरे अल्पविश्वासू माणसा, तू संशय
का धरलास?” 32मग ते नावेत बसल्यावर वारा थांबला.
33तेव्हा जे नावेत होते ते त्याला नमन करून म्हणाले,
“तुम्ही खरोखर देवाचे पुत्र आहात.”
34नंतर ते पलीकडे गनेसरेत येथे पोहोचले. 35तेथील
लोकांनी येशूला पाहिले व सभोवतालच्या सर्व प्रदेशात
निरोप पाठविला व त्यांनी सर्व प्रकारच्या आजाऱ्यांस
त्याच्याकडे आणले. 36आणि आम्हांला आपल्या वस्त्राच्या
काठाला स्पर्श करू द्यावा, अशी विनंती केली, तेव्हा
जितक्यांनी स्पर्श केला तितके बरे झाले.

### देवाची आज्ञा आणि माणसांनी बनविलेले नियम
***(मार्क 7:1-23)***

15 तेव्हा यरुशलेमाहून काही परूशी व
नियमशास्त्राचे शिक्षक येशूकडे आले व म्हणाले,
2“तुमचे शिष्य पूर्वजांनी घालून दिलेले नियम का पाळत
नाहीत? कारण तुमचे शिष्य जेवणापूर्वी हात धूत नाहीत.”
3येशूने उत्तर दिले, “आणि तुम्ही तुमच्या परंपरा
चालविण्यासाठी देवाची आज्ञा का मोडता? 4कारण देवाने
सांगितले आहे की, ‘तुझ्या आईवडिलांचा मान राख.*’
‘आणि जो कोणी आपल्या आईवडिलांबद्दल वाईट बोलतो,
त्याला जिवे मारावे.’* 5पण तुम्ही म्हणता, जो कोणी
पित्याला किंवा आईला म्हणेल की, ‘तुला जे काही दिल्याने
तुझा जो फायदा झाला असता, ते मी देवाला अर्पण केले
आहे 6ते देवाचे नियम मोडीत आहेत.’ आपल्या वडिलांचा
व आईचा सन्मान करू नये. याप्रकारे तुम्ही आपल्या
अशा परंपरेने देवाचे वचन रद्द केले आहे. 7अहो ढोंग्यांनो,
तुम्हांविषयी यशया संदेष्ट्यांने योग्य सांगितले आहे. तो
म्हणतो :

8‘हे लोक, ओठांनी माझा सन्मान करतात पण त्यांचे
हृदय माझ्यापासून दूर आहे.
9आणि ते माणसांचे नियम आपली धर्मतत्त्वे म्हणून
शिकवितात आणि व्यर्थच माझी उपासना करतात.’”
*यशया 29:13*

10तेव्हा लोकांना जवळ बोलावून त्याने म्हटले, “ऐका
व समजून घ्या. 11जे तोंडाद्वारे आत जाते ते माणसाला

---

**तुझ्या ... राख** निर्गम 20:12; अनुवाद 5:16

**आणि जो ... मारावे** निर्गम 21:17

अशुद्ध करीत नाही, पण जे तोंडातून बाहेर निघते तेच
माणसाला अशुद्ध करते.”
12नंतर शिष्य जवळ येऊन त्याला म्हणाले, “परूश्यांनी
जेव्हा हे ऐकले तेव्हा ते रागावले हे आपणांला कळले
काय?” 13पण त्याने उत्तर देऊन म्हटले, “प्रत्येक रोपटे
जे माझ्या स्वर्गातील पित्याने लावले नाही ते उपटले जाईल.
14त्यांना जाऊ द्या. ते आंधळे वाटाडे आहेत. जर एका
आंधव्व्याने दुसऱ्या आंधळ्याला वाट दाखवण्याचा प्रयत्न
केला तर दोघेही खड्ड्यात पडतील.”
15पेत्र म्हणाला, “आमच्यासाठी या बोधकथचे
स्पष्टीकरण करा.”
16“तुम्ही अजूनही बुद्धिमंदच आहात काय?” येशूने त्यांना
विचारले. 17“जे काही तोंडात जाते ते सर्व पोटात जाते व
मग बाहेर टाकले जाते. हे तुम्हांला अजून समजत नाही
काय? 18परंतु ज्या गोष्टी तोंडातून बाहेर निघतात त्या
अंत:करणातून येतात व त्याच माणसाला डागाळतात.
19कारण वाईट विचार, खून, व्यभिचार, जारकर्मे, खोट्या
साक्षी, निंदा ही अंत:करणातून बाहेर निघतात. 20माणसाला
डागाळणाऱ्या याच गोष्टी आहेत न धुतलेल्या हाताने
खाण्याने माणसाला विटाळ होत नाही.”

### येशू यहूदी नसलेल्या स्त्रीला मदत करतो
### (*मार्क 7:24-30*)

21नंतर येशू तेथून निघून सोर व सिदोन या भागात
गेला. 22तेव्हा एक कनानी स्त्री त्या भागातून येशूकडे
आली. ती स्त्री ओरडून म्हणाली, “प्रभु, दाविदाच्या पुत्रा,
माझ्यावर दया करा. माझी मुलगी भुताने पछाडली आहे.”
23पण येशूने तिला एका शब्दानेही उत्तर दिले नाही;
तेव्हा त्याच्या शिष्यांनी येऊन त्याला विनंति केली, “तिला
पाठवून द्या, कारण ती आमच्या मागे ओरडत येत आहे.”
24पण येशूने उत्तर दिले, “मला देवाने फक्त इस्राएलाच्या
हरवलेल्या मेंढरांकडे पाठविले आहे.”
25मग ती स्त्री पुन्हा येशूकडे आली, ती येशूच्या पाया
पडली व म्हणाली, “प्रभु, माझे साहाय्य करा. 26परंतु
त्याने म्हटले, “मुलाची भाकर घेऊन कुत्र्यास टाकणे बरे
नाही.”
27ती स्त्री म्हणाली, “होय प्रभु, परंतु कुत्रीही आपल्या
धन्याच्या मेजावरून पडलेले उष्टे चूर खातात. 28तेव्हा
येशूने तिला म्हटले, “बाई, तुझा विश्वास मोठा आहे!
तुझ्या इच्छेप्रमाणे तुला होवो.” आणि तिची मुलगी बरी
झाली.

### येशू अनेकांना बरे करतो

29नंतर येशू तेथून निघून गालील सरोवराकडे गेला.
येशू डोंगरावर गेला आणि तेथे बसला. 30मग पुष्कळ
लोक त्याच्याकडे आले, त्यांनी आपल्याबरोबर लुळे,
पांगळे, आंधळे, बहिरे व इतर अनेक लोकांना आणले
होते आणि त्यांनी त्या आजाऱ्यांना येशूच्या पायावर ठेवले.
तेव्हा त्याने त्यांना बरे केले. 31मुके बोलू लागले, लुळे
सशक्त झाले. व्यंग असलेले चांगले झाले, लंगडे चालू
लागले, आंधळे पाहू लागले. हे पाहून लोक थक्क झाले,
आणि त्यांनी इस्राएलाच्या देवाचा गौरव केले.

### येशू चार हजारांहून अधिकांना जेवू घालतो
### (*मार्क 8:1-10*)

32मग येशूने आपल्या शिष्यांस आपल्याजवळ बोलावून
म्हटले, “मला लोकांचा कळवळा येतो. कारण ते आज
तीन दिवस झाले माझ्याजवळ राहिले आहेत आणि
त्यांच्याकडे खायला काही नाही, आणि त्यांना उपाशी
पाठवावे अशी माझी इच्छा नाही, कारण ते वाटेत कदाचित
मूर्च्छित होतील.” 33शिष्य त्याला म्हणाले, “एवढ्या
मोठ्या लोकसमुदायाला तृप्त करावे इतक्या भाकरी ह्या
दूर रानात आमच्याजवळ कोठून असणार?”
34तेव्हा येशू म्हणाला, “तुमच्याजवळ किती भाकरी
आहेत?” ते म्हणाले, “आमच्याकडे सात भाकरी आहेत
व काही मासे आहेत.”
35मग त्याने लोकांना जमिनीवर बसविण्याची आज्ञा
केली. 36मग त्या सात भाकरी व मासे घेऊन त्याने देवाचे
उपकार मानले व त्या भाकरी मोडल्या व शिष्यांना दिल्या
व शिष्यांनी लोकांना दिल्या. 37तेव्हा ते सर्व जेवून तृप्त
झाले आणि त्यांनी उरलेल्या तुकड्यांनी भरलेल्या सात
पाट्या गोळा केल्या. 38आणि जेवणारे, स्त्रिया व लेकरे
सोडून चार हजार पुरुष होते. 39मग समुदायास निरोप
दिल्यावर तो नावेत बसून मगदानाच्या हद्दीत गेला.

### यहुदी पुढारी येशूची परीक्षा पाहतात
### (*मार्क 8:11-13; लूक 12:54-56*)

16 परुशी आणि सदूकी येशूकडे आले. त्यांना येशूची
परीक्षा पाहायची होती. आम्हांला आकाशातून
चिन्ह दाखवा अशी मागणी त्यांनी केली.
2त्याने त्यांना उत्तर दिले, “तुम्ही संध्याकाळ झाली असता
म्हणता आजचे हवामान चांगले असेल कारण आभाळ
तांबूस आहे; 3आणि तुम्ही सकाळी म्हणता, आज वादळ
होईल कारण आभाळ तांबूस व गडद आहे. तुम्हांला
आभाळाचे स्वरूप ओळखता येते, पण काळाची लक्षणे
ओळखता येत नाहीत? 4दुष्ट व व्यभिचारी पिढी चिन्ह
शोधते, पण तिला योना संदेष्ट्यशिवाय दुसरे चिन्ह दिले
जाणार नाही.” मग तो त्यांना सोडून गेला.

### येशू यहुदी पुढाऱ्यांविषयी सावध करतो
### (*मार्क 8:14-21*)

5येशू आणि त्याचे शिष्य सरोवराच्या पलीकडे गेले
तेव्हा भाकरी घ्यायला विसरले. 6तेव्हा येशू त्यांना म्हणाला,
“परूशी व सदूकी यांच्या खमिराविषयी सावध असा.”

7तेव्हा ते आपापसात विचार करून म्हणाले, "आपण भाकरी घेतल्या नाहीत म्हणून ते असे म्हणत आहे." 8पण येशूने हे ओळखून म्हटले, "अहो अल्पविश्वासू, आपण भाकरी घेतल्या नाहीत असा विचार तुम्ही आपापसामध्ये का करता? 9तुम्हांला अजून आठवत नाही काय? पाच भाकरींनी पाच हजार लोकांना जेवू घातले ते, आणि त्यानंतर तुम्ही किती टोपल्या उचलून घेतल्या ते तुम्हांला आठवत नाही काय? 10तसेच चार हजारांच्या जेवणाला सात भाकरी, आणि तुम्ही किती टोपल्या उचलून घेतल्या हे तुम्हांला आठवत नाही काय? 11मी भाकरी विषयी तुम्हांला बोललो नाही, तर परूशी व सदूकी यांच्या खमिराविषयी सावध राहा, असे म्हणालो, हे तुम्हांला कसे समजत नाही?"

12तेव्हा त्यांना समजले की, त्याने त्यांना भाकरीच्या खमिराविषयी सावध राहण्यास सांगितले नव्हते, तर परूशी आणि सदूकी यांच्या शिकवणुकीविषयी सावध राहायला सांगितले होते.

### पेत्र म्हणतो की येशू हा ख्रिस्त आहे
### *(मार्क 8:27-30; लूक 9:18-21)*

13येशू फिलिप्पाच्या कैसरिया या भागाकडे गेला. तो त्याच्या शिष्यांना म्हणाला, "मनुष्याच्या पुत्राला लोक कोण म्हणून म्हणतात?" 14आणि ते म्हणाले, "काही बाप्तिस्मा करणारा योहान, तर कित्येक एलीया तर दुसरे काही यिर्मया किंवा संदेष्ट्यांपैकी एक असे म्हणतात." 15मग येशू त्यांना म्हणाला, "पण तुम्ही मला कोण म्हणून म्हणता?" 16शिमोनाने उत्तर दिले, "तू ख्रिस्त, जिवंत देवाचा पुत्र आहेस."

17येशू म्हणाला, "शिमोना, योनाच्या पुत्रा, तू धन्य आहेस, कारण रक्त व मांस यांनी तुला हे प्रगट केले नाही, तर माझा पिता जो स्वर्गात आहे त्याने तुला हे प्रगट केले. 18आणखी मी तुला असे सांगतो की, तू पेत्र आहेस आणि या खडकावर मी आपली मंडळी रचीन, आणि मृत्युलोकाचा यावर अधिकार चालणार नाही. 19मी तुला स्वर्गाच्या राज्याच्या किल्ल्या देईन आणि पृथ्वीवर जे काही तू बांधून ठेवशील ते स्वर्गात बांधले जाईल आणि पृथ्वीवर जे काही तू मोकळे करशील ते स्वर्गात मोकळे केले जाईल. 20तेव्हा त्याने शिष्यांस निक्षून सांगितले की, मी ख्रिस्त आहे हे तुम्ही कोणालाही सांगू नका."

### येशू म्हणतो की त्याने मेलेच पाहिजे
### *(मार्क 8:31-9:1; लूक 9:22-27)*

21तेव्हापासून येशू ख्रिस्त आपल्या शिष्यास दाखवू लागला की, आपण यरुशलेमला जावे आणि वडील यहुदी नेते व मुख्य याजक आणि नियमशास्त्राचे शिक्षक यांच्याकडून पुष्कळ दु:खे सोसावी व जिवे मारले जावे व तिसऱ्या दिवशी पुन्हा उठविले जावे याचे अगत्य आहे.

22तेव्हा पेत्राने त्याला जवळ घेऊन निषेध करून म्हटले, "प्रभु, या गोष्टीपासून देव तुझी सुटका करो. या गोष्टी तुझ्या बाबतीत कधीही घडणार नाहीत!"

23परंतु तो वळून पेत्राला म्हणाला, "अरे सैताना, माझ्यामागे हो, तू मला अडखळण आहेस. कारण तू देवाच्या गोष्टींकडे लक्ष लावीत नाहीस तर मनुष्यांच्या गोष्टींकडे लक्ष लावतोस."

24तेव्हा येशूने आपल्या शिष्यांस म्हटले, "जर कोणी माझ्या मागे येऊ इच्छित असेल तर त्याने स्वत:ला नाकारावे आणि आपला वधस्तंभ उचलून घ्यावा व माझ्यामागे यावे. 25कारण जो कोणी आपला जीव वाचवू इच्छितो तो त्याला गमावील पण जो माझ्याकरिता आपला जीव गमावील तो त्याला मिळवील. 26जर मनुष्याने सर्व जग मिळविले आणि अनंतकालिक जीवन गमावले तर त्याला काय लाभ? किंवा मनुष्य आपल्या जिवाचा काय मोबदला देईल? 27कारण मनुष्याचा पुत्र आपल्या पित्याच्या वैभवात आपल्या दूतांसहित येणार आहे; आणि तेव्हा तो प्रत्येकाला ज्याच्या त्याच्या कामाप्रमाणे मोबदला देईल. 28मी तुम्हांला खरे सांगतो की, येथे उभे राहणाऱ्यातले काही जण असे आहेत की, ते मनुष्याच्या पुत्राला त्याच्या राज्यात येताना पाहतील तोपर्यंत त्यांना मरणाचा अनुभव येणारच नाही."

### येशू मोशे व एलीयाबरोबर दिसतो
### *(मार्क 9:2-13; लूक 9:28-36)*

17 सहा दिवसांनंतर येशूने पेत्र, याकोब व त्याचा भाऊ योहान यांना आपल्याबरोबर घेतले व त्यांना उंच डोंगरावर एकांती नेले. 2त्याचे शिष्य पाहत असतानाच येशूचे रूप पालटले. त्याचे तोंड सूर्यासारखे प्रकाशले आणि त्याची वस्त्रे प्रकाशासारखी पांढरी शुभ्र झाली. 3तेव्हा मोशे व एलीया हे त्याच्याशी संभाषण करीत असलेले त्यांना दिसले.

4पेत्र येशूला म्हणाला, "प्रभु, येथे असणे हे आपणांसाठी बरे आहे. आपली इच्छा असेल तर मी येथे तीन मंडप करतो, एक आपल्यासाठी, एक मोशेसाठी व एक एलीयासाठी."

5पेत्र बोलत आहे, इतक्यात, एका तेजस्वी ढगाने त्यांच्यावर सावली केली, आणि त्या ढगातून वाणी झाली, "हा माझा प्रिय पुत्र आहे, याजविषयी मी संतुष्ट आहे, याचे तुम्ही ऐका."

6येशुबरोबर असलेल्या शिष्यांनी ही वाणी ऐकली. तेव्हा ते जमिनीवर पालथे पडले कारण ते फार भ्याले होते. 7तेव्हा येशू जवळ येऊन त्यांना स्पर्श करून म्हणाला, "उठा! घाबरू नका." 8मग त्यांनी आपले डोळे उघडले आणि वर पाहिले तेव्हा त्यांना येशू शिवाय दुसरे कोणीही दिसले नाही.

9येशू आणि त्याचे शिष्य डोंगरावरून खाली उतरत असताना, येशूने त्यांना आज्ञा केली की, डोंगरावर त्यांनी

जे पाहिले ते कोणालाही सांगू नये. मनुष्याचा पुत्र मरणातून
पुन्हा उठेपर्यंत वाट पाहा. 10मग त्याच्या शिष्यांनी म्हटले,
“नियमशास्त्राचे शिक्षक असे का म्हणतात की, एलीया
अगोदर आला पाहिजे?” 11तेव्हा त्याने उत्तर दिले, “एलीया
येऊन सर्व काही पूर्ववत करील हे खरे, 12पण मी तुम्हांला
सांगतो की, एलीया आलाच आहे आणि त्यांनी त्याला
ओळखले नाही पण त्यांना वाटले तसे त्यांनी त्याला केले.
मनुष्याचा पुत्रही त्यांच्याकडून असेच सहन करणार आहे.”
13तेव्हा त्यांना समजले की त्याने बाप्तिस्मा करणाऱ्या
योहानाविषयी सांगितले आहे.

## येशू एका फेफरेकरी मुलाला बरे करतो
### *(मार्क 9:14-29; लूक 9:37-43)*

14नंतर येशू व शिष्य लोकसमुदायाजवळ आल्यावर
एक मनुष्य त्याच्याकडे आला आणि त्याच्यापुढे गुडघे
टेकून म्हणाला, 15“प्रभु, माझ्या मुलावर दया करा. त्याला
फेफरे येतात व त्याचे फार हाल होतात कारण तो सारखा
विस्तवात आणि पाण्यात पडतो. 16मी त्याला आपल्या
शिष्यांकडे आणले पण त्यांना त्याला बरे करता येईना.”
17येशूने उत्तर दिले, “अहो अविश्वासू व विपरीत पिढीच्या
लोकांनो, मी तुमच्याबरोबर आणखी कोठवर राहू? मी
तुमचे किती सहन करू? त्याला माझ्याकडे आणा.”
18येशूने त्या मुलामध्ये असलेल्या भुताला कडक रीतीने
धमकावले, तेव्हा ते भूत त्याच्यातून निघून गेले आणि
त्याच घटकेला तो मुलगा बरा झाला.
19नंतर शिष्य एकांती येशूजवळ येऊन म्हणाले,
“आम्हांला (त्याच्यातील भूत) का काढता आले नाही?”
20तेव्हा तो म्हणाला, “तुमच्या अल्पविश्वासामुळे. मी
तुम्हांला खरे सांगतो, तुमच्यात जर मोहरीच्या दाण्याएवढा
विश्वास असेल तर तुम्ही या डोंगराला म्हणू शकता,
‘येथून निघून तेथे जा’ तर तो डोंगर जाईल. तुमच्यासाठी
काहीही अशक्य असणार नाही.” 21*

## येशू स्वतःच्या मरणाविशयी बोलतो
### *(मार्क 9:30-32; लूक 9:43-45)*

22जेव्हा ते एकत्र गालीलात आले तेव्हा तो त्यांना
म्हणाला, “मनुष्याचा पुत्र माणसांच्या हाती विश्वासघाताने
धरून दिला जाणार आहे. 23ते त्याला जिवे मारतील
आणि तिसऱ्या दिवशी तो पुन्हा उठविला जाईल.” तेव्हा
शिष्य फार दुःखी झाले.

## येशू कर देण्याविषयी शिकवितो

24येशू आणि त्याचे शिष्य कफर्णहूमास आले तेव्हा
मंदिराचा कर वसूल करणारे आले, ते पेत्राकडे येऊन
म्हणाले, “तुमचा गुरू कराचा रुपया देत नाही काय?”
25त्याने म्हटले, “होय देतो.” मग तो घरात आल्याबरोबर
तो बोलण्याअगोदर येशू म्हणाला, “शिमोना, तुला काय
वाटते? पृथ्वीवरील राजे जकात किंवा कर कोणाकडून
घेतात, आपल्या मुलांकडून की परक्याकडून?”
26जेव्हा तो म्हणाला, “परक्याकडून” तेव्हा येशूने त्याला
म्हटले, “तर मग मुले मोकळी आहेत. 27तरी आपण
त्यांना अडखळण आणू नये, म्हणून पाण्यात जाऊन गळ
टाक आणि पहिल्याने वर येईल तो मासा धरून त्याचे
तोंड उघड म्हणजे तुला दोन रुपयांचे एक नाणे सापडेल.
ते घेऊन माझ्याबद्दल व तुझ्याबद्दल दे.”

## सर्वांत महान कोण हे येशू सांगतो
### *(मार्क 9:33-37; लूक 9:46-48)*

18 त्या वेळेस शिष्य आले आणि त्यांनी विचारले,
“स्वर्गाच्या राज्यात सर्वांत महान कोण?”
2तेव्हा त्याने एका लहान बालकाला आपल्याजवळ
बोलावून त्यांच्यामध्ये उभे केले, 3आणि म्हटले, “मी
तुम्हांला खरे सांगतो, तुमच्यात बदल होऊन तुम्ही
बालकासारखे झाल्याशिवाय स्वर्गाच्या राज्यात जाणारच
नाही. 4म्हणून जो कोणी आपणांला या बालकासारखे
लीन करतो तोच स्वर्गाच्या राज्यात सर्वांहून महान आहे.
5“आणि जो कोणी अशा एका लहान बालकाला माझ्या
नावाने स्वीकारतो, तो मला स्वीकारतो. 6परंतु जो कोणी
माझ्यावर विश्वास ठेवणाऱ्या ह्या लहानातील एकाला
अडखळण आणील त्याच्या गव्व्यात जात्याची मोठी तळी
बांधून त्याला समुद्राच्या खोल पाण्यात बुडविणे हे त्याच्या
फायद्याचे आहे.
7“जगाचा धिक्कार असो कारण त्याच्यातील काही
गोष्टींमुळे ते लोकांना पापात पाडते. तरी अशा काही
गोष्टी होत राहणारच, पण जे लोक या गोष्टींना कारणीभूत
होतात. त्यांना फार अहिताचे ठरेल. 8जर तुमचा उजवा
हात किंवा पाय तुम्हांला पापात पाडीत असेल तर तो
कापून टाका व फेकून द्या. तुम्ही एखादा अवयव गमावला,
परंतु अनंतकाळचे जीवन मिळविले तर त्यात तुमचे जास्त
हित आहे. दोन हात व दोन पाय यांच्यासह कधीही न
विझणाऱ्या अग्नीत (नरकात) तुम्ही टाकले जाण्यापेक्षा
ते जास्त बरे होईल.
9“जर तुमचा डोळा तुम्हांला पापात पाडीत असेल तर
तो उपटून फेकूनच द्या. कारण एकच डोळा असला
आणि तुम्हाला अनंतकालचे जीवन मिळाले तर ते जास्त
बरे आहे. दोन डोळ्यांसह तुम्ही नरकात टाकले जाण्यापेक्षा
ते जास्त बरे आहे.

## येशू हरवलेल्या मेंढराची बोधकथा सांगतो
### *(लूक 15:3-7)*

10“सावध असा. ही लहान मुले कुचकामी आहेत असे
समजू नका. मी तुम्हांला सांगतो की, या लहान मुलांचे

---

**वचन 21** कांही ग्रीक प्रतीमध्ये समाविष्ट: तरी पण प्रार्थना व
उपास यांवाचून असल्या जातीचे भूत निघत नाही.

देवदूत स्वर्गात असतात आणि ते देवदूत माझ्या स्वर्गातील पित्याबरोबर नेहमी असतात. 11 *

12 "जर एखाद्या मनुष्याजवळ 100 मेंढरे आहेत आणि त्यांच्यापैकी एक मेंढरू हरवले तर तो 99 मेंढरे टेकडीवर सोडून देईल आणि ते हरवलेले एक मेंढरू शोधायला जाईल की नाही? 13 आणि जर त्या मनुष्याला हरवलेले मेंढरू सापडले तर त्याला कधीही न हरवलेल्या 99 मेंढरांबद्दल वाटणाऱ्या आनंदापेक्षा त्या एकासाठी जास्त आनंद होईल. मी तुम्हांला खरे सांगतो, 14 तशाच प्रकारे, या लहान मुलांपैकी एकाचा अगदी लहानातील लहानाचा ही नाश व्हावा अशी तुमच्या स्वर्गीय पित्याची इच्छा नाही.

## जेव्हा एखादी व्यक्ती तुमचे वाईट करते
### *(लूक 17:3)*

15 "जर तुझा भाऊ अगर तुझी बहीण तुझ्यावर अन्याय करील, तर जा आणि त्याला किंवा तिला तुझ्यावर काय अन्याय झाला ते सांग आणि तोही एकांतात सांग. जर त्याने किंवा तिने तुझे ऐकले तर तू त्याला किंवा तिला आपला बंधु किंवा बहीण म्हणून परत मिळविले आहेस. 16 पण जर तो किंवा ती तुझे ऐकत नसेल तर एकाला किंवा दोघांना तुझ्याबरोबर घे, यासाठी की जे काही झाले त्याविषयी साक्ष द्यायला दोन किंवा तीन जण तेथे असतील,* 17 जर तो मनुष्य लोकांचेही ऐकणार नाही तर मंडळीसमोर ही गोष्ट मांड. जर तो मनुष्य मंडळीचेही ऐकणार नाही, तर मग तो देवाचा नाही, असे समज किंवा एखाद्या जकातदारासारखा समज.

18 "मी तुम्हांला खरे सांगतो, जेव्हा तुम्ही जगात न्याय कराल तेव्हा तो देवाकडून झालेला न्याय असेल. जेव्हा तुम्ही एखाद्याला क्षमा कराल तेव्हा ती देवाकडून झालेली क्षमा असेल.

19 "तसेच मी तुम्हांला सांगतो की, जर तुमच्यापैकी दोघांचे एखाद्या गोष्टीविषयी एकमत झाले तर त्याकरिता प्रार्थना करा. म्हणजे तुम्ही जी गोष्ट मागाल तुमचा स्वर्गीय पिता तिची पूर्तता करील. 20 हे खरे आहे कारण तुमच्यापैकी जर दोघे किंवा तिघे माझ्या नावात एकत्र जमले असतील तेथे त्यांच्यामध्ये मी आहे."

## क्षमा न करणाऱ्या नोकराचा दाखला

21 नंतर पेत्र येशूकडे आला आणि त्याने विचारले, "जर माझा भाऊ माझ्यावर अन्याय करीत राहिला तर मी त्याला किती वेळा क्षमा करावी? मी त्याला सात वेळा क्षमा करावी काय?"

22 येशूने उत्तर दिले, "मी तुला सांगतो, फक्त सातच वेळा नाही तर उलट त्याने तुझ्यावर 77 वेळा * अन्याय केला तरी तू त्याला क्षमा करीत राहा."

23 "म्हणून स्वर्गाच्या राज्याची तुलना एका राजाशी करता येईल. आपले जे नोकर आपले देणे लागत होते त्यांच्याकडून त्या राजाने पैसे परत घेण्याचे ठरविले. 24 जेव्हा त्याने पैसे जमा करायला सुरुवात केली, तेव्हा एक देणेकरी ज्याच्याकडे 10,000 चांदीच्या नाण्याचे कर्ज होते त्याला त्याच्याकडे आणण्यात आले.

25 त्या देणेकऱ्याकडे राजाचे पैसे परत करण्यासाठी काहीच नव्हते, तेव्हा मालकाने आज्ञा केली की त्याला, त्याच्या पत्नीला, त्याच्या मुलांना आणि जे काही त्याच्याकडे आहे ते सर्व विकले जावे आणि जे पैसे येतील त्यातून कर्जाची परतफेड व्हावी.

26 "परंतु त्या नोकराने पाया पडून, गयावया करीत म्हटले, 'मला थोडी सवलत द्या. जे काही मी तुमचे देणे लागतो ते तुम्हाला परत करीन!' 27 त्या मालकाला आपल्या नोकराबद्दल वाईट वाटले, म्हणून त्याने त्या नोकराचे सर्व कर्ज माफ केले आणि त्याला सोडले.

28 "नंतर त्याच नोकराचे काही शेकडे रुपये देणे लागत असलेला दुसरा एक नोकर पहिल्या नोकराला भेटला. त्याने त्या दुसऱ्या नोकराचा गळा पकडला आणि तो त्याला म्हणाला, 'तू माझे जे काही पैसे देणे लागतोस ते सर्व आताच्या आता दे!'

29 'परंतु दुसरा नोकर गुडघे टेकून गयावया करीत म्हणाला, 'मला थोडी सवलत द्या. जे काही पैसे मी तुम्हांला देणे लागतो ते परत करीन.'

30 "पण पहिल्या नोकराने दुसऱ्या नोकराला सांभाळून घेण्यास साफ नकार दिला. उलट तो गेला आणि त्याने त्याला तुरुंगात टाकले, तेथे त्याला त्याचे कर्ज फिटेपर्यंत राहावे लागणार होते. 31 घडलेला हा प्रकार जेव्हा दुसऱ्या नोकरांनी पाहिला तेव्हा ते फार दुःखी झाले, तेव्हा ते गेले आणि त्यांनी जे सर्व घडले होते ते मालकाला सांगितले.

32 "तेव्हा पहिल्या नोकराच्या मालकाने त्याला बोलाविले व तो त्याला म्हणाला, 'दुष्टा, तू माझे कितीतरी देणे लागत होतास, परंतु मी तुझे देणे माफ करावे अशी विनंती तू मला केलीस तेव्हा मी तुझे सर्व कर्ज माफ केले. 33 म्हणून तू तुझ्याबरोबरच्या नोकरालाही तशीच दया दाखवायची होतीस.' 34 मालक फार संतापला. शिक्षा म्हणून मालकाने पहिल्या नोकराला तुरुंगात टाकले. आणि त्याने सर्व कर्ज फेडीपर्यंत त्याला तुरुंगातून सोडले नाही.

35 "जसे या राजाने केले तसेच माझा स्वर्गीय पिता तुमचे करील. तुम्ही आपला भाऊ अगर बहीण यांना क्षमा केली नाही तर तुमचा स्वर्गीय पिताही तुम्हांला क्षमा करणार नाही."

---

**वचन 11 वे** काही ग्रीक मूळ प्रतीमध्ये ते अहे: जे हरवलेले आहेत त्यांचे तारण करायला मनुष्याचा पुत्र आला आहे.

**जे काही ... असतील** अनुवाद 19:15

**सत्याहत्तर वेळा** किंवा साताच्या सत्तर वेळा उत्पत्ती 4:24

## येशू घटस्फोटाविषयी शिकवितो
### *(मार्क 10:1-12)*

**19** येशूने या सर्व गोष्टी सांगितल्यानंतर तो गालीलातून निघून गेला. आणि यार्देन नदीच्या दुसऱ्या किनाऱ्याकडील यहूदा प्रांतात गेला. 2 तेव्हा मोठा लोकसमुदाय त्याच्या मागे गेला आणि तेथील अनेक आजारी लोकांना येशूने बरे केले.

3 काही परूशी येशूकडे आले. येशूने चुकीचे काही बोलावे असा प्रयत्न त्यांनी चालविला. त्यांनी येशूला विचारले, "कोणत्याही कारणास्तव एखाद्या मनुष्याने आपल्या पत्नीला सोडचिठ्ठी द्यावी काय?"

4 येशूने उत्तर दिले, "पवित्र शास्त्रात असे लिहिलेले तुमच्या वाचनात निश्चितच आले असेल की, 'जेव्हा देवाने जग उत्पन्न केले, तेव्हा त्याने नर व नारी असे उत्पन्न केले.'* 5 आणि देव म्हणाला, 'म्हणून पुरुष आपल्या आईवडिलांना सोडील व आपल्या पत्नीला जडून राहील. ती दोघे एकदेह होतील."* 6 म्हणून दोन व्यक्ति या दोन नाहीत तर एक आहेत. देवाने त्या दोघांना एकत्र जोडले आहे. म्हणून कोणाही व्यक्तिने त्यांना वेगळे करू नये."

7 परूश्यांनी विचारले, "असे जर आहे, तर मग पुरुषाने सोडचिठ्ठी लिहून देण्याची आणि आपल्या पत्नीला सोडून देण्याची मोकळीक देणारी आज्ञा मोशेने का दिली?"

8 येशूने उत्तर दिले, "तुम्ही देवाची शिकवण मानण्यास नकार दिल्याने तुमच्या पत्नींना सोडून देण्याची मोकळीक दिली. पण सुरुवातीला सोडचिठ्ठी देण्याची मोकळीक नव्हती. 9 मी तुम्हांस सांगतो, जो मनुष्य आपली पत्नी सोडून देतो आणि दुसरीशी लग्न करतो तो व्यभिचार करतो. आपल्या पत्नीला सोडचिठ्ठी देण्याचे एकच कारण आहे, ते म्हणजे पहिल्या पत्नीने परपुरुषांशी व्यभिचार करणे होय!"

10 मग त्याचे शिष्य त्याला म्हणाले, "जर पती व पत्नीमधील परिस्थिति अशी असेल तर मग लग्न न करणे जास्त योग्य ठरेल."

11 येशूने उत्तर दिले, "लग्नाविषयीची अशी शिकवण स्वीकारणे प्रत्येक मनुष्याला शक्य होणार नाही. परंतु काही जणांना देवाने ही शिकवण ग्रहण करण्यास संमति दिली आहे.

12 काही लोकांची लग्न न करण्याची कारणे निराळी असू शकतील. जन्मापासूनच काही माणसे अशी असतात की, ती मुलांना जन्म देऊ शकत नाहीत. इतर काही माणसांनी काही जणांना तसे बनविलेले असते तर आणखी काही माणसांनी स्वर्गाच्या राज्याकरिता लग्न करणे सोडून दिले आहे, परंतु ज्याला लग्न करणे शक्य होईल, त्या मनुष्याने लग्नाविषयी ही शिकवण मान्य करावी."

## येशू बालकांचे स्वागत करतो
### *(मार्क 10:13-16; लूक 18:15-17)*

13 नंतर येशूने आपल्या मुलांवर हात ठेवून प्रार्थना करावी यासाठी काही लोकांनी आपली मुले त्याच्याकडे आणली. येशूच्या शिष्यांनी त्यांना पाहिल्यावर ते बालकांना घेऊन येशूकडे येण्यास मना करू लागले. 14 परंतु येशू म्हणाला, "लहान मुलांना मजकडे येऊ द्या, त्यांना मना करू नका, कारण स्वर्गाचे राज्य या लहान मुलांसारख्या लोकांचेच आहे." 15 मुलांवर हात ठेवल्यावर येशू तेथून निघून गेला.

## एक श्रीमंत मनुष्य येशूला अनुसरण्याचे नाकारतो
### *(मार्क 10:17-31; लूक 18:18-30)*

16 एक मनुष्य येशूकडे आला आणि त्याने विचारले, "गुरुजी, अनंतकाळचे जीवन मिळावे म्हणून मी कोणत्या चांगल्या गोष्टी केल्या पाहिजेत?"

17 येशूने उत्तर दिले, "काय चांगले आहे असे मला का विचारतोस? फक्त देव एकच चांगला आहे पण जर तुला अनंतकाळचे जीवन पाहिजे तर सर्व आज्ञा पाळ."

18 त्याने विचारले, "कोणत्या आज्ञा?" येशूने उत्तर दिले, "'खून करू नको, व्यभिचार करू नको, चोरी करू नको, खोटी साक्ष देऊ नको. 19 आपल्या आईवडिलांना मान दे* आणि 'जशी स्वत:वर प्रीति करतोस तशी इतरांवर प्रीति कर.'*" 20 तो तरुण म्हणाला, "या सर्व आज्ञा मी पाळत आलो आहे. मी आणखी काय करावे?"

21 येशूने उत्तर दिले, "तुला जर परिपूर्ण व्हायचे असेल तर जा आणि तुझे जे काही आहे ते विकून टाक. आणि ते पैसे गरीबांना वाटून दे. म्हणजे स्वर्गात तुला मोठा ठेवा मिळेल. मग ये आणि माझ्यामागे चालू लाग."

22 पण जेव्हा त्या तरुणाने हे ऐकले, तेव्हा त्याला फार दु:ख झाले. कारण तो खूप श्रीमंत होता, म्हणून तो येशूला सोडून निघून गेला. 23 तेव्हा येशू आपल्या शिष्यांना म्हणाला, "मी तुम्हांला खरे सांगतो, धनवान माणसाला स्वर्गाच्या राज्यात प्रवेश करणे फार कठीण जाईल. 24 मी तुम्हांला सांगतो की, धनवानाचा स्वर्गाच्या राज्यात प्रवेश होणे यापेक्षा उंटाला सुईच्या नेढ्यातून जाणे जास्त सोपे आहे."

25 जेव्हा शिष्यांनी हे ऐकले तेव्हा ते फार आश्चर्यचकित झाले. त्यांनी येशूला विचारले, "मग कोणाचे तारण होईल?"

26 येशूने आपल्या शिष्यांकडे पाहिले आणि तो म्हणाला, "मनुष्यांना हे अशक्य आहे, पण देवासाठी सर्व गोष्टी शक्य आहेत."

27 पेत्र येशूला म्हणाला, "पाहा, आम्ही सर्व काही सोडले आणि तुमच्या मागे आलो आहोत; मग आम्हांला काय मिळेल?"

---

**जेव्हा ... केले** उत्पत्ति 1:27; 5:2

**म्हणून ... होतील** उत्पत्ति 2:24

**खून ... मान दे** निर्गम 20:12-16

**जशी ... कर** लेवीय 19:18

28येशू म्हणाला, “मी तुम्हांला खरे सांगतो; नव्या युगात जेव्हा मनुष्याचा पुत्र त्याच्या गौरवी सिंहासनावर बसेल तेव्हा तुम्ही जे सर्व माझ्यामागे आलात ते सर्व बारा आसनांवर बसाल आणि इस्राएलाच्या बारा वंशांचा न्याय कराल. 29ज्याने ज्याने माझ्या मागे येण्याकरिता आपले घर, भाऊ, बहीण, आईवडील, मुले, शेतीवाडी सोडली असेल तर त्याला त्यापेक्षा कितीतरी जास्तपटीने लाभ होईल व त्याला अनंतकाळचे जीवन मिळेल. 30पण पुष्कळसे जे आता पहिले आहेत ते शेवटचे होतील आणि जे शेवटचे आहेत ते पहिले होतील.”

### येशू शेतमजुराच्या बोधकथेचा वापर करतो

20 “स्वर्गाचे राज्य हे कोण्या शेतमालकासारखे आहे. जो अगदी पहाटे त्याच्या द्राक्षमळ्यासाठी मोलाने मजूर आणण्यासाठी गेला. 2त्या मनुष्याने एक दिवसाच्या मजुरीकरिता प्रत्येकाला चांदीचे एक नाणे* देण्याचे कबूल केले. आणि त्याने त्यांना द्राक्षाच्या मळ्यात कामास पाठविले. 3सकाळी नऊ वाजण्याच्या सुमारास तो मनुष्य बाजारात गेला तेव्हा तेथे काही माणसे उभी असलेली त्याला दिसली. त्या लोकांना काहीच काम नव्हते. 4मग तो त्यांना म्हणाला, ‘तुम्हीसुद्धा माझ्या द्राक्षमळ्यात कामाला जा आणि जी योग्य मजुरी आहे ती मी तुम्हांला देईन.’ 5मग ते काम करण्यास मळ्यात गेले.

“तो मनुष्य बारा वाजता आणि तीन वाजता बाजारात गेला आणि त्या मनुष्याने आपल्या मळ्यात काम करण्यासाठी काही लोकांना दोन वेळा जाऊन मजुरीवर घेतले. 6पाच वाजता तो मनुष्य परत एकदा बाजारात गेला तेव्हा आणखी काही लोक उभे असलेले त्याला आढळले. त्याने त्यांना विचारले, ‘तुम्ही काही काम न करता दिवसभर येथे का बरे उभे राहिला आहात?’

7त्या लोकांनी उत्तर दिले, ‘आम्हांला कोणी काम दिले नाही.’ तो मनुष्य त्यांना म्हणाला, ‘तर मग तुम्ही जाऊन माझ्या मळ्यात काम करा.’ 8संध्याकाळी मळ्याचा मालक मुकादमाला म्हणाला, ‘मजुरांना बोलवा आणि त्यांना त्यांची मजुरी देऊन टाका! मी ज्यांना अगदी शेवटी कामावर आणले त्यांना अगोदर मजुरी द्या. नंतर बाकीच्या सर्वांना मजुरी द्या. मी कामावर रोजगारीने पहिल्याने बोलाविलेल्यांना सर्वांत शेवटी मजुरी द्या.’

9जे मजूर संध्याकाळी साधारण पाच वाजता कामावर घेतले होते ते आपली मजुरी घेण्यासाठी आले. प्रत्येकाला एक चांदीचे नाणे मजुरी मिळाली. 10मग ज्यांना सुरुवातीला कामावर घेण्यात आले होते, ते आपली मजुरी घेण्यासाठी आले, त्यांना वाटत होते की, इतरांपेक्षा त्यांना जास्त पैसे मिळतील, पण त्यां सर्वांना एकच चांदीचे नाणे मजुरी मिळाली. 11त्यांनी ते घेतले व मालकाकडे तक्रार करू लागले. 12ते म्हणाले, ‘ज्यांना शेवटी कामावर घेतले त्यांनी केवळ एक तासच काम केले. परंतु तुम्ही त्यांना आमच्या बरोबरीने मजुरी दिली. आम्ही मात्र दिवसभर उन्हात राबलो.’ 13परंतु मळ्याचा मालक त्यांच्यातील एकाला म्हणाला, ‘मित्रा, मी तुझ्याबाबतीत अन्याय करीत नाही. आपण यावर सहमत झालो नाही का की, मी तुला एक चांदीचे नाणे मजुरी देईन? 14जे तुझे आहे ते घे आणि घरी जा. तुम्हांला दिली तितकीच मजुरी मला या शेवटच्या माणसाला द्यायची आहे. 15मी माझ्या पैशाचा वापर मला पाहिजे तसा करू शकत नाही का? मी लोकांशी चांगला आहे म्हणून, तुला हेवा वाटतो का?’

16“म्हणून आता जे शेवटचे आहेत ते पहिले होतील आणि पहिले ते शेवटचे होतील.”

### येशू त्याच्या मरणाविषयी बोलतो
### *(मार्क 10:32-34; लूक 18:31-34)*

17येशू यरूशलेमला चालला होता. ते चालत असता त्याने त्याच्या शिष्यांना बाजूला घेतले, आणि त्यांना म्हणाला, 18“ऐका, आपण यरुशलेमकडे जात आहोत. मनुष्याच्या पुत्राला धरून मुख्य याजक व नियमशास्त्राचे शिक्षक यांच्या हाती धरून देण्यात येईल. त्याने मेलेच पाहिजे असे ते म्हणतील. 19ते मनुष्याच्या पुत्राला यहूदीतरांच्या हाती देतील, ते लोक त्याची थट्टा करतील, त्याला चाबकाने मारतील नंतर ते त्याला वधस्तंभावर खिळून जिवे मारतील. परंतु मरणानंतर तिसऱ्या दिवशी त्याला पुन्हा उठविले जाईल.”

### एका आईची खास विनंति
### *(मार्क 10:35-45)*

20त्यानंतर जब्दीच्या मुलांची आई, आपल्या मुलांसह त्याच्याकडे आली. ती त्याच्या पाया पडली आणि तिने त्याला एक विनंति केली. 21त्याने तिला विचारले, “तुला काय पाहिजे?”

ती म्हणाली, “माझा एक मुलगा तुमच्या राज्यात तुमच्या उजवीकडे बसेल आणि दुसरा डावीकडे बसेल असे वचन द्या.”

22येशू तिला म्हणाला, “तू काय मागत आहेस ते तुला माहीत नाही! जे दु:ख मला सोसावे लागणार आहे ते तुमच्याने सोसवेल काय?”

ते म्हणाले, “होय. आम्ही ते सोसू शकू!”

23येशू त्यांना म्हणाला, “तुम्ही खरोखर माझ्या प्याल्यातून प्याल खरे, पण माझ्या उजव्या आणि डाव्या हाताला बसण्याचा मान, देणे हे ठरविणारा मी नाही, तर माझ्या पित्याने तो मान कोणाला द्यायचा हे ठरविले आहे.”

24जेव्हा इतर दहा शिष्यांनी हे ऐकले तेव्हा ते त्या दोघांवर रागावले. 25मग येशूने बोलावून त्यांना म्हटले, “यहूदीतर लोकांच्या राजांना लोकांवर आपली सत्ता आहे हे दाखविणे आवडते आणि त्यांच्या प्रमुख नेत्यांना आपले

---

**चांदीचे एक नाणे** रोमन दिनारी, एका दिवसाची मजूरी.

अधिकार वाटेल तसे वापरणे आवडते. [26]पण तुमचे वागणे
तसे नसावे! जर तुमच्यातील कोणाला मोठे व्हायचे असेल
तर त्याने तुमचा दासच झाले पाहिजे. [27]आणि ज्याला
पहिला व्हावयाचे आहे त्याने कनिष्ट झाले पाहिजे. [28]म्हणजे
तुम्ही मनुष्याच्या पुत्रासारखे असले पाहिजे जो इतरांकडून
सेवा करून घ्यायला आला नाही तर इतरांची सेवा करायला
आणि अनेकांचे तारण व्हावे यासाठी आपला जीव खंडणी
म्हणून देण्यासाठी आला."

## येशू दोन आंधळ्यांना बरे करतो
### *(मार्क 10:46-52; लूक 18:35-43)*

[29]ते यरीहो शहर सोडत असताना, मोठा लोकसमुदाय
त्याच्या मागे आला. [30]रस्त्याच्या कडेला दोन आंधळे
बसले होते आणि जेव्हा त्यांनी ऐकले की, येशू तेथून जात
आहे, तेव्हा ते मोठ्याने ओरडले, "प्रभु येशू, दाविदाच्या
पुत्रा! आमच्यावर दया करा!"

[31]जमावाने त्यांना दटावले व त्यांना शांत राहण्यास
सांगितले. पण ते अधिकच मोठ्याने ओरडू लागले, "प्रभु,
दाविदाच्या पुत्रा, आमच्यावर दया करा!"

[32]मग येशू थांबला आणि त्यांच्याशी बोलला, त्याने
विचारले, "मी तुमच्यासाठी काय करावे अशी तुमची
इच्छा आहे?" [33]त्या आंधळ्या मनुष्यांनी उत्तर दिले, "प्रभु,
आम्हांला दिसावे अशी आमची इच्छा आहे." [34]येशूला
त्यांच्याबद्दल कळवळा आला, आणि त्याने त्यांच्या
डोळ्यांना स्पर्श केला. त्याच क्षणी त्यांना दिसू लागले.
आणि ते त्याच्या मागे गेले.

## येशू यरुशलेममध्ये राजासारखा प्रवेश करतो
### *(मार्क 11:1-11; लूक 19:28-38; योहान 12:12-19)*

21 येशू व त्याचे शिष्य यरुशलेमजवळ आले असता
ते जैतूनाचा डोंगर म्हटलेल्या टेकडीजवळ बेथफगे
या जागी थांबले. येशूने त्याच्या दोन शिष्यांना [2]असे सांगून
पाठविले की, "तुमच्या समोर असलेल्या गावात जा. तुम्ही
गावात शिराल तेव्हा एक गाढवी बांधून ठेवलेली व तिच्या
जवळ एक शिंगरू असलेले तुम्हांला आढळेल. ती दोन्ही
गाढवे सोडून माझ्याकडे घेऊन या. [3]जर कोणी तुम्हांला
विचारले की, ही गाढवे कशासाठी नेत आहात तर त्याला
सांगा की, "येशूला यांची गरज आहे. तो ती लगेच माझ्याकडे
पाठवील." [4]हे यासाठी घडले की संदेष्ट्यांपैकी एक जण
जे बोलला होता ते पूर्ण व्हावे:

[5]"सीयोनेच्या कन्येला सांग: 'पाहा! तुझा राजा तुझ्याकडे
येत आहे! तो लीन आहे आणि नम्र होऊन गाढवावर
बसून येत आहे, होय, शिंगरावर, कष्ट करणाऱ्या प्राण्याच्या
शिंगरावर.'"

*जखऱ्या* 9:9

[6]त्याचे शिष्य गेले आणि जसे येशूने सांगितले होते तसे
त्यांनी केले. [7]शिष्यांनी गाढवी व शिंगरू येशूकडे आणले.
त्या गाढवावर त्यांनी आपले अंगरखे घातले आणि येशू
त्यावर बसला. [8]पुष्कळ लोकांनी आपले अंगरखे येशूसाठी
वाटेवर अंथरले. दुसऱ्या काही लोकांनी झाडांच्या फांद्या
तोडल्या आणि त्या रस्त्यावर पसरल्या. [9]काही लोक
येशूच्या पुढे चालू लागले, काही लोक येशूच्या मागून
चालू लागले. ते लोक मोठ्याने जयघोष करू लागले,

"होसान्ना,* दाविदाच्या पुत्राला प्रभुच्या नावाने येणारा
धन्यवादित असो. स्वर्गीय देवाला होसान्ना!" *स्तोत्र.* 118:26

[10]जेव्हा येशूने यरुशलेममध्ये प्रवेश केला तेव्हा संपूर्ण
शहर ढवळून निघाले व लोक विचारत होते, "हा कोण
आहे?" [11]जमाव उत्तर देत होता, "हा येशू संदेष्टा आहे, तो
गालील प्रांतातील नासरेथचा आहे."

## येशू मंदिरात जातो
### *(मार्क 11:15-19; लूक 19:45-48; योहान 2:13-22)*

[12]मग येशूने मंदिराच्या आवारात प्रवेश केला तेव्हा
तेथे जे लोक विक्री करीत होते व खरेदी करीत होते
तसेच पैशांची आपसात देवाण घेवाण करीत होते त्यांची
मेजे त्याने उलथून टाकली आणि जे लोक कबुतरे विकत
होते त्यांची बसण्याची बाके उलथून टाकली. [13]येशू त्यांना
म्हणाला, "पवित्र शास्त्रात असे म्हटले आहे, 'माझे घर
प्रार्थनेचे घर म्हटले जाईल, पण तुम्ही त्याला लुटारूंची
गुहा केले आहे.'"*

[14]काही आंधळे आणि पांगळे लोक मंदिरात येशूकडे
आले. येशूने त्यांना बरे केले. [15]जेव्हा मुख्य याजक व
नियमशास्त्राच्या शिक्षकांनी, येशूने केलेल्या आश्चर्यकारक
गोष्टी आणि मंदिराच्या आवारात लहान मुलांना "दाविदाच्या
पुत्राला होसान्ना" अशी घोषणा देताना पाहिले, तेव्हा या
सर्व गोष्टींमुळे त्यांना राग आला.

[16]त्यांनी त्याला विचारले, "ही मुले काय म्हणत आहेत
हे तुम्ही ऐकता ना?"

येशूने त्यांना उत्तर दिले, "होय, पवित्र शास्त्रात काय
लिहिले आहे ते तुम्ही ऐकले नाही का?

'तू बालके व तान्हुली यांना स्तुति करायला शिकविले
आहेस.'*

[17]नंतर येशू तेथून निघाला व बेथानीला गेला. तेथे तो
रात्रभर राहिला.

---

**होसान्ना** हा हिब्रु शब्द आहे, याचा अर्थ 'देवा आम्हांला वाचव पण या ठिकाणी याचा अर्थ आनंदाने देवाची स्तुति करणे असा होते.

**माझे ... आहे** यशया 56:7; यिर्मया 7:12

**तू बालके ... आहेस** स्तोत्र. 8:3

## येशू विश्वासाचे सामर्थ्य दर्शवितो
### *(मार्क 11:12-14, 20-24)*

18दुसऱ्या दिवशी पहाटे तो यरुशलेमकडे पुन्हा येत
असता त्याला भूक लागली. 19रस्त्याच्या कडेला त्याला
अंजिराचे एक झाड दिसले. अंजिर खायला मिळेल या
आशेने तो झाडाजवळ गेला. पण झाडावर त्याला एकही
अंजिर दिसले नाही. त्याला फक्त पाने होती. येशू त्या
झाडाला म्हणाला, "यापुढे तुला कधीही फळ न येवो!"
आणि ते झाड लगेच वाळून गेले आणि मेले.
20शिष्यांनी हे पाहिले, तेव्हा त्यांना फार आश्चर्य वाटले.
त्यांनी विचारले, "हे अंजिराचे झाड इतक्या लवकर वाळून
कसे गेले आणि मेले?"
21येशू त्याना म्हणाला, "मी तुम्हांला खरे सांगतो, जर
तुम्हांला विश्वास असेल, आणि जर तुम्ही संशय धरला
नाही तर मी जे अंजिराच्या झाडाबाबतीत केले तेच नव्हे
तर या डोंगराला उठून समुद्रात पड असे म्हणालात तरी ते
घडेल. 22जर तुमचा विश्वास असेल तर जे काही तुम्ही
प्रार्थनेत मागाल ते तुम्हांला मिळेल."

## यहूदी पुढारी येशूच्या अधिकाराविषयी शंका घेतात
### *(मार्क 11:27-33; लूक 20:1-8)*

23येशू मंदिरात गेला. येशू तेथे शिक्षण देत असताना
मुख्य याजक व वडीलजन येशूकडे आले. ते येशूला
म्हणाले, "तुम्ही कोणत्या अधिकाराने या गोष्टी करता?
हा अधिकार तुम्हांला कोणी दिला?"
24येशू म्हणाला, "मी सुद्धा तुम्हांला एक प्रश्न विचारतो.
जर तुम्ही मला उत्तर दिले तर मी कोणत्या अधिकाराने
या गोष्टी करतो, हे मी तुम्हांला सांगेन. 25तुम्ही मला
सांगा, योहान लोकांना बाप्तिस्मा देत असे, तेव्हा त्याला
तो देण्याचा अधिकार कोठून आला- देवाकडून की
मनुष्यांकडून?"
येशूच्या या प्रश्नावर ते चर्चा करू लागले. ते म्हणाले,
"'योहानाचा बाप्तिस्मा देवाकडून होता 'असे म्हणावे तर
येशू म्हणेल मग 'तुम्ही त्याच्यावर विश्वास का ठेवला
नाही?' 26पण जर 'तो मनुष्यांकडून होता' असे आपण
म्हणालो तर सर्व लोक आपल्यावर रागावतील. आपल्याला
लोकांची भीति आहे. कारण योहान हा एक संदेष्टा होता
असे ते सर्व जण मानतात."
27म्हणून त्यांनी येशूला उत्तर दिले, "योहानाचा अधिकार
कोठून होता हे आम्हांला माहीत नाही." तेव्हा येशू म्हणाला,
"मग मी कोणत्या अधिकाराने या गोष्टी करतो, हे मीही
तुम्हांला सांगणार नाही."

## येशू दोन पुत्रांचा दाखला सांगतो

28"याविषयी तुम्हांला काय वाटते ते मला सांगा. एका
मनुष्याला दोन मुलगे होते. तो मनुष्य आपल्या पहिल्या
मुलाकडे गेला आणि म्हणाला, 'माझ्या मुला, आज तू
माझ्या द्राक्षाच्या मळ्यात जा आणि काम कर.'
29"मुलाने उत्तर दिले, 'मी जाणार नाही.' परंतु नंतर
त्या मुलाने जायचे ठरविले व तो गेला.
30"नंतर वडील आपल्या दुसऱ्या मुलाकडे गेले आणि
म्हणाले, 'माझ्या मुला, आज तू जाऊन माझ्या द्राक्षाच्या
मळ्यात काम कर.' त्या मुलाने उत्तर दिले, 'होय बाबा,
मी जातो.' पण तो गेला नाही.
31"त्या दोघांपैकी कोणत्या मुलाने वडीलांची आज्ञा
पाळली?" ते म्हणाले, "पहिल्या मुलाने"
येशू त्यांना म्हणाला, "मी खरे सांगतो, जकातदार व
वेश्या हे वाईट लोक आहेत असे तुम्हांला वाटते, पण ते
तुमच्या अगोदर स्वर्गाच्या राज्यात जातील. 32जीवनाचा
खरा रस्ता कोणता हे तुम्हांला दाखवावे म्हणून योहान
आला आणि तुम्ही योहानाला मानले नाही. जकातदार व
वेश्या यांनी योहानावर विश्वास ठेवला हे तुम्ही पाहिले
पण तरी देखील तुम्ही आपले मन बदलण्यास आणि
योहानावर विश्वास ठेवण्यास तयार झाला नाही.

## देव आपला पुत्र पाठवितो
### *(मार्क 12:1-12; लूक 20:9-19)*

33"ही बोधकथा ऐका : एक मनुष्य होता, त्याचे शेत
होते. त्याने आपल्या शेतात द्राक्षे लावली. शेताच्या भोवती
त्याने एक भिंत बांधली आणि द्राक्षे कुस्करून रस
गाळण्याकरिता खड्डा करून एक घाणा तयार केला. आणि
टेहळणी करण्यासाठी एक मनोरा (माळा) बांधला. मग
त्याने आपला मळा काही शेतकऱ्यांना करायला खंडाने
दिला. मग तो परत गेला. 34जेव्हा द्राक्षे तोडणीचा हंगाम
जवळ आला, तेव्हा त्या मनुष्याने आपला वाटा
आणण्याकरिता काही नोकर खंडकरी शेतकऱ्याकडे
पाठविले. 35परंतु शेतकऱ्यांनी त्यांच्यावर हल्ला केला.
एकाला मार दिला तर दुसऱ्या नोकराला जिवे मारले.
नंतर तिसऱ्याला दगडमार करून ठार केले. 36मग
शेतकऱ्यांकडे त्या मनुष्याने आणखी एकदा नोकर
पाठविले. पहिल्यापेक्षा त्याने जास्त नोकर पाठविले पण
त्या शेतकऱ्यांनी त्यांना तशीच वागणूक दिली. 37नंतर,
त्याने त्याच्या स्वत:च्या मुलाला त्यांच्याकडे पाठविले, तो
म्हणाला, 'निश्चितच ते माझ्या मुलाचा मान राखतील.'
38"पण जेव्हा शेतकऱ्यांनी त्याच्या मुलाला पाहिले तेव्हा
ते एकमेकास म्हणू लागले, 'हा तर मालकाचा मुलगा
आहे. तो वारस आहे. चला आपण त्याला ठार करू व
त्याचे वतन घेऊ.' 39त्यांनी त्याला धरले व मळ्याच्या
बाहेर फेकले व त्याला ठार मारले.
40"मग द्राक्षमळ्याचा मालक परत येईल तेव्हा या
शेतकऱ्यांचे काय करील?" 41यहूदी मुख्य याजक आणि
पुढारी म्हणाले, "तो त्या लोकांना खात्रीने मरणदंड देईल.
कारण ते दुष्ट होते. नंतर तो आपला मळा दुसऱ्यास

खंडाने देईल. हंगामाच्या दिवसात जे त्याच्या पिकाची वाटणी
देतील, अशांना तो ते देईल.”
42येशू त्यांना म्हणाला, “तुम्ही पवित्र शास्त्रात वाचले
असेलच की,

‘बांधणाऱ्यांनी नापसंत केलेला दगड कोनशिला झाला
आहे हे प्रभूने केले आणि आमच्यासाठी हे अद्भुत आहे.’
*स्तोत्र.* 118:22-23

43“म्हणून मी तुम्हांला सांगतो की, देवाचे राज्य
तुमच्याकडून काढून घेण्यात येईल. देवाला आपल्या
राज्यात पाहिजेत अशा गोष्टी जे लोक करतील, त्यांना ते
देण्यात येईल. 44जो कोणी या दगडावर पडेल, त्याचे तुकडे
तुकडे होतील आणि जर हा दगड एखाद्या मनुष्यावर पडेल
तर त्या मनुष्याचा चक्काचूर होईल.”
45येशूने सांगितलेल्या या बोधकथा मुख्य याजकांनी
आणि परूश्यांनी ऐकल्या. येशू त्यांच्याविषयी बोलत आहे
हे त्यांनी ओळखले. 46त्यांना येशूला अटक करायचे
होते, पण त्यांना लोकांचे भय वाटत होते, कारण लोक
येशूला संदेष्टा मानीत होते.

## लोकांना भोजनाला दिलेल्या आमंत्रणाची बोधकथा
*(लूक 14:15-24)*

22 येशूने त्यांच्याशी बोलण्यास सुरुवात करून पुन्हा
एकदा बोधकथेचा वापर केला. तो म्हणाला,
2“स्वर्गाचे राज्य एका राजासारखे आहे, त्याने त्याच्या
मुलाच्या लग्नानिमित्त भोजनाचे आमंत्रण दिले. 3त्याने
त्याच्या नोकरांना पाठवून, ज्यांना लग्नाचे आमंत्रण होते
आशांना बोलाविण्यास सांगितले. पण लोकांनी राजाच्या
मेजवानीस येण्यास नकार दिला.
4“नंतर राजाने आणखी काही नोकरांना पाठवून दिले.
राजा नोकरांना म्हणाला, ‘मी त्या लोकांना अगोदरच
आमंत्रण दिले आहे म्हणून आता जा आणि त्यांना सांगा,
‘पाहा, मेजवानी तयार आहे. मी चांगल्यातील चांगले बैल
आणि वासरे कापली आहेत आणि सगळे तयार आहे.
लग्नाच्या मेजवानीस या!’
5“नोकर गेले आणि त्यांनी लोकांस येण्यास सांगितले,
पण त्यांनी नोकरांच्याकडे लक्ष दिले नाही. ते आपापल्या
कामास निघून गेले. एक शेतात काम करायला गेला;
तर दुसरा व्यापार करायला गेला. 6काहींनी मालकाच्या
उरलेल्या नोकरांना पकडून मार दिला व जिवे मारले.
7राजा फार रागावला. त्याने त्याचे सैन्य पाठविले आणि
त्यांनी त्या खुन्यांना ठार मारले. त्यांनी त्यांचे शहर जाळले.
8“मग राजा त्याच्या नोकरांना म्हणाला, ‘मेजवानी तयार
आहे, पण ज्यांना बोलाविले होते ते पात्र नव्हते, 9म्हणून
रस्त्यांच्या कोपऱ्यांवर जा आणि तेथे तुम्हांला जे भेटतील
त्यांना लग्नाच्या मेजवानीला बोलवा.’ 10मग ते नोकर
रस्त्यावर गेले. त्यांना जे जे लोक भेटले त्यांना जमा
केले. ज्या ठिकाणी लग्नाची मेजवानी तयार होती तेथे
नोकरांनी चांगल्या आणि वाईट लोकांना जमा केले आणि
ती जागा भरून गेली.
11“मग त्या सर्वांना भेटण्यास राजा तेथे आला.
मेजवानीसाठी साजेल असा पोशाख न केलेला एक मनुष्य
राजाला तेथे आढळला. 12राजा त्याला म्हणाला, ‘मित्रा,
तुला येथे कोणी व कसे येऊ दिले? मेजवानीला साजेसे
कपडे नसताना तू येथे कसा आलास?’ पण तो गप्प राहिला.
13तेव्हा राजाने नोकरांना सांगितले, ‘या मनुष्याचे हात व
पाय बांधा आणि त्याला बाहेर अंधारात टाका, तेथे रडणे
आणि दातखाणे चालेल.’
14“कारण बोलाविलेले पुष्कळ आहेत पण निवडलेले
थोडे आहेत.”

## काही यहूदी पुढारी येशूला फसवू पाहतात
*(मार्क 12:13-17; लूक 20:20-26)*

15मग परूशी गेले आणि येशूला कसे पकडावे याचा
कट करू लागले. त्याला शब्दात पकडण्याचा प्रयत्न करू
लागले. 16परूशांनी येशूला फसविण्याच्या हेतूने काही
माणसे त्याच्याकडे पाठविली. त्यांनी आपली काही माणसे
(शिष्य) आणि हेरोदी गटाच्या काही लोकांना येशूकडे
पाठविले. ते म्हणाले, “गुरुजी, आम्हांला माहीत आहे की
आपण सत्यवचनी आहात, आणि तुम्ही देवाचा मार्ग
प्रामाणिकपणे शिकविता, व दुसरे काय विचार करतात
याची तुम्ही पर्वा करीत नाही. तुम्ही सर्वांना समान मानता.
17म्हणून तुमचे मत आम्हांला सांगा: कैसराला कर देणे
योग्य आहे की नाही?”
18येशूला त्यांचा दुष्ट उद्देश माहीत होता, म्हणून तो
म्हणाला, “ढोंग्यांनो, तुम्ही माझी परीक्षा का घेत आहात?
19कर भरण्यासाठी जे नाणे वापरले जाते ते मला दाखवा.”
त्या लोकांनी येशूला चांदीचे एक नाणे दाखविले.
20तेव्हा येशूने विचारले, “या नाण्यावर कोणाचे चित्र
आहे? आणि या नाण्यावर कोणाचे नाव लिहिलेले आहे?”
21त्या लोकांनी उत्तर दिले, “त्यावर कैसराचे चित्र व नाव
दिले आहे.” यावर येशू त्यांना म्हणाला, “जे कैसराचे
आहे ते कैसराला द्या. आणि जे देवाचे आहे ते देवाला
द्या!” 22येशू जे म्हणाला ते त्या लोकांनी ऐकले तेव्हा ते
आश्चर्यचकित झाले आणि तेथून निघून गेले.

## काही सदूकी लोक येशूला फसवू पाहतात
*(मार्क 12:18-27; लूक 20:27-40)*

23त्याच दिवशी काही सदूकी लोक त्याच्याकडे आले
(हे लोक असे समजतात की पुनरुत्थान नाही.) त्यांनी
येशूला एक प्रश्न विचारला, 24ते म्हणाले, “गुरुजी, मोशेने
शिकविले की, जर एखादा मनुष्य मेला आणि त्याला
मूलबाळ नसेल, तर त्याच्या भावाने किंवा जवळच्या

नातेवाईकाने त्याच्या पत्नीशी लग्न करावे, म्हणजे मेलेल्या भावासाठी त्यांना मुले होतील. 25आता, आमच्यामध्ये सात भाऊ होते. पहिल्याने लग्न केले आणि नंतर तो मेला आणि त्याला मूल नसल्याने त्याच्या भावाने त्याच्या पत्नीशी लग्न केले. 26असेच दुसऱ्या व तिसऱ्या भावाच्या बाबतीतही घडले व सातही भावांनी तिच्याशी लग्न केले आणि मेले. 27शेवटी ती स्त्री मेली. 28आता प्रश्न असा आहे की, पुनरुत्थानाच्या वेळेस ती कोणाची पत्नी असेल, कारण सर्व सातही भावांनी तिच्याशी लग्न केले होते."

29उत्तर देताना येशू त्यांना म्हणाला, "तुम्ही चुकीची समजूत करून घेत आहात, कारण तुम्हांला देवाचे वचन किंवा सामर्थ्य माहीत नाही. 30तुम्हांला समजले पाहिजे की, पुनरुत्थानानंतरच्या जीवनात लोक लग्न करणार नाहीत किंवा करून देणार नाहीत. उलट ते स्वर्गात देवदूतासारखे असतील. 31तरी, मृतांच्या पुनरुत्थानाच्या संदर्भात देव तुमच्या फायद्यासाठी जे बोलला ते तुम्ही अजूनपर्यंत वाचले नाही काय? 32तो म्हणाला, 'मी अब्राहाम, इसहाक आणि याकोबाचा देव आहे.'* हा देव मेलेल्यांचा देव नाही तर जिवंत लोकांचा देव आहे."

33जेव्हा जमावाने हे ऐकले तेव्हा ते आश्चर्यचकित झाले.

## कोणती आज्ञा सर्वांत महत्त्वाची आहे?
### *(मार्क 12:28-34; लूक 10:25-28)*

34येशूने सदूकी लोकांना अशा बोधकथा सांगितल्या की त्यांना वाद घालता येईना. हे परूश्यांनी ऐकले. म्हणून परूश्यांनी एकत्र येऊन मसलत केली. 35एक परूशी नियमशास्त्राचा जाणकार होता. त्या परूश्याने येशूची परीक्षा पाहावी म्हणून प्रश्न केला. 36त्याने विचारले, "गुरुजी, नियमशास्त्रातील कोणती आज्ञा सर्वांत महत्त्वाची आहे?"

37येशूने उत्तर दिले, "'प्रभु तुमचा देव याजवर प्रीति करा. तुम्ही त्याजवर पूर्ण हृदयाने, पूर्ण जिवाने, पूर्ण मनाने प्रीति करा.'* 38ही पहिली आणि मोठी आज्ञा आहे. 39हिच्यासारखी दुसरी एक आहे: 'जशी आपणावर तशी इतरांवर प्रीति करा.'* 40सर्व नियमशास्त्र आणि संदेष्ट्यांचे लिखाण या दोन आज्ञांवरच अवलंबून आहे."

## येशू परूश्यांना प्रश्न विचारतो
### *(मार्क 12:35-37; लूक 20:41-44)*

41म्हणून परूशी एकत्र उभे असताना, येशूने त्यांना प्रश्न केला. 42येशू म्हणाला, "ख्रिस्ताविषयी तुमचे काय मत आहे? तो कोणाचा पुत्र आहे?" परूश्यांनी उत्तर दिले, "ख्रिस्त हा दाविदाचा पुत्र आहे." 43त्यावर येशू त्यांना म्हणाला, "मग दाविदाने त्याला प्रभु असे का म्हटले? दाविदाच्या अंगी पवित्र आत्मा आला असता तो म्हणाला,

44 'प्रभु माझ्या प्रभूला (ख्रिस्ताला) म्हणाला, 'मी तुझे वैरी तुझे पादासन करीपर्यंत, माझ्या उजव्या बाजूला बैस.'
*स्तोत्र. 110:1*

45आता, मग जर दाविद त्याला प्रभु म्हणतो तर तो दाविदाचा पुत्र कसा होऊ शकतो?" 46पण परुश्यांपैकी कोणीही त्याच्या प्रश्नाचे उत्तर देऊ शकला नाही. त्या दिवसानंतर त्याला आणखी प्रश्न विचारण्याचे धाडस कोणीही केले नाही.

## येशू धार्मिक पुढाऱ्यांवर टीका करतो
### *(मार्क 12:38-40; लूक 11:37-52; 20:45-47)*

23 मग येशू लोकांशी व त्याच्या शिष्यांशी बोलला, तो म्हणाला, 2"नियमशास्त्राचे शिक्षक व परूशी यांना मोशेच्या नियमशास्त्राचे स्पष्टीकरण करण्याचे अधिकार आहेत. 3म्हणून ते जसे सांगतात तसे तुम्ही करा. पण ते जसे करतात तसे करू नका. मी असे म्हणतो याचे कारण ते बोलतात पण त्याप्रमाणे करत नाहीत. 4वाहावयास अवघड असे ओझे ते बांधतात व ते ओझे लोकांच्या खांद्यांवर देतात व ते स्वत: ते ओझे उचलायला एक बोटदेखील लावत नाहीत.

5"ते त्यांचे सर्व चांगले काम लोकांनी पाहावे म्हणून करतात. ते पवित्र शास्त्र लिहिलेल्या लहान पेट्या* मोठमोठ्या बनवितात आणि लोकांनी पाहावे म्हणून लांब झगे घालतात. 6मेजवानीच्या ठिकाणी आपल्याला विशेष मानाची जागा मिळावी असे त्यांना वाटते. तसेच यहूद्यांचे सभास्थानात मोक्याच्या जागी बसायला त्यांना फार आवडते. 7बाजारातील मुख्य रस्त्याने जाता येता लोकांनी आपल्याला मान द्यावा याची त्यांना फार आवड असते आणि लोकांनी त्यांना 'गुरुजी' म्हणावे असे त्यांना वाटते.

8"परंतु तुम्ही स्वत:ला गुरुजी म्हणवून घेऊ नका. तुम्ही सर्व एकमेकांचे बहीण भाऊ आहात, तुमचा गुरू एकच आहे. 9आणि जगातील कोणालाही 'पिता' म्हणू नका. कारण तुमचा पिता एकच आहे व तो स्वर्गात आहे. 10तुम्ही स्वत:ला 'मालक' म्हणवून घेऊ नका. तुमचा मालक ख्रिस्त आहे. 11तुमच्यातील जो सेवक बनून तुमची सेवा करतो तो तुमच्यात सर्वात मोठा होय. 12जो स्वत:ला मोठा समजेल त्याला कमी लेखले जाईल. स्वत:ला लहान समजणारा प्रत्येक जण मोठा गणला जाईल. 13अहो, परूश्यांनो आणि नियमशास्त्राच्या शिक्षकांनो, हाय, हाय,

---

**मी ... आहे** निर्गम 3:6

**प्रभू ... प्रीति करा** अनुवाद 6:5.

**जशी ... करा** लेवीय 19:18

**लहान पेट्या** लहान चामडी पेट्या, ज्यात महत्त्वाची पवित्र वचने लिहीलेली असतात. काही यहूदी ते आपल्या कपाळवर व हातावर बांधून आपण फार धार्मिक आहोत हे दाखवितात.

तुम्ही ढोंगी आहात! तुम्ही स्वर्गाच्या राज्याचा रस्ता
लोकांसाठी खुला ठेवीत नाहीत. तुम्ही स्वत: तर आत
जात नाहीच पण जे आत जाण्याचा प्रयत्न करतात त्यांनाही
आत जाऊ देत नाहीत. 14*

15“परूश्यांनो व नियमशास्त्राच्या शिक्षकांनो, तुम्ही
दु:खी व्हाल. तुम्ही ढोंगी आहात! तुम्ही समुद्र व जमिनीवरून
प्रवास करून एक तरी शिष्य मिळतो का ते पाहता आणि
तुम्हांला तो मिळतो तेव्हा तुम्ही त्याला तुमच्याप्रमाणे
नरकपुत्रासारखे करून टाकता.

16“तुम्हांला दु:ख होईल. आंधळ्या वाटाड्यांनो, जे तुम्ही
म्हणता, ‘जर एखादा मंदिराच्या नावाने शपथ घेतो तर
त्याने ती पाळलीच पाहिजे याचे बंधन त्याच्यावर नाही;
पण जर एखादा मंदिरातील सोन्याची शपथ घेऊन बोलतो,
तर त्याने ती शपथ पाळलीच पाहिजे.’ 17तुम्ही मूर्ख आंधळे
आहात. सोने आणि मंदिर यांपैकी कोणते अधिक महत्त्वाचे?
मंदिर त्या सोन्याला पवित्र बनविते. 18आणि तुम्ही असे
म्हणता, ‘जर एखादा वेदीची शपथ घेतो तर त्यात काही
वावगे नाही. पण जर एखादा वेदीवरील अर्पणाची शपथ
घेतो तर त्याने ती शपथ पाळलीच पाहिजे.’ 19तुम्ही आंधळे
आहात. तुम्हांला काही दिसत नाही व कळत नाही! अर्पण
मोठे की वेदी मोठी? वेदीमुळे अर्पण पवित्र होते म्हणून
वेदी मोठी. 20म्हणून जो वेदीची शपथ घेतो तो त्या वेदीबरोबर
त्यावरच्या सर्वांची शपथ घेतो. 21तसेच जो मंदिराची शपथ
घेतो तो मंदिर व त्यात राहणाऱ्या देवाची देखील शपथ
घेतो. 22जो स्वर्गाची शपथ घेतो तो देवाच्या आसनाची व
त्यावर बसणाऱ्याचीही शपथ घेतो.

23“परूश्यांनो, नियमशास्त्राच्या शिक्षकांनो, तुम्ही दु:खी
व्हाल. तुम्ही ढोंगी आहात! तुमचे जे काही आहे त्याचा
दशांश तुम्ही देवाला देता– पुदिना, शेप, जिरे यांचा देखील
दशांश देता. पण नियमशास्त्राच्या महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे–
न्यायाने वागणे, दया दाखविणे व प्रामाणिकपणे वागणे हे
तुम्ही पाळत नाही. या गोष्टी तुम्ही केल्या पाहिजेत व
तसेच इतरही केल्या पाहिजेत. 24तुम्ही आंधळे वाटाडे
आहात. जो पाण्याने भरलेल्या प्याल्यातून माशी बाजूला
करतो व उंटासह पाणी पिऊन टाकतो त्यांच्यासारखे तुम्ही
आहात. 25“अहो परूश्यांनो, नियमशास्त्राच्या शिक्षकांनो,
तुम्ही दु:खी व्हाल, तुम्ही ढोंगी आहात! तुम्ही आपल्या
ताटवाट्या बाहेरून घासता पुसता पण लोकांना फसवून
कमावलेला फायदा आणि असंयम यानी त्या आतून भरल्या
आहेत. 26अहो परूश्यांनो, तुम्ही आंधळे आहात! अगोदर
तुमची वाटी आतून घासा व धुवा म्हणजे ती बाहेरूनदेखील
खरोखर साफ होईल.

27“अहो परूश्यांनो, नियमशास्त्राच्या शिक्षकांनो, तुम्ही
दु:खी व्हाल. तुम्ही ढोंगी आहात! रंगसफेदी केलेल्या
कबरांसारखे तुम्ही आहात. त्या वरून चांगल्या दिसतात
पण आतून मेलेल्या माणसांच्या हाडांनी भरल्या आहेत
तसेच सर्व प्रकारच्या अशुद्ध गोष्टींनी त्या भरल्या आहेत.
28तुमचेही तसेच आहे. लोक तुमच्याकडे पाहतात आणि
तुम्ही चांगले आहात असे त्यांना वाटते. पण तुम्ही आतून
ढोंग व दुष्टपणा यांनी भरला आहात.

29अहो, परूश्यांनो, नियमशास्त्राच्य शिक्षकांनो, तुम्ही
दु:खी व्हाल. तुम्ही ढोंगी आहात! तुम्ही संदेष्ट्यांसाठी कबरा
बांधता. आणि जे लोक धार्मिक जीवन जगले त्यांची
थडगी सजवता.

30आणि तुम्ही म्हणता, ‘जर आम्ही आमच्या
वाडवडिलांच्या काळात जिवंत असतो तर त्यांना या
संदेष्ट्यांना जिवे मारण्यास मदत केली नसती.’ 31पण ज्यांनी
ज्यांनी त्यांना जिवे मारले, त्यांचेच तुम्ही वंशज आहात
याचा पुरावा तुम्ही देता. 32पुढे व्हा आणि तुमच्या
वाडवडिलांनी सुरू केलेली पापी कामे पूर्ण करा!

33“तुम्ही साप आहात. विषारी सापाची पिल्ले आहात!
तुम्ही देवाच्या हातून सुटू शकणार नाही. तुम्हा सर्वांना
दोषी ठरविण्यात येईल. तुम्ही नरकात जाल! 34मी तुम्हांला
सांगतो की मी तुमच्याकडे संदेष्टे, ज्ञानी लोक आणि
शिक्षक पाठवीत आहे. त्यांच्यातील काहींना तुम्ही जिवे
माराल. त्यांपैकी काहींना वधस्तंभावर खिळाल.
त्यांच्यातील काहींना तुमच्या सभास्थानात मारहाण कराल.
त्यांचा नगरानगरातून पाठलाग कराल.

35म्हणून ज्या चांगल्या लोकांचा वध या पृथ्वीवर झाला
त्या सर्वांसाठी तुम्ही दोषी ठराल. हाबेल या चांगल्या
मनुष्याच्या वधासाठी तुम्ही दोषी ठराल. आणि तुम्ही
बरख्याचा पुत्र जखऱ्याला जिवे मारण्याविषयी दोषी ठराल.
त्याला मंदिर आणि वेदी यांच्यामध्ये मारले होते. हाबेलाच्या
काळापासून ते जखऱ्याच्या* काळापर्यंत जे जे चांगले
लोक मारण्यात आले, त्यांच्या वधाविषयी तुम्ही दोषी
ठराल. 36मी तुम्हांला खरे सांगतो; तुम्ही लोक जिवंत
असेपर्यंत या गोष्टी घडतील.

## यरुशलेमच्या लोकांना येशू सावध करतो
***(लूक 13:34-35)***

37“अगे, यरुशलेमे, यरूशलेमे, तू संदेष्ट्यांना जिवे
मारतेस. देवाने तुझ्याकडे पाठविलेल्या लोकांना दगडमार
करतेस. कोंबडी जशी आपल्या पिल्लांना पंखाखाली
एकवटते तसे तुझ्यातील लोकांना एकवटण्याचा पुष्कळ
वेळा मी प्रयत्न केला, पण तू मला तसे करू दिले नाहीस.
38आता तुझे घर उजाड होईल. 39मी तुला सांगतो, ‘प्रभूच्या

---

**वचन 14** परूशयांनो, आणि नियमशास्त्राच्या शिक्षकांनो, तुम्ही दु:खी व्हाल. तुम्ही ढोंगी आहात. तुमही विधवांची घरे लुटता आणि लोकांनी पाहावे म्हणून लांबलचक प्रार्थना करता, म्हणून तुम्हांला फार कडक शिक्षा होईल.

**हाबेल ते जखऱ्या** हिब्रु भाषेतील जुन्या करारात (पवित्र शास्त्रात) हे दोघे पहिल्यांदा व शेवटी मारण्यात आलेली माणसे आहेत.

नावाने येणारा धन्यवादित असो.'* असे म्हणेपर्यंत तू मला
पाहणार नाहीस."

## मंदिराचा भावी नाश
***(मार्क 13:1-31; लूक 21:5-33)***

24 येशू मंदिरातून बाहेर निघून चालत निघाला
होता तेव्हा त्याचे शिष्य त्याच्याकडे आले. कारण
त्यांना त्याला मंदिराच्या इमारती दाखवायच्या होत्या.
2प्रतिसादादाखल, तो त्यांना म्हणाला, "तुम्ही या सर्व गोष्टी
पाहता, खरे ना? आता, मी तुम्हांला खरे सांगतो, येथे एक
दगड दुसऱ्या दगडावर राहणार नाही, त्यातील प्रत्येक
दगड खाली टाकला जाईल."
3येशू जैतूनाच्या डोंगरावर बसला असताना, त्याचे शिष्य
त्याच्याशी एकांतात बोलावे म्हणून आले, ते म्हणाले,
"आम्हांला सांगा की या गोष्टी कधी होतील? तुम्ही परत
येण्याचा आणि जगाचा शेवट होण्याचा काळ जवळ आला
आहे हे आम्ही कोणत्या घटनांवरून ओळखावे?"
4येशूने त्यांना उत्तर दिले, "सांभाळा! कोणीही तुम्हांला
फसवू नये 5मी हे म्हणतो कारण असे पुष्कळ आहेत की
जे माझ्या नावाने येतील आणि ते म्हणतील, 'मी ख्रिस्त
आहे.' आणि ते पुष्कळ लोकांना फसवितील. 6तुम्ही
लढायांबद्दल आणि लढायांच्या अफवांबद्दल ऐकाल पण
त्यामुळे तुम्ही त्यांना भिऊ नका. या गोष्टी घडल्याच
पाहिजेत, तरी इतक्यात शेवट जवळ येणार नाही. 7होय,
एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रावर उठेल. अनेक ठिकाणी भूकंप
व दुष्काळ येतील, 8पण या सर्व गोष्टी म्हणजे प्रसूतीच्या
कळांची सुरूवात अशा आहेत.
9"लोक तुमच्याशी वाईट वागतील. तुमचा छळ व्हावा
आणि तुम्हांला जिवे मारावे यासाठी लोक तुम्हांला
राज्यकर्त्यांच्या हाती देतील. सर्व लोक तुमचा द्वेष करतील.
तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवला म्हणून या गोष्टी तुमच्यावर
ओढवतील. 10अशा वेळी बरेच विश्वासणारे आपला
विश्वास गमावतील. ते एकमेकाविरुद्ध उठतील आणि
एकमेकांचा द्वेष करतील. 11अनेक खोटे संदेष्टे येतील.
ते लोकांना चुकीचे शिक्षण देतील व त्यावर विश्वास
ठेवायला लावतील. 12सतत वाढणाऱ्या दुष्टाईमुळे
अधिकाधिक विश्र्वासणाऱ्यांची प्रीति कमी कमी होत
जाईल. 13पण जो मनुष्य शेवटपर्यंत खंबीरपणे वागेल तोच
तारला जाईल. 14सर्व जगभर देवाची सुवार्ता गाजविली
जाईल व हे सर्व राष्टातील लोकांना साक्ष असे होईल.
आणि मग शेवट होईल.
15"दानीएल संदेष्ट्यांने एका अमंगळ गोष्टीविषयी
सांगितले की, जिच्यामुळे नाश ओढवेल. अशी अमंगळ
गोष्ट ही पवित्र जागी– मंदिरामध्ये उभी असलेली तुम्ही
पाहाल." तुम्ही लोक जे हे वाचाल ते याचा अर्थ समजून
घ्या. 16"त्यावेळी यहूदातील लोकांनी डोंगरावर पळून जावे.
17जो कोणी छपरावर असेल त्याने घरातील सामान
घेण्यासाठी उतरू नये. 18जर कोणी शेतात असेल तर
त्याने आपला सदरा घेण्यासाठी परत जाऊ नये. 19त्याकाळी
गर्भवती असलेल्या अगर तान्ही बालके असलेल्या स्त्रियांना
फार कठीण जाईल! 20जेव्हा या गोष्टी होतील आणि
तुम्हांला पळून जावे लागेल तेव्हा थंडीचे दिवस नसावेत
अथवा शब्बाथ दिवस नसावा यासाठी प्रार्थना करा.
21कारण त्याकाळी फार पीडा येतील. जगाच्या आरंभापासून
कधीही झाली नाही आणि पुन्हा कधी होणार नाही अशी
पीडा त्या काळी भोगावी लागेल. 22आणखी, देवाने ते
दिवस जर थोडेच ठेवले नसते तर कोणीच वाचले नसते.
परंतु त्याच्या निवडलेल्यांमुळे तो ते दिवस थोडे करील.
23त्या वेळी जर एखाद्याने तुम्हांला म्हटले, 'पहा! ख्रिस्त
येथे आहे' किंवा 'तो तेथे आहे,' तर त्याच्यावर विश्वास
ठेवू नका. 24खोटे ख्रिस्त आणि खोटे संदेष्टे उदयास येतील.
ते महान व आश्चर्यकारक चिन्हे दाखवतील. देवाच्या
निवडलेल्या लोकांना ते चिन्हे दाखवतील व लोकांना
एवढेच नव्हे तर देवाच्या निवडलेल्यांना फसविण्याचा प्रयत्न
करतील. 25या गोष्टी होण्या अगोदरच मी तुम्हांला सावध
केले आहे.
26"एखादा मनुष्य तुम्हांला सांगेल, 'पाहा, मशीहा ओसाड
रानात आहे.' तर तेथे जाऊ नका. किंवा जर ते म्हणाले,
'पाहा, ख्रिस्त आतल्या खोलीत लपला आहे,' तर त्याच्यावर
विश्वास ठेवू नका. 27मी हे म्हणतो कारण वीज जशी
पूर्वेकडून पश्चिमेकडे चमकताना सर्वांना दिसते तसेच
मनुष्याच्या पुत्राचे येणेदेखील असेल. 28जेथे कोठे प्रेत
असेल तेथे गिधाडेही असतील.
29 "छळानंतर लगेच, असे घडेल:

'सूर्य अंधकारमय होईल व चंद्र प्रकाश देणार नाही.
आकाशातील तारे व नक्षत्रे गळून पडतील आकाशातील
सर्व शक्ती डळमळतील. आकाश गुंडाळीसारखे गुंडाळले
जाईल.' *यशया 13:10; 34:4*

30"त्यावेळेला मनुष्याच्या पुत्राच्या येण्याचे चिन्ह
आकाशात दिसेल. तेव्हा जगातील सर्व लोक शोक
करतील. मनुष्याच्या पुत्राला सर्व जण मेघावर बसून येताना
पाहतील. तो महासामर्थ्य आणि वैभव यांच्यासह येईल.
31मनुष्याचा पुत्र तुतारीचा मोठा नाद करून आपले दूत
पृथ्वीभोवती पाठवून देईल. ते पृथ्वीच्या चारही कोपऱ्यातून,
आकाशाच्या एका सीमेपासून दुसऱ्या सीमेपर्यंत
निवडलेल्यांना गोळा करतील.
32"अंजिराच्या झाडापासून शिका: अंजिराच्या झाडाच्या
फांद्या जेव्हा हिरव्या आणि कोवळ्या असतात आणि पाने
फुटू लागतात तेव्हा उन्हाळा जवळ आला हे तुम्हांला
कळते. 33मी तुम्हांला ज्याविषयी सांगितले त्याबाबतीतही

---

**प्रभूच्या ... असो** स्तोत्र. 118:26

असेच होईल. जेव्हा या सर्व गोष्टी तुम्ही पाहाल तेव्हा वेळ
जवळ येत आहे हे तुम्ही ओळखाल. 34मी तुम्हांला खरे
सांगतो: या गोष्टी होत असताना आजची ही पिढी नाहीशी
होणार नाही. 35सर्व जग, आकाश, पृथ्वी नाहीशी होतील
पण माझी वचने कधीही नष्ट होणार नाहीत.

36“पण त्या दिवसाविषयी आणि त्या घटकेविषयी
कोणालाही माहीत नाही, स्वर्गातील देवदूतांनाही नाही,
किंवा खुद्द पुत्रालाही नाही. फक्त पिताच हे जाणतो.
37नोहाच्या काळी घडले तसे मनुष्याच्या पुत्राच्या येण्याच्या
वेळेसही होईल. 38महापूर येण्याअगोदर लोक खातपीत
होते. लोक लग्न करीत होते. लग्न करून देत होते. नोहा
जहाजात जाईपर्यंत लोक या गोष्टी करीत होते. 39त्यांना
माहीत नव्हते की काही तरी घडणार आहे. परंतु नंतर
पूर आला आणि सर्व लोक मरून गेले. मनुष्याचा पुत्र
आल्यावर असेच होईल. 40दोघे जण शेतात एकत्र काम
करत असतील तर त्यातला एक जण वर घेतला जाईल
आणि दुसरा तेथेच राहील. 41दोन स्त्रिया जात्यावर धान्य
दळत असतील तर त्या दोघीतील एक वर घेतली जाईल
आणि दुसरी तेथेच राहील. 42“म्हणून तुम्ही तयार असा,
कारण तुम्हांला माहीत नाही की कोणत्या दिवशी तुमचा
प्रभु येत आहे, 43हे लक्षात ठेवा, चोर केव्हा येईल हे जर
घराच्या मालकाला माहीत असते तर तो त्यासाठी तयारीत
राहिला असता आणि त्याने चोराला घर फोडू दिले नसते.
44या कारणासाठी तुम्हीसुद्धा तयार असले पाहिजे. जेव्हा
तुम्हांला अपेक्षा नसेल तेव्हा मनुष्याचा पुत्र येईल.

45“शहाणा आणि विश्वासू सेवक कोण बरे? दुसऱ्या
सेवकांना वेळेवर जेवण देण्याचे काम मालक एका
सेवकावर सोपवितो. हे काम करण्यासाठी मालक कोणाला
विश्वासाने सांगेल? 46मालक आल्यावर आपले दिलेले
काम करीत असलेला सेवक खरोखर धन्य! 47मी तुम्हांला
सांगतो: मालक आपल्या सर्व मालमत्तेवर त्या सेवकाची
नेमणूक करील. 48पण जर सेवक वाईट निघाला आणि
आपला मालक लवकर घरी परत येणार नाही असे
म्हणाला तर काय होईल? 49तो सेवक इतर सेवकांना
मारहाण करील आणि आपल्यासारख्या लोकांबरोबर
जेवण करील आणि दारू पिऊन मस्त होईल. 50आणि तो
सेवक तयारीत नसेल अशा वेळी मालक येईल. 51मग
मालक त्या सेवकाचे तुकडे करील. त्या सेवकाला मालक
ढोंगी लोकांबरोबर राहायला पाठवील. आणि त्या ठिकाणी
रडणे व दात खाणे चालेल.

## दहा कुमारिकांची बोधकथा

25 “त्या दिवसांत स्वर्गाचे राज्य दहा
कुमारिकांसारखे असेल, त्यांनी त्यांचे दिवे घेतले
व वराला भेटण्यास गेल्या. 2त्या दहा मुलींपैकी पाच मूर्ख
होत्या आणि पाच शहाण्या होत्या. 3मूर्ख मुलींनी आपले
दिवे घेतले, पण दिव्यासाठी तेल घेतले नाही. 4शहाण्या
मुलींनी दिव्याबरोबर तेलही घेतले. 5वराला उशीर झाल्याने
सर्वच मुलींना डुलक्या लागल्या व त्या झोपी गेल्या.

6“मध्यरात्री कोणीतरी घोषणा केली, ‘वर येत आहे!
बाहेर जाऊन त्याला भेटा!’

7“सर्व मुली जाग्या झाल्या आणि त्यांनी आपले दिवे
तयार केले. 8पण मूर्ख मुली, हुशार मुलींना म्हणाल्या,
‘तुमच्यातील काही तेल आम्हांला द्या. आमचे दिवे विझत
आहेत.’

9“पण उत्तरादाखल हुशार मुली म्हणाल्या, ‘नाही, आम्ही
तुम्हांला काहीच देऊ शकत नाही, नाही तर तुम्हांला व
आम्हांलाही पुरणार नाही. त्याऐवजी तेल विकणाऱ्याकडे
जा आणि आपणांसाठी तेल विकत आणा.’

10“पाच मूर्ख मुली तेल विकत घ्यायला निघाल्या तेव्हा
वर आला. तेव्हा ज्या मुली तयार होत्या त्या मेजवानीसाठी
त्याच्याबरोबर आत गेल्या. मग दार बंद झाले.

11“शेवटी उरलेल्या पाच मुली आल्या आणि म्हणाल्या,
‘महाराज! महाराज! दार उघडा!’ 12“पण तो त्यांना
उत्तरादाखल म्हणाला, ‘मी तुम्हांला खरे सांगतो: मी तुम्हांला
ओळखत नाही!’

13“म्हणून नेहमी तयार असा. कारण मनुष्याचा पुत्र
कधी येणार तो दिवस व ती वेळ तुम्हांला माहीत नाही.

## तीन नोकरांची बोधकथा
***(लूक 19:11-27)***

14“स्वर्गाचे राज्य अशा मनुष्यासारखे आहे, जो प्रवासाला
जाण्याअगोदर आपल्या नोकरांना बोलावून आपल्या
मालमत्तेवर लक्ष देण्यास सांगणाऱ्या मनुष्यासारखे स्वर्गाचे
राज्य आहे. 15त्याच्यांतील एकाला त्याने पाच थैल्या रुपये
दिले. दुसऱ्याला त्याने दोन थैल्या रुपये दिले आणि
तिसऱ्याला त्याने एक थैली रुपये दिले. प्रत्येकाला त्याच्या
त्याच्या कुवतीप्रमाणे त्याने पैसे दिले. मग तो आपल्या
प्रवासाला गेला. 16ज्याला पाच थैल्या रुपये दिले होते
त्याने त्याप्रमाणे काम करायला सुरुवात केली आणि
आणखी पाच थैल्या रुपये त्याने मिळविले. 17त्याचप्रमाणे,
ज्याला दोन थैल्या रुपये मिळाले होते त्याने आणखी दोन
थैल्या रुपये कमविले. 18पण ज्याला एक थैली मिळाली
होती, त्याने जमिनीत एक खड्डा खोदला आणि मालकाचे
पैसे त्यात लपविले.

19“बराच काळ लोटल्यानंतर त्या नोकरांचा मालक
आला व त्याने त्यांचा हिशेब घ्यायला सुरुवात केली.
20ज्याला पाच थैल्या रुपये मिळाले होते, त्याने मालकाकडे
रुपयाच्या आणखी पाच थैल्या आणून दिल्या, तो म्हणाला,
‘मालक, तुम्ही दिलेल्या रुपयांवर मी आणखी पाच थैल्या
रुपये मिळविले.’

21त्याचा मालक म्हणाला, ‘शाब्बास, चांगल्या आणि
इमानी दासा, तू भरंवसा ठेवण्यायोग्य नोकर आहेस. त्या
थोड्या पैशांचा तू चांगला वापर केलास म्हणून मी

पुष्कळांवर तुझी नेमणूक करीन. आत जा आणि आपल्या मालकाच्या आनंदात सहभागी हो!'

22"नंतर ज्या मनुष्याला रुपयांच्या दोन थैल्या मिळाल्या होत्या, तो मालकाकडे आला आणि म्हणाला, 'मालक, तुम्ही मला रुपयांच्या दोन थैल्या दिल्या होत्या त्यापासून मी आणखी दोन थैल्या कमाविल्या.'

23"मालक म्हणाला, 'चांगल्या आणि इमानी दासा! तू थोड्या पैशाविषयी इमानीपणे वागलास, म्हणून मी तुझी आणखी पुष्कळशा गोष्टींवर नेमणूक करीन. आत जा आणि आपल्या मालकाच्या आनंदात सहभागी हो!'

24"नंतर ज्याला रुपयाची एक थैली मिळाली होती तो मालकाकडे आला व म्हणाला, 'मालक, मला माहीत होते की आपण एक करड्या शिस्तीचे मनुष्य आहात. जेथे पेरणी केली नाही तेथे तुम्ही कापणी करता आणि जेथे बी पेरले नाही तेथे पीक घेता. 25मला आपली भीति होती. म्हणून मी जाऊन तुमच्या रुपयाची थैली जमिनीत लपवून ठेवली. हे घ्या! हे तुमचेच आहेत!'

26"मालकाने उत्तर दिले, 'अरे वाईट आणि आळशी नोकरा! मी जेथे पेरणी केली नाही तेथे कापणी करतो आणि जेथे बी पेरले नाही तेथे पीक घेतो, हे तुला माहीत होते. 27तर तू माझे पैसे पेढीत ठेवायचे होतेस म्हणजे मी घरी आल्यावर मला व्याजासहित पैसे मिळाले असते.'

28"म्हणून मालकाने दुसऱ्या नोकरांना सांगितले, 'याच्याजवळची रुपयांची थैली घ्या आणि ज्याच्याजवळ रुपयांच्या दहा थैल्या आहेत त्याला द्या. 29कारण आपल्याकडे जे आहे, त्याचा वापर करणाऱ्याला आणखी देण्यात येईल, आणि त्याला त्याच्या गरजेपेक्षा जास्त मिळेल. पण जो आपल्याजवळ असलेल्याचा उपयोग करीत नाही त्याच्याजवळ जे काही असेल ते सर्व त्याजपासून काढून घेण्यात येईल.' 30नंतर मालक म्हणाला, 'त्या निकामी नोकराला बाहेरच्या अंधारात घालवून द्या. तेथे रडणे व दात खाणे चालेल.'

## मनुष्याचा पुत्र सर्वांचा न्याय करील

31"मनुष्याचा पुत्र जेव्हा त्याच्या स्वर्गीय गौरवाने आपल्या देवदूतांसह येईल तेव्हा तो त्याच्या गौरवी आसनावर बसेल. 32मग सर्व राष्ट्रे त्याच्यासमोर एकत्र जमतील. त्यांना तो एकमेकांपासून विभक्त करील. ज्याप्रमाणे मेंढपाळ मेंढरे शेरडांपासून वेगळी करतो. 33तो मेंढरांना आपल्या उजवीकडे बसवील पण शेरडांना तो डावीकडे बसवील.

34"मग राजा जे त्याच्या उजवीकडे आहेत त्यांना म्हणेल, 'या, जे तुम्ही माझ्या पित्याचे आशीर्वादित आहात! जे तुमच्यासाठी तयार केले आहे त्या राज्याचे वतनदार व्हा. हे राज्य जगाच्या स्थापनेपासून तयार केले आहे. 35हे तुमचे राज्य आहे कारण जेव्हा मी भुकेला होतो तेव्हा तुम्ही मला खायला दिले. मी तहानेला होतो तेव्हा तुम्ही मला प्यावयास दिले. मी प्रवासी असता तुम्ही माझा पाहुणचार केलात 36मी कपड्यांशिवाय होतो तेव्हा तुम्ही मला कपडे दिलेत. मी आजारी होतो, तेव्हा तुम्ही माझी काळजी घेतलीत. मी तुरूंगात होतो तेव्हा तुम्ही माझ्याकडे समाचारासाठी आलात.'

37'मग जे नीतिमान आहेत ते उत्तर देतील, 'प्रभु आम्ही तुला केव्हा भुकेला व तहानेला पाहिला आणि तुला खायला आणि प्यायला दिले? 38आम्ही तुला प्रवासी म्हणून कधी पाहिले आणि तुझा पाहुणचार केला? किंवा आम्ही तुला केव्हा उघडे पाहिले व कपडे दिले? 39आणि तू आजारी असताना आम्ही तुला कधी भेटायला आलो? किंवा तुरूंगात असताना कधी तुझ्या समाचारास आलो?'

40"मग राजा त्यांना उत्तर देईल, 'मी तुम्हांला खरे सांगतो: येथे असलेल्या माझ्या बांधवातील अगदी लहानातील एकाला तुम्ही केले, तर ते तुम्ही मलाच केले.' 41मग राजा आपल्या डाव्या बाजूच्यांना म्हणेल, 'माझ्यापासून दूर जा, तुम्ही शापित आहात, अनंतकाळच्या अग्नीत जा. हा अग्नी सैतान व त्याच्या दूतांसाठी तयार केला आहे. 42ही तुमची शिक्षा आहे कारण मी भुकेला होतो पण तुम्ही मला काही खायला दिले नाही, मी तहानेला होतो पण तुम्ही मला काही प्यावयास दिले नाही. 43मी प्रवासी असता माझा पाहुणचार केला नाही. मी वस्त्रहीन होतो, पण तुम्ही मला कपडे दिले नाहीत. मी आजारी आणि तुरूंगात होतो पण तुम्ही माझी काळजी घेतली नाही.'

44"मग ते लोक सुद्धा त्याला उत्तर देतील, 'प्रभु आम्ही कधी तुला उपाशी अगर तहानेले पाहिले किंवा प्रवासी म्हणून कधी पाहिले? किंवा वस्त्रहीन, आजारी किंवा तुरुंगात कधी पाहिले आणि तुला मदत केली नाही?'

45"मग राजा त्यांना उत्तर देईल, 'मी तुम्हांला खरे सांगतो: माझ्या अनुयायातील लहानातील लहानाला काही करण्याचे जेव्हा जेव्हा तुम्ही नाकारले, तेव्हा तेव्हा ते तुम्ही मला करण्याचे नाकारले.' 46मग ते अनीतिमान लोक अनंतकाळच्या शिक्षेसाठी जातील, पण नीतिमान अनंतकाळच्या जीवनासाठी जातील."

## यहूदी पुढारी येशूला जिवे मारण्याचा कट करतात
***(मार्क 14:1-2; लूक 22:1-2; योहान 11:45-53)***

26 येशूने या सर्व बोधकथा सांगण्याचे संपविल्यानंतर तो त्याच्या शिष्यांना म्हणाला, 2"परवा वल्हांडणाचा सण आहे हे तुम्हांला माहीत आहे. आणि मनुष्याचा पुत्र वधस्तंभावर खिळून जिवे मारला जाण्यासाठी शत्रूच्या हाती धरून दिला जाईल."

3मग मुख्य याजक आणि लोकांचे वडील, प्रमुख याजकाच्या घरी जमले. प्रमुख याजकाचे नाव कयफा होते. 4सभेत त्यांनी धूर्तपणे येशूला अटक करण्याचा आणि जिवे मारण्याचा कट केला. 5तरीही ते म्हणत होते, "वल्हांडण सणाच्या दिवसात आपण येशूला धरू शकणार नाही, कारण लोकांमध्ये दंगा होईल."

### एक स्त्री काही तरी विशेष करते
### *(मार्क 14:3-9; योहान 12:1-8)*

6येशू बेथानीमध्ये होता. तो शिमोन कुष्ठरोग्याच्या घरात
होता. 7येशू तेथे असताना एक बाई त्याच्याकडे आली.
उंची अत्तराने भरलेली अलाबास्त्र कुपी तिच्याजवळ होती.
येशू जेवत असता ही कुपी त्या बाईने त्याच्या डोक्यावर
ओतली. 8त्या बाईला हे करताना शिष्यांनी पाहिले, तेव्हा
त्यांना राग आला. शिष्य विचारू लागले, "या अत्तराचा
असा नाश का व्हावा? 9ते पुष्कळ पैशांना विकता आले
असते आणि ते पैसे गोरगरिबांना देता आले असते."
10येशूला ते काय म्हणत आहेत हे माहीत होते, त्याने
त्यांना विचारले, "तुम्ही त्या बाईला का त्रास देत आहा?
तिने माझ्यासाठी फार चांगले काम केले आहे. 11गरीब
लोक तुमच्याबरोबर नेहमीच असतील पण मी
तुमच्याबरोबर नेहमी असणार नाही. 12या बाईने माझ्या
शरीरावर हे अत्तर ओतले. मला पुरण्याच्या वेळेची तयारी
तिने केली. 13मी तुम्हांला खरे सांगतो, सर्व जगातील
लोकांना सुवार्ता सांगितली जाईल आणि जेथे सुवार्ता
सांगण्यात येईल तेथे या बाईने जे केले त्याचे वर्णन तिची
आठवण म्हणून करण्यात येईल."

### यहूदा येशूचा शत्रु होतो
### *(मार्क 14:10-11; लूक 22:3-6)*

14बारा शिष्यांपैकी एक यहूदा इस्कार्योत मुख्य
याजकांकडे गेला. 15यहूदा म्हणाला, "मी येशूला धरून
तुमच्या हाती दिले तर तुम्ही मला काय द्याल?" तेव्हा
त्यांनी त्याला चांदीची तीस नाणी दिली. 16तेव्हापासून यहूदा
येशूला धरून देण्याच्या संधीची वाट पाहू लागला.

### येशू वल्हांडण सणाचे भोजन खातो
### *(मार्क 14:21-22; लूक 22:7-14, 21-23; योहान 13:21-30)*

17बेखमीर भाकरीच्या सणाच्या पहिल्या दिवशी येशूचे
शिष्य त्याच्याकडे आले. ते म्हणाले, "वल्हांडण सणाच्या
जेवणाची सर्व तयारी आम्ही करणार आहोत. वल्हांडण
सणाचे जेवण कोठे करावे अशी तुमची इच्छा आहे?"
18येशू म्हणाला, "ज्याला मी ओळखतो अशा त्या
माणसाकडे खेड्यात जा आणि त्याला म्हणा, 'गुरुजी
म्हणतात: माझी वेळ जवळ आली आहे. तुझ्या घरी मी
माझ्या शिष्यांसह वल्हांडण सण साजरा करणार आहे.'"
19येशूने जे सांगितले होते ते त्याच्या शिष्यांनी केले
आणि त्यांनी वल्हांडण सणाचे जेवण तयार केले.
20संध्याकाळ झाल्यावर येशू आपल्या शिष्यांबरोबर मेजाशी
जेवावयास बसला.
21जेवण करीत असता येशू म्हणाला, "मी तुम्हांला खरे
सांगतो: तुमच्यापैकी एक जण माझा विश्वासघात करील."
22ते खूप दु:खी झाले आणि त्यांच्यातील प्रत्येक जण
त्याला विचारू लागला, "तो मी नाही ना प्रभु?"
23मग येशूने उत्तर दिले, "जो माझ्याबरोबर ताटात हात
घालतो तोच माझा विश्वासघात करील. 24जसे मनुष्याच्या
पुत्राविषयी पवित्र शास्त्रात लिहिले आहे, तसा मनुष्याच्या
पुत्राचा शेवट होईल, पण जो त्याचा विश्वासघात करील
त्याच्याविषयी मला दु:ख वाटते! तो जर जन्मला नसता
तर त्याच्यासाठी ते बरे झाले असते."
25मग यहूदा, जो त्याचा विश्वासघात करणार होता, तो
येशूकडे वळून म्हणाला, "तो मी आहे का, गुरुजी?" येशू
त्याला म्हणाला, "तू म्हणालास, तसेच आहे (म्हणजे होय
तो तूच आहेस.")

### प्रभुभोजन
### *(मार्क 14:22-26; लूक 22:15-20; 1 करिंथकरांस 11:23-25)*

26ते जेवण करीत असताना येशूने भाकर घेतली.
तिच्याबद्दल देवाचे उपकार मानले. आणि ती मोडली.
त्याने ती भाकर आपल्या शिष्यांना दिली. तो म्हणाला,
"हे घ्या आणि खा. हे माझे शरीर आहे."
27नंतर येशूने द्राक्षारसाचा प्याला घेतला. त्याबद्दल देवाचे
उपकार मानले आणि तो शिष्यांना दिला. येशू म्हणाला,
"तुम्ही सर्वांनी यातील प्यावे. कारण हे माझे रक्त आहे,
28हे नवा करार प्रस्थापित करते. ते पुष्कळ लोकांकरिता
ओतले जात आहे. यासाठी की त्यांच्या पापांची क्षमा व्हावी.
29मी तुम्हांला सांगतो: माझ्या पित्याच्या राज्यात आपण
सर्व एकत्र येईपर्यंत मी नवा द्राक्षारस पिणार नाही."
30मग त्यांनी वल्हांडणाचे गीत गाईले. नंतर ते जैतूनाच्या
डोंगरावर निघून गेले.

### येशू म्हणतो त्याचे शिष्य त्याला सोडून जातील
### *(मार्क 14:27-31; लूक 22:31-34; योहान 13:36-38)*

31येशूने सांगितले, "आज रात्रीच तुमच्या मनात
माझ्याविषयी शंकाकुशंका येतील आणि माझ्यावरील
तुमचा विश्वास उडेल. पवित्र शास्त्रात असे लिहिले आहे:

'मी मेंढपाळाचा वध करीन, कळपातील मेंढरांची
दाणादाण होईल.' *जखऱ्या* 13:7

32पण मी मरणातून उठल्यानंतर, तुमच्या अगोदर
गालीलात जाईन." 33उत्तर देताना पेत्र म्हणाला, "इतर
सर्वांचा जरी तुमच्याविषयी गोंधळ झाला तरी माझा कधीही
होणार नाही!"
34येशू त्याला म्हणाला, "मी तुला खरे सांगतो: तू मला
ओळखत नाहीस असे आज रात्री कोंबडा आरवण्यापूर्वी
तू तीन वेळा म्हणशील." 35पेत्र म्हणाला, "तुम्हांला
ओळखीत नाही असे मी कधीही म्हणणार नाही. मग

मला तुमच्याबरोबर मरावे लागले तरी हरकत नाही." आणि इतर शिष्यसुद्धा असेच म्हणाले

## येशू एकटाच प्रार्थना करतो
### *(मार्क 14:32-42; लूक 22:39-46)*

36नंतर गेथशेमाने नावाच्या जागी येशू आपल्या शिष्यांसह गेला. येशू त्यांना म्हणाला, "मी थोडा पुढे जाऊन प्रार्थना करीपर्यंत येथेच थांबा." 37येशूने पेत्र आणि दोन जब्दीचे पुत्र यांना आपल्याबरोबर यायला सांगितले. यानंतर येशू मनातून फार दु:खी व व्याकूळ होऊ लागला. 38येशू पेत्राला व जब्दीच्या दोघा पुत्रांना म्हणाला, "माझे दु:ख मला इतके झाले आहे की, ते मला मारून टाकील. येथे थांबा व माझ्याबरोबर जागे राहा."

39तो थोडे अंतर पुढे गेला आणि जमिनीवर ओणवून प्रार्थना करू लागला, "हे माझ्या पित्या, शक्य झाले तर हा दु:खाचा प्याला माझ्यापुढून जाऊ दे, तथापि, माझ्या इच्छेप्रमाणे नको तर तुझ्या इच्छेप्रमाणे होऊ दे." 40मग तो शिष्यांकडे परत गेला तेव्हा ते झोपी गेले आहेत असे त्याला आढळले. येशू पेत्राला म्हणाला, "तुम्हा लोकांना माझ्याबरोबर एखादा तासही जागे राहता येत नाही काय? 41आपण परीक्षेत पडू नये म्हणून जागे राहा. आणि प्रार्थना करीत राहा. यासाठी की तुम्ही मोहात पडू नये. जे योग्य आहे ते तुमचा आत्मा करू इच्छितो, पण तुमचे शरीर अशक्त आहे."

42नंतर दुसऱ्यांदा जाऊन येशू प्रार्थना करू लागला, "हे माझ्या पित्या, जर दु:खाचा हा प्याला पिणे मला अटळच आहे तर तुझी इच्छा असेल तसे होवो."

43नंतर येशू शिष्यांकडे परत गेला तेव्हा त्याला आढळून आले की, त्यांचे डोळे जड झाले होते व ते झोपी गेले आहेत कारण जागे राहणे त्यांना शक्य होत नव्हते. 44नंतर येशू शिष्यांना पुन्हा सोडून तसाच पुढे गेला आणि त्याने प्रार्थना केली. तिसऱ्या वेळी प्रार्थना करताना त्याने पुन्हा हेच शब्द उच्चारले. 45यानंतर येशू परत शिष्यांकडे गेला आणि त्यांना म्हणाला, "तुम्ही अजून झोप आणि विश्रांतिच घेत आहात का? ऐका! मनुष्याचा पुत्र पापी लोकांच्या हाती धरून दिला जाण्याची वेळ आली आहे. 46उठा! आपल्याला निघालेच पाहिजे. हा पाहा, मला धरून शत्रूंच्या हाती देणारा येत आहे."

## येशूला अटक होते
### *(मार्क 14:43-50; लूक 22:47-53; योहान 18:3-12)*

47येशू हे बोलत असतानाच बारा जणांपैकी एक जो यहूदा, तो तेथे आला. त्याच्याबरोबर बरेच लोक होते. मुख्य याजक, लोकांचे वडीलजन यांनी त्यांना पाठविले होते. ते लोक तलवारी व सोटे घेऊन आले होते. 48येशूला विश्वासघाताने धरून लोकांच्या हाती देणारा यहूदा याने हाच येशू आहे याविषयी एक खूण सांगितली होती. यहूदा म्हणाला, "ज्या मनुष्याचे मी चुंबन घेईन तोच येशू होय; त्याला तुम्ही धरा."

49मग यहूदा येशूकडे गेला आणि म्हणाला, "गुरुजी," आणि यहूदाने येशूचे चुंबन घेतले.

50येशू त्याला म्हणाला, "मित्रा, जे करण्यास आलास ते कर!" मग ते येशूकडे आले. त्यांनी येशूवर हात टाकले व त्याला धरले. 51हे झाल्यावर येशूबरोबर असलेल्या एका अनुयायाने तलवारीला हात घातला आणि ती उपसली. त्याने प्रमुख याजकाच्या नोकराचा कान कापला.

52येशू त्या मनुष्याला म्हणाला, "तू आपली तलवार म्यानात ठेव. जे तलवारीचा वापर करतात ते तलवारीनेच मरतात. 53मी माझ्या पित्याला सांगितले तर तो देवदूतांच्या बारापेक्षा अधिक पलटणी पाठवील, हे तुम्हांला कळत नाही काय? 54परंतु हे अशाच रीतीने झाले पाहिजे असा पवित्र शास्त्रात जो लेख आहे तो कसा काय पूर्ण होईल?"

55यानंतर येशू सर्व लोकसमुदायाला म्हणाला, "जसा मी कोणी गुन्हेगार आहे, अशा रीतीने तुम्ही तलवारी व सोटे हाती घेऊन मला धरायला माझ्यावर चाल करून आला काय? मी दररोज मंदिरात शिक्षण देत असता तुम्ही मला धरले नाही. 56परंतु या सर्व गोष्टी अशासाठी झाल्या आहेत की, संदेष्ट्यांनी जे लिहिले होते ते पूर्ण व्हावे." नंतर येशूचे सर्व शिष्य त्याला सोडून पळून गेले.

## यहूदी पुढाऱ्यांपुढे येशू
### *(मार्क 14:53-65; लूक 22:54-55, 63-71; योहान 18:13-14, 19-24)*

57त्या लोकांनी येशूला धरले, त्यांनी त्याला प्रमुख याजक कयफा याच्या घरी नेले. तेथे नियमशास्त्राचे शिक्षक आणि वडीलजन एकत्र जमले होते. 58पेत्र काही अंतर ठेवून येशूच्या मागे चालला होता. पेत्र येशूच्या मागे मुख्य याजकाच्या आवारापर्यंत गेला आणि काय होते ते पाहण्यासाठी नोकरांसोबत बसला.

59येशूला मरणदंड द्यावा म्हणून मुख्य याजक आणि सर्व यहूदी सभा त्याच्याविरुद्ध काही खोटे दोषारोप करता येईल काय याचा प्रयत्न करू लागले. खोटी साक्ष देणारे लोक सापडतात काय याचा शोध घेऊ लागले. 60पुष्कळ लोक पुढे आले आणि येशूविरुद्ध साक्ष देऊ लागले. परंतु येशूला जिवे मारण्याचे काहीही कारण यहूदी सभेला सापडेना. शेवटी दोन माणसे पुढे आली, ती म्हणू लागली, 61"हा मनुष्य असे म्हणाला की, देवाचे मंदिर मी पाडू शकतो आणि ते तीन दिवसात पुन्हा बांधू शकतो."

62तेव्हा प्रमुख याजक उठून येशूला म्हणाला, "हे लोक तुझ्याविरूद्ध साक्ष देत आहेत, तुझ्याविरुद्ध जे आरोप आहेत, त्याविषयी तुला काही सांगायचे आहे का? हे सर्व खरे सांगत आहेत काय?"

63पण येशूने काहीच उत्तर दिले नाही. परत एकदा प्रमुख याजक येशूला म्हणाला, "जिवंत देवाच्या नावाची

शपथ. मी तुला बजावून सांगतो की खरे काय ते तू सांग!
तू देवाचा पुत्र ख्रिस्त आहेस काय?"
64येशू त्यांना म्हणाला, "होय, मी आहे. जसे तू म्हणालास.
तरी मी तुम्हांला सांगतो: ह्यापुढे मनुष्याच्या पुत्राला तुम्ही
ढगातून येताना पाहाल व त्याला देवाच्या उजवीकडे बसलेले
पाहाल."
65जेव्हा प्रमुख याजकाने हे ऐकले, तेव्हा तो फार
संतापला. आपले कपडे फाडून तो म्हणाला, "याने देवाविरुद्ध
दुर्भाषण केले आहे! आम्हांला आणखी साक्षीदारांची गरज
राहिली नाही. ह्याला देवाची निंदा करताना तुम्ही ऐकले!
66तुम्हांला काय वाटते?"
यहूद्यांनी उत्तर दिले, "तो अपराधी आहे आणि त्याला
मेलेच पाहिजे."
67तेव्हा ते त्याच्यावर थुंकले, त्यांनी त्याला मारले.
दुसऱ्यांनी चपराका मारल्या. 68ते म्हणाले, "ख्रिस्ता
आमच्यासाठी भविष्य सांग! तुला कोणी मारले?"

### आपण येशूला ओळखतो हे सांगायला पेत्र घाबरतो
### *(मार्क 14:66-72; लूक 22:56-62; योहान 18:15-18, 25-27)*

69यावेळी पेत्र वाड्याच्या अंगणात बसला होता. प्रमुख
याजकाच्या दासीपैंकी एक दासी पेत्राकडे आली. ती
म्हणाली, "तू सुद्धा गालीलच्या येशूबरोबर होतास."
70पण पेत्राने सर्वांसमोर ते नाकारले. तो म्हणाला, "तू
काय म्हणतेस ते मला माहीत नाही!" 71मग तो अंगणातून
निघून फाटकापाशी गेला. फाटकाजवळ दुसऱ्या एका
दासीने त्याला पाहिले. ती तेथे असलेल्या लोकांना म्हणाली,
"नासरे थकर येशूबरोबर हा होता."
72पुन्हा एकदा पेत्र शपथ घेऊन येशूला नाकारतांना,
म्हणाला, "मी त्याला ओळखत नाही!"
73काही क्षणानंतर तेथे असलेले लोक पेत्राकडे वळाले
आणि त्याला म्हणाले, "तू खरोखर येशूच्या शिष्यांपैकी
एक आहेस, हे आम्हांला माहीत आहे. तुझ्या बोलण्यावरून
हे आम्हांला स्पष्ट दिसून येते."
74मग तो स्वत:ला शाप देऊ लागला. तो जोराने म्हणाला,
"मी देवाशपथ सांगतो, येशू हा मनुष्य कोण आहे हे मला
माहीत नाही!" पेत्र असे म्हणाला तोच कोंबडा आरवला.
75नंतर येशू काय म्हणाला होता हे पेत्राला आठवले,
"कोंबडा आरवण्यापूर्वी तू मला तीन वेळा नाकारशील."
यानंतर पेत्र तेथून बाहेर निघून गेला आणि दु:खातिशयाने
रडला.

### येशूला राज्यपाल पिलाताकडे नेतात
### *(मार्क 15:1; लूक 23:1-2; योहान 18:28-32)*

27 जेव्हा सकाळ झाली तेव्हा सर्व मुख्य याजक व
वडीलजन यांनी येशूविरुद्ध कट केला. आणि
कशा प्रकारे येशूला ठार मारायचे याचा विचार केला.
2त्यांनी येशूला साखळदंडानी बांधून दूर नेले व राज्यपाल
पिलाताच्या स्वाधीन केले.

### यहूदाची आत्महत्या
### *(प्रेषितांची कृत्ये 1:18-19)*

3त्याच वेळेला, यहूदा, जो येशूचा विश्वासघात करून
त्याला पकडून देण्यास कारणीभूत होता, त्याने पाहिले
की, त्यांनी येशूला जिवे मारण्याचे ठरविले आहे, तेव्हा
त्याने जे केले होते त्याचे त्याला वाईट वाटले. म्हणून
त्याने चांदीची तीस नाणी घेऊन मुख्य याजक व वडिलांना
परत दिली.
4तो म्हणाला, "मी पाप केले आहे, मी एका निष्पाप
मनुष्याला जिवे मारण्यासाठी तुमच्या हाती दिले."
यहूदी पुढाऱ्यांनी उत्तर दिले, "आम्हांला त्याचे काय?
तो तुझा प्रश्न आहे!"
5तेव्हा यहूदाने ती चांदीची नाणी मंदिरात फेकून दिली
आणि तो गेला. मग बाहेर जाऊन त्याने स्वत:ला गळफास
लावून घेतला.
6मुख्य याजकांनी चांदीची ती तीस नाणी घेतली आणि
ते म्हणाले, "हे पैसे मंदिराच्या खजिन्यात ठेवता येणार
नाहीत. हे आमच्या नियमाविरुद्ध आहे, कारण ते पैसे
कोणाला तरी जिवे मारण्यासाठी दिले होते."
7म्हणून त्यांनी त्या पैशांनी कुंभाराचे शेत नावाची जागा
विकत घेण्याचे ठरविले. यरुशलेमला भेट देण्यासाठी
येणाऱ्या माणसांना मरण आले तर त्यांना पुरण्यासाठी त्या
शेताचा उपयोग करता येईल. 8त्यामुळे आजही त्या जागेला
'रक्ताचे शेत' असे म्हणतात. 9अशा रीतीने यिर्मया संदेष्ट्याचे
बोल खरे ठरले. ते असे:
"त्यांनी चांदीची तीस नाणी घेतली हे पैसे यहूदी लोकांनी
त्याच्या (येशूच्या) जिवाचे मोल म्हणून देण्याचे ठरविले.
10मला प्रभु परमेश्वराने आज्ञा दिल्यानुसार चांदीच्या त्या
तीस नाण्यांनी त्यांनी कुंभाराचे शेत विकत घेतले."*

### राज्यपाल पिलात येशूला प्रश्न विचारतो
### *(मार्क 15:2-5; लूक 23:3-5; योहान 18:33-38)*

11राज्यपाल पिलातापुढे येशू उभा राहिला तेव्हा पिलाताने
त्याला प्रश्न विचारले. तो म्हणाला, "तू यहूद्यांचा राजा
आहेस काय?" येशूने उत्तर दिले, "होय, मी आहे, जसे
तुम्ही म्हणता." 12पण जेव्हा मुख्य याजकांनी व वडिलांनी
त्याच्यावर दोषारोप केले, तेव्हा तो गप्प बसला. 13म्हणून
पिलात येशूला म्हणाला, "हे लोक तुझ्यावर जो दोषारोप
ठेवीत आहेत तो तू ऐकत आहेस ना? तर मग तू का उत्तर
देत नाहीस?"14परंतु येशूने पिलाताला काहीही उत्तर दिले
नाही. आणि पिलात आश्चर्यचकित झाला.

---

**त्यांनी ... घेतले** जखऱ्या 11:12-13; यिर्मया 32:6-9

## येशूला मुक्त करण्याचा पिलाताचा अयशस्वी प्रयत्न
### *(मार्क 15:6-15; लूक 23:13-25; योहान 18:39-19:16)*

15वल्हांडण सणानिमित्त दरवर्षी लोकसमुदायासाठी
तुरुंगातून एकाला सोडण्याची प्रथा होती. 16त्या विशिष्ट
वेळेला तेथे एक कुप्रसिद्ध कैदी होता. त्याचे नाव बरब्बा*
होते. 17म्हणून जेव्हा लोक जमले, तेव्हा पिलाताने त्यांना
विचारले, "तुमच्यासाठी मी कोणाला सोडावे अशी तुमची
इच्छा आहे? कुविख्यात बरब्बाला की ज्याला ख्रिस्त
म्हणतात त्या येशूला?"

18लोकांनी ईर्षेला पेटून येशूला पिलाताच्या हाती दिले
होते हे पिलाताच्या ध्यानी आले. 19न्यायासनावर बसला
असता पिलात हे बोलला. तो तेथे बसलेला असतानाच
त्याच्या पत्नीने त्याला एक निरोप पाठविला. तो निरोप
असा होता: "या मनुष्याविषयी सावध राहा; कारण तो
दोषी नाही. त्याच्याविषयी स्वप्न पडल्यामुळे मला आज
दिवसभर फार दु:ख सहन करावे लागले आहे."

20पण पिलाताने बरब्बाला सोडून द्यावे व येशूला
जिवे मारावे अशी मागणी लोकांनी करावी म्हणून
मुख्य याजकांनी व वडील जनांनी लो कसमुदायाचे
मन वळविले.

21पिलात म्हणाला, "माझ्यासमोर बरब्बा व येशू दोघेही
आहेत. मी तुमच्यासाठी कोणाला सोडून द्यावे अशी तुमची
इच्छा आहे?" लोकांनी उत्तर दिले, 'बरब्बा.'

22पिलाताने विचारले, "मग ज्याला ख्रिस्त म्हणतात त्या
येशूचे मी काय करावे?" सर्व लोक ओरडून म्हणाले,
"त्याला वधस्तंभावर खिळून मारून टाका!"

23पिलाताने विचारले, "का? मी त्याला जिवे मारावे
असे तुम्ही का म्हणता? त्याने काय अपराध केला आहे?"
परंतु सर्व लोक मोठ्याने ओरडून म्हणू लागले, "त्याला
वधस्तंभावर खिळा!"

24लोकांच्या पुढे आपले काही चालणार नाही हे पिलाताने
पाहिले. उलट लोक अधिक अशांत होऊ लागले होते
म्हणून पिलाताने थोडे पाणी घेतले आणि लोकांच्या समोर
आपले हात धुतले. मग पिलात म्हणाला, "या मनुष्याच्या
मरणाची जबाबदारी माझ्यावर नाही, तुम्हीच त्यासाठी
जबाबदार आहात."

25सर्व लोक ओरडून म्हणू लागले, "याच्या मरणाची
जबाबदारी आमच्यावर असो. त्याच्यासाठी व्हायची शिक्षा
आम्ही व आमची मुले भोगायला तयार आहोत."

26मग पिलाताने बरब्बाला सोडून दिले. येशूला चाबकाचे
फटके मारावे असे पिलाताने आपल्या काही सैनिकांना
सांगितले. नंतर येशूला वधस्तंभावर खिळून मारावे म्हणून
पिलाताने शिपायांच्या हाती दिले.

---

**बरब्बा** काही ग्रीक प्रतीमध्ये बरब्बाचा उल्लेख 'येशू बरब्बा'
असा आढळतो.

## पिलाताचे शिपाई येशूची थट्टा करतात
### *(मार्क 15:16-20; योहान 19:2-3)*

27नंतर पिलाताचे शिपाई येशूला राज्यपालाच्या वाड्यात
घेऊन आले. ते सर्व घोळक्याने येशूभोवती जमले. 28त्यांनी
येशूचे कपडे काढले व त्याला लाल किरमिजी झगा
घातला. 29काटेरी झाडाच्या फांद्यांचा एक मुगुट तयार
करून तो येशूच्या डोक्यावर ठेवला. तसेच त्यांनी त्याच्या
उजव्या हातात एक काठी दिली. मग शिपाई येशूपुढे गुडघे
टेकून त्याची थट्टा करू लागले. ते म्हणू लागले. "यहूद्यांचा
राजा चिरायू होवो!" 30नंतर शिपाई येशूवर थुंकले. त्याच्या
हातातील काठी त्यांनी घेतली आणि त्या काठीने त्याच्या
डोक्यावर मारत राहिले. 31येशूची थट्टा करण्याचे
संपविल्यावर त्यांनी त्याचा झगा काढून घेतला आणि
त्याचे कपडे त्याला घातले. मग ते त्याला वधस्तंभावर
खिळून मारण्यासाठी घेऊन गेले.

## येशूला वधस्तंभावर खिळून मारतात
### *(मार्क 15:21-32; लूक 23:26-43; योहान 19:17-27)*

32शिपाई येशूला शहराबाहेर घेऊन चालले होते. तेव्हा
त्यांनी एका मनुष्याला वेठीला धरून येशूचा वधस्तंभ
वाहायला लावले. तो कुरेने या गावचा असून त्याचे नाव
शिमोन होते. 33जेव्हा ते 'गुलगुथा' (म्हणजे कवटीची जागा)
नावाच्या ठिकाणी येऊन पोहोचले. 34तेव्हा त्यांनी येशूला
पित्तमिश्रित द्राक्षारस प्यायला दिला. त्याने तो चाखला. पण
पिण्यास नकार दिला. 35त्यांनी त्याला वधस्तंभावर खिळले.
नंतर त्यांनी चिठ्ठ्या टाकून येशूचे कपडे आपसात वाटून
घेतले. 36शिपाई तेथे बसून येशूवर पहारा देऊ लागले.
37येशूच्या डोक्याच्या वरच्या बाजूला त्याच्यावर ठेवण्यात
आलेला दोषारोप लिहिलेला लेख शिपायांनी लावला.
त्यावर मजकूर होता, "येशू – यहूद्यांचा राजा." 38येशूच्या
दोन्ही बाजूंना दोन लुटारू खिळण्यात आले होते. 39जवळून
जाणारे लोक येशूची निंदा करू लागले. ते डोकी हलवू
लागले.

40आणि म्हणू लागले, "तू म्हणालास की, 'हे मंदिर
मोडून तीन दिवसात परत उभे करीन.' आता स्वत:चा
बचाव कर! जर तू खरोखरच देवाचा पुत्र असलास तर
वधस्तंभावरून खाली ये!"

41तसेच मुख्य याजक, नियमशास्त्राचे शिक्षक, वडील
हेही तेथे होते. तेही इतरांसारखी येशूची निंदा करू लागले.
42ते म्हणू लागले, "याने दुसऱ्यांना वाचविले, परंतु तो
स्वत:चा बचाव करू शकत नाही! लोक म्हणतात की,
हा इस्त्राएल (यहूदी) लोकांचा राजा आहे. जर तो
राजा असेल, तर त्याने वधस्तंभावरून खाली यावे.
म्हणजे आम्ही त्याच्यावर विश्वास ठेवू! 43याचा देवावर
विश्वास आहे, जर देवाला तो खरोखर पाहिजे असेल तर
त्याने त्याला वाचवावे. तो स्वत: असे म्हणत असे,
'मी देवाचा पुत्र आहे.'"

44तसेच त्याच्याबरोबर वधस्तंभावर खिळलेले चोर देखील येशूविषयी वाईट गोष्टी बोलू लागले.

## येशूचे मरण

***(मार्क 15:33-41; लूक 23:44-49; योहान 19:28-30)***

45दुपारनंतर लगेच सुमारे तीन तास सर्व भूमीवर अंधार पसरला. 46सुमारे तीन वाजता येशू मोठ्याने ओरडून म्हणाला, “एलोई, एलोई, लमा सबकत्नी?” याचा अर्थ “माझ्या देवा, माझ्या देवा, तू माझा त्याग का केलास?” 47जे लोक तेथे उभे होते त्यांनी हे ऐकले. ते म्हणू लागले, “तो एलीयाला हाक मारीत आहे!”

48एक जण लगेच धावत गेला आणि बोळा घेऊन आला. त्या मनुष्याने तो बोळा आंबेत बुडविला आणि तो वेताच्या टोकावर ठेवून येशूला प्यायला दिला. 49परंतु दुसरे काही लोक म्हणू लागले, “थांबा. एलीया येऊन त्याला वाचवितो काय, हे आम्हांला पाहायचे आहे.”

50पुन्हा एकदा येशूने मोठ्याने आरोळी मारली आणि तो मरण पावला.

51त्याचवेळी, येशू मेल्याबरोबर मंदिरातील पडदा वरपासून खालपर्यंत दुभागला गेला, भूकंप झाला, खडक फुटले. 52कबरी उघडल्या, आणि देवाचे बरेच लोक जे मरण पावले होते, ते उठविले गेले. 53ते लोक कबरींतून बाहेर पडले, येशू मरणातून पुन्हा उठल्यावर ते लोक पवित्र नगर अर्थात यरुशलेमामध्ये गेले आणि अनेक लोकांनी त्यांना पाहिले. 54सेनाधिकारी व त्याच्याबरोबर येशूवर जे शिपाई पहारा देत होते त्यांनी भूकंप व जे काही घडले ते पाहिले. आणि ते फार भ्याले. ते म्हणाले, “हा मनुष्य खरोखर देवाचा पुत्र होता.”

55तेथे बऱ्याच स्त्रिया वधस्तंभापासून काही अंतरावर उभ्या राहून हे पाहत होत्या. येशूची सेवा करण्यासाठी या स्त्रिया गालीलाहून त्याच्यामागून आल्या होत्या. 56मरीया मग्दालिया, याकोब व योसेफ यांची आई मरीया आणि जब्दीचे पुत्र याकोब व योहान यांची आई तेथे होत्या.

## येशूला पुरतात

***(मार्क 15:42-47; लूक 23:50-56; योहान 19:38-42)***

57संध्याकाळ झाल्यावर योसेफ नावाचा एक श्रीमंत मनुष्य तेथे आला. तो अरिमथाईचा होता व येशूचा अनुयायी होता. 58योसेफ पिलाताकडे गेला. आणि त्याने त्याचे शरीर मागितले. पिलाताने येशूचे शरीर योसेफाला देण्याचा हुकूम शिपायांना केला. 59नंतर योसेफाने येशूचे शरीर घेतले आणि नवीन तागाच्या कपड्यात ते गुंडाळले. 60मग योसेफाने खडकात खोदलेल्या नव्या कबरेत येशूचे शरीर ठेवले. नंतर कबरेच्या तोंडावर एक मोठी धोंड लोटून ती कबर बंद केली. या गोष्टी केल्यानंतर योसेफ निघून गेला. 61मरीया मग्दालिया, आणि मरीया नावाची दुसरी स्त्री कबरेभोवती बसल्या होत्या.

## येशूच्या कबरेवर पहारा

62त्या दिवसाला तयारीचा दिवस* म्हणत असत. दुसऱ्या दिवशी मुख्य याजक व परूशी पिलाताकडे गेले. 63ते म्हणाले, “महाराज, तो लबाड मनुष्य (येशू) जिवंत असताना असे म्हणाला होता की, मी मरण पावल्यानंतर तीन दिवसांनी परत उठेन.’ 64म्हणून तीन दिवसापर्यंत कबरेवर कडक पहारा ठेवण्याचा हुकूम द्या. (कारण) त्याचे शिष्य येऊन त्याचे शरीर चोरून नेण्याचा प्रयत्न करतील. मग तो मरणानंतर पुन्हा उठला असे लोकांना सांगतील. ही शेवटची फसवणूक पहिल्यापेक्षा अधिक वाईट होईल.”

65पिलात म्हणाला, “तुम्ही शिपाई घेऊ शकता. जा आणि कबरेवर कडक पहारा ठेवा.” 66म्हणून ते गेले आणि कबरेवर कडक पहारा ठेवला. कबरेवर जी धोंड होती तिच्यावर सरकारी शिक्का मारला. आणि तेथे पहारा करण्यासाठी शिपाई नेमले.

## येशू मरणातून उठल्याची बातमी

***(मार्क 16:1-8; लूक 24:1-12; योहान 20:1-10)***

28 शब्बाथवारानंतरचा पहिला दिवस आला. पहाटेस मरीया मग्दालिया, मरीया नावाची दुसरी स्त्री कबर पाहावयास तेथे गेल्या.

2त्यावेळी तेथे मोठा भूकंप झाला. देवाचा दूत स्वर्गातून तेथे आला. तो देवदूत कबरेकडे गेला. त्याने कबरेच्या तोंडावरची धोंड बाजूला केली. नंतर तो देवदूत त्या धोंडेवर बसला.

3चमकणाऱ्या विजेसारखा तो देवदूत दिसत होता. त्याचे कपडे बर्फासारखे शुभ्र होते. 4कबरेवर पहारा करणारे शिपाई, देवदूत पाहून खूप घाबरले. ते थरथर कापू लागले. आणि ते मेलेल्या माणसासारखे झाले.

5देवदूत म्हणाला, “भिऊ नका, ज्याला वधस्तंभावर खिळले होते त्या येशूला तुम्ही पाहत आहात. 6पण तो येथे नाही. तो म्हणाला होता, त्याप्रमाणे त्याला मरणातून उठविण्यात आले आहे. या आणि जेथे त्याचे शरीर ठेवले होते ती जागा पाहा. 7आता ताबडतोब निघा आणि त्याच्या शिष्यांना सांगा : येशू मरणातून उठला आहे. तो गालीलात जाणार आहे. तो तुमच्या अगोदर तेथे जाईल. तुम्ही त्याला तेथे पाहाल.”

नंतर देवदूत म्हणाला, “मी तुम्हांला सर्व काही सांगितले आहे.” 8म्हणून त्या स्त्रिया लगबगीने कबरेजवळून निघाल्या. त्या फार घाबरलेल्या होत्या. परंतु फार आनंदितही झाल्या होत्या. जे काही घडले ते सांगण्यासाठी त्या धावत निघाल्या.

9अचानक येशू त्यांना भेटला आणि तो त्यांना म्हणाला, “शांती असो.” त्या त्याच्याजवळ आल्या. त्यांनी त्याचे पाय धरले आणि त्याची उपासना केली. 10मग येशू त्यांना

---

**तयारीचा दिवस** शुक्रवार. शब्बाथाच्या अगोदरचा दिवस.

म्हणाला, “मला अडवू नका. माझ्या भावांना सांगा की त्यांनी गालीलात जावे. तेथेच त्यांची माझी भेट होईल.”

## यहूदी पुढाऱ्यांना अहवाल

[11]स्त्रिया शिष्यांना सांगण्यासाठी गेल्या. तेव्हा कबरेवरील पहारेकरी शिपायांतील काही जण नगरात गेले आणि
त्यांनी घडलेले सर्व मुख्य याजकांना सांगितले. [12]नंतर
याजक जाऊन वडीलजनांना भेटले. आणि त्यांनी एक बेत रचला. त्यांनी शिपायांना पुष्कळ पैसे देऊन असे म्हणण्यास सांगितले.
[13]ते म्हणाले, “लोकांना असे सांगा की, आम्ही रात्री झोपेत असताना येशूचे शिष्य आले आणि त्यांनी त्याचे शरीर चोरून नेले.
[14]हे जरराज्यपालाच्या कानावर गेले तर आम्ही त्याला पटवून देऊ आणि तुम्हांला काही होऊ देणार नाही.”
[15]मग शिपायांनी पैसे घेतले व याजकांनी सांगितले तसे केले. आणि ही गोष्ट यहूदी लोकांत आजवर प्रचलित आहे.

## येशू आपल्या शिष्यांशी बोलतो

***(मार्क 16:14-18; लूक 24:36-49; योहान 20:19-23; प्रेषितांची कृत्ये 1:6-8)***

[16]अकरा शिष्य गालीलास निघून गेले. येशूने सांगितलेल्या डोंगरावर ते हजर झाले.
[17]त्या डोंगरावर येशू त्यांना दिसला. त्यांनी त्याची उपासना केली. पण तो येशू आहे यावर शिष्यांपैकी काहींचा विश्वास बसला नाही.

[18]तेव्हा येशू त्याच्याकडे आला आणि म्हणाला, “स्वर्गात आणि पृथ्वीवर मला सर्व अधिकार देण्यात आला आहे.
[19]म्हणून तुम्ही जा आणि राष्ट्रातील लोकांस माझे शिष्य करा. पिता, पुत्र आणि पवित्र आत्मा यांच्या नावाने बाप्तिस्मा द्या.

[20]आणि जे काही मी तुम्हांला शिकविले आहे ते त्या लोकांना करायला शिकवा. आणि पाहा, काळाच्या शेवटापर्यंत मी सदोदित तुमच्याबरोबर राहीन.”

# मार्कने लिहिलेले शुभवर्तमान

### येशू ख्रिस्ताचे येणे
***(मत्तय 3:1-12; लूक 3:1-9, 15-17; योहान 1:19-28)***

1 देवाचा पुत्र* येशू ख्रिस्त याच्या शुभवर्तमानाची सुरूवात. 2यशया संदेष्ट्याच्या पुस्तकात असे लिहिले आहे:

"ऐका! मी माझ्या दूताला तुझ्याकडे पाठवीत आहे तो तुझ्यासाठी मार्ग तयार करील. *मलाखी 3:1*

3तेथे रानात एक व्यक्ति ओरडून सांगत होती: 'प्रभूसाठी मार्ग तयार करा, त्याच्यासाठी वाटा सरळ करा.'"
*यशया 40:3*

4मग बाप्तिस्मा करणारा योहान आला व रानात लोकांचे बाप्तिस्मे करू लागला. लोकांना त्याने सांगितले की, जर त्यांना त्यांची अंत:करणे बदलायची असतील तर त्यांनी पश्चात्तापाचा बाप्तिस्मा घ्यायला पाहिजे. मग त्यांच्या पापांची क्षमा केली जाईल. 5यहूदीया व यरुशलेम येथील सर्व लोक योहानाकडे आले, त्यांनी आपली पापे कबूल केल्यावर त्याने त्यांचा यार्देन नदीत बाप्तिस्मा केला.

6योहान उंटाच्या केसांपासून केलेली वस्त्रे वापरीत असे. त्याच्या कंबरेला कातड्याचा पट्टा होता आणि तो टोळ व रानमध खात असे. 7योहानाने लोकांना हा संदेश दिला: "माझ्यापेक्षाही महान असा कोणी एक येत आहे, तो माझ्यानंतर येत आहे. मी त्याच्या वहाणांचा बंद सोडण्याच्यादेखील पात्रतेचा नाही. 8मी तुमचा पाण्याने बाप्तिस्मा करतो पण तो तुमचा बाप्तिस्मा पवित्र आत्म्याने करील."

### येशूचा बाप्तिस्मा
***(मत्तय 3:13-17; लूक 3:21-22)***

9त्यावेळी येशू गालीलातील नासरेथहून जेथे योहान होता त्या ठिकाणी आला. यार्देन नदीत योहानाने येशूचा\ बाप्तिस्मा केला. 10येशू पाण्यातून वर येत असता त्याने आकाश उघडलेले पाहिले. आणि पवित्र आत्मा त्याच्यावर कबुतरासारखा आला. 11आकाशातून वाणी झाली. ती म्हणाली, "तू माझा प्रिय पुत्र आहेस, तुझ्यावर मी प्रेम करतो. तुझ्याविषयी मी संतुष्ट आहे."

### परीक्षा होण्यासाठी येशू दूर जातो
***(मत्तय 4:1-11; लूक 4:1-13)***

12नंतर आत्म्याने येशूला एकट्याला रानात पाठविले. 13येशू रानात चाळीस दिवस होता. तो तेथे हिंस्त्र प्राण्यांबरोबर होता. तो तेथे असता सैतान त्याला मोह पाडून त्याची परीक्षा बघत होता. पण दूत येऊन त्याची सेवा करीत होते.

### येशू काही शिष्य निवडतो
***(मत्तय 4:12-22; लूक 4:14-15; 5:1-11)***

14यानंतर, योहानाला तुरुंगात टाकण्यात आले. येशू गालीलास गेला व देवाकडून आलेली सुवार्ता त्याने सांगितली. 15येशू म्हणाला, "आता योग्य वेळ आली आहे. देवाचे राज्य जवळ आले आहे. पश्चात्ताप करा आणि सुवार्तेवर विश्वास ठेवा. 16येशू गालीलाच्या सरोवराजवळून जात होता तेव्हा त्याने शिमोन* व शिमोनाचा भाऊ अंद्रिया याला सरोवरात जाळे टाकताना पाहिले कारण ते मासे धरणारे होते. 17येशू त्यांना म्हणाला, "माझ्या मागे या म्हणजे मी तुम्हांला माणसे धरणारे करीन. 18मग ते लगेचच जाळी सोडून त्याच्यामागे चालू लागले. 19आणि तो थोडा पुढे गेल्यावर त्याला जब्दीचा मुलगा याकोब व त्याचा भाऊ योहान हे दिसले. ते त्यांच्या नावेत होते व आपली जाळी तयार करीत होते. 20त्याने लगेच त्यांना हाक मारली. मग त्यांनी आपले वडील जब्दी व नोकरचाकर यांना नावेत सोडले आणि ते त्याच्या मागे गेले.

### दुष्ट आत्मा असलेल्या मनुष्याला येशू बरे करतो
***(लूक 4:31-37)***

21येशू व त्याचे शिष्य कफर्णहूमास गेले. लगेच येणाऱ्या शब्बाथ दिवशी येशू सभास्थानात गेला आणि लोकांना त्याने शिकविले. 22त्याच्या शिकवणुकीने ते चकित झाले, कारण येशू नियमशास्त्राच्या शिक्षकांप्रमाणे शिकवीत नव्हता, तर त्याला अधिकार असल्यासारखा शिकवीत होता. 23त्यांच्या सभास्थानात एक भूतबाधा झालेला मनुष्य

---

**देवाचा पुत्र** काही ग्रीक प्रतींमध्ये हे शब्द गाळलेले आहेत.

**शिमोन** शिमोनाचे दुसरे नाव पेत्र.

होता, तो एकदम मोठ्याने ओरडला, 24आणि म्हणाला, “नासरेथच्या येशू, तुला आमच्याकडून काय पाहिजे? तू आमचा नाश करावयास आला आहेस काय? तू कोण आहेस हे मला माहीत आहे, देवाचा पवित्र असा तू आहेस.”

25परंतु येशूने त्याला अधिकारवाणीने म्हटले, “शांत राहा व याच्यातून नीघ.” 26नंतर अशुद्ध आत्म्याने त्याला पिळले व तो मोठ्याने ओरडून त्याच्यातून बाहेर गेला.

27आणि लोक आश्चर्यचकित झाले, व एकमेकांस विचारू लागले, “येथे काय चालले आहे? हा मनुष्य काही तरी नवीन शिकवीत आहे. आणि तो अधिकाराने शिकवीत आहे. तो दुष्ट आत्म्यांना आज्ञा करतो आणि ते त्याचे ऐकतात!” 28मग येशूविषयीची बातमी ताबडतोब गालीलाच्या सर्व प्रदेशात पसरली.

## येशू पुष्कळ लोकांना बरे करतो
### *(मत्तय 8:14-17; लूक 4:38-41)*

29येशू व त्याच्या शिष्यांनी सभास्थान सोडले आणि लागलीच ते योहान व याकोब यांच्याबरोबर शिमोन व अंद्रिया यांच्या घरी गेले. 30शिमोनाची सासू तापाने बिछान्यावर पडली होती. तेव्हा त्यांनी ताबडतोब येशूला तिच्याविषयी सांगितले. 31तो तिच्याकडे गेला आणि तिला हाताला धरून त्याने उठविले. आणि तिचा ताप निघून गेला व ती त्याची सेवा करू लागली. 32संध्याकाळ झाली आणि सूर्य अस्ताला गेल्यावर त्यांनी सर्व आजारी लोकांस आणि भुतांनी पछाडलेल्या लोकांस त्याच्याकडे आणले. 33तेव्हा सर्व शहर घरापाशी दारापुढे जमा झाले. 34त्याने निरनिराळ्या रोगांनी आजारी असलेल्यांना बरे केले व अनेक लोकांतून भुते काढली. पण त्याने भुतांना बोलू दिले नाही कारण ती त्याला ओळखत होती.

## येशू लोकांना सुवार्ता सांगण्याची तयारी करतो
### *(लूक 4:42-44)*

35अगदी पहाटेच अंधार असतानाच त्याने घर सोडले आणि तो एकांत स्थळी गेला. तेथे त्याने प्रार्थना केली. 36शिमोन व त्याच्यासोबत असलेले येशूचा शोध करीत होते, 37आणि जेव्हा त्यांना तो सापडला तेव्हा ते त्याला म्हणाले, “सर्वजण तुमचा शोध करीत आहेत.”

38तेव्हा येशू त्यांना म्हणाला, “आपण जवळपासच्या ठिकाणी जाऊ या, म्हणजे मला तेथे देखील उपदेश करणे शक्य होईल. कारण त्या कारणासाठीच मी बाहेर पडलो आहे.” 39मग तो सर्व गालीलातून, त्यांच्या सभास्थानातून उपदेश करीत आणि भुते काढीत फिरला.

## येशू एका आजारी मनुष्याला बरे करतो
### *(मत्तय 8:1-4; लूक 5:12-16)*

40एक कुष्ठरोगी येशूकडे आला व त्याच्यापुढे गुडघे टेकून त्याने स्वत:ला बरे करण्याची विनंति केली. तो येशूला म्हणाला, “जर तुमची इच्छा असेल तर तुम्हामध्ये मला शुद्ध करण्याचे सामर्थ्य आहे.

41येशूला त्याची दया आली. मग त्याने हात लांब केला आणि त्याला स्पर्श केला व त्याला म्हणाला, “मला तुला बरे करावयाचे आहे. तुझा कुष्टरोग बरा होवो.” 42आणि लगेच त्याचे कुष्ठ गेले व तो शुद्ध झाला.

43येशूने त्याला सक्त ताकीद दिली व लगेच जाण्यास सांगितले. येशू त्याला म्हणाला, 44“पाहा, याविषयी कोणाला काहीही सांगू नकोस, परंतु जा आणि स्वत:ला याजकाला दाखव. व स्वत:च्या शुद्धीकरणासाठी मोशेच्या आज्ञेप्रमाणे अर्पण कर. हे यासाठी कर की, तू शुद्ध झाला आहेस याची त्या सर्वांना साक्ष पटावी. 45परंतु तो मनुष्य गेला व त्याने मोकळेपणाने सांगण्यास सुरूवात केली व ही बातमी पसरविली. याचा परिणाम असा झाला की, येशूला उघडपणे शहरात जाता येईना. म्हणून तो एकांतवासात राहिला. आणि चोहोबाजूंनी लोक त्याच्याकडे आले.

## येशू एका पक्षघाती मनुष्याला बरे करतो
### *(मत्तय 9:1-8; लूक 5:17-26)*

2 नंतर काही दिवसांनी येशू कफर्णहूमास परत गेला. तो घरी आहे ही बातमी लोकांपर्यंत गेली. 2तेव्हा इतके लोक जमले की जागा उरली नाही. एवढेच नव्हे तर दाराबाहेरदेखील जागा नव्हती. येशू त्यांना उपदेश करीत होता. 3काही लोक त्याच्याकडे पक्षघाती मनुष्याला घेऊन आले. त्याला चौघांनी उचलून आणले होते. 4परंतु गर्दीमुळे त्यांना त्या मनुष्याला येशूजवळ नेता येईना, मग तो होता तेथील त्याच्यावरचे छपर त्यांनी काढले व ज्या खाटेवर तो मनुष्य होता. ती खाट त्यांनी छपरातून खाली सोडता येईल अशी जागा केली व त्या पक्षघाती मनुष्याला खाली सोडले. 5येशूने त्यांचा विश्वास पाहिला तेव्हा तो पक्षघाती मनुष्याला म्हणाला, “मुला, तुझ्या पापांची क्षमा झाली आहे.”

6तेथे नियमशास्त्राचे काही शिक्षक बसले होते. ते आपसात कुजबूज करीत होते की, 7“हा मनुष्य असे का बोलत आहे? हा देवाची निंदा करीत आहे. देवाशिवाय कोण पापांची क्षमा करू शकतो?”

8आणि येशूला त्याच क्षणी त्याच्या आत्म्यात समजले की, ते स्वत:शी असा विचार करीत आहेत. तो त्यांस म्हणाला, “तुम्ही या गोष्टीविषयी आपसात का कुजबूज करता? 9‘तुझ्या पापांची क्षमा झाली आहे’ असे या पक्षघाती मनुष्याला म्हणणे किंवा ‘ऊठ, आपला बिछाना उचल आणि आपल्या घरी जा,’ असे म्हणणे; यातील कोणते सोपे आहे?”

10परंतु मनुष्याच्या पुत्राला पृथ्वीवर पापांची क्षमा करण्याचा अधिकार आहे हे समजावे म्हणून तो पक्षघाती मनुष्याला म्हणाला, 11“मी तुला सांगतो; ऊठ, तुझा बिछाना उचल आणि आपल्या घरी जा.” 12मग तो लगेच उठला.

त्याने आपला बिछाना घेतला व सर्वांच्या समक्ष बाहेर
गेला. यामुळे ते सर्व थक्क झाले. त्यांनी देवाची स्तुति
केली आणि म्हणाले, "यासारखे आम्ही कधी पाहिले
नव्हते."
13येशू पुन्हा सरोवराकडे गेला व पुष्कळ लोक तेथे
त्याच्यामागे गेले आणि त्याने त्यांस शिक्षण दिले. 14नंतर
तो जात असता त्याने अल्फीचा मुलगा लेवी यांस
जकातनाक्यावर बसलेले पाहिले. मग येशू लेवीला
म्हणाला, "माझ्या मागे ये." तेव्हा लेवी उठला आणि
येशूच्या मागे गेला.
15नंतर येशू लेवीच्या घरी जेवत असता पुष्कळ
जकातदार व पापी लोकही येशू व त्याच्या शिष्यांबरोबर
जेवत होते. कारण तेथे जे त्याच्यामागे आले होते त्यांच्यापैकी
पुष्कळ जण होते, 16काही नियमशास्त्राचे शिक्षक जे परूशी
होते त्यांनी येशूला पापी व जकातदारांबरोबर जेवताना
पाहिले. ते त्याच्या शिष्यांस म्हणाले, "येशू हा पापी व
जकातदार यांच्याबरोबर का जेवत आहे?"
17येशूने हे ऐकले आणि तो त्यांना म्हणाला, "जे निरोगी
आहेत त्यांस वैद्याची गरज नाही पण रोग्यांस आहे. मी
नीतिमान लोकांस नाही तर पाप्यांस बोलवावयास आलो
आहे."

## येशू इतर धार्मिक पुढाऱ्यांसारखा नाही
### *(**मत्तय** 9:14-17; **लूक** 5:33-39)*

18जेव्हा योहानाचे शिष्य व परूशी उपास करीत होते.
ते काहीजण येशूकडे आले आणि त्याला म्हणाले, "योहानाचे
शिष्य व परूशी लोक उपास करतात परंतु तुझे शिष्य
उपास का करीत नाहीत?"
19येशू म्हणाला, "खरोखर जोपर्यंत वऱ्हाड्यांबरोबर
वर आहे तोपर्यंत त्यांनी उपास करावा अशी तुमची अपेक्षा
आहे काय? जोपर्यंत त्यांच्याबरोबर वर आहे तोपर्यंत त्यांना
उपास करणे शक्य नाही. 20परंतु असे दिवस येतील की,
वर त्यांच्यापासून घेतला जाईल आणि नंतर ते त्या दिवशी
उपास करतील.
21"कोणी नव्या कापडाचा तुकडा जुन्या कापडाला जोडीत
नाही, जर तो असे करतो तर नवे कापड आकसून
जाईल व जुन्याला अधिक फाडील व ते अधिकच फाटेल.
22तसेच नवा द्राक्षारस कोणीही द्राक्षारसाच्या जुन्या कातडी
पिशवीत घालीत नाही. जर तो असे करतो तर द्राक्षारस
कातडी पिशवीला फाडील आणि द्राक्षारस व द्राक्षारसाची
कातडी पिशवी यांचा नाश होईल. म्हणून तो नवा द्राक्षारस
नव्या पिशवीत घालतो."

## काही यहूदी येशूवर टीका करतात
### *(**मत्तय** 12:1-8; **लूक** 6:1-5)*

23नंतर असे झाले की, येशू शब्बाथ दिवशी शेतातून
जात असता, जाताना त्याचे शिष्य कणसे मोडू लागले.
24तेव्हा परूशी येशूला म्हणाले, "पाहा, शब्बाथ दिवशी जे
करू नये ते हे का करतात?"
25येशू म्हणाला, "जेव्हा दावीद व त्याच्याबरोबर असलेल्यां
लोकांना भूक लागली व त्यांना खावयाला हवे होते. तेव्हा
त्यांनी काय केले याविषयी तुम्ही ऐकले नाही काय?
26अब्याथार प्रमुख याजक असताना, तो देवाच्या मंदिरात
कसा गेला आणि देवाला समर्पित केलेल्या भाकरी, ज्या
नियमशास्त्रप्रमाणे याजकाशिवाय कोणीही खाऊ नयेत त्या
कशा खाल्ल्या व जे त्याच्याबरोबर होते त्यांनाही कशा
दिल्या, याविषयी तुम्ही वाचले नाही काय?
27तो त्यास सांगत होता, "शब्बाथ मनुष्यांसाठी करण्यात
आला. मनुष्य शब्बाथासाठी करण्यात आला नाही.
28म्हणून मनुष्याचा पुत्र शब्बाथाचादेखील प्रभु आहे.

## येशू वाळलेल्या हाताच्या मनुष्याला बरे करतो
### *(**मत्तय** 12:9-14; **लूक** 6:6-11)*

3 दुसऱ्यांदा येशू सभास्थानात गेला. तेथे वाळलेल्या
हाताचा मनुष्य होता. 2येशूवर आरोप करण्यासाठी
कारण मिळावे म्हणून तो शब्बाथ दिवशी त्या मनुष्याला
बरे करतो की काय हे पाहण्यासाठी काही लोक त्याच्यावर
बारकाईने नजर ठेवून होते. 3येशू वाळलेल्या हाताच्या
मनुष्याला म्हणाला, "लोकांच्या समोर उभा राहा."
4नंतर तो त्यांना म्हणाला, "शब्बाथ दिवशी चांगले
करणे किंवा वाईट करणे, जीव वाचविणे किंवा जिवे
मारणे यांतील कोणते योग्य आहे?" परंतु ते गप्प राहिले.
5येशूने सर्वांकडे रागाने पाहिले. त्यांच्या मनाच्या
कठीणतेमुळे तो फार खिन्न झाला. तो त्या मनुष्याला
म्हणाला, "तुझा हात पुढे सरळ कर," त्याने तो लांब
केला आणि त्याचा हात बरा झाला. 6नंतर परूशी निघून
गेले आणि लगेच त्याला ठार करणे कसे शक्य होईल
याविषयी हेरोदीयांबरोबर * येशूविरुद्ध कट करू लागले.

## पुष्कळ लोक येशूच्या मागे जातात

7येशू आपल्या शिष्यांसह गालील सरोवराकडे निघून
गेला आणि गालील व यहूदीयातून मोठा लोकसमुदाय
त्याच्या मागे आला. 8कारण तो करीत असलेल्या
कृत्यांविषयी त्यांनी ऐकले व यरुशलेम, इदूमिया, यार्देनच्या
पलीकडच्या प्रदेशातून, सोर व सीदोनच्या आसपासच्या
प्रदेशातून मोठा लोकसमुदाय येशूकडे आला. 9मग गर्दीमुळे
चेंगरुन जाऊ नये म्हणून त्याने आपल्या शिष्यांस एक
छोटी होडी आणावयास सांगितली, 10त्याने अनेक लोकांना
बरे केले होते म्हणून ज्यांना रोग होते ते त्याला स्पर्श
करण्यासाठी व वाट काढण्यासाठी पुढे रेटीत होते. 11जेव्हा
अशुद्ध आत्मे येशूला पाहत तेव्हा ते त्याच्यासमोर खाली
पडून मोठ्याने ओरडत की, "तू देवाचा पुत्र आहेस!"

---

**हेरोदीयांबरोबर** राजकीय यहूदी गट.

12पण त्याने त्यांना सक्त ताकीद दिली की, मला प्रगट करू नका.

### येशू त्याचे बारा शिष्य निवडतो
**(*मत्तय 10:1-4; लूक 6:12-16*)**

13नंतर येशू डोंगरावर गेला आणि जे त्याला पाहिजे होते त्यांना त्याने स्वत:कडे बोलाविले. व ते त्याच्याकडे आले. 14त्याने बारा जण निवडले व त्यांना प्रेषित हे नाव दिले. त्याने त्यांची यासाठी निवड केली की, त्यांनी त्याच्याजवळ असावे व त्यांना दुसऱ्या ठिकाणी उपदेश करण्यासाठी त्याला पाठविता यावे. 15व त्यांना भुते काढण्याचा अधिकार असावा. 16मग येशूने या बारा जणांची निवड केली व जो शिमोन त्याला पेत्र हे नाव दिले. 17जब्दीचा मुलगा याकोब व याकोबाचा भाऊ योहान यांना त्याने बेनेरेगेश, ज्याचा अर्थ 'गर्जनेचे पुत्र' असा होतो हे नाव दिले. 18अंद्रिया, फिलीप, बर्थलमय, मत्तय, थोमा, अल्फीचा मुलगा याकोब, तद्दय, शिमोन कनानी 19आणि यहूदा इस्कर्योत ज्याने नंतर येशूचा विश्वासघात केला.

### काही यहूदी येशूमध्ये अशुद्ध आत्मा आहे असे म्हणतात
**(*मत्तय 12:22-32; लूक 11:14-23,12:10*)**

20नंतर येशू घरी गेला आणि पुन्हा एकदा एवढा मोठा लोकसमुदाय जमला की, येशू व त्याचे शिष्य जेवूसुद्धा शकले नाहीत. 21त्याच्या कुटुंबातील लोकांनी याविषयी ऐकले तेव्हा ते त्यास आणावयास गेले कारण लोक म्हणत होते की तो वेडा आहे. 22यरुशलेमेहून आलेले नियमशास्त्राचे शिक्षक म्हणत होते की, "याच्यामध्ये बालजबूल आहे." आणि त्या भुतांच्या अधिपतीच्या सामर्थ्याने हा भुतांना घालवून देतो."

23मग येशूने त्यांना जवळ बोलाविले व बोधकथेच्या साहाय्याने त्यांच्याशी बोलू लागला, "सैतानच सैतानाला कसा काढू शकेल? 24जर राज्यातच फूट पडली तर ते राज्य टिकू शकत नाही. 25आणि घरातच फूट पडली तर ते घर टिकू शकत नाही. 26तर मग सैतान स्वत:लाच विरोध करू लागला आणि त्याच्यातच फूट पडली तर तो टिकू शकणार नाही. परंतु त्याचा शेवट होईल. 27खरोखर कोणालाही बलवान मनुष्याच्या घरात शिरून त्याची मिळकत लुटता येणार नाही. प्रथम त्या बलवान माणसाला बांधले पाहिजे, मगच त्याचे घर लुटता येईल. 28मी तुम्हांस खरे सांगतो की, लोकांच्या पापांची व त्यांनी केलेल्या देवाच्या निंदेची त्यांना क्षमा होईल. 29पण जो कोणी पवित्र आत्म्याची निंदा करील, त्याची कधीच क्षमा होणार नाही आणि तो मनुष्य सार्वकालिक पापाचा दोषी आहे."

30येशू असे म्हणाला कारण नियमशास्त्राचे शिक्षक म्हणाले की त्याच्यामध्ये अशुद्ध आत्मा आहे.

### येशूचे अनुयायी हे त्याचे खरे कुटुंब आहे
**(*मत्तय 12:46-50; लूक 8:19-21*)**

31नंतर येशूची आई आणि भाऊ तेथे आले. ते बाहेर उभे राहिले आणि कोणाला तरी त्याला बोलवावायास पाठविले. 32लोकसमुदाय त्याच्याभोवती जमा झाला होता. लोक येशूला म्हणाले, "पाहा तुझी आई व तुझे भाऊ बाहेर तुझी वाट पाहत आहेत."

33त्याने त्यांना उत्तर दिले, "कोण माझी आई आणि कोण माझे भाऊ?" 34येशूने जे त्याच्याभोवती जमले होते त्यांच्याकडे पाहिले आणि म्हणाला, "हे पाहा माझी आई आणि माझे भाऊ. 35जे जे कोणी देवाच्या इच्छेप्रमाणे वागतात तेच माझे भाऊ, माझी बहीण व माझी आई आहेत."

### बी पेरणाऱ्या शेतकऱ्याविषयीची बोधकथा
**(*मत्तय 13:1-9; लूक 8:4-8*)**

4 दुसऱ्या वेळी येशू सरोवराच्या काठी शिक्षण देऊ लागला. पुष्कळ लोक त्याच्याभोवती जमले. मग तो सरोवरातील नावेत बसला आणि सर्व लोक सरोवराच्या किनाऱ्यावरील जमिनीवर होते. 2त्याने बोधकथेवरून पुष्कळ गोष्टी शिकविल्या. शिक्षण देताना तो म्हणाला, 3"ऐका! एक शेतकरी आपले बी पेरावयास गेला. 4तो पेरीत असता काही वाटेवर पडले व पक्ष्यांनी येऊन ते सर्व खाऊन टाकले. 5दुसरे काही बी खडकाळ जमिनीवर पडले. तेथे फार माती नव्हती. माती खोल नसल्यामुळे ते लवकर उगवले पण 6सूर्य उगवल्यावर ते करपले आणि मूळ रूजले नसल्यामुळे ते वाळून गेले. 7काही बी काटेरी झुडुपात पडले. काटेरी झुडपे अधिक वाढली आणि त्यांनी त्याची वाढ खुंटविली. व त्याला पीक आले नाही 8पण काही बी चांगल्या जमिनीवर पडले, ते उगवले, वाढले आणि भरपूर पीक आले आणि त्याचे कोठे तीसपट, कोठे साठपट आणि कोठे शंभरपट पीक आले." 9मग तो म्हणाला, "ज्याला ऐकावयास कान आहेत तो ऐको!"

### येशू बोधकथांचा उपयोग का करतो हे सांगतो
**(*मत्तय 13:10-17; लूक 8:9-10*)**

10जेव्हा तो एकटा होता तेव्हा त्याच्याभोवती बारा शिष्यांसह जे इतर होते त्यांनी त्या बोधकथांविषयी त्याला विचारले.

11तो त्यास म्हणाला, "केवळ तुम्हांस देवाच्या राज्याचे रहस्य जाणून घेण्याचे (अधिकार) देण्यात आले आहेत, पण बाहेरच्यांना गोष्टीरूपात सांगितले आहे. 12यासाठी की,

'ते पाहत असता पाहतील पण त्यांना कधीच दिसणार नाही ते ऐकत असता ऐकतील पण त्यांना कधीच समजणार

नाही जर त्यांनी पाहिले आणि त्यांना समजले तर त्यांच्यात कदाचित बदल होईल आणि त्यांना क्षमा करण्यात येईल.'"
*यशया 6:9-10*

## बियांविषयीच्या बोधकथेचे येशू स्पष्टीकरण करतो
### *(मत्तय 13:18-23; लूक 8:11-15)*

13मग तो त्यांस म्हणाला, "तुम्हांला ही बोधकथा समजत नाही काय? तर मग तुम्हांला दुसरी कोणतीही गोष्ट कशी समजेल? 14पेरणारा वचन पेरतो. 15काही लोक वाटेवर पेरलेल्या बियांसारखे जेथे वचन पेरले आहे अशासारखे आहेत. जेव्हा ते ऐकतात तेव्हा लगेच सैतान येतो आणि त्यांच्यात पेरलेले वचन घेऊन जातो. 16काही लोक खडकाळ जमिनीत पेरलेल्या बियांसारखे असतात. ते ऐकतात तेव्हा लगेच आनंदाने ग्रहण करतात. 17पण त्यांनी ते वचन आपल्यामध्ये खोलवर रूजू (मुळावू) न दिल्यामुळे ते थोडाच काळ टिकतात. जेव्हा वचनामुळे संकटे येतात किंवा त्रास होतो तेव्हा ते चटकन विश्वास ठेवण्याचे सोडून देतात. 18इतर लोक काटेरी झुडपात बी पेरल्याप्रमाणे आहेत. ते असे आहेत की, जे वचन ऐकतात. 19परंतु या संसाराच्या चिंता, संपत्तीचा मोह, आणि इतर गोष्टींची इच्छा या गोष्टी आड येतात, व वचन खुंटवितात व ते फळ देत नाहीत. 20आणि इतर दुसरे चांगल्या जमिनीत पेरलेल्या बियांसारखे आहेत. ते असे आहेत की जे वचन ऐकतात, स्वीकारतात, आणि फळ देतात. कोणी तीसपट, साठपट, कोणी शंभरपट."

## तुमच्याजवळ जे आहे त्याचा उपयोग केलाच पाहिजे
### *(लूक 8:16-18)*

21आणखी तो त्यांस म्हणाला, "दिवा मापाखाली किंवा पलंगाखाली कधी ठेवतात काय? तो दिवठणीवर ठेवण्यासाठी आणीत नाहीत काय? 22प्रत्येक गोष्ट जी झाकलेली आहे ती उघड होईल. आणि प्रत्येक गुप्त गोष्ट जाहीर होईल. 23ज्याला कान आहेत तो ऐको!

24नंतर तो त्यांस म्हणाला, "तुम्ही जे ऐकता त्याचा काळजीपूर्वक विचार करा. जे माप तुम्ही इतरांसाठी वापरता त्याच मापाने तुमच्यासाठी मोजण्यात येईल. किंबहुना थोडे जास्तच तुम्हांला देण्यात येईल. 25कारण ज्याच्याजवळ आहे त्याला जास्त दिले जाईल आणि ज्या कोणाजवळ नाही त्याच्यापासून जे आहे तेही काढून घेतले जाईल."

## येशू बियांच्या बोधकथेचा उपयोग करतो

26आणखी तो म्हणाला, "देवाचे राज्य असे आहे की, एखादा मनुष्य जमिनीवर बी पसरून टाकतो. 27रात्री झोपतो आणि दिवसा उठतो. बी रूजते व ते वाढते हे कसे होते हे त्याला कळत नाही. 28जमीन आपोआप पीक उपजविते. प्रथम अंकुर, नंतर तुरा, त्यानंतर दाण्यांनी भरलेली ओंबी, मग कणसात पूर्ण वाढलेला दाणा. 29पीक तयार होते तेव्हा तो त्याला लगेच विळा लावतो, कारण कापणीची वेळ आलेली असते."

## देवाचे राज्य मोहरीच्या दाण्यासारखे आहे
### *(मत्तय 13:31-32, 34-35; लूक 13:18-19)*

30येशू म्हणाला, "आपण देवाचे राज्य कशासारखे आहे असे म्हणावे किंवा कोणती गोष्ट ते समजावून सांगण्यासाठी उपयोगात आणावी? 31ते मोहरीच्या दाण्यासारखे आहे. जो जमिनीत पेरतेवेळी पृथ्वीवरील सर्व दाण्यात सर्वात लहान असतो. 32परंतु तो पेरला जातो तेव्हा तो वाढतो व मळ्यातील सर्व झाडात मोठा होतो. त्याला मोठ्या फांद्या येतात आणि आकाशातील पाखरे त्याच्या सावलीत घरटी बांधू शकतात."

33अशा अनेक बोधकथांनी त्याने ते समजू शकतील असा संदेश त्यांना सांगितला. 34बोधकथेचा उपयोग केल्याशिवाय त्याने त्यांना इतर काहीही सांगितले नाही, परंतु जेव्हा तो शिष्यांसह एकांतात होता तेव्हा त्याने शिष्यांना सर्व समजावून सांगितले.

## येशू वादळ शांत करतो
### *(मत्तय 8:23-27; लूक 8:22-25)*

35त्या दिवशी संध्याकाळ झाल्यावर तो त्यांना म्हणाला, "आपण सरोवरापलीकडे जाऊ या." 36मग त्यांनी लोकसमुदायाला सोडले आणि तो नावेत होता तसेच त्याला घेऊन गेले. त्यांच्याबरोबर इतरही दुसऱ्या नावा होत्या. 37जोराच्या वाऱ्याचे वादळ आले आणि लाटा नावेवर आदळू लागल्या व ती पाण्याने भरू लागली. 38परंतु येशू मागच्या बाजूस वरामावर उशी घेऊन झोपला होता. त्यांनी त्याला उठविले आणि म्हटले, "गुरुजी, आपण बुडत आहोत तरी आपणांस काळजी वाटत नाही काय?"

39मग तो उठला आणि त्याने वाऱ्याला धमकाविले आणि समुद्राला म्हणाला, "शांत हो! स्तब्ध राहा." मग वारा थांबला व तेथे मोठी शांतता पसरली.

40मग तो त्यांना म्हणाला, "तुम्ही का भिता? तुमच्याकडे अजूनही कसा विश्वास नाही?"

41परंतु ते अतिशय घाबरले आणि एकमेकास म्हणाले, "हा आहे तरी कोण, की वारा आणि समुद्रदेखील त्याचे ऐकतात."

## येशू दुष्ट आत्मा लागलेल्या मनुष्याला बरे करतो
### *(मत्तय 8:28-34; लूक 8:26-39)*

5 मग ते सरोवराच्या पलीकडच्या बाजूच्या गरसेकरांच्या देशात आले आणि तो नावेतून उतरला तेव्हा 2लगेच एक दुष्ट आत्मा लागलेला मनुष्य स्मशानातून निघून त्याच्याकडे आला. 3हा मनुष्य कबरेमध्ये राहत

असे. आणि कोणीही त्याला साखळदंडानी सुद्धा बांधून
ठेवू शकत नव्हते. 4कारण पुष्कळदा त्याच्या पायात बेड्या
घालून साखळ्यांनी बांधलेले असतानाही त्याने साखळ्या
तोडल्या आणि बेड्यांचे तुकडे केले. कोणीही त्याला काबूत
आणू शकत नव्हते. 5तो रात्रंदिवस कबरांतून आणि
डोंगरातून मोठ्याने ओरडत असे आणि दगडांनी स्वत:स
ठेचून घेत असे. 6त्याने येशूला दुरून पाहिले तेव्हा तो
येशूकडे धावत आला आणि त्याच्यापुढे पडून त्याने त्याला
नमन केले. 7व तो मोठ्याने ओरडून म्हणाला, "येशू,
परात्पर देवाच्या पुत्रा, तुला माझ्याकडून काय पाहिजे? मी
तुला देवाची शपथ घालून विनवितो की, मला छळू नकोस."
8(कारण येशू त्याला म्हणत होता, "अरे अशुद्ध आत्म्या,
या माणसातून नीघ.")

9मग येशूने त्याला विचारले, "तुझे नाव काय?"

तो मनुष्य येशूला म्हणाला, "माझे नाव सैन्य* आहे,
कारण आम्ही पुष्कळ आहोत." 10त्यांना या हद्दीतून घालवू
नये म्हणून. तो मनुष्य येशूला पुन्हा पुन्हा विनवीत होता.

11तेथे डोंगराच्या कडेला डुकरांचा एक मोठा कळप
चरत होता. 12मग त्या दुष्ट आत्म्याने येशूला विनंति
केली आणि म्हणाला, "आम्हांला त्या डुकरांत पाठव
म्हणजे आम्ही त्यांच्यात शिरू."

13मग त्याने त्यांना तसे करण्यास परवानगी दिली. मग
दुष्ट आत्मे त्या मनुष्यातून बाहेर आले आणि त्या डुकरांत
शिरले. मग तो दोन हजारांचा कळप टेकडीवरून पळत
खाली जाऊन सरोवरात पडला व बुडून मेला.

14त्या कळपाची राखण करणारे लोक दूर पळून गेले
व त्यांनी ही बातमी गावात व शेतात सांगितली, तेव्हा
काय झाले हे पाहण्यास लोक तेथे आले. 15ते येशूकडे
आले आणि त्यांनी त्या भूतग्रस्ताला तेथे बसलेले पाहिले.
त्याने कपडे घातले होते. तो शुद्धीवर आलेला व ज्याला
सैन्य नावाच्या भुतांनी पछाडले होते तो तोच होता हे
पाहिले तेव्हा त्यांना भीति वाटली. 16काही लोक तेथे होते
व त्यांनी येशूने काय केले हे पाहिले होते, त्यांनी ज्या
मनुष्यात दुष्ट आत्मा होता त्याच्या बाबतीत काय घडले हे
इतरांना सांगितले. 17मग लोक त्याला आमचा प्रांत सोडून
जा असे विनवू लागले.

18येशू नावेतून जात असता पूर्वी भूतग्रस्त असलेल्या
मनुष्याने त्याला आपणाबरोबर येऊ द्यावे अशी विनंति
केली. 19पण येशूने त्याला येऊ दिले नाही. तो त्यास
म्हणाला, "आपल्या घरी तुझ्या लोकांकडे जा आणि प्रभूने
तुझ्यासाठी जे केले ते सर्व सांग. प्रभूने तुझ्यावर कशी
दया केली तेही सांग." 20मग तो निघाला आणि येशूने
त्याच्यासाठी जे काही केले याविषयी दकापलिस येथील
लोकांना सांगू लागला, तेव्हा सर्व लोकांना आश्चर्य वाटले.

### येशू मृत मुलीला जीवन देतो व आजारी स्त्रीला बरे करतो

***(मत्तय 9:18-26; लूक 8:40-56)***

21नंतर येशू नावेत बसून परत सरोवरापलीकडे गेल्यावर,
मोठा समुदाय त्याच्या भोवती जमला. तो सरोवराजवळ
होता. 22याईर नावाचा यहूद्यांच्या सभास्थानाचा एक
अधिकारी तेथे आला. याईराने येशूला पाहिले तेव्हा तो
त्याच्या पाया पडला. 23आणि आग्रहाने विनंति करून
त्याला म्हणाला, "माझी लहान मुलगी मरावरायस टेकली
आहे. मी विनंति करतो की आपण येऊन तिला बरे
वाटावे म्हणून तिच्यावर हात ठेवावा."

24मग येशू त्याच्याबरोबर गेला. लोकांचा मोठा समुदाय
येशूच्या मागे चालत होता व ते त्याच्याभोवती गर्दी करीत
होते. 25त्या लोकांमध्ये एक स्त्री होती. ती बारा वर्षांपासून
रक्तस्रावाने पीडलेली होती. 26बऱ्याच वैद्यांकडून इलाज
करून घेऊनसुद्धा तिने बराच त्रास सहन केला होता.
तिच्याकडे होते नव्हते ते सर्व तिने उपचारासाठी खर्च
केले होते. पण ती बरी न होता, तिचा आजार वाढला
होता. 27त्या स्त्रीने येशूविषयी ऐकले तेव्हा ती गर्दीत
त्याच्यामागे आली व त्याच्या झग्याला तिने स्पर्श केला.
28कारण ती म्हणत होती, 'जर मी त्याच्या कपड्यांना
शिवले तरी बरी होईन." 29जेव्हा तिने त्याच्या झग्याला
स्पर्श केला, तेव्हा तिचा रक्तस्राव थांबला. व आपल्या
त्रासातून आपण मुक्त झालो आहोत असे तिला जाणवले.
30येशूला ताबडतोब जाणीव झाली की, आपल्या शरीरातून
शक्ती गेली आहे. तो गर्दीत वळून म्हणाला, "माझ्या
कपड्यांना कोणी स्पर्श केला?"

31शिष्य येशूला म्हणाले, "लोक तुमच्याभोवती गर्दी
करीत आहेत हे तुम्ही पाहता, आणि तरीही विचारता,
मला कोणी स्पर्श केला?"

32परंतु हे कोणी केले हे पाहण्यासाठी तो सभोवार
बघतच राहिला. 33त्या स्त्रीला ती बरी झाली आहे हे
माहीत होते म्हणून ती आली आणि येशूच्या पाया पडली.
ती स्त्री भीतिने थरथर कांपत होती. तिने येशूला सर्व
काही सांगितले. 34येशू त्या स्त्रीला म्हणाला, "मुली, तुझ्या
विश्वासाने तुला बरे केले आहे, शांतिने जा आणि त्रासापासून
मुक्त राहा."

35तो हे बोलत असता सभास्थानातील अधिकाऱ्याच्या
घरून काही माणसे निरोप घेऊन आली. ती म्हणाली,
"तुमची मुलगी मेली आहे. गुरूजींना का त्रास देता?"

36येशूने त्यांचे बोलणे ऐकले आणि तो यहूद्यांच्या
सभास्थानाच्या अधिकाऱ्याला म्हणाला, "भिऊ नको,
फक्त विश्वास धर."

37येशूने फक्त पेत्र, याकोब आणि याकोबाचा भाऊ
योहान यांनाच आपल्याबरोबर येऊ दिले. 38ते त्या
अधिकाऱ्याच्या घरी आले. त्याने लोकांना मोठ्याने
आकांत करताना व रडताना पाहिले. 39तो आत गेला

---

**सैन्य** रोमन सैन्यातील सुमारे 5000 सैनिकांची तुकडी.

आणि त्यांना म्हणाला, “तुम्ही लोक रडून असा गोंधळ
का करीत आहात? ही मुलगी मेलेली नाही, ती झोपली
आहे.” 40ते सर्व त्याला हसले. त्याने सर्व लोकांना बाहेर
घालवून दिले व मुलीचे आईवडील व जे त्याच्याबरोबर
होते त्यांना घेऊन जेथे मुलगी होती तेथे आत गेला.
41त्याने मुलीचा हात धरला आणि म्हणाला, “तलीथा
कूम” म्हणजे (लहान मुली मी तुला सांगतो, ऊठ.”) 42ती
लहान मुलगी लगेच उठली आणि सभोवती फिरू लागली
(ती बारा वर्षाची होती.) ते फार आश्चर्यचकित झाले.
43नंतर त्याने त्यांना सक्त ताकीद दिली की हे कोणाला
कळता कामा नये. त्याने तिला खाण्यास देण्याविषयी
सांगितले.

## येशू आपल्या गावी जातो
### *(मत्तय 13:53-58; लूक 4:16-30)*

6 येशू तेथून निघाला आणि आपल्या गावी गेला
आणि त्याचे शिष्य त्याच्यामागे गेले. 2शब्बाथ दिवशी
तो सभास्थानात शिकवीत होता, पुष्कळ लोकांनी त्याची
शिकवण ऐकली तेव्हा ते थक्क झाले. ते म्हणाले, “या
माणसाला ही शिकवण कोठून मिळाली? आणि त्याला
कोणते ज्ञान देण्यात आले आहे की, यासारखे चमत्कार
त्याच्या हातून केले जातात? तो सुतार नाही काय?
3तो मरीयेचा मुलगाच ना? तो याकोब, योसे, यहूदा
आणि शिमोनाचा भाऊ नव्हे काय? व या आपल्याबरोबर
आहेत त्या याच्या बहिणी नव्हेत काय?” त्याचा स्वीकार
करण्याविषयी त्यांना प्रश्न पडला.
4मग येशू त्यांना म्हणाला, “संदेष्ट्यांचा सन्मान होत
नाही असे नाही पण त्याच्या गावात, शहरात, त्याच्या
नातेवाईकात आणि त्याच्या कुटुंबात होत नसतो.’ 5आणि
तेथे त्याला चमत्कार करता आला नाही. फक्त त्याने
काही रोगी लोकांच्या डोक्यावर हात ठेवून त्यांना बरे
केले. त्यांच्या अविश्वासामुळे त्याला आश्चर्य वाटले.
6नंतर येशू शिक्षण देत जवळपासच्या गावोगावी फिरला.
7त्याने बारा शिष्यांना आपणांकडे बोलावून घेतले व त्यांना
जोडीजोडीने पाठविले आणि त्याने त्यांना अशुद्ध आत्म्यावर
अधिकार दिला. 8त्याने त्यांना आज्ञा दिल्या की,
“काठीशिवाय प्रवासासाठी त्यांनी काही घेऊ नये. भाकर,
पिशवी किंवा कमरकशात पैसे काही घेऊ नका. 9त्यांनी
वहाणा घालाव्यात पण जास्तीचा अंगरखा नको. 10तो
त्यांना म्हणाला, “ज्या कुठल्याही घरात तुम्ही जाल तेथे
तुम्ही ते शहर सोडेपर्यंत राहा. 11आणि ज्या ठिकाणी
तुमचे स्वागत होणार नाही किंवा तुमचे ऐकणार नाहीत ते
गाव तुम्ही सोडून जा. आणि त्यांच्याविरुद्ध साक्ष म्हणून
तुमच्या पायाची धूळ तेथेच झटकून टाका. 12मग शिष्य
गेले आणि लोकांनी पश्चात्ताप करावा म्हणून त्यांनी उपदेश
केला. 13त्यांनी पुष्कळ भुते काढली आणि अनेक रोग्यांना
जैतुनाचे तेल लावून त्यांना बरे केले.

## हेरोद येशूला बाप्तिस्मा करणारा योहान समजतो
### *(मत्तय 14:1-12; लूक 9:7-9)*

14हेरोद राजाने येशूविषयी ऐकले कारण येशूचे नाव
सगळीकडे गाजले होते. काही लोक म्हणत होते, बाप्तिस्मा
करणारा योहान मेलेल्यांतून उठला आहे म्हणून
त्याच्याठायी चमत्कार करण्याचे सामर्थ्य आहे.
15इतर लोक म्हणत, “येशू एलीया आहे” तर काही
जण म्हणत, “हा संदेष्टा फार पूर्वीच्या संदेष्ट्यांपैकी एक
आहे.”
16परंतु हेरोदाने जेव्हा ऐकले तेव्हा तो म्हणाला, “ज्या
योहानाचा मी शिरच्छेद केला तो मरणातून उठविला गेला
आहे.”

## बाप्तिस्मा करणाऱ्या योहानाला असे मारले गेले

17कारण हेरोदाने स्वत: योहानाला पकडून तुरुंगात
टाकण्याची आज्ञा दिली होती. त्याचा भाऊ फिलिप याची
पत्नी हेरोदीया हिच्याबरोबर हेरोदाने लग्न केले. त्या
कारणामुळे त्याने असे केले. 18योहान हेरोदाला सांगत
असे की, “तुझ्या भावाच्या पत्नीशी असे लग्न करणे तुला
योग्य नाही.” 19याकरिता हेरोदीयाने योहानाविरुद्ध मनात
अढी धरली. ती त्याला ठार मारण्याची संधी पाहात होती.
परंतु ती त्याला मारू शकली नाही. 20कारण हेरोद
योहानाला भीत असे. हेरोदाला माहीत होते की, योहान
नीतिमान आणि पवित्र मनुष्य आहे, म्हणून तो त्याचे
संरक्षण करी. हेरोद योहानाचे बोलणे ऐके तेव्हा फार
गोंधळून जाई परंतु तो आनंदाने त्याचे ऐकत असे.
21मग एके दिवशी संधी आली. आपल्या वाढदिवशी
हेरोदाने आपले महत्त्वाचे अधिकारी, सैन्यातील सरदार व
गालीलातील प्रमुख लोकांना मेजवानी दिली. 22हेरोदीयाची
मुलगी मेजवानीच्या ठिकाणी आली व तिने नाच केला
आणि हेरोद व आलेल्या पाहुण्यांना आनंदीत केले.
तेव्हा हेरोद राजा मुलीला म्हणाला, “तुला जे पाहिजे ते
माग म्हणजे मी ते तुला देईन.” 23तो गंभीरपणे शपथ
वाहून म्हणाला, “माझ्या अर्ध्या राज्यापर्यंत जे काही तू
मागशील ते मी तुला देईन.” 24ती बाहेर गेली आणि
तिच्या आईला म्हणाली, “मी काय मागू?” आई म्हणाली,
“बाप्तिस्मा करणाऱ्या योहानाचे शीर.”
25आणि ती मुलगी लगेच आत राजाकडे गेली आणि
म्हणाली, “मला तुम्ही या क्षणी बाप्तिस्मा करणाऱ्या
योहानाचे शीर तबकात घालून द्यावे अशी माझी इच्छा
आहे.” 26राजाला फार वाईट वाटले, परंतु त्याच्या शपथेमुळे
व भोजनास आलेल्या पाहुण्यांमुळे त्याला तिला नकार
द्यावा असे वाटले नाही. 27तेव्हा राजाने लगेच वध
करणाऱ्याला पाठविले व योहानाचे शीर घेऊन येण्याची
आज्ञा केली. मग तो गेला व तुरूंगात जाऊन त्याने योहानाचे
शीर कापले. 28ते शीर तबकात घालून मुलीला दिले व
मुलीने ते आईला दिले. 29योहानाच्या शिष्यांनी हे ऐकले

तेव्हा ते तेथे आले. त्यांनी त्याचे शरीर उचलले आणि
कबरेत नेऊन ठेवले.

## येशू पाच हजारहून अधिक लोकांना जेवू घालतो

*(मत्तय 14:13-21; लूक 9:10-17; योहान 6:1-14)*

30प्रेषित येशूभोवती जमले. त्यांनी जे केले आणि
शिकविले ते सर्व त्याला सांगितले. 31नंतर येशू त्यांना
म्हणाला, “तुम्ही माझ्याबरोबर एकांती चला आणि थोडा
विसावा घ्या. तो असे म्हणाला कारण तेथे पुष्कळ लोक
जात येत होते व त्यांना जेवायलाही सवड मिळत नव्हती.
32तेव्हा ते सर्वजण नावेत बसून निर्जन ठिकाणी गेले.
33परंतु पुष्कळ लोकांनी त्यांना जाताना पाहिले व ते
कोण आहेत हे त्यांना कळाले तेव्हा सर्व गावांतील लोक
पायीच धावत निघाले व येशू तेथे येण्याअगोदरच ते तेथे
पोहोंचले. 34येशू नावेतून उतरला तेव्हा त्याने मोठा
लोकसमुदाय पाहिला व त्याला त्यांचा कळवळा आला.
कारण ते मेंढपाळ नसलेल्या मेंढरांसारखे होते. मग तो
त्यांना बऱ्याच गोष्टी शिकवू लागला. 35या वेळेपर्यंत
बराच उशीर झाला होता आणि (दिवस मावळतीला आला
होता.) मग त्याचे शिष्य त्याच्याकडे आले व म्हणाले, “ही
निर्जन जागा आहे व बराच उशीर झाला आहे. 36लोकांना
पाठवून द्या म्हणजे ते भोवतालच्या शेतात व खेड्यात
जाऊन त्यांच्यासाठी काहीतरी खायला विकत आणतील.”
37परंतु येशूने त्यांना उत्तर दिले, “तुम्ही त्यांना काहीतरी
खावयास द्या.” ते त्याला म्हणाले, “आम्ही जाऊन त्यांना
खाण्यासाठी दोनशे दीनारांच्या* भाकरी विकत आणाव्या
काय?” 38तो त्यांना म्हणाला, “जा आणि पाहा, की
तुमच्याजवळ किती भाकरी आहेत?” त्यांनी पाहिले तेव्हा
ते म्हणाले, “आमच्याजवळ पाच भाकरी आणि दोन मासे
आहेत.”
39येशूने शिष्यांना सांगितले, “सर्व लोकांना गटागटाने
हिरवळीवर बसायला सांगा.” 40तेव्हा सर्व लोक गटागटाने
बसले. प्रत्येक गटात पन्नास ते शंभर लोक होते. 41येशूने
पाच भाकरी आणि दोन मासे घेतले. त्याने त्याचे वाटे
केले. त्याने तेथे आकाशाकडे पाहून देवाचे आभार मानले.
भाकरी मोडल्या व त्या लोकांना वाढण्यासाठी आपल्या
शिष्यांजवळ दिल्या. दोन मासेसुद्धा वाटून दिले. 42मग ते
सर्व जेवून तृप्त झाले. 43त्यांनी भाकरीच्या व माशांच्या
तुकड्यांनी भरलेल्या बारा टोपल्या भरल्या. 44आणि जे
पुरुष जेवले, त्यांची संख्या पाच हजार होती.

## येशू पाण्यावर चालतो

*(मत्तय 14:22-23; योहान 6:15-21)*

45नंतर येशूने लगेच शिष्यांना नावेत बसविले आणि
पलीकडे असलेल्या बेथसैदा येथे त्याच्यापुढे जाण्यास
सांगितले. तोपर्यंत त्याने लोकांना निरोप देऊन घरी पाठवले.
46त्यांना निरोप दिल्यावर तो प्रार्थना करण्यास डोंगरावर
गेला. 47संध्याकाळ झाली तेव्हा नाव सरोवराच्या मध्यभागी
होती आणि जमिनीवर येशू एकटाच होता. 48मग त्याने
त्यांना वल्ही मारणे अवघड जात आहे असे पाहिले. कारण
वारा त्यांच्या विरुद्धचा होता. पहाटे तीन ते सहाच्या दरम्यान
येशू नावेकडे गेला. येशू पाण्यावरून चालत होता व तो
त्यांना ओलांडून पुढे जाऊ लागला, 49जेव्हा त्यांनी त्याला
सरोवरावरून पाण्यावरून चालताना पाहिले तेव्हा त्यांना
ते भूत आहे असे वाटले व ते ओरडले. 50कारण त्या
सर्वांनी त्याला पाहिले व ते घाबरून गेले. तो लगेच त्यांना
म्हणाला, “धीर धरा, भिऊ नका, मी आहे.” 51नंतर तो
त्यांच्याकडे नावेत गेला तेव्हा वारा शांत झाला. ते अतिशय
आश्चर्यचकित झाले. 52कारण त्यांना भाकरीच्या
संदर्भातील चमत्कार समजलाच नव्हता आणि त्यांची मने
कठीण झाली होती.
53त्यांनी सरोवर ओलांडल्यावर ते गनेसरेतच्या
किनाऱ्याला आले व नाव (होडी) बांधून टाकली. 54ते
नावेतून उतरले, तेव्हा लोकांनी येशूला ओळखले. 55लोक
हे सांगण्यासाठी इतर सर्व लोकांकडे पळाले आणि
आजाऱ्यांना खाटेवर घालून जेथे तो आहे असे ऐकले
तेथे घेऊन जाऊ लागले. 56खेड्यात, गावात किंवा शेतात
आणि, जेथे बाजाराच्या जागी कोठे तो गेला तेथे लोकांनी
आपल्या आजारी माणसांना आणून ठेवले. त्यांनी त्याला
फक्त त्याच्या झग्याच्या काठाला स्पर्श करू देण्याची विनंति
केली. ज्यांनी त्याला स्पर्श केला ते बरे झाले.

## देवाचा नियम आणि माणसांनी बनविलेले नियम

*(मत्तय 15:1-20)*

7 काही परूशी आणि नियमाशास्त्राचे शिक्षक जे
यरुशलेमेहून आले होते ते येशूभोवती जमले. 2आणि
त्यांनी त्याच्या काही शिष्यांना अशुद्ध (म्हणजे हात न
धुता) हातांनी जेवताना पाहिले. 3(कारण परूशी व इतर
सर्व यहूदी वाडवडिलांच्या रुढी पाळून विशिष्ट रीतीने
नीट हात धुतल्याशिवाय जेवत नाहीत.) 4बाजारातून
आणलेली कुठलीही वस्तू धुतल्याशिवाय ते खात नाहीत.
त्यांच्या पूर्वजांच्या इतर अनेक चालीरीति ते पाळतात
आणि प्याले, घागरी, तांब्याची भांडी धुणे अशा दुसऱ्या
इतर रूढीही पाळतात.
5मग परूशी व नियमशास्त्राचे शिक्षक यांनी येशूला
विचारले, “तुझे शिष्य वाडवडिलांच्या रूढी का पाळत
नाहीत? हात न धुता का जेवतात?” 6येशू त्यांना म्हणाला,
“यशयाने जेव्हा तुम्हा ढोंगी लोकांविषयी भविष्य केले
तेव्हा त्याचे बरोबरच होते. यशया लिहितो,

‘हे लोक ओठांनी माझा सन्मान करतात परंतु त्यांची
अंत:करणे माझ्यापासून दूर आहेत,

---

**दीनार** मजुराच्या एका दिवसाची मजुरी.

7ते व्यर्थ माझी उपासना करतात कारण ते लोकांना
शास्त्र म्हणून जे शिकवितात ते मनुष्यांनी केलेले नियम
असतात.’ *यशया 29:13*

8तुम्ही देवाच्या आज्ञा पाळत नाही, तर आता तुम्ही मनुष्यांची
शिकवण पाळता आहात.”
9आणखी तो त्यांना म्हणाला, “आपल्या स्वत:च्या रूढी
प्रस्थापित करण्यासाठी देवाच्या आज्ञा दूर करण्यात तुम्ही
पटाईत आहात. 10मोशे म्हणाला, “तू आपल्या
आईवडिलांचा सन्मान कर.”* जो मनुष्य आपल्या
वडिलांबद्दल किंवा आईबद्दल वाईट बोलतो, त्याला ठार
मारलेच पाहिजे.* 11परंतु तुम्ही शिकविता, एखादा मनुष्य
आपल्या आईला व वडिलांना असे म्हणू शकतो की,
‘तुम्हांला मदत करण्यासाठी माझ्याकडे थोडेफार आहे.
परंतु तुम्हांला मदत करण्यासाठी मी ते वापरणार नाही.
मी ते देवाला देईन,’

12तुम्ही त्याला त्याच्या वडिलांसाठी किंवा आईसाठी
काही करू देत नाही. 13तुम्ही अशा रूढी पाळण्याचे
शिकवून रूढींनी देवाचे वचन रद्द करता आणि तुम्ही
अशा प्रकारच्या अनेक गोष्टी करता.
14येशूने लोकांना आपल्याकडे पुन्हा बोलावून म्हटले,
“प्रत्येकाने माझे ऐका व हे समजून घ्या. 15बाहेरून
मनुष्याच्या आत जाऊन त्याला अपवित्र करील असे काही
नाही. ज्या कुणाला ऐकायला कान आहेत तो ऐको.”
16*

17लोकसमुदायाला सोडून येशू घरात गेला तेव्हा शिष्यांनी
त्याला या दाखल्याविषयी विचारले, 18तो त्यांना म्हणाला,
“तुम्हांलादेखील हे समजत नाही काय?” जे बाहेरून
मनुष्याच्या आत जाते ते त्याला अपवित्र करीत नाही हे
तुम्हांला समजत नाही का? 19कारण ते त्याच्या
अंत:करणात जात नाही तर त्याच्या पोटात जाते. नंतर ते
शरीराबाहेर जाते. असे सांगून सर्व अन्न त्याने शुद्ध घोषित
केले.
20आणखी तो म्हणाला, “जे माणसाच्या आतून बाहेर
पडते ते माणसाला अपवित्र करते. कारण आतून म्हणजे
अंत:करणातून वाईट विचार बाहेर पडतात. 21जारकर्म,
चोरी, खून, 22व्यभिचार, लोभ, वाईटपणा, कपट,
असभ्यता, मत्सर, शिव्यागाळी, अहंकार आणि मूर्खपणा,
23या सर्व वाईट गोष्टी आतून बाहेर पडतात आणि माणसाला
अपवित्र करतात.”

## यहूदी नसलेल्या स्त्रीला येशू मदत करतो
***(मत्तय 15:21-28)***

24येशू त्या ठिकाणाहून निघाला आणि सोर प्रांताच्या
आसपासच्या प्रदेशात गेला. तो एका घरात गेला व हे
कोणाला कळू नये अशी त्याची इच्छा होती. परंतु तो
त्याची उपस्थिती लपवू शकला नाही. एका स्त्रीने ऐकले
की येशू तेथे आहे. तिच्या मुलीला अशुद्ध आत्मा लागलेला
होता. 25ती स्त्री आली व येशूच्या पाया पडली. 26ती स्त्री
ग्रीक होती व सिरीयातील फिनीशिया येथे जन्मली होती.
तिने येशूला आपल्या मुलीतून भूत काढण्याची विनंति
केली. 27येशू तिला म्हणाला, “प्रथम मुलांना तृप्त होऊ दे
कारण मुलांची भाकरी घेऊन कुत्र्याला टाकणे योग्य
नव्हे.
28परंतु ती त्याला म्हणाली, “प्रभू, कुत्रीसुद्धा मुलांच्या
हातून मेजाखाली पडलेला चुरा खातात.”
29येशू त्या स्त्रीला म्हणाला, “तुझ्या या उत्तरामुळे तू
शांतीने घरी जा. तुझ्या मुलीतून भूत निघून गेले आहे.”
30मग ती घरी आली आणि तिची मुलगी अंथरुणावर
पडली आहे व तिच्यातून भूत निघून गेले आहे, असे तिने
पाहिले.

## येशू एका बहिऱ्या मनुष्याला बरे करतो

31येशू सोरभोवतालच्या प्रदेशातून परतला आणि
सिदोनाहून दकापलीसच्या वाटेने गालील समुद्राकडे आला.
32तेथे काही लोकांनी एका बहिऱ्या तोतऱ्या मनुष्याला
येशूकडे आणले व आपण त्याच्यावर हात ठेवा अशी
विनंति केली. 33येशूने त्याला लोकांपासून एका बाजूस
घेऊन त्याच्या कानात आपली बोटे घातली. नंतर तो
थुंकला आणि त्या माणसाच्या जिभेला स्पर्श केला. 34त्याने
स्वर्गाकडे पाहून मोठा उसासा टाकला व म्हणाला,
“एप्फात्था” म्हणजे मोकळा हो. 35आणि त्याच क्षणी त्याचे
कान मोकळे झाले. त्याला बोलता येऊ लागले. त्याने
कोणाला सांगू नका अशी आज्ञा केली.
36येशू नेहमी अशा गोष्टी न सांगण्याविषयी लोकांना
सूचना देऊ लागला, (पण लोक त्याविषयी अधिकाअधिक
सांगत गेले.) 37ते लोक फारच आश्चर्यचकित झाले व
म्हणाले, “त्याने सर्व काही चांगले केले आहे. तो बहिऱ्यांना
ऐकण्यास आणि मुक्यांना बोलावयास लावतो.”

## येशू चार हजारांपेक्षा अधिक लोकांना जेवू घालतो
***(मत्तय 15:32-39)***

8 त्या दिवसात आणखी एका वेळी लोकांचा मोठा
समुदाय जमला. त्यांच्याजवळ खावयास काही नव्हते.
येशूने आपल्या शिष्यांस बोलाविले आणि त्यांना म्हणाला,
2“मला या लोकांचा कळवळा येतो कारण तीन दिवसांपासून
ते माझ्याबरोबर आहेत आणि त्यांच्याजवळ खावयास काही
नाही. 3मी जर त्यांना उपाशी घरी पाठविले तर ते रस्त्यातच

---

**तू आपल्या ... कर** निर्गम. 20:12; अनुवाद 5:16.

**जो मनुष्य ... पाहिजे** निर्गम. 21:17

**वचन 16** काही ग्रीक प्रतींत 16 वे वचन आहे. “ज्याला कान आहेत तो ऐको!”

शुद्ध हरपून पडतील. त्यांच्यातील काही फार दुरून आले
आहेत.”
4त्याच्या शिष्यांनी उत्तर दिले, “या निर्जन जागी एवढ्या
लोकांना पुरतील इतक्या भाकरी कोण मिळवू शकेल
काय?”
5येशूने त्यांना विचारले, “तुमच्याजवळ किती भाकरी
आहेत? शिष्य म्हणाले, “आमच्याकडे सात भाकरी आहेत.”
6नंतर त्याने लोकांना जमिनीवर बसण्याची आज्ञा केली.
त्याने सात भाकरी घेतल्या, आभार मानले व त्या मोडल्या
व आपल्या शिष्यांजवळ त्या वाढण्यास दिल्या. नंतर त्यांनी
त्या लोकांना वाढल्या. 7त्यांच्याजवळ थोडे लहान मासे
होते मग त्याने त्यावर आभार मानले व त्यांना तेही
वाढावयास दिले. 8लोक जेऊन तृप्त झाले. उरलेल्या
तुकड्यांच्या सात टोपल्या त्यांनी भरल्या. 9तेथे सुमारे चार
हजार पुरुष होते. नंतर त्याने त्यांना घरी पाठवले. 10आणि
लगेच तो आपल्या शिष्यांसह नावेत बसला व दल्मनुथा
प्रांतात आला.

## परूशी येशूची परीक्षा पाहण्याचा प्रयत्न करतात
***(मत्तय 16:1-4)***

11मग परूशी आले व त्याला प्रश्न विचारू लागले.
त्याची परीक्षा पाहावी म्हणून त्यांनी त्याला स्वर्गातून चिन्ह
मागितले. 12आपल्या आत्म्यात दीर्घ उसासा टाकून तो
म्हणाला, “ही पिढी चिन्ह का मागते? मी तुम्हांस सांगतो
की, या पिढीला चिन्ह दिले जाणार नाही.” 13नंतर त्याने
त्यांना सोडले व तो नावेत जाऊन बसला व सरोवराच्या
पलीकडच्या बाजूस गेला.

## येशू यहूदी पुढाऱ्यांविरुद्ध इशारा देतो
***(मत्तय 16:5-12)***

14शिष्य भाकरी आणण्याचे विसरले होते. एका
भाकरीशिवाय त्यांच्याकडे काही नव्हते. 15येशूने त्यांना
निक्षून सांगितले, “सांभाळा, परूश्यांचे खमीर व हेरोदाचे
खमीर यापासून सावध राहा.”
16मग ते आपसात चर्चा करू लागले की, “आपल्याजवळ
भाकरी नाहीत म्हणून तसे बोलला की काय?”
17ते काय बोलतात हे ओळखून येशू त्यास म्हणाला,
“आपणाजवळ भाकरी नाहीत याविषयी चर्चा का करता?
अजून तुमच्या लक्षात आले नाही काय व तुम्हांला समजत
नाही काय? तुमचे अंत:करण कठीण झाले आहे काय?
18तुमचे डोळे आंधळे आहेत काय? तुमचे कान बहिरे
आहेत काय? आपल्याकडे पुरेशा भाकरी नसताना मी
काय केले हे तुम्हांला आठवत नाही काय? 19पाच
हजारांसाठी मी पाच भाकरी मोडल्या तेव्हा जे खाल्ले गेले
नाही अशा भाकरींच्या किती टोपल्या तुम्ही गोळा केल्या
ते आठवा. शिष्यांनी उत्तर दिले, “बारा टोपल्या.”
20चार हजारांसाठी मी सात भाकरी मोडल्या, तेव्हा
तुम्ही तुकड्यांच्या किती टोपल्या गोळा केल्या? शिष्यांनी
उत्तर दिले, “सात टोपल्या.” 21मग येशू त्यांना म्हणाला,
“अजूनही तुम्हांला समजत नाही काय?”

## येशू बेथसैदा येथील आंधळ्याला बरे करतो

22ते बेथसैदा येथे आले आणि काही जणांनी त्याच्याकडे
एका आंधळ्याला आणले व येशूने त्याला स्पर्श करावा
अशी विनंति केली. 23मग त्याने आंधळ्याचा हात धरून
त्याला गावाबाहेर नेले. मग येशू त्या आंधळ्याच्या डोळ्यात
थुंकला व त्याच्यावर हात ठेवून त्याने विचारले, “तुला
काही दिसते काय?”
24त्याने वर पाहिले आणि म्हणाला, “मला माणसे दिसतात
व सभोवताली झाडे चालत असल्यासारखी दिसतात.”
25नंतर येशूने पुन्हा आपले हात त्या माणसाच्या डोळ्यावर
ठेवले. त्याने डोळे उघडले तेव्हा त्याला दृष्टी आली,
त्याला सर्व काही स्पष्ट दिसु लागले 26येशूने त्याला, “त्या
गावात पाऊलदेखील टाकू नको” असे सांगून घरी पाठवून
दिले.

## पेत्र म्हणतो की येशू हा ख्रिस्त आहे
***(मत्तय 16:13-20; लूक 9:18-21)***

27मग येशू व त्याचे शिष्य फिलीप्पै कैसरीयाच्या
आसपासच्या खेड्यात गेले. वाटेत त्याने त्याच्या शिष्यांस
विचारले, “लोक मला कोण म्हणून ओळखतात?”
28त्यांनी त्याला उत्तर दिले, “काही जण म्हणतात, तुम्ही
बाप्तिस्मा करणारा योहान आहात तर इतर काही एलीया
समजतात, तर दुसरे काही तुम्ही संदेष्ट्यांपैकी एक आहा
असे म्हणतात.”
29मग येशूने त्यांना विचारले, “तुम्हांला मी कोण आहे
असे वाटते?”
पेत्राने उत्तर दिले, “तू ख्रिस्त आहेस.”
30येशू शिष्यांना म्हणाला, “मी कोण आहे हे कोणालाही
सांगू नका.”
31तो त्यांना शिकवू लागला, “मनुष्याच्या पुत्राने पुष्कळ
दु:ख भोगावे. वडील, मुख्य याजक, नियमशास्त्राचे शिक्षक
यांजकडून नाकारले जावे, त्याला जिवे मारले जावे व
तिसऱ्या दिवशी त्याने पुन्हा उठावे हे होणे अगत्याचे आहे.
32त्याने हे स्पष्टपणे सांगितले तेव्हा पेत्राने येशूला बाजूला
घेतले व तो त्याला दटावू लागला. 33परंतु येशूने वळून
आपल्या शिष्यांकडे पाहिले व पेत्राला धमकावून म्हटले,
“अरे सैताना माझ्यापुढून निघून जा. देवाच्या गोष्टीविषयी
तुला काही वाटत नाही. तुझे लक्ष देवाच्या गोष्टीकडे
लागलेले नाही, तर फक्त मानवाच्या दृष्टिकोणातून
महत्त्वाच्या असणाऱ्या गोष्टीकडे आहे.”
34नंतर त्याने आपल्या शिष्यांसह लोकांना बोलाविले
व त्यांना म्हणाला, “जर कोणाला माझ्या मागे यायचे आहे

तर त्याने आत्मत्याग करावा. आपला वधस्तंभ घ्यावा व
मला अनुसरावे. 35जो कोणी आपला जीव वाचवू पाहतो
तो जिवाला मुकेल व जो कोणी माझ्यासाठी व सुवार्तेसाठी
जिवाला मुकेल तो आपला जीव वाचवील. 36मनुष्याने
सर्व जग मिळविले व जिवाचा नाश करून घेतला तर
त्याला काय लाभ? 37जिवाच्या मोबदल्यात मनुष्य काय
देऊ शकेल? 38या व्यभिचारी आणि पापी पिढीत जो
कोणी माझी व माझ्या वचनांची लाज धरतो तर मनुष्याचा
पुत्रही जेव्हा तो आपल्या पित्याच्या गौरवात पवित्र दूतांसह
येईल तेव्हा त्यांची लाज धरील."

9 येशू त्या लोकांना म्हणाला, "मी तुम्हांला खरे सांगतो
की, येथे उभे असलेले काही असे आहेत की.
ज्यांना देवाचे राज्य सामर्थ्यानिशी आलेले दिसेपर्यंत मरणाचा
अनुभव येणार नाही."

## मोशे व एलीयाबरोबर येशू

***(मत्तय 17:1-13; लूक 9:28-36)***

2सहा दिवसांनंतर येशूने पेत्र, याकोब आणि योहान
यांना आपल्याबरोबर एका उंच डोंगरावर नेले आणि तेथे
त्यांच्यासमोर त्याचे रूपांतर झाले. 3त्याची वस्त्रे चमकदार,
अत्यंत पांढरी शुभ्र, इतकी की तशी पृथ्वीवरील कोणत्याही
परिटालाशुभ्र करता येणार नाहीत, अशी होती. 4एलीया
व मोशे त्याच्याबरोबर प्रगट झाले, ते येशूबरोबर संभाषण
करीत होते. 5पेत्र येशूला म्हणाला, "गुरुजी, आपण येथे
आहोत हे चांगले आहे. आपण तीन मंडप बनवू. एक
आपणांसाठी, एक मोशेसाठी व एक एलीयासाठी." 6पेत्र
असे बोलला कारण काय बोलावे ते त्याला समजेना
कारण ते भयभीत झाले होते.

7मग एक मेघ आला आणि त्याने त्यांच्यावर छाया
केली. मेघातून एक वाणी झाली, "हा माझा प्रिय पुत्र आहे
याचे तुम्ही ऐका."

8आणि एकाएकी त्यांनी एकदम सभोवती पाहिले तेव्हा
त्यांना येशूशिवाय कोणीही दिसले नाही.

9ते डोंगरावरून खाली येत असता येशूने त्यांना आज्ञा
केली की, तुम्ही जे पाहिले आहे ते मनुष्याचा पुत्र मेलेल्यातून
उठेपर्यंत कोणालाही सांगू नका."

10म्हणून त्यांनी ही गोष्ट त्यांच्यातच ठेवली. परंतु ते
मेलेल्यांतून उठणे' याचा अर्थ काय याविषयी आपसात
चर्चा करीत होते. 11त्यांनी येशूला विचारले, "प्रथम एलीया
आला पाहिजे असे नियमशास्त्राचे शिक्षक का म्हणतात?"

12तो त्यांना म्हणाला, "होय, एलीया सर्व गोष्टी
व्यवस्थितपणे करण्यासाठी आला पाहिजे. परंतु मनुष्याच्या
पुत्राविषयी त्याने पुष्कळ दुःखे सोसावीत व नाकारले जावे
असे पवित्र शास्त्रात का लिहिले आहे? 13मी तुम्हांला
सांगतो, एलीया आधीच आला आहे आणि जसे त्याच्याविषयी
लिहिले आहे तसे, त्यांनी त्यांना पाहिजे तसे त्याचे केले."

## येशू एका आजारी मुलाला बरे करतो

***(मत्तय 17:14-20; लूक 9:37-43)***

14नंतर ते उरलेल्या शिष्यांजवळ आले, तेव्हा त्यांना
त्यांच्याभोवती मोठा लोकसमुदाय दिसला आणि
नियमशास्त्राचे शिक्षक त्यांच्याशी वाद घालीत होते. 15सर्व
लोक येशूला पाहताच आश्चर्यचकित झाले आणि ते त्याला
वंदन करण्यासाठी धावले. 16येशूने त्यांना विचारले, "तुम्ही
त्यांच्याशी कसला वाद घालीत आहात?"

17लोकांतील एकाने त्याला उत्तर दिले, "गुरुजी, मी
माझ्या मुलाला आपणकडे आणले. त्याला अशुद्ध आत्मा
लागला असून तो बोलू शकत नाही. 18आणि जेव्हा तो
त्याला धरतो तेव्हा त्याला खाली आपटतो व तोंडाला फेस
आणतो, दात चावतो व नंतर ताठ होतो. मी आपल्या
शिष्यांना त्याला काढावयास सांगितले परंतु ते काढू शकले
नाहीत."

19येशू त्यांना म्हणाला, "तुम्ही लोक विश्वास ठेवीत
नाही. मी तुमचे कोठवर सहन करू? मुलाला इकडे
आणा."

20नंतर त्यांनी मुलाला येशूकडे आणले आणि जेव्हा
त्या आत्म्याने येशूकडे पाहिले तेव्हा लगेच त्या मुलाला
पिळवटून टाकले. तो जमिनीवर पडला आणि तोंडाला
फेस आला आणि तो लोळू लागला.

21नंतर येशूने त्याच्या वडिलांना विचारले, "किती काळ
हा असा आहे?"

वडिलांनी उत्तर दिले, "बाळपणापासून हा असा आहे.
22पुष्कळदा ठार करण्यासाठी तो त्याला अग्नीत किंवा
पाण्यात टाकीत असे. परंतु आपण काही करत
असाल तर आम्हांवर दया करा, आणि आम्हांला मदत
करा."

23येशू त्याला म्हणाला, "तू म्हणालास तुम्हांला काही
तरी करणे शक्य असेल तर, परंतु जो विश्वास ठेवतो त्या
मनुष्याला सर्व काही शक्य असते."

24तेव्हा लागलेच मुलाचे वडील मोठ्याने ओरडून
म्हणाले, "मी विश्वास धरतो, माझा अविश्वास घालवण्यास
मदत करा."

25येशूने लोकसमुदाय त्याच्याकडे धावत येत आहे असे
पाहिले तेव्हा येशू त्या अशुद्ध आत्म्याला धमकावून
म्हणाला, "अरे याला मुके बहिरे करणाऱ्या आत्म्या मी
तुला आज्ञा करतो की, याच्यातून बाहेर नीघ आणि पुन्हा
कधीही याच्यात शिरू नको."

26नंतर तो अशुद्ध आत्मा किंचाळला व मुलाला अगदी
पिळवटून बाहेर निघाला. मुलगा मृतासारखा झाला आणि
लोकांना वाटले, तो मेला. 27परंतु येशूने त्याला हातास
धरून त्याच्या पायावर उभे केले. आणि मुलगा उभा
राहिला. 28नंतर येशू घरात गेल्यावर त्याच्या शिष्यांनी
त्याला एकांतात विचारले, "आम्ही तो अशुद्ध आत्मा का
काढू शकलो नाही?"

29येशू त्यांना म्हणाला, "ही असली भुते प्रार्थनेशिवाय व उपासावाचून दुसऱ्या कशाने निघणे शक्य नाही."

## येशू स्वतःच्या मरणाविषयी सांगतो
***(मत्तय 17:22-23; लूक 9:43-45)***

30ते तेथून निघाले आणि गालीलातून प्रवास करीत गेले. ते कोठे आहेत हे कोणालाही कळू नये अशी येशूची इच्छा होती. 31कारण तो आपल्या शिष्यांस शिकवीत होता. तो त्यांना म्हणाला, "मनुष्याचा पुत्र विश्वासघाताने धरून माणसांच्या हाती दिला जाणार आहे. ते त्याला ठार मारतील. परंतु मारला गेल्यानंतर तो तिसऱ्या दिवशी उठेल."

32पण या बोलण्याचा अर्थ त्यांना समजला नाही. आणि त्याविषयी त्याला विचारण्यास ते भीत होते.

## सर्वांत मोठा कोण हे येशू सांगतो
***(मत्तय 18:1-5; लूक 9:46-48)***

33येशू व त्याचे शिष्य कफर्णहूमास आले. येशू घरात असता त्याने त्यांना विचारले, "वाटेत तुम्ही कशाविषयी चर्चा करीत होता?" 34परंतु ते गप्प राहिले कारण वाटेत त्यांनी सर्वांत मोठा कोण याविषयी चर्चा केली होती.

35मग येशू खाली बसला, त्याने बारा जणांना बोलावून त्यांना म्हटले, "जर कोणाला पहिले व्हावयाचे असेल तर त्याने शेवटले झाले पाहिजे आणि सर्वांचा सेवक झाले पाहिजे."

36येशू एका बालकाला घेऊन त्यांच्यापुढे उभा राहिला. येशूने त्या बालकाच्या हातास धरले व बालकास उचलून घेऊन त्यांना म्हणाला, 37"जो कोणी ह्यासारख्या लहान बालकाला माझ्या नावाने स्वीकारतो तो मला स्वीकारतो आणि जो कोणी मला स्वीकारतो तो केवळ माझाच स्वीकार करतो असे नाही तर ज्याने मला पाठविले त्याचाही स्वीकार करतो.

## कोणीही मनुष्य जो आपणाविरुद्ध नाही तो आपल्या बाजूचा आहे
***(लूक 9:49-50)***

38योहान येशूला म्हणाला, "गुरुजी, आम्ही एकाला आपल्या नावाने भुते काढताना पाहिले आणि आम्ही त्याला थांबविण्याचा प्रयत्न केला कारण तो आपल्यापैकी नव्हता."

39परंतु येशू म्हणाला, "त्याला मना करू नका, कारण जो कोणी माझ्या नावाने चमत्कार करतो तो नंतर माझ्याविषयी वाईट बोलू शकणार नाही. 40जो आपल्याविरुद्ध नाही तो आपल्याला अनुकूल आहे. 41मी तुम्हांला खरे सांगतो, ख्रिस्ताचे म्हणून तुम्हांला जो कोणी एक प्याला पाणी देईल तो नक्कीच आपल्या प्रतिफळाला मुकणार नाही. 42माझ्यावर विश्वास ठेवणाऱ्या या लहानातील एकाला देवापासून परावृत्त करील, त्याच्या गळ्यात जात्याची तळी बांधून त्याला समुद्रात फेकून देणे हे त्याच्यासाठी बरे आहे. 43जर तुझा उजवा हात तुला पाप करायला प्रवृत्त करतो तर तो तोडून टाक. दोन हात असून नरकात न विझणाऱ्या अग्नीत जाण्यापेक्षा व्यंग असून जीवनात जाणे बरे. 44* 45आणि जर तुझा पाय तुला पाप करावयास लावतो तर तो काढून टाक. दोन पाय असून नरकात फेकले जावे यापेक्षा लंगडे होऊन जीवनात गेलेले बरे. 46* 41–48जर तुझा उजवा डोळा तुला पाप करावयास लावितो तर तो काढून टाक. दोन डोळे असून जेथे त्यांना खाणारे किडे मरत नाहीत आणि अग्नि विझत नाही अशा नरकात फेकले जावे यापेक्षा एक डोळा असून देवाच्या राज्यात जाणे हे बरे. 49कारण प्रत्येकाची अग्नीने परीक्षा घेतली जाईल.

50"मीठ चांगले आहे. जर मिठाने त्याचा खारटपणा घालविला तर ते पुन्हा कसे खारट कराल. तुम्ही आपणामध्ये मीठ असू द्या आणि एकमेकांबरोबर शांतीने राहा."

## येशू घटस्फोटाविषयी शिकवितो
***(मत्तय 19:1-12)***

10 नंतर येशूने ती जागा सोडली आणि यहूदीया प्रांतात व यार्देन ओलांडून पलीकडे गेला. लोक पुन्हा गटागटाने त्याच्याकडे आले. आणि जसा त्याचा परिपाठ होता तसे त्याने त्यांना शिकविले.

2काही परूशी येशूकडे आले. त्यांनी त्याला विचारले, "आपल्या पत्नीला घटस्फोट द्यावा हे मनुष्यासाठी कायदेशीर आहे काय?" हे तर त्यांनी त्याची परीक्षा पाहण्यासाठी विचारले. 3येशूने त्यांना उत्तर दिले, "मोशेने तुम्हांला काय आज्ञा दिली आहे?" 4ते म्हणाले, "मोशेने पुरुषाला सूटपत्र लिहिण्याची व असे करून आपल्या बायकोला सोडण्याची परवानगी दिली आहे."

5येशू म्हणाला, "कारण केवळ तुमच्या हट्टामुळे मोशेने तुमच्यासाठी ही पर्यायी अनुमति दिली (लिहिली) आहे. 6परंतु उत्पत्तीच्या आरंभापासून देवाने त्यांना पुरुष व स्त्री असे निर्माण केले.* 7या कारणामुळे पुरुष आपल्या आईवडिलांना सोडील व आपल्या पत्नीशी जडून राहील. 8आणि ती दोघे एकदेह होतील.* म्हणून यापुढे ती दोन नाहीत तर एकदेह आहेत. 9यासाठी देवाने जे जोडले आहे ते मनुष्याने वेगळे करू नये." 10नंतर, येशू व शिष्य घरात असता शिष्यांनी या गोष्टीविषयी त्याला विचारले,

---

**वचन 44** काही ग्रीक प्रतीमध्ये वचन 44 जोडतात जे वचन 48 सारखेच आहे.

**वचन 46** काही ग्रीक प्रतीमध्ये वचन 46 जोडतात जे वचन 48 सारखेच आहे.

**उत्पत्तीच्या ... केले** उत्पत्ति 1:27

**या कारणामूळे ... होतील** उत्पत्ति 2:24

11येशू त्यांना म्हणाला, “जो कोणी आपली पत्नी टाकतो
व दुसरीबरोबर लग्न करतो तो आपल्या पत्नीविरुद्ध
व्यभिचार करतो. 12आणि जर पत्नी आपल्या नवऱ्याला
सोडते आणि दुसऱ्याबरोबर लग्न करते तर तीही व्यभिचार
करते.”

## येशू मुलांचा स्वीकार करतो
***(मत्तय 19:13-15; लूक 18:15-17)***

13त्याने त्यांना स्पर्श करावा, यासाठी लोक लहान
बालकांना त्याच्याकडे आणीत होते. परंतु शिष्यांनी त्यांना
दटावले 14येशूने हे पाहिले तेव्हा तो रागावला आणि
त्यांना म्हणाला, “लहान बालकांना माझ्याकडे येऊ द्या.
त्यांना मना करू नका कारण देवाचे राज्य
यांच्यासारख्यांचेच आहे. 15मी तुम्हांस खरे सांगतो, जो
कोणी बालकासारखा देवाच्या राज्याचा स्वीकार करणार
नाही त्याचा तेथे कधीही प्रवेश होणार नाही.” 16तेव्हा
त्याने बालकांना उचलून जवळ घेतले. आपले हात
त्यांच्यावर ठेवले आणि आशीर्वाद दिला.

## श्रीमंत मनुष्य अनुसरण्याचे नाकारतो
***(मत्तय 19:16-30; लूक 18:18-30)***

17येशू प्रवासाला निघाला असता एक मनुष्य त्याच्याकडे
धावत आला आणि त्याच्यापुडे गुडघे टेकून म्हणाला,
“उत्तम गुरूजी, अनंतकाळचे जीवन मिळण्यासाठी मी काय
करावे?”

18येशू त्याला म्हणाला, “तू मला उत्तम का म्हणतोस?
एका देवाशिवाय कोणी उत्तम नाही. 19तुला आज्ञा माहीत
आहेतच : खून करू नको, व्यभिचार करू नको, चोरी
करू नको, खोटी साक्ष देऊ नको, फसवू नको, आपल्या
वडिलांचा व आपल्या आईचा सन्मान कर.”

20तो मनुष्य म्हणाला, “गुरूजी, मी तरुणपणापासून या
आज्ञा पाळत आलो आहे.”

21येशूने त्याच्याकडे पाहिले त्याला त्याच्याविषयी प्रेम
वाटले. तो त्याला म्हणाला, “तुझ्यामध्ये एका गोष्टीची
उणीव आहे. जा, तुझ्याजवळ जे सर्व आहे ते वीक. नंतर
ते गोरगरिबांस वाटून टाक. स्वर्गात तुला संपत्ती प्राप्त
होईल. तर मग चल आणि माझ्या मागे ये.”

22हे शब्द ऐकून तो मनुष्य खूप निराश झाला व खिन्न
होऊन निघून गेला कारण त्याच्याजवळ खूप संपत्ति होती.
23येशूने सभोवताली पाहिले व तो आपल्या शिष्यांना
म्हणाला, “ज्याच्याजवळ संपत्ति आहे त्याचा देवाच्या राज्यात
(श्रीमंतांचा) प्रवेश होणे किती कठीण आहे!”

24त्याचे शब्द ऐकून शिष्य थक्क झाले, परंतु येशू त्यास
म्हणाला, “माझ्या मुलांनो, देवाच्या राज्यात श्रीमंताचा प्रवेश
होणे किती कठीण आहे! 25श्रीमंतांचा देवाच्या राज्यात
प्रवेश होणे यापेक्षा उंटाला सुईच्या नेढयातून जाणे सोपे
आहे.” 26ते यापेक्षाही अधिक आश्चर्यचकित झाले आणि
एकमेकाला म्हणाले, “तर मग कोणाचे तारण होणे शक्य
आहे?”

27त्यांच्याकडे पाहून येशू म्हणाला, “मनुष्यांना हे अशक्य
आहे पण देवाला अशक्य नाही. कारण सर्व गोष्टी देवाला
शक्य आहेत.”

28पेत्र त्याला म्हणू लागला, “पाहा, आम्ही सर्व सोडले
आणि आपल्या मागे आलो आहोत.”

29येशू म्हणाला, “मी तुम्हांला खरे सांगतो की, ज्या
कोणी माझ्यासाठी व सुवार्तेसाठी आपले घर, भाऊ, बहिणी,
आईवडील, मुले किंवा शेतीवाडी सोडली, त्याचा छळ
झाला तरी 30त्याला शंभरपटीने फायदा मिळेल आणि
येणाऱ्या युगात त्याला अनंतकाळचे जीवन मिळाल्याशिवाय
राहणार नाही.” 31परंतु ज्यांना सध्या मोठे स्थान आहे
भविष्यात त्यांना खालचे स्थान मिळेल व ज्यांना खालचे
स्थान आहे त्यांना मोठे स्थान मिळेल.”

## येशू पुन्हा आपल्या मरणाविषयी सांगतो
***(मत्तय 20:17-19; लूक 18:31-34)***

32ते वर यरुशलेमेच्या रस्त्यावरून जात असता येशू
त्यांच्यापुढे चालत होता. त्याचे शिष्य विस्मित झाले होते
आणि त्यांच्यामागून येणारे घाबरले होते. नंतर येशूने त्या
बारा शिष्यांना पुन्हा एका बाजूला घेतले आणि स्वत:च्या
बाबतीत काय घडणार आहे हे त्यांना सांगू लागला. 33“ऐका!
आपण वर यरुशलेमेस जात आहोत आणि मनुष्याचा पुत्र
विश्वासघाताने धरून मुख्य याजक आणि नियमशास्त्राचे
शिक्षक यांच्या हाती दिला जाईल. ते त्याला मरणाची
शिक्षा देतील आणि ते त्याला यहूदीतर लोकांच्या हाती
देतील. 34ते त्याची थट्टा करतील, त्याच्यावर थुंकतील,
त्याला फटके मारतील, ठार करतील आणि तीन दिवसांनी
तो पुन्हा उठेल.”

## याकोब व योहान येशूला मदतीसाठी विचारतात
***(मत्तय 20:20-28)***

35याकोब व योहान हे जब्दीचे मुलगे त्याच्याकडे आले.
आणि त्याला म्हणाले, “गुरूजी, आम्ही आपणांजवळ जे
मागू ते आपण आमच्यासाठी करावे अशी आमची इच्छा
आहे.”

36येशू त्यांना म्हणाला, “मी तुमच्यासाठी काय करावे
अशी तुमची इच्छा आहे?”

37ते म्हणाले, “आपल्या वैभवात आमच्यापैकी एकाला
तुमच्या उजवीकडे व दुसऱ्याला डावीकडे बसण्याचा
अधिकार द्यावा.”

38येशू त्यांना म्हणाला, “तुम्ही काय मागत आहात हे
तुम्हांस कळत नाही. मी जो प्याला पिणार आहे, तो तुमच्याने
पिणे शक्य आहे काय? किंवा मी जो बाप्तिस्मा घेणार
आहे तो तुमच्याने घेणे शक्य आहे काय?

[39]ते त्याला म्हणाले, "आम्हांस शक्य आहे."

मग येशू त्यांना म्हणाला, "मी जो प्याला पिणार आहे तो तुम्ही प्याल आणि जो बाप्तिस्मा घेईन तो तुम्ही घ्याल, [40]परंतु माझ्या उजवीकडे किंवा डावीकडे बसू देणे माझ्या हाती नाही. ज्यांच्यासाठी त्या जागा तयार केल्या आहेत, त्यांच्यासाठीच त्या राखून ठेवल्या आहेत."

[41]दहा शिष्यांनी या विनंतिविषयी ऐकले तेव्हा ते याकोब व योहानावर फार रागावले. [42]येशूने त्यांना जवळ बोलाविले आणि म्हटले, "तुम्हांस माहीत आहे की, परराष्ट्रीयांचे जे सत्ताधारी आहेत ते त्यांच्यावर स्वामित्व गाजवितात आणि त्यांचे पुढारी त्यांच्यावर अधिकार गाजवितात. [43]परंतु तुमच्याबाबतीत तसे नाही. तुमच्यातील जो कोणी मोठा होऊ पाहतो त्याने तुमचा सेवक झाले पाहिजे. [44]आणि जो कोणी पहिला होऊ इच्छितो त्याने सर्वांचा सेवक झाले पाहिजे. [45]कारण मनुष्याचा पुत्रही सेवा करून घ्यावयास नाही तर तो सेवा करावयास आला आहे. व अनेकांसाठी आपले जीवन खंडणी म्हणून देण्यासाठी आला आहे."

## येशू आंधळ्याला बरे करतो
### *(मत्तय 20:29-34; लूक 18:35-43)*

[46]मग ते यरीहोस आले. येशू आपले शिष्य व लोकसमुदायासह यरीहो सोडून जात असता तिमयाचा मुलगा बार्तीमय हा एक आंधळा भिकारी रस्त्याच्या कडेला बसला होता. [47]जेव्हा त्याने ऐकले की, नासरेथचा येशू जात आहे तेव्हा तो मोठ्याने ओरडून म्हणून लागला, "येशू, दाविदाचे पुत्र माझ्यावर दया करा."

[48]तेव्हा त्याने गप्प बसावे म्हणून अनेकांनी त्याला दटावले. पण तो अधिक मोठ्याने ओरडून म्हणू लागला. "येशू दाविदाचे पुत्र मजवर दया करा."

[49]मग येशू थांबला आणि म्हणाला, "त्याला बोलवा. तेव्हा त्यांनी आंधळ्या मनुष्याला बोलाविले आणि म्हटले, "धीर धर, येशू तुला बोलावीत आहे." [50]त्या आंधळ्याने आपला झगा टाकला, उडी मारली व तो येशूकडे आला.

[51]येशू त्याला म्हणाला, "मी तुझ्यासाठी काय करावे अशी तुझी इच्छा आहे?" आंधळा मनुष्य त्याला म्हणाला, "गुरूजी मला पुन्हा दृष्टी प्राप्त व्हावी." [52]मग येशू त्याला म्हणाला, "जा! तू विश्वास ठेवलास म्हणून तू बरा झाला आहेस." लगेच तो पाहू शकला (त्याला दृष्टी आली) आणि रस्त्याने तो येशूच्या मागे चालू लागला.

## येशू यरुशलेमेत राजासारखा प्रवेश करतो
### *(मत्तय 21:1-11; लूक 19:28-40; योहान 12:12-19)*

11 जेव्हा ते यरुशलेमजवळ जैतुनाच्या डोंगराजवळ बेथानी गावाजवळ आले तेव्हा येशूने आपल्या दोन शिष्यास असे सांगून पाठविले की, [2]"तुम्ही जे गाव पुढे दिसते त्या गावात जा. गावात जाताच, ज्याच्यावर कोणी बसले नाही असे शिंगरू बांधलेले आढळेल. ते सोडा व येथे आणा. [3]आणि जर कोणी तुम्हांला विचारले, 'तुम्ही हे का नेत आहात?' तर तुम्ही असे म्हणा, 'प्रभूला याची गरज आहे.' व तो ते लगेच परत येथे पाठवील."

[4]मग ते गेले आणि त्यांना रस्त्यावर, दाराजवळ एक शिंगरू बांधलेले दिसले. मग त्यांनी ते सोडले. [5]तेथे उभे असलेल्या लोकांपैकी काही जण त्यांना म्हणाले, "हे शिंगरू सोडून तुम्ही काय करीत आहात?" [6]त्यांनी येशू त्यांना काय म्हणाला ते सांगितले. तेव्हा त्या लोकांनी त्यास ते शिंगरू नेऊ दिले. [7]त्यांनी ते शिंगरू येशूकडे आणले. त्यांनी आपली वस्त्रे त्याच्यावर पांघरली व येशू त्यावर बसला. [8]पुष्कळ लोकांनी आपले झगे रस्त्यावर पसरले आणि इतरांनी शेतातून तोडलेल्या डहाळ्या पसरल्या. [9]पुढे चालणारे व मागून येणारे घोषणा देऊ लागले,

"होसान्ना, प्रभूच्या नावाने येणारा धन्यवादित असो.
*स्तोत्र. 118:25-26*

[10]आमचा पूर्वज दावीद याचे येणारे राज्य धन्यवादित असो. स्वर्गात होसान्ना"

[11]नंतर येशूने यरुशलेमात प्रवेश केल्यावर तो मंदिरात गेला व सभोवतालचे सर्व पाहिले. त्या सुमारास संध्याकाळ झाली होती म्हणून तो बेथानीस गेला व शिष्यांना आपल्याबरोबर नेले.

[12]दुसऱ्या दिवशी ते बेथानी सोडून जात असताना येशूला भूक लागली. [13]त्याने दूर असलेल्या व पानांनी भरलेल्या अंजिराच्या झाडाकडे पाहिले. त्यावर काही मिळेल या आशेने तो पाहावयास गेला पण तेथे त्याला पानांशिवाय काही आढळले नाही. कारण तो अंजिराचा हंगाम नव्हता. [14]नंतर तो त्याला म्हणाला, "यापुढे तुझे फळ कोणीही कधीही खाणार नाही." त्याच्या शिष्यांनी हे ऐकले.

## येशू मंदिरात जातो
### *(मत्तय 21:12-17; लूक 19:45-48; योहान 2:13-22)*

[15]नंतर ते यरुशलेमेत गेले आणि येशू मंदिरात गेला तेव्हा मंदिरात जे खरेदी विक्रीचा व्यवहार करीत होते त्यांना येशू बाहेर घालवू लागला. त्याने सराफांचे चौरंग व जे कबुतरे विकत होते त्यांची बाके उलथून टाकली. [16]येशूने मंदिरातून कोणालाही काहीही बाहेर नेऊ दिले नाही. [17]मग येशू शिकवू लागला. तो त्यांना म्हणाला, "माझ्या घराला सर्व राष्ट्रांचे प्रार्थनामंदिर म्हणतील, असे पवित्र शास्त्रात लिहिले नाही काय? परंतु तुम्ही त्याला चोरांची गुहा बनविली आहे."*

---

**माझ्या ... आहे** यिर्मया 7:11

[18]मुख्य याजकांनी आणि नियमशास्त्राच्या शिक्षकांनी
हे ऐकले आणि ते त्याला ठार मारण्याचा मार्ग शोधू
लागले. कारण सर्व लोक त्याच्या शिक्षणाने थक्क झाल्याने
ते त्याला भीत होते. [19]त्या रात्री येशू व त्याचे शिष्य
शहराबाहेर गेले.

## येशू विश्वासाचे सामर्थ्य दाखवितो
*(मत्तय 21:20-22)*

[20]सकाळी येशू आणि त्याचे शिष्य जात असता त्यांनी ते
अंजिराचे झाड मुळापासून वाळून गेलेले पाहिले. [21]पेत्राला
आठवण झाली. तो येशूला म्हणाला, "गुरूजी, पाहा! ज्या
अंजिराच्या झाडाला आपण शाप दिला ते वाळून गेले
आहे."

[22]येशूने उत्तर दिले, "देवावर विश्वास ठेवा. [23]मी तुम्हांस
खरे सांगतो की, जो कोणी या डोंगराला 'उपटून समुद्रात
टाकला जा' असे म्हणेल व तो आपल्या मनात शंका न
धरता, त्याच्या शब्दांप्रमाणे घडेल असा विश्वास धरील
तर त्याच्यासाठी तसेच घडेल. [24]या कारणास्तव मी तुम्हांस
सांगतो जे काही तुम्ही प्रार्थनेत मागाल ते मिळालेच आहे
असा विश्वास धरा आणि ते तुम्हांला मिळेल. [25]जेव्हा
तुम्ही प्रार्थना करीत उभे राहता तेव्हा तुमच्या मनात जर
कोणाच्या विरुद्ध काही असेल तर त्याची क्षमा करा
यासाठी की, तुमच्या स्वर्गातील पित्याने तुमच्या पापांची
क्षमा करावी. [26]परंतु तुम्ही जर क्षमा करणार नाही तर
तुमचा स्वर्गातील पिताही तुमच्या अपराधांची क्षमा करणार
नाही."

## यहूदी पुढारी येशूच्या अधिकाराविषयी संशय घेतात
*(मत्तय 21:23-27; लूक 20:1-8)*

[27]ते परत यरुशलेमेस आले. आणि येशू मंदिरात फिरत
असता मुख्य याजक, नियमशास्त्राचे शिक्षक आणि वडील
त्याच्याकडे आले. [28]आणि त्याला म्हणाले, "आपण
कोणत्या अधिकाराने या गोष्टी करता? त्या करण्याचा
अधिकार आपणांस कोणी दिला?"

[29]येशू त्यांना म्हणाला, "मीही तुम्हांला एक प्रश्न
विचारतो आणि जर तुम्ही मला त्याचे उत्तर दिले तर मी
या गोष्टी कोणत्या अधिकाराने करतो हे तुम्हांस सांगेन.
[30]योहानाचा बाप्तिस्मा स्वर्गातून होता की मनुष्यांपासून
होता? याचे उत्तर द्या."

[31]त्याविषयी त्यांनी आपसात चर्चा केली आणि म्हणू
लागले जर आपण तो स्वर्गापासून म्हणावे तर तो म्हणेल,
"मग त्यावर तुम्ही विश्वास का ठेवला नाही? [32]परंतु जर
आपण तो मनुष्यांपासून आहे असे म्हणावे तर लोक
आपणावर रागावतील." पुढाऱ्यांना लोकांची भीति वाटत
होती. कारण सर्व लोकांचा विश्वास होता की योहान
खरोखर संदेष्टा होता. [33]मग त्यांनी येशूला उत्तर दिले,
"आम्हांला माहीत नाही." तेव्हा येशू त्यांना म्हणाला, "मग
मीही या गोष्टी कोणत्या अधिकाराने करीत आहे हे
तुम्हांला सांगत नाही."

## देव त्याचा पुत्र पाठवितो
*(मत्तय 21:33-46; लूक 20:9-19)*

12 येशू त्यांना बोधकथा सांगून शिकवू लागला.
"एका मनुष्याने द्राक्षाचा मळा लावला व
त्याच्याभोवती कुंपण घातले. त्याने द्राक्षारसासाठी कुंड
खणले, आणि टेहळणीसाठी माळा बांधला. त्याने तो
शेतकऱ्यास खंडाने दिला व तो दूर प्रवासास गेला.
[2]हंगामाच्या योग्य वेळी शेतकऱ्याकडून द्राक्षमळ्यातील
फळांचा योग्य हिस्सा मिळावा म्हणून त्याने एका नोकरास
पाठविले. [3]परंतु त्यांनी नोकरास धरले, मारले आणि
रिकामे पाठवून दिले. [4]नंतर त्याने दुसऱ्या नोकरास
पाठविले. त्यांनी त्याचे डोके फोडले आणि त्याला
अपमानकारक रीतीने वागविले. [5]मग धन्याने आणखी
एका नोकराला पाठविले. त्यांनी त्याला जिवे मारले
त्याने इतर अनेकांना पाठविले. शेतकऱ्यांनी काहींना
हाणमार केली तर काहींना ठार मारले.

[6]धन्याजवळ पाठविण्यासाठी आता फक्त त्याचा प्रिय
मुलगा उरला होता. त्याने त्याला सर्वांत शेवटी पाठविले.
तो म्हणाला, "खात्रीने ते माझ्या मुलाला मान देतील." तो
त्याचा आवडता मुलगा होता, म्हणून शेवटी त्याने त्याला
त्या शेतकऱ्यांकडे पाठविले. [7]परंतु ते शेतकरी एकमेकांस
म्हणाले, "हा तर वारस आहे. चला, आपण याला जिवे
मारू म्हणजे वतन आपले होईल!"

[8]मग त्यांनी त्याला धरले, जिवे मारले, आणि
द्राक्षमळ्याबाहेर फेकून दिले.

[9]तर मग द्राक्षमळ्याचा धनी काय करील? तो येईल
आणि शेतकऱ्यांना जिवे मारील व द्राक्षमळा दुसऱ्यांना
देईल. [10]तुम्ही हा शास्त्रलेख वाचला नाही काय?

'जो दगड बांधणारांनी नाकारला तो कोनशिला झाला.
[11]हे प्रभूने केले. आणि ते आमच्यासाठी आश्चर्य
कारक आहे.' "

*स्तोत्र. 118:22-23*

[12]मग ते येशूला अटक करण्याचा मार्ग शोधू लागले.
परंतु त्यांना लोकांची भीति वाटत होती. त्याला अटक
करण्याची त्यांची इच्छा होती कारण त्यांना माहीत होते
की, ही बोधकथा त्याने त्यांनाच उद्देशून सांगितली होती.
मग ते त्याला सोडून निघून गेले.

## यहूदी पुढारी येशूला फसविण्याचा प्रयत्न करतात
*(मत्तय 22:15-22; लूक 20:20-26)*

[13]नंतर त्यांनी त्याला चुकीचे बोलताना पकडावे म्हणून
काही परूशी व हेरोदी यांना. त्याच्याकडे पाठविले. [14]ते

त्याच्याकडे आले आणि म्हणाले, “गुरूजी आम्हांस माहीत
आहे की, आपण प्रामाणिक आहात आणि कुणाची तमा
न बाळगता आपण देवाचा मार्ग खरेपणाने शिकविता. तर
मग कैसराला कर देणे योग्य आहे की नाही? आणि
आम्ही तो द्यावा की न द्यावा?”

15परंतु येशूने त्यांचा ढोंगीपणा ओळखला व त्यांना
म्हणाला, “तुम्ही माझी परीक्षा का पाहता? माझ्याकडे
एक नाणे (चांदीचे एक नाणे) आणा म्हणजे मी ते
पाहीन.” 16मग त्यांनी त्याच्याकडे नाणे आणले. त्याने
त्यांना विचारले, “हा मुखवटा व लेख कोणाचा आहे?” ते
त्याला म्हणाले, “कैसराचा”
17मग येशू त्यांना म्हणाला, “कैसराचे ते कैसराला व
देवाचे ते देवाला द्या.” तेव्हा त्यांना त्याच्याविषयी फार
आश्चर्य वाटले.

## काही सदूकी येशूला फसविण्याचा प्रयत्न करतात
## *(मत्तय 22:23-33; लूक 20:27-40)*

18नंतर काही सदूकी त्याच्याकडे आले, (सदूकी
पुनरुत्थान नाही असे समजतात) त्यांनी त्याला विचारले,
19“गुरूजी, मोशाने आमच्यासाठी असे लिहिले आहे की,
जर कोणा मनुष्याचा भाऊ मेला व पत्नी राहिली, परंतु
मूलबाळ नसले तर वंश पुढे चालावा म्हणून त्या मनुष्याने
तिच्याबरोबर लग्न करावे आणि मेलेल्या भावाचा वंश
वाढवावा. 20असे कोणी सात भाऊ होते. पहिल्याने पत्नी
केली व तो मूलबाळ न होता मेला. 21दुसऱ्याने तिच्याबरोबर
लग्न केले, तोही मूलबाळ न होता मेला. 22तिसऱ्याने
तसेच केले. त्या सात भावांपैकी एकालाही त्या स्त्रीपासून,
मूलबाळ झाले नाही. शेवटी ती स्त्रीही मेली. 23सातही
भावांनी तिच्याबरोबर लग्न केले तर पुनरुत्थानाच्या वेळी
जेव्हा लोक मेलेल्यातून उठतील तेव्हा ती कोणाची पत्नी
असेल? कारण सातही जणांनी तिच्याबरोबर लग्न केले
होते.”
24येशू त्यांना म्हणाला, “खात्रीने, पवित्र शास्त्र आणि
देवाचे सामर्थ्य तुम्हांला माहीत नाही म्हणून तुम्ही अशी
चूक करीत आहात. 25कारण जेव्हा लोक मेलेल्यातून
उठतील तेव्हा ते लग्न करणार नाहीत व करुन देणार
नाहीत. त्याऐवजी ते स्वर्गातील देवदूताप्रमाणे असतील.
26परंतु मेलेल्यांच्या पुन्हा उठण्याविषयी तुम्ही मोशाच्या
पुस्तकातील जळत्या झुडपाविषयी वाचले नाही काय?
तेथे देव मोशाला म्हणाला, “मी अब्राहामाचा, इसहाकाचा
आणि याकोबाचा देव आहे.*
27तो मेलेल्यांचा देव नव्हे तर जिवंत लोकांचा देव
आहे. तुम्ही फार चुकत आहा.”

## सर्वात महत्त्वाची आज्ञा कोणती?
## *(मत्तय 22:34-40; लूक 10:25-28)*

28त्यानंतर एका नियमशास्त्राच्या शिक्षकाने त्यांना वाद
घालताना ऐकले. येशूने त्यांना किती चांगल्या प्रकारे
उत्तर दिले ते पाहिले. तेव्हा त्याने विचारले, “सर्व आज्ञांत
महत्त्वाची पहिली आज्ञा कोणती?”
29येशूने उत्तर दिले, “पहिली महत्त्वाची आज्ञा ही, ‘हे
इस्राएला, ऐक, आपला प्रभु देव अनन्य आहे. 30तू आपला
देव जो तुझा प्रभु आहे, त्याजवर संपूर्ण अंत:करणाने,
संपूर्ण जिवाने, संपूर्ण मनाने आणि संपूर्ण शक्तीने प्रीति
कर.’*
31दुसरी आज्ञा ही आहे, ‘जशी आपणांवर तशी आपल्या
शेजाऱ्यावर प्रीति कर.’* यापेक्षा दुसरी कोणतीही आज्ञा
मोठी नाही.”
32तो मनुष्य उत्तरला, “देव एकच आहे, गुरूजी, आणि
त्याच्याशिवाय कोणीही नाही असे आपण म्हणता ते योग्य
बोललात.” 33त्याच्यावर पूर्ण अंत:करणाने, पूर्ण समजुतीने,
पूर्ण शक्तीने आणि जशी आपणावर तशी आपल्या
शेजाऱ्यावर प्रीति करणे हे सर्व यज्ञ व अर्पणे, जी आपणास
करण्याची आज्ञा दिली आहे, त्यापेक्षाही अधिक महत्त्वाचे
आहे.”
34येशूने पाहिले की, त्या मनुष्याने शहाणपणाने उत्तर
दिले आहे. तेव्हा तो त्याला म्हणाला, “तू देवाच्या राज्यापासून
दूर नाहीस.” त्यानंतर त्याला प्रश्न विचारण्याचे धाडस
कोणी केले नाही. 35येशू मंदिरात शिकवीत असता, तो
म्हणाला, “ख्रिस्त दाविदाचा पुत्र आहे असे नियमशास्त्राचे
शिक्षक म्हणतात ते कसे शक्य आहे?” 36दावीद स्वत:
पवित्र आत्म्याने प्रेरित होऊन म्हणाला,

‘प्रभु देव, माझ्या प्रभूला म्हणाला, मी तुझे वैरी तुझ्या
पायाखाली घालेपर्यंत तू माझ्या उजवीकडे बैस.’

*स्तोत्र. 110:1*

37दावीद स्वत: ख्रिस्ताला ‘प्रभु’ म्हणतो तर मग ख्रिस्त
दाविदाचा पुत्र कसा?” आणि मोठा लोकसमुदाय त्याचे
आनंदाने ऐकत होता.
38शिक्षण देताना तो म्हणाला, “नियमशास्त्राच्या
शिक्षकांविषयी सावध असा. त्यांना लांब झगे घालून
मिरवायला आणि बाजारात नमस्कार घ्यायला आवडते.
39आणि सभास्थानातील व मेजवानीतील सर्वांत महत्त्वाच्या
जागांची त्यांना आवड असते. 40ते विधवांची घरे
खाऊन टाकतात आणि धार्मिकता दाखविण्यासाठी ते
लांब लांब प्रार्थना करतात. या लोकांना फार कडक
शिक्षा होईल.”

---

**मी अब्राहामाचा ... देव आहे** निर्गम. 3:6

**हे इस्राएला ... कर** अनुवाद 6:4-5

**जशी ... प्रीति कर** लेवीय 19:18

## विधवा दान देण्याचा अर्थ दाखविते
*(लूक 21:1-4)*

41येशू दानपेटीच्या समोर बसला असता लोक पेटीत पैसे कसे टाकतात हे पाहत होता. आणि पुष्कळ श्रीमंत लोक भरपूर पैसे टाकीत होते. 42नंतर एक गरीब विधवा आली. तिने तांब्याची दोन लहान नाणी टाकली, ज्याची किंमत शंभरातील एका पैशाएवढी होती.

43येशूने आपल्या शिष्यांना एकत्र बोलावले आणि म्हणाला, "मी तुम्हांला खरे सांगतो, की सर्वांनी त्या पेटीत जे दान टाकले त्या सर्वांपेक्षा या विधवेने अधिक टाकले आहे. 44मी असे म्हणतो कारण त्यांच्याजवळ जे भरपूर होते त्यामधून त्यांनी काही दान दिले, परंतु ती गरीब असूनही तिच्याजवळ होते ते सर्व तिने देऊन टाकले. ती सर्व तिच्या जीवनाची उपजीविका होती."

## मंदिराचा भावी विध्वंस
*(मत्तय 24:1-44; लूक 21:5-33)*

13 येशू मंदिरातून निघून जात असता त्याच्या शिष्यांपैकी एक जण त्याला म्हणाला, "गुरूजी, पाहा, खूप मोठ्या दगडांनी बांधलेली या मंदिराची इमारत किती सुंदर आहे."

2येशू त्याला म्हणाला "तू या मोठ्या इमारती पाहतोस ना? येथील एकही दगड दुसऱ्या दगडावर राहणार नाही. त्यातील प्रत्येक खाली पाडला जाईल."

3येशू मंदिरासमोरच्या जैतुनाच्या डोंगरावर बसला होता. पेत्र, याकोब, योहान आणि अंद्रिया यांनी त्याला एकांतात विचारले, 4"या गोष्टी केव्हा घडतील हे आम्हांस सांगा. आणि या गोष्टी पूर्ण होण्याची वेळ येईल तेव्हा कोणते चिन्ह घडेल?"

5नंतर येशू त्यांना सांगू लागला, "तुम्हांला कोणी फसवू नये म्हणून सावध राहा. 6पुष्कळ लोक माझ्या नावाने येतील व म्हणतील की, 'मी तोच आहे' आणि ते पुष्कळांना फसवतील. 7जेव्हा तुम्ही लढायाविषयी आणि लढायांच्या अफवांविषयी ऐकाल तेव्हा घाबरू नका. हे निश्चितपणे घडणारच आहे. पण एवढ्याने शेवट होणार नाही. 8एक राष्ट्रदुसऱ्या राष्ट्रावर उठेल, एक राज्य दुसऱ्या राज्यावर उठेल, निरनिराळ्या ठिकाणी धरणीकंप होतील आणि दुष्काळ होतील. पण या गोष्टी म्हणजे नाशाची सुरूवात आहे.

9"तुम्ही सावध असा. ते तुम्हांला न्याय सभांच्या स्वाधीन करतील आणि सभास्थानात तुम्हांला मार देतील. त्यांना साक्ष व्हावी म्हणून तुम्हांला राज्यकर्ते व राजे यांच्यासमोर उभे राहावे लागेल. 10या गोष्टी घडण्यापूर्वी सर्व राष्ट्रांमध्ये सुवार्तेची घोषणा झालीच पाहिजे. 11ते तुम्हांला अटक करून चौकशीसाठी आणतील तेव्हा अगोदरच तुम्ही काय बोलावे याची काळजी करू नका, तर त्या घटकेला जे काही सुचविले जाईल ते बोला, कारण बोलणारे तुम्ही नाही तर पवित्र आत्मा तुम्हासाठी बोलेल. 12भाऊ भावाला व वडील आपल्या मुलाला ठार मारण्यासाठी विश्वासघात करून धरून देतील. मुले आपल्या आईवडीलांविरुद्ध उठतील आणि ते त्यांना ठार करवितील. 13आणि माझ्या नावामुळे सर्व जण तुमचा द्वेष करतील, पण जो शेवटपर्यंत टिकेल तोच तरेल.'

14"जेव्हा तुम्ही 'नाशाला कारण अशी भयंकर गोष्ट, (दानीयाल संदेष्ट्याने सांगितलेला ओसाडीचा अमंगल पदार्थ) जो जिथे नको तेथे पाहाल. "(वाचकाने याचा अर्थ काय तो समजावून घ्यावा)" तेव्हा जे यहूदीयांत आहेत त्यांनी डोंगरात पळू जावे. 15जो मनुष्य आपल्या घराच्या छतावर असेल त्याने घरातून काही आणण्यासाठी खाली उतरू नये. 16आणि जर एखादा मनुष्य शेतात असेल तर त्याने आपला झगा आणण्यासाठी माघारी जाऊ नये. 17त्या दिवसांत ज्या स्त्रियांची मुले तान्ही असतील व अंगावर पीत असतील त्यांच्यासाठी हे अती भयंकर होईल. 18हे हिवाळ्यात होऊ नये म्हणून प्रार्थना करा. 19कारण त्या दिवसात जो त्रास होईल तो देवाने जग निर्माण केले त्या आरंभापासून तो आजपर्यंत कधीही झाला नसेल व पुन्हा त्यासारखा कधीही होणार नाही, असा असेल. 20देवाने जर ते दिवस कमी केले नसते तर कोणीही वाचला नसता. परंतु ज्यांना त्याने निवडले आहे अशा निवडलेल्या लोकांसाठी ते दिवस त्याने कमी केले आहेत. 21आणि जर कोणी तुम्हांला म्हणेल की पाहा, ख्रिस्त येथे आहे किंवा तेथे आहे, तर त्यावर विश्वास ठेवू नका. 22कारण काही लोक आपण ख्रिस्त किंवा संदेष्टे असल्याचा खोटा दावा करतील आणि शक्य झाले तर ते निवडलेल्या लोकांना फसविण्यासाठी चिन्हे व आश्चर्यकर्मे करतील. 23तेव्हा तुम्ही सावध राहा. मी काळापूर्वीच तुम्हांला सर्व काही सांगून ठेवले आहे.

24 "परंतु त्या दिवसांत ही संकटे येऊन गेल्यावर, 'सूर्य अंधकारमय होईल व चंद्र प्रकाश देणार नाही.
25आकाशातून तारे पडतील आणि आकाशातील बळे डळमळतील.' *यशया 13:10; 34:4*

26"आणि लोक मनुष्याचा पुत्र मेघारूढ होऊन मोठ्या सामर्थ्यानिशी आणि वैभवाने येताना पाहतील. 27नंतर तो आपल्या देवदूतास पाठवील व चार दिशांतून, पृथ्वीच्या सीमेपासून ते आकाशाच्या सीमेपर्यंत त्याच्या निवडलेल्या लोकांना एकत्र करील.

28"अंजिराच्या झाडापासून धडा घ्या. जेव्हा त्याच्या डहाळ्या कोमल होतात आणि त्यावर पाने फुटतात तेव्हा तुम्हांला उन्हाळा जवळ आला हे समजते. 29त्याचप्रमाणे तुम्ही जेव्हा या गोष्टी घडताना पाहाल तेव्हा तुम्हांला समजेल की, तो काळ अगदीच दाराशी येऊन ठेपला आहे. 30मी तुम्हांला खरे सांगतो की, या सर्व गोष्टी

घडण्यापूर्वी ही पिढी खात्रीने नाहीशी होणार नाही. 31स्वर्ग आणि पृथ्वी नाहीशी होतील पण माझी वचने नाहीशी होणार नाहीत. 32त्या दिवसाविषयी किंवा त्या घटकेविषयी कोणालाही ठाऊक नाही. देवदूतालाही नाही व पुत्रासही नाही. फक्त पित्याला माहीत आहे. 33सावध असा, जागृत असा कारण ती वेळ केव्हा येईल हे तुम्हांला ठाऊक नाही.

34ती वेळ अशी आहे की, एक मनुष्य प्रवासाला निघते वेळी घर सोडतो आणि त्याच्या प्रत्येक नोकराला काम नेमून देतो. तो पहारेकऱ्यास जागरूक राहण्याची आज्ञा करतो. 35म्हणून तुम्ही जागरूक असा, कारण घरधनी केव्हा येईल हे तुम्हांस ठाऊक नाही. तो संध्याकाळी, मध्यरात्री, पहाटे कोंबडा आरवण्यापूर्वी किंवा सकाळी केव्हा येईल हे तुम्हांला माहीत नाही. 36जर तो अचानक आला तर तुम्ही त्याला झोपलेले सापडू नका. 37मी तुम्हांला सांगतो, ते सर्वांना सांगतो, 'जागृत राहा.'"

## यहूदी पुढारी येशूला ठार मारण्याचा कट करतात
### *(मत्तय 26:1-5; लूक 22:1-2; योहान 11:45-53)*

14 वल्हांडण* आणि बेखमीर भाकरीच्या सणाच्या* दोन दिवस अगोदर प्रमुख याजक आणि नियमशास्त्राचे शिक्षक कपटाने त्याला धरून जिवे मारण्याचा मार्ग शोधीत होते. 2कारण ते म्हणत होते "आपण ते सणात करू नये नाही तर लोक दंगा करतील."

## एक स्त्री काही तरी विशेष करते
### *(मत्तय 26:6-13; योहान 12:1-8)*

3येशू बेथानी येथे शिमोन कुष्ठरोगी याच्या घरी मेजावर जेवायला बसला असता कोणी एक स्त्री वनस्पतींपासून बनविलेल्या शुद्ध, सुगंधी तेलाची फार मौल्यवान अलाबास्त्र कुपी घेऊन आली. तिने अलाबास्त्र कुपी फोडली आणि सुगंधी तेल येशूच्या मस्तकावर ओतले.

4तेथे असलेले काही लोक रागावले, ते एकमेकांना म्हणाले, "सुगंधी तेलाचा असा नाश व्हावा हे बरे नाही. 5कारण हे सुगंधी तेल तीस दिनारापेक्षा अधिक किंमतीला विकता आले असते आणि ते पैसे गरीबांना देता आले असते." त्यांनी तिच्यावर कडक टीका केली.

6पण येशू म्हणाला, "तिला एकाकी असू द्या. तिला का त्रास देता? तिने माझ्यासाठी एक सुंदर कृत्य केले आहे. 7गरीब तर नेहमी तुमच्याजवळ असतील आणि पाहिजे त्या वेळेला त्यांना मदत करणे तुम्हांला शक्य आहे. परंतु मी नेहमीच तुमच्याबरोबर असेन असे नाही. 8तिला शक्य झाले ते तिने केले. तिने दफनविधीच्या तयारीच्या काळाअगोदरच माझ्या शरीरावर सुगंधी तेल ओतले आहे. 9मी तुम्हांला खरे सांगतो सर्व जगात जेथे कोठे सुवार्तेची घोषणा केली जाईल तेथे तिची आठवण म्हणून तिने जे केले ते नेहमीच सांगितले जाईल."

10नंतर बारा शिष्यांपैकी एक, यहूदा इस्कर्योत येशूला विश्वासघाताने धरून देण्यासाठी प्रमुख याजकांकडे गेला. 11त्यांना हे ऐकून आनंद झाला. आणि त्यांनी त्याला पैसे देण्याचे वचन दिले. मग यहूदा येशूला धरून त्यांच्या हातात देण्याची संधि पाहू लागला.

12बेखमीर भाकरीच्या सणाच्या पहिल्या दिवशी जेव्हा वल्हांडण सणाचा कोकरा मारीत असत तेव्हा येशूचे शिष्य त्याला म्हणाले, "आम्ही जातो आणि वल्हांडण सणाच्या भोजनाची तयारी करतो. आम्ही कोठे जाऊन तयारी करावी अशी आपली इच्छा आहे?"

13येशूने आपल्या दोघा शिष्यांना पाठविले आणि त्यांना सांगितले, "शहरात जा, आणि पाण्याचे भांडे घेऊन जाणारा मनुष्य तुम्हांला भेटेल, त्याच्या मागे जा. 14आणि जेथे तो आत जाईल त्या घराच्या मालकास सांगा, 'गुरुजी म्हणतात, जेथे मला माझ्या शिष्यांबरोबर वल्हांडण सणाचे भोजन करणे शक्य होईल अशी खोली कोठे आहे?' 15आणि तो तुम्हांला माडीवरची एक मोठी नीटनेटकी केलेली खोली दाखवील, तेथे आपणांसाठी तयारी करा."

16शिष्य निघाले आणि ते शहरात गेले. आणि येशूने सांगितल्याप्रमाणे त्यांना सर्व आढळले. मग त्यांनी वल्हांडण सणाच्या भोजनाची तयारी केली.

17संध्याकाळ झाली तेव्हा येशू बारा जणांसह आला. 18मेजावर बसून ते जेवीत असता येशू म्हणाला, "मी तुम्हांला खरे सांगतो, तुमच्यापैकी जो एक जण मला शत्रूच्या स्वाधीन करून देईल, तो माझ्याबरोबर येथे जेवीत आहे."

19शिष्य अतिशय खिन्न झाले व प्रत्येक जण त्याला म्हणू लागला, "तो मी आहे का?"

20तो त्यांना म्हणाला, "बारा जणांपैकी एक जो माझ्याबरोबर ताटात भाकर बुडवीत आहे तोच. 21हाय, हाय, त्याच्याविषयी पवित्र शास्त्रात जसे लिहिले आहे, तसा मनुष्याचा पुत्र जाईल, परंतु ज्याच्याकडून मनुष्याचा पुत्र धरून दिला जाईल, त्याचा नाश होवो. तो जन्मला नसता तर ते त्याच्यासाठी बरे झाले असते."

## प्रभु भोजन
### *(मत्तय 26:26-30; लूक 22:15-20; 1 करिंथकरांस 11:23-25)*

22ते भोजन करीत असता येशूने भाकर घेतली, उपकारस्तुति केली, ती मोडली आणि त्यांना दिली. तो म्हणाला, "घ्या, हे माझे शरीर आहे."

---

**वल्हांडण सण** यहूदी लोकांचा महत्तवाचा पवित्र दिवस. मोशेच्या काळात देवाने केलेल्या सुटकेची आठवण करण्यासाठी ते विशेष मेजवानी करतात.

**बेखमीर भाकरीच्या सण** महत्त्वाचा यहूदी सुट्ट्यांचा आठवडा. जुन्या करारात हा वल्हांडणानंतरच्या दिवशी सुरू झाला पण यावेळेपर्यंत दोन्ही सण एक झाले होते.

23नंतर येशूने प्याला घेतला, उपकारस्तुति केली. तो
प्याला त्यांना दिला आणि सर्व त्यांतून प्याले.
24मग येशू म्हणाला, "हे माझे नव्या कराराचे* रक्त
आहे. पुष्कळांसाठी ते ओतले जात आहे. 25मी तुम्हांला
खरे सांगतो की, देवाच्या राज्यात मी नवा द्राक्षारस पिईन
त्या दिवसापर्यंत मी यापुढे द्राक्षाचा उपज (द्राक्षारस) पिणार
नाही."
26नंतर त्यांनी उपकारस्तुतिचे गीत गाईले व ते जैतुनाच्या
डोंगराकडे निघून गेले.

## येशू सांगतो त्याचे सर्व शिष्य त्याला सोडून जातील

***(मत्तय 26:31-35; लूक 22:31-34; योहान 13:36-38)***

27येशू शिष्यांना म्हणाला, "तुम्ही सर्व विश्वास गमावून
बसाल. कारण असे लिहिले आहे की,

'मी मेंढपाळास मारीन आणि मेंढरे विखुरली जातील.'

*जखऱ्या 13:7*

28परंतु माझे पुनरुत्थान झाल्यावर मी तुमच्यापुढे गालीलात
जाईन."
29पेत्र म्हणाला, "इतर सर्वांनी जरी त्यांचा विश्वास
गमावला तरी मी गमावणार नाही."
30मग येशू त्याला म्हणाला, "मी तुला खरे सांगतो,
आज रात्री दोनदा कोंबडा आरवण्यापूर्वी तू तीन वेळा
मला नाकारशील." 31तरीही पेत्र अधिक आवेशाने
म्हणाला, "जरी मला आपणांबरोबर मरावे लागले तरी
सुद्धा मी आपणांला नाकारणार नाही." आणि इतर सर्व
जण तसेच म्हणाले.

## येशू एकटाच प्रार्थना करतो

***(मत्तय 26:36-46; लूक 22:39-46)***

32नंतर ते गेथशेमाने म्हटलेल्या जागी आले, तेव्हा येशू
त्याच्या शिष्यांना म्हणाला, "मी प्रार्थना करीपर्यंत येथे
बसा." 33येशूने आपल्याबरोबर पेत्र, याकोब व योहान
यांना घेतले. दुःख व वेदनांनी त्याचे मन भरून आले.
34तो त्यांना म्हणाला, "माझा जीव मरणाइतका वेदना
सोशीत आहे. येथे राहा व जागृत असा."
35त्यांच्यापासून थोडे दूर अंतरावर जाऊन तो जमिनीवर
पडला आणि त्याने प्रार्थना केली की, "शक्य असेल तर
ही घटका मजपासून टळून जावो." 36तो म्हणाला, "अब्बा*
बापा, तुला सर्व काही शक्य आहे. हा प्याला मजपासून
दूर कर पण मला पाहिजे ते नको तर तुला पाहिजे ते
कर. (माझ्या इच्छेप्रमाणे नाही तर तुझ्या इच्छेप्रमाणे कर.)"
37नंतर येशू आला आणि त्यांना झोपलेले पाहिले. तो
पेत्राला म्हणाला, "शिमोना, तू झोपी गेलास काय? तासभर
तुझ्याच्याने जागे राहवत नाही काय? 38जागृत राहा आणि
प्रार्थना करा म्हणजे तुम्ही मोहात पडणार नाही. आत्मा
उत्सुक आहे पण देह अशक्त आहे."
39पुन्हा येशू दूर गेला आणि त्याच गोष्टी उच्चारून
त्याने प्रार्थना केली. 40नंतर तो परत आला व त्याला ते
झोपलेले आढळले. कारण त्यांचे डोळे जड झाले होते
आणि त्याला काय उत्तर द्यावे हे त्यांना कळेना.
41तो पुन्हा तिसऱ्या वेळेस आला आणि त्यांना म्हणाला,
"तुम्ही अजूनही झोपलेले आणि विश्रांति घेत आहात काय?
पुरे झाले! आता वेळ आली आहे. मनुष्याचा पुत्र पाप्यांच्या
हाती धरून दिला जात आहे. 42उठा, आपण जाऊ या.
पाहा, मला धरून देणारा मनुष्य इकडे येत आहे."

## येशूला अटक करण्यात येते

***(मत्तय 26:47-56; लूक 22:47-53; योहान18:3-12)***

43आणि येशू बोलत आहे तोपर्यंत बारा जणांपैकी एक–
यहूदा आला. त्याच्याबरोबर मुख्य याजक व नियमशास्त्राचे
शिक्षक आणि वडील यांनी पाठविलेले अनेक लोक
तलवारी व सोटे घेऊन आले. 44घात करून देणाऱ्याने
त्यांना अशी खूण दिली होती की, "मी ज्या कोणाचे चुंबन
घेईन तोच तो आहे, त्याला धरा आणि बाजूला काढा."
45मग यहूदा आल्याबरोबर तो येशूकडे गेला आणि
म्हणाला, "गुरूजी!" आणि यहूदाने येशूचे चुंबन घेतले.
46नंतर त्यांनी त्याच्यावर हात टाकले आणि त्याला अटक
केली. 47तेथे जवळ उभे असलेल्यांपैकी एकाने आपली
तलवार काढली आणि मुख्य याजकाच्या नोकरावर वार
करून त्याचा कान कापून टाकला. 48नंतर येशू त्यांना
म्हणाला, "मी लुटारू असल्याप्रमाणे तुम्ही तलवारी आणि
सोटे घेऊन मला पकडायला बाहेर पडलात काय?"
49मी दररोज मंदिरात शिकवीत असता तुम्हांबरोबर
होतो आणि तुम्ही मला अटक केली नाही. परंतु शास्त्रलेख
पूर्ण झालाच पाहिजे." 50सर्व शिष्य त्याला सोडून पळून
गेले. 51एक तरुण मनुष्य अंगावर तागाचे वस्त्र पांघरून
त्याच्या मागे चालत होता. त्यांनी त्याला पकडण्याचा
प्रयत्न केला, 52परंतु तो तागाचे वस्त्र टाकून उघडाच
पळून गेला.

## यहूदी पुढाऱ्यांबरोबर येशू

***(मत्तय 26:57-68; लूक 22:54-55, 63-71; योहान 18:13-14,19-24)***

53नंतर त्यांनी येशूला तेथून मुख्य याजकाकडे नेले.
आणि सर्व मुख्य याजक, वडील व नियमशास्त्राचे शिक्षक
जमा झाले. 54थोडे अंतर ठेवून पेत्र येशूच्या मागे थेट

---

**कराराचे** काही प्राचीन प्रतीमध्ये 'कराराचे' या शब्दाअगोदर 'नवा' शब्द जोडतात.

**अब्बा** मूल आपल्या वडीलांना ज्या नावाने हाक मारते ते नाव. हा शब्द अरेमिक असून त्याचा अर्थ मुलाचे वडील असा होतो.

मुख्य याजकाच्या वाड्यात गेला. तेथे पेत्र पहारेकऱ्याबरोबर विस्तवाजवळ शेकत बसला.

55मुख्य याजक आणि सर्व यहूदी सभा येशूला जिवे मारण्यासाठी पुरावा गोळा करण्याचा प्रयत्न करीत होते. परंतु त्यांना काही मिळेना. 56पुष्कळांनी त्याच्याविरुद्ध खोटी साक्ष दिली. परंतु त्यांची साक्ष सारखी नव्हती.

57नंतर काही जण उभे राहिले आणि त्याच्या विरुद्ध साक्ष देऊन म्हणाले, "आम्ही त्याला असे म्हणताना ऐकले की, 58'हाताने बांधलेले मंदिर मी पाडून टाकीन आणि हातांनी न बांधलेले असे दुसरे मंदिर तीन दिवसात उभारीन.' 59परंतु तरीही या बाबतीत त्यांच्या साक्षीत मेळ नव्हता.

60नंतर मुख्य याजक त्यांच्यापुढे उभा राहिला आणि त्याने येशूला विचारले, "तू उत्तर देणार नाहीस काय? हे लोक तुझ्याविरुद्ध आरोप करताहेत हे कसे?"

61परंतु येशू गप्प राहिला. त्याने उत्तर दिले नाही. नंतर मुख्य याजकाने पुन्हा विचारले, "धन्य देवाचा पुत्र तो तू ख्रिस्त आहेस काय?" 62येशू म्हणाला, "मी आहे, आणि तुम्ही मनुष्याच्या पुत्राला सर्वसमर्थ देवाच्या उजवीकडे बसलेले व आकाशातील मेघांसह येताना पाहाल."

63मुख्य याजकाने आपले कपडे फाडले आणि म्हणाला, "आपणांला अधिक साक्षीदारांची काय गरज आहे? 64तुम्ही निंदा ऐकली आहे. तुम्हांला काय वाटते?"

सर्वांनी त्याला मरणदंड योग्य आहे अशी शिक्षा फर्मावली. 65काही जण त्याच्यावर थुंकू लागले, त्याचे तोंड झाकून बुक्के मारू लागले व त्याला म्हणू लागले, "ओळख बरे, तुला कोणी मारले?" पहारेकऱ्यांनी त्याला ताब्यात घेतले आणि मारले.

## येशूला ओळखतो हे सांगण्यास पेत्र घाबरतो
### *(मत्तय 26:69-75; लूक 22:56-62; योहान 18:15-18, 25-27)*

66पेत्र अंगणात असतानाच मुख्य याजकांच्या दासींपैकी एक आली. 67आणि तिने पेत्राला शेकताना पाहिले. तेव्हा तिने त्याच्याकडे निरखून पाहिले व म्हणाली, "तू सुद्धा नासरेथकर येशूबरोबर होतास ना?"

68परंतु पेत्राने ते नाकारले, आणि म्हणाला, "तू काय म्हणतेस हे मला कळत नाही व समजतही नाही." पेत्र अंगणाच्या दरवाजाच्या देवडीवर गेला आणि कोंबडा आरवला. 69जेव्हा दासीने त्याला पाहिले तेव्हा जे लोक तेथे होते त्यांना ती म्हणू लागली की, "हा मनुष्य त्यांच्यापैकीच एक आहे."

70पेत्राने पुन्हा ते नाकारले. नंतर थोड्या वेळाने तेथे उभे असलेले लोक पेत्राला म्हणाले, "खात्रीने तू त्यांच्यापैकी एक आहेस, कारण तू सुद्धा गालीली आहेस."

71पेत्र स्वत:ची निर्भर्त्सना करीत व शपथ वाहून म्हणाला, "तुम्ही ज्या माणसाविषयी बोलत आहात त्याला मी ओळखत नाही!"

72आणि लगेच दुसऱ्यांदा कोंबडा आरवला. "दोन वेळा कोंबडा आरवण्यापूर्वी तू मला तीन वेळा नाकारशील," असे येशू म्हणाला होता याची पेत्राला आठवण झाली व तो अतिशय दु:खी झाला व ढसढसा रडला.

## राज्यपाल पिलात येशूला प्रश्न करतो
### *(मत्तय 27:1-2, 11-14; लूक 23:1-5; योहान 18:28-38)*

15 पहाट होताच मुख्य याजक, वडील, नियमशास्त्राचे शिक्षक व सर्व यहूदी सभा यांनी एक योजना आखली. त्यांनी येशूला बांधले आणि पिलाताच्या ताब्यात दिले.

2पिलाताने त्याला विचारले, "तू यहूद्यांचा राजा आहेस काय?"

येशूने उत्तर दिले, "तू म्हणतोस तसेच."

3मुख्य याजकांनी पुष्कळ बाबतीत येशूवर आरोप ठेवले. 4मग पिलाताने त्याला पुन्हा प्रश्न विचारला, "तू उत्तर देणार नाहीस काय? पाहा, ते किती तरी गोष्टींविषयी तुझ्यावर आरोप ठेवीत आहेत!"

5पण तरीही येशूने उत्तर दिले नाही म्हणून पिलाताला आश्चर्य वाटले.

## पिलात येशूला मुक्त करण्याचा अयशस्वी प्रयत्न करतो
### *(मत्तय 27:15-31; लूक 23:13-25; योहान 18:39-19:16)*

6वल्हांडण सणाच्या वेळी ते कोणत्याही एका कैद्याच्या सुटकेची मागणी करीत असत. त्याला पिलात रिवाजा प्रमाणे लोकांसाठी सोडत असे. 7बरब्बा नावाचा एक मनुष्य, बंडखोरांबरोबर तुरुंगात होता. या लोकांनी दंगलीमध्ये खून केला होता. 8लोक आले आणि पिलाताला तो नेहमी त्यांच्यासाठी करीत असे तसे करायला लावले.

9पिलाताने विचारले, "तुमच्यासाठी यहूद्यांच्या राजाला सोडावे अशी तुमची इच्छा आहे काय?" 10पिलात असे म्हणाला कारण त्याला माहीत होते की, द्वेषामुळे मुख्य याजकांनी येशूला धरून दिले होते. 11परंतु पिलाताने त्याच्याऐवजी बरब्बाला सोडावे असे मुख्य याजकांनी लोकांना चिथावले.

12परंतु पिलात त्यांना पुन्हा म्हणाला, "तर मग तुम्ही ज्याला यहूद्यांचा राजा म्हणता त्याचे मी काय करावे अशी तुमची इच्छा आहे?"

13ते पुन्हा मोठ्याने ओरडले, "त्याला वधस्तंभावर खिळा!"

14पिलाताने पुन्हा विचारले, "का? त्याने कोणता गुन्हा केला आहे?" ते सर्व अधिकच मोठ्याने ओरडले, "त्याला वधस्तंभावर खिळा!"

15पिलाताला लोकांना खूष करायचे होते म्हणून त्याने
त्यांच्यासाठी बरब्बाला सोडले आणि येशूला फटके मारून
वधस्तंभावर खिळण्यासाठी शिपायांच्या स्वाधीन केले.
16शिपायांनी येशूला राज्यपालाच्या राजवाड्यात, ज्याला
प्रयटोरियम म्हणतात तेथे नेले आणि त्यांनी सैनिकांची
एक तुकडीच एकत्र बोलाविली. 17त्यांनी त्याच्या अंगावर
जांभळा झगा घातला व काट्यांचा मुगुट करून त्याला
घातला. 18ते त्याला मुजरा करू लागले आणि म्हणू लागले,
“यहूद्यांच्या राजाचा जयजयकार असो.” 19त्यांनी वेताच्या
काठीने वारंवार त्याच्या डोक्यावर मारले. त्याच्यावर
थुंकले आणि गुडघे टेकून त्याला नमन केले. 20त्यांनी
त्याची थट्टा केल्यावर त्याच्या अंगावरून जांभळा झगा
काढून घेतला व त्याचे स्वत:चे कपडे त्याला घातले.
नंतर वधस्तंभावर खिळणे शक्य व्हावे म्हणून ते त्याला
बाहेर घेऊन गेले.

## येशूला वधस्तंभावर जिवे मारतात
### (*मत्तय 27:32-44; लूक 23:26-43; योहान 19:17-27*)

21वाटेत त्यांना कुरेने येथील शिमोन नावाचा एक मनुष्य
दिसला. तो अलेक्सांद्र व रूफ यांचा पिता होता व आपल्या
शेतातून घरी परत चालला होता. मग सैनिकांनी त्याला
जबरदस्तीने येशूचा वधस्तंभ वहावयास लावले. 22आणि
त्यांनी येशूला गुलगुथा म्हणजे ‘कवटीची जागा’ म्हटलेल्या
ठिकाणी आणले. 23त्यांनी त्याला बोळ मिसळलेला द्राक्षारस
दिला परंतु त्याने तो घेतला नाही. 24त्यांनी त्याला
वधस्तंभावर खिळले. कोणी कोणते कपडे घ्यावे यासाठी
त्यांनी चिठ्ठ्या टाकल्या व त्याचे कपडे वाटून घेतले.
25त्यांनी त्याला वधस्तंभांवर खिळले तेव्हा सकाळचे नऊ
वाजले होते. 26आणि त्याच्यावर त्याच्या दोषारोपाचा लेख,
“यहूद्याचा राजा” असा लिहिला होता. 27त्यांनी
त्याच्याबरोबर दोन लुटारूंना एकाला त्याच्या उजवीकडे
व दुसऱ्याला त्याच्या डावीकडे वधस्तंभावर खिळले होते.
28* 29जवळून जाणारे लोक त्याची निंदा करीत होते. ते
आपली डोकी हलवून म्हणाले, “अरे! मंदिर पाडून ते
तीन दिवसात बांधणारा तो तूच ना! 30वधस्तंभावरून
खाली ये आणि स्वत:चा बचाव कर.”

31तसेच मुख्य याजकांनी, नियमशास्त्राच्या शिक्षकांनी
येशूची थट्टा केली आणि एकमेकाला म्हणाले, “त्याने
दुसऱ्यांचे तारण केले पण त्याला स्वत:चा बचाव करता
येत नाही! 32या मशीहाला, इस्राएलाचा राजा ख्रिस्त याला
वधस्तंभावरून खाली येऊ द्या मग आम्ही ते पाहू आणि
त्याच्यावर विश्वास ठेवू” आणि जे त्याच्याबरोबर
वधस्तंभावर खिळले होते त्यांनी देखील त्याचा अपमान
केला.

## येशूचे मरण
### (*मत्तय 27:45-56; लूक 23:44-49; योहान 19:28-30*)

33दुपारची वेळ झाली. सगळ्या भूमीवर अंधार पडला.
तो अंधार दुपारी तीन वाजेपर्यंत राहिला. 34मग तीन वाजता
ख्रिस्त मोठ्याने आरोळी मारून म्हणाला, ‘एलोई, एलोई,
लमा सबखथनी,” म्हणजे, “माझ्या देवा, माझ्या देवा, माझा
त्याग तू का केलास?”

35जवळ उभे असलेल्या काही जणांनी हे ऐकले तेव्हा
ते म्हणाले, “ऐका, तो एलीयाला बोलवीत आहे.”

36एक जण धावत गेला. त्याने स्पंज आंबेत बुडवून
भरला. काठीवर ठेवला व तो येशूला पिण्यास दिला
आणि म्हणाला, “थांबा! एलीया येऊन त्याला खाली
उतरवितो की काय हे आपण पाहू.”

37मग मोठ्याने आरोळी मारून येशूने प्राण सोडला.
38तेव्हा मंदिरातील पडदा वरपासून खालपर्यंत फाटला व
त्याचे दोन भाग झाले.

39येशूच्या पुढे उभे असलेल्या सेनाधिकाऱ्याने जेव्हा
त्याची आरोळी ऐकली आणि तो कसा मरण पावला हे
पाहिले तेव्हा तो म्हणाला, “खरोखर हा मनुष्य देवाचा पुत्र
होता.” 40तेथे असलेल्या काही स्त्रिया दुरून पाहत होत्या.
त्यांच्यामध्ये मरीया मग्दालिया, धाकटा याकोब आणि योसे
यांची आई मरीया व सलोमी या होत्या. 41येशू जेव्हा
गालीलात होता तेव्हा या स्त्रिया त्याच्या मागे जात व
त्याची सेवा करीत असत. याशिवाय त्याच्याबरोबर
यरुशलेमेपर्यंत आलेल्या इतर अनेक स्त्रियाही होत्या.

## येशूला पुरतात
### (*मत्तय 27:57-61; लूक 23:50-56; योहान 19:38-42*)

42त्या सुमारास संध्याकाळ झाली होती आणि तो तयारीचा
म्हणजे शब्बाथाच्या आधीचा दिवस होता. 43योसेफ
अरिमथाईकर न्यायसभेचा माननीय सभासद होता व तो
सुद्धा देवाचे राज्य येण्याची वाट पाहत होता. तो योसेफ
धैर्याने पिलाताकडे गेला आणि त्याने येशूचे शरीर मागितले.
44येशू इतक्या लवकर कसा मरण पावला याचे पिलाताला
आश्चर्य वाटले. मग त्याने सेनाधिकारी बोलाविले आणि
त्याना विचारले. येशूला मरून बराच वेळ झाला की
काय? 45सेनाधिकाऱ्याकडून त्याने अहवाल ऐकला, तेव्हा
त्याने ते शरीर योसेफाला दिले. 46मग योसेफाने तागाचे
वस्त्र विकत आणले. आणि येशूला वधस्तंभावरून खाली
काढले व त्याला तागाच्या वस्त्रात गुंडाळून ते त्याने खडकात
खोदलेल्या कबरेत ठेवले. नंतर त्याने कबरेच्या तोंडावर
धोंड बसविली. 47येशूला कोठे ठेवले हे मरीया मग्दालिया
आणि योसेची आई मरीया हे सर्व बघत होत्या येशूला कुठे
ठेवले हे त्यांनी पाहिले.

---

**वचन 28** काही ग्रीक आवृत्त्या 28 वे वचन घालतात. “आणि त्याला गुन्हेगारांमध्ये ठेवले हा शास्त्रलेख पूर्ण झाला.”

### येशू मरणातून उठला हे अनुयायांना कळते
***(मत्तय 28:1-8; लूक 24:1-12; योहान 20:1-10)***

16 शब्बाथाचा दिवस संपला तेव्हा मरीया मग्दालिया, याकोबाची आई मरीया आणि सलोमी यांनी त्याला लावण्याकरिता सुगंधी तेल विकत आणले. 2आणि आठवड्याच्या पहिल्या दिवशी, अगदी पहाटे सूर्योदयाच्या वेळी त्या कबरेकडे गेल्या. 3त्या एकमेकीस म्हणत होत्या की, "कबरेच्या तोंडावरून आपणांसाठी धोंड कोण बाजूला लोटील?"

4नंतर त्यांनी वर पाहिले आणि त्यांना धोंड दूर लोटलेली आढळली. ती फारच मोठी होती. 5त्या कबरेत आत गेल्या तेव्हा त्या भयचकित झाल्या. त्यांना एक तरुण पुरुष उजव्या बाजूस बसलेला आढळला. त्याने पांढरा शुभ्र झगा घातला होता.

6तो त्यांना म्हणाला, "भयभीत होऊ नका, तुम्ही नासरेथकर येशू जो वधस्तंभावर खिळला होता त्याचा शोध करीत आहात. पण तो उठला आहे. येथे नाही. त्यांनी त्याला ठेवले होते ती जागा पाहा. 7जा आणि त्याच्या शिष्यांना व पेत्रालाही सांगा की, तो तुमच्या अगोदर गालीलात जात आहे. त्याने तुम्हांस सांगितल्याप्रमाणे तेथे तो तुम्हांस दृष्टीस पडेल."

8मग त्या बाहेर गेल्या आणि भीतीमुळे कबरेपासून पळाल्या. त्यांना आश्चर्य वाटले. त्यांनी कोणाला काहीही सांगितले नाही. कारण त्या भयभीत झाल्या होत्या.

### काही शिष्य येशूला पाहतात
***(मत्तय 28:9-10; योहान 20:11-18; लूक 24:13-35)***

9आठवड्याच्या पहिल्या दिवशी येशू उठल्यावर त्याने प्रथम मरीया मग्दालियाला, जिच्यातून त्याने सात भुते काढली होती, तिला दर्शन दिले.

10ती गेली आणि रडून शोक करणाऱ्या त्याच्या अनुयायांना तिने हे वृत्त सांगितले. 11त्यांनी ऐकले की तो जिवंत आहे. व तिने त्याला पाहिले आहे. तेव्हा त्यांनी तिच्या म्हणण्यावर विश्वास ठेवला नाही.

12यानंतर त्यांच्यापैकी दोघे उघड्या माळरानावर चालले होते. गावाकडे जात असता येशू त्यांना दुसऱ्या रूपाने प्रगट झाला. 13ते परत आले व इतरांना त्याविषयी सांगितले परंतु त्यांनी त्यांवरही विश्वास ठेवला नाही.

### .येशू शिष्यांबरोबर बोलतो
***(मत्तय 28:16-20; लूक 24:36-49; योहान 20:19-23; प्रेषितांची कृत्ये 1:6-8)***

14नंतर अकरा जण जेवत बसले असता येशू त्यांना प्रगट झाला. त्याने शिष्यांच्या अविश्वासाबद्दल आणि त्यांच्या अंत:करणाच्या कठोरतेबद्दल त्यांना समज दिली. कारण ज्यांनी त्याला उठल्यावर पाहिले होते त्यांच्यावर त्यांनी विश्वास ठेवला नाही.

15तो त्यांना म्हणाला, "संपूर्ण जगात जा आणि सर्व सृष्टीला सुवार्तेची घोषणा करा." 16जो कोणी विश्वास धरतो आणि बाप्तिस्मा घेतो त्याचे तारण होईल, परंतु जो विश्वास ठेवीत नाही त्याचा धिक्क ार होईल. 17आणि जे विश्वास धरतील त्यांच्याबरोबर ही चिन्हे असतील. ते माझ्या नावाने भुते काढतील, ते नव्या नव्या भाषा बोलतील. 18ते आपल्या हातांनी साप उचलतील आणि ते कोणतेही विष पितील तेव्हा ते त्यांना बाधणार नाही. ते आजाऱ्यांवर हात ठेवतील आणि ते बरे होतील."

19मग प्रभु येशू त्यांच्याबरोबर बोलल्यानंतर तो स्वर्गात घेतला गेला आणि देवाच्या उजव्या बाजूस जाऊन बसला. 20शिष्य बाहेर गेले आणि त्यांनी प्रत्येक ठिकाणी सुवार्तेची घोषणा केली. प्रभूने त्यांच्याबरोबर कार्य केले, व त्याने वचनाबरोबर असणाऱ्या चिन्हांनी त्याची खात्री केली.

# लूकाने लिहिलेले शुभवर्तमान

## लूक येशूच्या जीवनाविषयी लिहितो

1 पुष्कळ लोकांनी आमच्यामध्ये घडलेल्या ऐतिहासिक घटनांची नोंद करण्याचा प्रयत्न केला. [2]त्यांनी त्याच गोष्टी लिहिल्या ज्या आम्हांला काही इतर लोकांकडून समजल्या होत्या–या लोकांनी त्या गोष्टी सुरुवातीपासून पाहिल्या होत्या आणि देवाचा संदेश लोकांना सांगून त्याची सेवा केली होती. [3]थियफिला महाराज, सुरुवातीपासून या सगळ्या गोष्टींचा काळजीपूर्वक अभ्यास मी केला आहे, म्हणून मला असे वाटले की, या सर्व घटनांविषयी आपणांला व्यवस्थित माहिती लिहावी. [4]हे मी यासाठी लिहित आहे की, जे काही तुम्हांला शिकविण्यात आले ते खरे आहे, हे तुम्हांला समजावे.

## जखऱ्या आणि अलीशिबा

[5]यहूदीयाचा राजा हेरोद याच्या दिवसांत, जखऱ्या नावाचा एक याजक होता. तो अबीयाच्या याजककुळातील होता. त्याला एक पत्नी होती. ती अहरोनाच्या वंशातील कन्यांपैकी होती. तिचे नाव अलीशिबा होते. [6]दोघेही देवाच्या दृष्टीने धार्मिक होते आणि प्रभूच्या आज्ञा व विधी पाळण्यात काटेकोर होते. [7]परंतु त्यांना मूल नव्हते कारण अलीशिबा वांझ होती. आणि शिवाय दोघेही फार म्हातारे झाले होते.

[8]जेव्हा जखऱ्याच्या गटाची मंदिरात सेवा करण्याची वेळ आली आणि त्यावेळी तो तेथे देवाचा याजक म्हणून सेवा करीत होता, [9]याजकांच्या प्रथेप्रमाणे मंदिरात देवापुढे धूप जाळण्यासाठी चिठ्ठ्या टाकून त्याची निवड करण्यात आली. [10]जेव्हा धूप जाळण्याच्या वेळी सर्वजण बाहेर जमून प्रार्थना करीत होते, [11]तेव्हा देवाच्या दूताने त्याला दर्शन दिले. देवदूत धूप जाळण्याच्या वेदीच्या उजव्या बाजूला उभा होता. [12]जेव्हा जखऱ्याने त्याला पाहिले तेव्हा तो अस्वस्थ झाला, आणि त्याला भीति वाटली. [13]देवदूत त्याला म्हणाला, "जखऱ्या, भिऊ नको, कारण तुझी प्रार्थना ऐकण्यात आली आहे, आणि तुझी पत्नी अलीशिबा इजपासून तुला मुलगा होईल. तू त्याचे नाव योहान ठेव. [14]तो तुला आनंद आणि सुख देईल. त्याचा जन्म होईल तेव्हा पुष्कळ लोक आनंदित होतील. [15]देवाच्या दृष्टीने तो महान होईल. त्याने कोणतेही कडक पेय किंवा मद्य पिऊ नये. आणि तो आईच्या गर्भात असल्यापासूनच पवित्र आत्म्याने भरलेला असेल. [16]आणि तो पुष्कळ इस्राएल लोकांना प्रभु त्यांचा देव याच्याकडे वळविण्यास कारणीभूत ठरेल. [17]योहान स्वत: देवापुढे चालेल. तो एलीयाप्रमाणे समर्थ होईल. एलीयाला जो आत्मा होता, तोच त्याला असेल. तो वडिलांची अंत:करणे त्यांच्या मुलांकडे वळवील. आज्ञा न मानणाऱ्यांना तो धार्मिकतेकडे नेईल. प्रभूसाठी लोकांना तयार करण्यासाठी तो या गोष्टी करील."

[18]मग जखऱ्या देवदूताला म्हणाला, "हे खरे आहे हे मला कसे समजेल? कारण मी वृद्ध मनुष्य आहे, आणि माझी पत्नीसुद्धा वृद्ध झाली आहे."

[19]आणि देवदूताने उत्तर दिले. तो म्हणाला, "मी गब्रीएल आहे. मी देवाच्या समक्षतेमध्ये उभा राहतो. आणि मला तुझ्याशी बोलायला व तुला ही सुवार्ता सांगायला पाठविण्यात आले आहे. [20]पण हे लक्षात ठेव, तू मुका राहशील. हे घडेपर्यंत तुला बोलता येणार नाही. कारण माझे शब्द जे योग्य वेळी खरे ठरणार आहेत त्या माझ्या शब्दांवर तू विश्वास ठेवला नाहीस." [21]लोक जखऱ्याची वाट पाहत होते, आणि तो मंदिरात इतका वेळ का राहिला याचे त्यांना नवल वाटत होते. [22]जेव्हा तो बाहेर आला तेव्हा त्याला त्यांच्याशी बोलता येईना. मग त्यांना जाणीव झाली की, मंदिरात त्याने दृष्टान्त पाहिला आहे. तो त्यांना खुणा करीत होता परंतु बोलू शकत नव्हता.

[23]मग असे झाले की, त्याच्या सेवेचा कालावधि संपल्यानंतर तो घरी गेला.

[24]काही काळानंतर त्याची पत्नी अलीशिबा गरोदर राहिली. आणि पाच महिने तिने स्वत: एकांतवास पत्करला. ती म्हणाली, [25]"शेवटी आता प्रभूने मला या मार्गाने मदत केली आहे. लोकांमध्ये माझी लाज राखण्यासाठी त्याने माझी पुष्कळ काळजी घेतली."

## कुमारी मरीया

[26]अलीशिबाच्या सहाव्या महिन्यात, देवाने गब्रीएल दूताला गालीलातील नासरेथ गावी पाठविले. [27]योसेफ नावाच्या मनुष्याशी ज्या कुमारीची मागणी झाली होती, तिच्याकडे गब्रीएलाला पाठविण्यात आले. योसेफ हा दाविदाच्या* घराण्यातील होता. तिचे नाव मरीया होते. [28]गब्रीएल तिच्याकडे आला आणि म्हणाला, "अभिवादन!

---

**दावीद** ख्रिस्तपूर्व 1000 वर्षे, इस्राएलाचा राजा.

तुझ्यावर कृपा झालेली आहे. प्रभु तुझ्याबरोबर आहे.”
29परंतु या शब्दांनी ती अस्वस्थ झाली, आणि या
अभिवादनाचा अर्थ काय असावा याचे ती नवल करू
लागली.

30देवदूत तिला म्हणाला, “मरीये, भिऊ नकोस, देवाने
तुझ्यावर कृपा केली आहे. 31ऐक! तू गरोदर राहशील,
आणि तुला मुलगा होईल, त्याचे नाव तू येशू ठेव. 32तो
महान होईल व त्याला सर्वोच्च देवाचा पुत्र म्हणतील.
आणि प्रभु देव त्याला त्याचा पिता दावीद याचे सिंहासन
देईल. 33याकोबाच्या घराण्यावर सर्वकाळासाठी तो सत्ता
चालवील. त्याच्या राज्याचा कधीही अंत होणार नाही.”
34तेव्हा मरीया दूताला म्हणाली, “मी कुमारी असल्याने हे
असे कसे घडेल?”

35देवदूत तिला म्हणाला, “पवित्र आत्मा तुझ्यावर येईल,
आणि सर्वोच्च देवाचे सामर्थ्य तुझ्यावर सावली करील.
आणि म्हणून जे पवित्र बाळ जन्मास येईल, त्याला देवाचा
पुत्र म्हणतील. 36आणि याकडे लक्ष दे: तुझी नातेवाईक
अलीशिबा जरी वांझ असली तरी तीसुद्धा गरोदर आहे व
तिच्या पोटी पुत्र आहे. आणि ज्या स्त्रीला ते म्हणाले की
तुला मूल होणार नाही तिला आता सहावा महिना आहे!
37कारण देवाला कोणतीही गोष्ट अशक्य नाही.”

38मरीया म्हणाली, “मी प्रभूची दासी आहे, आपण
म्हणालात तसे माझ्याबाबतीत घडो.” मग देवदूत तिला
सोडून गेला.

## जखऱ्या व अलीशिबेला मरीया भेटते

39त्याच वेळी मरीया तयार झाली आणि लगेच यहूदीयाच्या
डोंगराळ भागातील एका गावी गेली. 40तिने जखऱ्याच्या
घरात प्रवेश केला आणि अलीशिबेला अभिवादन केले.
41आणि असे झाले की, जेव्हा अलीशिबेने मरीयेचे
अभिवादन ऐकले तेव्हा तिच्या पोटातील बालकाने उडी
मारली. आणि अलीशिबा पवित्र आत्म्याने भरून गेली.
42ती मोठ्या आवाजात बोलली, “सर्व स्त्रियांमध्ये तू अधिक
धन्य आहेस, तुझ्या पोटचे फळ धन्य आहे. 43परंतु माझ्या
बाबतीत अशी कोणती गोष्ट घडली की माझ्या प्रभूच्या
आईने माझ्याकडे यावे? 44कारण तुझ्या अभिवादनाचा
आवाज माझ्या कानी पडताक्षणीच, माझ्या पोटातील बाळाने
आनंदाने उडी घेतली. 45प्रभूने तुला ज्या गोष्टी घडतील
असे सांगितले त्यावर तू विश्वास ठेवलास म्हणून तू धन्य
आहेस.”

## मरीया देवाची स्तुति करते

46आणि मरीया म्हणाली,

47“माझा आत्मा प्रभूची स्तुति करतो;माझा आत्मा माझ्या
तारणाऱ्या देवामध्ये आनंद करतो.

48कारण त्याने त्याच्या नम्र दासीची काळजी वाहिली.
होय, येथून पुढे सर्व लोक मला धन्य म्हणतील.

49कारण सर्वसमर्थाने माझ्यासाठी महान कृत्ये केली
आहेत. त्याचे नाव पवित्र आहे.

50जे त्याचे भय धरतात, त्यांच्यावर तो पिढ्यान्‌पिढ्या
दया करतो.

51त्याने आपल्या बाहूंनी आपले सामर्थ्य दाखविले;
गर्विष्ठ लोकांना त्यांच्या बढाईखोर विचारांसह विखरून
टाकले आहे.

52सत्ताधीशांना त्याने त्यांच्या सिंहासनावरून खाली
आणले आहे, आणि नम्र जनांना त्याने उंच केले आहे.

53त्याने भुकेलेल्यांना उत्तम पदार्थांनी समाधान दिले
आहे. श्रीमंत लोकांना त्याने रिकामे पाठविले आहे.

54त्याचा सेवक जो इस्राएल याला मदत करण्यास तो
आला आहे.

55त्याने आपल्या पूर्वजांना जे अभिवचन दिले होते
त्याप्रमाणे अब्राहाम व त्याच्या वंशजांवर दया करण्याचे
तो लक्षात ठेवतो.”

56मरीया अलीशिबेबरोबर तीन महिने राहिली, आणि
मग ती तिच्या घरी परत गेली.

## योहानाचा जन्म

57अलीशिबेला तिचे मूल होण्याची वेळ आली, तेव्हा
तिने एका मुलाला जन्म दिला. 58तिच्या शेजाऱ्यांनी व
नातेवाईकांनी ऐकले की, देवाने तिच्यावर मोठी कृपा
केली आहे. ते तिच्या आनंदात सहभागी झाले.

59मग असे झाले की, आठव्या दिवशी मुलाची सुंता
करण्यासाठी ते आले, ते, त्याच्या बापाचे जे नाव होते तेच
म्हणजे जखऱ्या नाव ठेवणार होते. 60पण त्याची आई
म्हणाली, “नाही, त्याला योहान असे म्हणावे.”

61ते तिला म्हणाले, “तुझ्या कोणत्याच नातेवाईकाचे
नाव ते नाही.” 62नंतर त्यांनी त्याच्या वडिलांना खुणेने
विचारले,“ त्याला कोणते नाव ठेवायचे आहे?”

63त्याने लिहिण्यासाठी पाटी मागितली आणि लिहिले,
“त्याचे नाव योहान आहे.” त्या सर्वांना खूपच आश्चर्य
वाटले. 64लगेच त्याचे तोंड उघडले आणि त्याची जीभ
मोकळी झाली, आणि तो बोलू लागला व देवाची स्तुति
करू लागला. 65सर्व शेजारी भयभीत झाले आणि
यहूदीयाच्या सर्व डोंगराळ प्रदेशात लोक या सर्व गोष्टींबद्दल
बोलत होते. 66ज्या कोणी हे ऐकले त्या प्रत्येकाने याविषयी
नवल केले. ते म्हणाले, “हे मूल पुढे कोण होणार आहे?”
कारण देवाचा वरदहस्त त्यांच्यावर होता.

## जखऱ्या देवाची स्तुति करतो

67मग त्याचा पिता जखऱ्या पवित्र आत्म्याने भरला
गेला, त्याने भविष्यवाणी केली; तो म्हणाला,

68“प्रभु, इस्राएलाचा देव धन्यवादित असो, कारण तो
त्याच्या लोकांना मदत करण्यास, व त्यांना मुक्त करण्यास
आला आहे.

69त्याने आमच्यासाठी आपला सेवक दावीद याच्या
घराण्यातून आम्हांला सामर्थ्यशाली तारणारा दिला आहे.
70देव म्हणाला की, मी असे करीन त्याच्या पवित्र
भविष्यवाद्यांकरवी तो हे बोलला व ते फार वर्षां पूर्वी
होऊन गेले.
71जे आमचे शत्रू आहेत व जे आमचा द्वेष करतात
त्यांच्यापासून मुक्त करण्याचे अभिवचन त्याने आम्हांला
दिले.
72आमच्या पूर्वजांवर दया दाखविण्यासाठी तो हे करणार
आहे. व त्यांच्याशी केलेला पवित्र करार लक्षात
ठेवण्यासाठी तो आमचे रक्षण करणार आहे.
73हा करार एक शपथ होती, जी त्याने आमचा पूर्वज
अब्राहाम याच्याशी घेतली
74ती अशी की, तो आम्हांला शत्रूच्या सामर्थ्यापासून
मुक्त करील, अशासाठी की, आम्ही त्याची सेवा निर्भयपणे
करू शकू.
75त्याची अशी इच्छा होती की, आम्ही त्याच्यासमोर
धार्मिकतेने व पवित्रतेने आमच्या आयुष्याचे सर्व दिवस
जगावे.
76“मुला, आता तुला सर्वोच्च देवाचा संदेष्टा म्हणतील.
प्रभूच्या येण्यासाठी लोकांना तयार करण्यासाठी तू त्याच्या
(प्रभु) पुढे चालशील.
77कारण तू प्रभूसमोर, त्याचा मार्ग तयार करण्यासाठी
आणि पापक्षमा मिळून तुमचे तारण होईल हे त्याच्या
लोकांना सांगण्यासाठी पुढे जाशील.
78कारण देवाच्या हळुवार करुणेमुळे स्वर्गीय दिवसाची
पहाट उजाडेल व मरणाच्या दाट छायेत जे जगत आहेत
त्यांच्यावर प्रकाशेल.
79आणि शांतीच्या मार्गावर आमच्या पावलांना मार्गदर्शन
करील.”
80अशा रीतीने तिचा मुलगा मोठा होत गेला आणि
आत्म्यात सामर्थ्यशाली झाला. इस्राएल लोकांना प्रगट
होण्याच्या दिवसापर्यंत तो अरण्यात राहिला.

### येशूचा जन्म
### (*मत्तय 1:18-25*)

2 त्या दिवसात कैसर औगुस्तकडून हुकूम झाला की,
रोमन जगातील सर्व लोकांच्या नावांची नोंद झालीच
पाहिजे. 2ही पहिली नावनोंदणी होती. क्वीरीनिय हा सूरिया
प्रांताचा राज्यपाल होता त्यावेळेस ही नावनोंदणी झाली.
3प्रत्येक जण नावनोंदणी करण्यासाठी आपापल्या गावी
गेला.
4मग योसेफसुद्धा गालीलातील नासरेथ गावाहून
यहूदीयातील दाविदाच्या बेथलेहेम या गावी गेला. कारण
तो दाविदाच्या घराण्यातील व कुळातील होता. 5जिच्याशी
त्याचे लग्न ठरले होते व जी गरोदर होती, त्या मरीयेसह
तो तेथे नावनोंदणी करण्यासाठी गेला. 6ते तेथे असतानाच
तिची बाळंतपणाची वेळ आली. 7आणि तिने तिच्या पहिल्या
मुलाला जन्म दिला. तिने त्याला फडक्यांमध्ये गुंडाळले व
गोठ्यात ठेवले, कारण धर्मशाळेत उतरण्यासाठी त्यांना
जागा मिळाली नाही.

### काही मेंढपाळ येशूविषयी ऐकतात

8आणि तेथे काही मेंढपाळ रात्रीच्या वेळी शेतामध्ये
राहून आपले कळप राखीत होते, 9आणि देवाचा एक दूत
त्यांच्यामोर प्रगट झाला व प्रभूचे तेज त्यांच्याभोवती पसरले.
आणि ते मेंढपाळ घाबरून गेले. 10देवदूत त्यांना म्हणाला:
“भिऊ नका, कारण मी तुम्हांला आनंदाची बातमी सांगणार
आहे, जिच्यामुळे सर्व लोकांना आनंद होणार आहे. 11कारण
आज दाविदाच्या गावात तारणारा जन्मला आहे. तो ख्रिस्त
प्रभु आहे. 12आणि तुमच्यासाठी ही खूण असेल : फडक्यात
गुंडाळलेले आणि गोठ्यात निजविलेले बाळ तुम्हांला
आढळेल.”
13आणि अचानक तेथे देवदूताबरोबर स्वर्गातील सैन्याचा
समुदाय जमला. ते देवाची स्तुति करीत होते आणि म्हणत
होते;

14“स्वर्गात देवाला गौरव आणि ज्यांच्याबद्दल देव
समाधानी आहे, त्या पृथ्वीवरील मनुष्यांत शांति”

15जेव्हा देवदूत त्यांना सोडून परत स्वर्गात गेले, तेव्हां
मेंढपाळ एकमेकांना म्हणाले, “चला, बेथलेहेमला जाऊ
या आणि घडलेली जी गोष्ट देवाने आम्हांला कळविली
ती पाहू या.”
16ते घाईने गेले आणि त्यांना मरीया व योसेफ आढळले
आणि त्यांनी गोठ्यात ठेवलेले बाळ पाहिले. 17जेव्हा
मेंढपाळांनी त्याला पाहिले तेव्हा देवदूताने त्यांना त्या
बाळाविषयी जे सांगितले होते ते सर्वांना सांगितले. 18ज्यांनी
हे ऐकले ते सर्व मेंढपाळांनी सांगितलेल्या गोष्टीमुळे चकित
झाले. 19पण मरीयेने या गोष्टी स्वत:जवळच ठेवल्या, व
सतत त्याविषयी विचार करू लागली. 20त्यांनी पाहिलेल्या
आणि ऐकलेल्या सर्व गोष्टींविषयी देवाचे गौरव आणि
स्तुति करीत मेंढपाळ घरी गेले; त्यांना जसे सांगण्यात
आले तसेच सर्व घडले.
21आणि जेव्हा बाळाची सुंता करण्याचा आठवा दिवस
आला, तेव्हा त्याचे नाव येशू ठेवले गेले. हे नाव देवदूतांनी
त्याला त्याची गर्भधारणा होण्यापूर्वीच ठेवले होते.
22मोशेच्या नियमाप्रमाणे जो त्यांचा शुद्धीकरणाच्या
विधीचा काळ होता तो आला तेव्हा त्याला देवापुढे सादर
करण्याचा विधि करण्यासाठी ते त्याला घेऊन यरुशलेमला
गेले. 23ज्याप्रमाणे प्रभूच्या नियमात लिहिले आहे;
“प्रत्येक प्रथम जन्मलेला नर प्रभूला अर्पण करावा.”*

---

**प्रत्येक … करावा** निर्गम. 13:2

24आणि "कबुतरांच्या जोडीचा किंवा पारव्याच्या दोन
पिलांचा यज्ञ करावा."*

प्रभूच्या या नियमाप्रमाणे यज्ञ अर्पण करण्यास ते गेले:

### शिमोन येशूला पाहतो

25यरुशलेम येथे एक मनुष्य होता, त्याचे नाव शिमोन
होते; तो नीतिमान आणि भक्तिशील होता. इस्राएलाचे सांत्वन
होण्याची तो वाट पाहत होता आणि पवित्र आत्मा त्याच्यावर
होता. 26पवित्र आत्म्याने त्याला दाखवून दिले की, प्रभूच्या
ख्रिस्ताला पाहिल्याशिवाय तो मरणार नाही. 27आत्म्याने
भरलेला तो मंदिरात गेला. आणि येशूच्या आईवडिलांनी
बाळाला नियमशास्त्रात सांगितलेल्या विधीप्रमाणे
करण्यासाठी त्याच्याजवळ आणले. 28शिमोनाने येशूला
आपल्या हातात घेतले, आणि त्याने देवाची स्तुति केली.
तो म्हणाला:

29"आता, प्रभु, आपल्या वचनाप्रमाणे आपल्या सेवकाला
जाऊ दे,

30कारण माझ्या डोळ्यांनी तुझे तारण पाहिले आहे,

31जे तू सर्व लोकांच्या समोर केलेस.

32तो यहूदीतर लोकांना तुझा मार्ग प्रगट करण्यासाठी
प्रकाश असा आहे. आणि तो तुझे लोक इस्राएल यांच्यासाठी
गौरव असा आहे."

33त्याच्याविषयी सांगितलेल्या गोष्टींमुळे त्याचे
आईवडील आश्चर्यचकित झाले. 34मग शिमोनाने त्यांना
आशीर्वाद दिला, तो येशूची आई मरीया हिला म्हणाला,
"इस्राएलात, हे मूल, अनेकांचे पडणे व उठणे यांस
कारणीभूत ठरेल. जे चिन्ह नाकारले जाईल ते होण्याकरिता
याची नेमणूक झाली आहे. 35अनेकांच्या मनातील विचार
प्रगट होण्यासाठी तुझ्या जिवातून तरवार आरपार जाईल."

### हन्ना येशूला पाहते

36तेथे हन्ना नावाची एक संदेष्टी स्त्री होती. ती फनूएलाची
मुलगी होती. ती अशेर वंशाची होती. ती फार वृद्ध झाली
होती. ती लग्नानंतर आपल्या पतीसमवेत सात वर्षे राहिली.
37ती विधवा असून आता चौऱ्याऐंशी वर्षांची होती. तिने
मंदिर कधीही सोडले नाही; उपास व प्रार्थना करून ती
रात्रंदिवस उपासना करीत असे.

38ती त्यावेळी बालकाच्या आईवडिलांकडे आली व
तिने देवाचे आभार मानले. आणि जे यरुशलेमच्या
सुटकेविषयी वाट पाहत होते त्या सर्वांना तिने त्याच्याविषयी
सांगितले.

### योसेफ आणि मरीया घरी येतात

39प्रभूच्या नियमशास्त्राप्रमाणे त्यांनी सर्व पूर्ण केले व
नंतर ते गालीलातील त्यांच्या नासरेथ या गावी परतले.
40बालक वाढत होता, तो बलवान झाला, तो ज्ञानाने
परिपूर्ण झाला आणि देवाची कृपा त्याच्यावर होती.

### येशूचे बालपण

41प्रत्येक वर्षी त्याचे आईवडील वल्हांडण सणासाठी
यरुशलेमाला जात. 42जेव्हा तो बारा वर्षांचा झाला तेव्हा
ते नेहमीप्रमाणे सणासाठी वर गेले. 43सण संपल्यावर ते
घरी परतत असता, येशू (मुलगा) मात्र यरुशलेमातच
राहिला, पण त्याच्या आईवडिलांना हे माहीत नव्हते.
44कुठल्या तरी प्रवाश्यांच्या घोळक्याबरोबर तो येत असावा
असा विचार करून पुढे एक दिवसाचा प्रवास केला. मग
ते त्याला त्यांच्या नातेवाईकांमध्ये व मित्रांमध्ये शोधू लागले.
45जेव्हा तो त्यानां सापडला नाही तेव्हा त्याला शोधण्यासाठी
यरुशलेमास परत गेले.

46असे घडले की, तीन दिवसांनंतर तो त्यांना मंदिरात
सापडला. तो गुरुजनांच्यामध्ये बसून त्यांचे ऐकत होता व
त्यांना प्रश्न विचारीत होता. 47ज्यांनी त्याचे बोलणे ऐकले
ते सर्व त्याच्या समजबुद्धीमुळे आणि उत्तरांमुळे चकित
झाले.

48जेव्हा त्याच्या आईवडिलांनी त्याला पाहिले तेव्हा ते
चकित झाले. त्याची आई त्याला म्हणाली, "मुला, तू
आमच्याबरोबर असे का केले? तुला शोधत असताना
तुझे वडील व मी अतिशय काळजीत होतो."

49मग येशू त्यांना म्हणाला, "तुम्ही माझा शोध का
केलात? माझ्या पित्याचे कार्य जेथे आहे, तेथे मी असावे
हे तुम्हांला माहीत नव्हते काय?" 50परंतु त्याने हे जे उत्तर
दिले ते त्यांना समजले नाही.

51मग तो त्यांच्याबरोबर नासरेथास गेला. आणि तो
त्यांच्या आज्ञेत राहिला. त्याची आई या सर्व गोष्टी
अंत:करणात ठेवीत होती. 52येशू ज्ञानाने आणि शरीराने
देवाच्या आणि मनुष्यांच्या कृपेत वाढला.

### योहानाचा संदेश

***(मत्तय 3:1-12; मार्क 1:1-8; योहान 1:19-28)***

3 तिबिर्य कैसराच्या कारकीर्दीच्या पंधराव्या वर्षी, जेव्हा
पंतय पिलात यहूदीयाचा राज्यपाल होता, आणि हेरोद
गालीलचा अधिकारी असताना, आणि त्याचा भाऊ
फिलिप्प हा इतुरीया व त्राखोनीती या देशांचा अधिकारी
होता व लूसनिय हा अबिलेनेचा अधिकारी होता.

2हनन्या व केफा हे मुख्य याजक होते, तेव्हा वाळवंटात
देवाचे वचन जखऱ्याचा पुत्र योहान याच्याकडे आले. 3तो
यार्देनेच्या सभोवतालच्या सर्व परिसरात गेला, व लोकांना
त्यांच्या पापांपासून क्षमा मिळण्यासाठी पश्चात्तापाचा

---

**कबुतरांच्या ... करावा** लेवीय 12:8

बाप्तिस्मा घेण्याविषयी घोषणा करीत फिरला. 4हे यशया
संदेष्ट्याच्या पुस्तकात लिहिल्याप्रमाणे झाले:

"वाळवंटात कोणाचा तरी आवाज ऐकू आला, 'प्रभूसाठी
मार्ग तयार करा, त्याचे रस्ते सरळ करा.
5प्रत्येक दरी भरून येईल, आणि प्रत्येक डोंगर व
टेकडी सपाट केली जाईल वाकड्यातिकड्या जागा
सरळ केल्या जातील ओबडधोबड रस्ते सपाट केले जातील
6आणि सर्व लोक देवाचे तारण पाहतील!'"

*यशया 40:3-5*

7त्याच्याकडून बाप्तिस्मा करून घेण्यासाठी येणाऱ्या
जमावाला योहान म्हणाला: "अहो, सापाच्या पिल्लांनो,
येणाऱ्या क्रोधापासून सुटका करून घेण्यासाठी तुम्हांला
कोणी सावध केले? 8पश्चात्तापास योग्य असे फळ द्या,
आणि आपापसात असे म्हणू नका की, 'आमच्यासाठी
अब्राहाम आमच्या पित्यासारखा आहे.' मी तुम्हांला सांगतो
की, अब्राहामासाठी मुले निर्माण करण्यास देव या खडकांचा
उपयोग करण्यास समर्थ आहे. 9आणि झाडांच्या मुळांशी
कुऱ्हाड अगोदरच ठेवलेली आहे. आणि प्रत्येक झाड जे
चांगले फळ देत नाही ते तोडून आगीत टाकले जाईल."
10जमावाने त्याला विचारले, "मग आता आम्ही काय
करावे?"
11त्याने उत्तर दिले, "ज्याच्याकडे दोन सदरे असतील
त्याने ज्याच्याकडे काहीच नाही त्याला ते वाटून द्यावे.
ज्याच्याकडे अन्न आहे त्यानेही तसेच करावे."
12काही जकातदारही बाप्तिस्मा करून घ्यावयास आले
होते. ते म्हणाले, "गुरुजी, आम्ही काय करावे?"
13तो त्यांना म्हणाला, "गरजेपेक्षा जास्त जमा करू नका."
हेच तुम्हांला सांगितले आहे. 14काही शिपायांनीसुद्धा त्याला
विचारले, "आणि आम्ही काय करावे?"
योहान त्यांना म्हणाला, "कोणाकडून बळजबरीने पैसे
घेऊ नका, कोणावरही खोटा आरोप करू नका. आणि
तुम्हांला मिळणाऱ्या पगारात समाधानी राहा."
15लोक मशीहाची अपेक्षा करीत होते. आणि ते सर्व
त्यांच्या मनामध्ये योहानाबद्दल आश्चर्य करीत होते व
असा विचार करीत होते की, "कदाचित तो ख्रिस्त
असण्याची शक्यता आहे."
16त्या सर्वांना योहानाने उत्तर दिले; तो म्हणाला, "मी
तुमचा बाप्तिस्मा पाण्याने करतो, पण एकजण जो
माझ्यापेक्षाही सामर्थ्यशाली आहे तो येत आहे. त्याच्या
वहाणांचे बंद सोडण्यासही मी पात्र नाही. तो तुमचा बाप्तिस्मा
पवित्र आत्म्याने व अग्नीने करील. 17त्याचे खळे स्वच्छ
करण्यासाठी व त्याच्या कोठारात गहू साठविण्यासाठी
त्याच्या हातात त्याचे सूप आहे पण भुसा तो न विझविता
येणाऱ्या अग्नीने जाळून टाकील." 18योहानाने इतर पुष्कळ
उत्तेजन देणाऱ्या शब्दांनी त्यांना बोध करून सुवार्ता
सांगितली.
19योहानाने हेरोद या सत्ताधीशाची कानउघडणी केली.
कारण त्याने त्याच्या भावाच्या पत्नीशी–हेरोदीयाशी
अनैतिक संबंध होते, तसेच इतर अनेक वाईट गोष्टी
त्याने केल्या होत्या. 20हे सर्व करून सुद्धा त्यात भर
म्हणून की काय त्याने योहानाला तुरुंगात टाकले.

## योहानाकरवी येशूचा बाप्तिस्मा
***(मत्तय 3:13-17; मार्क 1:9-11)***

21तेव्हा असे झाले की, जेव्हा सर्व लोकांचा बाप्तिस्मा
केला जात होता, तेव्हा येशूचा सुद्धा बाप्तिस्मा झाला. तो
प्रार्थना करीत असता आकाश उघडले गेले. 22आणि
पवित्र आत्मा कबुतराच्या रूपात त्याच्यावर उतरला आणि
आकाशातून एक वाणी आली: "तू माझा प्रिय पुत्र आहेस,
मी तुझ्याविषयी फार संतुष्ट आहे."

## योसेफाच्या घराण्याचा इतिहास
***(मत्तय 1:1-17)***

23जेव्हा येशूने त्याच्या कार्यास सुरूवात केली तेव्हा तो
सुमारे तीस वर्षांचा होता. लोकांना असे वाटे की, येशू
योसेफाचा मुलगा आहे. योसेफ एलीचा मुलगा होता 24एली
मत्ताथाचा मुलगा होता, मत्ताथ लेवीचा मुलगा होता. लेवी
मल्खीचा मुलगा होता. मल्खी यन्नयाचा मुलगा होता. यन्नया
योसेफाचा मुलगा होता. 25योसेफ मत्तिथ्याचा मुलगा होता.
मत्तिथ्य अमोसाचा मुलगा होता. अमोस नहूमाचा मुलगा
होता. नहूम हेस्लीचा मुलगा होता. हेस्ली नग्गयाचा मुलगा
होता. 26नग्गय महथाचा मुलगा होता. महथ मत्तिथ्याचा
मुलगा होता. मत्तिथ्य शिमयीचा मुलगा होता. शिमयी
योसेखाचा मुलगा होता. योसेख योदाचा मुलगा होता.
27योदा योहानानाचा मुलगा होता. योहानान रेशाचा मुलगा
होता. रेशा जरूब्बाबेलाचा मुलगा होता. जरूब्बाबेल
शल्तीएलाचा मुलगा होता. शल्तीएल नेरीचा मुलगा होता.
28नेरी मल्खीचा मुलगा होता. मल्खी अद्दीचा मुलगा होता.
अद्दी कोसोमाचा मुलगा होता. कोसोम एल्मदामाचा मुलगा
होता. एल्मदाम एराचा मुलगा होता. 29एर येशूचा मुलगा
होता. येशू अलिएजरचा मुलगा होता. अलिएजर योरीमाचा
मुलगा होता. योरीम मत्ताथाचा मुलगा होता. मत्ताथ लेवीचा
मुलगा होता. 30लेवी शिमोनाचा मुलगा होता. शिमोन
यहूदाचा मुलगा होता. यहूदा योसेफाचा मुलगा होता. योसेफ
योनामाचा मुलगा होता. योनाम एल्याकीमाचा मुलगा होता.
31एल्याकीम मल्ल्याचा मुलगा होता. मल्ल्या मिन्नाचा
मुलगा होता. मिन्ना मत्ताथाचा मुलगा होता. मत्ताथ नाथानाचा
मुलगा होता. नाथान दाविदाचा मुलगा होता. 32दावीद
इशायाचा मुलगा होता. इशाय ओबेदाचा मुलगा होता.
ओबेद बवाजाचा मुलगा होता. बवाज सल्मोनाचा मुलगा
होता. सल्मोन नहशोनाचा मुलगा होता.
33नहशोन अम्मीनादाबाचा मुलगा होता. अम्मीनादाब
अर्णयाचा मुलगा होता. अर्णय हेस्रोनाचा मुलगा होता.

हेस्रोन पेरेसाचा मुलगा होता. पेरेस यहूदाचा मुलगा होता.
34यहूदा याकोबाचा मुलगा होता. याकोब इसहाकाचा मुलगा
होता. इसहाक अब्राहामाचा मुलगा होता. अब्राहाम तेरहाचा
मुलगा होता. तेरह नाहोराचा मुलगा होता. 35नाहोर सरुगाचा
मुलगा होता. सरुग रऊचा मुलगा होता. रऊ पेलेगाचा
मुलगा होता. पेलेग एबराचा मुलगा होता. एबर शेलहाचा
मुलगा होता.
36शेलह केनानाचा मुलगा होता. केनान अर्पक्षदाचा
मुलगा होता. अर्पक्षद शेमाचा मुलगा होता. शेम नोहाचा
मुलगा होता. नोहा लामेखाचा मुलगा होता. 37लामेख
मथुशलहाचा मुलगा होता. मथुशलह हनोखाचा मुलगा
होता. हनोख यारेदाचा मुलगा होता. यारेद महललेलाचा
मुलगा होता. महललेल केनानाचा मुलगा होता.
38केनान अनोशाचा मुलगा होता. अनोश शेथाचा मुलगा
होता. शेथ आदामाचा मुलगा होता. आदाम देवाचा मुलगा
होता.

## येशूची परीक्षा
**(*मत्तय 4:1-11; मार्क 1:12-13*)**

4 येशू पवित्र आत्म्याने पूर्ण भरून यार्देन नदीहून परतला.
मग आत्म्याने त्याला अरण्यात नेले. 2तेथे सैतानाने
त्याला चाळीस दिवस मोहात टाकले. त्या दिवसांत येशूने
काहीही खाल्ले नाही. जेव्हा ती वेळ संपली, तेव्हा येशूला
भूक लागली.
3सैतान त्याला म्हणाला, "जर तू देवाचा पुत्र आहेस, तर
या दगडांची भाकर करून दाखव."
4येशूने त्याला उत्तर दिले, "असे लिहिले आहे:

'मनुष्य फक्त भाकरीनेच जगेल असे नाही.'"
*अनुवाद 8:3*

5मग सैतान त्याला वर घेऊन गेला. आणि एका क्षणात
जगातील सर्व राज्ये त्याला दाखविली. 6सैतान त्याला
म्हणाला, "मी तुला या सर्व राज्यांचे अधिकार व गौरव
देईन कारण ते मला दिलेले आहे. आणि मी माझ्या
मर्जीनुसार ते देऊ शकतो. 7जर तू माझी उपासना करशील,
तर हे सर्व तुझे होईल."
8येशूने उत्तर दिले, पवित्र शास्त्रात असे लिहिले आहे:

"तू प्रभु तुझा देव याचीच उपासना केली पाहिजे, आणि
फक्त त्याचीच सेवा केली पाहिजे.'" *अनुवाद 6:13*

9नंतर त्याने त्याला यरुशलेमाला नेले. आणि मंदिराच्या
उंच टोकावर त्याला उभे केले. आणि तो म्हणाला, "जर
तू देवाचा पुत्र आहेस तर येथून खाली उडी मार! 10असे
लिहिले आहे:

'तो तुझे संरक्षण करण्याची देवदूतांना आज्ञा करील.'
*स्तोत्र. 91:11*

आणि असेही लिहिले आहे:

11'ते तुला आपल्या हातावर उचलून धरतील, त्यामुळे
तुझा पाय दगडावर आपटणार नाही.'" *स्तोत्र. 91:12*

12येशूने उत्तर दिले, "पवित्र शास्त्रात असेही म्हटले
आहे,

'तू प्रभु, तुझा देव याची परीक्षा पाहू नकोस.'"
*अनुवाद 6:16*

13म्हणून सैतानाने प्रत्येक प्रकारे भुरळ घालण्याचे
संपविल्यावर, योग्य वेळ येईपर्यंत तो येशूला सोडून गेला.

## येशू लोकांना शिकवितो
**(*मत्तय 4:12-17; मार्क 1:14-15*)**

14मग आत्म्याच्या सामर्थ्यात येशू गालीलास परतला
आणि त्याच्याविषयीची बातमी सगळीकडे पसरली. 15त्याने
त्यांच्या सभास्थानात शिकविले. आणि सर्वांनी त्याची स्तुति
केली. 16मग तो नासरेथला गेला. जेथे तो लहानाचा
मोठा झाला होता, आणि शब्बाथ दिवशी त्याच्या प्रथेप्रमाणे
तो सभास्थानात गेला. तो वाचण्यासाठी उभा राहिला,
17आणि यशया संदेष्ट्याचे पुस्तक त्याला देण्यात आले.
त्याने ते पुस्तक उघडले आणि जो भाग शोधून काढला,
त्या ठिकाणी असे लिहिले आहे:

18"प्रभूचा आत्मा मजवर आहे. कारण त्याने मला
अभिषेक केला आहे, यासाठी की, गरिबांना सुवार्ता
सांगण्यासाठी बंदीवान म्हणून नेलेल्यांस स्वातंत्र्याची घोषणा
करण्यासाठी, आंधळ्यांना दृष्टि मिळावी व त्यांनी बघावे
यासाठी, जुलूम होणाऱ्यांची सुटका करण्यासाठी
19आणि प्रभूच्या कृपेच्या वर्षाची घोषणा करण्यासाठी
त्याने मला पाठविले आहे."
*यशया 61:1-2*

20मग त्याने पुस्तक बंद केले आणि सेवकाला परत
दिले व तो खाली बसला. सभास्थानातील प्रत्येक जण
त्याच्याकडे रोखून पाहत होता. 21त्यांने त्यांच्याशी बोलण्यास
सुरुवात केली: "तुमच्या ऐकण्यामुळे आज हे शास्त्रवचन
पूर्ण झाले."
22तेव्हा प्रत्येकाने त्याच्याविषयी चांगले उद्गार काढले.
आणि त्याच्या मुखातून येणाऱ्या कृपेच्या शब्दांबद्दल ते
आश्चर्यचकित झाले. आणि ते म्हणाले, "हा योसेफाचाच
मुलगा नव्हे काय?"

23तो त्यांना म्हणाला, “अर्थात, तुम्ही मला ही म्हण
लागू कराल; ‘वैद्या, स्वत:ला बरे कर.’ कफर्णहूमात ज्या
गोष्टी तू केल्याचे आम्ही ऐकले त्या गोष्टी तुझ्या स्वत:च्या
गावातसुद्धा कर.”
मग तो म्हणाला, 24“मी तुम्हांला खरे सांगतो, कोणीही
संदेष्टा त्याच्या स्वत:च्या गावात स्वीकारला जात नाही.
25मी तुम्हांला खरे सांगतो, इस्राएलात एलीयाच्या काळात
पुष्कळ विधवा होत्या, जेव्हा साडेतीन वर्षेपर्यंत पाऊस
पडला नाही आणि सर्व प्रदेशात मोठा दुष्काळ पडला होता
26तरीही एलीयाला इतर कोणत्याही विधवेकडे पाठविण्यात
आले नाही. त्याला सिदोन प्रांतातील सारफथ येथील
विधवेकडेच पाठविण्यात आले. 27अलीशा संदेष्ट्याच्या
वेळेस इस्राएलात अनेक कुष्ठरोगी होते परंतु त्यापैकी
कोणीही शुद्ध झाला नाही. केवळ सूरीया येथील नामान
कुष्ठरोग्यालाच शुद्ध करण्यात आले होते.”
28जेव्हा सभास्थानातील लोकांनी हे ऐकले, तेव्हा ते
फार रागावले. 29ते लोक उठले आणि त्यांनी त्याला
(येशूला) शहराबाहेर घालवून दिले आणि ज्या टेकडीवर
त्यांचे गाव वसले होते, त्या टेकडीच्या कड्याकडे त्याला
ढकलून देण्यासाठी घेऊन गेले. 30परंतु तो त्यांच्यातून
निघून आपल्या वाटेने गेला.

## येशू अशुद्ध आत्मा असलेल्या मनुष्याला बरे करतो
### *(मार्क 1:21-28)*

31नंतर तो गालीलातील कफर्णहूम गावी गेला. तो त्यांना
शब्बाथ दिवशी शिक्षण देत असे. 32ते त्याच्या शिकवणीने
आश्चर्यचकित झाले, कारण तो अधिकारवाणीने
शिकवीत असे. 33सभास्थानात एक मनुष्य होता, त्याच्यात
अशुद्ध आत्मा होता. 34तो मोठ्याने ओरडून म्हणाला, “हे
नासरेथच्या येशू, तुला आमच्याकडून काय पाहिजे? तू
आमचा नाश करावयास आला आहेस काय? तू कोण
आहेस हे मला माहीत आहे: देवाचा पवित्र तोच तू आहेस.”
35येशूने त्याला दटावले आणि म्हटले, “शांत राहा आणि
त्याच्यातून नीघ!” तेव्हा त्या अशुद्ध आत्म्याने त्या मनुष्याला
जमिनीवर खाली ढकलले व त्या माणसाला काहीही इजा
न करता तो बाहेर आला.
36सर्व जण आश्चर्यचकित झाले व एकमेकांशी बोलू
लागले, “हे कोणत्या प्रकारचे शब्द आहेत? अधिकाराने
आणि सामर्थ्याने तो अशुद्ध आत्म्यांना आज्ञा करतो व ते
बाहेर येतात.” 37अशा प्रकारे त्या भागात त्याच्याविषयी
सगळीकडे ही बातमी पसरली.

## येशू एका स्त्रीला बरे करतो
### *(मत्तय 8:14-17; मार्क 1:29-34)*

38येशू सभास्थानातून निघून शिमोनाच्या घरी गेला.
शिमोनाची सासू अति तापाने आजारी होती. त्यांनी येशूला
तिला बरे करण्याविषयी विनविले. 39येशू तिच्याजवळ
उभा राहिला. त्याने तापाला आज्ञा दिली व ताप निघाला.
ती ताबडतोब उठली आणि त्यांची सेवा करू लागली.

## इतर अनेकांना येशू बरे करतो

40सूर्य मावळतीला जात असताना, ज्यांची माणसे
निरनिराळ्या रोगांनी आजारी होती त्या सर्वांना लोकांनी
त्याच्याकडे आणले. प्रत्येकाच्या डोक्यावर हात ठेवून त्याने
त्यांना बरे केले. 41कित्येकांमधून अशुद्ध आत्मे बाहेर
आले. ते अशुद्ध आत्मे ओरडत होते आणि म्हणत होते,
“तू देवाचा पुत्र आहेस.” परंतु त्याने त्यांना दटावले व बोलू
दिले नाही कारण त्यांना माहीत होते की, तो ख्रिस्त आहे.

## येशू इतर शहरांमध्ये जातो
### *(मार्क 1:35-39)*

42जेव्हा दिवस उगवला तेव्हा तो एकांत स्थळी गेला.
पण लोक त्याला शोधत होते. तो जेथे होता तेथे ते लगेच
आले. आणि त्याने त्यांच्यातून निघून जाऊ नये म्हणून
प्रयत्न केले. 43तेव्हा तो त्यांना म्हणाला, “देवाच्या राज्याची
सुवार्ता मला इतर गावांमध्येही सांगितली पाहिजे. कारण
याच कारणासाठी मला पाठविले आहे.”
44आणि तो यहूदीयाच्या वेगवेगळ्या सभास्थानात उपदेश
करीत होता.

## पेत्र, याकोब आणि योहान येशूच्या मागे जातात
### *(मत्तय 4:18-22; मार्क 1:16-20)*

5 मग असे झाले की, लोकांनी त्याच्याभोवती गर्दी
केली होती व ते देवाचे वचन ऐकत होते आणि तो
गनेसरेत सरोवराच्या काठी उभा होता, 2तेव्हा त्याने
सरोवरातील दोन होड्या पाहिल्या, पण होड्यातील कोळी
बाहेर गेले होते व त्यांची जाळी धूत होते. 3त्यातील,
शिमोनाच्या होडीवर येशू चढला आणि त्याने ती होडी
किनाऱ्यापासून थोडी दूर नेण्यास सांगितले. नंतर तो होडीत
बसला व लोकांना शिक्षण देऊ लागला.
4जेव्हा त्याने बोलणे संपविले, तेव्हा तो शिमोनाला
म्हणाला, “खोल पाण्यात होडी ने आणि मासे पकडण्यासाठी
तुझे जाळे खाली सोड.”
5शिमोनाने उत्तर दिले, “गुरुजी संपूर्ण रात्र आम्ही खूप
कष्ट घेतले पण काहीच मासे पकडू शकलो नाही. तरी
आपण सांगत आहात म्हणून मी जाळे खाली सोडतो.”
6जेव्हा त्यांनी तसे केले तेव्हा त्यांच्या जाळ्यात भरपूर
मासे लागले. पण त्यांचे जाळे तुटू लागल्याने 7त्यांनी दुसऱ्या
होडीतील आपल्या जोडीदारांना मदत करण्यासाठी
बोलाविले. ते आले आणि त्यांनी इतके मासे भरले की,
दोन्ही होड्या बुडू लागल्या. 8शिमोन पेत्राने जेव्हा हे पाहिले
तेव्हा तो येशूच्या पाया पडला आणि म्हणाला, “प्रभु,
माझ्यापासून दूर जा कारण मी पापी मनुष्य आहे!”

9तो असे म्हणाला कारण तो आणि त्याच्या साथीदारांना
इतके मासे मिळाले होते की, हे कसे झाले म्हणून ते
आश्चर्यात पडले. 10जब्दीचे पुत्र याकोब व योहान हे ही
त्यांच्याप्रमाणे आश्चर्यचकित झाले होते. ते शिमोनाचे
भागीदार होते.
मग येशू शिमोनाला म्हणाला, “भिऊ नको. कारण
येथून पुढे तू माणसे धरशील.”
11त्यांनी त्यांच्या होड्या किनाऱ्याला आणल्या, नंतर
त्यानी सर्व काही सोडले आणि त्याच्यामागे गेले.

## येशू एका आजारी माणसाला बरे करतो
### (*मत्तय 8:1-4; मार्क 1:40-45*)

12आणि असे झाले की, तेव्हा येशू कुठल्या एका गावात
असता तेथे कुष्ठाने भरलेला एक मनुष्य होता. जेव्हा
त्याने येशूला पाहिले तेव्हा तो तोंडावर उपडा पडला आणि
त्याला विनंति केली, “प्रभु, जर तुझी इच्छा असेल तर तू
मला बरे करण्यास समर्थ आहेस.”
13येशूने आपला हात लांब करून त्याला स्पर्श केला
आणि म्हटले, “मला तुला बरे करायचे आहे, बरा हो!”
आणि ताबडतोब त्याचे कुष्ठ नाहीसे झाले. 14मग येशूने
त्याला आज्ञा केली की, “कोणालाही सांगू नकोस. पण
जा आणि स्वत:ला याजकाला दाखव आणि तुझ्या
शुद्धतेबद्दल मोशेने आज्ञा केल्याप्रमाणे अर्पण कर. त्यांना
समजेल की तू बरा झाला आहेस. ते आश्चर्यचकित
झाले. त्यांच्यासाठी हा पुरावा म्हणून कर.”
15परंतु येशूविषयीच्या बातम्या अधिक पसरतच गेल्या.
आणि मोठे जमाव त्याचे ऐकण्यासाठी व त्यांच्या रोगांपासून
मुक्त होण्यासाठी येत असत.
16परंतु येशू नेहमी एकांतात जात असे व प्रार्थना करीत
असे.

## येशू एका लंगड्या मनुष्याला बरे करतो
### (*मत्तय 9:1-8; मार्क 2:1-12*)

17असे झाले की एके दिवशी तो शिक्षण देत असता
तेथे परूशी व नियमशास्त्राचे शिक्षक बसले होते. ते गालील,
यहूदीया आणि यरूशलेम या भागातील प्रत्येक गावातून
आले होते. प्रभूचे सामर्थ्य त्याच्याजवळ होते त्यामुळे तो
बरे करत होता. 18काही लोक एका अर्धांगवायु झालेल्या
मनुष्याला बिछान्यात घालून घेऊन आले. त्यांनी त्याला
आत आणण्याचा व येशूसमोर खाली ठेवण्याचा प्रयत्न
केला. 19परंतु गर्दीमुळे आत आणण्याचा मार्ग त्यांना
सापडेना. ते छपरावर गेले, आणि त्याला खाटेसहित आत
सोडले. कौले काढून बरोबर मध्यभागी जेथे येशू बसला
होता तेथे सोडले.
20त्यांचा विश्वास पाहून येशू त्याला म्हणाला, “मनुष्या,
तुझ्या पापांची क्षमा झाली आहे!”

21नियमशास्त्राचे शिक्षक आणि परूशी स्वत:शी विचार
करू लागले: “हा कोण आहे, जो असे दुर्भाषण करीत
आहे? देवाशिवाय कोण पापांची क्षमा करू शकतो?”
22पण येशू त्यांचे विचार जाणून होता. तो त्यांना म्हणाला,
“तुम्ही आपल्या अंत:करणात असा विचार का करता?
23‘तुझ्या पापांची क्षमा झाली आहे’ किंवा ‘ऊठ आणि
चालू लाग’ यांतील कोणते म्हणणे सोपे आहे? 24पण तुम्हांला
हे कळावे की मनुष्याच्या पुत्राला* पृथ्वीवर पापांची क्षमा
करण्याचा अधिकार आहे.” तो अर्धांगवायु झालेल्या
मनुष्याला म्हणाला, “मी तुला सांगतो ऊठ, आपला बिछाना
उचल आणि घरी जा.”
25ताबडतोब तो उभा राहिला. ज्या बिछान्यावर तो झोपला
होता तो त्याने उचलला व देवाची स्तुति करीत आपल्या
घरी गेला. 26आणि ते सर्व आश्चर्यचकित झाले, आणि
देवाची स्तुति करू लागले. ते खरोखरच आश्चर्यचकित
झाले. ते म्हणाले, “आम्ही आज आश्चर्य पाहिले!”

## लेवी येशूमागे जातो
### (*मत्तय 9:9-13; मार्क 2:13-17*)

27यानंतर येशू बाहेर गेला आणि त्याने लेवी नावाच्या
जकातदाराला जकात नाक्यावर बसलेले पाहिले. येशू
त्याला म्हणाला, “माझ्या मागे ये!” 28लेवी सर्व काही
तेथेच सोडून उठला आणि त्याच्या मागे गेला.
29नंतर लेवीने त्याच्या घरी येशूसाठी मोठी मेजवानी
दिली. जकातदारांचा आणि इतर लोकांचा मोठा जमाव
त्याच्याबरोबर जेवत होता. 30परूशी आणि नियमशास्त्राचे
शिक्षक यांनी त्याच्या शिष्यांकडे तक्रार केली. ते म्हणाले,
“तुम्ही जकातदार आणि पापी लोकांबरोबर का जेवता?”
31येशू त्यांना म्हणाला, “जे निरोगी आहेत त्यांना वैद्याची
गरज नाही, पण जे रोगी आहेत, त्यांना वैद्याची गरज
आहे. 32मी धार्मिकांस नाही तर पाप्यांस पश्चात्ताप
करण्यासाठी बोलावण्यास आलो आहे.

## येशू उपासासंबंधीच्या प्रश्नाचे उत्तर देतो
### (*मत्तय 9:14-17; मार्क 2:18-22*)

33ते त्याला म्हणाले, योहानाचे शिष्य नेहमी उपास
करतात आणि प्रार्थना करतात. आणि परूश्यांचे शिष्यसुद्धा
तसेच करतात, पण तुझे शिष्य नेहमीच खातपीत असतात.”
34येशू त्यांना म्हणाला, “नवरा मुलगा (वर) बरोबर
असताना त्याच्या पाहुण्यांना तुम्ही उपाशी ठेवाल काय?
35पण असे दिवस येत आहेत की, वराला त्यांच्यापासून
घेतले जाईल आणि त्या दिवसांत ते उपास करतील.”
36त्याने त्यांना आणखी एक बोधकथा सांगितली,
“कोणीही नवीन कापडाचा तुकडा फाडून जुन्याला लावीत

---

**मनुष्याच्या पुत्राला** येशू. दानीएल 7:13-14. मशीहासाठी हे नाव दिलेले आहे. लोकांचे तारण करण्यासाठी देवाने निवडलेला.

नाही, जर तो तसे करतो तर तो नवे कापड फाडतो पण नव्या कापडांचे ठिगळ जुन्या कापडाला योग्य दिसणार नाही.

37आणि कोणीही नवा द्राक्षारस जुन्या द्राक्षारसाच्या कातडी पिशवीत ठेवीत नाही जर तो असे करतो तर नवा द्राक्षारस कातडी पिशवी फोडून बाहेर उसळेल. 38नवा द्राक्षारस नव्या कातडी पिशवीतच ठेवला पाहिजे. 39कोणालाही जुना द्राक्षारस प्याल्यानंतर नवा नको असतो कारण तो म्हणतो, 'जुना द्राक्षारसच चांगला आहे.'"

### येशू हा शब्बाथाच्या दिवसाचा प्रभु आहे
*(मत्तय 12:1-8; मार्क 2:23-28)*

6 नंतर असे झाले की, शब्बाथ दिवशी येशू शेतामधून जात होता. आणि त्याचे शिष्य धान्याची कणसे मोडून हातावर चोळून खात होते. 2मग परूश्यांपैकी काही म्हणाले, "शब्बाथ दिवशी जे करण्यास मना आहे, ते तुम्ही का करता?"

3येशूने त्यांना म्हटले, "जेव्हा दावीद व त्याच्याबरोबर असलेल्यांना भूक लागली तेव्हा त्यांनी काय केले हे तुम्ही वाचले नाही काय? 4तुम्ही हे ऐकले नाही का की, तो देवाच्या मंदिरात गेला आणि अर्पणाची भाकर त्याने खाल्ली व त्याच्याबरोबर जे होते त्यांना दिली. जी भाकर फक्त याजकच खाऊ शकत असे ती त्यांनी खाल्ली." 5येशू त्यांना म्हणाला, "मनुष्याचा पुत्र शब्बाथाचा प्रभु आहे."

### येशू एका मनुष्याला शब्बाथ दिवशी बरे करतो
*(मत्तय 12:9-14; मार्क 3:1-6)*

6असे झाले की दुसऱ्या एका शब्बाथाच्या दिवशी येशू सभास्थानात गेला, आणि शिकवू लागला. तेव्हा तेथे एक मनुष्य होता. त्याचा उजवा हात वाळलेला होता. 7येशू शब्बाथ दिवशी कोणाला बरे करतो की काय हे पाहण्यासाठी नियमशास्त्राचे शिक्षक व परूशी त्याच्यावर पाळत ठेवून होते. यासाठी की, त्याच्यावर आरोप ठेवण्यासाठी त्यांना काहीतरी कारण मिळावे.

8त्याला त्यांचे विचार माहीत होते, पण वाळलेल्या हाताच्या मनुष्याला तो म्हणाला, "ऊठ आणि सर्वांसमोर उभा राहा!" आणि तो मनुष्य उठला आणि तेथे उभा राहिला.

9येशू त्यांना म्हणाला," मी तुम्हांला विचारतो, शब्बाथ दिवशी कोणत्या गोष्टी करायला परवानगी आहे? चांगले करणे की वाईट करणे? कोणते कायदेशीर आहे, एखाद्याचा जीव वाचविणे का जीव घेणे? 10येशूने सर्वांकडे पाहिले, मग तो त्या मनुष्याला म्हणाला, "हात सरळ कर." त्याने हात सरळ केला आणि त्याचा हात बरा झाला. 11पण परूशी व नियमशास्त्राचे शिक्षक खूप रागावले व येशूविषयी काय करता येईल याविषयी आपापसात चर्चा करू लागले.

### येशू त्याच्या बारा शिष्यांना निवडतो
*(मत्तय 10:1-4; मार्क 3:13-19)*

12त्या दिवसांत असे झाले की, येशू प्रार्थना करण्यासाठी डोंगरावर गेला. त्याने ती रात्र देवाची प्रार्थना करण्यात घालविली. 13जेव्हा दिवस उगवला, तेव्हा त्याने शिष्यांना आपणांकडे बोलाविले. त्याने त्यांच्यातील बारा जणांना निवडले व त्यांना "प्रेषित" असे नाव दिले. 14शिमोन– त्याला पेत्र हे सुद्धा नाव दिले, आंद्रिया (पेत्राचा भाऊ), याकोब आणि योहान, फिलिप्प, बर्थलमय, 15मत्तय, थोमा, अल्फीचा पुत्र याकोब, शिमोन ज्याला जिलोट म्हणत, 16याकोबाचा पुत्र यहूदा व यहूदा इस्कर्योत, जो पुढे विश्वासघात करणारा निघाला.

### येशू लोकांना शिकवितो आणि रोग्यांस बरे करतो
*(मत्तय 4:23-25; 5:1-12)*

17तो त्यांच्याबरोबर खाली उतरला व सपाट जागेवर उभा राहिला आणि त्याच्या अनुयायांचा मोठा समुदाय तेथे आला होता. व यहूदीया, यरूशलेम, सोर आणि सिदोनच्या समुद्रकिनाऱ्याकडचे असे पुष्कळसे लोक तेथे आले होते.

18ते तेथे त्याचे ऐकण्यास व त्यांच्या रोगापासून बरे होण्यास आले होते. व ज्यांना अशुद्ध आत्म्यांची बाधा होती त्यांनाही त्यांच्या व्याधींपासून मुक्त करण्यात आले. 19सगळा लोकसमुदाय त्याला स्पर्श करू पाहत होता. कारण त्याच्यामधून सामर्थ्य येत होते व ते सर्वांना बरे करीत होते.

20येशूने आपल्या शिष्यांकडे पाहिले व म्हणाला,

"जे तुम्ही गरीब आहात ते तुम्ही आशीर्वादित आहात कारण देवाचे राज्य तुमचे आहे.

21तुम्ही जे भुकेले ते आशीर्वादित आहात कारण तुम्ही तृप्त व्हाल. आता तुम्ही जे रडता ते तुम्ही आशीर्वादित आहात कारण तुम्ही हसाल.

22"जेव्हा लोक तुमचा द्वेष करतील, तुम्हांला वाळीत टाकतील आणि तुमचा अपमान करतील, जेव्हा तुमचे नाव ते वाईट समजतील आणि मनुष्याच्या पुत्रामुळे तुम्हाला नाकारतील, तेव्हा तुम्ही आशीर्वादित व्हाल. 23त्या दिवशी तुम्ही आनंद करा. आनंदाने उड्या मारा कारण स्वर्गात तुमचे बक्षीस मोठे आहे! कारण त्यांच्या पूर्वजांनी संदेष्ट्यांना सुध्दा तसेच केले.

24"पण श्रीमंतानो, तुम्हांला दु:ख होवो कारण तुम्हांला अगोदरच सर्व सुख मिळाले आहे.

25जे तुम्ही तृप्त आहात त्या तुम्हांला दु:ख होवो, कारण तुम्ही भुकेले व्हाल. जे आता हसतात त्यांना दु:ख होवो कारण तुम्ही शोक कराल आणि रडाल.

26“जेव्हा सर्व तुमच्याविषयी चांगले बोलतील तेव्हा
तुम्हांला दु:ख होवो कारण त्यांच्या वाडवडिलांनी खोट्या
संदेष्ट्यांना असेच केले.

## तुमच्या शत्रूवर प्रेम करा
*(मत्तय 5:38-48; 7:12)*

27“माझे ऐकणाऱ्यांना मी सांगतो. तुमच्या शत्रूंवर प्रेम
करा. जे तुमचा द्वेष करतात, त्यांचे चांगले करा. 28जे
तुम्हांला शाप देतात त्यांना आशीर्वाद द्या. जे तुम्हांला
वाईट वागवितात त्यांच्यासाठी प्रार्थना करा. 29जर कोणी
तुमच्या एका गालावर मारतो तर त्याच्यासमोर दुसरा पण
गाल करा. जर कोणी तुमचा अंगरखा घेतो तर त्याला
तुमचा सदराही घेऊ द्या. 30जे तुम्हांला मागतात त्या
प्रत्येकाला द्या आणि जो तुमचे घेतो ते परत मागू नका.
31लोकांनी तुमच्याशी जसे वागावे असे तुम्हांला वाटते
तसेच तुम्हीही त्यांच्याशी वागा. 32तुमच्यावर जे प्रेम करतात
त्यांच्यावर जर तुम्ही प्रेम केले, तर तुम्ही काय विशेष
केले? पापी लोकसुद्धा, जे त्यांच्यावर प्रेम करतात,
त्यांच्यावर प्रेम करतात. 33तुमचे जे चांगले करतात, त्यांचे
जर तुम्ही चांगले करता तर तुम्हांला काय लाभ? पापीसुद्धा
असेच करतात. 34ज्यांच्याकडून तुम्हांला परत मिळेल
अशी आशा असते, त्यांना जर उसने देता तर तुम्हांला
काय लाभ? पापीसुद्धा परत मिळावे या उद्देशाने दुसऱ्या
पाप्याला उसने देतात.
35पण तुमच्या शत्रूवर प्रेम करा आणि त्यांचे चांगले
करा. व कोणतीही अपेक्षा न ठेवता उसने द्या. मग तुमचे
बक्षीस मोठे असेल व तुम्ही सर्वोच्च देवाचे पुत्र व्हाल.
कारण देव हा कृतघ्न व दुष्ट लोकांवर दया करतो.
36जसा तुमचा पिता कनवाळू आहे तसे तुम्हीही कनवाळू
व्हा.

## स्वत:कडे पाहा
*(मत्तय 7:1-5)*

37“दुसऱ्यांचा न्याय करू नका, म्हणजे तुमचाही न्याय
होणार नाही. दुसऱ्यांना दोषी ठरवू नका म्हणजे तुम्हांला
दोषी ठरविले जाणार नाही. दुसऱ्यांची क्षमा करा म्हणजे
तुमचीही क्षमा केली जाईल. 38दुसऱ्यांना द्या म्हणजे
तुम्हांलाही दिले जाईल. तुमच्या पदरात हलवून, दाबून,
ओसंडून वाहणारे उत्तम माप ओतले जाईल. जे माप तुम्ही
दुसऱ्यांसाठी वापरता त्याच मापाने तुम्हांला दिले जाईल.”
39त्याने त्यांना एक गोष्ट सांगितली: “एक आंधळा
दुसऱ्या आंधळ्याला मार्ग दाखवू शकेल काय? ते दोघेही
खड्ड्यात पडणार नाहीत काय? 40कोणताही शिष्य त्याच्या
गुरूच्या पातळीला जाऊ शकत नाही. पण प्रत्येक मनुष्य
जेव्हा तो पूर्ण शिकतो तेव्हा तो गुरुसारखाच असतो.
41“तू आपल्या भावाच्या डोळ्यतील कुसळ का पाहतोस?
स्वत:च्या डोळ्यातील मुसळ तुला दिसत नाही काय? 42तू
तुझ्या भावाला कसे म्हणू शकतोस, ‘बंधु, तुझ्या डोळ्यातील
कुसळ मला काढू दे.’ तुझ्या स्वत:च्या डोळ्यातील मुसळ
तुला दिसत नाही? ढोंग्या, प्रथम तुझ्या डोळ्यातील मुसळ
काढ मगच तुला तुझ्या भावाच्या डोळ्यातील कुसळ
काढताना चांगले दिसेल.

## दोन प्रकारची फळे
*(मत्तय 7:17-20; 12:34-35)*

43“कोणतेही चांगले झाड असे नाही की जे वाईट फळ
देते, किंवा कोणतेही वाईट झाड असे नाही की जे चांगले
फळ देते. 44कारण प्रत्येक झाड हे त्याच्या फळावरून
ओळखले जाते. लोक काटेरी झुडुपातून अंजिरे गोळा
करीत नाहीत तसेच काटेरी झुडुपातून ते द्राक्षे गोळा करीत
नाहीत. 45चांगला मनुष्य त्याच्या अंत:करणात ज्या चांगल्या
गोष्टी साठविलेल्या असतात त्याच काढतो आणि दुष्ट
मनुष्य त्याच्या अंत:करणात जे वाईट आहे तेच बाहेर
काढतो. कारण मनुष्याच्या अंत:करणात जे असते तेच तो
मुखाद्वारे बोलतो.

## दोन प्रकारचे लोक
*(मत्तय 7:24-27)*

46“तुम्ही मला प्रभु, प्रभु, का म्हणता, आणि मी जे
सांगतो ते तुम्ही का करीत नाही? 47प्रत्येक जण जो
माझ्याकडे येतो व माझी वचने ऐकतो व त्या आज्ञा पाळतो–
तो कसा आहे हे मी तुम्हांला दाखवितो: 48तो एका घर
बांधणाऱ्या मनुष्यासारखा आहे. त्याने खोल खोदले आणि
खडकावर पाया बांधला. मग पूर आला, तेव्हा नदीचे
पाणी घरावर आदळले. पण पाण्याने ते हलले नाही. कारण
ते चांगले बांधले होते.
49पण जो कोणी माझी वचने ऐकतो पण ती पाळीत
नाही, तो, ज्याने आपले घर पाया न घालता जमिनीवर
बांधले त्या मनुष्यासारखा आहे. नदीच्या पुराचे पाणी घरावर
आदळते व ते घर लगेच कोसळते आणि घर पूर्णपणे नष्ट
होते.”

## येशू एका नोकराला बरे करतो
*(मत्तय 8:5-13; योहान 4:43-54)*

7 ज्या बोधकथा लोकांनी ऐकाव्यात असे त्याला वाटत
होते त्या सांगण्याचे संपविल्यावर तो कफर्णहूमास
गेला. 2तेथे एक रोमी शताधिपती होता. त्याचा गुलाम
इतका आजारी होता की, तो मरावयास टेकला होता. हा
गुलाम त्या शताधिपतीचा फार आवडता होता. 3जेव्हा
शताधिपतीने येशूविषयी ऐकले तेव्हा त्याने काही यहूदी
वडील जनांना त्याच्याकडे पाठविले, व अशी विनंति केली
की, त्याने येऊन त्याच्या गुलामाला वाचवावे. 4जेव्हा ते
येशूकडे आले तेव्हा त्यांनी मन:पूर्वक विनंति केली. ते
म्हणाले, “तू त्याच्यासाठी हे करावेस कारण तो त्या योग्यतेचा

आहे. [5]कारण तो आमच्या लोकांवर प्रेम करतो, त्याने आमचे सभास्थान आम्हांला बांधून दिले."

[6]म्हणून येशू त्यांच्याबरोबर गेला. तो घरापासून दूर नव्हता, तोच शताधिपतीने मित्रांना असे सांगण्यासाठी पाठविले की, "प्रभु, आपण त्रास करून घेऊ नका. कारण आपण माझ्या घरी यावे इतकी माझी योग्यता नाही. [7]यासाठीच मी स्वत: आपणाकडे येऊ नये असा विचार केला होता. परंतु तुम्ही फक्त शब्द बोला, म्हणजे माझा चाकर बरा होईल. [8]कारण मीही ताबेदार असून माझ्या अधिपत्याखाली शिपाई आहेत. मी एखाद्याला 'जा' असे म्हणतो, आणि तो जातो. दुसऱ्याला 'ये' म्हणतो आणि तो येतो. मी माझ्या गुलामाला म्हणतो, 'हे कर!' आणि तो ते करतो."

[9]जेव्हा येशूने हे ऐकले तेव्हा त्याला त्याच्याविषयी (शताधिपतीविषयी) आश्चर्य वाटले. तो त्याच्यामागे येणाऱ्या जमावाकडे वळून म्हणाला, "मी तुम्हांला सांगतो, असा विश्वास मला इस्राएलात देखील आढळला नाही." [10]ज्यांना पाठविले होते, ते घराकडे परतले, तेव्हा त्यांना आढळून आले की, तो सेवक बरा झाला आहे.

### येशू एका मेलेल्या माणसाला जिवंत करतो

[11]नंतर असे झाले की, येशू नाईन नावाच्या गावाला गेला. त्याच्याबरोबर त्याचे शिष्य व मोठा समुदाय होता. [12]तो गावाच्या वेशीजवळ आला असता, एका मेलेल्या माणसाला अंत्यविधीकरिता नेले जात होते. तो त्याच्या आईचा एकुलता एक मुलगा होता. आणि ती विधवा होती. आणि गावातील बरेच लोक तिच्याबरोबर होते. [13]जेव्हा प्रभूने तिला पाहिले, त्याला तिची अनुकंपा वाटली व तो तिला म्हणाला, "रडू नकोस." [14]नंतर तो पुढे तिरडीजवळ गेला व तिला स्पर्श केला. जे लोक तिरडी वाहून नेत होते, ते थांबले. [15]तेव्हा येशू म्हणाला, "तरुणा, मी तुला सांगतो, ऊठ!" आणि तो मृत मनुष्य उठून बसला व बोलू लागला. मग येशूने त्याला त्याच्या आईकडे दिले.

[16]ते सर्व भयचकित झाले, त्यांनी देवाचे गौरव केले; ते म्हणाले, "आमच्यामध्ये एक महान संदेष्टा प्रगट झाला आहे." आणि म्हणाले, "देव त्याच्या लोकांना मदत करण्यास आला आहे.!"

[17]येशूविषयीची ही बातमी सर्व यहूदीयात आणि सभोवतालच्या परिसरात पसरली.

### योहान प्रश्न विचारतो
### *(मत्तय 11:2-19)*

[18]योहानाच्या शिष्यांनी योहानाला जाऊन हे सर्व सांगितले, नंतर योहानाने आपल्या दोन शिष्यांना बोलाविले [19]आणि त्याने त्यांना प्रभूकडे हे विचारण्यासाठी पाठविले की. "जो येणारा तो तूच आहेस की, आम्ही दुसऱ्या कोणाची तरी अपेक्षा करावी?" [20]जेव्हा लोक त्याच्याकडे आले, ते म्हणाले, "बाप्तिस्मा करणाऱ्या योहानाने आम्हांला तुमच्याकडे हे विचारण्यास पाठविले आहे की, 'जो येणारा तो तूच आहेस की आम्ही दुसऱ्या कोणाची अपेक्षा करावी?'"

[21]त्यावेळी येशूने अनेक लोकांचे रोग, आजार बरे केले, पुष्कळांमधील भुते काढली, आंधळ्यांना दृष्टी दिली. [22]येशूने त्यांना उत्तर दिले, "जा आणि तुम्ही जे ऐकले व पाहिले आहे ते योहानाला सांगा: आंधळे पाहतात, लंगडे चालतात, कुष्ठरोगी शुद्ध होतात, बहिरे ऐकतात, मेलेले जिवंत केले जातात आणि गरीब लोक सुवार्ता ऐकतात. [23]जो मला अनमान न करता स्वीकारतो, तो धन्य." [24]योहानाचे निरोपे गेल्यावर येशू समुदायाबरोबर योहानाविषयी बोलू लागला: "वाळवंटात तुम्ही काय पाहण्यासाठी गेला होता? वाऱ्याने वाकलेला बोरू? [25]नाही, मग काय पाहण्यासाठी तुम्ही गेला होता? कपडे घातलेला मनुष्य? नाही. तलम कपडे घालणारे आणि ऐषारामात राहणारे लोक राजवाड्यात राहतात. [26]पण तुम्ही बाहेर काय पाहण्यासाठी गेला होता? संदेष्टा? होय, मी तुम्हांला सांगतो, तुम्ही संदेष्ट्यापेक्षा काही तरी अधिक पाहिले आहे! [27]हाच तो ज्याच्याविषयी पवित्र शास्त्रात लिहिले आहे,

'पाहा, मी माझ्या संदेशवाहकाला माझ्यापुढे पाठवीत आहे. तो तुमच्यापुढे मार्ग तयार करील.' *मलाखी. 3:1*

[28]मी तुम्हांला सांगतो, जे स्त्रियांपासून जन्मले त्यात योहानापेक्षा कोणीही श्रेष्ठ नाही. तरीही देवाच्या राज्यातील अगदी सामान्य माणूस सुध्दा त्याच्यापेक्षा श्रेष्ठ आहे.

[29]"जेव्हा लोकांनी हे ऐकले, तेव्हा त्यांनी मान्य केले की, देवाची शिकवण चांगली आहे. जकातदारसुद्धा सहमत झाले. या लोकांना योहानाने अगोदरच बाप्तिस्मा दिला होता. [30]पण परूशी व नियमशास्त्राच्या शिक्षकांनी देवाची त्यांच्याविषयी असलेली योजना नाकारली. त्यांनी योहानाला त्यांचा बाप्तिस्मा करू दिला नाही.

[31]मग मी या पिढीची कोणाशी तुलना करू? ते कोणासारखे आहेत? [32]ते उनाड मुलांसारखे आहेत, ते बाजारात बसतात, ते एकमेकाला म्हणतात,

'आम्ही तुमच्यासाठी पावा वाजविला पण तुम्ही नाचला नाही. आम्ही तुमच्यासाठी शोकगीत गाईले पण तुम्ही रडला नाही.'

[33]बाप्तिस्मा करणारा योहान हा भाकर किंवा द्राक्षारस खात किंवा पीत आला नाही. पण तुम्ही म्हणता, 'त्याला भूत लागले आहे.' [34]मनुष्याचा पुत्र खात पीत आला आणि तुम्ही म्हणता; 'पाहा, तो खादाड, मद्यपी, जकातदारांचा

आणि पाप्यांचा मित्र आहे.' 35ज्ञान तेव्हा योग्य ठरते,
जेव्हा त्याचा वापर केल्याने झालेल्या गोष्टी योग्य असतात."

## शिमोन परूशी

36कोणा एका परूश्याने येशूला त्याच्याबरोबर जेवणाचे
आमंत्रण दिले, म्हणून तो परूश्याच्या घरी गेला व
मेजासभोवती आपल्या जागेवर बसला. 37तेथे त्या गावात
एक स्त्री होती. ती पापी होती. जेव्हा तिला समजले की.
येशू परूश्याच्या घरी जेवत आहे, तेव्हा तिने सुगंधी तेलाचे
एक अलाबास्त्र भांडे आणले. 38ती त्याच्या पाठीमागे पायाशी
उभी राहून रडत होती. ती आपल्या आसवांनी त्याचे पाय
भिजवू लागली. नंतर तिने ते आपल्या केसांनी पुसले,
त्याच्या पायाचे मुके घेतले व त्यावर सुगंधी तेल ओतले.
39ज्या परूश्याने हे आमंत्रण दिले होते त्याने ते पाहिले
आणि तो स्वत:शी म्हणाला, "जर हा मनुष्य संदेष्टा असता,
तर ही कोण व कशा प्रकारची स्त्री आपल्या पायाला
स्पर्श करीत आहे, हे त्याला कळले असते!"

40येशू त्याला म्हणाला, "शिमोना, मला तुला काही
सांगायचे आहे." त्याने उत्तर दिले, "सांगा गुरुजी."

41येशू म्हणाला, "एका सावकाराचे दोन कर्जदार होते.
एकाकडे पाचशे चांदीची नाणी आणि दुसऱ्याकडे पन्नास
चांदीची नाणी असे कर्ज होते. 42ते कर्ज फेडू शकत
नसल्याने सावकाराने दोघांचीही कर्जे माफ केली. आता
त्यांच्यापैकी कोण त्याच्यावर अधिक प्रेम करील?"

43शिमोनाने उत्तर दिले, "मला वाटते, ज्याचे कर्ज जास्त
होते तो."

येशू त्याला म्हणाला, "तू बरोबर ओळखलेस." 44तो
स्त्रीकडे वळून शिमोनाला म्हणाला, "तू ही स्त्री पाहतोस
काय? मी तुझ्या घरी आलो तेव्हा माझे पाय धुण्यास तू
मला पाणी दिले नाहीस. परंतु हिने माझे पाय अश्रूंनी
ओले केले. ते तिने केसांनी पुसले. 45तू मला साधे
शुभेच्छालिंगन सुध्दा दिले नाहीस, पण मी आत आल्यापासून
तिने माझ्या पायाचे मुके घेण्याचे थांबवले नाही. 46तू
माझ्या डोक्याला तेल लावले नाही, परंतु तिने माझ्या
पायावर सुगंधी तेल ओतले. 47यासाठी मी तुला सांगतो
की तिच्या अनेक पापांची क्षमा झाली आहे. हे स्पष्ट
आहे कारण तिने विपुल प्रेम दाखविले आहे. परंतु ज्याला
कमी माफ केले आहे तो कमी प्रेम करतो."

48तेव्हा तो तिला म्हणाला, "तुझ्या पापांची क्षमा झाली
आहे." 49नंतर जे त्यांच्याबरोबर जेवत होते ते स्वत:शीच
म्हणू लागले, "हा कोण आहे, जो पापांचीसुद्धा क्षमा करतो?"

50पण तो स्त्रीला म्हणाला, "तुझ्या विश्वासाने तुला
वाचविले आहे. शांतीने जा."

## येशूबरोबरचे लोक

8 यानंतर असे झाले की, येशू सर्व गावांतून आणि
खेड्यामधून उपदेश करीत व देवाच्या राज्यासंबंधीची
सुवार्ता सांगत जात होता. आणि बारा प्रेषित त्याच्याबरोबर
होते. 2ज्यांच्यामधून भुते काढली होती व ज्यांना आजारातून
बरे केले होते अशा काही स्त्रियाही त्याच्याबरोबर होत्या:
मरीया जिला मग्दालिया म्हणत, तिच्यातून सात भुते बाहेर
पडली होती. 3हेरोदाच्या घराचा कारभारी खुजा याची
पत्नी योहान्ना, सूसान्ना आणि इतर अनेक स्त्रिया होत्या. या
स्त्रिया त्यांच्याकडे जे होते, म्हणजे त्यांच्या उत्पन्नातून येशू
व त्याच्या शिष्यांना देत असत.

## पेरणी करणाऱ्याची बोधकथा
*(मत्तय 13:1-17, मार्क 4:1-12)*

4जेव्हा मोठा जनसमुदाय जमत असे व प्रत्येक गावातून
लोक त्याच्याकडे येत असत, तेव्हा येशू बोधकथांचा उपयोग
करून बोलत असे:

5"एक शेतकरी आपले बी पेरायला गेला. तो पेरत
असताना काही बी रस्त्यावर पडले व ते तुडविले गेले.
आकाशातील पक्ष्यांनी ते खाऊन टाकले. 6काही बी
खडकाळ जमिनीवर पडले आणि उगवल्यावर वाळून
गेले कारण त्यात ओलावा नव्हता. 7काही बी काटेरी
झुडुपात पडले. काटेरी झुडुपे त्याच्याबरोबर वाढली व
त्याची वाढ खुंटविली. 8काही बी चांगल्या जमिनीवर पडले.
ते उगवले, वाढले व जे पेरले होते त्यापेक्षा शंभर पट
पीक जास्त आले." या बोधकथा सांगत असता तो मोठ्याने
म्हणाला,

"ज्याला ऐकण्यास कान आहेत, त्याने ऐकावे!"

9त्याच्या शिष्यांनी या बोधकथेचा अर्थ काय असे
विचारले. 10म्हणून तो म्हणाला, "तुम्हांला देवाच्या राज्याची
रहस्ये जाणून घेण्याचा अधिकार दिलेला आहे. पण
इतरांच्यासाठी ते बोधकथेमध्ये दिले आहे.

'यासाठी की, जरी ते पाहत असले, तरी त्यांना दिसू नये
आणि ऐकत असले तरी त्यांना समजू नये.' *यशया 6:9*

## येशू बियाच्या बोधकथेचे स्पष्टीकरण करतो
*(मत्तय 13:18-23, मार्क 4:13-20)*

11"बोधकथेचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे. बी हे देवाचा
संदेश आहे. 12आणि जे बी वाटेवर पडले ते जे ऐकतात
त्याचे दर्शक आहेत. नंतर सैतान येतो आणि त्यांच्या
हृदयातील बी घेऊन जातो, यासाठी की त्यांनी विश्वास
ठेवू नये व त्यांचे तारण होऊ नये. 13जे बी खडकावर
पडते ते असे आहे की, ते ऐकतात आणि आनंदाने संदेश
ग्रहण करतात. पण त्यांना मूळ नसते. ते काही वेळ
विश्वास ठेवतात पण परीक्षेच्या वेळी देवापासून दूर जातात.
14जे बी काटेरी झुडुपात पडलेले असते ते दर्शविते की, ते
ऐकतात परंतु आपल्या मार्गाने जात असता काळजी, श्रीमंती,
जीवनातील सुखे यांनी ते खुंटविले जाते. ते पक्व फळ देत
नाही. 15चांगल्या जमिनीतील बी दर्शविते की, ते चांगल्या

व प्रामाणिक अंत:करणाचे आहेत ते वचन ऐकतात. ग्रहण
करतात व धीराने फळ देतात.

### तुमच्या समजबुद्धीचा उपयोग करा
### *(मत्तय 4:21-25)*

16“कोणीही दिवा लावून तो भांड्याने झाकून ठेवीत
नाही, किंवा खाटेखाली ठेवीत नाहीत, तर तो दिवठणीवर
ठेवतात, यासाठी की जे आत येतात त्यांना प्रकाश दिसावा.
17लक्षात ठेवा, असे काहीही लपविलेले नाही, जे उघड
होणार नाही. प्रत्येक रहस्य सर्वांना सांगितले जाईल आणि
ते प्रकाशात येईल. 18म्हणून तुम्ही कसे ऐकता याविषयी
काळजी घ्या कारण ज्याच्याजवळ आहे त्याला अधिक
दिले जाईल आणि ज्याच्याजवळ नाही, त्याच्याकडे जे
आहे असे वाटते तेदेखील काढून घेतले जाईल”.

### येशूचे शिष्य हेच त्याचे खरे कुटुंब
### *(मत्तय 12:46-50; मार्क 3:31-35)*

19येशूची आई व त्याचे भाऊ त्याच्याकडे आले. पण
गर्दीमुळे त्यांना त्याच्याजवळ जाता येईना. 20म्हणून त्याला
असे सांगण्यात आले की, “तुझी आई व तुझे भाऊ बाहेर
उभे आहेत, त्यांना तुला भेटायचे आहे.”

21पण त्याने त्यांना उत्तर दिले, “जे देवाचे वचन ऐकतात
व त्याप्रमाणे करतात तेच माझी आई व माझे भाऊ आहेत.”

### शिष्य येशूचे सामर्थ्य पाहतात
### *(मत्तय 8:23-27; मार्क 4:35-41)*

22त्या दिवसात एकदा असे झाले की, येशू त्याच्या
शिष्यांसह नावेत बसला. आणि तो त्यांना म्हणाला, “आपण
सरोवराच्या पलीकडच्या बाजूला जाऊ या.”

23आणि ते निघाले. ते जात असता येशू झोपी गेला.
सरोवरावर तुफान वादळी वारे सुरू झाले व नावेत पाणी
जाऊ लागले. ते अतिधोकादायक स्थितीत सापडले.
24म्हणून त्यांनी त्याला उठविले, ते त्याला म्हणाले, “गुरुजी,
गुरुजी, आपण बुडत आहोत!”

मग तो उठला. त्याने वारा व लाटा यांना दटाविले. ते
थांबले. व सर्वत्र शांतता पसरली. 25येशू त्यांना म्हणाला,
“तुमचा विश्वास कोठे आहे?” पण ते भयचकित आणि
विस्मित झाले व एकमेकांना म्हणाले, “हा आहे तरी
कोण? कारण तो वारा आणि लाटा यांनाही आज्ञा करतो
आणि ते त्याचे ऐकतात?”

### भुते अंगात असलेला माणूस
### *(मत्तय 8:28-34; मार्क 5:1-20)*

26नंतर ते गालील सरोवरापलीकडील गरसेकरांच्या
प्रदेशात गेले. 27जेव्हा तो किनाऱ्यावर उतरला, तेव्हा
नगरातला एक मनुष्य त्याला भेटला. त्या माणसामध्ये
अनेक भुते होती. बराच काळपर्यंत त्याने कपडे घातले
नव्हते व तो घरातही राहिला नव्हता. तो कबरांमध्ये
राहत होता. 28जेव्हा त्याने येशूला पाहिले, तेव्हा तो मोठ्याने
ओरडला व त्याच्यापुढे पडला. तो मोठ्या आवाजात म्हणाला,
“येशू, सर्वोच्च देवाच्या पुत्रा, तुला माझ्यापासून काय पाहिजे?
मी तुला विनंति करतो की, मला त्रास देऊ नको.” 29तो
असे म्हणाला कारण येशूने भुताला त्याच्यातून बाहेर
येण्याची आज्ञा केली होती. कारण त्याने त्याला पुष्कळ
वेळा धरले होते. त्याला त्यावेळी साखळ्यांनी बांधले होते.
पायात बेड्या होत्या व त्याला पहाऱ्यात ठेवले होते परंतु
तो नेहमी साखळ्या तोडीत असे व भुते त्याला एकांतात
घेऊन जात असत.

30येशूने त्याला विचारले, “तुझे नाव काय आहे?”

तो म्हणाला, “सैन्य.” कारण त्याच्यात अनेक भुते शिरली
होती. 31भुतांनी येशूला विनवणी केली की, आम्हांला
अनंतकाळच्या अंधारात* जाण्याची आज्ञा करू नको.

32डोंगराच्या कडेला डुकरांचा एक मोठा कळप चरत
होता. भुतांनी त्याला विनंति केली, “आम्हांला त्या
डुकरांच्या मध्ये जाऊ दे.” आणि येशूने त्यांना तसे करण्याची
परवानगी दिली. 33मग भुते त्या मनुष्यातून बाहेर आली
आणि डुकरात शिरली. नंतर डुकरांचा कळप सरोवराकडे
जोरात पळाला आणि तो सारा कळप सरोवरात बुडून
मेला. 34जेव्हा डुकरांचा कळप राखणाऱ्यांनी हे पाहिले,
तेव्हा ते दूर पळाले व त्यांनी नगरात व त्या प्रदेशात हे
वर्तमान सांगितले. 35काय झाले हे पाहण्यासाठी लोक
बाहेर आले. ते येशूकडे आले आणि त्यांनी ज्या माणसाच्या
अंगातून भुते निघाली होती, त्याला येशूच्या पायाजवळ
बसलेला त्यांनी पाहिले. त्याने नीट कपडे घातले होते व
तो पूर्ण शुद्धीवर होता. या घटनेचे त्यांना भय वाटले.
36ज्यांनी हे पाहिले त्यांनी तो भूत लागलेला मनुष्य कसा
बरा झाला हे त्यांना सांगितले. 37तेव्हा गरसेकर प्रदेशातील
सर्व लोकांनी येशूला त्यांना सोडून जाण्यास सांगितले.
कारण ते सर्व फार घाबरले होते. मग येशू नावेत बसून
परत गेला. 38ज्याच्या अंगातून भुते निघाली होती तो
त्याच्याबरोबर जाण्यासाठी विनवणी करू लागला. पण
येशूने त्याला परत जायला सांगितले आणि म्हणाला, 39“घरी
जा आणि देवाने तुझ्यासाठी जे केले आहे ते सांग.” तेव्हा
तो मनुष्य गेला आणि येशूने त्याच्यासाठी जे काही केले ते
नगरातील सर्व लोकांना त्याने सांगितले.

### येशू मेलेल्या मुलीला जिवंत करतो व आजारी स्त्रीला बरे करतो
### *(मत्तय 9:18-26; मार्क 5:21-43)*

40नंतर जेव्हा येशू परत आला तेव्हा लोकांनी त्याचे
स्वागत केले, कारण ते सर्व त्याची वाट पाहत होते.

---

**अनंतकाळच्या अंधारात** ज्याचा अंत (ठाव) लागत नाही असा खड्डा.

41त्याचवेळी याईर नावाचा एक मनुष्य आला. तेथील सभास्थानाचा तो अधिकारी होता. त्याने येशूच्या पाया पडून त्याला आपल्या घरी येण्याची विनंति केली. 42कारण त्याला बारा वर्षांची एक मुलगी होती आणि ती मरावयास टेकली होती.

येशू जात असता लोकांची गर्दी झाली होती व तो चेंगरला जात होता. 43आणि एक स्त्री तेथे होती. तिला बारा वर्षे रक्तस्राव होत होता. तिच्याकडे जे काही पैसे होते ते सर्व तिने वैद्यांसाठी खर्च केले पण कोणीही तिला बरे करू शकले नाही. 44ती त्याच्या मागोमाग आली. व तिने त्याच्या वस्त्राच्या टोकाला स्पर्श केला आणि ताबडतोब तिचा रक्तस्राव थांबला. 45मग येशू म्हणाला, "मला कोणी स्पर्श केला?"

ते सर्व जण नाकारीत असताना पेत्र म्हणाला, "सर्व जण आपल्याभोवती गर्दी करीत आहेत आणि तुम्हांला चेंगरीत आहेत."

46परंतु येशू म्हणाला, "कोणी तरी मला स्पर्श केला आहे. कारण मला माहीत आहे की, माझ्यातून शक्ति निघाली आहे." 47आपण येशूच्या नजरेतून सुटू शकणार नाही हे जेव्हा त्या स्त्रीने पाहिले तेव्हा ती थरथर कांपत आली आणि त्याच्या पाया पडली. तेथे तिने सर्व लोकांसमोर आपण त्याला का स्पर्श केला व आपण कसे बरे झालो ते सांगितले. 48तेव्हा तो तिला म्हणाला, "मुली, तुझ्या विश्वासाने तुला बरे केले आहे. शांतीने जा."

49तो हे बोलत असतानाच कोणी तरी सभास्थानाच्या अधिकाऱ्याच्या घरून आले आणि म्हणाले, "तुमची मुलगी मरण पावली आहे. आता गुरुजींना त्रास देऊ नका."

50येशूने हे ऐकले व तो सभास्थानाच्या अधिकाऱ्याला म्हणाला, "भिऊ नको, फक्त विश्वास ठेव आणि ती मरणातून वाचविली जाईल.

51जेव्हा येशू त्या घरी आला, त्याने आपणाबरोबर पेत्र, योहान, याकोब आणि मुलीचे आईवडील यांच्याशिवाय कोणालाही आत येऊ दिले नाही. 52सर्व लोक तिच्यासाठी रडत होते. येशू म्हणाला, "रडणे थांबवा, ती मेलेली नाही, ती झोपेत आहे."

53पण ते त्याला हसले. कारण त्यांना माहीत होते की ती मेली आहे. 54परंतु त्याने तिचा हात धरला आणि मोठ्याने म्हणाला, "मुली, ऊठ!" 55मग, तेव्हा तिचा आत्मा पुन्हा आला आणि ती लगेच उभी राहिली. नंतर त्याने तिला खाण्यास देण्याची आज्ञा केली. 56तेव्हा तिचे आईवडील आश्चर्याने थक्क झाले, परंतु जे घडले त्याबद्दल कोणालाही सांगू नका अशी त्याने त्यांना आज्ञा केली.

## येशू बारा प्रेषितांना कामगिरीवर पाठवितो
### *(मत्तय 10:5-15; मार्क 6:7-13)*

9 येशूने बारा शिष्यांना एकत्र बोलाविले, आणि त्याने त्यांना सर्व भुतांवर सामर्थ्य व अधिकार दिला. आणि त्यांना त्याने रोग बरे करण्याचे सामर्थ्य दिले. 2नंतर त्याने त्यांना देवाच्या राज्याची घोषणा करण्यास व रोग्यांना बरे करण्यास पाठविले.

3तो त्यांना म्हणाला, "तुमच्या प्रवासासाठी बरोबर काठी, पिशवी, भाकरी, चांदीची नाणी, दोन-दोन अंगरखे असे काहीही घेऊ नका. 4आणि ज्या घरात तुम्ही जाल त्या घरातच तुम्ही राहा. व दुसऱ्या गावाला जाताना ते घर सोडा. 5जेथे लोक तुमचे स्वागत करणार नाहीत, तेथे गाव सोडताना त्यांच्याविरुद्ध साक्ष म्हणून आपल्या पायावरील धूळ झटकून टाका."

6ते निघाल्यानंतर सर्व गावातून सुवार्ता सांगत व लोकांचे रोग बरे करीत गेले.

## हेरोदाचा येशूविषयी गोंधळ होतो
### *(मत्तय 14:1-12, मार्क 6:14-29)*

7जेव्हा हेरोद राज्यपालाने जे सर्व काही घडत होते त्याविषयी ऐकले, तेव्हा तो घोटाळ्यात पडला. कारण काही जणांनी असे म्हटले की, "योहान मेलेल्यांतून उठविला गेला आहे." 8इतर काही जण असे म्हणत होते की, "एलीया पुन्हा आला आहे." इतर काही जणांनी असे सांगितले की, "फार पूर्वीच्या संदेष्ट्यांपैकी एक जण मेलेल्यांतून पुन्हा जिवंत झाला आहे."

9परंतु हेरोद म्हणाला, "मी योहानाचा शिरच्छेद केला आहे, मग ज्याच्याविषयी अशा गोष्टी ऐकत आहे, तो कोण आहे?" म्हणून हेरोदाने येशूला पाहण्याचा प्रयत्न केला.

## येशू पाच हजारांपेक्षा अधिक लोकांना जेवू घालतो
### *(मत्तय 14:13-21; मार्क 6:30-44; योहान 6:1-14)*

10शिष्य परत आले तेव्हा त्यांनी येशूला आपण केलेल्या सर्व गोष्टी सांगितल्या. नंतर येशू त्यांना घेऊन बेथसैदा नावाच्या नगरास गुप्तपणे गेला. 11पण लोकसमुदायाला हे कळाले व ते त्याच्यामागे गेले. त्याने त्यांचे स्वागत केले आणि त्यांना स्वर्गराज्याविषयी सांगितले. ज्यांना बरे होण्याची आवश्यकता होती, त्यांना त्याने बरे केले.

12दिवस मावळत असता प्रेषित त्याच्याकडे आले आणि म्हणाले, "लोकांना जाऊ द्या. म्हणजे ते आजूबाजूच्या शेतात आणि खेड्यात जातील व त्यांना खावयाला व राहण्यास मिळण्याची शक्यता आहे का ते पाहतील. कारण आपण दूर ठिकाणी आहोत."

13पण तो त्यांना म्हणाला, "तुम्ही त्यांना काही खावयास द्या."

ते म्हणाले, "आम्ही जाऊन या सर्व लोकांसाठी अन्न विकत घ्यावे असे तुम्हांला वाटते काय? आमच्याजवळ फक्त पाच भाकरी आणि दोन मासे याशिवाय काही नाही." 14तेथे ते सुमारे पाच हजार पुरुष होते. परंतु तो आपल्या शिष्यांस म्हणाला, "त्यांना सुमारे पन्नासाच्या गटाने बसवा."

15त्यांनी तसे केले व सर्वांना खाली बसविले. 16नंतर
त्याने पाच भाकरी व दोन मासे घेतले, मग स्वर्गाकडे
बघून त्याने भाकरी व मासे याबद्दल देवाचे उपकार मानले.
त्याचे तुकडे केले. नंतर लोकांना वाढण्यासाठी शिष्यांना
दिले. 17लोक जेवले व सर्व तृप्त झाले. आणि जेवून
झाल्यानंतर उरलेले गोळा करण्यात आले तेव्हा त्या
तुकड्यांच्या बारा टोपल्या भरल्या.

## येशू हा ख्रिस्त आहे

***(मत्तय 16:13-19; मार्क 8:27-29)***

18मग असे झाले की एकदा येशू एकटाच प्रार्थना करीत
असताना, त्याचे शिष्य त्याच्याबरोबर होते. त्याने त्यांना
विचारले, "मी कोण आहे याबद्दल लोक काय म्हणतात?"
19ते म्हणाले, "बाप्तिस्मा करणारा योहान, इतर काही
एलीया आणि काहीजण म्हणतात की, फार पूर्वी होऊन
गेलेल्या संदेष्ट्यांपैकी कोणी तरी उठला आहे."
20तो त्यांना म्हणाला, "तुम्ही मला कोण म्हणून म्हणता?"
पेत्राने उत्तर दिले, "देवाचा ख्रिस्त."
21तेव्हा ताकीद देऊन त्याने त्यांना सूचना दिली की, हे
कोणालाही सांगू नका. 22येशू म्हणाला, "मनुष्याच्या पुत्राला
पुष्कळ दु:ख सोसणे आवश्यक आहे, आणि वडिलांनी,
मुख्य याजकांनी, नियमशास्त्राचे शिक्षक यांनी नाकारावे
व त्यांच्याकडून मारले जावे व पुन्हा तिसऱ्या दिवशी
उठावे हे आवश्यक आहे."
23नंतर तो त्या सर्वांना म्हणाला, "जर कोणा व्यक्तीला
माझ्या मागे यायचे असेल तर त्याने स्वत:ला नाकारले
पाहिजे. व दररोज स्वत:चा वधस्तंभ उचलून माझ्या मागे
आले पाहिजे. 24जो कोणी स्वत:चा जीव वाचवू पाहतो, तो
त्याला मुकेल, पण जो कोणी माझ्यासाठी जिवाला मुकेल
तो त्याला वाचवील. 25कोणी सर्व जग मिळविले परंतु
स्वत:चा नाश करून घेतला किंवा स्वत:ला गमाविले तर
त्याला काय लाभ? 26जो कोणी माझी व माझ्या वचनांची
लाज धरतो तर मनुष्याचा पुत्र जेव्हा त्याच्या वैभवाने,
पित्याच्या आणि पवित्र दूतांच्या गौरवाने येईल तेव्हा तोही
त्याची लाज धरील. 27परंतु मी तुम्हांला खरे सांगतो येथे
उभे राहिलेल्यांमध्ये असे काही आहेत की, स्वर्गाचे राज्य
पाहिल्याशिवाय त्यांना मरणाचा अनुभव येणारच नाही."

## मोशे, एलीया आणि ख्रिस्त

***(मत्तय 17:1-8; मार्क 9:2-8)***

28मग असे झाले की, तो असे बोलल्यावर साधारणपणे
आठ दिवसांनंतर, आपल्याबरोबर पेत्र, योहान व याकोब
यांना घेऊन डोंगरावर प्रार्थना करण्यास गेला. 29मग असे
घडले की, तो प्रार्थना करीत असताना त्याच्या चेहऱ्याचे
रूप पालटले व त्याचे कपडे डोळे दिपविण्याएवढे पांढरेशुभ्र
झाले. 30आणि तेथे दोघे जण त्याच्याबरोबर बोलत होते.
ते एलीया व मोशे होते. ते गौरवामध्ये प्रगट झाले होते,
31आणि ते येशूच्या मरणाविषयी, जे तो यरुशलेमामध्ये
पूर्ण करणार होता, त्याविषयी बोलत होते. 32पण पेत्र व
त्याच्याबरोबर असलेले सर्व झोपी गेले होते, जेव्हा ते जागे
झाले, त्यांनी येशूचे गौरव पाहिले, आणि दोन मनुष्यांना
त्याच्याबरोबर उभे असलेले पाहिले. 33मग असे झाले
की, ते दोघे जण येशूपासून विभक्त होत असताना, पेत्र
येशूला म्हणाला, "गुरुजी, आम्ही येथे आहोत ते चांगले
झाले. आपण तीन मंडप तयार करु या, एक तुमच्यासाठी,
एक मोशेसाठी व एक एलीयासाठी." (तो काय बोलत
होता हे त्याचे त्याला कळत नव्हते.)
34पण तो या गोष्टी सांगत असता एक मेघ खाली आला
आणि त्याने छायेने त्यांना झाकून टाकले. त्यांनी मेघामध्ये
प्रवेश केल्यानंतर ते घाबरले. 35आणि त्यांना वेढलेल्या
ढगातून एक वाणी ऐकू आली; ती म्हणाली, "हा माझा
पुत्र आहे; तो माझा निवडलेला आहे. त्याचे ऐका."
36जेव्हा वाणी झाली तेव्हा येशू एकटाच तेथे होता.
आणि याविषयी ते गप्प राहिले. त्यांनी त्यावेळी जे काही
पाहिले होते त्याविषयी कोणालाही काही सांगितले नाही.

## येशू भूतग्रस्त मुलाला बरे करतो

***(मत्तय 17:14-18; मार्क 9:14-27)***

37नंतर दुसऱ्या दिवशी असे झाले की, जेव्हा ते
डोंगरावरून खाली आले तेव्हा मोठा जमाव येशूला
भेटण्यासाठी आला. 38आणि त्याचवेळी जमावातील एक
मनुष्य मोठ्याने ओरडून म्हणाला, "गुरुजी, मी तुम्हांला
विनंति करतो, माझ्या मुलाकडे पाहा, कारण तो माझा
एकुलता एक मुलगा आहे. 39एकाएकी त्याला अशुद्ध
आत्मा धरतो व तो अचानक किंचाळतो, आणि तो त्याला
झटके देईपर्यंत पिळतो, त्यामुळे त्याच्या तोंडाला फेस येतो,
तो त्याला सोडीत नाही व त्याला गलितगात्र करतो. 40मी
तुमच्या शिष्यांना तो अशुद्ध आत्मा काढण्याची विनंति
केली, पण त्यांना ते शक्य झाले नाही."
41"येशू म्हणाला अहो, अविश्वासू व चुकलेल्या
लोकांनो! मी तुमच्याबरोबर किती काळ राहू व किती
काळ तुमचे सोसू? त्या मुलाला इकडे आणा." 42परंतु तो
येत असतानाच भुताने त्याला पाडले आणि पिळवटले.
येशूने अशुद्ध आत्म्याला धमकावले. त्याने मुलाला बरे
केले आणि त्याला त्याच्या वडिलांजवळ परत दिले.
43देवाचा महिमा पाहून ते सर्व फार आश्चर्यचकित झाले.

## येशू त्याच्या मरणाविषयी सांगतो

***(मत्तय 17:22-23; मार्क 9:30-32)***

पण सर्व लोक येशूने जे केले त्याविषयी आश्चर्य व्यक्त
करीत असताना, तो त्याच्या शिष्यांना म्हणाला.
44"मी तुमच्याजवळ ज्या गोष्टी सांगतो त्याकडे
काळजीपूर्वक लक्ष द्या. मनुष्याच्या पुत्राला लोकांच्या हाती
देण्यात येईल." 45पण शिष्यांना त्याचे बोलणे समजले

नाही. ते त्यांच्यापासून लपवून ठेवण्यात आले होते. यासाठी की ते त्यांना समजू नये. आणि या बोलण्याविषयी त्याला विचारण्याची त्यांना भीति वाटत होती.

### अति महत्त्वाची व्यक्ति
### *(मत्तय 18:1-5; मार्क 9:33-37)*

46आपणांमध्ये सर्वांत मोठा कोण असा शिष्यांमध्ये वाद सुरू झाला. 47पण येशूला त्यांच्या मनातले विचार समजले, तेव्हा त्याने एका लहान बालकाला घेतले व त्याच्याजवळ त्याला उभे केले. 48येशू त्यांना म्हणाला, “जो कोणी ह्या लहान बालकाला माझ्या नावाने स्वीकारतो तो मला स्वीकारतो आणि जो मला स्वीकारतो तो ज्याने मला पाठविले त्याला स्वीकारतो. कारण जो कोणी तुम्हा मध्ये सर्वांत लहान बनेल तो सर्वांत मोठा आहे.”

### जी व्यक्ति तुमच्याविरुद्ध नाही ती तुम्हांला अनुकूल आहे
### *(मार्क 9:38-40)*

49परंतु योहानाने उत्तर दिले, “गुरुजी, आम्ही कोणाला तरी तुमच्या नावाने भुते काढताना पाहिले, व आम्ही त्याला मना केले, कारण आम्ही जे तुम्हांला अनुसरतो त्यापैकी तो नाही.” 50परंतु येशू योहानाला म्हणाला, “त्याला मना करू नका, कारण जो तुमच्याविरुद्ध नाही तो तुम्हांला अनुकूल आहे.”

### शोमरोननगर

51आता असे घडले की, जेव्हा त्याला स्वर्गात घेण्याची वेळ आली, त्याने यरुशलेमाला जाण्याचे ठरविले. 52त्याने आपणांपुढे निरोपे पाठविले. ते गेले आणि येशूच्या येण्याविषयीच्या तयारीसाठी एका शोमरोनी खेड्यात गेले. 53पण शोमरोन्यांनी येशूचा स्वीकार केला नाही, कारण तो यरुशलेमाकडे निघाला होता.

54जेव्हा याकोब व योहान या शिष्यांनी पाहिले, तेव्हा ते म्हणाले, “प्रभु, स्वर्गातील अग्नीने येऊन त्यांचा नाश करावा यासाठी आम्ही आज्ञा करावी असे तुला वाटते काय?”

55तेव्हा त्याने वळून त्यांना धमकावले. 56आणि ते दुसऱ्या खेड्यात निघून गेले.

### येशूला अनुसरणे
### *(मत्तय 8:19-22)*

57ते रस्त्याने चालत जात असता कोणी तरी त्याला म्हणाले, “तू जेथे कोठे जाशील तेथे मी तुझ्यामागे येईन.”

58तेव्हा येशू त्याला म्हणाला, “कोल्ह्यांना बिळे आहेत, आणि आकाशातील पक्ष्यांना घरटी आहेत, पण मनुष्याच्या पुत्राला डोकेसुध्दा टेकावयास जागा नाही.”

59तो दुसऱ्या एकाला म्हणाला, “माझ्यामागे ये.” पण तो मनुष्य म्हणाला, “पहिल्यांदा मला जाऊ दे आणि माझ्या वडिलांना पुरू दे.”

60पण येशू त्याला म्हणाला, “मेलेल्यांना त्यांच्या मेलेल्यांना पुरू दे. तू जा आणि देवाच्या राज्याची घोषणा कर.”

61दुसरा म्हणाला, “मी तुला अनुसरेन, प्रभु पण अगोदर मला माझ्या घरातील लोकांचा निरोप घेऊ दे.”

62पण येशू त्यांस म्हणाला, “जो कोणी नांगराला हात घालतो व मागे पाहतो तो देवाच्या राज्यासाठी योग्य नाही.”

### येशू बहात्तर पुरुषांना कामगिरीवर पाठवितो

10 या घटनांनंतर प्रभूने इतर बहात्तर जणांची* नेमणूक केली. आणि येशूने त्यांना जोडीजोडीने पाठविले. त्याला ज्या ठिकाणी जायचे होते त्या प्रत्येक गावात व ठिकाणी त्याने त्यांना पाठविले. 2तो त्यांना म्हणाला, “पीक फार आहे पण कामकरी थोडे आहेत. यास्तव पिकाच्या धन्याने त्याच्या पिकासाठी कामकरी पाठवावेत यासाठी प्रार्थना करा. 3जा! आणि लक्षात ठेवा, लांडग्यात जशी कोंकरे तसे मी तुम्हास या जगात पाठवीत आहे. 4थैली, पिशवी किंवा वहाणा बरोबर घेऊ नका. व रस्त्याने जाताना कोणाला सलाम करू नका. 5कोणत्याही घरात तुम्ही प्रवेश कराल तेव्हा पहिल्यांदा असे म्हणा, ‘या घरास शांति असो!’ 6जर तेथे शांतिप्रिय मनुष्य असेल तर तुमची शांति त्याच्यावर राहील, परंतु तो मनुष्य शांतिप्रिय नसेल तर तुमची शांति तुमच्याकडे परत येईल. 7त्या घरात तुम्हांला जे देतील ते खातपीत राहा. कारण कामकरी हा त्याच्या मजुरीस पात्र आहे. या घरातून त्या घरात असे घर बदलू नका. 8कोणत्याही नगरात तुम्ही प्रवेश कराल तेव्हा आणि जेव्हा ते तुमचे स्वागत करतील तेव्हा, तुमच्यासमोर जे वाढलेले असेल ते खा. 9तेथील रोग्यांना बरे करा आणि नंतर त्यांना सांगा की, ‘देवाचे राज्य लवकरच तुमच्याकडे येत आहे!’ 10परंतु तुम्ही एखाद्या गावात प्रवेश कराल आणि त्यांनी जर तुमचे स्वागत केले नाही तर रस्त्यात जा आणि म्हणा, 11‘आमच्या पायाला लागलेली तुमच्या गावाची धूळदेखील आम्ही तुम्हांविरुद्ध झटकून टाकीत आहोत! तरीही हे लक्षात असू द्या की, देवाचे राज्य लवकरच तुमच्येकडे येत आहे.!’ 12मी तुम्हांला सांगतो, त्या दिवशी त्या गावापेक्षा सदोमातील लोकांना सोपे जाईल.”

### जे विश्वास ठेवीत नाहीत त्यांना येशू इशारा देतो
### *(मत्तय 11:20-24)*

13“खोराजिना तुझ्यासाठी हे वाईट होईल! बेथसैदा* तुझ्यासाठी हे वाईट होईल! कारण जे चमत्कार तुम्हांमध्ये

---

**बहात्तर जणांची** लूकाच्या काही ग्रीक प्रतीमध्ये सत्तर म्हटले आहे.

**खोराजिन, बेथसैदा** गालील सरोवरालगतची नगरे जेथे येशूने लोकांना संदेश दिले.

घडले ते जर सोर व सिदोनमध्ये घडले असते तर त्यांनी फार पूर्वीच गोणपाट नेसून राखेत बसून पश्चात्ताप केला असता.

14"तरीसुद्धा सोर व सिदोन यांना न्यायाच्या वेळी तुमच्यापेक्षा सोपे जाईल. 15आणि कफर्णहूमा, तुला स्वर्गापर्यंत चढवले जाईल काय? तू तर अधोलोकातच जाशील. 16जो शिष्यांचे ऐकतो तो माझे ऐकतो आणि जो शिष्यांना नाकारतो तो मला नाकारतो. आणि जो मला नाकारतो तो ज्याने मला पाठविले त्याला नाकारतो."

## सैतानाचे पतन

17ते बहात्तर लोक आनंदाने परतले आणि म्हणाले, "प्रभु, तुझ्या नावाने भुतेसुद्धा आम्हांला वश होतात!" 18तेव्हा तो त्यांना म्हणाला, "मी सैतानाला आकाशातून विजेसारखे पडताना पाहिले! 19ऐका मी तुम्हांला साप आणि विंचू यांना तुडविण्याचा अधिकार दिला आहे. व मी तुम्हांला शत्रूच्या सर्व सामर्थ्यावर अधिकार दिलेला आहे. आणि कशानेच तुम्हांला अपाय होणार नाही. 20तथापि तुम्हांला भुते वश होतात याचा आनंद मानू नका तर तुमची नावे स्वर्गात लिहिली आहेत याचा आनंद माना."

## येशू पित्याला प्रार्थना करतो

***(मत्तय 11:25-27; 13:16-17)***

21त्या क्षणी तो पवित्र आत्म्यात उल्हासित झाला, आणि म्हणाला, "हे पित्या, स्वर्गाच्या आणि पृथ्वीच्या प्रभु मी तुझी स्तुति करतो, कारण तू या गोष्टी ज्ञानी आणि बुद्धिमान लोकांपासून लपवून ठेवून त्या लहान बाळकांस प्रकट केल्या आहेस. होय, पित्या कारण तुला जे बरे वाटले ते तू केलेस.

22"माझ्या पित्याने सर्व गोष्टी माझ्यासाठी दिल्या होत्या. आणि पुत्र कोण आहे हे पित्याशिवाय कोणालाच ठाऊक नाही. आणि पुत्राशिवाय कोणालाही पिता कोण आहे हे माहीत नाही व ज्या कोणाला ते प्रगट करण्याची पुत्राची इच्छा असेल त्यालाच फक्त माहीत आहे."

23आणि शिष्यांकडे वळून तो एकांतात बोलला, "तुम्ही जे पाहता ते पाहणारे डोळे धन्य. 24मी तुम्हांस सांगतो, अनेक राजांनी व संदेष्ट्यांनी तुम्ही जे पाहता ते पाहण्याची इच्छा बाळगली, परंतु त्यांनी ते पाहिले नाही आणि तुम्ही जे ऐकता ते ऐकण्याची इच्छा बाळगली, परंतु त्यांनी ते ऐकले नाही."

## चांगला शोमरोनी

25नंतर एक नियमशास्त्राचा शिक्षक उभा राहिला आणि त्याने येशूची परीक्षा पाहण्याचा प्रथम केला. तो म्हणाला, "गुरुजी, अनंतकाळचे जीवन मिळण्यासाठी मी काय करावे?"

26तेव्हा येशू त्याला म्हणाला, "नियमशास्त्रात काय लिहिले आहे? तू त्यांत काय वाचतोस?"

27तो म्हणाला, "'तू तुझा देव प्रभु याच्यावर पूर्ण अंतःकरणाने, पूर्ण आत्म्याने, पूर्ण शक्तीने प्रीति कर.'*

व 'स्वतःवर जशी प्रीति करतोस तशी तू आपल्या शेजाऱ्यावरही प्रीति कर.'*" 28तेव्हा येशू त्याला म्हणाला, "तू बरोबर उत्तर दिलेस, हेच कर म्हणजे तू चिरकाल राहशील."

29पण आपण योग्य प्रश्न विचारला आहे हे इतरांना दाखवून देण्यासाठी त्याने येशूला विचारले, "मग माझा शेजारी कोण?"

30येशूने उत्तर दिले, "एक मनुष्य यरुशलेमाहून यरीहोस निघाला होता. आणि तो लुटारूंच्या हाती सापडला. त्यांनी त्याचे कपडे काढून घेतले. त्यांनी त्याला मारले, आणि त्याला अर्धमेला टाकून ते निघून गेले. 31तेव्हा त्याचवेळी एक याजक त्या रस्त्याने जात होता. याजकाने त्याला पाहिले, पण तो रस्त्याच्या दुसऱ्या बाजूने निघून गेला.

32त्याच मार्गाने एक लेवी त्या ठिकाणी आला. लेव्याने त्याला पाहिले. व तो सुध्दा रस्त्याच्या दुसऱ्या बाजूने निघून गेला. 33नंतर एक शोमरोनी त्याच रस्त्याने प्रवास करीत तेथे आला. जेव्हा त्याने त्या मनुष्याला पाहिले, तेव्हा त्याला त्याच्याविषयी कळवळा आला 34तो त्याच्याजवळ आला त्याच्या जखमांवर तेल व द्राक्षारस ओतून त्या बांधल्या. नंतर त्या शोमरोन्याने त्याला आपल्या गाढवावर बसविले व त्याला उतारशाळेत आणले, व त्याची देखभाल केली. 35दुसऱ्या दिवशी त्याने दोन दीनार*(सुमारे वीस रूपये) काढले आणि उतारशाळेच्या मालकाला दिले व म्हणाला, 'याची चांगली देखभाल कर म्हणजे यापेक्षा जे तू अधिक खर्च करशील ते मी परत आल्यावर तुला देईन.'"

36लुटारूंच्या तावडीत जो मनुष्य सापडला होता, त्याचा त्या तिघांपैकी कोण खरा शेजारी होता असे तुला वाटते?"

37तो नियमशास्त्राचा शिक्षक म्हणाला, "ज्याने त्या गरजू जखमी प्रवाशावर दया मनापासून केली तो."

तेव्हा येशू त्याला म्हणाला, "जा आणि तूही तसेच कर."

## मरीया आणि मार्था

38मग येशू आणि त्याचे शिष्य त्याच्या मार्गाने जात असता, तो एका खेड्यात आला. तेथे मार्था नावाच्या स्त्रीने त्याचे स्वागत करून आदरातिथ्य केले. 39तिला मरीया नावाची एक बहीण होती. ती प्रभूच्या पायाजवळ बसली व तो काय बोलतो हे ऐकत राहिली. 40पण मार्थेची अति कामामुळे तारांबळ झाली. ती येशूकडे आली आणि

---

**तू ... कर** अनुवाद 6:5

**स्वतःवर ... कर** लेवीय 19:18

**दिनार** एक नाणे, एका व्यक्तीच्या रोजच्या मजूरीइतके मूल्य.

म्हणाली, “प्रभु, माझ्या बहिणीने सर्व काम माझ्यावर टाकले
याची तुला काळजी नाही काय? तेव्हा मला मदत करायला
तिला सांग.”
41प्रभूने उत्तर दिले, “मार्था, मार्था, तू पुष्कळ गोष्टींविषयी
दगदग करतेस. 42पण एक गोष्ट आवश्यक आहे. हे मी
सांगतो कारण मरीयेने तिच्यासाठी चांगला कार्यभाग
निवडला आहे. तो तिच्यापासून काढून घेतला जाणार
नाही.”

## येशू प्रार्थने विषयी शिकवितो
### (*मत्तय 6:9-15; मार्क 7:7-11*)

11 मग असे झाले की, तो एका ठिकाणी प्रार्थना
करीत होता. प्रार्थना संपल्यावर शिष्यांपैकी एक
जण त्याला म्हणाला, “प्रभु, योहानाने जशी त्याच्या शिष्यांना
प्रार्थना शिकवली;” त्याचप्रमाणे आम्ही प्रार्थना कशी
करावी ते आम्हास शिकवा.”
2मग तो त्यांना म्हणाला, “जेव्हा तुम्ही प्रार्थना करता
तेव्हा असे म्हणा:

‘पित्या, तुझे नाव पवित्र राखले जावो. तुझे राज्य येवो,
3आम्हाला रोज लागणारी भाकर आज आम्हांला दे,
4आणि आमच्या पापांची आम्हांला क्षमा कर, कारण
आम्ही सुद्धा जे आमचे वाईट करतात त्यांची क्षमा करतो.
आणि आम्हांला परीक्षेत आणू नकोस तर आम्हास
वाइटापासून सोडीव.’”

## मागत राहा

5मग येशू त्यास म्हणाला, “समजा तुमच्यापैकी कोणाला
तरी एक मित्र होता. आणि तो त्याच्याकडे मध्यरात्री गेला
व त्याला म्हणाला, ‘मित्रा, मला तीन भाकरी उसन्या दे,
6कारण माझा मित्र नुकताच प्रवास करून माझ्याकडे
आला आहे. आणि त्याला वाढायला माझ्याजवळ काहीही
नाही.’ 7आणि समजा तो मनुष्य आतून म्हणाला, ‘मला
त्रास देऊ नको! अगोदरच दार लावलेले आहे. आणि
माझी मुले माझ्याजवळ झोपलेली आहेत. मी तुला देण्यासाठी
उठू शकत नाही.’ 8मी तुम्हाला सांगतो जरी तो उठून
त्याला कांही देण्याची टाळटाळ करील तरी त्याच्या मित्राच्या
आग्रही वृत्तीमुळे तो खात्रीने उठून त्याला पाहिजे ते देईल.
9आणि म्हणून मी तुम्हांला सांगतो, मागा म्हणजे तुम्हांला
दिले जाईल. शोधा म्हणजे तुम्हांस सापडेल आणि ठोठवा
म्हणजे तुम्हांसाठी उघडले जाईल. 10कारण जो कोणी
मागतो त्याला मिळेल. जो शोधतो त्याला सापडेल आणि
जो कोणी ठोठावतो त्याच्यासाठी दार उघडले जाईल.
11तुम्हांमध्ये असा कोण पिता आहे की, त्याच्या मुलाने
त्याला मासा मागितला असता त्यास माशाऐवजी साप देईल?
12किंवा जर मुलाने अंडे मागितले तर कोणता पिता
त्याला विंचू देईल? 13जर तुम्ही इतके वाईट असताना
तुम्हांला तुमच्या मुलांना चांगल्या देणग्या देण्याचे समजते,
तर जे त्याच्याकडे मागतात त्यांना स्वर्गातील पिता किती
तरी अधिक पवित्र आत्मा देईल?”

## येशूचे सामर्थ्य देवापासून आहे
### (*मत्तय 12:22-30; मार्क 3:20-27*)

14येशू एक भूत काढीत होता. ते मुके होते. मग असे
झाले की, जो मनुष्य बोलू शकत नव्हता तो, भूत बाहेर
आल्यावर, बोलू लागला व लोकांचा जमाव चकित झाला.
15परंतु त्यांच्यातील काही लोक म्हणाले की, “भुतांचा
प्रमुख जो बालजबूल याच्या साहाय्याने तो भुते काढतो.”
16काहींनी त्याची परीक्षा पाहण्यासाठी स्वर्गातून चिन्ह
मागितले. 17पण त्यांच्या मनात काय होते हे त्याला माहीत
होते आणि तो त्यांना म्हणाला, “आपसात फूट पडलेले
प्रत्येक राज्य ओसाड पडते आणि एखाद्या घरात
एकमेकांविरुद्ध भांडतात तेव्हा त्या घराचे तुकडे होतात.
18आणि तुम्ही म्हणता तशी जर भुतांमध्येही फूट पडली
तर त्याचे राज्य कसे टिकेल? मी तुम्हांला हे विचारतो,
कारण तुम्ही म्हणता मी बालजबूलच्या साहाय्याने भुते
काढतो. .
19पण जर मी बालजबूलच्या साहाय्याने भुते काढतो,
तर तुमचे अनुयायी ( तुमची मुले) कोणाच्या साहाय्याने
भुते काढतात? म्हणून तेच तुमचा न्याय करतील. 20परंतु
जर मी देवाच्या साहाय्याने भुते काढतो, तर मग हे स्पष्ट
आहे की, देवाचे राज्य तुमच्याकडे आले आहे. 21जेव्हा
एखादा बलवान मनुष्य आपल्या सुरक्षिततेसाठी पूर्ण
शस्त्रसामग्री बाळगतो आणि स्वत:चे रक्षण करतो तेव्हा
त्याची मालमत्ता सुरक्षित राहते. 22परंतु कोणी त्याच्याहीपेक्षा
अधिक बलवान त्याच्यावर हल्ला करून त्याचा पराभव
करतो, तेव्हा ज्या शस्त्रसामग्रीवर त्याने भरंवसा ठेवला
होता, ती तो घेऊन जातो व त्याला मिळालेली लूट आपल्या
मित्रांना वाटतो. 23जो माझ्या पक्षाचा नाही, तो माझ्याविरुद्ध
आहे आणि जो माझ्याबरोबरीने गोळा करीत नाही, तर तो
उधळून टाकतो.

## रिकामा मनुष्य
### (*मत्तय 12:43-45*)

24जेव्हा भूत माणसाबाहेर येते व ते विसावा घेण्यासाठी
निर्जल प्रदेशात जागा शोधते. पण त्याला ती विश्रांति मिळत
नाही. तेव्हा तो म्हणतो, ‘मी ज्या घरातून बाहेर आलो त्या
घरात परत जाईन.’ 25तो जातो आणि त्याला ते घर झाडून
नीटनेटके केलेले आढळते. 26नंतर तो जातो आणि
आपणापेक्षा अधिक बळकट व दुष्ट असे सात आत्मे
मिळवितो, आणि ते आत जातात आणि तेथेच राहतात.
तेव्हा त्या मनुष्याची शेवटची अवस्था पहिल्यापेक्षा वाईट
होते.”

### खरे धन्य लोक

27असे घडले की, तो या गोष्टी बोलला तेव्हा गर्दीतील एक स्त्री मोठ्याने ओरडून त्याला म्हणाली, “धन्य ते गर्भाशय, ज्याने तुझा भार वाहिला व धन्य ती स्तने जी तू चोखलीस!” 28परंतु तो म्हणाला, “जे देवाचे वचन ऐकतात व पाळतात ते धन्य!”

### आम्हांला पुरावा दे

***(मत्तय 12:38-42; मार्क 8:12)***

29जसजसा लोकसमुदाय वाढू लागला, तेव्हा तो बोलू लागला, “ही पिढी दुष्ट पिढी आहे. ती चिन्ह मागत आहे, आणि योनाच्या चिन्हाशिवाय कोणतेही चिन्ह तिला दिले जाणार नाही. 30कारण जसा योना निनवेच्या लोकांकरिता चिन्ह होता तसा मनुष्याचा पुत्रही या पिढीसाठी चिन्ह होईल. 31दक्षिणेकडची राणी* न्यायाच्या दिवशी या पिढीविरुद्ध उठेल आणि ती त्यांचा धिक्कार करील. कारण ती पृथ्वीच्या दक्षिण टोकाकडून शलमोनाचे शहाणपण ऐकण्यासाठी आली, आणि आता तर शलमोनापेक्षाही थोर असा कोणी एक येथे आहे. 32न्यायाच्या दिवशी निनवेचे लोक या पिढीबरोबर उभे राहतील व त्यांचा धिक्कार करतील. कारण योनाचा उपदेश ऐकून त्यांनी पश्चात्ताप केला पण आता योनापेक्षाही थोर असा कोणी येथे आहे.

### जगासाठी प्रकाश असे व्हा

***(मत्तय 5:15; 6-22:23)***

33“कोणी दिवा लावून तळघरात किंवा भांड्याखाली ठेवत नाहीत, उलट तो दिवठणीवर ठेवतात. यासाठी की जे कोणी आत येतात त्यांना प्रकाश दिसणे शक्य व्हावे. 34डोळा हा तुमच्या शरीराचा दिवा आहे. जर तुमचे डोळे चांगले आहेत, तर तुमचे शरीरही प्रकाशाने भरलेले आहे. 35पण ते जर वाईट आहेत तर तुमचे शरीर अंधकारमय आहेत तुमच्यातला प्रकाश हा अंधार तर नाही ना, याची काळजी घ्या. 36जर तुमचे सर्व शरीर प्रकाश आहे आणि जर त्याचा एकही भाग अंधार नाही तर, जशी दिव्याची प्रकाशकिरणे तुझ्यावर प्रकाशतात, तसे ते पूर्णपणे प्रकाशतील.”

### येशू परूश्यांवर टीका करतो

***(मत्तय 23:1-36; मार्क 12:38-40; लूक 20:45-47)***

37जेव्हा येशूने आपले बोलणे संपविले तेव्हा एका परूश्याने त्याला आपल्याबरोबर जेवायला बोलाविले. तो आत गेला आणि आपल्या जागी रेलून बसला. 38परंतु त्याने जेवणापूर्वी हात धुतले नाहीत हे पाहून परूश्याला फार आश्चर्य वाटले. 39तेव्हा प्रभु त्याला म्हणाला, “तुम्ही परूशी प्याला व ताट बाहेरून स्वच्छ करता पण तुम्ही आतून अधाशीपणाने व फसवणुकीच्या दुष्टतेने भरले आहात. 40तुम्ही मूर्ख लोक! ज्याने बाहेरील बाजू बनवली तो आतली बाजू बनवणार नाही का? 41पण जे आतमध्ये आहे, ते गरिबांना द्या. आणि नंतर सर्व काही तुमच्यासाठी स्वच्छ होईल. 42परूश्यांनो तुम्हाला धिश्च ार असो कारण तुम्ही पश्चात्ताप करता व पुदिन्याचा व प्रत्येक वनस्पतीचा दशांश देता. परंतु तुम्ही न्याय आणि देवाविषयीचे प्रेम याकडे दुर्लक्ष करता. तुम्ही या गोष्टी प्रथम काराव्यात व मुख्य गोष्टींकडे दुर्लक्ष करू नये. 43परूश्यांनो तुमचा धिक्कार असो, कारण तुम्हांला सभास्थानातील महत्त्वाच्या जागी बसणे आणि बाजारात नमस्कार घेणे आवडते. 44तुमचा धिश्च ार असो कारण तुम्ही खुणा न केलेल्या कबरांसारखे आहात, अशा कबरांवर लोक नकळत पाय देऊन चालतात.”

### येशू यहूदी शिक्षकांशी बोलतो

45नियमशास्त्राचा एक शिक्षक येशूला म्हणाला, “गुरुजी, तुम्ही असे बोलता तेव्हा तुम्ही आमचासुद्धा अपमान करता.”

46तेव्हा येशू म्हणाला, “नियमशास्त्राच्या शिक्षकांनो तुमचाही धिक्कार असो, कारण तुम्ही लोकांना वाहण्यास कठीण असे ओझे लादता व ते उचलणयास तुमच्या एका बोटानेसुद्धा मदत करीत नाही. 47तुमचा धिक्कार असो, कारण तुमच्या पूर्वजांनी ठार केलेल्या भविष्यवाद्यांसाठी तुम्ही कबरा बांधता. 48अशा प्रकारे तुमच्या पूर्वजांनी केलेल्या कृत्यांचे समर्थन करता. 49यामुळे देवाचे ज्ञानसुद्धा असे म्हणाले, ‘मी प्रेषित व संदेष्टे त्यांच्याकडे पाठवील. त्यांपैकी काही जणांना ते ठार मारतील व काही जणांचा ते छळ करतील!’

50तेव्हा या पिढीस भविष्यवाद्यांचे जे रक्त जगाच्या प्रारंभापासून सांडले गेले त्याबद्दल दंड भरून द्यावा लागेल. 51म्हणजे हाबेलाच्या रक्तापासून ते जखऱ्या जो देवाचे मंदिर व वेदी यांच्यामध्ये मारला गेला. खरोखर मी तुम्हांस सांगतो या पिढीला ते भरून द्यावे लागेल.

52“नियमशास्त्राच्या शिक्षकांनो तुमचा धिक्कार असो. कारण तुम्ही ज्ञानाची किल्ली काढून घेतली आहे. तुम्ही स्वत:ही आत गेला नाहीत आणि जे आत जाण्याचा प्रयत्न करत होते, त्यांनाही जाऊ दिले नाही.”

53येशू तेथून निघून जात असता नियमशास्त्राचे शिक्षक व परूशी फार विरोध करू लागले व त्याला अनेक गोष्टींविषयी प्रश्न विचारू लागले. 54तो जे बोलेल त्यामध्ये त्याला एखाद्या सावजाप्रमाणे पकडण्यासाठी टपून बसले.

### परूश्यांसारखे होऊ नका

12 आणि म्हणून हजारो लोकांचा समुदाय जमला होता. इतके लोक जमले होते की, ते एकमेकांना तुडवू लागले. तेव्हा येशू प्रथम आपल्या शिष्यांशी बोलला:

---

**दक्षिणेकडची राणी** शीबाची राणी, देवाचे शहाणपण ऐकण्यसाठी ती 1000 मैल प्रवास करुन आली. वाचा 1 राजे 10:1-3

"परूश्यांच्या खमिराविषयी जपा, म्हणजे जे ढोंग आहे
त्याविषयी जपा. 2उघड केले जाणार नाही असे काहीच
झाकलेले नाही व जे कळणार नाही असे काहीच गुप्त
नाही. 3यास्तव जे काही तुम्ही अंधारात बोलाल ते उजेडात
ऐकले जाईल आणि जे काही तुम्ही कोणाच्या कानात
एकांतात सांगाल ते घराच्या छपरावरून घोषित केले
जाईल."

## फक्त देवाची भीति बाळगा

**(*मत्तय 10:28-31*)**

4"परंतु माझ्या मित्रांनो, मी तुम्हांला सांगतो, जे शरीराला
मारतात त्यांना तुम्ही भिऊ नये, कारण त्यानंतर त्यापेक्षा
जास्त त्यांना काही करता येत नाही. 5तुम्ही कोणाची
भीति बाळगावी हे मी तुम्हांला सांगतो. तुम्हांला ठार
मारल्यांनतर तुम्हांस नरकात टाकून देण्यास जो समर्थ
आहे, त्याची भीति धरा. होय, मी तुम्हांस सांगतो त्यालाच
भ्या.

6"पाच चिमण्या दोन पैशांना विकतात की नाही? आणि
त्यातील एकीचाही देवाला विसर पडत नाही. 7पण तुमच्या
डोक्यावरील सर्व केसदेखील त्याने मोजलेले आहेत. भिऊ
नका. पुष्कळ चिमण्यांपेक्षा तुम्ही मोल्लवान आहात."

## येशूची लाज बाळगू नका

**(*मत्तय 10:32-33; 12:32; 10:19-20*)**

8"प्रत्येक जण जो मला इतर लोकांसमोर स्वीकारतो,
त्या मनुष्याला देवाच्या दूतासमोर मनुष्याचा पुत्रही
स्वीकारील. 9परंतु जो मला इतर लोकांसमोर नाकारतो,
तो देवदूतांसमोरही नाकारला जाईल.

10"प्रत्येक मनुष्य जो मनुष्याच्या पुत्राविरुद्ध बोलतो,
त्याला क्षमा केली जाईल. परंतु जो पवित्र आत्म्याविरुद्ध
दुर्भाषण करतो त्याला क्षमा केली जाणार नाही.

11"जेव्हा ते तुम्हांला सभास्थान, सरकार, अधिकारी
यांच्यासमोर आणतील तेव्हा तुम्ही काय बोलावे किंवा
स्वत:चा बचाव कसा करावा याविषयी आधीच चिंता
करीत बसू नका. 12कारण तुम्ही काय बोलावे हे पवित्र
आत्मा त्यावेळी तुम्हांला शिकवील."

## येशू स्वार्था विरुद्ध सूचना देतो

13नंतर लोकसमुदायातील एक जण त्याला म्हणाला,
"गुरुजी, माझ्या भावाला वतन विभागून माझे मला द्यायला
सांगा!"

14परंतु येशू त्याला म्हणाला, "मनुष्या, मला तुमच्यावर
मध्यस्थ किंवा न्यायाधीश म्हणून कोणी नेमले?" 15मग
येशू त्यांना म्हणाला, "सांभाळा आणि सर्व प्रकारच्या
लोभापासून स्वत:ला दूर ठेवा. कारण जेव्हा एखाद्या
माणसाजवळ त्याच्या गरजेपेक्षा अधिक असते तेव्हा ती
संपत्ती म्हणजे त्याचे जीवन असे होत नाही."

16नंतर त्याने त्यास एक बोधकथा सांगितली: "कोणा
एका धनवान मनुष्याच्या जमिनीत फार उत्तम पीक आले.
17तो स्वत:शी विचार करून असे म्हणाला, 'मी काय
करू, कारण धान्य साठवायला माझ्याकडे जागा नाही?'
18मग तो म्हणाला, 'मी असे करीन की धान्याची कोठारे
पाडून मोठी बांधीन, मी माझे सर्व धान्य व माल तेथे
साठवीन. 19आणि मी माझ्या जिवाला म्हणेन, जिवा,
तुझ्यासाठी पुष्कळ चांगल्या गोष्टी अनेक वर्षे पुरतील
इतक्या आहेत. आराम कर. खा, पी आणि मजा कर."
20पण देव त्याला म्हणतो, 'मूर्खा, जर आज तू मेलास तर
तू मिळविलेल्या गोष्टी कोणाला मिळतील?'

21"जो कोणी स्वत:साठी संपत्ती जमा करतो परंतु देवाच्या
दृष्टीने जो धनवान नाही, अशा मनुष्यासारखे हे आहे."

## देवाच्या राज्याला प्रथम स्थान देणे

**(*मत्तय 6:25-34, 19-21*)**

22मग येशू त्याच्या शिष्यांना म्हणाला, "म्हणून मी तुम्हांस
सांगतो, स्वत:च्या जीवनाविषयी किंवा तुम्ही काय खावे
याविषयी चिंता करू नका. किंवा तुमच्या शरीराविषयी
म्हणजे कोणते कपडे घालावेत याविषयी चिंता करू नका.
23कारण अन्नापेक्षा जीव आणि कपड्यापेक्षा शरीर महत्त्वाचे
आहे. 24कावळ्यांचा विचार करा. ते पेरीत नाहीत व
कापणीही करीत नाहीत. त्यांना कोठार नाही व कणगीही
नाही. तरीही देव त्याचे पोषण करतो. पक्ष्यांपेक्षा तुम्ही
कितीतरी मोलवान आहात! 25चिंता करून तुम्हांपैकी
कोण स्वत:च्या आयुष्यात एका तासाची भर घालू शकेल?
26ज्याअर्थी तुम्ही ही लहान गोष्ट करू शकत नाही, तर
इतर गोष्टींविषयी चिंता का करता?

27रानफुले कशी वाढतात याचा विचार करा. ते कष्ट
करीत नाहीत व कातीत नाहीत. तरी मी तुम्हांला सांगतो
शलमोनानेसुद्धा आपल्या सर्व वैभवात त्यांच्यातील
एकासारखाही पोशाख घातला नव्हता. 28जर देवाने जे
आज आहे व उद्या भट्टीत टाकले जाईल अशा त्या रानातील
गवताला असा पोशाख घातला आहे, तर तुम्ही जे
अल्पविश्वासू त्या तुम्हांला तो कितीतरी अधिक (चांगला)
पोशाख घालणार नाही काय! 29आणि तुम्ही काय खावे
व काय प्यावे याविषयी खटपट करू नका. या गोष्टींविषयी
चिंता करू नका. 30कारण जगातील सर्व लोक हे
मिळविण्याची खटपट करतात पण या गोष्टींची गरज
तुम्हांला आहे, हे तुमच्या पित्याला माहीत आहे. 31त्याऐवजी
प्रथम त्याचे राज्य मिळविण्यासाठी झटा म्हणजे याही गोष्टी
तुम्हांला दिल्या जातील.

## धनावर विश्वास ठेवू नका

32"लहान कळपा भिऊ नको, कारण तुम्हांला त्याचे
राज्य द्यावे हे दयाळू पित्याला समाधानाचे वाटते.
33तुमच्याकडे असलेले सर्व विका आणि गरिबांना पैसे

द्या. जुन्या न होणाऱ्या व स्वर्गातही न संपणाऱ्या अशा
थैल्या स्वत:साठी करा. जेथे चोर जाऊ शकणार नाही व
कसरही त्याचा नाश करू शकणार नाही. 34कारण जेथे
तुमचे धन आहे तेथे तुमचे मनही लागेल.

## सदैव तयार असा

*(मत्तय 24:45-51)*

35“तुमच्या कंबरा बांधलेल्या आणि दिवे लागलेले असू
द्या. 36लग्नाच्या मेजवानीवरून त्यांचा मालक परत येईल
अशी वाट पाहणाऱ्या लोकांसारखे व्हा. यासाठी की जेव्हा
तो येतो व ठोठावतो तेव्हा त्याच्यासाठी ते ताबडतोब दार
उघडतील. 37धन्य ते नोकर जे त्यांचा मालक परत
आल्यावर त्याला जागे व तयारीत असलेले आढळतील.
मी तुम्हांला खरे सांगतो, तो स्वत: त्यांची सेवा करण्यासाठी
कंबर कसेल, त्यांना मेजावर बसायला सांगून त्यांची सेवा
करील. 38तो मध्यरात्री येवो अगर त्यानंतर येवो. जर ते
त्याला असे तयारीत आढळतील तर ते धन्य. 39परंतु
याविषयी खात्री बाळगा; जर घराच्या मालकाला चोर
केव्हा येणार हे माहीत असते तर त्याचे घर त्याने फोडू
दिले नसते. 40तुम्हीही तयार असा कारण तुम्ही अपेक्षा
करणार नाही अशा कोणत्याही क्षणी मनुष्याचा पुत्र येईल.”

## विश्वासू नोकर कोण आहे

41मग पेत्र म्हणाला, “प्रभु, तुम्ही ही बोधकथा आम्हांलाच
सांगत आहात की सर्वांना?”

42तेव्हा प्रभु म्हणाला, “असा कोण शहाणा व विश्वासू
कारभारी आहे की, ज्याला प्रभु त्याच्या नोकरांना त्यांचे
धान्य योग्य वेळी देण्यासाठी त्याची नेमणूक करील?
43त्याचा मालक येईल त्यावेळी असे करताना जो नोकर
आढळेल तो धन्य. 44मी तुम्हांला खरे सांगतो, मालक त्या
नोकराला त्याच्या सर्व मालमत्तेवर अधिकारी म्हणून
नेमील. 45पण जर तो नोकर मनात म्हणतो, ‘माझा मालक
येण्यास फार विलंब लावतो.’ व तो त्याच्या स्त्री व पुरुष
नोकरांना मारहाण करतो व खाण्यापिण्यास सुरुवात करतो.
46ज्या दिवसाची तो वाट पाहत नाही त्या दिवशी त्या
नोकराचा मालक येईल व अशा वेळी येईल की ती वेळ
त्याला माहीत असणार नाही. आणि तो त्याचे वाभाडे
वाभाडे काढील व तो त्याला अविश्वासू लोकांबरोबर
ठेवील. 47ज्या नोकराला आपल्या मालकाची इच्छा माहीत
असते व जो तयार राहत नाही, किंवा जो आपल्या
मालकाच्या इच्छेप्रमाणे करीत नाही, त्या नोकराला खूप
मार मिळेल. 48परंतु कसलाही वाईट हेतू न बाळगता
मालकाला न आवडणारे जर त्याने केले असेल तर
त्याला कमी मार बसेल. ज्या कोणाला पुष्कळ दिले आहे
त्याच्याकडून पुष्कळाची अपेक्षा केली जाईल.
ज्यांच्याजवळ जास्त ठेवले आहे त्यांच्याकडून जास्त
मागितले जाईल.”

## लोक येशूविषयी सहमत होणार नाहीत

*(मत्तय 10:34-36)*

49“मी पृथ्वीवर आग लावण्यास आलो आहे. मला असे
वाटते की ती अगोदरच पेटली असती तर किती बरे झाले
असेत. 50माझ्याकडे बाप्तिस्मा आहे व तो मला घ्यावयाचा
आहे. आणि तो होईपर्यंत मी किती अस्वस्थ आहे! 51तुम्हांला
असे वाटते का की मी पृथ्वीवर शांतता प्रस्थापित करण्यास
आलो आहे? नाही, मी तुम्हांला सांगतो मी तुमच्यात फूट
पाडण्यासाठी आलो आहे. 52मी असे म्हणतो कारण
आतापासून घरातील पाच जणात एकमेकाविरुद्ध फूट पडेल.
तिघे दोघांविरुद्ध व दोघे तिघांविरुद्ध अशी फूट पडेल.

53त्यांच्यात पित्याविरुद्ध मुलगा व मुलाविरुद्ध पिता अशी
फूट पडेल, आईविरुद्ध मुलगी व मुलीविरुद्ध आई अशी
फूट पडेल, सासूविरुद्ध सून व सुनेविरुद्ध सासू अशी त्यांच्यात
फूट पडेल.”

## समय ओळखणे

*(मत्तय 16:2-3)*

54तो लोकसमुदायाला म्हणाला, “तुम्ही जेव्हा
पश्चिमेकडून ढग येताना पाहता तेव्हा तुम्ही लगेच म्हणता
की, ‘पाऊस पडेल’ आणि तेच घडते. 55जेव्हा दक्षिणेकडचा
वारा वाहतो, तेव्हा तुम्ही म्हणता ‘उकाडा होईल’ आणि
तसे घडते. 56अहो ढोंग्यांनो! तुम्ही पृथ्वीवरील व
आकाशातील स्थित्यंतरे पाहून अनुमान काढता, पण
सध्याच्या काळाचा अर्थ तुम्हांला का काढता येत नाही?”

## तुमच्या समस्या सोडवा

*(मत्तय 5:25-26)*

57“आणि काय योग्य आहे हे तुमचे तुम्ही स्वत:च का
ठरवीत नाही? 58तुम्ही तुमच्या वाद्याबरोबर न्यायालयात
जात असता वाटेतच त्यांच्याशी समेट करा नाही तर तो
तुम्हांला न्यायाधीशासमोर नेईल, आणि न्यायाधीश तुम्हांला
दंडाधिकाऱ्याच्या स्वाधीन करील. आणि अधिकारी
तुम्हांला तुरुंगात टाकील. 59मी तुम्हांला सांगतो, तुम्ही पै
न पै देईपर्यंत तेथून बाहेर पडू शकणार नाही.”

## तुमची अंत:करणे बदला

13 त्यावेळी तेथे काही लोक उपस्थित होते. त्यांनी
येशूला गालीलातील त्या लोकांविषयी सांगितले,
ज्यांचे रक्त पिलाताने* आधीच असलेल्या यज्ञपशूंच्या
रक्तात मिसळले होते. 2त्याने त्यांना उत्तर दिले, “तुम्हांला
वाटते का की, ह्या गालीलकरांनी जे भोगले त्यावरून ते
इतर गालीलकरांपेक्षा जास्त पापी होते? 3नाही, मी तुम्हांस

---

**पिलात** पंतय पिलात हा रोमी राज्यपाल होता. तो यहुदायाचा
इ.स. 26 ते 36 पर्यंत राज्यपाल होता.

सांगतो, जर तुम्ही पश्चात्ताप केला नाही तर ते जसे मेले
तसे तुम्हीही मराल. 4किंवा त्या अठरा जणांचे काय?
ज्यांच्यावर शिलोहाचा बुरूज पडला व ते मारले गेले?
तुम्हांला वाटते का की, यरुशलेम येथे राहणाऱ्या सर्व
लोकांपेक्षा ते अधिक दोषी होते? 5नाही, मी तुम्हांला
सांगतो जर तुम्ही पश्चात्ताप केला नाही तर तुम्ही सर्व जण
त्यांच्यासारखे मराल."

## निरुपयोगी झाड

6नंतर त्याने ही बोधकथा सांगितली, "एका माणसाने
त्याच्या बागेत अंजिराचे झाड लावले होते, त्यावर फळ
असेल म्हणून तो पाहावयास आला परंतु त्याला काहीही
आढळले नाही. 7म्हणून तो माळ्याला म्हणाला, 'पाहा, या
अंजिराच्या झाडावर फळ पाहण्यासाठी मी गेल्या तीन
वर्षांपासून येत आहे, परंतु मला त्यावर काहीही आढळले
नाही. तेव्हा ते तोडून टाक. त्याचा उगीच भुईला भार
कशाला?'
8माळ्याने उत्तर दिले, 'मालक, या एका वर्षासाठी ते
राहू द्या. मग मी त्याच्याभोवती खणून त्याला खत घालीन.
9मग येत्या वर्षात फळ आले तर छानच! जर आले नाही
तर मग आपण ते तोडून टाकावे."

## येशू एका स्त्रीला शब्बाथ दिवशी बरे करतो

10शब्बाथ दिवशी येशू एका सभास्थानात शिकवीत
होता. 11तेथे एक स्त्री होती. तिला अशुद्ध आत्म्याने अठरा
वर्षे पांगळे केले होते. ती कुबडी होती व तिला सरळ उभे
राहता येत नव्हते.
12येशूने तिला पाहिले, त्याने तिला बोलावले आणि तो
तिला म्हणाला, "बाई, तुझ्या आजारापासून तू मुक्त झाली
आहेस!"
13नंतर त्याने आपले हात तिच्यावर ठेवले आणि ती
तत्काळ सरळ झाली. आणि ती देवाची स्तुति करू लागली.
14नंतर सभास्थानाचा अधिकारी रागावला, कारण येशूने
शब्बाथ दिवशी तिला बरे केले होते. तो लोकांना म्हणाला,
"काम करण्यासाठी सहा दिवस आहेत म्हणून या सहा
दिवसांमध्ये या व बरे व्हा. पण शब्बाथ दिवशी येऊन बरे
होऊ नका."
15येशूने त्याला उत्तर दिले, आणि म्हणाला, "ढोंग्यांनो,
तुम्हांपैकी प्रत्येक जण त्याच्या बैलाला वा गाढवाला शब्बाथ
दिवशी त्याच्या ठिकाणाहून सोडून पाणी पाजायला घेऊन
जात नाही का? 16ही तर अब्राहामाची कन्या आहे. सैतानाने
हिला अठरा वर्षे बांधून ठेवले होते. ज्या बंधनात ती होती
त्यापासून तिला शब्बाथ दिवशी सोडविणे चूक होते काय?"
17तो असे म्हणाल्यावर जे त्याचा विरोध करीत होते त्यांना
लाज वाटली व त्याने ज्या अद्भुत गोष्टी केल्या होत्या
त्यामुळे सगळा समुदाय आनंद करू लागला.

## देवाचे राज्य कशासारखे आहे?

*(मत्तय 13:31-33; मार्क 4:30-32)*

18मग तो म्हणाला, "देवाचे राज्य कशासारखे आहे?
आणि मी त्याची कशाबरोबर तुलना करू? 19देवाचे राज्य
एका मोहरीच्या दाण्यासारखे आहे. तो मोहरीचा दाणा
एका मनुष्याने घेतला व आपल्या बागेत लावला, तो
वाढला आणि त्याचे झाड झाले. आकाशातील पाखरांनी
त्याच्या फांद्यांवर घरटी बांधली."
20तो पुन्हा म्हणाला, "मी देवाच्या राज्याची तुलना
कोणाबरोबर करू? 21ते खमिरासारखे आहे. एका स्त्रीने
तीन मापे पिठात खमिर मिसळले आणि ते सर्व खमिरामुळे
फुगले.'

## अरूंद दरवाजा

*(मत्तय 7:13-14, 21-23)*

22येशू गावागावांतून आणि खेड्यापाड्यांतून जात असता
व यरुशलेमाच्या दिशेने वाटचाल करीत असता तो लोकांना
शिकवीत होता. 23कोणीतरी त्याला विचारले, "प्रभु, फक्त
थोड्या लोकांचेच तारण होईल का?"
तो त्यांना म्हणाला, 24"अरूंद दरवाजाने आत जाण्याचा
प्रयत्न करा, कारण मी तुम्हांला सांगतो की, पुष्कळ जण
आत येण्याचा प्रयत्न करतील, पण त्यांना ते शक्य होणार
नाही. 25जेव्हा घराचा मालक उठून दार बंद करील,
तेव्हा तुम्ही बाहेर उभे राहाल व दार ठोठवाल. आणि
म्हणाल, 'प्रभु, आम्हांसाठी दार उघडा!' परंतु तो तुम्हांला
उत्तर देईल, 'तुम्ही कोठून आलात हे मला माहीत नाही.'
26नंतर तुम्ही म्हणाल, 'आम्ही तुमच्याबरोबर जेवलो,
आम्ही तुमच्याबरोबर प्यालो, आमच्या रस्त्यावर तुम्ही
शिक्षण दिले!'
27आणि तो तुम्हांला म्हणेल, "तुम्ही कोठून आलात हे
मला माहीत नाही, जे तुम्ही दुष्टपणा करता ते सर्व
माझ्यापासून निघून जा.' 28तेथे रडणे व दात खाणे चालेल,
तेव्हा तुम्ही अब्राहामाला, आणि इसहाकाला आणि
याकोबाला आणि सर्व संदेष्ट्यांना देवाच्या राज्यामध्ये
पाहाल, पण तुम्ही स्वत: मात्र बाहेर फेकलेले असाल.
29आणि लोक पूर्वेकडून, पश्चिमेकडून, उत्तरेकडून व
दक्षिणेकडून येतील व देवाच्या राज्यात मेजासभोवती
आपापल्या जागेवर बसतील. 30लक्षात ठेवा की, जे शेवटचे
आहेत ते पहिले होतील, व जे पहिले आहेत ते शेवटचे
होतील."

## येशू यरुशलेमामध्ये मरण पावेल

*(मत्तय 23:37-39)*

31त्यावेळी काही परूशी येशूकडे आले. आणि ते त्याला
म्हणाले, "येथून निघा व दुसरीकडे कुठे तरी जा, कारण
हेरोद तुम्हांला ठार मारणार आहे." 32येशू त्यांना म्हणाला,
"जा आणि त्या कोल्ह्याला सांगा, 'ऐक, मी लोकांतून भुते

काढीन, आज व उद्या रोग बरे करीन आणि तिसऱ्या
दिवशी माझे काम संपवीन.' 33तरीही आज, उद्या आणि
परवा मला पुढे गेले पाहिजे कारण संदेष्टयांने
यरुशलेमाबाहेर मरणे ह्याचा विचार करणे चूक आहे.
34"यरुशलेमे, यरुशलेमे, जी तू संदेष्टयांना मारतेस व
देवाने पाठविलेल्यांवर दगडमार करतेस! कितीतरी वेळा
कोंबडी जशी पिलांना आपल्या पंखाखाली एकवटते तसे
तुम्हा लोकांना एकवटण्याची माझी इच्छा होती, पण तुमची
तशी इच्छा नव्हती. 35पाहा, देवाने तुमच्या घराचा त्याग
केला आहे. मी तुम्हांला सांगतो, 'देवाच्या नावाने येणारा
धन्यवादित असो'* असे म्हणण्याची वेळ येईपर्यंत तुम्ही
मला पाहणार नाही."

## शब्बाथ दिवशी रोग बरे करणे योग्य आहे काय?

14 एका शब्बाथ दिवशी तो प्रमुख परूश्यांपैकी
एकाच्या घरी जेवावयास गेला, तेव्हा तेथे असणारे
लोक येशूवर बारकाईने नजर ठेवीत होते. 2आणि तेथे
त्याच्यासमोर जलोदर झालेला एक मनुष्य होता. 3येशूने
नियमशास्त्राच्या शिक्षकांना व परूश्यांना विचारले,
"शब्बाथ दिवशी बरे करणे नियमशास्त्राला धरून आहे
की कसे?" 4पण ते गप्प राहिले. तेव्हा येशूने त्या आजारी
माणसाला धरून त्याला बरे केले व त्याला पाठवून दिले.
5मग तो त्यांना म्हणाला, "जर तुमच्यापैकी एखाद्याला एक
मुलगा किंवा एक बैल आहे व तो विहीरीत पडला, तर
शब्बाथ दिवशी तुम्ही त्याला ताबडतोब बाहेर काढणार
नाही काय?" 6आणि ह्या प्रश्नाला उत्तर देणे त्यांना जमले
नाही.

## स्वत:ला महत्त्व देऊ नका

7मग त्याने पाहुण्यांना एक बोधकथा सांगितली, कारण
त्याने पाहिले की, ते त्यांच्यासाठी मानाच्या जागा शोधीत
होते. तो त्यांना म्हणाला, 8"जेव्हा एखादा तुम्हांला लग्नाच्या
मेजवानीला आमंत्रित करील, तेव्हा मानाच्या आसनावर
बसू नका. कारण तुमच्यापेक्षा अधिक महत्त्वाच्या माणसाला
त्याने कदाचित आमंत्रण दिले असेल. 9मग ज्याने तुम्हा
दोघांना आमंत्रित केले आहे तो येईल, आणि तुम्हांला
म्हणेल, 'या माणसाला तुझी जागा दे.' मग खजील होऊन
तुम्हांला खालच्या जागी बसावे लागेल. 10पण जेव्हा तुम्हांला
आमंत्रित केलेले असेल, तेव्हा जा आणि अगदी खालच्या
(शेवटच्या) जागी जाऊन बसा. यासाठी की, जेव्हा यजमान
येईल, तेव्हा तो तुम्हांला म्हणेल, 'मित्रा, वरच्या आसनावर
येऊन बैस.' तेव्हा तुझ्या पाहुण्यांसमोर तुझा मान होईल.
11कारण जो कोणी स्वत:ला उच्च करितो त्याला लीन
केले जाईल व जो स्वत:ला लीन करील त्याला उच्च
केले जाईल."

## तुम्हांला बक्षीस दिले जाईल

12मग ज्याने आमंत्रण दिले होते त्याला तो म्हणाला, "तू
जेव्हा दुपारी किंवा संध्याकाळी भोजनास बोलावशील तेव्हा
तुझ्या मित्रांना, भावांना, किंवा तुझ्या नातेवाईकांना वा
श्रीमंत शेजाऱ्यांना बोलावू नको, कारण तेही तुला परत
आमंत्रण देतील व अशा रीतीने तुझ्या आमंत्रणाची परतफेड
केली जाईल. 13पण जेव्हा तू मेजवानी देशील, तेव्हा
गरीब, लंगडे, पांगळे, आंधळे यांना आमंत्रण दे. 14आणि
तुला आशीर्वाद मिळतील, कारण तुझी परतफेड
करण्यासाठी त्यांच्याकडे काहीही असणार नाही. कारण
नीतीमानांच्या पुनरुत्थानाच्या वेळी तुझी परतफेड होईल."

## मोठ्या मेजवानीविषयीची गोष्ट
### (*मत्तय 22:1-10*)

15आता जेव्हा मेजाभोवती बसलेल्यांपैकी एकाने हे
ऐकले, तेव्हा तो येशूला म्हणाला, "देवाच्या राज्यात जेवतो,
तो प्रत्येक जण धन्य!"
16मग येशू त्याला म्हणाला, "एक मनुष्य एका मोठ्या
मेजवानीची तयारी करीत होता. त्याने पुष्कळ लोकांना
आमंत्रण दिले. 17भोजनाच्या वेळी ज्यांना आमंत्रण दिले
होते त्यांना 'या, कारण सर्व तयार आहे' हे सांगण्यासाठी
नोकराला पाठविले. 18ते सर्वजण सबब सांगू लागले. पहिला
त्याला म्हणाला, 'मी शेत विकत घेतले आहे आणि मला
जाऊन ते पाहिले पाहिजे. कृपा करून मला क्षमा कर.'
19दुसरा म्हणाला, 'मी बैलाच्या पाच जोड्या विकत घेतल्या
आहोत व त्या कशा आहेत हे बघण्यासाठी मी चाललो
आहे. कृपा करून मला क्षमा कर.' 20आणखी तिसरा
म्हणाला, 'मी लग्न केले आहे, व त्यामुळे मी येऊ शकणार
नाही.' 21म्हणून जेव्हा तो नोकर परत आला, तेव्हा त्याने
आपल्या मालकाला या गोष्टी सांगितल्या. मग घराचा
मालक रागावला आणि नोकराला म्हणाला, 'लवकर
बाहेर रस्त्यावर आणि नगरातल्या गल्ल्यांमध्ये जा व गरीब,
आंधळे, असहाय्य, लंगडे यांना घेऊन इकडे ये!' 22नोकर
म्हणाला, 'आपल्या आज्ञेप्रमाणे केले आहे. आणि तरीही
जागा आहे.' 23मालक नोकराला म्हणाला, 'रस्त्यावर जा,
कुंपणाजवळ जा आणि तेथे असलेल्या लोकांना आग्रहाने
आत येण्यास सांग म्हणजे माझे घर भरून जाईल. 24कारण
मी तुम्हांस सांगतो की, त्या आमंत्रित केलेल्या कोणालाही
माझ्या मेजवानीतली चव पाहायला मिळणार नाही.'"

## प्रथम तुम्ही योजना आखा
### (*मत्तय 10:37-38*)

25मोठ्या संख्येने लोक येशूबरोबर चालत होते. तो
त्यांच्याकडे वळाला व म्हणाला, 26"जर कोणी माझ्याकडे
येतो आणि आपले वडील, आई, पत्नी, मुले, भाऊ, बहिणी
एवढेच नव्हे, तर स्वत:च्या जिवाचासुद्धा द्वेष करीत नाही,
तर तो माझा शिष्य होऊ शकत नाही. 27जो कोणी स्वत:चा

---

**देवाच्या ... असो** स्तोत्र. 118:26

वधस्तंभ घेऊन माझ्यामागे येणार नाही, तो माझा शिष्य होऊ शकणार नाही. [28]जर तुम्हांपैकी कोणाला बुरूज बांधायचा असेल तर तो अगोदर बसून खर्चाचा अंदाज करून तो पूर्ण करावयास त्याच्याजवळ पुरेसे आहे की नाही हे पाहणार नाही काय? [29]नाहीतर कदाचित तो पाया घालील आणि पूर्ण करू शकणार नाही. आणि जे पाहणारे आहेत ते त्याची थट्टा करतील आणि म्हणतील, [30]'या मनुष्याने बांधण्यास सुरूवात केली पण पूर्ण करू शकला नाही!'

[31]"किंवा एक राजा दुसऱ्या राजाबरोबर लढाई करण्यास निघाला, तर तो अगोदर बसून याचा विचार करणार नाही का की, त्याच्या दहा हजार मनुष्यांनिशी त्याच्या शत्रूशी, जो वीस हजार सैन्यानिशी चालून येत आहे, त्याला मुकाबला करता येणे शक्य आहे काय? [32]जर तो त्याला तोंड देऊ शकणार नसेल, तर त्याचा शत्रू दूर अंतरावर असतानाच तो शिष्टमंडळ पाठवून शांततेसाठी तहअटींची विचारणा करील. [33]त्याच प्रकारे तुमच्यापैकी जो कोणी सर्वस्वाचा त्याग करीत नाही त्याला माझा शिष्य होता येणार नाही.

## तुमचा प्रभाव गमावू नका
### *(मत्तय 5:13; मार्क 9:50)*

[34]"मीठ चांगले आहे. पण मिठाची जर चव गेली, तर त्याला खारटपणा कशाने येईल? [35]ते पूर्णपणे निरुपयोगी ठरेल व लोक ते फेकून देतील.

"ज्याला ऐकायला कान आहेत तो ऐको!"

## स्वर्गातील आनंद
### *(मत्तय 18:12-14)*

15 सर्व पापी लोक त्याचे ऐकायला त्याच्याकडे येत होते. [2]तेव्हा परूशी व नियमशास्त्राचे शिक्षक कुरकूर करू लागले. ते म्हणू लागले, "हा पाप्यांचे स्वागत करतो आणि त्यांच्याबरोबर जेवतो!"

[3]मग येशूने त्यांना ही गोष्ट सांगितली. [4]"जर तुमच्यापैकी कोणा एकाजवळ शंभर मेंढरे असून त्यातील एक हरवले, तर तो नव्याण्णव रानांत सोडून हरवलेल्या मेंढरामागे ते सापडेपर्यंत जाणार नाही काय? [5]आणि जेव्हा त्याला ते सापडते तेव्हा तो आनंदाने ते खांद्यांवर घेतो. [6]आणि घरी येतो, तेव्हा मित्रांना आणि शेजाऱ्यांना एकत्र करून म्हणतो, 'माझ्याबरोबर आनंद करा कारण माझे हरवलेले मेंढरू सापडले आहे.' [7]मी तुम्हांस सांगतो, त्याचप्रमाणे ज्यांना पश्चात्तापाची गरज नाही अशा नव्याण्णव नीतिमानांपेक्षा पश्चात्ताप करणाऱ्या एका पाप्याबद्दल स्वर्गात अधिक आनंद होईल.

[8]"समजा एका बाईजवळ चांदीची दहा नाणी आहेत. जर तिचे एक नाणे हरवतले तर ती दिवा लावून घर झाडून ते मिळेपर्यंत काळजीपूर्वक शोधणार नाही काय? [9]आणि जेव्हा तिला ते नाणे सापडते तेव्हा ती मैत्रिणींना आणि शेजाऱ्यांना बोलाविते आणि म्हणते, 'माझ्याबरोबर आनंद करा कारण माझे हरवलेले नाणे सापडले आहे.' [10]त्याचप्रमाणे पश्चात्ताप करणाऱ्या एका पाप्याबद्दल देवाच्या दूतासमोर आनंद होतो हे मी तुम्हांस सांगतो."

## घर सोडून गेलेला मुलगा

[11]मग येशू म्हणाला, "एका मनुष्याला दोन मुलगे होते. [12]त्यापैकी धाकटा म्हणाला, 'बाबा, मालमत्तेचा माझा वाटा मला द्या.' आणि वडिलांनी आपली संपत्ती दोघा मुलांमध्ये विभागली. [13]नंतर फार दिवस झाले नाहीत तोच धाकट्या मुलाने आपले सर्व गोळा केले आणि तो दूरदेशी निघून गेला. तेथे त्याने सर्व संपत्ती चैनीचे जीवन जगून उधळून टाकली. [14]त्याने सर्व पैसे खर्च केल्यावर, त्या देशांत भयंकर दुष्काळ पडला व त्याला गरज भासू लागली. [15]मग तो गेला आणि त्या देशातील एका नागरिकाजवळ नोकरी करू लागला. त्या नागरिकाने त्याला डुकरे चारावयास पाठविले. [16]तेव्हा डुकरे खातात त्या शेंगा तरी खाव्यात अशी त्याला इच्छा होई, पण कोणी त्याला काहीही दिले नाही. [17]नंतर तो शुद्धीवर आला आणि म्हणाला, 'माझ्या पित्याच्या घरी किती तरी मजुरांना पुरून उरेल इतके अन्न आहे आणि येथे मी भुकेने मरतो आहे! [18]मी उठून आपल्या वडिलांकडे जाईन आणि त्यांना म्हणेन, बाबा, मी स्वर्गाविरुद्ध (देवाविरुद्ध) आणि तुमच्याविरुद्ध पाप केले आहे. [19]तुमचा मुलगा म्हणवून घेण्यास मी योग्य नाही. मला आपल्या रोजंदारीवरील मजुरांसारखे ठेवा.'

[20]मग तो उठला आणि आपल्या पित्याकडे गेला. तो दूर असतानाच पित्याने त्याला पाहिले आणि त्याला त्याचा कळवळा आला. वडील पळत गेले आणि त्याच्या गळ्यात पडले आणि त्याचे मुके घेतले.

## मुलगा परततो

[21]"मुलगा त्यांना म्हणाला, 'बाबा, मी स्वर्गाविरुद्ध व तुमच्याविरुद्ध पाप केले आहे. तुमचा मुलगा म्हणवून घेण्यास मी योग्य नाही.' [22]परंतु वडील आपल्या नोकरांस म्हणाले, "त्वरा करा, चांगला झगा आणून त्याला घाला. त्याच्या हातात अंगठी आणि पायात जोडे घाला. [23]आणि पुष्ट वासरू आणून कापा, आपण खाऊ आणि आनंद करू! [24]कारण हा माझा मुलगा मेला होता पण जिवंत झाला आहे! तो हरवला होता. पण आता सापडला आहे.' व ते आनंद करू लागले.

## मोठा मुलगा येतो

[25]"त्याचा मोठा मुलगा शेतात होता. तो घराकडे निघाला. जेव्हा तो घराजवळ आला, तेव्हा त्याने गायनवादन व नाचण्याचा आवाज ऐकला. [26]त्याने एका नोकराला

बोलावून विचारले, ‘हे सर्व काय चालले आहे?’ 27तो नोकर त्याला म्हणाला, ‘तुमचा भाऊ आला आहे. तो सुखरूप आला म्हणून तुमच्या वडिलांनी पुष्ट वासरू कापले आहे.’

28मोठा मुलगा रागावला त्याला आत जाण्याची इच्छा होईना. तेव्हा वडिलांनी येऊन त्याची समजूत काढली. 29परंतु त्याने वडिलांना उत्तर दिले, ‘पाहा, इतकी वर्षे मी तुमची सेवा केली आहे व कधीही तुमची आज्ञा मोडली नाही! मित्रांबरोबर आनंद करण्यासाठी तुम्ही मला कधी बकरीसुद्धा दिली नाही. 30ज्याने तुमची सर्व संपत्ती वेश्यांसाठी उधळली तो तुमचा मुलगा परत आला तेव्हा तुम्ही त्याच्यासाठी पुष्ट वासरू कापले! ’31वडील त्याला म्हणाले, ‘माझ्या मुला, तू नेहमीच माझ्याबरोबर आहेस आणि जे माझे आहे ते सर्व तुझे आहे. 32आपण आनंद आणि उत्सव केला पाहिजे कारण हा तुझा भाऊ मेला होता तो जिवंत झाला आहे. तो हरवला होता, तो सापडला आहे.’”

## खरी संपत्ती

16 येशू त्याच्या शिष्यांना म्हणाला, “एक श्रीमंत मनुष्य होता. त्याचा एक कारभारी होता. ‘हा कारभारी तुमचे पैसे उधळतो,’ असे त्या श्रीमंत माणसाला सांगण्यात आले. 2म्हणून त्या श्रीमंत मनुष्याने कारभाऱ्याला आत बोलावले आणि म्हणाला, ‘हे मी तुझ्याविषयी काय ऐकत आहे? तुझ्या कारभाराचा हिशेब दे, कारण यापुढे कारभारी म्हणून तुला राहता येणार नाही.’

3“तेव्हा कारभारी स्वत:शी म्हणाला, ‘मी काय करू? माझे मालक माझे कारभाऱ्याचे काम काढून घेत आहेत. शेतात कष्ट करण्याइतका मी बळकट नाही व भीक मागण्याची मला लाज वाटते. 4मी काय करावे हे मला माहीत आहे. यासाठी की जेव्हा मला कारभाऱ्याच्या कामावरून काढून टाकतील, लोक मला त्यांच्या घरांमध्ये घेतील.’

5“मग त्याने त्याच्या मालकाच्या प्रत्येक कर्जदाराला बोलावले. पहिल्याला तो म्हणाला, ‘तू माझ्या मालकाचे किती देणे लागतोस?’

6तो म्हणाला, ‘चार हजार लीटर जैतून तेल.’ मग तो त्याला म्हणाला, ‘तुझा पावती घे बघ, खाली बस आणि लवकर त्यावर दोन हजार लीटर लिही.’

7“मग दुसऱ्याला तो म्हणाला, ‘आणि तुझे किती देणे आहे?’ तो म्हणाला, ‘तीस हजार किलो गहू.’ तो त्याला म्हणाला, ‘तुझा हिशेबाची पावती घे व त्यावर पंचवीस हजार किलो लिही.

8आणि मालकाने त्या अप्रामाणिक कारभाऱ्याची प्रशंसा केली. कारण तो धूर्तपणे वागला होता. या जगाचे पुत्र त्यांच्यासारख्यांशी वागताना प्रकाशाच्या पुत्रांपेक्षा अधिक धूर्ततेने वागतात.

9“मी तुम्हांस सांगतो, तुमच्यासाठी तुमच्या ऐहिक संपत्तीने मित्र मिळवा. यासाठी की, जेव्हा ते संपेल तेव्हा ते तुमचे अनंतकाळच्या घरात स्वागत करतील. 10ज्या कोणावर थोडा विश्वास ठेवणे शक्य आहे त्याच्यावर जास्त विश्वास ठेवला जाण्याची शक्यता आहे. व जो कोणी थोडक्याविषयी अविश्वासू आहे तो अधिकाविषयीसुद्धा अविश्वासू आहे.

11“म्हणून जर तुम्ही ऐहिक संपत्तीविषयी विश्वासू नाही, तर मग खऱ्या संपत्तीविषयी तुमच्यावर कोण विश्वास ठेवील?

12“जे दुसऱ्याचे आहे त्याविषयी तुम्ही विश्वासू नसाल तर जे तुमचे आहे ते तुम्हांस कोण देईल?”

13“कोणत्याही नोकराला दोन मालकांची सेवा करता येत नाही. एकाचा तो द्वेष करील व दुसऱ्यावर तो प्रेम करील किंवा एकाशी तो प्रामाणिक राहील व दुसऱ्याला तुच्छ मानील. तुम्ही एकाच वेळी देवाची व पैशाची सेवा करू शकणार नाही.”

## देवाचे नियमशास्त्र बदलणे शक्य नाही

***(मत्तय 11:12-13)***

14मग जे परुशी धनलोभी होते, त्यांनी हे सर्व ऐकले व त्यांनी त्याचा उपहास केला. 15तो त्यांना म्हणाला, “तुम्ही स्वत:ला लोकांसमोर नीतिमान म्हणून मिरवता दाखविता, पण देव तुमची अंत:करणे ओळखतो. जे लोकांना महत्त्वाचे वाटते ते देवाच्या दृष्टीने टाकावू आहे.

16“नियमशास्त्र व संदेष्टे योहानाप5त होते, तेव्हापासून देवाच्या राज्याची सुवार्ता गाजविली जात आहे. व प्रत्येक जण त्यात घुसण्याचा जोरदार प्रयत्न करीत आहे. 17एकवेळ आकाश व पृथ्वी नाहीशी होणे शक्य होईल पण नियमशास्त्राचा एक काना मात्राही नाहीसा होणार नाही.

## घटस्फोट आणि पुनर्विवाह

18“जो कोणी आपल्या पत्नीस सूटपत्र देतो व दुसरीबरोबर लग्न करतो तो व्यभिचार करतो आणि जो कोणी एखाद्या स्त्रीशी– जिला तिच्या पतीने टाकलेले आहे तिच्याशी लग्न करतो तो व्यभिचार करतो.”

## श्रीमंत मनुष्य व लाजार

19“एक मनुष्य होता. तो श्रीमंत होता. तो जांभळी आणि तलम वस्त्रे घालीत असे. प्रत्येक दिवस तो ऐषारामात घालवीत असे. 20त्याच्या फाटकाजवळ लाजार नावाचा एक गरीब मनुष्य पडून होता. त्याच्या अंगावर फोड भरलेले होते. 21त्या श्रीमंत मनुष्याच्या टेबलावरून खाली पडलेले असेल ते खाण्याची तो आतुरतेने वाट पाही. कुत्रीदेखील येऊन त्याचे फोड चाटीत असत. 22मग असे झाले की, तो गरीब मनुष्य मरण पावला, व देवदूतांनी त्याला अब्राहामाच्या उराशी नेऊन ठेवले. नंतर श्रीमंत मनुष्यही मरण पावला व त्याला पुरले गेले. 23आणि अधोलोकात, जेथे तो (श्रीमंत

मनुष्य) यातना भोगीत होता, तेथून त्याने वर पाहिले, व दूरवर असलेल्या अब्राहामाला पाहिले आणि लाजाराला त्याच्या शेजारी पाहिले, 24तो मोठ्याने ओरडला, “पित्या अब्राहामा, माझ्यावर दया कर आणि लाजाराला पाठव, यासाठी की तो बोटाचे टोक पाण्यात बुडवून माझी जीभ थंड करील, कारण या अग्नीत मी भयंकर वेदना सहन करीत आहे.!” 25परंतु अब्राहाम म्हणाला, “माझ्या मुला, लक्षात ठेव की तुझ्या जीवनात जशा तुला चांगल्या गोष्टी मिळाल्या, तशा लाजाराला वाईट गोष्टी मिळाल्या. पण आता येथे तो समाधानात आहे व तू दु:खात आहेस. 26आणि या सगळ्याशिवाय, तुमच्या व आमच्यामध्ये एक मोठी दरी ठेवलेली आहे, यासाठी की, येथून तुमच्याकडे ज्यांना जायचे आहे त्यांना जाता येऊ नये व तुमच्याकडून कोणालाही आमच्याकडे येता येऊ नये.’ 27तो श्रीमंत मनुष्य म्हणाला, ‘मग तुला मी विनंति करतो की पित्या, लाजाराला माझ्या पित्याच्या घरी पाठव, 28कारण मला पाच भाऊ आहेत. त्याला त्यांना तरी सावध करू दे. म्हणजे ते तरी या यातनेच्या ठिकाणी येणार नाहीत.’ 29पण अब्राहाम म्हणाला, ‘त्यांच्याजवळ मोशे आणि संदेष्टये आहेत, त्यांचे त्यांनी ऐकावे.’ 30तो श्रीमंत मनुष्य म्हणाला, ‘नाही, पित्या अब्राहामा, मेलेल्यातील कोणी त्यांच्याकडे गेला तर ते पश्चात्ताप करतील.’ 31अब्राहाम त्याला म्हणाला, ‘जर ते मोशेचे आणि संदेष्टयांचे ऐकत नाहीत तर मेलेल्यांतून जर कोणी उठला तरी त्यांची खात्री होणार नाही.’”

17 येशू त्याच्या शिष्यांना म्हणाला, “ज्या गोष्टी लोकांना देवापासून दूर नेतात त्या येणे निश्चित आहे, परंतु ज्याच्यामुळे त्या येणार त्याची वाईट दशा होवो! 2त्याने या लहानातील एकाला पाप करावयास लावण्यापेक्षा त्याच्या गळ्यात जात्याची तळी बांधून त्याला समुद्रात फेकणे हे त्याच्यासाठी अधिक बरे होईल. 3स्वत:कडे लक्ष द्या! जर तुमचा भाऊ पाप करतो तर त्याला धमकावा. आणि जर तो पश्चात्ताप करतो तर त्याची क्षमा करा. 4जर तो तुझ्याविरुद्ध दिवसातून सात वेळा पाप करतो आणि सात वेळा तुमच्याकडे येतो व म्हणतो, ‘मी पश्चात्ताप करतो,’ त्याला क्षमा करा.”

## तुमचा विश्वास किती मोठा आहे?

5मग शिष्य प्रभूला म्हणाले, “आमचा विश्वास वाढव.”

6प्रभु म्हणाला, “जर तुमचा विश्वास मोहरीच्या दाण्याएवढा असेल तर तुम्ही या तुतीच्या झाडाला म्हणू शकता, ‘मुळासकट उपटून समुद्रात लावले जा.’ आणि ते तुमची आज्ञा पाळील.”

## चांगले सेवक व्हा

7समजा, तुमच्यापैकी एकाला एक सेवक आहे. व तो शेत नांगरीत आहे किंवा मेंढरे राखीत आहे. जेव्हा तो शेतातून परत येतो, तुम्ही त्याला “ताबडतोब ये आणि जेवायला बैस” असे म्हणाल का? 8उलट तुम्ही असे म्हणणार नाही का, ‘माझे भोजन तयार कर. आणि कामाचे कपडे घालून माझे खाणेपिणे चालू असताना माझी सेवा कर. त्यानंतर तू खाऊ पिऊ शकतोस? 9ज्या गोष्टी करण्याबद्दल तुम्ही नोकराला आज्ञा करता ते केल्याबद्दल त्याचे आभार तुम्ही मानता काय?

10तुमच्या बाबतीतही हे तसेच आहे: जेव्हा तुम्हांला करण्यास सांगितलेली सर्व कामे तुम्ही केल्यावर असे म्हटले पाहिजे, ‘आम्ही कोणत्याही मानास पात्र नसलेले सेवक आहोत आम्ही फक्त आमचे कर्तव्य केले आहे.’”

## कृतज्ञ असा

11येशू यरुशलेमाला जात असताना त्याने शोमरोन व गालील यांच्या सीमेवरून प्रवास केला. 12तो एका खेड्यात जात असताना, कुष्ठरोग झालेले दहा पुरुष त्याला भेटले. ते दूर उभे राहिले.

13ते मोठ्याने ओरडून म्हणाले, “येशू, गुरुजी आम्हांवर दया करा!”

14जेव्हा त्याने त्यांना पाहिले, तेव्हा तो म्हणाला, “जा, आणि स्वत:ला याजकांना दाखवा.”* ते जात असतानाच बरे झाले. 15जेव्हा त्यांच्यातील एकाने पाहिले की, आपण बरे झालो आहोत, तेव्हा तो परत आला व त्याने मोठ्या स्वरात देवाची स्तुति केली. 16तो येशूच्या पायाजवळ उपडा पडला. आणि त्याने त्याचे उपकार मानले. तो शोमरोनी होता. 17येशू त्याला म्हणाला, “दहाजण बरे झाले नव्हते काय? नऊजण कोठे आहेत? 18या विदेशी माणसाशिवाय कोणीही देवाची स्तुति करण्यासाठी परत आला नाही काय?” 19येशू त्याला म्हणाला, “ऊठ, आणि जा. तुझ्या विश्वासाने तुला बरे केले आहे.”

## देवाचे राज्य तुम्हांमध्ये आहे
***(मत्तय 24:23-28, 37-41)***

20एकदा, परूश्यांनी येशूला विचारले, देवाचे राज्य केव्हा येईल, त्याने त्यांना उत्तर दिले, “देवाचे राज्य दृश्य स्वरूपात येत नाही. लोक असे म्हणणार नाहीत की 21ते येथे आहे! किंवा ते तेथे आहे!’ कारण देवाचे राज्य तुमच्यामध्ये आहे.” 22पण शिष्यांना तो म्हणाला, “असे दिवस येतील की जेव्हा मनुष्याच्या पुत्राच्या गौरवाने येण्याच्या एका दिवसाची तुम्ही उत्सुकतेने वाट पाहाल. परंतु तो दिवस तुम्ही पाहू शकणार नाही. 23आणि लोक तुम्हांला म्हणतील, “तेथे पाहा! येथे पाहा!’ तेथे जाऊ नका. किंवा त्यांच्यामागे जाऊ नका.

---

**स्वत:ला याजकांना दाखवा** मोशेच्या नियमशास्त्रात म्हटले आहे की, जेव्हा एखादा यहूदी कुष्टरोगी मुक्त झाला असेल तेव्हा तसे याजकांना जाहीर केले पाहिजे.

## जेव्हा येशू परत येतो

24"कारण जशी वीज आकाशाच्या एका बाजूपासून
दुसऱ्या बाजूपर्यंत चमकते आणि प्रकाशते तसेच मनुष्याच्या
पुत्राचे त्याच्या दिवसात होईल. 25पण पहिल्यांदा त्याने
पुष्कळ गोष्टींविषयी दु:ख भोगले पाहिजे. व या पिढीने
त्याला नाकारले पाहिजे. 26जसे नोहाच्या दिवसांत झाले,
तसेच मनुष्याच्या पुत्राच्या दिवसातदेखील होईल. ते खात
होते, पीत होते, लग्न करीत होते, लग्न करून देत होते.
27नोहा तारवात जाईपर्यंत असे चालले होते. मग पूर
आला. व त्या सर्वांचा नाश झाला. 28त्याचप्रकारे लोटाच्या
दिवसात झाले तसे होईल: ते खात होते, पीत होते. विकत
घेत होते. विकत देत होते. लागवड करीत होते. बांधीत
होते. 29परंतु ज्या दिवशी लोट सदोमातून बाहेर पडला त्या
दिवशी आकाशातून अग्नि व गंधक यांचा पाऊस पडला
आणि सर्वांचा नाश केला. 30मनुष्याचा पुत्र प्रगट होईल
तेव्हा असेच होईल.

31"त्या दिवशी जर एखादा छपरावर असेल व त्याचे
सामान घरात असेल, त्याने ते घेण्यासाठी घरात जाऊ
नये. त्याचप्रमाणे जो शेतात असेल त्याने परत जाऊ नये.
32लोटाच्या पत्नीची आठवण करा. 33जो कोणी आपला
जीव वाचवू पाहतो तो त्याला गमावील आणि जो कोणी
आपला जीव गमावील तो त्याला राखील. 34मी तुम्हांला
सांगतो, त्या रात्री बिछान्यावर दोघे असतील, त्यापैकी एक
घेतला जाईल व दुसरा ठेवला जाईल. 35दोन स्त्रिया धान्य
दळत असतील, तर त्यांपैकी एक घेतली जाईल व दुसरी
ठेवली जाईल. 36शेतात दोघे असतील एकाला घेतले जाईल
व दुसऱ्याला ठेविले जाईल." 37शिष्यांनी त्याला विचारले,
"कोठे प्रभु?" येशूने उत्तर दिले, "जेथे प्रेत असेल तेथे
गिधाडे जमतील."

## देव त्याच्या लोकांना उत्तर देईल

18 त्यांनी नेहमी आशा न सोडता प्रार्थना करावी व
ती करण्याचे कधीच सोडू नये हे शिकविण्यासाठी
त्याने त्यांना एक बोधकथा सांगितली. 2तो म्हणाला, "एका
नगरात एक न्यायाधीश होता. तो देवाला भीत नसे लोकांना
मानही देत नसे. 3त्या नगरात एक विधवा होती. ती वारंवार
येत असे व न्यायाधीशाला म्हणत असे, 'माझ्या
विरोधकांविरुद्ध मला न्याय मिळेल असे बघा!' 4काही
काळ त्याची इच्छा नव्हती पण शेवटी तो स्वत:शीच
म्हणाला, 'मी जरी देवाला भीत नाही व लोकांना मान देत
नाही. 5तरीही ती विधवा मला त्रास देत असल्याने तिला
न्याय मिळेल असे मी करतो, यासाठी की ती वारंवार
येऊन मला बेजार करणार नाही.'

6मग प्रभु म्हणाला, "अनीतिमान न्यायाधीश काय
म्हणाला त्याकडे लक्ष द्या. 7आणि मग जे देवाचे निवडलेले
लोक रात्रंदिवस त्याचा धावा करतात त्यांचा तो न्याय
करणार नाही काय? तो त्यांना मदत करावयास वेळ
लावील काय? 8मी तुम्हांस सांगतो, तो त्यांना न्याय देईल.
तरीही जेव्हा मनुष्याचा पुत्र येतो, तेव्हा त्याला पृथ्वीवर
विश्वास आढळेल काय?"

## देवाबरोबर योग्य ते संबंध असणे

9अशा लोकांना जे स्वत: नीतिमान असल्याचा अभिमान
बाळगत होते व इतरांना कमी लेखत होते, अशा लोकांसाठी
येशूने ही गोष्ट सांगितली. 10"दोघे जण प्रार्थना करावयास
वर मंदिरात गेले. एक परूशी होता व दुसरा जकातदार
होता. 11परूशी उभा राहिला व त्याने अशी प्रार्थना केली,
'हे देवा, मी तुझे उपकार मानतो कारण, इतर लोकांसारखा
म्हणजे चोर, फसविणारा, व्यभिचारी व या
जकातदारासारखा मी नाही. 12उलट मी आठवड्यातून
दोनदा उपास करतो, व माझ्या सर्व उत्पन्नाचा दहावा भाग
देतो.'

13"परंतु जकातदार दूर अंतरावर उभा राहिला व आपले
डोळे स्वर्गाकडे वर न उचलता आपली छाती बडवीत
म्हणाला, 'हे देवा, मज पापी माणसावर दया कर!' 14मी
तुम्हांला सांगतो हा मनुष्य, त्या दुसऱ्या माणसापेक्षा नीतिमान
ठरून घरी गेला. कारण जो कोणी स्वत:ला उंच करतो
त्याला नीच केले जाईल आणि जो कोणी स्वत:ला नीच
करतो त्याला उंच केले जाईल."

## देवाच्या राज्यात कोण प्रवेश करील?
*(मत्तय 19:13-15 मार्क 10:13-16)*

15आणि ते आपल्या बालकांनादेखील त्याच्याकडे
आणीत यासाठी की त्याने त्यांना स्पर्श करावा. पण जेव्हा
शिष्यांनी हे पाहिले तेव्हा ते त्यांना दटावू लागले. 16पण
येशूने बाळकांना त्याच्याकडे बोलाविले आणि म्हणाला,
"बालकांना मजकडे येऊ द्या. त्यांना अडवू नका. कारण
देवाचे राज्य त्यांच्यासारख्यांचेच आहे. 17मी खरोखर
तुम्हांला सांगतो, जो कोणी देवाच्या राज्याचा बालकासारखा
स्वीकार करीत नाही. त्याचा स्वर्गात प्रवेश होणार नाही."

## एक श्रीमंत मनुष्य येशूला प्रश्न विचारतो
*(मत्तय 19:16-30; मार्क 10:17-31)*

18एका यहूदी पुढाऱ्याने त्याला विचारले, "उत्तम गुरुजी,
अनंतकाळचे जीवन मिळविण्यासाठी मी काय करू?"

19येशू त्याला म्हणाला, "मला उत्तम का म्हणतोस?
देवाशिवाय कोणीही उत्तम नाही.

20"तुला आज्ञा माहीत आहेत: 'व्यभिचार करू नको,
खून करू नको, चोरी करू नको, खोटी साक्ष देऊ नको,
तुझ्या आईवडिलांचा मान राख.'*

21तो पुढारी म्हणाला, "या सर्व आज्ञा मी माझ्या
तरुणपणासून पाळल्या आहेत."

---

**व्यभिचार ... मान राख** निर्गम 20:12-16 अनुवाद 5:16-20

22जेव्हा येशूने हे ऐकले, तेव्हा तो त्याला म्हणाला,
“तुझ्यामध्ये अजून एका गोष्टीची उणीव आहे: तुझ्याजवळचे
सर्व काही विकून ते गरिबांना वाट. म्हणजे स्वर्गात तुला
संपत्ती मिळेल. मग ये. माझ्या मागे चल.” 23पण जेव्हा त्या
पुढाऱ्याने हे ऐकले तेव्हा तो फार दु:खी झाला, कारण तो
फार श्रीमंत होता. 24जेव्हा येशूने पाहिले की, तो दु:खी
झाला आहे, तो म्हणाला, “ज्यांच्याजवळ धन आहे, त्या
लोकांचा देवाच्या राज्यात प्रवेश होणे किती कठीण आहे!
25“होय, श्रीमंत माणसाचा देवाच्या राज्यात प्रवेश होणे
यापेक्षा उंटाने सुईच्या छिद्रातून जाणे सोपे आहे.

### कोणाचे तारण होईल?

26नंतर ज्या लोकांनी हे ऐकले, ते म्हणाले, “तर मग
कोणाचे तारण होईल?” 27येशू म्हणाला, “ज्या गोष्टी
माणसांना अशक्य आहेत त्या देवाला शक्य आहेत.”
28मग पेत्र म्हणाला, “पाहा, आमच्याकडे जे होते, ते
सर्व सोडून आम्ही तुमच्यामागे आलो आहोत.” 29येशू
त्यांना म्हणाला, “मी तुम्हांस खरे सांगतो, असा कोणीही
नाही की ज्याने देवाच्या राज्यासाठी आपले घर किंवा
पत्नी किंवा भाऊ, किंवा आईवडील सोडले आहेत, त्यांस
या काळात व 30येणाऱ्या काळातील अनंतकाळात
याच्यापेक्षा कित्येक पटींनी मिळाले नाही.”

### येशू मरणातून उठेल
*(मत्तय 20:17-19; मार्क 10:32-34)*

31येशूने बारा प्रेषितांना बाजूला घेतले आणि त्यांना
म्हणाला, “ऐका! आपण वर यरुशलेमास जात आहोत
आणि भविष्यवाद्यांनी मनुष्याच्या पुत्राविषयी जे काही
लिहिले होते ते पूर्ण होईल. 32होय, त्याला विदेश्यांच्या
हाती धरून देण्यात येईल, त्याची कुचेष्टा होईल, त्याची
निंदा करतील, त्याच्यावर थुंकतील. 33ते त्याला चाबकाचे
फटके मारून रक्तबंबाळ करून ठार करतील. आणि तो
तिसऱ्या दिवशी मरणातून उठेल.” 34शिष्यांना यातील
काहीही कळाले नाही. कारण हे वचन त्यांच्यापासून लपवून
ठेवण्यात आले होते. आणि तो कशाविषयी बोलत आहे हे
त्यांना माहीत नव्हते.

### येशू एका आंधळ्यास बरे करतो
*(मत्तय 20:29-34; मार्क 10:46-52)*

35येशू यरीहोजवळ येत असताना एक आंधळा रस्त्यावर
बसून भीक मागत होता. 36जेव्हा त्या आंधळ्या मनुष्याने
जवळून जाणाऱ्या समुदायाचा आवाज ऐकला तेव्हा त्याने
विचारले हे काय चालले आहे. 37त्यांनी त्याला सांगितले
की, “नासरेथकर येशू जात आहे.”
38तो मोठ्याने ओरडून म्हणाला, “येशू दाविदाच्या पुत्रा
माझ्यावर दया कर!”
39जे पुढे चालले होते त्यांनी त्याला गप्प राहण्यास
सांगितले. परंतु तो आणखी मोठ्याने ओरडून म्हणाला,
“दाविदाचे पुत्र माझ्यावर दया करा!”
40येशू थांबला, आणि त्याने आंधळ्याला आपणांकडे
आणण्याची आज्ञा केली. जेव्हा आंधळा जवळ आला,
तेव्हा येशूने त्याला विचारले, 41“तुला काय हवे?” आंधळा
मनुष्य म्हणाला, “प्रभु, मला परत दृष्टि प्राप्त व्हावी.”
42येशू त्याला म्हणाला, “तुला दृष्टि येवो; तुझ्या
विश्वासाने तुला बरे केले आहे.” 43तत्काळ त्याला दृष्टि
आली आणि देवाचे गौरव करीत तो येशूच्या मागे गेला.
सर्व लोकांनी हे पाहिले आणि देवाची स्तुति केली.

### जक्कय

19 येशूने यरीहोत प्रवेश केला आणि यरीहोतून जात
होता. 2तेथे जक्कय य नावाचा मनुष्य होता. तो
मुख्य जकातदार होता आणि खूप श्रीमंत होता. 3येशू
कोण आहे हे पाहण्याचा तो प्रयत्न करीत होता. परंतु
गर्दीमुळे त्याला काही दिसेना, कारण तो बुटका होता.
4तेव्हा तो सर्वांच्या पुढे पळत गेला आणि त्याला पाहण्यासाठी
उंबराच्या झाडावर चढला. कारण तो त्याच रस्त्याने पुढे
जाणार होता. 5येशू जेव्हा त्या ठिकाणी आला तेव्हा वर
पाहून जक्कय याला म्हणाला, “जक्कय या, त्वरा कर आणि
खाली ये. कारण आज मला तुझ्याच घरी राहायचे आहे.”
6मग तो घाईघाईने खाली उतरला आणि आनंदाने त्याचे
स्वागत केले. 7सर्व लोकांनी ते पाहिले, ते कुरकूर करू
लागले. व म्हणू लागले की, “तो पापी माणसाचा पाहुणा
होण्यास गेला आहे.” 8परंतु जक्कय य उभा राहिला व
प्रभूला म्हणाला, “गुरुजी, जे माझे आहे त्यातील अर्धे मी
गरिबांना दिले असे समजा व मी कोणाला फसवून काही
घेतले असेल तर ते चौपट परत करीन.” 9येशू त्याला
म्हणाला, “आज या घराला तारण मिळाले आहे. कारण
हा मनुष्यसुद्धा अब्राहामाचा पुत्र आहे. 10कारण मनुष्याचा
पुत्र जे हरवलेले ते शोधावयास व तारावयास आला आहे.”

### देव तुम्हांला देतो त्या गोष्टींचा उपयोग करा
*(मत्तय 25:14-30)*

11लोक या गोष्टी ऐकत असतानाच येशूने त्यांना आणखी
एक गोष्ट सांगितली, कारण तो यरुशलेमाजवळ होता
म्हणून त्यांनी असा विचार केला की, देवाचे राज्य तत्काळ
प्रगट होणार आहे.
12मग येशू म्हणाला, “कोणी एक उच्च कुळातील मनुष्य
आपली त्या भागाचा सरदार म्हणून नियुक्ती करून
घेण्यासाठी व पुन्हा परतण्यासाठी दूरच्या देशी गेला. 13त्याने
त्याच्या नोकरांपैकी दहा नोकरांना बोलाविले. त्यांना त्याने
दहा मोहरा* दिल्या. आणि तो त्यांना म्हणाला, “मी परत

---

**दहा मोहर** एका मजुराच्या तीन महिन्यांच्य पगाराइतकी एक मोहरेची किंमत.

येईपर्यंत यावर व्यापार करा. 14परंतु त्याचे प्रजाजन त्याचा द्वेष करीत असत त्यांनी त्याच्यामागे एक शिष्टमंडळ पाठविले, व सांगितले की, "या माणसाला आमचा राजा करू नका."

15परंतु त्याची राजा म्हणून नेमणूक झाली व तो परत आला. त्याने ज्या नोकरांना पैसे दिले होते त्यांना बोलावणे पाठविले. यासाठी की, त्यांनी त्यापासून किती फायदा मिळविला हे पाहावे. 16पहिला वर आला आणि म्हणाला, "धनी तुम्ही दिलेल्या नाण्यावर मी आणखी दहा नाणी मिळवली आहेत. 17तेव्हा तो त्याला म्हणाला, "चांगल्या दासा, छान केलेस, तू थोडक्यांविषयी विश्वासू झालास, म्हणून तू दहा नगरांवर अधिकारी होशील."

18मग दुसरा (नोकर) आला व म्हणाला, "तुमच्या पाच नाण्यांवर मी पाच नाणी आणखी मिळवली."

19आणि तो त्याला म्हणाला, "तू पाच नगरांवर अधिकारी असशील."

20मग दुसरा नोकर आला आणि म्हणाला, "धनी, आपण दिलेले नाणे मी हातरुमालात बांधून ठेवले होते. 21आपण कठोर आहात, मला तुमची भीति वाटत होती. जे आपण ठेवले नाही, ते आपण काढता, आणि जे पेरिले नाही, ते कापता." 22धनी त्यास म्हणाला, "दुष्ट माणसा, तुझ्याच शब्दांनी मी तुझा न्याय करतो. तुला ठाऊक होते की मी कडक शिस्तीचा माणूस आहे. मी जे दिले नाही ते घेतो आणि जे पेरले नाही त्याची कापणी करतो, 23तर तू माझा पैसा पेढीवर का ठेवला नाहीस? मग जेव्हा मी परत आलो असतो तेव्हा ते मला व्याजासह मिळाले असते. 24त्याच्याजवळ उभे राहणाऱ्यांना तो म्हणाला, 'त्याच्याजवळून ते नाणे घ्या आणि ज्याच्याजवळ दहा नाणी आहेत, त्याला द्या.' 25ते त्याला म्हणाले, 'धनी, त्याच्याजवळ दहा नाणी आहेत,' 26धन्याने उत्तर दिले, 'मी तुम्हांला सांगतो, ज्याच्याजवळ आहे, त्याला अधिक दिले जाईल आणि ज्याच्याजवळ नाही, ज्याच्याकडे जे काही असेल ते सुद्धा काढून घेतले जाईल. 27परंतु मी राज्य करू नये अशी इच्छा करणाऱ्या माझ्या शत्रूंना येथे आणा आणि माझ्यासमोर ठार मारा.'"

## येशू यरुशलेमेत प्रवेश करतो

**(*मत्तय 21:1-11; मार्क 11:1-11; योहान 12:12-19*)**

28येशूने या गोष्टी सांगितल्यावर तो वर यरुशलेमापर्यंत गेला. 29जेव्हा तो वर जातच राहिला तेव्हा तो जैतून डोंगर म्हटलेल्या टेकडीनजिक असलेल्या बेथफगे आणि बेथानीजवळ आला तेव्हा त्याने आपल्या दोन शिष्यांना असे सांगून पाठविले की, 30"तुमच्यासमोर असलेल्या खेड्यात जा. तुम्ही प्रवेश करताच, ज्यावर कोणी बसले नाही असे शिंगरू तुम्हास आढळेल. ते सोडून येथे आणा. 31जर तुम्हांला कोणी विचारले की, "तुम्ही ते का सोडता?" तर म्हणा की, 'प्रभूला याची गरज आहे.'

32ज्यांना पाठविले होते, ते गेले आणि त्याने सांगितल्याप्रमाणे त्यांस आढळले. 33ते सोडीत असता त्याचा मालक त्यांना म्हणाला, "तुम्ही शिंगरू का सोडता?"

34ते म्हणाले, "प्रभूला याची गरज आहे." 35त्यांनी ते येशूकडे आणले. त्यांनी आपले झगे शिंगरावर घातले आणि येशूला त्याच्यावर बसविले. 36येशू रस्त्यावरून जात असता लोक आपली वस्त्रे रस्त्यावर पसरीत होते.

37जेव्हा तो जैतून डोंगराच्या उतरणीवर आला तेव्हा सर्व जनसमुदाय, त्यांनी जे चमत्कार पाहिले होते त्याबद्दल मोठ्या आनंदाने देवाची स्तुति करू लागले.

38ते म्हणाले, "प्रभूच्या नावाने येणारा राजा धन्यवादित असो!

*स्तोत्र. 118:26*

स्वर्गात शांति आणि उर्ध्वलोकी देवाला गौरव!"

39जमावातील काही परूशी येशूला म्हणाले, "गुरुजी, आपल्या शिष्यांना दटावा."

40त्याने उत्तर दिले, "मी तुम्हांला सांगतो, जर ते शांत बसतील तर हे धोंडे ओरडतील!"

## येशू यरुशलेमासाठी रडतो

41जेव्हा तो जवळ आला व त्याने शहर पाहिले, तेव्हा तो त्यासाठी रडला. आणि म्हणाला, 42"जर आज कोणत्या गोष्टी तुला शांति देतील हे माहीत असते तर!, परंतु आता ते तुझ्या नजरेपासून लपवून ठेवण्यात आले आहे. 43तुझ्यावर असे दिवस येतील की, तुझे शत्रू तुझ्याभोवती कोट उभारतील. तुला वेढीतील, आणि सर्व बाजूंनी तुला कोंडीत पकडतील. 44ते तुला, तुझ्या मुलांना तुझ्या भिंतीच्या आत धुळीस मिळवतील. व दगडावर दगड राहू देणार नाही. कारण देवाचा तुझ्याकडे येण्याचा समय तू ओळखला नाही."

## येशूचा मंदिरात प्रवेश

**(*मत्तय 21:12-17; मार्क 11:15-19 योहान 2:13-22*)**

45येशूने मंदिरात प्रवेश केला व जे विक्री करीत होते, त्यांना बाहेर हाकलू लागला. 46तो त्यांस म्हणाला, "असे लिहिले आहे की, 'माझे घर प्रार्थनेचे घर होईल!' पण तुम्ही ते लुटारूंची गुहा केली आहे."*

47तो दररोज मंदिरात शिकवीत असे. मुख्य याजक, नियमशास्त्राचे शिक्षक, लोकांचे पुढारी त्याला ठार मारण्याचा प्रयत्न करीत होते. 48पण तसे करण्यासाठी त्यांना काही मार्ग सापडत नव्हता. कारण सर्व लोक त्याच्या शब्दांनी खिळून गेले होते.

---

**माझे ... आहे** यिर्मया 7:11

## यहूदी पुढारी येशूला एक प्रश्न विचारतात
*(मत्तय 21:23-27; मार्क 11:27-33)*

20 एके दिवशी येशू मंदिरात लोकांना शिक्षण देत असताना व सुवार्ता सांगत असताना एकदा एक मुख्य याजक आणि नियमशास्त्राचे शिक्षक, वडीलजनांसह एकत्र वर त्याच्याकडे आले. 2ते त्याला म्हणाले, "आम्हांला सांग, कोणत्या अधिकाराने तू या गोष्टी करत आहेस! तुला हा अधिकार कुणी दिला?"

3तेव्हा त्याने त्यास उत्तर दिले, "मी सुद्धा तुम्हांला एक प्रश्न विचारीन. तुम्ही मला सांगा: 4योहानाचा बाप्तिस्मा स्वर्गापासून होता की मनुष्यापासून?"

5त्यांनी आपसात चर्चा केली आणि म्हणाले, "जर आपण स्वर्गापासून म्हणावे, तर तो म्हणेल, तुम्ही त्याच्यावर विश्वास का ठेवला नाही? 6पण जर आपण मनुष्यांकडून म्हणावे, तर सर्व लोक आपणांस दगडमार करतील कारण त्यांची खात्री होती की, योहान संदेष्टा होता." 7म्हणून त्यांनी असे उत्तर दिले की, तो कोणापासून होता हे त्यांना माहीत नाही.

8मग येशू त्यांस म्हणाला, "मग मी या गोष्टी कोणत्या अधिकाराने करतो हे तुम्हांला मी सुध्दा सांगणार नाही.

## देव आपला पुत्र पाठवितो
*(मत्तय 21:33-46; मार्क 12:1-12)*

9मग तो लोकांना ही गोष्ट सांगू लागला: "एका मनुष्याने द्राक्षमळा लावला. व तो काही शेतकऱ्यांना मोलाने देऊन बऱ्याच दिवसांसाठी दूर गेला. 10हंगामाच्या वेळी त्याने नोकराला शेतकऱ्यांकडे पाठविले. यासाठी की, त्यांनी द्राक्षमळ्यातील काही फळे द्यावीत. पण शेतकऱ्यांनी त्या नोकराला मारले व रिकाम्या हाताने परत पाठविले.
11नंतर त्याने दुसऱ्या नोकराला पाठविले, पण त्यालासुद्धा त्यांनी मारले. त्या नोकराला त्यांनी लज्जास्पद वागणूक दिली. आणि रिकाम्या हाताने परत पाठविले. 12तेव्हा त्याने तिसऱ्या नोकराला पाठविले. पण त्यालाही त्यांनी जखमी करून बाहेर फेकून दिले.

13द्राक्षमळ्याचा मालक म्हणाला, "मी काय करू? मी माझा स्वत:चा प्रिय पुत्र पाठवतो. कदाचित ते त्याला मान देतील. 14पण जेव्हा शेतकऱ्यांनी मुलाला पाहिले, तेव्हा त्यांनी आपसात चर्चा केली आणि म्हणाले, "हा तर वारस आहे, आपण त्याला ठार मारू, म्हणजे वतन आपले होईल."

15त्यांनी त्याला द्राक्षमळ्याच्या बाहेर फेकले व ठार मारले. "तर मग द्राक्षमळ्याचा मालक काय करील?
16तो येईल आणि त्या शेतकऱ्यांना ठार मारील व तो द्राक्षमळा दुसऱ्यांना सोपवून देईल."

त्यांनी हे ऐकले तेव्हा ते म्हणाले, "असे कधीही न होवो." 17येशूने त्यांच्याकडे पाहिले व म्हटले,

"'तर मग जो दगड बांधणाऱ्यांनी नाकारला तोच
कोनशिला झाला' *स्तोत्र. 118:22*

असे जे लिहिले आहे त्याचा अर्थ काय?"

18जो कोणी त्याच्यावर पडेल त्याचे तुकडे तुकडे होतील परंतु ज्या कोणावर तो पडेल त्याचा चुराडा होईल."

19नियमशास्त्राचे शिक्षक आणि मुख्य याजक यांनी त्याचवेळी त्याला अटक करण्याचा प्रयत्न केला, पण त्यांना लोकांची भीति वाटत होती. त्यांना त्याला अटक करायचे होते, कारण त्यांना माहीत होते की, हा दाखला त्याने त्यांनाच उद्देशून सांगितला होता.

## यहूदी पुढारी येशूला फसविण्याचा प्रयत्न करतात
*(मत्तय 22:15-22; मार्क 12:13-17)*

20तेव्हा त्यांनी त्याच्यावर पाळत ठेवली. आणि आपण प्रामाणिक आहोत असे भासविणारे हेर पाठविले. त्यांची अशी योजना होती की, त्याच्या बोलण्यात त्याला पकडावे म्हणजे त्यांना त्याला राज्यपालाच्या ताब्यात देऊन त्यांच्या अधिकाराच्या कक्षेत आणता आले असते. अधिकारामध्ये सुपूर्त करता आले असते. 21म्हणून त्या हेरांनी त्याला प्रश्न विचारला. ते म्हणाले, "गुरुजी, आम्हांला माहीत आहे की, जे योग्य ते तुम्ही बोलता व शिकविता आणि तुम्ही पक्षपात करीत नाही. तर सत्याने देवाचा मार्ग शिकविता. 22आम्ही कैसराला कर द्यावा हे योग्य आहे किंवा नाही?"

23ते धूर्तपणे आपल्याला फसवू पाहत आहेत याची येशूला कल्पना होती. 24"मला एक नाणे दाखवा. त्यावर कोणाचा मुखवटा व शिश्च । आहे?" ते म्हणाले, "कैसराचा."

25तेव्हा तो त्यांना म्हणाला, "कैसराचे ते कैसराला आणि देवाचे ते देवाला द्या."

26तेव्हा लोकांसमोर तो जे बोलला त्यात त्याला धरणे त्यांना शक्य झाले नाही. त्याच्या उत्तराने ते आश्चर्यचकित झाले. आणि शांत झाले.

## काही सदूकी येशूला फसविण्याचा प्रयत्न करतात
*(मत्तय 22:23-33; मार्क 12:18-27)*

27मग पुनरुत्थान नाही असे म्हणणारे काही सदूकी त्याच्याकडे आले. त्यांनी त्याला प्रश्न विचारला. ते म्हणाले,
28"गुरुजी, मोशेने आमच्यासाठी लिहून ठेवले आहे की जर एखाद्याचा भाऊ मेला, व त्या भावाला पत्नी आहे पण मूल नाही, तर त्याच्या भावाने त्या विधवेशी लग्न करावे आणि भावासाठी त्याला मुले व्हावीत. 29सात भाऊ होते. पहिल्या भावाने लग्न केले व तो मूल न होता मेला.
30नंतर दुसऱ्या भावाने तिच्याशी लग्न केले. 31नंतर तिसऱ्याने तिच्याशी लग्न केले. सातही भावांबरोबर तीच गोष्ट घडली. कोणालाही मुले न होता ते मरण पावले.
32नंतर ती स्त्रीही मरण पावली. 33तर मग पुनरुत्थानाच्या

वेळी ती कोणाची पत्नी होईल? कारण त्या सातांनीही तिच्याबरोबर लग्न केले होते.

34तेव्हा येशू त्यांना म्हणाला, "या युगातले लोक लग्न करून घेतात व लग्न करून देतात. 35परंतु जे लोक त्या येणाऱ्या युगामध्ये व मृतांच्या पुनरुत्थानामध्ये भाग घेण्यासाठी पात्र ठरतील, ते लग्न करून घेणार नाहीत, आणि लग्न करून देणार नाहीत 36आणि ते मरणार नाहीत, कारण ते देवदूतासारखे आहेत. ते पुनरुत्थानाचे पुत्र असल्यामुळे ते देवाचे पुत्रही आहेत. 37जळत्या झुडुपाविषयी मोशेने लिहिले, तेव्हा त्याने परमेश्वराला अब्राहामाचा देव, इसहाकाचा देव आणि याकोबाचा देव असे म्हटले व मेलेलेसुद्धा उठविले जातात हे दाखवून दिले. 38देव मेलेल्यांचा नाही तर जिवंतांचा देव आहे. सर्व लोक जे त्याचे आहेत ते जिवंत आहेत."

39काही नियमशास्त्राचे शिक्षक म्हणाले, "गुरुजी, उत्तम बोललात!" 40तेव्हा त्याला आणखी प्रश्न विचारण्याचे धाडस कोणी केले नाही.

## ख्रिस्त दावीदाचा पुत्र असेल काय?

*(मत्तय 22:41-46; मार्क 12:35-37)*

41परंतु तो त्यांना म्हणाला, "ख्रिस्त दावीदाचा पुत्र आहे असे ते कसे म्हणतात? 42कारण दावीद स्वत: स्तोत्राच्या पुस्तकात म्हणतो,

'प्रभु माझ्या प्रभूला म्हणाला: तू माझ्या उजवीकडे बैस,
43जोपर्यंत मी तुझ्या शत्रूला तुझ्या पायाखालचे आसन करीत नाही तोपर्यंत.' *स्तोत्र. 110:1*

44अशा रीतीने दावीद त्याला 'प्रभु' म्हणतो, तर मग ख्रिस्त दावीदाचा पुत्र कसा?"

## नियमशास्त्रातील शिक्षकांविरुद्ध इशारा

*(मत्तय 23:1-36; मार्क 12:38-40; लूक 11:37-54)*

45सर्व लोक हे ऐकत असताना तो शिष्यांना म्हणाला, "नियमशास्त्राच्या शिक्षकांविषयी सावध असा, त्यांना लांब झगे घालून फिरणे आवडते, 46त्यांना बाजारात नमस्कार घेण्यास, सभास्थानात महत्त्वाच्या आसनावर व मेजवानीच्या वेळी मानाच्या जागी बसणे आवडते. 47ते विधवांची घरे खाऊन फस्त करतात आणि देखाव्यासाठी लांब लांब प्रार्थना करतात. या माणसांना अत्यंत वाईट शिक्षा होईल.

## खरे दान

*(मार्क 12:41-44)*

21 येशूने वर पाहिले व श्रीमंत लोकांना दानपेटीत दाने टाकताना न्याहाळले. 2त्याने एका गरीब विधवेलाही तांब्याची दोन नाणी टाकताना पाहिले. 3तेव्हा तो म्हणाला, "मी तुम्हांला खरे सांगतो, या गरीब विधवेने इतर सर्वांपेक्षा अधिक टाकले. (मी असे म्हणतो) 4कारण या सर्व लोकांनी आपल्या भरपूर संपत्तीमधून काही भाग दान म्हणून टाकले. परंतु तिने गरीब असून आपल्या उपजीविकेतील सर्वच टाकले.

## मंदिराचा नाश

*(मत्तय 24:1-14; मार्क 13:1-13)*

5शिष्यातील काही जण मंदिराविषयी असे बोलत होते की, ते सुंदर पाषाणांनी आणि नवसाच्या अर्पणांनी सुशोभित केले आहे. येशू म्हणाला,

6"या गोष्टी तुम्ही पाहताना असे दिवस येतील की, एकावर एक असा एकही दगड ठेवला जाणार नाही. ते सर्व पाडले जातील."

7त्यांनी त्याला प्रश्न विचारला आणि ते म्हणाले, "गुरुजी या गोष्टी केव्हा घडतील? व या गोष्टी घडणार आहेत यासंबंधी कोणते चिन्ह असेल?"

8आणि तो म्हणाला, "तुम्हांला कोणी फसवू नये म्हणून सावध राहा. कारण माझ्या नावाने पुष्कळ येतील आणि तो 'मी आहे' असे म्हणतील. आणि ते म्हणतील, 'वेळ जवळ आली आहे.' त्यांच्यामागे जाऊ नका! 9जेव्हा तुम्ही लढाया व दंगे याविषयी ऐकाल तेव्हा घाबरू नका. कारण या गोष्टी घडल्याच पाहिजेत. पण एवढ्यात शेवट होणार नाही."

10मग तो त्यांना म्हणाला, "एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रावर उठेल, एक राज्य दुसऱ्या राज्यावर उठेल. 11मोठे भूकंप होतील, दुष्काळ पडतील, आणि वेगवेगळ्या ठिकाणी पीडा उद्भवतील, भितीदायक घटना घडतील. आणि आकाशात मोठी चिन्हे घडतील.

12"परंतु हे सर्व होण्यापूर्वी ते तुम्हांला अटक करतील. ते तुमचा छळ करतील. चौकशीसाठी ते तुम्हांस सभास्थानांसमोर उभे करतील आणि तुरूंगात टाकतील. माझ्या नावासाठी ते तुम्हांला राजे व राज्यपाल यांच्यासमोर नेतील. 13यामुळे तुम्हांला माझ्याविषयी साक्ष देण्याची संधी मिळेल.

14"आपला स्वत:चा बचाव कसा करायचा याविषयी काळजी करायची नाही अशी मनाची तयारी करा, 15कारण मी तुम्हांला असे शब्द व अशी बुद्धी देईन की ज्यामुळे त्यांना तुमचा विरोध करायला किंवा तुमच्याविरुद्ध बोलायला मुळीच जमणार नाही.

16"परंतु आईवडील, भाऊ, नातेवाईक आणि मित्र तुमचा विश्वासघात करतील आणि तुम्हांपैकी काही जणांना ठार मारतील. 17माझ्या नावामुळे सर्व जण तुमचा द्वेष करतील. 18परंतु तुमच्या डोक्यावरील एक केसही नाहीसा होणार नाही. 19आपल्या सहनशीलतेने तुम्ही जिवाचे रक्षण कराल.

## यरुशलेमेचा नाश

*(मत्तय 24:15-21; मार्क 13:14-19)*

20"जेव्हा तुम्ही यरुशलेमाला सैन्यानी वेढा घातलेला पाहाल, तेव्हा तुम्हांला कळून येईल की, तिचा नाश होण्याची वेळ आली आहे. 21जे यहूदीयात आहेत त्यांनी डोंगरांमध्ये पळून गेले पाहिजे. जे रानात आहेत त्यांनी शहरात जाऊ नये. 22ज्या सर्व गोष्टी लिहिलेल्या आहेत त्या पूर्ण होण्यासाठी हे शिक्षेचे दिवस आहेत. 23त्या दिवसांत ज्या गरोदर स्त्रिया आहेत, व ज्या बाळाचे पोषण करणाऱ्या स्त्रिया आहेत, त्यांच्यासाठी ते किती भयंकर होईल. अशा स्त्रियांची खरोखर दुर्दशा होईल. मी असे म्हणतो कारण देशावर मोठे संकट येईल आणि लोकांवर देवाचा कोप ओढवेल. 24ते तरवारीच्या धारेने पडतील आणि त्यांना बंदीवान करून राष्ट्रांत नेतील आणि यहूदीतर लोकांचा काळ संपेपर्यंत यहूदीतर राष्ट्रे यरुशलेम पायाखाली तुडवतील.

## भिऊ नका

*(मत्तय 24:29-31; मार्क 13:24-27)*

25"सूर्य, चंद्र, तारे यांच्यात चिन्हे होतील, पृथ्वीवरील राष्ट्रे हतबल होतील व समुद्राच्या गर्जणाऱ्या लाटांनी ते घाबरून जातील. 26भीतीमुळे लोक बेशुद्ध होतील आणि जगात काय घडणार आहे ह्या धास्तीमुळे व भीतीमुळे लोक दुर्बल होतील. आकाशातील सामर्थ्ये डळमळीत होतील. 27नंतर ते मनुष्याच्या पुत्राला सामर्थ्याने आणि वैभवाने मेघात येताना पाहतील. 28मग या गोष्टी घडण्यास आरंभ होईल, तेव्हा सरळ उभे राहा. आणि तुमचे मस्तक वर करा, कारण तुमच्या सुटकेची वेळ जवळ येत आहे."

## माझी वचने सर्वकाळ टिकतील

*(मत्तय 24:32-35; मार्क 13:28-31)*

29नंतर त्याने त्यांस एक बोधकथा सांगितली: "अंजिराच्या झाडाकडे व इतर दुसऱ्या सर्व झाडांकडे पाहा. 30त्यांना पालवी येऊ लागली की, तुमचे तुम्हीच समजता की, उन्हाळा अगदी जवळ आला आहे. 31त्याचप्रमाणे या गोष्टी घडताना तुम्ही पाहाल तेव्हा ओळखा की देवाचे राज्य जवळ आले आहे.

32"मी तुम्हांस खरे सांगतो की, ह्या सर्व गोष्टी घडून येईपर्यंत ही पिढी नाहीशी होणार नाही. 33आकाश व पृथ्वी नाहीशी होतील पण माझी वचने नाहीशी होणार नाहीत.

## सर्वदा तयार राहा

34"सावध राहा, दारूबाजी आणि अधाशीपणात तुमचा वेळ घालवू नका, किंवा ऐहिक गोष्टींमध्ये मग्न राहू नका. जर तुम्ही तसे कराल, तर तुम्ही व्यवस्थित विचार करू शकणार नाही, व तुम्ही तयार नसताना तो दिवस (शेवट) अकस्मात तुमच्यावर येईल. 35खरोखर, तो पृथ्वीवर असणाऱ्या सर्व जिवंतांवर येईल. 36सर्व समयी जागृत राहा. होणाऱ्या सर्व गोष्टींपासून जिवंत राहण्यासाठी आणि विश्वासाने मनुष्याच्या पुत्रासमोर उभे राहणे शक्य व्हावे यासाठी प्रार्थना करा."

37दर दिवशी तो मंदिरात शिक्षण देत असे. परंतु रात्री मात्र तो जैतूनाचा डोंगर म्हटलेल्या टेकडीवर जात असे. 38सर्व लोक मंदिरात जाण्यासाठी व त्याचे ऐकण्यासाठी पहाटेस उठून त्याच्याकडे जात.

## यहूदी पुढारी येशूला ठार मारावयास टपतात

*(मत्तय 26:1-5, 14-16; मार्क 14:1-2, 10-11; योहान 11:45-53)*

22 नंतर बेखमीर भाकरीचा सण ज्याला वल्हांडण म्हणतात, तो समय जवळ येत होता. 2आणि मुख्य याजक, नियमशास्त्राचे शिक्षक, येशूला कसे मारता येईल हे बघत होते. कारण त्यांना लोकांची भीति वाटत होती.

## यहूदा येशू विरुध्द बेत आखतो

3नंतर सैतान यहूदामध्ये, ज्याला इस्कर्योत म्हणत, व जो बारा जणांपैकी एक होता, त्याच्यात शिरला. 4यहूदा मुख्य याजक व मंदिराचे अधिकारी यांच्याकडे गेला आणि येशूला त्यांच्या हाती कसे धरून देता येईल याविषयी त्याने बोलणी केली. 5त्यांना फार आनंद झाला व त्यांनी त्याला पैसे देण्याचे मान्य केले. 6म्हणून त्याने संमति दर्शविली आणि तो येशूला गर्दी नसेल तेव्हा धरून त्यांच्या हाती देण्याची संधि शोधू लागला.

## वल्हांडण सणाच्या भोजनाची तयारी

*(मत्तय 26:17-25; मार्क 14:12-21; योहान 13:21-30)*

7बेखमीर भाकरीचा सण, ज्या दिवशी वल्हांडणाचे कोकरू मारावयाचे तो दिवस आला. 8तेव्हा त्याने पेत्र व योहान यांना सांगून पाठविले की, "जा आणि आपणांसाठी वल्हांडण सणाचे भोजन तयार करा म्हणजे आपण ते खाऊ."

9पेत्र व योहान येशूला म्हणाले, "आम्ही ते कोठे करावे अशी तुमची इच्छा आहे?"

10तो त्यांना म्हणाला, "तुम्ही नगरात प्रवेश कराल तेव्हा पाण्याचे भांडे घेऊन जाणारा एक मनुष्य तुम्हांला भेटेल. तो ज्या घरात जाईल तेथे जा. 11आणि घरमालकांस सांगा, 'गुरुजींनी तुम्हांला विचारले आहे की, माझ्या शिष्यांसह वल्हांडण सणाचे भोजन करता येईल ती पाहुण्यांची खोली कोठे आहे?' 12तो मनुष्य तुम्हांला माडीवरील सजविलेली खोली दाखवील. तेथे तयारी करा." 13तेव्हा पेत्र व योहान तेथून निघाले. जसे येशूने सांगितले तसेच सर्व घडले तेव्हा त्यांनी वल्हांडणाच्या भोजनाची तयारी केली.

### प्रभु भोजन
***(मत्तय 26:26-30; मार्क 14:22-26; 1 करिंथकरांस 11:23-25)***

14वेळ झाली तेव्हा येशू त्याच्या शिष्यांसह भोजनास
बसला. 15तो त्यांना म्हणाला, "मी दु:ख भोगण्यापूर्वी
तुमच्याबरोबर वल्हांडण सणाचे भोजन घ्यावे अशी माझी
फार इच्छा होती. 16कारण मी तुम्हांस सांगतो की, देवाच्या
राज्यात हे परिपूर्ण होईपर्यंत मी पुन्हा हे भोजन करणार
नाही."
17नंतर त्याने पेला घेतला आणि उपकार मानले. तो
म्हणाला, "हे घ्या, आणि आपसात वाटून घ्या. 18कारण
मी तुम्हांस सांगतो की, देवाचे राज्य येईपर्यंत यापुढे मी
द्राक्षफळांचा रस घेणार नाही."
19नंतर त्याने भाकर घेतली आणि उपकार मानले.
त्याने ती मोडली आणि त्यांना दिली व म्हणाला, "हे माझे
शरीर आहे जे तुम्हांसाठी दिले आहे. माझ्या आठवणीसाठी
हे करा." 20त्याचप्रमाणे त्यांचे भोजन झाल्यावर त्याने
प्याला घेतला आणि म्हणाला, "हा प्याला माझ्या रक्तात
नवा करार आहे. जो तुमच्यासाठी ओतला जात आहे."*

### येशू विरुद्ध कोण जाईल?

21परंतु पाहा! माझा विश्वासघात करणाऱ्याचा हात
माझ्याबरोबरच मेजावर आहे. 22कारण मनुष्याचा पुत्र
जसे निश्चित केले आहे, त्याप्रमाणे मरावयास जाईल.
परंतु ज्याने त्याचा विश्वासघात केला आहे, त्याचा धिश्च ार
असो."
23आणि ते आपापसात एकमेकाला प्रश्न विचारू लागले,
"हे करणारा आपणापैकी कोण असावा?"

### सेवकासारखे व्हा

24तसेच, त्यांच्यामध्ये अशासंबंधी वाद निर्माण झाला
की, त्यांच्यामध्ये सर्वांत श्रेष्ठ कोण आहे. 25पण येशू
त्यांना म्हणाला, विदेश्यांचे राजे त्यांच्या लोकांवर (प्रजेवर)
सत्ता गाजवितात. इतर लोकांवर अधिकार असणारी माणसे
लोकांनी त्यांना लोकांचे उपकारकर्ते म्हणण्यास भाग
पाडतात. (स्वत:ला उपकारकर्ते म्हणवून घेतात.) 26परंतु
तुम्ही तसे नाही. त्याऐवजी तुमच्यातील सर्वांत मोठा
असलेल्याने सर्वांत लहान व्हावे व जो अधिकारी आहे
त्याने सेवक व्हावे. 27तेव्हा मोठा कोण: जो मेजावर बसतो
तो की जो सेवा करतो तो? जो मेजावर बसतो तो नाही
का? परंतु मी तुम्हांमध्ये सेवा करणारासारखा आहे. 28परंतु
माझ्या परीक्षेमध्ये माझ्या पाठीशी उभे राहिलेले असे तुम्हीच
आहात. 29ज्याप्रमाणे माझ्या पित्याने माझी नियुक्ति केली
तशी मी तुमची नियुक्ति राज्यावर करतो. 30म्हणून तुम्ही
माझ्या राज्यात माझ्या मेजावर खावे व प्यावे आणि
आसनावर बसून इस्राएलाच्या बारा वंशाचा न्याय करावा.

### तुमचा विश्वास ढळू देऊ नका
***(मत्तय 26:31-35; मार्क 14:27-31; योहान 13:36-38)***

31शिमोना, शिमोना, ऐक! सैतानाने तुम्हांला गव्हासारखे
चाळावे म्हणून मागितले आहे. 32परंतु शिमोना, तुझा विश्वास
ढळू नये, म्हणून मी तुझ्यासाठी प्रार्थना करून केली आहे
आणि तू पुन्हा माझ्याकडे वळलास म्हणजे तुझ्या भावांस
स्थिर कर.
33परंतु शिमोन पेत्र त्याला म्हणाला, "प्रभु, मी
तुझ्याबरोबर तुरूंगात जाण्यासाठी व मरण्यासाठी तयार
आहे."
34पण येशू म्हणाला, "पेत्रा, मी तुला सांगतो, तू मला
ओळखतोस हे तीन वेळा नाकारीपर्यंत आज कोंबडा
आरवणार नाही."

### संकटासाठी तयार राहा

35येशू शिष्यांना म्हणाला, "जेव्हा मी तुम्हांला थैली,
पिशवी व वहाणांशिवाय पाठविले, तेव्हा तुम्हांस काही
कमी पडले का?" ते म्हणाले, "काहीही नाही."
36तो त्यांना म्हणाला, "पण आता, ज्याच्याजवळ थैली
आहे त्याने ती घ्यावी व त्याने पिशवीसुद्धा घ्यावी. आणि
ज्याच्याजवळ तलवार नाही त्याने आपला झगा विकावा
आणि एक विकत घ्यावी. 37कारण मी तुम्हांस सांगतो, हा
शास्त्रभाग माझ्यामध्ये परिपूर्ण झालाच पाहिजे:

'आणि तो अपराधी असा गणला गेला.'

*यशया 53:12*

होय, हा माझ्याविषयीचा संदर्भ पूर्ण होत आहे."

38ते म्हणाले, "प्रभु, पहा, येथे दोन तरवारी आहेत." तो
त्यांना म्हणाला, "तेवढे पुरे!"

### येशू प्रेषितांना प्रार्थना करण्यास सांगतो
***(मत्तय 26:36-46; मार्क 14:32-42)***

39तो निघाला आणि नेहमीप्रमाणे जैतूनाच्या डोंगराकडे
गेला व शिष्यही त्याच्या मागोमाग गेले. 40तो त्या ठिकाणी
आला तेव्हा त्यांना म्हणाला, "तुम्ही मोहात पडू नये म्हणून
प्रार्थना करा."
41तो त्यांच्यापासून दगडाच्या टप्प्याइतका दूर गेल्यानंतर
त्याने गुडघे टेकले. आणि अशी प्रार्थना केली, "42पित्या,
जर तुझी इच्छा असेल तर हा प्याला माझ्याकडून घे. तरी
माझ्या इच्छेप्रमाणे नको तर तुझ्या इच्छेप्रमाणे होऊ दे."
43स्वर्गातून एक देवदूत आला व तो त्याला सामर्थ्य देत
राहिला 44दु:खाने ग्रासलेला असतानासुद्धा त्याने अधिक
काकुळतीने प्रार्थना केली. आणि त्याचा घाम रक्ताच्या

---

**वचन 20** काही ग्रीक प्रतीमध्ये 19 व्या वचनाचा शेवटचा भाग
व 20 वे वचन पूर्णपणे नाहीत.

थेंबासारखा जमिनीवर पडत होता. 45आणि जेव्हा प्रार्थना करून तो उठला आणि शिष्यांकडे आला तेव्हा ते त्यांच्या दु:खामुळे थकून जाऊन झोपी गेलेले आढळले. 46तो त्यांना म्हणाला, "तुम्ही का झोपत आहात? उठा, आणि मोहात पडू नये म्हणून प्रार्थना करा."

## येशूला अटक

*(मत्तय 26:47-56; मार्क 14:43-50; योहान 18:3-11)*

47तो बोलत असता लोकांचा जमाव आला. आणि बारा शिष्यातील यहूदा इस्कर्योत म्हटलेला एक जण त्यांच्यापुढे चालत होता. येशूचे चुंबन घेण्यासाठी तो त्याच्याजवळ आला. 48परंतु येशू त्यास म्हणाला, "यहूदा, चुंबन घेऊन मनुष्याच्या पुत्राचा तू विश्वासघात करतोस काय?" 49त्याच्याभोवती जे होते ते काय होणार हे पाहून म्हणाले, "प्रभु, आम्ही तलवारीने मारावे काय?" 50त्यांच्यापैकी एकाने मुख्य याजकाच्या नोकरावर वार केला आणि त्याचा उजवा कान कापला.

51येशूने उत्तर दिले, "असे काही करू नका. त्याने त्याच्या कानाला स्पर्श केला व त्याला बरे केले.

52नंतर येशू मुख्य याजक, मंदिराचे मुख्य अधिकारी आणि वडील जे त्याच्यावर चालून आले होते, त्यांना म्हणाला, "तुम्ही तलवारी आणि सोटे घेऊन माझ्यावर चालून आलात, जसा काय मी लुटारू आहे. 53मी तर तुम्हांबरोबर दररोज मंदिरात असे आणि तुम्ही माझ्यावर हात टाकला नाही. परंतु ही तुमची आणि अंधाराची राज्य करण्याची वेळ आहे."

## मी येशूला ओळखतो असे म्हणण्याची पेत्राला भीति वाटते

*(मत्तय 26:57-58, 69-75; मार्क 14:53-54, 66-72; योहान 18:12-18, 25-27)*

54त्यांनी त्याला अटक केली व ते त्याला मुख्य याजकाच्या घरी घेऊन गेले. पण पेत्र दुरून त्यांच्या मागे चालला. 55त्यांनी अंगणाच्या मध्यभागी विस्तव पेटविला, आणि त्याच्याभोवती बसले. पेत्रही त्यांच्यात बसला. 56एका दासीने तेथे त्याला विस्तवाच्या उजेडात बसलेले पाहिले. तिने त्याच्याकडे निरखून पाहिले आणि ती म्हणाली, "हा मनुष्यही त्याच्याबरोबर होता."

57पेत्र ते नाकारून म्हणाला, "बाई, मी त्याला ओळखत नाही!" 58थोड्या वेळानंतर दुसऱ्या मनुष्याने त्याला पाहिले आणि म्हणाला, "तू सुद्धा त्यांच्यापैकी एक आहेस!" पण पेत्र म्हणाला, "गृहस्था, मी नाही!"

59नंतर सुमारे एक तास झाल्यावर आणखी एक जण ठामपणे म्हणाला, "खात्रीने हा मनुष्यसुद्धा त्याच्याबरोबर होता, कारण हा गालीलाचा आहे."

60परंतु पेत्र म्हणाला, "गृहस्था तू काय बोलतोस ते मला कळत नाही!" तो बोलत असताना त्याच क्षणी कोंबडा आरवला. 61आणि प्रभूने वळून पेत्राकडे पाहिले. पेत्राला प्रभूने उच्चारलेले वाक्य आठवले. "आज कोंबडा आरवण्यापूर्वी तू तीन वेळा मला नाकारशील," असे सांगितलेले त्याला आठवले. 62मग तो बाहेर गेला आणि अतिदु:खाने रडला.

## लोक येशूचा उपहास करतात

*(मत्तय 26:67-68; मार्क 14:65)*

63येशूवर पहारा देणाऱ्या लोकांनी त्याचा उपहास करायला व त्याला मारायला सुरूवात केली. 64त्यांनी त्याचे डोळे बांधले, व त्याला प्रश्न विचारू लागले. ते म्हणाले, "ओळख बघू! तुला कोणी मारले?" 65आणि ते त्याचा अपमान करण्यासाठी आणखी पुष्कळ काही बोलले.

## यहूदी पुढाऱ्यांसमोर येशू

*(मत्तय 26:59-66; मार्क 14:55-64; योहान 18:19-24)*

66दिवस उगवला तेव्हा वडील लोकांची म्हणजे त्यात दोन्ही प्रकारचे लोक, मुख्य याजक, व नियमशास्त्राचे शिक्षक यांची सभा भरली. आणि ते त्याला त्यांच्या सभेत घेऊन गेले. 67ते म्हणाले, "जर तू ख्रिस्त आहेस तर आम्हांला सांग."

येशू त्यांना म्हणाला, "जरी मी तुम्हांला सांगितले तरी तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवणार नाही. 68आणि जरी मी तुम्हांला प्रश्न विचारला तरी तुम्ही उत्तर देणार नाही. 69पण आतापासून मनुष्याचा पुत्र सर्वसमर्थ देवाच्या उजवीकडे बसलेला असेल."

70ते सर्व म्हणाले, "तर मग तू देवाचा पुत्र आहेस काय?" त्याने त्यांना उत्तर दिले, "मी आहे असे तुम्ही म्हणता ते बरोबर आहे."

71मग ते म्हणाले, "आता आपल्याला आणखी साक्षीची काय गरज आहे? आपण स्वत: त्याच्या तोंडचे शब्द ऐकले आहेत."

## राज्यपाल पिलात येशूला प्रश्न विचारतो

*(मत्तय 27:1-2, 11-14; मार्क 15:1-5; योहान 18:28-38)*

23 मग त्यांचा सर्व समुदाय उठला, व त्यांनी त्याला (येशूला) पिलाताकडे नेले. 2व ते त्याच्यावर आरोप करू लागले. ते म्हणाले, "आम्ही या माणसाला लोकांची दिशाभूल करताना पकडले. तो कैसराला कर देण्यासाठी विरोध करतो आणि म्हणतो की, तो स्वत: ख्रिस्त, एक राजा आहे."

3मग पिलाताने येशूला विचारले, "तू यहूद्यांचा राजा आहेस काय?" येशू म्हणाला, "मी आहे हे तू म्हणतोस ते बरोबर आहे." 4मग पिलात मुख्य याजकांना आणि जमावाला म्हणाला, "या माणसावर दोष ठेवण्यास मला काही कारण आढळत नाही."

5पण त्यांनी आग्रह धरला. ते म्हणाले, “यहूदीयातील
सर्व लोकांना तो आपल्या शिकवणीने भडकावीत आहे,
त्याने गालीलापासून सुरूवात केली आणि येथपर्यंत आला
आहे.”

## पिलात येशूला हेरोदाकडे पाठवितो

6पिलाताने हे ऐकले, तेव्हा त्याने विचारले की, “हा
मनुष्य गालीलाचा आहे काय?” 7जेव्हा त्याला समजले
की, येशू हेरोदाच्या अंमलाखाली येतो. तेव्हा त्याने त्याला
हेरोदाकडे पाठविले. तो त्या दिवसांत यरुशलेमामध्येच
होता. 8हेरोदाने येशूला पाहिले तेव्हा त्याला फार आनंद
झाला, कारण त्याने त्याजविषयी ऐकले होते, व त्याला
असे वाटत होते की, तो एखादा चमत्कार करील व
आपल्याला तो बघायला मिळेल 9त्याने येशूला अनेक
प्रश्न विचारले, पण येशूने त्याला उत्तर दिले नाही. 10मुख्य
याजक आणि नियमशास्त्राचे शिक्षक तेथे उभे होते. ते
त्याच्याविरुद्ध जोरदारपणे आरोप करीत होते. 11हेरोदाने
त्याच्या शिपायांसह येशूला अपमानास्पद वागणूक दिली,
त्याची थट्टा केली. त्यांनी त्याच्यावर एक तलम झगा
घातला व त्याला पिलाताकडे परत पाठविले. 12त्याच
दिवशी हेरोद आणि पिलात एकमेकांचे मित्र बनले. त्यापूर्वी
ते एकमेकांचे वैरी होते.

## येशू मेलाच पाहिजे
### *(मत्तय 27:15-26; मार्क 15:6-15; योहान 18:39, 19:16)*

13पिलाताने मुख्य याजक, पुढारी आणि लोकांना एकत्र
बोलावले. 14तो त्यांना म्हणला, “तुम्ही या माणसाला तो
लोकांना भडकावीत होता म्हणून आणले, आता मी त्याची
तुमच्यासमोर चौकशी केली आहे आणि तुम्ही त्याच्याविरुद्ध
जे आरोप करीत आहात त्यासाठी मला काहीही आधार
सापडत नाही. 15हेरोदालाही आरोपाविषयी काहीही आधार
सापडला नाही. कारण त्याने त्याला परत आमच्याकडे
आणले आहे. तुम्हीही पाहू शकता की, मरणाची शिक्षा
देण्यास योग्य असे त्याने काहीही केलेले नाही. 16म्हणून
मी याला फटके मारून सोडून देतो. 17*

18पण ते सर्व एकत्र मोठ्याने ओरडले, “या माणसाला
ठार करा! आणि आम्हांसाठी बरब्बाला सोडा!” 19(बरब्बाने
शहरात खळबळ माजवली होती. त्याने काही लोकांना
ठारही केले होते, त्यामुळे त्याला तुरूंगात टाकले होते.)
20पुन्हा पिलात त्यांच्याशी बोलला, कारण येशूला
सोडण्याची त्याची इच्छा होती. 21पण ते ओरडतच राहिले,
“त्याला वधस्तंभावर खिळा, त्याला वधस्तंभावर खिळा!”
22तिसऱ्यांदा पिलात त्यांना म्हणाला, “परंतु या माणसाने
असा कोणता गुन्हा केला आहे? मरणाची शिक्षा देण्यायोग्य
असे मला याच्याविरुद्ध काहीही आढळले नाही. यास्तव
मी याला फटक्याची शिक्षा सांगून सोडून देतो.”
23परंतु ते मोठ्याने ओरडतच राहिले आणि त्याला
वधस्तंभावर खिळण्याची मागणी करू लागले. आणि
त्यांच्या ओरडण्याचा विजय झाला. 24पिलाताने त्यांची
मागणी मान्य करण्याचे ठरविले.
25जो मनुष्य दंगा आणि खून यासाठी तुरूंगात टाकला
गेला होता, व ज्याची त्यांनी मागणी केली होती त्याला
त्याने सोडून दिले. पिलाताने त्यांच्या इच्छेप्रमाणे
करण्यासाठी येशूला त्यांच्या हाती दिले.

## येशूला वधस्तंभावर खिळून ठार मारले
### *(मत्तय 27:32-44; मार्क 15:21-32; योहान 19:17-27)*

26ते त्याला घेऊन जात असताना, कुरेने येथील शिमोन
नावाच्या मनुष्याला त्यांनी धरले. तो शेताकडून येत होता.
त्यांनी वधस्तंभ त्याच्यावर ठेवला व त्यांनी त्याला तो
वधस्तंभ येशूच्या मागे वाहावयास लावला.
27लोकांचा मोठा समुदाय त्याच्यामागे चालला होता.
त्यामध्ये त्याच्यासाठी शोक करणाऱ्या आणि रडणाऱ्या
काही स्त्रियांचाही समावेश होता. 28येशू त्यांच्याकडे वळून
म्हणाला, “यरुशलेमच्या कन्यांनो, माझ्यासाठी रडू नका,
तर आपल्या स्वत:साठी आणि आपल्या मुलांबाळांसाठी
रडा. 29कारण असे दिवस येत आहेत, जेव्हा लोक म्हणतील,
‘धन्य त्या स्त्रिया ज्या वांझ आहेत, आणि धन्य ती गर्भाशये,
ज्यांनी जन्मदिले नाहीत, व धन्य ती स्तने, ज्यांनी कधी
पाजले नाही.’ 30‘तेव्हा ते पर्वतास म्हणतील, “आम्हांवर
पडा!” आणि ते टेकड्यांस म्हणतील. “आम्हांला झाका!”*
31जर लोक असे करतात जेव्हा झाड हिरवे असते, तर
झाड सुकल्यावर काय होईल?”
32दोन दुसरी माणसे जी दोघेही गुन्हेगार होती, त्यांनाही
मृत्युदंडाच्या शिक्षेची अंमलबजावणी करण्यासाठी नेत होते.
33आणि जेव्हा ते गुन्हेगारांसमवेत “कवटी” म्हटलेल्या
ठिकाणी आले, तेथे त्यांनी त्याला वधस्तंभी गुन्हेगारांमध्ये
खिळले. एका गुन्हेगाराला त्यांनी उजवीकडे ठेवले व
दुसऱ्याला डावीकडे ठेवले. 34नंतर येशू म्हणाला, “हे
बापा, त्यांची क्षमा कर, कारण ते काय करतात हे त्यांना
समजत नाही.”
त्यांनी चिठ्ठया टाकून त्याचे कपडे वाटून घेतले. 35लोक
तेथे पाहात उभे होते. आणि पुढारी थट्टा करून म्हणाले,
“त्याने दुसऱ्यांना वाचविले, जर तो ख्रिस्त, देवाचा
निवडलेला असेल तर त्याने स्वत:ला वाचवावे!”
36शिपायांनीही त्याची थट्टा केली. ते त्याच्याकडे आले
आणि त्यांनी त्याला आंब दिली. 37आणि ते म्हणाले, “
जर तू यहूद्यांचा राजा आहेस तर स्वत:ला वाचव!”

---

**वचन 17** काही ग्रीक प्रतीमध्ये, “प्रत्येक वर्षी वल्हांडणाच्या वेळी पिलाताला लोकांसाठी एका कैद्या सोडावे लागे”.

**तेव्हा … झाका** होशेय 10:8

38त्याच्यावर असे लिहिले होते: “हा यहूदी लोकांचा राजा आहे.”

39तेथे खिळलेल्या एका गुन्हेगाराने त्याचा अपमान केला. तो म्हणाला, “तू ख्रिस्त नाहीस काय? स्वत:ला व आम्हालाही वाचव!”

40पण दुसऱ्या गुन्हेगाराने त्याला दटावले आणि म्हणाला, “तुला देवाचे भय नाही का? तुलाही तीच शिक्षा झाली आहे. 41पण आपली शिक्षा योग्य आहे. कारण आपण जे केले त्याचे योग्य फळ आपणांस मिळत आहे. पण या माणसाने काहीही अयोग्य केले नाही.” 42नंतर तो म्हणाला, “येशू, तू आपल्या राज्याधिकाराने येशील तेव्हा माझी आठवण कर.” 43येशू त्याला म्हणाला, “मी तुला खरे सांगतो, आज तू मजबरोबर सुखलोकात असशील.”

## येशूचा मृत्यू

*(मत्तय 27:45-56; मार्क 15:33-41; योहान 19:28-30)*

44त्यावेळी जवळजवळ दुपारचे बारा वाजले होते आणि तीन वाजेपर्यंत सर्व प्रदेशावर अंधार पडला. त्यादरम्यान सूर्य प्रकाशला नाही. 45आणि मंदिरातील पडदा फाटला आणि त्याचे दोन भाग झाले. 46येशू मोठ्या आवाजात ओरडला, “पित्या, मी आपला आत्मा तुझ्या हाती सोपवून देतो.” असे म्हटल्यानंतर तो मेला. 47जेव्हा रोमी सेनाधिकाऱ्याने काय घडले ते पाहिले तेव्हा त्याने देवाचे गौरव केले आणि म्हणाला, “खरोखर हा नीतिमान मनुष्य होता.”

48हे दृष्य पाहण्यासाठी जमलेल्या लोकांनी घडलेल्या गोष्टी पाहिल्या, तेव्हा ते छाती बडवीत परत गेले. 49परंतु त्याच्या ओळखीचे सर्वजण हे पाहण्यासाठी दूर उभे राहिले. त्यामध्ये गालीलाहून त्याच्यामागे आलेल्या स्त्रियाही होत्या.

## योसेफ अरिमथाईकर

*(मत्तय 27:57-61; मार्क 15:42-47; योहान 19:38-42)*

50तेथे एक योसेफ नावाचा एक मनुष्य होता. तो यहूदी सभेचा सभासद होता. तो चांगला आणि धार्मिक मनुष्य होता. 51तो सभेच्या निर्णयाशी व कृतीशी सहमत नव्हता. तो यहूदीयातील अरिमथाई नगराचा होता. तो देवाच्या राज्याची वाट पाहत होता. 52हा मनुष्य पिलाताकडे गेला आणि त्याने येशूचे शरीर मागितले. 53ते त्याने वधस्तंभावरून खाली काढले आणि तागाच्या वस्त्रात गुंडाळले. नंतर ते खडकात खोदलेल्या कबरेत ठेवले. ही कबर अशी होती की, जिच्यात तोपर्यंत कोणाला ही ठेवले नव्हते. 54तो शुक्रवार (तयारीचा दिवस) होता, आणि शब्बाथ सुरू होणार होता. 55गालीलाहून येशूबरोबर आलेल्या स्त्रिया योसेफाच्या मागे गेल्या. त्यांनी ती कबर व तिच्यामध्ये ते शरीर कसे ठेवले ते पाहिले. 56नंतर त्या घरी गेल्या व त्यांनी सुगंधी मसाले आणि लेप तयार केले. शब्बाथ दिवशी त्यांनी आज्ञेप्रमाणे विसावा घेतला.

## येशू मरणातून उठला आहे

*(मत्तय 28:1-10; मार्क 16:1-8; योहान 20:1-10)*

24 आठवड्याच्या पहिल्या दिवशी त्या स्त्रिया अगदी पहाटेस कबरेकडे आल्या, आणि त्यांनी स्वत: तयार केलेले मसाले आणले. 2त्यांना दगड कबरेवरून लोटलेला आढळला. 3त्या आत गेल्या, परंतु त्यांना प्रभु येशूचे शरीर सापडले नाही. 4यामुळे त्या अवाक् झाल्या असतानाच, अचानक लखलखीत कपडे घातलेले दोन पुरुष त्यांच्या बाजूला उभे राहिले. 5अतिशय भयभीत होऊन त्यांनी आपले चेहरे जमिनीकडे वळविले. ते दोन पुरुष त्यांना म्हणाले, “जो जिवंत आहे त्याचा शोध तुम्ही मेलेल्यांमध्ये का करता? 6तो येथे नाही; तो उठला आहे! तो गालीलात असताना त्याने तुम्हांला काय सांगितले याची आठवण करा. 7तो असे म्हणाला की, मनुष्याच्या पुत्राला धरून पापी लोकांच्या हाती द्यावे, त्याला वधस्तंभावर खिळावे आणि तिसऱ्या दिवशी त्याने उठावे.” 8नंतर स्त्रियांना येशूच्या शब्दाची आठवण झाली.

9त्या कबरेपासून परतल्या आणि त्यांनी या सर्व गोष्टींचे वर्तमान अकरा प्रेषितांना व इतर सर्वांना सांगितले. 10त्या स्त्रिया मरीया मग्दालिया, योहान्ना, आणि याकोबाची आई मरीया ह्या होत्या. त्या आणि इतर स्त्रियांसुद्धा ज्या त्यांच्याबरोबर होत्या, प्रेषितांना या गोष्टी सांगत होत्या. 11पण प्रेषितांना त्यांचे सांगणे मूर्खपणाचे वाटले. आणि त्यांनी त्यांच्यावर विश्वास ठेवला नाही. 12पण पेत्र उठला आणि कबरेकडे पळाला. त्याने खाली वाकून पाहिले पण त्याला तागाच्या गुंडाळण्याच्या वस्त्राशिवाय काही आढळले नाही. जे घडले त्याविषयी तो स्वत:शीच आश्चर्य करीत दूर गेला.

## अम्माऊसच्या वाटेवर

*(मार्क 16:12-13)*

13त्याच दिवशी त्यांच्यातील दोघे शिष्य यरुशलेमापासून सुमारे दहा किलोमीटर अंतरावर असलेल्या अम्माऊस नावाच्या गावाला चालले होते. 14ते एकमेकांशी या घडलेल्या सर्व गोष्टींविषयी बोलत होते. 15ते बोलत असताना आणि या गोष्टींची चर्चा करीत असताना येशू स्वत: आला आणि त्यांच्याबरोब चालू लागला. 16पण त्यांचे डोळे त्याला ओळखण्यापासून बंद करण्यात आले होते. 17येशू त्यांना म्हणाला, “चालत असताना तुम्ही एकमेकांबरोबर बोलत आहात त्या गोष्टी कोणत्या आहेत?”

चालता चालता ते थांबले. ते अतिशय दु:खी दिसले. 18त्यांच्यातील एकजण ज्याचे नाव क्लयपा होते, तो त्याला म्हणला, “ह्या दिवसांमध्ये घडलेल्या गोष्टी माहीत नसलेले असे यरुशलेमात राहणारे तुम्ही एकटेच आहात काय?”

19येशू त्यांना म्हणाला, “तुमच्या मते कोणत्या गोष्टी?” ते त्याला म्हणाले, “नासरेथकर येशूविषयीच्या सर्व गोष्टी.

हाच तो मनुष्य जो आपल्या कृत्यांनी आणि शब्दांनी
देवासमोर आणि मनुष्यांसमोर एक महान संदेष्टा झाला.
20आणि आम्ही चर्चा करीत होतो की, कसे आमच्या
प्रमुख याजकांनी आणि अधिकाऱ्यांनी त्याला मरणदंड
भोगण्यासाठी स्वाधीन केले. आणि त्यांनी त्याला वधस्तंभी
खिळले. 21आम्ही अशी आशा केली होती की, तोच एक
आहे जो इस्राएलाची मुक्तता करील. आणि या
सगळ्याशिवाय हे सर्व घडून गेलेल्या गोष्टीला आज तीन
दिवस झालेत.

22"आणि आमच्या परिवारातील काही स्त्रियांनी
आम्हांला थक्क केले आहे: आज अगदी पहाटे त्या
कबरेकडे गेल्या, परंतु त्यांना त्याचे शरीर सापडले नाही.
23त्यांनी येऊन आम्हांला सांगितले की, त्यांना देवदूतांचा
दृष्टात घडला आणि देवदूतांनी सांगितले की, तो जिवंत
आहे. 24तेव्हा आमच्यातील काही कबरेकडे गेले, आणि
स्त्रियांनी जसे सांगितले होते, तसेच त्यांना आढळले, पण
त्यांनी त्याला पाहिले नाही."

25मग येशू त्यांना म्हणाला, "संदेष्ट्यांनी सांगितलेल्या
सर्व गोष्टींवर विश्वास ठेवण्यास तुम्ही अति मूर्ख आणि
मंद आहात. 26ख्रिस्तासाठी या सर्व गोष्टी सहन करणे
आणि त्याच्या गौरवात जाणे आवश्यक नव्हते काय?"
27आणि म्हणून त्याने मोशेपासून सुरूवात करून आणि
सर्व संदेष्ट्यांपर्यंत सांगून, पवित्र शास्त्रात त्याच्याविषयी
काय लिहिले आहे ते सर्व त्याने त्यांना स्पष्ट करून
सांगितले.

28ज्या खेड्याकडे ते जात होते, त्याच्याजवळ ते आले
आणि येशूने असा बहाणा केला की, जणू काय तो पुढे
जाणार आहे. 29परंतु जास्त आग्रह करून ते म्हणाले,
"आमच्या बरोबर राहा. कारण जवळजवळ संध्याकाळ
झालीच आहे. आणि दिवसही जवळजवळ मावळला आहे."
मग तो त्यांच्याबरोबर राहावयास आत गेला.

30जेव्हा तो त्यांच्याबरोबर जेवायला मेजासभोवती बसला,
त्याने भाकर घेतली आणि उपकार मानले. नंतर त्याने
ती मोडली व ती त्यांना तो देऊ लागला. 31तेव्हा त्यांचे
डोळे उघडले आणि त्यांनी त्याला ओळखले. पण तो
त्यांच्यातून अदृश्य झाला.

32मग ते एकमेकांना म्हणू लागले, "तो वाटेवर आपणाशी
बोलत असताना व पवित्र शास्त्र आपल्याला स्पष्ट करून
सांगत असताना आपली अंत:करणे आतल्या आत उकळत
नव्हती काय?"

33मग ते लगेच उठले, व यरुशलेमेस परत गेले. तेव्हा
त्यांना अकरा प्रेषित व त्यांच्याबरोबर असलेले इतर एकत्र
जमलेले आढळले. 34प्रेषित आणि इतरजण म्हणाले,
"खरोखर प्रभु उठला आहे! आणि शिमोनाला दिसला
आहे."

35नंतर त्या दोन शिष्यांनी वाटेत काय घडले ते त्याला
सांगितले आणि तो भाकर मोडत असताना त्यांनी त्याला
कसे ओळखले ते सांगितले.

## येशू त्याच्या अनुयायांना दर्शन देतो
***(मत्तय 28:16-20; मार्क 16:14-18; योहान 20:19-23; प्रेषितांची कृत्यें 1:6-8)***

36ते या गोष्टी त्यांना सांगत असतानाच येशू त्यांच्यामध्ये
उभा राहिला आणि त्यांस म्हणाला, "तुम्हांस शांति असो."
37ते दचकले आणि भयभीत झाले. त्यांना असे वाटले
की, ते भूत पाहत आहेत. 38तो त्यांना म्हणाला, "तुम्ही
असे अस्वस्थ का झालात? तुमच्या मनात शंका का
निर्माण झाल्या? 39माझे हात व पाय पाहा. तुम्हाला मी
दिसतो तोच मी आहे. मला स्पर्श करा आणि पाहा की,
मला आहे तसे हाडमांस भुताला नसते. 40असे बोलून
त्याने त्यांस आपले हातपाय दाखवले. तरीही त्यांच्या
आनंदामुळे त्यांना ते खरे वाटेना. 41ते आश्चर्यचकित
झाले तेव्हा येशू त्यांना म्हणाला, "येथे तुमच्याजवळ
खाण्यासाठी काय आहे?" 42त्यांनी त्याला भाजलेला
माशाचा तुकडा दिला. 43त्याने तो घेतला व त्यांच्यासमोर
खाल्ला.

44तो त्यांना म्हणाला, "ह्याच त्या गोष्टी ज्या मी
तुम्हांबरोबर असताना सांगितल्या होत्या की, मोशेचे
नियमशास्त्र, भविष्यवादी आणि स्तोत्रे ह्यात माझ्याविषयी
जे सांगितले आहे ते सर्व पूर्ण झालेच पाहिजे."

45नंतर पवित्र शास्त्र समजण्यासाठी त्याने त्यांची मने
उघडली. 46मग तो त्यांना म्हणाला, "असे लिहिले आहे
की, ख्रिस्ताने दु:ख भोगावे आणि मेलेल्यांतून तिसऱ्या
दिवशी उठावे. 47आणि यरुशलेमापासून सुरूवात करून
सर्व राष्ट्रांस माझ्या पित्याने जे वचन दिले आहे ते पाठवीन.
पापक्षमेसाठी पश्चात्तापाची घोषणा करावी. 48या गोष्टींचे
तुम्ही साक्षी आहात. 49आता मी तुम्हांला माझ्या पित्याने
जे वचन दिले आहे ते पाठवीन. परंतु जोपर्यंत
तुम्ही स्वर्गीय सामर्थ्याने भरले जात नाही तोपर्यंत तुम्ही या
शहरातच राहा."

## येशू परत स्वर्गात जातो
***(मार्क 16:19-20; प्रेषितांची कृत्यें 1:9-11)***

50नंतर तो त्यांना बाहेर दूरवर बेथानीपर्यंत घेऊन गेला
आणि त्याने हात वर करून आशीर्वाद दिला. 51तो त्यांना
आशीर्वाद देत असतानाच तो त्यांना सोडून गेला. आणि
त्याला स्वर्गात घेण्यात आले.

52नंतर त्यांनी त्याची उपासना केली व ते मोठ्या आनंदाने
यरुशलेमाला परतले. 53आणि देवाची सतत स्तुति करीत
ते मंदिरात राहिले.

# योहानाने लिहिलेले शुभवर्तमान

## येशू जगात येतो

1 जगाची उत्पत्ति होण्यापूर्वी शब्द* अस्तित्वात होता.
तो शब्द देवाबरोबर होता, आणि शब्द देव होता. 2तो
शब्द सुरूवातीपासूनच देवाबरोबर होता. 3त्याच्याद्वारे
(शब्दाच्या) सर्व काही निर्माण करण्यात आले
त्याच्याशिवाय काहीच निर्माण करण्यात आले नाही.
4त्याच्यामध्ये जीवन होते. ते जीवन जगातील लोकांसाठी
प्रकाश (समजबुद्धी, चांगुलपण) असे होते. 5हा प्रकाश
अंधारात प्रकाशतो. पण त्या प्रकाशाला अंधाराने पराभूत*
केले नाही.

6योहान* नावाचा एक मनुष्य होता. देवाने त्याला
पाठविले. 7तो लोकांना प्रकाशाविषयी (ख्रिस्ताविषयी)
सांगण्यासाठी आला. यासाठी की, योहानाकडून प्रकाश
ाविषयी ऐकून लोकांनी विश्वास ठेवावा. 8योहान तो प्रकाश
नव्हता, परंतु लोकांना प्रकाशाविषयी सांगण्यासाठी योहान
आला. 9खरा प्रकाश जगात येणार होता. हा प्रकाश सर्व
लोकांना प्रकाश देतो. 10शब्द अगोदरच जगात होता.
त्याच्याद्वारेच जग निर्माण झाले. परंतु जगाने त्याला
ओळखले नाही. 11तो जगात आला. जे त्याचे स्वत:चे होते
त्या लोकांकडे आला, परंतु त्याच्या स्वत:च्याच लोकांनी
त्याला आपले मानले नाही. 12काही लोकांनी त्याला
आपले मानले. त्यांनी त्याच्यावर विश्वास ठेवला. विश्वास
ठेवणाऱ्या सर्वांना त्याने देवाची मुले होण्याचा हक्क दिला.
13ही मुले लहान बालके जन्मतात तशी जन्मली नाहीत.
त्यांचा जन्म आईवडिलांच्या इच्छेने किंवा योजनेमुळे झाला
नाही, तर त्यांचा जन्म देवाकडून झाला.

14शब्द मनुष्य झाला आणि आमच्यामध्ये राहिला. आम्ही
त्याचे गौरव पाहिले. ते देवपित्याच्या एकमेव अशा पुत्राचे
गौरव ख्रिस्ताशिवाय दुसरे असू शकत नाही. तो शब्द
कृपा (दयाळूपणा) आणि सत्य यांनी पूर्णपणे भरला होता.
15योहानाने त्याच्याविषयी लोकांना सांगितले. योहान
म्हणाला, "ज्याच्याविषयी मी सांगत आहे तो हाच. मी
म्हणालो, माझ्यानंतर येणारा माझ्याहून थोर आहे, तो
माझ्या अगोदरपासून आहे."

16शब्द (ख्रिस्त) हा कृपा (दयाळूपणा) व सत्य यांनी
पूर्णपणे भरला होता. त्याच्याकडून आम्हांला भरपूर
आशीर्वाद मिळाले.

17मोशेद्वारे नियमशास्त्र दिले, पण दया व सत्याचा मार्ग
ही येशू ख्रिस्ताद्वारे प्राप्त झाली. 18कोणाही मनुष्याने
आतापर्यंत देवाला कधी पाहिले नाही. परंतु एकमेव देव
(येशू) जो बापाच्या उराशी आहे, तो पुत्राद्वारे आम्हांला
प्रकट झाला आहे.*

## योहान येशूविषयी लोकांना सांगतो

***(मत्तय 3:1-12; मार्क 1:2-8; लूक 3:15-17)***

19यरुशलेम येथील यहूदी लोकांनी योहानाकडे काही
याजक व लेवी* ह्यांना पाठविले. "तू कोण आहेस?" हे
विचारण्यासाठी यहूदी लोकांनी त्यांना पाठविले.

20योहान अगदी मोकळेपणाने बोलला. त्याने उत्तर
देण्यास नकार दिला नाही. तो स्पष्टपणे म्हणाला, "मी
ख्रिस्त* नाही." योहानाने लोकांना तेच सांगितले.

21यहूदी लोकांनी योहानाला विचारले, "तर मग तू कोण
आहेस? तू एलीया* आहेस काय?"

योहानाने उत्तर दिले, "नाही, मी एलीया नाही." यहूदी
लोकांनी विचारले, "तू संदेष्टा आहेस काय?" योहानाने
म्हटले, "नाही, मी संदेष्टा नाही."

22यावर यहूदी लोक म्हणाले, "तू कोण आहेस?"
तुझ्याविषयी आम्हांला सांग. ज्या लोकांनी आम्हांला
पाठविले, त्यांना आम्ही काय उत्तर द्यावे हे तू आम्हांला
सांग. तू स्वत:ला कोण म्हणवितोस?" 23योहानाने त्यांना
यशया संदेष्ट्याच्या शब्दात सांगितले,

---

**शब्द** ग्रीक शब्द 'लोगोस' चे मराठी भाषांतर, या ठिकाणी याचा अर्थ ख्रिस्त. मूळ अर्थ कोणतेही भाषांतर.

**पराभूत** किंवा समजणे.

**योहान** बाप्तिस्मा करणारा योहान. याने येशूच्या येण्याविषयी संदेश दिला. (वाचा. मत्तय 3रा व लूक 3रा अध्याय).

**परंतु … आहे** किंवा "परंतु फक्त देवाचा पित्याच्या अगदी जवळचा आहे." काही ग्रीक प्रतीमध्ये, "फक्त पुत्रच पित्याच्या अगदी जवळचा आहे," असे म्हटेलेले आहे.

**लेवी** हे लेवी वंशातील लोक होते. ते यहूदी याजकांना मंदिराच्या कामात मदत करीत असत.

**ख्रिस्त** देवाचा अभिषिक्त (मशीहा) किंवा देवाचा निवडलेला.

**एलीया** इ. स. पू. 850 मध्ये होऊन गेलेला एक संदेष्टा, यहूदी लोकांची अशी अपेक्षा होती की, मशीहा येण्यापूर्वी एलीया येईल.

"मी वैराण रानात ओरडणाऱ्या मनुष्याची वाणी आहे:
'प्रभूसाठी सरळ मार्ग तयार करा.' " *यशाया 40:3*

24परूशी लोकांनी या यहूदी लोकांना पाठविले होते.
25हे लोक योहानाला म्हणाले, "तू म्हणतोस की, मी ख्रिस्त
नाही; मी एलीया नाही किंवा मी संदेष्टाही नाही, मग तू
लोकांचा बाप्तिस्मा का करतोस?"

26योहानाने उत्तर दिले, "मी लोकांचा बाप्तिस्मा पाण्याने
करतो. परंतु तुम्हांला माहीत नाही असा एक मनुष्य येथे
तुमच्यात आहे. 27माझ्यानंतर येणारा तो हाच मनुष्य आहे.
त्याच्या वहाणांचे बंद सोडण्याइतकीही माझी लायकी नाही."
28यार्देन नदीपलीकडील बेथानी गावात या सर्व गोष्टी
घडल्या. योहान तेथेच लोकांचा बाप्तिस्मा करीत असे.

29दुसऱ्या दिवशी योहानाने येशूला आपणांकडे येताना
पाहिले. योहान म्हणाला, "पाहा, हा देवाचा कोकरा. जगाचे
पाप वाहून नेणारा. 30याच्याविषयी मी बोलत होतो. मी
म्हणालो, 'माझ्यानंतर एक मनुष्य येणार आहे. परंतु तो
माझ्याहून थोर आहे. तो माझ्या अगोदरपासून आहे. तो
सदाजीवी आहे.' 31तो कोण होता हे मलाही माहीत नव्हते.
परंतु मी पाण्याने बाप्तिस्मा* करीत आलो यासाठी की,
येशू हाच ख्रिस्त आहे हे इस्राएलाला (यहूदी लोकांना)
कळावे."

32-33नंतर योहान म्हणाला, "ख्रिस्त कोण होता हे
मलाही माहीत नव्हते परंतु मी लोकांचा बाप्तिस्मा पाण्याने
करावा म्हणून देवाने मला पाठविले. आणि देवाने मला
सांगितले, "आत्मा खाली येऊन एका मनुष्यावर
स्थिरावताना दिसेल. तोच मनुष्य पवित्र आत्म्याने*
बाप्तिस्मा करील." योहान म्हणाला, "हे होताना मी पाहिले
आहे. स्वर्गातून पवित्र आत्मा खाली उतरताना मी पाहिला.
आत्मा कबुतरासारखा दिसत होता. आणि तो त्याच्यावर
(येशूवर) येऊन स्थिरावला. 34म्हणून मी लोकांना सांगतो:
'तो (येशू) देवाचा पुत्र आहे.' "

## येशूचे पहिले शिष्य

35दुसऱ्या दिवशी योहान पुन्हा तेथे आला. योहानाबरोबर
त्याचे दोन शिष्य होते. 36योहानाने येशूला जाताना पाहिले.
योहान म्हणाला, "पाहा हा देवाचा कोकरा!"*

37योहान हे बोलत असता त्या दोघा शिष्यांनी ऐकले,
म्हणून ते योहानाचे शिष्य येशूच्या मागे गेले. 38येशूने मागे
वळून पाहिले तो दोघेजण आपल्यामागे येत आहेत असे
त्याला दिसले. येशूने विचारले, "तुम्हांला काय पाहिजे?"
ते दोघे म्हणाले, "गुरूजी (रब्बी), तुम्ही कोठे राहता?"

39येशूने उत्तर दिले, "माझ्याबरोबर या म्हणजे तुम्हांला
दिसेल." तेव्हा ते दोघेजण येशूबरोबर गेले. येशू राहत
होता ती जागा त्यांनी पाहिली. ते त्या दिवशी येशूबरोबर
तेथे राहिले. त्यावेळी सुमारे दुपारचे चार वाजले होते.

40येशूविषयी योहानाकडून ऐकल्यावर ते दोघे जण
येशूच्या मागे गेले. त्यांच्यापैकी एकाचे नाव अंद्रिया होते.
अंद्रिया हा शिमोन पेत्राचा भाऊ. 41अंद्रियाने पहिली गोष्ट
ही केली की, आपला भाऊ शिमोन याला शोधून काढले.
अंद्रिया शिमोनाला म्हणाला, "आम्हांला मशीहा सापडला
आहे."

42शिमोनाला घेऊन अंद्रिया येशूकडे आला. शिमोनाकडे
पाहून येशू म्हणाला, "तू योहानाचा पुत्र शिमोन आहेस.
तुला केफा* म्हणतील." 43दुसऱ्या दिवशी येशूने गालील
प्रांतात जाण्याचे ठरविले. तेव्हा तो फिलिप्पाला भेटला.
येशू त्याला म्हणाला, "माझ्यामागे ये."

44जसे अंद्रिया व पेत्र तसाच फिलिप्पही बेथसैदा या
गावचा होता. 45फिलिप्प नथनेलास भेटला व म्हणाला,
"मोशेने नियमशास्त्रात जे लिहिले आहे त्याची आठवण
कर. जो येणार आहे त्या मनुष्याविषयी मोशेने व
संदेष्ट्यांनीही लिहिले. तो आम्हांला सापडला आहे. त्याचे
नाव येशू आहे. तो योसेफाचा पुत्र असून नासरेथ गावचा
आहे."

46परंतु नथनेल फिलिप्पाला म्हणाला, "नासरेथ!
नासरेथमधून काही चांगले निघेल काय?" फिलिप्प
म्हणाला, "येऊन पहा."

47येशूने नथनेलाला आपल्याकडे येताना पाहिले. येशू
म्हणाला, "हा येत असलेला मनुष्य खरोखर देवाच्या
लोकांपैकी एक आहे. त्याच्यात खोटे काहीच नाही."

48"तुम्ही मला कसे ओळखता?" नथनेलाने विचारले.
येशूने उत्तर दिले, "तू अंजिराच्या झाडाखाली उभा होता.
तेव्हाच मी तुला पाहिले. फिलिप्पने तुला माझ्याविषयी
सांगण्यापूर्वीच."

49मग नथनेल येशूला म्हणाला, "रब्बी (गुरूजी) तुम्ही
देवाचे पुत्र आहात. तुम्ही इस्राएलाचे राजे आहात.

50येशू नथनेलला म्हणाला, "तू अंजिराच्या झाडाखाली
उभा असतानाच मी तुला पाहिले, असे मी सांगितले म्हणून
तुझा माझ्यावर विश्वास बसला. परंतु यापेक्षा मोठमोठ्या
गोष्टी तू पाहशील!" 51येशू पुढे म्हणाला, "खरे तेच मी
तुला सांगतो. स्वर्ग उघडलेला तुम्ही सर्व जण पाहाल.
देवदूत वर चढताना आणि मनुष्याच्या पुत्रावर खाली
उतरताना तुम्ही पाहाल."*

**बाप्तिस्मा** ग्रीक शब्द. याचा अर्थ एखादी व्यक्ति किंवा वस्तु काही वेळ पाण्याखाली बुडविणे.

**पवित्र आत्मा** याला देवाचा आत्मा, ख्रिस्ताचा आत्मा व सांत्वन करणारा म्हणतात. देव व ख्रिस्त यांच्यासह असलेला व तो जगामध्ये देवाचे कार्य करतो.

**देवाचा कोकरा** येशूचे नाव, येशू जणू कोकरा असून देवाला तो अर्पण केला आहे.

**केफा** ग्रीकमध्ये पेत्र व अरेमी केफायाचा अर्थ 'खडक'.

**देवदूत … पाहाल** उत्पत्ति 28:12

## काना येथील लग्न

2 दोन दिवसांनी गालीलातील काना गावी एक लग्न
होते. येशूची आई तेथे होती. 2येशू व त्याचे शिष्य
यांनाही लग्नाला बोलाविले होते. 3लग्नात पुरेसा द्राक्षारस
नव्हता. सगळा द्राक्षारस संपला. तेव्हा येशूची आई त्याला
म्हणाली, "त्यांच्याजवळ द्राक्षारस नाही."
4येशूने उत्तर दिले, "आई, तू मला यात का गुंतवितेस?
माझी वेळ अजून आलेली नाही."
5येशूची आई नोकरांना म्हणाली, "येशू तुम्हांला सांगेल
तसे करा."
6त्या ठिकाणी दगडाचे सहा मोठे रांजण होते. यहूदी
लोक विशेष विधीप्रसंगी धुण्यासाठी* पाणि ठेवण्यासाठी
हे रांजण वापरीत असत. प्रत्येक रांजणात वीस ते तीस
बादल्या पाणी मावत असे.
7येशू नोकरांना म्हणाला, "हे रांजण पाण्याने भरा."
मग नोकरांनी ते रांजण काठोकाठ भरले. 8मग येशू
नोकरांना म्हणाला, "आता यातील काही पाणी काढा
आणि ते भोजनप्रमुखाकडे न्या."
मग नोकर ते पाणी घेऊन भोजनप्रमुखाकडे गेले. 9मग
लग्नसमारंभातील भोजनप्रमुखाने ते चाखून पाहिले, तर
पाण्याचा द्राक्षारस झालेला होता. तो द्राक्षारस कोठून आला
हे त्या माणसाला माहीत नव्हते. परंतु ज्या नोकरांनी ते
पाणी नेले होते त्यांना तो द्राक्षारस कोठून आला होता हे
माहीत होते. लग्नसमारंभाच्या भोजनप्रमुखाने वराला
बोलाविले.
10तो वराला म्हणाला, "लोक नेहमी उत्तम द्राक्षारस
पहिल्यांदा वाढतात. नंतर पाहुणे भरपूर प्याले म्हणजे मग
लोक हलक्या प्रतीचा वाढतात. परंतु तू तर उत्तम द्राक्षारस
अजून राखून ठेवला आहेस."
11स्वर्गीय सामर्थ्याचे चिन्ह म्हणून येशूने केलेला हा
पहिला चमत्कार होता. गालीलातील काना येथे येशूने हा
चमत्कार केला. आणि येशूने आपली महानता दाखवून
दिली. तेव्हा त्याच्या शिष्यांनी त्याच्यावर विश्वास ठेवला.

## येशू मंदिरात जातो

***(मत्तय 21:12-13; मार्क 11:15-17; लूक 19:45-46)***

12नंतर येशू कफर्णहूम गावी गेला. येशूची आई, भाऊ
व त्याचे शिष्य त्याच्यासोबत गेले. ते सर्व काही दिवस
कफर्णहूमास राहिले. 13यहूदी लोकांचा वल्हांडण सण अगदी
जवळ आला होता, म्हणून येशू यरुशलेमला गेला. 14येशू
यरुशलेम येथील मंदिरात गेला. येशूला मंदिरात गुरे, मेंढ्या
आणि कबुतरे विकणारी माणसे दिसली. काही माणसे
मेज मांडून बसल्याचे त्याने पाहिले. ती माणसे लोकांना
पैसे बदलून देण्याचा व्यापार करीत होती. 15येशूने दोऱ्यांचे
तुकडे जोडून एक चाबूक तयार केला. मग येशूने त्या
सर्वांना तसेच मेंढ्यांना व गुरांना मंदिरातून हाकलून दिले.
लोकांच्या पैशाचा व्यापार करणाऱ्यांचे मेज उलथेपालथे
केले आणि त्यांचे पैस विस्कटून टाकले. 16येशू कबुतरे
विकणाऱ्यांना म्हणाला, "या सर्व गोष्टी येथून घेऊन जा.
माझ्या पित्याचे घर विकणाऱ्याची व विकत घेणाऱ्याची
बाजारपेठ बनवू नका!"
17हे घडले तेव्हा येशूच्या शिष्यांना पवित्र शास्त्रात जे
लिहिले होते त्याची आठवण झाली:

"तुझ्या मंदिराच्या आवेशाने मला ग्रासून टाकले जाईल"
*स्तोत्र. 69:9*

18यहूदी लोक येशूला म्हणाले, "एखादा चमत्कार करून
आम्हांला चिन्ह दाखवा. आणि या गोष्टी करण्याचा तुम्हांला
अधिकार आहे हे सिद्ध करा."
19येशूने उत्तर दिले, "हे मंदिर नष्ट करा म्हणजे मी ते
तीन दिवसांत पुन्हा उभारीन."
20यहूदी लोक म्हणाले, "लोकांना हे मंदिर बांधण्यासाठी
शेहेचाळीस वर्षे लागली! आणि तुम्ही ते तीन दिवसांत
बांधू शकता यावर तुमचा खरोखरच विश्वास आहे काय?"
21(परंतु येशू मंदिराविषयी म्हणजे स्वत:च्या शरीराविषयी
बोलला. 22नंतर येशू मेलेल्यांतून पुन्हा उठविला गेला,
तेव्हा त्याच्या शिष्यांना तो हे बोलल्याचे आठवले. आणि
त्याच्या शिष्यांनी त्याच्याविषयी लिहिलेल्या पवित्र शास्त्रावर
आणि जे शब्द येशू बोलला त्यावर विश्वास ठेवला.)
23वल्हांडण सणासाठी येशू यरुशलेमात होता. पुष्कळ
लोकांनी येशूवर विश्वास ठेवला कारण तो करीत असलेले
चमत्कार त्यांनी पाहिले. 24परंतु येशूने त्यांच्यावर भरवसा
ठेवला नाही. कारण येशूला त्यांचे विचार माहीत होते.
25लोकांविषयी कोणी येशूला सांगावे याची त्याला काहीच
गरज नव्हती. लोकांच्या मनात काय आहे हे येशू जाणून
होता.

## येशू आणि निकदेम

3 निकदेम नावाचा एक मनुष्य होता. निकदेम परूशी
लोकांपैकी एक असून तो यहूदी लोकांचा एक
महत्त्वाचा पुढारी होता. 2एका रात्री निकदेम येशूकडे आला
आणि म्हणाला, "रब्बी, तुम्ही देवाकडून पाठविलेले शिक्षक
आहात हे आम्हांला माहीत आहे. कारण तुम्ही जे चमत्कार
करता ते देवाच्या मदतीशिवाय कोणाही माणसाला करता
येणार नाहीत."
3येशूने उत्तर दिले, "मी तुम्हांला खरे सांगतो. प्रत्येक
व्यक्तीचा नव्याने जन्म झालाच पाहिजे. जर एखाद्या माणसाचा
नव्याने जन्म झाला नाही, तर देवाचे राज्य पाहू शकणार
नाही."

---

**विधीप्रसंगी धुण्यासाठी** यहूदी लोकांचे धुण्यासंबंधीचे विशेष नियम होते. म्हणजे जेवणापूर्वी, उपासनेपूर्वी व इतर विशेष प्रसंगी.

**4**निकदेम म्हणाला, "जर एखादा माणूस म्हातारा असेल
तर त्याचा नव्याने जन्म कसा होईल? तो आपल्या आईच्या
उदरात परत जाऊ शकत नाही! म्हणून त्या व्यक्तीचा
दुसऱ्यांदा जन्म होणारच नाही!"
**5**येशूने उत्तर दिले, "मी तुम्हांला खरे सांगतो : मनुष्याचा
पाण्याने आणि आत्म्याने जन्म झाला नाही तर त्याचा
देवाच्या राज्यात प्रवेश होणे शक्यच नाही. **6**मनुष्य मानवी
आईवडिलांच्या उदरी जन्माला येतो. परंतु त्याच्या आत्मिक
जीवनाचा जन्म पवित्र आत्म्यापासून होतो. **7**तुमचा नवीन
जन्म झाला पाहिजे म्हणून मी तुम्हांला सांगितल्याबद्दल
आश्चर्यचकित होऊ नका. **8**वाऱ्याला वाहायला पाहिजे
तिकडे तो वाहतो. वारा वाहताना तुम्हांला त्याचा आवाज
ऐकू येतो. परंतु वारा कोठून येतो व कोठे जातो हे तुम्हांला
कळत नाही. आत्म्यापासून जन्म पावलेल्या प्रत्येक माणसाचे
असेच असते."
**9**निकदेम म्हणाला, "हे सारे कसे शक्य आहे?"
**10**येशू म्हणाला, "तुम्ही इस्राएलाचे प्रमुख शिक्षक आहात.
तरीही तुम्हांला या गोष्टी कळत नाहीत काय? **11**मी तुम्हांला
खरे तेच सांगतो. आम्हांला जे माहीत आहे त्याविषयी
आम्ही बोलतो. जे पाहिले त्याविषयी आम्ही सांगतो. परंतु
आम्ही जे सांगतो ते तुम्ही लोक मानीत नाही. **12**मी तुम्हांला
जगातील गोष्टींविषयी सांगितले पण तुमचा माझ्यावर
विश्वास बसत नाही. मग जर मी तुम्हांला स्वर्गातील
गोष्टींविषयी सांगितले तर तुम्ही विश्वास ठेवणारच नाही!
**13**मनुष्याचा पुत्र असा एकमेव आहे जो वर स्वर्गात जेथे
होता तेथे गेला आणि स्वर्गातून उतरून खाली आला."
**14**"मोशेने अरण्यात असताना सापाला उंच केले.*
मनुष्याच्या पुत्रालाही तसेच उंच केले पाहिजे. **15**अशासाठी
की जो कोणी मनुष्याच्या पुत्रावर विश्वास ठेवतो त्याला
अनंतकाळचे जीवन मिळू शकते."
**16**होय, देवाने जगावर एवढी प्रीति केली की त्याने
आपला एकुलता एक पुत्र दिला. देवाने आपला पुत्र यासाठी
दिला की, जो कोणी त्याच्यावर विश्वास ठेवतो त्याचा
नाश होऊ नये तर त्याला अनंतकाळचे जीवन मिळावे.
**17**देवाने आपल्या पुत्राला जगात पाठविले. जगाचा न्याय
करण्यासाठी देवाने आपला पुत्र पाठविला नाही, तर
आपल्या पुत्राद्वारे जगाचे तारण व्हावे यासाठी देवाने त्याला
जगात पाठविले. **18**जो कोणी देवाच्या पुत्रावर विश्वास
ठेवतो त्याचा न्याय (दोषी ठरविले जाणे) होणार नाही.
परंतु जो विश्वास ठेवीत नाही त्याचा न्याय झाल्यासारखाच
आहे. कारण त्याने देवाच्या एकुलत्या एका पुत्रावर विश्वास
ठेवला नाही. **19**ज्या वस्तुस्थितीच्या आधारे लोकांचा न्याय
केला जातो ती ही जगामध्ये प्रकाश आला परंतु लोकांना
प्रकाश नको होता. त्यांना अंधार पाहिजे होता. कारण
लोक वाईट कृत्ये करीत होते. **20**वाईट कृत्ये करणारा
प्रत्येक जण प्रकाशाचा द्वेष करतो. तो प्रकाशाकडे येत
नाही. कारण त्याने केलेली सर्व वाईट कृत्ये तो प्रकाश
उघड करील. **21**परंतु जो सत्य मार्गाने चालतो तो
प्रकाशाकडे वळतो. आणि त्याने केलेली कामे देवाकडून
झाली होती हे तो प्रकाश दाखवून देईल. *

## येशू आणि बाप्तिस्मा करणारा योहान

**22**त्यानंतर येशू आणि त्याचे शिष्य यहूदीया प्रांतात गेले.
तेथे येशू आपल्या शिष्यांसह राहिला आणि लोकांचे
बाप्तिस्मे केले. **23**योहान हा एनोन गावात लोकांचा
बाप्तिस्मा करीत असे. एनोन गाव शालिमनगराजवळ
आहे. तेथे भरपूर पाणी असल्याने योहान लोकांचा बाप्तिस्मा
तेथे करीत असे. बाप्तिस्मा करून घेण्यासाठी लोक तेथे
येत असत. **24**(योहान तुरूंगात जाण्याच्या अगोदर हे घडले.)
**25**योहानाच्या काही शिष्यांचा दुसऱ्या यहूदी लोकांशी
वादविवाद झाला. नियमशास्त्रात सांगितलेल्या
शुद्धीकरणाच्या विधीविषयी ते वाद घालीत होते. **26**म्हणून
ते शिष्य योहानाकडे आले व म्हणाले, रब्बी, यार्देन नदीच्या
पलीकडे जो मनुष्य तुमच्याबरोबर होता तो आठवतो?
तुम्ही त्याच्याविषयी साक्ष देखील दिली. तो मनुष्य लोकांना
बाप्तिस्मा देत आहे. व पुष्कळजण त्याच्याकडे जात आहेत.
**27**योहानाने उत्तर दिले, "देव जे देतो तेच माणसाला
मिळते. **28**मी हे सांगताना तुम्ही स्वत:च ऐकले आहे की,
'मी ख्रिस्त नाही. त्याच्याकरिता मार्ग तयार करण्यासाठी
देवाने ज्याला पुढे पाठविले तो मी आहे.' **29**ज्याला वधू
असते तो वर असतो. वराला मदत करणारा वराचा मित्र
वराची वाट पाहतो आणि वेगळ्या आवाजामुळे त्याच्या
येण्याची चाहूल लागते काय, ते कान देऊन ऐकतो. वराची
वाणी आली म्हणजे त्याच्या मित्राला आनंद होतो. तसाच
आनंद मला वाटत आहे. आणि माझ्या आनंदाची वेळ
आता आलेली आहे. **30**तो महान व्हावा आणि मी लहान
व्हावे हे योग्यच आहे."

## स्वर्गातून येणारा

**31**"जो (येशू) वरून येतो तो इतर सर्वांहून थोर आहे.
जो मनुष्य या जगापासून आला आहे तो जगाचा आहे. तो
जगातल्याच गोष्टींविषयी बोलतो, परंतु जो स्वर्गातून आला
तो (येशू) इतर लोकांहून थोर आहे. **32**त्याने जे ऐकले व
पाहिले त्याविषयी सांगतो. परंतु तो सांगतो त्या गोष्टी कोणी
स्वीकारीत नाहीत. **33**तो (येशू) जे सांगतो ते मान्य करणारा
माणूस, देव सत्य आहे याचा पुरावाच देतो. **34**देवाने त्याला

---

**मोशेने ... केले** जेव्हा देवाचे लोक साप चावल्यामुळे मरत होते. देवाने मोशेला पितळेचा साप करून एका खांबावर उंच करायला सांगितले. यासाठी की लोकांनी त्याकडे पाहावे व आरोग्य प्राप्त करून घ्यावे. गणना 21:4-9

**वचने 16-21** काही विद्वानांचे मत असे आहे की, ही वचने येशूचे शब्द आहेत. काही म्हणतात ती योहानाने लिहिली.

(येशूला) पाठविले. आणि देव सांगतो त्याच गोष्टींविषयी
तो सांगतो. कारण देव त्याला आत्म्याने पूर्णपणे भरतो.
35पिता पुत्रावर प्रीति करतो. पित्याने सर्व गोष्टींवरील
अधिकार पुत्राला दिलेला आहे. 36जो कोणी पुत्रावर
विश्वास ठेवतो त्याला अनंतकाळचे जीवन मिळते. परंतु
जो पुत्राची आज्ञा पाळीत नाही त्याला अनंतकाळचे जीवन
कधीही मिळणार नाही. उलट देवाचा क्रोध त्याच्यावर
राहतो."

### येशू शोमरोनी स्त्रीशी बोलतो

4 परूश्यांनी हे ऐकले की, येशू योहानापेक्षा अधिक
लोकांना बाप्तिस्मा देऊन शिष्य करून घेत आहे.
2(परंतु खरे पाहता, येशू स्वत: बाप्तिस्मा देत नसे, तर
त्याचे शिष्य त्याच्या वतीने लोकांना बाप्तिस्मा देत असत.)
परूश्यांनी आपणांविषयी ऐकले आहे हे येशूला समजले.
3म्हणून येशू यहूदीयातून निघून परत गालील प्रांतात गेला.
4गालीलाकडे जाताना येशूला शोमरोन प्रांतातून जावे
लागले.

5शोमरोनातील सूखार नावाच्या गावात येशू आला.
याकोबाने आपला मुलगा योसेफ याला दिलेल्या शेताजवळ
हे गाव आहे. 6याकोबाची विहीर तेथे होती. लांबच्या
प्रवासामुळे येशू थकला होता. म्हणून येशू विहीरीजवळ
बसला. ती दुपारची वेळ होती. 7तेव्हा पाणी नेण्यासाठी
एक शोमरोनी* स्त्री त्या विहीरीवर आली. येशू तिला
म्हणाला, "मला प्यावयास पाणी दे." 8हे घडले तेव्हा येशूचे
शिष्य अन्न विकत घेण्यासाठी गावात गेले होते.

9ती शोमरोनी स्त्री म्हणाली, "तुम्ही यहूदी आहात आणि
मी तर एक शोमरोनी स्त्री आहे. तुम्ही माझ्या हातून पाणी
प्यावयास मागता याचे मला मोठे आश्चर्य वाटते." (यहूदी
लोकांचे शोमरोनी लोकांशी सलोख्याचे संबंध नव्हते.*)

10येशूने उत्तर दिले, "देव काय दान देतो याविषयी तुला
माहीत नाही आणि तुझ्या हातून पाणि मागणारा कोण हे
देखील तुला माहीत नाही. तुला जर या गोष्टी माहीत
असत्या तर तूच माझ्याकडे मागितले असतेस. आणि मी
तुला जिवंत पाणी दिले असते."

11ती स्त्री म्हणाली, "महाराज, जिवंत पाणी तुम्हांला
कोठून मिळणार? विहीर तर फार खोल आहे. आणि
पाणी काढण्यासाठी तुमच्याजवळ पोहरा वगैरे काही नाही.
12आमचा पिता (पूर्वज) याकोब याच्यापेक्षाही तुम्ही मोठे
आहात काय? याकोबानेच ही विहीर आम्हांला दिली. ते
स्वत: या विहीरीचे पाणी पीत असत. शिवाय त्यांची मुले
व गुरेढोरे याच विहीरीचे पाणी पीत असत."

13येशू म्हणाला, "जो कोणी हे पाणी पिईल त्याला पुन्हा
तहान लागेल. 14परंतु मी जे पाणी देतो ते पाणी जो पिईल
त्याला कधीही तहान लागणार नाही. मी दिलेले पाणी
त्याच्या अंतर्यामी जिवंत पाण्याच्या झऱ्यासारखे होईल.
त्या पाण्यामुळे त्याला अनंतकाळचे जीवन मिळेल."

15ती स्त्री येशूला म्हणाली, महाराज, "ते पाणी मला द्या,
म्हणजे मला पुन्हा तहान लागणार नाही. आणि पाणी
आणण्यासाठी मला इकडे परत यावे लागणार नाही."

16येशूने तिला सांगितले, "जा, तुझ्या पतीला घेऊन
इकडे ये!"

17ती स्त्री म्हणाली, "मला पती नाही." येशू तिला म्हणाला,
"हे तू बरोबर सांगितलेस की, तुला नवरा नाही. 18खरे
तर तुझे पाच पती झाले. आणि आता तू ज्याच्याबरोबर
राहतेस तो तुझा पती नाही. तेव्हा तू मला सत्यच सांगितलेस."

19ती स्त्री म्हणाली, "महाराज, मला आता कळले की,
तुम्ही एक संदेष्टा आहात. 20आमचे वाडवडील या डोंगरावर
उपासना करीत. परंतु तुम्ही यहूदी लोक म्हणता की,
यरुशलेम हीच ती जागा आहे जेथे लोकांनी उपासना
केली पाहिजे."

21येशू म्हणाला, "बाई, माझ्यावर विश्वास ठेव! अशी
वेळ येत आहे की, आपल्या पित्याची (देवाची) उपासना
करण्यासाठी यरुशलेमला अगर या डोंगरावर जाण्याची
गरज पडणार नाही. 22जे तुम्हांला समजत नाही त्याची
तुम्ही शोमरोनी उपासना करता. आम्ही यहूदी लोक
कशाची उपासना करतो हे आम्हांला चांगले कळते, कारण
यहूदी लोकांकडूनच तारण येते. 23असा काळ येत आहे
की, खरे उपासक आत्म्याने व खरेपणाने पित्याची उपासना
करतील. तशी वेळ आता आलेली आहे. आणि तशाच
प्रकारचे उपासक पित्याला पाहिजेत. 24देव आत्मा आहे.
म्हणून त्याच्या उपासकांनी आत्म्याने व खरेपणाने त्याची
उपासना केली पाहिजे."

25ती स्त्री म्हणाली, "मशीहा येणार आहे हे मला माहीत
आहे. मशीहा येईल तेव्हा तो आम्हांला प्रत्येक गोष्ट
समाजावून सांगेल." 26येशू म्हणाला, "ती व्यक्ति तुझ्याशी
आता बोलत आहे. मीच तो मशीहा आहे."

27तेवढ्यात येशूचे शिष्य गावातून परत आले. येशू एका
बाईशी बोलत आहे हे पाहून त्यांना आश्चर्य वाटले. परंतु
"तुम्हांला काय पाहिजे?" अगर "तुम्ही तिच्याशी का बोलत
आहात?" असे त्यांच्यापैकी एकानेही विचारले नाही.

28मग ती स्त्री आपली पाण्याची घागर तशीच विहिरीवर
सोडून परत गावात गेली. तिने गावांतील लोकांना सांगितले,
29एका मनुष्याने मी आतापर्यंत जे काही केलेले आहे ते
सर्व सांगितले. त्याला भेटायला चला. कदाचित तो ख्रिस्त
असेल.

30मग लोक गावातून बाहेर पडले आणि येशूला भेटायला
आले. 31ती स्त्री गावात होती तेव्हा येशूचे शिष्य त्याला
विनवणी करू लागले, "गुरुजी, दोन घास खाऊन घ्या!"

---

**शोमरोनी** हे लोक शोमरोन प्रांताचे. हे काही प्रमाणात यहूदी होते. परंतु यहूदी तसे त्यांना स्वीकारीत नव्हते.

**यहूदी ... नव्हते** याचा असाही अर्थ होऊ शकतो की, शोमारोनी लोक ज्या वस्तु वापरीत त्या वस्तू यहूदी लोक वापरीत नसत.

32परंतु येशूने उत्तर दिले, "माझ्याजवळ खावयाला जे
अन्न आहे त्याविषयी तुम्हांला काहीच माहिती नाही."
33म्हणून शिष्य एकमेकांना विचारू लागले, "येशूला
कोणीतरी अगोदरच काही खावयास आणून दिले काय?"
34येशू म्हणाला, "ज्याने मला पाठविले त्याच्या इच्छेप्रमाणे
करणे हेच माझे अन्न! त्याने मला दिलेले काम पूर्ण
करणे हेच माझे अन्न होय. 35जेव्हा तुम्ही पेरणी करता
तेव्हा तुम्ही नेहमी म्हणता, 'पीक गोळा करायला अजून
चार महिने आहेत.' परंतु मी तुम्हांला सांगतो, तुम्ही तुमचे
डोळे उघडा. लोकांकडे पाहा. पीक तयार असलेल्या
शेतांसारखेच ते आहेत. 36आताही पीक कापणाऱ्या
मजुराला मजुरी दिली जात आहे. तो अनंतकाळासाठी
पीक गोळा करीत आहे. म्हणून आता पेरणी करणारा
कापणी करणारासह आनंदी आहे. 37'एक पेरणी करतो
तर दुसरा कापणी' असे जे आपण म्हणतो ते किती खरे
आहे. 38ज्या पीकासाठी तुम्ही मेहनत केली नाही, त्याची
कापणी करण्यासाठी मी तुम्हांस पाठविले. दुसऱ्या लोकांनी
काम केले आणि त्यांनी केलेल्या श्रमाचा फायदा तुम्हांस
मिळतो."

39त्या गावातील पुष्कळ शोमरोनी लोकांनी येशूवर
विश्वास ठेवला. त्या स्त्रीने येशूविषयी जे सांगितले त्यावरून
त्यांनी विश्वास ठेवला. तिने त्यांना सांगितले होते," मी
केलेली प्रत्येक गोष्ट त्याने मला सांगितली." 40शोमरोनी
लोक येशूकडे आले. त्यांनी येशूला त्यांच्याबरोबर
राहण्याची विनंती केली. म्हणून येशू तेथे दोन दिवस
राहिला. 41आणखी पुष्कळ लोकांनी येशूच्या शिक्षणामुळे
विश्वास ठेवला. 42ते लोक त्या स्त्रीला म्हणाले, "पहिल्यांदा
तू जे आम्हांला सांगितलेस त्यामुळे आम्ही येशूवर विश्वास
ठेवला. परंतु आता आम्ही स्वत:च त्याचे बोलणे ऐकले
त्यामुळे विश्वास ठेवतो. आता आम्हांला कळले की,
खरोखर हाच मनुष्य जगाचे तारण करील."

## येशू अधिकाऱ्याच्या मुलाला बरे करतो

*(मत्तय 8:5-13; लूक 7:1-10 )*

43दोन दिवसांनी येशू तेथून निघाला आणि गालील
प्रांतात गेला. 44(पूर्वीच येशू म्हणाला होता की, संदेष्ट्याला
त्याच्या देशात मान मिळत नाही.) 45येशू जेव्हा गालीलात
आला तेव्हा तेथील लोकांनी त्याचे स्वागत केले. वल्हांडण
सणाच्या दिवसात यरुशलेम येथे येशूने केलेली सर्व कामे
लोकांनी पाहिली होती. कारण ते लोकही सणानिमित्त
तेथे गेले होते.

46येशू पुन्हा गालीलातील काना गावाला भेट देण्यास
गेला. काना गावीच येशूने पाण्याचे द्राक्षारसात रूपांतर
केले होते. तेथे राजाचे जे मुख्य अधिकारी होते त्यापैकी
एक अधिकारी कफर्णहूम नगरात राहत होता. या माणसाचा
मुलगा आजारी होता. 47येशू यहूदीयातून आला आहे आणि
आता तो गालीलातच आहे हे त्या अधिकाऱ्याने ऐकले.
म्हणून तो मनुष्य येशूकडे काना गावी गेला. येशूने
कफर्णहूम येथे येऊन आपल्या मुलाला बरे करावे म्हणून
त्याने याचना केली. कारण त्याचा मुलगा जवळजवळ
मेला होता. 48येशू त्याला म्हणाला, "चमत्कार आणि
अद्भुत कामे पाहिली तरच तुम्ही लोक माझ्यावर विश्वास
ठेवाल."

49राजाचा अधिकारी म्हणाला, "महाराज, माझा लहान
मुलगा मरण्यापूर्वी माझ्या घरी चला.

50येशूने उत्तर दिले, "जा, तुझा मुलगा वाचेल."

येशूने सांगितले त्यावर विश्वास ठेवून तो मनुष्य घरी
गेला. 51तो घरी चाललेला असताना वाटेतच त्याचे नोकर
त्या माणसाला भेटले. त्यांनी त्याला सांगितले, "तुमचा
मुलगा बरा आहे."

52त्या मनुष्याने विचारले, "माझ्या मुलाला कधीपासून
बरे वाटू लागले ?"

नोकर म्हणाले, "काल दुपारी एक वाजण्याच्या सुमारास
त्याचा ताप उतरला."

53"तुझा मुलगा वाचेल" असे एक वाजण्याच्या सुमारासच
येशूने सांगितले होते, हे त्या मुलाच्या वडिलांना माहीत
होते. म्हणून त्याने व त्याच्या घरातील सर्वांनी येशूवर
विश्वास ठेवला. 54यहुदीयातून गालील प्रांतात आल्यानंतर
येशूने केलेला हा दुसरा चमत्कार.

## तळ्याकाठच्या रोग्याला येशू बरे करतो

5 नंतर एका यहुदी सणासाठी येशू यरुशलेमला गेला.
2यरुशलेमात एक तळे आहे. त्या तळ्याला लागून
पाच पडव्या आहेत. (होत्या) यहूदीभाषेत* त्या तळ्याला
बेथेझाथा* म्हणत. हे तळे मेंढरे नावाच्या वेशीजवळ
आहे. 3तळ्यालगतच्या पडव्यामध्ये अनेक रोगी पडून
असत. त्यात काही आंधळे, लंगडे व काही पांगळे होते.*
4कारण की देवदूत वेळोवेळी तळ्यात उतरून पाणी हालवीत
असे आणि पाणी हालविल्यानंतर प्रथम जो त्यात जाई
त्याला कोणताही रोग असेला तरी तो बरी होत असे.
5तेथे अडतीस वर्षे आजारी असलेला एक रोगी पडून
होता. 6येशूने त्याला तेथे पडलेले पाहिले. तो मनुष्य तेथे
बराच काळ पडून असावा हे येशूने ओळखले. म्हणून
येशूने त्या मनुष्याला विचारले, "तुला बरे व्हावयाला पाहिजे
का?"

---

**यहूदी भाषा** अरेमी, (हिब्रु) भाषा, पहिल्या शतकात.

**बेथेझाथा** बेथसैदा किंवा बेतेस्दा असेही म्हणतात.

**वचन 3** काही ग्रीक आवृत्त्यांत असे लिहिले आहे, 'आणि ते पाणी हलण्याची वाट पाहू लागले.' काही नंतरच्या आवृत्यांमध्ये चवथे वचन असे ही लिहिले आहे. 'काही वेळा देवाचा दूत तळ्याकाठी येई व पाणी हलवी. देवाच्या दूताने असे केल्यानंतर जो कोणी रोगी प्रथम उतरत असे त्याला कोणताही रोग असला तरी तो बरा होत असे.

7त्या आजारी मनुष्याने उत्तर दिले, "महाराज, पाणी
हालते तेव्हा त्यात घेऊन जाण्यासाठी माझ्याजवळ कोणीच
व्यक्ति नाही. सर्वांत अगोदर पाण्यात उतरण्यासाठी मी
निघालो की, माझ्या अगोदर दुसराच रोगी पाण्यात उतरतो."
8मग येशू म्हणाला, "उठून उभा राहा! आपली खाट
उचल आणि चालू लाग." 9तेव्हा तो रोगी ताबडतोब बरा
झाला, तो आपली खाट उचलून चालू लागला.

हे सर्व ज्या दिवशी घडले तो शब्बाथाचा दिवस होता.
10म्हणून बऱ्या झालेल्या त्या मनुष्याला यहुदी म्हणाले,
"आज शब्बाथाचा दिवस आहे. शब्बाथाच्या दिवशी तू
आपली खाट उचलून नेणे आपल्या नियमशास्त्राच्या विरुद्ध
आहे."

11परंतु तो मनुष्य म्हणाला, "ज्याने मला बरे केले,
त्यानेच मला सांगितले की, तू आपली खाट उचल आणि
चालू लाग."

12यहुदी लोकांनी त्या मनुष्याला विचारले, "तुला आपली
खाट उचलून चालायला कोणी सांगितले?" 13परंतु तो
कोण होता हे त्या बऱ्या झालेल्या माणसाला माहीत नव्हते
त्या ठिकाणी बरेच लोक होते, आणि येशू तेथून निघून
गेला होता.

14त्यानंतर तो मनुष्य येशूला मंदिरात भेटला. तेव्हा
येशू त्याला म्हणाला, "पाहा, आता तू बरा झाला आहेस.
पण पाप करण्याचे सोडून दे. नाही तर तुझे अधिक वाईट
होईल!"

15नंतर तो मनुष्य तेथून निघाला आणि त्या यहूदी
लोकांकडे परत गेला. त्याने त्यांना सांगितले की, ज्याने
त्याला बरे केले तो येशू आहे.

16येशू शब्बाथ दिवशी या गोष्टी करीत होता म्हणून
यहूदी लोक येशूशी दुष्टपणे वागू लागले. 17परंतु येशू
यहूदी लोकांना म्हणाला, "माझा पिता नेहमीच काम करीत
असतो व म्हणून मीही काम करतो".

18यावरून यहूदी लोकांचा येशूला जिवे मारण्याचा पक्का
निश्चय झाला. ते म्हणाले, "पहिली गोष्ट ही की, येशू
शब्बाथासंबंधीचा नियम मोडतो. दुसरे, 'देव माझा पिता
आहे!' असे तो म्हणाला. तो स्वत:ची देवाशी बरोबरी
करतो".

## येशूला देवाचा अधिकार आहे

19परंतु येशूने उत्तर दिले, "मी तुम्हांला खरे सांगतो. पुत्र
जरी सर्व करू शकत असला, तरी पित्याच्या इच्छेला
डावलून एकटा काही करू शकत नाही. पिता करतो त्या
गोष्टी पुत्रही करतो. 20पिता पुत्रावर प्रीति करतो आणि
ज्या गोष्टी पिता करतो त्या सर्व तो पुत्राला दाखवितो. हा
मनुष्य बरा झाला, परंतु यापेक्षाही मोठमोठ्या गोष्टी
करण्याचे पिता पुत्राला दाखवील. तेव्हा तुम्ही सर्व जण
चकित व्हाल. 21पिता लोकांना मेलेल्यांतून उठवितो आणि
जीवन देतो. तसेच पुत्रही त्याला, ज्यांना द्यायला पाहिजे,
त्यांना जीवन देतो. 22याशिवाय, पिता कोणाचाही न्याय
करीत नाही. परंतु न्याय करण्याचा सर्व अधिकार पित्याने
पुत्राला दिलेला आहे. 23देवाने हे अशासाठी केले की,
लोक जसा पित्याचा सन्मान करतात, तसा त्यांनी पुत्राचाही
करावा. जर कोणी पुत्राचा मान राखीत नाही, तर तो
पित्याचाही मान राखीत नाही. पित्यानेच पुत्राला पाठविले
आहे.

24मी तुम्हांला खरे तेच सांगतो : जो माझे ऐकतो आणि
ज्याने मला पाठविले त्याच्यावर विश्वास ठेवतो त्याला
अनंतकालचे जीवन मिळेल. त्याला दोषी ठरविले जाणार
नाही. तर त्याने मरणातून निघून जीवनात प्रवेश केला
आहे. 25मी तुम्हांला खरे सांगतो. अशी महत्त्वाची वेळ येत
आहे. ती वेळ जवळजवळ आलेलीच आहे. जे लोक
पापामध्ये मृत आहेत ते देवाच्या पुत्राची वाणी ऐकतील
आणि देवाच्या पुत्राकडून ऐकलेल्या गोष्टी जे लोक
स्वीकारतील त्यांना अनंतकाळचे जीवन मिळेल. 26खुद्द
पित्यापासून (देवापासून) जीवनाचा लाभ होतो. म्हणून
पित्याने पुत्रालाही जीवन देण्याची देणगी दिली आहे. 27आणि
पुत्राने सर्व लोकांचा न्यायनिवाडा करावा असा अधिकार
पित्याने पुत्राला दिला आहे. कारण तो पुत्र मनुष्याचाही
पुत्र आहे. 28तुम्ही याचे आश्चर्य मानू नका. अशी वेळ
येत आहे की, सर्व लोक जे मेलेले आहेत व आपल्या
कबरेत आहेत ते त्याची वाणी ऐकतील. 29मग ते आपल्या
कबरेतून बाहेर येतील. ज्या लोकांनी आपल्या आयुष्यात
चांगली कामे केली, ते उठतील आणि त्यांना अनंतकाळचे
जीवन मिळेल. परंतु ज्या लोकांनी वाईट कामे केली ते
शिक्षा भोगण्यासाठी उठतील.

## येशू यहूदी लोकांशी बोलणे चालू ठेवतो

30"मी एकटा काहीच करू शकत नाही, मला
सांगितल्याप्रमाणेच मी न्याय करतो, म्हणून माझा न्याय
योग्य आहे. कारण मी स्वत:च्या समाधानासाठी नाही;
परंतु ज्याने मला पाठविले त्याच्या समाधानासाठी
न्याय करतो."

31"जर मी स्वत:च माझ्याविषयी लोकांना सांगितले
तर लोक त्या गोष्टी मानणार नाहीत. 32परंतु लोकांना
याविषयी सांगणारा दुसरा एक जण आहे. आणि तो
माझ्याविषयी ज्या गोष्टी सांगतो त्या खऱ्या आहेत, हे मला
माहीत आहे." 33तुम्ही योहानाकडे काही लोकांना पाठविले
आणि सत्याविषयी त्याने तुम्हांला सांगितलेच आहे.
34माझ्याविषयी लोकांना सांगण्यास मला कोणाही माणसाची
गरज नाही. परंतु तुमचे तारण व्हावे म्हणून मी या
गोष्टी तुम्हांला सांगतो. 35पेटलेला दिवा प्रकाश देतो,
तसाच योहान होता आणि तुम्हांला त्याच्या प्रकाशाकडून
काही काळ आनंद मिळाला."

36"परंतु मजजवळ माझ्याविषयी योहानापेक्षाही मोठा
पुरावा आहे. जी कामे मी करतो तीच माझा पुरावा आहेत.

या गोष्टी माझ्या पित्याने मला करण्यासाठी दिलेल्या आहेत.
त्या गोष्टींवरून हे सिद्ध होते की, पित्याने मला पाठविले
आहे. 37आणि ज्या पित्याने मला पाठविले त्याने
स्वत:ही माझ्याविषयी साक्ष दिलेली आहे. परंतु तुम्ही त्याची
वाणी कधीही ऐकली नाही. तो कसा दिसतो हे तुम्ही
कधी पाहिले नाही. 38पित्याची शिकवण तुमच्यामध्ये राहात
नाही. कारण पित्याने ज्या एकाला तुमच्याकडे पाठविले
त्याच्यावर तुम्ही विश्वास ठेवीत नाही. 39तुम्ही शास्त्राचा
काळजीपूर्वक अभ्यास करता. त्या शास्त्राच्या द्वारे
आपल्याला अनंतकाळचे जीवन मिळते, असे तुम्हांला
वाटते, तेच शास्त्र माझ्याविषयी सांगते! 40तरी तुम्ही
अनंतकालचे जीवन मिळण्यासाठी मजकडे येण्यास नकार
देता."

41"मला माणसांकडून स्तुति नको. 42पण मी तुम्हांला
ओळखतो– तुम्हांमध्ये देवाविषयी प्रीति नाही हे मला माहीत
आहे. 43मी माझ्या पित्यापासून आलो आहे– मी
त्याच्यावतीने बोलतो. परंतु तरीही तुम्ही मला स्वीकारीत
नाही. पण जर दुसरा कोणी मनुष्य फक्त स्वत:विषयी
सांगत आला, तर मात्र तुम्ही त्याचे मानाल. 44तुम्हांला
एकमेकांकडून स्तुति करवून घ्यायला आवडते. परंतु
एकाच देवाकडून होणारी स्तुति मिळविण्याचा प्रयत्न तुम्ही
कधी करीत नाही. मग तुम्ही माझ्यावर कसा काय विश्वास
ठेवाल? 45मी पित्यासमोर उभा राहून तुम्हांला दोषी ठरवीन
असे समजू नका. तुमचे चुकते असे मोशेच तुम्हांला
म्हणतो, आणि मोशे आपले तारण करील अशी तुम्हांला
आशा आहे. 46जर तुम्ही खरोखरच मोशेवर विश्वास
ठेवला आहे, तर तुम्ही माझ्यावरही विश्वास ठेवाल. कारण
खुद्द मोशेनेच माझ्याविषयी लिहिले आहे. 47परंतु मोशेने
जे लिहिले आहे त्याच्यावर तुम्ही विश्वास ठेवीत नाही,
तर मी सांगतो त्या गोष्टींवर तुम्ही विश्वास ठेवू शकणारच
नाही."

## येशू पाच हजारांहून अधिक लोकांना खावयास देतो

***(मत्तय 14:13-21; मार्क 6:30-44; लूक 9:10-17)***

6 नंतर येशू गालील (किंवा तिबिर्या) सरोवराच्या
पलीकडे गेला. 2तेव्हा पुष्कळ लोक येशूच्या मागे
गेले. कारण येशूने अनेक आजारी लोकांना बरे केले. व
निरनिराळ्या मार्गांनी आपले जे सामर्थ्य दाखविले ते
लोकांनी पाहिले. म्हणून ते त्याच्यामागे गेले. 3मग येशू
टेकडीच्या वर चढून गेला. तो आपल्या शिष्यांसह तेथे
बसला. 4त्याच सुमारास यहूदी लोकांचा वल्हांडण सण
जवळ आला होता.

5येशूने नजर वर करून पाहिले तो लोकांचा मोठा
समुदाय आपणांकडे येताना त्याला दिसला. येशू फिलिप्पाला
म्हणाला, "आपण या लोकांना पुरेशा भाकरी कोठून
विकत आणाव्या बरे?" 6(फिलिप्पची परीक्षा पाहण्यासाठी
येशूने त्याला हा प्रश्न विचारला, कारण आपण काय
करायचे याचा विचार येशूने अगोदरच करून ठेवला
होता.)

7फिलिप्पने उत्तर दिले, "येथील प्रत्येकाला थोडी थोडी
भाकर दिली तरी या सर्वांना पुरेशा भाकर विकत
घेण्यासाठी आपणा सर्वांना महिनाभर काम करावे लागेल."
8आंद्रिया नावाचा दुसरा एक शिष्य तेथे होता. आंद्रिया
हा शिमोन पेत्राचा भाऊ होता. 9आंद्रिया म्हणाला, "येथे
असलेल्या एका लहान मुलाजवळ जवाच्या पाच भाकरी
आणि दोन लहान मासे आहेत. परंतु इतक्या लोकांना त्या
पुरणार नाहीत."

10येशू म्हणाला, "लोकांना खाली बसण्यास सांगा." ती
बरीच गवताळ अशी जागा होती. तेथे खाली बसलेले
सुमारे पाच हजार पुरुष होते. 11मग येशूने त्या भाकरी
हातात घेतल्या; येशूने भाकरीबद्दल देवाचे उपकार मानले
आणि त्या तेथे बसलेल्या लोकांना दिल्या. मासे घेऊन
त्याने तसेच केले. येशूने लोकांना पाहिजे तितके खाऊ
दिले. 12सर्व लोकांना खाण्यासाठी भरपूर होते. जेवण
झाल्यावर येशू त्याच्या शिष्यांना म्हणाला, "लोकांनी खाऊन
उरलेले भाकरींचे व माशांचे तुकडे गोळा करा. काहीही
वाया जाऊ देऊ नका."

13म्हणून शिष्यांनी उरलेले तुकडे जमा केले. लोकांनी
जेवायला सुरूवात केली, तेव्हा जवाच्या फक्त पाच भाकरी
तेथे होत्या. शिष्यांनी उरलेल्या तुकड्यांच्या बारा टोपल्या
भरल्या.

14येशूने केलेला हा चमत्कार लोकांनी पाहिला, तेव्हा
ते म्हणाले, "जगात येणारा संदेष्टा तो खरोखर हाच असला
पाहिजे."

15आपण राजा बनावे असे लोकांना वाटते हे येशूला
माहीत होते. येशूला आपला राजा करावे असा बेत लोकांनी
केला. तेव्हा येशू तेथून निघून एकटाच डोंगराळ भागात
गेला.

## येशू पाण्यावरून चालतो

***(मत्तय 14:22-27; मार्क 6:45-52)***

16त्या संध्याकाळी येशूचे शिष्य (गालील) सरोवराकडे
गेले. 17शिष्य एका नावेत बसून सरोवरापलीकडील
कफर्णहूम नगराकडे निघाले. आता अंधार पडला होता
आणि येशू अजून त्यांच्याकडे आलेला नव्हता. 18वारा
फारच जोराने वाहत होता आणि सरोवरात मोठमोठ्या
लाटा उसळू लागल्या होत्या. 19त्यांनी नाव तीन ते चार
मैल वल्हवीत नेली तेव्हा त्यांना येशू नावेकडे येताना
दिसला. तो सरोवराच्या पाण्यावरून चालत होता. तो
नावेकडेच येत होता. तेव्हा शिष्य घाबरले. 20परंतु येशू
त्यांना म्हणाला, "मी आहे, भिऊ नका." 21येशू असे
बोलल्यावर त्यांनी आनंदाने येशूला नावेत घेतले. आणि
त्यांना जायचे होते त्या ठिकाणी नाव लगेच येऊन काठाला
लागली.

## लोक येशूला शोधतात

22दुसरा दिवस उजाडला. काही लोक सरोवराच्या दुसऱ्या
काठावर राहिले होते. त्या लोकांना माहीत होते की, येशू
शिष्यांबरोबर नावेतून गेलेला नव्हता. त्यांना समजले की,
येशूचे शिष्य नावेत बसून निघून गेलेत आणि तेथे असलेली
तेवढीच एक नाव होती हेही त्यांना ठाऊक होते. 23पण
मग तिबिर्याहून आणखी काही नावा आल्या. आदल्या
दिवशी ज्या ठिकाणी लोकांनी अन्न खाल्ले त्या ठिकाणी
त्या नावा येऊन काठाला लागल्या. प्रभू येशूने देवाचे
उपकार मानल्यावर लोकांनी भाकरी खाल्ल्या तीच ही
जागा होती. 24आता येशू किंवा त्याचे शिष्य तेथे नाहीत हे
लोकांनी पाहिले. म्हणून लोक नावांमध्ये बसले आणि
कफर्णहूमला गेले. त्यांना येशूला शोधायचे होते.

## येशू जीवनाची भाकर

25लोकांना येशू सरोवराच्या दुसऱ्या काठावर भेटला.
लोक म्हणाले, "गुरूजी, तुम्ही इकडे कधी आलात?"

26येशूने उत्तर दिले, "तुम्ही माझा शोध का करता?
माझे सामर्थ्य सिद्ध करणारे चमत्कार पाहिले म्हणून तुम्ही
माझा शोध करता का? मी तुम्हांस खरे सांगतो, तुम्ही
मला शोधता, कारण तुम्ही भाकरी खाल्ल्या आणि तुमची
तृप्ती झाली. 27ऐहिक अन्न नाश पावते. म्हणून नाश
पावणाऱ्या अन्नासाठी कष्ट करू नका. परंतु जे अन्न
कायम टिकते आणि अनंतकाळचे जीवन देते, अशा
अन्नासाठी तुम्ही कष्ट करा. मनुष्याचा पुत्र ते अन्न तुम्हांला
देईल. देव जो पिता याने दाखवून दिले आहे की, तो
मनुष्याच्या पुत्राबरोबर आहे.

28लोकांनी येशूला विचारले, "आम्ही कोणत्या गोष्टी
कराव्यात अशी देवाची इच्छा आहे?"

29येशूने उत्तर दिले, "तुम्ही जे काम करावे अशी देवाची
इच्छा आहे, ते हेच की, देवाने ज्याला पाठविले, त्याच्यावर
तुम्ही विश्वास ठेवावा."

30मग लोक येशूला म्हणाले, "देवाने तुम्हांलाच पाठविले
आहे हे पटविण्यासाठी तुम्ही कोणता चमत्कार कराल?
तुम्हांला एखादा चमत्कार करताना जर आम्ही पाहिले
तर आम्ही तुमच्यावर विश्वास ठेवू. तुम्ही काय कराल?
31अरण्यात आमच्या पूर्वजांनी देवाने दिलेला मान्ना खाल्ला.
पवित्र शास्त्रात असे लिहिले आहे की, देवाने त्यांना
स्वर्गातील भाकर खायला दिली."

32येशू म्हणाला, "मी तुम्हांला खरे सांगतो. मोशेने तुमच्या
लोकांना स्वर्गातील भाकर दिली नाही. माझा पिता तुम्हांला
खरी स्वर्गीय भाकर देतो. 33देवाची भाकर कोणती? देवाची
भाकर म्हणजे जो स्वर्गातून खाली उतरतो आणि जगाला
जीवन देतो, तोच ती भाकर."

34ते लोक येशूला म्हणाले, "महाराज, आम्हांला हीच
भाकर नेहमी द्या."

35मग येशू म्हणाला, "मीच ती जीवनाची भाकर आहे.
जो माझ्याकडे येतो त्याला कधीही भूक लागणार नाही.
आणि जो माझ्यावर विश्वास ठेवतो त्याला कधीही तहान
लागणार नाही. 36मी तुम्हांला पूर्वीच सांगितले की, तुम्ही
मला पाहिले, तरीही विश्वास ठेवीत नाही. 37पिता माझे
लोक मला देतो. त्यातील प्रत्येकजण माझ्याकडे येईल
आणि माझ्याकडे येणाऱ्या प्रत्येकाला मी स्वीकारीन. 38मी
स्वर्गातून खाली आलो, ते नेहमीच देवाच्या इच्छेप्रमाणे
करण्यास आलो आहे. मला पाहिजे ते करायला मी आलो
नाही. 39देवाने मला दिलेल्या लोकांपैकी एकालाही मी
गमवू नये. परंतु त्या सर्वांना मी शेवटच्या दिवशी जिवंत
असे उठवायला हवे. ज्याने मला पाठविले त्याची मी हेच
करावे अशी इच्छा आहे. 40पुत्राला पाहून त्याच्यावर
विश्वास ठेवणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला अनंतकाळचे जीवन
आहे. मी त्या व्यक्तीला शेवटच्या दिवशी उठवीन. हेच
माझ्या पित्याला हवे."

41मग यहुदी लोक येशूविरुद्ध कुरकुर करू लागले.
कारण "स्वर्गातून खाली आलेली भाकर मी आहे" असे
तो म्हणाला. 42यहूदी लोक म्हणाले, "हा येशू आहे. आपण
त्याच्या आईवडिलांना ओळखतो. येशू तर योसेफाचाच
पुत्र आहे. 'मी स्वर्गातून खाली आलो आहे' असे तो कसे
काय म्हणू शकतो?"

43पण येशूने उत्तर दिले, "आपापसात कुरकूर करू
नका. 44पित्यानेच मला पाठविले आहे. पिताच लोकांना
माझ्याकडे पाठवितो. त्या लोकांना मी शेवटच्या दिवशी
परत उठवीन. पित्याने जर एखाद्या व्यक्तीला आकर्षित
केले नाही, तर ती व्यक्ति माझ्याकडे येऊ शकत नाही.
45संदेष्टयांनी असे लिहिले आहे की, 'देव सर्व लोकांना
शिक्षण देईल.'* लोक देवाचे ऐकतात आणि त्याच्याकडून
शिक्षण घेतात, तेच लोक माझ्याकडे वळतात. 46देवाने
ज्याला पाठविले त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणीही देवाला
पाहिले नाही. फक्त त्यानेच देवाला पाहिले आहे. 47मी
तुम्हांला खरे तेच सांगतो, "जो विश्वास ठेवतो त्याला
अनंतकाळचे जीवन मिळाले आहे. 48मी जीवन देणारी
भाकर आहे. 49तुमच्या वाडवडिलांनी अरण्यांत असताना
देवाने दिलेला मान्ना खाल्ला. परंतु इतर सर्व लोकांप्रमाणेच
ते मरण पावले. 50जी स्वर्गातून उतरते ती भाकर मी
आहे. जर ही भाकर कोणी खाईल तर तो कधीच मरणार
नाही. 51स्वर्गातून खाली उतरलेली जिवंत भाकर मी
आहे. जर कोणी ती भाकर खाईल तर तो अनंतकाळासाठी
जिवंत राहील. आणि ती भाकर म्हणजे माझे शरीर आहे.
जगातील लोकांना जीवन मिळावे मी माझे शरीर देईन."

52नंतर यहूदी आपापसात वाद घालू लागले. ते म्हणाले,
"हा मनुष्य आपले स्वत:चे शरीर आम्हांला कसे काय
खायला देऊ शकेल?"

---

**देव ... देईल** यशया 54:13

53येशू म्हणाला, "मी तुम्हांला खरे सांगतो, तुम्ही
मनुष्याच्या पुत्राचे शरीर खाल्ले पाहिजे आणि त्याचे रक्त
प्याले पाहिजे. जर तुम्ही हे करणार नाही, तर तुमच्यात
खरे जीवन नाही. 54जो कोणी माझे शरीर खातो आणि
माझे रक्त पितो, त्याला अनंतकाळचे जीवन मिळेल.
शेवटच्या दिवशी मी त्याला उठवीन. 55माझे शरीर खरे
अन्न आहे आणि माझे रक्त खरे पेय आहे. 56जो माझे
शरीर खातो आणि माझे रक्त पितो तो माझ्यात राहतो
आणि मी त्याच्यामध्ये राहतो. 57पित्याने मला पाठविले.
तो जिवंत आहे आणि पित्यामुळे मीही जगतो. म्हणून जो
कोणी मला खातो तो माझ्यामुळे जिवंत राहील. 58आपल्या
वाडवडिलांनी अरण्यांत जी भाकर खाल्ली, त्या
भाकरीसारखा मी नाही. त्यांनी ती भाकर खाल्ली परंतु
इतर सर्व लोकांप्रमाणेच ते मरून गेले. मी स्वर्गातून
उतरलेली भाकर आहे. जो कोणी ही भाकर खातो तो
अनंतकाळ जगेल."

59कफर्णहूम नगरातील सभास्थानात शिक्षण देताना
येशूने या सर्व गोष्टी सांगितल्या.

## अनंतकाळच्या जीवनाचे शब्द

60येशूच्या शिष्यांनी हे ऐकले. त्यांपैकी अनेकजण
म्हणाले, "हे शिक्षण स्वीकारण्यास फार कठीण आहे.
कोण हे शिक्षण मान्य करील?"

61आपले शिष्य याविषयी कुरकूर करीत आहेत, हे
येशूने ओळखले. म्हणून तो त्यांना म्हणाला, "ही शिकवण
तुम्हांला त्रासदायक वाटेल काय? 62तर मग मनुष्याचा
पुत्र जेथून आला तेथे परत जाताना पाहून तुम्हांला तसेच
त्रासदायक वाटेल काय? 63शरीराद्वारे मनुष्याला जीवन
मिळत नाही. परंतु आत्म्याकडून ते जीवन मिळते. मी
तुम्हांला सांगितलेल्या गोष्टी आत्म्याविषयी आहेत. म्हणूनच
या गोष्टीपासून जीवन मिळते. 64परंतु तुमच्यातील काहीजण
विश्वास ठेवीत नाहीत." जे लोक विश्वास ठेवीत नव्हते,
ते येशूला माहीत होते. येशूला हे अगदी सुरूवातीपासूनच
माहीत होते. आणि जो मनुष्य त्याचा विश्वासघात करणार
होता, तोही त्याला माहित होता. 65येशू म्हणाला, "म्हणूनच
मी तुम्हांला म्हटले की, जर पिता एखाद्या व्यक्तीला
माझ्याकडे येऊ देत नसेल तर ती व्यक्ति येणारच नाही."

66येशूने हे सर्व सांगितल्यावर त्याच्या शिष्यांपैकी बरेच
जण त्याला सोडून गेले; येशूच्या मागे जाण्याचे त्यांनी
सोडून दिले.

67नंतर येशूने आपल्या बारा शिष्यांना विचारले,
"तुम्हांलासुद्धा मला सोडून जावेसे वाटते काय?"

68शिमोन पेत्राने उत्तर दिले, "प्रभुजी आम्ही कोठे जाणार?
अनंतकालच्या जीवनाची वचने तर तुमच्याजवळ आहेत.
69आम्ही तुमच्यावर विश्वास ठेवतो. तुम्ही पवित्र व्यक्ति
आहात हे आम्हांला माहीत आहे."

70मग येशूने उत्तर दिले, "तुम्हा बारा जणांना मी
निवडले. पण तुमच्यातील एक सैतान आहे."

71शिमोन इस्कर्योत याचा मुलगा यहूदा याच्याविषयी
येशू बोलत होता. यहूदा बारा शिष्यांपैकी एक होता. परंतु
पुढे हाच यहूदा येशूच्या विरुद्ध उठणार होता.

## येशू आणि त्याचे भाऊ

7 यानंतर येशू गालील प्रांतात फिरला. येशूला यहूदीया
प्रांतातून प्रवास करायला नको होता, कारण तेथील
काही यहूदी लोकांना येशूला जिवे मारायचे होते. 2यहूदी
लोकांचा मंडपाचा सण* जवळ आला होता. 3म्हणून
येशूचे भाऊ त्याला म्हणाले, "तू येथून सणासाठी यहूदीयात
जा. म्हणजे तू करतोस ते चमत्कार तेथे तुझे शिष्य पाहू
शकतील. 4लोकांना माहिती व्हावी असे एखाद्याला वाटत
असेल तर त्याने तो करतो ती कामे लपवू नयेत. तू
जगाला प्रगट हो. तू जे चमत्कार करतोस ते त्यांना पाहू
दे." 5येशूच्या भावांनीसुद्धा त्याच्यावर विश्वास ठेवला नाही.
6येशू आपल्या भावांना म्हणाला, "माझी योग्य वेळ अजून
आलेली नाही. पण तुम्ही जाण्यासाठी मात्र कोणतीही वेळ
योग्य असेल. 7जग तुमचा द्वेष करू शकत नाही. परंतु
जग माझा द्वेष करते. कारण जगातील लोक वाईट कामे
करतात हे मी त्यांना सांगतो. 8तेव्हा तुम्ही सणासाठी जा.
मी आत्ताच सणाला येणार नाही. माझी योग्य वेळ अजून
आली नाही." 9हे सांगितल्यानंतर येशू गालीलातच राहिला.

10म्हणून येशूचे भाऊ सणासाठी तेथून निघून गेले. ते
गेल्यावर मग येशूही गेला. परंतु येशूने हे लोकांना उघडपणे
दाखविले नाही. 11सणाच्या काळात यहूदी लोक येशूचा
शोध करीत होते. यहूदी म्हणाले, "तो मनुष्य कोठे आहे?"

12लोकांचा मोठा जमाव त्या ठिकाणी जमा झालेला
होता. त्यांतील अनेक लोक येशूविषयी आपसांत बोलत
होते. काही म्हणाले, "तो चांगला मनुष्य आहे." परंतु
दुसरे काहीजण म्हणाले, "नाही, तो लोकांना ठकवितो."
13परंतु लोकांपैकी कोणीच येशूविषयी उघडपणे बोलायला
धजत नव्हते. लोकांना यहूदी पुढाऱ्यांची भीति वाटत होती.

## येशू यरुशलेमात शिक्षण देतो

14अर्धाअधिक सण पार पडला होता तेव्हा येशू मंदिरात
गेला आणि तेथे लोकांना शिक्षण देण्यास त्याने सुरूवात
केली. 15यहूदी लोकांना मोठे आश्चर्य वाटले. ते म्हणाले,
"हा माणूस शाळेत कधी शिकला नाही. हे एवढे तो कोठून
शिकला?"

16येशूने उत्तर दिले, "मी ज्या गोष्टी शिकवितो त्या
माझ्या स्वत:च्या नाहीत. माझी शिकवण मला पाठविणाऱ्या

---

**मंडपाचा सण** यहूदी लोकांचे वाडवडील मोशेच्या काळात
चाळीस वर्षे अरण्यात फिरत राहिले, त्याची आठवण म्हणून
यहूदी लोक दरवर्षी एक आठवडाभर मंडपात राहात.

पित्याकडून आलेली आहे. 17जो देवाच्या इच्छेप्रमाणे करतो
त्याला माझी शिकवण देवाकडून आहे हे कळेल. त्याला
हे कळेल की, माझी शिकवण माझी स्वत:ची नाही. 18जो
कोणी स्वत:च्या कल्पना शिकवितो, तो स्वत:ला
मानसन्मान मिळावा असा प्रयत्न करतो. परंतु ज्याने मला
पाठविले त्याचा सन्मान करण्याचा जो प्रयत्न करतो तोच
माणूस सत्य सांगतो. त्याचे काहीच खोटे नसते. 19मोशेने
तुम्हांला नियमशास्त्र दिले. खरे ना? परंतु तुमच्यातील
कोणी नियमशास्त्र पाळीत नाही. तुम्ही का बरे मला जिवे
मारायला पाहता?"

20लोकांनी उत्तर दिले, "तुम्हांला भूत लागले आहे.
आम्ही काही तुम्हांला जिवे मारण्याचा प्रयत्न करीत नाही."

21येशू त्यांना म्हणाला, "मी एक चमत्कार केला आणि
तुम्ही सारे चकित झालात. 22मोशेने तुम्हांला सुंतेचा नियम
दिला. परंतु खरे पाहता सुंता मोशेपासून आलेली नाही. ती
मोशेच्या आधीच आपल्या पूर्वजांपासून चालत आलेली
आहे. म्हणून कधी कधी शब्बाथ दिवशीही तुम्ही मुलांची
सुंता करता. 23याचा अर्थ मोशेच्या नियमांचे पालन
करण्यासाठी शब्बाथ दिवशीही बालकाची सुंता करता
येते. मग मी शब्बाथ दिवशी एका माणसाचे संपूर्ण शरीर
बरे केले तर तुम्ही माझ्यावर का रागावता? 24वरवर
पाहून न्याय करू नका. तर खरोखर काय बरोबर आहे
याची कसून शहानिशा करून योग्य प्रकारे न्याय करा."

## येशू हाच ख्रिस्त आहे काय? लोकांना पडलेला प्रश्न

25मग यरुशलेमात राहणारे काही लोक म्हणाले, "याच
माणसाला लोक जिवे मारण्याच्या प्रयत्नात आहेत. 26परंतु
सर्व लोक आपल्याला पाहू आणि ऐकू शकतील अशा
ठिकाणी हा शिक्षण देत आहे. आणि शिक्षण देताना त्याला
थांबविण्याचा कोणीही प्रयत्न करीत नाही. कदाचित हा
खरोखरच ख्रिस्त आहे असे पुढारी लोकांनी ठरविले
असेल. 27परंतु हा माणूस कोठून आला आहे हे आपल्याला
माहीत आहे. आणि खरोखरचा ख्रिस्त येईल तेव्हा तो
कोठून येईल हे कोणालाच कळणार नाही."

28अजूनही येशू मंदिरात शिक्षण देत होता. येशू म्हणाला,
"होय, तुम्ही मला ओळखता आणि मी कोठला हेही तुम्हांला
माहीत आहे. परंतु मी स्वत:च्या अधिकाराने आलो नाही.
जो खरा देव आहे त्याने मला पाठविले. तुम्ही त्याला
ओळखीत नाही. 29पण मी त्याला ओळखतो. मी
त्याच्याकडून आलो आणि त्यानेच मला पाठविले."

30येशू हे बोलला तेव्हा लोकांनी त्याला धरण्याचा प्रयत्न
केला, परंतु कोणीही त्याला धरू शकला नाही, कारण
त्याला मारले जाण्याची वेळ अजून आली नव्हती. 31परंतु
लोकांपैकी पुष्कळ जणांनी येशूवर विश्वास ठेवला. लोक
म्हणाले, "आम्ही ख्रिस्ताच्या येण्याची वाट पाहत आहोत.
ख्रिस्त आला तर या मनुष्याने केले त्याहून जास्त चमत्कार
तो करून दाखवील काय? नाही! म्हणून हाच ख्रिस्त
असला पाहिजे."

## यहूदी लोक येशूला अटक करण्याचा प्रयत्न करतात

32लोक येशूविषयी जे बोलत होते ते परूश्यांनी ऐकले.
म्हणून मुख्य याजक आणि परूशी यांनी येशूला अटक
करण्यासाठी मंदिराचे शिपाई पाठविले.

33मग येशू म्हणाला, "मी तुम्हा लोकांबरोबर आणखी
थोडा काळ राहीन. नंतर ज्याने मला पाठविले, त्याच्याकडे
मी परत जाईन. 34तुम्ही माझा शोध कराल पण मी तुम्हांला
सापडणार नाही."

35यहूदी आपापसात म्हणाले, "हा माणूस असा कोठे
जाणार आहे की जेथे आपण त्याला शोधू शकणार नाही?
ग्रीक शहरात राहणाऱ्या यहूदी लोकांकडे हा जाईल काय?
तो तेथील ग्रीक लोकांना शिक्षण देईल काय? 36हा माणूस
म्हणतो, 'तुम्ही माझा शोध कराल परंतु मी तुम्हांला
सापडणार नाही.' तो असेही म्हणतो, 'जेथे मी आहे तेथे
तुम्ही येऊ शकत नाही.' याचा अर्थ काय?"

## येशू पवित्र आत्म्याविषयी सांगतो

37सणाचा शेवटचा दिवस आला. तो फार महत्त्वाचा
दिवस होता. त्या दिवशी उभे राहून येशू मोठयाने म्हणाला,
"ज्याला तहान लागली असेल त्याने माझ्याकडे यावे आणि
प्यावे. 38जर कोणी माझ्यावर विश्वास ठेवील तर त्याच्या
अंत:करणातून जिवंत पाण्याच्या नद्या वाहतील." असे पवित्र
शास्त्र सांगते. 39येशू आत्म्याविषयी बोलत होता. लोकांना
अजून पवित्र आत्मा देण्यात आला नव्हता. कारण येशू
अजून मरण पावला नव्हता आणि गौरवात उठविला गेला
नव्हता. परंतु नंतर येशूवर विश्वास ठेवणाऱ्या लोकांना
तो मिळणार होता.

## लोक येशूविषयी वाद करतात

40येशूने सांगितलेल्या या गोष्टी लोकांनी ऐकल्या. काही
लोक म्हणाले, "हा माणूस खरोखरच संदेष्टा आहे.

41दुसरे म्हणाले, "हा ख्रिस्त आहे."

तर दुसरे काहीजण म्हणाले, "ख्रिस्त हा गालील प्रांतातून
येणार नाही." 42पवित्र शास्त्रात असेही लिहिले आहे की,
"ख्रिस्त दावीद राजाच्या घराण्यातून येईल."

43आणि पवित्र शास्त्रात असेही लिहिले आहे की, "दावीद
राजा राहत असे त्या बेथलहेम गावातून ख्रिस्त येईल."
तेव्हा येशूमुळे लोकांचे एकमत होईना. 44काहींना येशूला
अटक करायचे होते पण तसा प्रयत्न कोणीच केला नाही.

## यहूदी पुढारी येशूवर विश्वास ठेवण्यास नकार देतात

45मंदिराचे शिपाई मुख्य याजकांकडे आणि परूश्यांकडे
परत गेले. मुख्य याजकांनी व परूश्यांनी शिपायांना
विचारले, "तुम्ही येशूला का आणले नाही?"

46मंदिराचे शिपाई म्हणाले, “तो बोलतो त्या गोष्टी
कोणत्याही मानवी शब्दांपेक्षा महान आहेत!”
47मग परूशी म्हणाले, “म्हणजे येशूने तुम्हांलासुद्धा मूर्ख
बनविले! 48पुढाऱ्यांपैकी एकाने तरी येशूवर विश्वास
ठेवला का? नाही! आम्हा परूश्यांपैकी एकाने तरी
त्याच्यावर विश्वास ठेवला का? नाही! 49परंतु बाहेरच्या
लोकांना नियमशास्त्राची माहिती नाही, त्यांच्यावर देवाचा
कोप होईल!”
50परंतु त्या घोळक्यात निकदेम हजर होता. यापूर्वी हा
निकदेमच येशूला भेटायला आला होता* निकदेम
म्हणाला, 51“एखाद्या माणसाची बाजू ऐकून घेतल्याशिवाय
त्याला आपल्या नियमशास्त्राप्रमाणे दोषी ठरवता येत नाही.
त्याने काय केले हे कळल्याशिवाय आपण त्याचा न्याय
करू शकत नाही.”
52यहूदी पुढाऱ्यांनी उत्तर दिले, “तू सुद्धा गालील
प्रांतामधील आहेस काय? पवित्र शास्त्र वाचून पाहा!
गालीलातून एकही संदेष्टा येणार नाही. हे तुला कळेल.”

### व्यभिचार करताना पकडलेली स्त्री

53नंतर ते सर्व यहूदी पुढारी आपापल्या घरी गेले.
8 येशू जैतुनाच्या डोंगरावर* निघून गेला. 2दुसऱ्या
दिवशी सकाळीच येशू परत मंदिरात गेला. सर्व
लोक येशूकडे आले. येशू बसला आणि त्याने लोकांना
शिक्षण दिले. 3नियमशास्त्राचे शिक्षक व परूशी एका
स्त्रीला घेऊन तेथे आले. त्या स्त्रीला व्यभिचाराचे पाप
करताना पकडले होते. या यहूदी लोकांनी त्या स्त्रीला
बळजबरीने लोकांपुढे उभे केले. 4ते येशूला म्हणाले,
“गुरूजी, जो हिचा नवरा नाही, अशा माणसाशी व्यभिचार
करताना ह्या स्त्रीला पकडले. 5मोशेच्या नियमशास्त्रात
अशी आज्ञा दिलेली आहे की, असे कर्म करणाऱ्या
प्रत्येक स्त्रीला आम्ही धोंडमार करून जिवे मारले पाहिजे.
आम्ही काय करावे असे तुमचे मत आहे?” 6येशूला
पेचात पकडावे म्हणून यहूदी लोकांनी हा प्रश्न विचारला
होता. काही तरी चुकीचे बोलताना येशूला धरावे अशी
त्यांची इच्छा होती. म्हणजे मग त्यांना येशूवर आरोप
ठेवता आला असता. पण येशूने गुडघे टेकले व आपल्या
बोटाने जमिनीवर लिहू लागला. 7यहूदी पुढारी येशूला
प्रश्न विचारीतच राहिले, म्हणून येशू मान वर करून
त्यांच्याकडे पाहत म्हणाला, “ज्याने कधीच पाप केले
नाही असा एकतरी मनुष्य येथे आहे काय? निष्पाप मनुष्य
या स्त्रीवर पहिला दगड फेकू शकतो.” 8मग येशूने पुन्हा
गुडघे टेकले व जमिनीवर लिहू लागला. 9येशूचे हे शब्द
ज्या लोकांनी ऐकले, ते एक एक करून निघून जाऊ
लागले. जे वयस्कर होते ते अगोदर गेले. मग इतर लोक
गेले. येशू एकटाच त्या स्त्रीसह तेथे राहिला होता. ती
त्याच्यासमोर उभी होती. 10येशूने पुन्हा वर पाहिले आणि
तिला विचारले, “बाई, ते सर्व लोक निघून गेले आहेत,
त्यातील एकानेही तुला दोषी ठरविले नाही काय?”
11त्या स्त्रीने उत्तर दिले, “महाराज, मला कोणीही दोषी
ठरविले नाही.”
मग येशू म्हणाला, “मग मीही तुझा न्याय करीत नाही.
आता तू जाऊ शकतेस. पण परत पाप करू नकोस.”

*[वचने 7:53 ते 8:11 अति जुन्या व उत्तम ग्रीक प्रतीमध्ये ही वचने नाहीत ]*

### येशू जगाचा प्रकाश आहे

12नंतर येशू पुन्हा लोकांशी बोलू लागला. तो म्हणाला,
“मी जगाचा प्रकाश आहे. जो माझ्यामागे येतो तो कधीही
अंधारात राहणार नाही. त्या माणसाजवळ जीवन देणारा
प्रकाश राहील.”
13परंतु परूशी लोक येशूला म्हणाले, “जेव्हा तुम्ही
स्वत: आपल्याविषयी बोलता, तेव्हा ह्या गोष्टी खऱ्या
आहेत असे म्हणणारे तुम्ही एकटेच असता. तेव्हा तुम्ही
सांगता त्या गोष्टी आम्ही स्वीकारू शकत नाही.”
14येशूने उत्तर दिले, “होय, मी स्वत:च माझ्याविषयी ह्या
गोष्टी सांगत आहे. परंतु मी सांगतो त्या गोष्टीवर लोक
विश्वास ठेवू शकतील. कारण मी कोठून आलो हे मला
माहीत आहे व कोठे जाणार हे मला माहीत आहे. मी
तुमच्यासारखा नाही. मी कोठून आलो व कोठे जाणार हे
तुम्हांला माहीत नाही. 15तुम्ही एखाद्याचा न्याय करता
तसाच माझाही करता. मी कोणाचा न्याय करीत नाही.
16पण जर मी न्याय केला तर त्यात माझा न्याय खरा
असतो. कारण जेव्हा मी न्याय करतो तेव्हा मी एकटा
नसतो. ज्या पित्याने मला पाठविले, तो माझ्याबरोबर असतो.
17तुमचे स्वत:चेच नियमशास्त्र असे म्हणते की, दोन
साक्षीदार एकाच गोष्टीविषयी साक्ष देतात तेव्हा ते काय
म्हणतात, ते तुम्हांला स्वीकारावेच लागते. 18स्वत:विषयी
बोलणाऱ्या दोघा साक्षीदारांपैकी मी एक साक्षीदार आहे.
आणि ज्या पित्याने मला पाठविले, तो दुसरा साक्षीदार
आहे.”
19लोकांनी येशूला विचारले, “तुमचा पिता कोठे आहे.?”
येशूने उत्तर दिले, “तुम्ही मला अगर माझ्या पित्याला
ओळखत नाही. जर तुम्ही मला ओळखले असते तर
माझ्या पित्यालाही ओळखले असते.” 20येशू मंदिरात शिक्षण
देत असता या गोष्टी बोलला. ज्या पेटीत लोक पैसे टाकीत
त्या पेटीजवळच तो होता. परंतु येशूला कोणी अटक
केली (पकडले) नाही. कारण त्याची वेळ अजून आलेली
नव्हती.

**निकदेम ... होता** योहान 3:1-21

**जैतुनाच्या डोंगरावर** यरूशलेम शहराजवळची टेकडी.

## यहूदी लोकांना येशूविषयी समजत नाही

21येशू पुन्हा लोकांना म्हणाला, “मी लवकरच तुम्हांला
सोडून जाईन. तुम्ही माझा शोध कराल, परंतु तुम्ही आपल्या
पापात मराल. मी जातो तेथे तुम्ही येऊ शकत नाही.”
22म्हणून यहूदी लोक एकमेकांस विचारू लागले, “येशू
स्वत:ला ठार करणार नाही ना? यासाठी तो असे म्हणाला
का, ‘की मी जाणार आहे, तिकडे तुम्ही येऊ शकणार
नाही?’ 23पण येशू म्हणाला, “तुम्ही लोक येथील खालचे
आहात. पण मी वरचा आहे. तुम्ही या जगाचे आहा; परंतु
मी या जगाचा नाही. 24तुम्ही आपल्या पापात मराल असे
मी म्हणालो, होय. ‘मी आहे’* यावर तुम्ही विश्वास ठेवीत
नाही, तर तुम्ही पापात मराल.”
25यहूदी लोकांनी विचारले, “मग तुम्ही कोण आहात?”
येशूने उत्तर दिले, “मी सुरूवातीपासून तुम्हांला सांगत
आलो तोच मी आहे. 26तुमच्याविषयी बोलण्यासारख्या
बऱ्याच गोष्टी माझ्याकडे आहेत. मी तुमचा न्याय करू
शकतो. परंतु ज्याने मला पाठविले त्याच्याकडून ऐकलेल्या
गोष्टीच मी लोकांना सांगतो. आणि तो सत्य सांगतो.”
27येशू कोणाविषयी बोलत आहे, हे लोकांना समजेना.
येशू त्यांना पित्याविषयी सांगत होता. 28म्हणून येशू लोकांना
म्हणाला, “तुम्ही मनुष्याच्या पुत्राला उंच कराल
(वधस्तंभावर ठार माराल). मग तो मी आहे हे समजू
शकाल. मी ज्या गोष्टी करतो त्या माझ्या स्वत:च्या
अधिकारात करीत नाही, हे तुम्हांला समजेल. तुम्हांला
समजेल की, ज्या गोष्टी मला पित्याने शिकविल्या त्याच
गोष्टींविषयी मी बोलतो. 29ज्याने मला पाठविले तो
माझ्याबरोबर आहे. त्याला ज्यामुळे संतोष होतो तेच मी
नेहमी करतो. म्हणून त्याने मला एकटे सोडले नाही.”
30येशू या गोष्टी बोलत असता अनेकांनी त्याच्यावर विश्वास
ठेवला.

## पापापासून सुटका याविषयी येशू बोलतो

31ज्यांनी येशूवर विश्वास ठेवला, त्या यहूदी लोकांना
तो म्हणाला, “तुम्ही जर नेहमी माझ्या शिकवणुकीचे पालन
कराल, तरच तुम्ही माझे खरे शिष्य आहात. 32मग सत्य
काय आहे हे तुम्हांला समजेल. आणि सत्य तुम्हांला मोकळे
करील.” 33यहूदी लोकांनी उत्तर दिले, “आम्ही अब्राहामाचे
लोक आहोत आणि आम्ही कधीच गुलाम नव्हतो तर
आम्ही मोकळे होऊ असे तुम्ही का म्हणता?”
34येशूने उत्तर दिले, “मी तुम्हांला खरे तेच सांगतो. जो
प्रत्येक पाप करतो तो गुलाम आहे. पाप त्याचा मालक
आहे. 35गुलाम कुटुंबात कायमचा राहत नाही. परंतु पुत्र
कायमचा आपल्या कुटुंबात राहतो. 36म्हणून जर पुत्र
तुमची सुटका करतो, तर तुम्ही खरोखरच मोकळे व्हाल.
37तुम्ही अब्राहामाचे लोक आहात हे मला माहीत आहे.
परंतु तुम्ही मला जिवे मारावयास टपलेले आहात. कारण
तुम्हांला माझे शिक्षण स्वीकारायला नको आहे. 38माझ्या
पित्याने जे काही मला दाखवून दिले, तेच मी तुम्हांला
सांगत आहे. परंतु तुमच्या पित्याने तुम्हांला सांगितले तेच
तुम्ही करता.”
39यहूदी लोकांनी उत्तर दिले, “आमचा पिता अब्राहाम
आहे.”
येशू म्हणाला, “तुम्ही जर खरोखरच अब्राहामाची संतति
असता तर अब्राहामाने केल्या त्याच गोष्टी तुम्ही केल्या
असत्या. 40देवाकडून जे सत्य ऐकले ते तुम्हांला सांगणारा
मी एक मनुष्य आहे. परंतु तुम्ही मला जिवे मारायला
पाहता. अब्राहामाने तसे केले नाही. 41पण अब्राहामाने जे
केले नाही ते तुम्ही करता याचा अर्थ तुम्ही त्याची मुले
नाहीत तर तुमचा पिता अब्राहाम नसून कोणी वेगळा
आहे.”
परंतु यहूदी म्हणाले, “ज्या मुलांना आपला पिता कोण
आहे ते माहीत नाही त्यांच्यासारखे आम्ही नाही! देव
आमचा पिता आहे. तोच एक आमचा पिता आहे.”
42येशू त्या यहूदी लोकांना म्हणाला, “जर देव खरोखरच
तुमचा पिता असता, तर तुम्ही माझ्यावर प्रीति केली असती.
मी पित्याकडून आलो आणि आता मी येथे आहे. मी
माझ्या स्वत:च्या अधिकारात आलो नाही. देवानेच मला
पाठविले. 43मी म्हणतो, मी देत असलेली शिकवण तुम्हांला
समजत नाही का? कारण की तुम्हांला माझी शिकवण
स्वीकारता येत नाही. 44तुमचा पिता सैतान आहे. तुम्ही
त्याचे आहात. त्याला करायला पाहिजे तेच तुम्ही करता.
सैतान सुरूवातीपासूनच खुनी आहे. सैतान सत्याच्या विरुद्ध
आहे. आणि सैतानाच्या ठायी सत्य नाही. तो सांगतो त्या
लबाड्याप्रमाणेच तो आहे. सैतान लबाड आहे. आणि तो
असत्याचा पिता आहे. 45मी सत्य बोलतो म्हणून तुम्ही
माझ्यावर विश्वास ठेवीत नाही. 46मी एखाद्या पापाविषयी
दोषी आहे असे तुमच्यातील कोणी सिद्ध करू शकेल
काय? जर मी सत्य सांगतो तर तुम्ही माझ्यावर विश्वास
का ठेवीत नाही? 47जो देवाचा आहे, तो देवाचे म्हणणे
ऐकतो. परंतु तुम्ही देवाचे म्हणणे ऐकत नाही. कारण
तुम्ही देवाचे लोक नाहीत.”

## स्वत:विषयी व अब्राहामाविषयी येशू बोलतो

48यहूदी म्हणाले, “तुम्ही शोमरोनी आहात, तुम्हांला
भूताने पछाडले आहे, असे आम्ही म्हणालो तर आम्ही
म्हणतो तेच बरोबर नाही काय?”
49येशूने उत्तर दिले, “मला भूत लागले नाही. मी तर
आपल्या पित्याचा मान राखतो. परंतु तुम्ही माझा मान
राखीत नाही. 50स्वत:ला सन्मान मिळविण्याचा प्रयत्न मी
करीत नाही. माझा सन्मान व्हावा असे एकाला (देवाला)

---

**मी आहे** जुन्या करारातील निर्गम. 3:14 मध्ये वापरलेल्या देवाच्या नावासारखे हे आहे. परंतु ‘मी तो (ख्रिस्त) आहे’ असाही याचा अर्थ होऊ शकतो.

वाटते. तोच न्यायाधीश आहे, 51मी तुम्हांला खरे तेच सांगतो. जो कोणी माझ्या शिक्षणाचे पालन करतो तो कधीही मरणार नाही. 52यहूदी लोक म्हणाले, “तुमच्यात खरोखर भूत संचारले आहे. हे आता आम्हांला माहीत झाले. अब्राहाम आणि संदेष्टे मेले. परंतु तुम्ही म्हणता, ‘जो माझ्या शिकवणूकीचे पालन करतो तो कधीच मरणार नही.’ 53तुम्ही आमचा पिता अब्राहाम याच्यापेक्षाही थोर आहात असे तुम्हांला वाटते काय? अब्राहाम मेला. तसेच संदेष्टेही मेले. तुम्ही स्वत:ला समजता तरी कोण?”

54येशूने उत्तर दिले, “जर मी स्वत:च स्वत:चा सन्मान केला तर त्या सन्मानाला काहीच अर्थ नाही. माझा पिता माझा सन्मान करतो. तो आमचा देव आहे असे तुम्ही म्हणता. 55परंतु तुम्ही खरोखर त्याला ओळखीत नाही. पण मी त्याला ओळखतो. तो सांगतो त्याचे पालन मी करतो. मी त्याला ओळखीत नाही असे जर मी म्हणालो, तर तुम्ही लबाड आहात तसा मीही लबाड ठरेन. परंतु मी त्याला नक्की च ओळखतो. आणि तो जे काही सांगतो त्याचे पालन करतो. 56माझ्या येण्याचा दिवस पाहण्याच्या आशेने तुमचा पिता अब्राहाम आनंदित झाला होता. त्याने तो दिवस पाहिला आणि त्याला आनंद झाला.”

57यहूदी लोक येशूला म्हणाले, “तुम्ही अब्राहामाला कधीच पाहिले नाही. तुम्ही पन्नास वर्षांचेही नाही!”

58येशूने उत्तर दिले, “मी तुम्हांला खरे तेच सांगतो: अब्राहामाच्या जन्मापूर्वी पासून मी आहे.” 59जेव्हा येशू असे बोलला तेव्हा लोकांनी त्याला मारण्यासाठी दगड उचलले. पण येशू गुप्त झाला आणि नंतर मंदिरात निघून गेला.

## जन्मापासून आंधळा असलेल्या मनुष्याला येशू दृष्टि देतो

9 येशू चालला असताना त्याने एक आंधळा मनुष्य पाहिला. हा मनुष्य त्याच्या जन्मापासून आंधळा होता. 2येशूच्या शिष्यांनी त्याला विचारले, “गुरुजी, हा मनुष्य आंधळा जन्मला. परंतु तो कोणाच्या पापामुळे आंधळा जन्मला? त्याच्या स्वत:च्या का त्याच्या आईवडिलांच्या पापामुळे?”

3येशूने उत्तर दिले, “त्याच्या स्वत:च्या पापामुळे अगर त्याच्या आईवडीलांच्या पापामुळे हा आंधळा झाला नाही. मी याला बरे करताना लोकांना देवाचे सामर्थ्य दाखविता यावे म्हणून हा आंधळा जन्मला. 4दिवस आहे तोपर्यंत, ज्याने मला पाठविले त्याचे काम आपण करीत राहिले पाहिजे. रात्र येत आहे आणि रात्री कोणी काम करू शकत नाही. 5मी जगात आहे तोपर्यंत मी जगाचा प्रकाश आहे.”

6असे बोलल्यानंतर, येशू मातीवर थुंकला. त्याने त्या थुंकीने चिखल केला. आणि त्या चिखलाचा गोळा करून त्याने त्या माणसाच्या डोळ्यांवर ठेवला. 7मग येशूने त्या मनुष्याला सांगितले, “जाऊन शिलोह तळ्यात डोळे धू.” (शिलोह म्हणजे पाठविलेला) म्हणून तो मनुष्य त्या तळ्यापाशी गेला. त्याने डोळे धुतले आणि तो परत आला. तेव्हा त्याला चांगले दिसू लागले होते.

8काही लोकांनी त्याला भीक मागताना पूर्वी पाहिले होते. ही माणसे आणि त्याचे शेजारी म्हणाले, “पाहा! येथे बसून भीक मागत असे तो मनुष्य हाच आहे ना?”

9काही लोक म्हणाले, “होय! हा तोच आहे.” परंतु दुसरे काही म्हणाले, “नाही हा तो मनुष्य नाही. हा फक्त त्याच्यासारखा दिसतो.”

मग तो माणूस स्वत: होऊनच म्हणाला, “अहो, मीच तो पूर्वीचा आंधळा आहे.”

10लोकांनी विचारले, “अरे असे घडले तरी काय? तुला कसे दिसू लागले?”

11त्या मनुष्याने उत्तर दिले, “लोक ज्याला येशू म्हणतात त्याने थोडा चिखल केला. त्याने तो चिखल माझ्या डोळ्यांवर लावला. मग येशूने मला शिलोह तळ्याकडे जाऊन धुण्यास सांगितले. म्हणून मी शिलोह तळ्यावर जाऊन डोळे धुतले. आणि मग मला दिसू लागले.”

12लोकांनी त्या मनुष्याला विचारले, “तो मनुष्य कोठे आहे?” त्या मनुष्याने उत्तर दिले, “मला माहीत नाही.”

## येशूने बरे केलेल्या मनुष्याची परूश्यांकडून चौकशी

13मग लोकांनी परूशी लोकांकडे त्या मनुष्याला नेले. हाच पूर्वी आंधळा मनुष्य होता. 14येशूने चिखल करून त्या मनुष्याचे डोळे बरे केले होते. ज्या दिवशी येशूने हे केले तो शब्बाथ दिवस होता. 15म्हणून आता परूशी लोक त्या मनुष्याला विचारू लागले, “तुला कसे काय दिसू लागले?”

त्या मनुष्याने उत्तर दिले, “त्याने माझ्या डोळ्यांवर चिखल लावला. मी डोळे धुतले आणि आता मी पाहू शकतो.”

16परूश्यांतील काही लोक म्हणाले, “हा मनुष्य शब्बाथाचा नियम पाळीत नाही. म्हणून तो देवापासून नाही.”

दुसरे लोक म्हणाले, “परंतु एखादा मनुष्य पापी असेल तर त्याला असे चमत्कार करताच येणार नाहीत.” याविषयी त्या यहूदी लोकांचे एकमत होईना.

17मग यहूदी पुढाऱ्यांनी त्या मनुष्याला पुन्हा विचारले, “त्या मनुष्याने तुला बरे केले, आणि आता तुला दिसते, तर त्याच्याविषयी तुला काय म्हणायचे आहे?”

त्या मनुष्याने उत्तर दिले, “तो एक संदेष्टा आहे.

18हे या माणसाच्या बाबतीत घडले आहे यावर यहूदी लोकांचा विश्वासच बसेना. हा मनुष्य आंधळा होता आणि आता त्याला दिसते या गोष्टीवर त्यांचा विश्वास बसत नव्हता. नंतर त्यांनी त्या मनुष्याच्या आईवडिलांना बोलावून घेतले.

19यहूदी लोकांनी त्याच्या आईवडिलांना विचारले, “हा तुमचाच मुलगा आहे काय? तुम्ही म्हणता हा जन्मापासून आंधळा होता तर आता याला कसे काय दिसू लागले?”

20त्याच्या आईवडिलांनी उत्तर दिले, "हा आमचाच मुलगा
आहे. आणि तो आंधळाच जन्माला आला हे आम्हांला
माहीत आहे. 21परंतु त्याला आता कसे दिसायला लागले
आणि त्याचे डोळे कोणी बरे केले हे आम्हांला माहीत
नाही. त्यालाच विचारा. तो स्वत: बद्दल सांगण्याइतका
सुज्ञ झाला आहे. 22त्याचे आईवडील असे म्हणाले कारण
त्यांना यहूदी धर्मपुढाऱ्यांची फार भीति वाटत होती. येशू
हा ख्रिस्त आहे, असे जो कोणी म्हणेल, त्याला शिक्षा
करायची असे यहूदी पुढाऱ्यांनी अगोदरच ठरवून ठेवलेले
होते. अशा लोकांना यहूदी पुढारी सभास्थानाबाहेर घालवू
शकत होते. 23म्हणून 'त्यालाच विचारा तो आता मोठा
झाला आहे' असे त्या मनुष्याचे आईवडील म्हणाले.

24मग जो पूर्वी आंधळा होता त्याला यहूदी पुढाऱ्यांनी
पुन्हा बोलाविले. ते त्याला म्हणाले, "तुला बरे केले म्हणून
तू देवाला गौरव द्यावे. हा मनुष्य पापी आहे हे आम्हांला
माहीत आहे."

25त्या मनुष्याने उत्तर दिले, "तो पापी आहे की नाही हे
मला माहीत नाही. परंतु हे मला नक्की माहीत आहे की,
मी पूर्वी आंधळा होतो आणि आता मला दिसते."

26यहूदी पुढाऱ्यांनी विचारले, "त्याने तुला काय केले?
त्याने तुझे डोळे कसे बरे केले?" 27त्या मनुष्याने उत्तर
दिले, "ते मी तुम्हांला अगोदरच सांगितले आहे. परंतु
तुम्ही माझे ऐकत नाही. पुन्हा तुम्हांला ते ऐकावेसे वाटते
काय? तुम्हांलाही त्याचे शिष्य व्हावयाची इच्छा आहे काय?"

28यहूदी पुढारी फार संतापले आणि त्याला फारच वाईट
रीतीने बोलू लागले. ते त्याला म्हणाले, "तू त्याचा शिष्य
आहेस. आम्ही तर मोशेचे शिष्य आहोत. 29देव मोशेशी
बोलत असे हे आम्हांला माहीत आहे. परंतु हा मनुष्य
कोण, कोठून आला हे आम्हांला माहीत नाही."

30त्या मनुष्याने उत्तर दिले, "ही फारच विचित्र गोष्ट
आहे. येशू कोठून आला हे तुम्हांला माहीत नाही. परंतु
त्याने माझे डोळे बरे केले. 31देव पापी लोकांचे ऐकत
नाही हे आपणा सर्वांना माहीत आहे. पण जो त्याची उपासना
करतो आणि त्याची आज्ञा पाळतो त्याचेच तो ऐकेल.
32जो मनुष्य जन्मजात आंधळा होता, त्याला दृष्टी येण्याची
ही पहिलीच वेळ आहे. 33हा मनुष्य देवाकडूनच आला
असला पाहिजे. जर तो देवाकडून आला नसता तर त्याला
असे काहीच करता आले नसते."

34यहूदी पुढाऱ्यांनी उत्तर दिले, "तू तर पापात जन्मला
आहेस तू आम्हांला शिकवू पाहतोस काय?" आणि यहूदी
पुढाऱ्यांनी त्या मनुष्याला तेथून हुसकून लावले.

## आध्यात्मिक आंधळेपणा

35यहूदी पुढाऱ्यांनी त्या मनुष्याला बळजबरीने हुसकावून
लावले, हे येशूने ऐकले, म्हणून येशू त्या मनुष्याला भेटला
आणि म्हणाला, "तू मनुष्याच्या पुत्रावर विश्वास ठेवतोस
काय?" 36त्या मनुष्याने विचारले, "महाराज, हा मनुष्याचा
पुत्र कोण? मला सांगा, म्हणजे मला त्याच्यावर विश्वास
ठेवता येईल."

37येशू त्याला म्हणाला, "तू त्याला अगोदरच पाहिले
आहेस. मनुष्याचा पुत्र आता तुझ्याशी बोलत आहे."

38"होय, प्रभु, मी विश्वास ठेवतो." त्या मनुष्याने उत्तर
दिले. मग त्या मनुष्याने खाली वाकून येशूला वंदन केले.

39येशू म्हणाला, "जगाचा न्याय व्हावा म्हणून मी जगात
आलो आहे. मी आलो आहे तो यासाठी की, जे आंधळे
आहेत त्यांना दिसावे. आणि आम्हांला पाहता येते असे
वाटणारे आंधळे व्हावेत."

40परुश्यांतील काही जण येशूच्या आजूबाजूला होते.
त्यांनी येशूला हे बोलताना ऐकले. आणि त्यांनी विचारले,
"काय, आम्हीसुद्धा आंधळे आहोत असे तुला म्हणायचे
आहे काय?"

41येशू म्हणाला, "तुम्ही जर खरोखरच आंधळे (समज
नसलेले) असता, तर तुम्ही पापाबद्दल दोषी ठरला नसता.
परंतु 'आम्हांस दिसते' असे तुम्ही म्हणता (तुम्ही काय
करता हे जाणता) म्हणून तुम्ही दोषी आहात."

## मेंढपाळ आणि त्याची मेंढरे

10 येशू म्हणाला, "मी तुम्हांला खरे तेच सांगतो.
जेव्हा एखादा मनुष्य मेंढवाड्यात प्रवेश करतो,
तेव्हा त्याने दाराचाच उपयोग करावा. जर तो दुसऱ्या
मार्गाने चढतो तर तो लुटारू आहे. तो मेंढरे चोरण्याचा
प्रयत्न करीत आहे, 2परंतु मेंढरांची काळजी घेणारा
दारातूनच आत जातो. तो मेंढपाळ आहे. 3दारावरचा
पहारेकरी मेंढपाळासाठी दार उघडतो आणि मेंढरे आपल्या
मेंढपाळाचा आवाज ऐकतात. मेंढपाळ आपल्या मेंढरांना
त्यांच्या नावाने हाका मारतो. आणि त्यांना तो बाहेर घेऊन
जातो. 4आपली सर्व मेंढरे बाहेर पडल्यावर तो त्यांच्या पुढे
पुढे चालतो. (त्यांचे नेतृत्व करतो). मेंढरे त्याच्या मागोमाग
जातात. कारण ती त्याचा आवाज ओळखतात. 5अनोळखी
माणसांच्या मागे मेंढरे कधीच जाणार नाहीत. ती त्या
माणसापासून दूर पळून जातील. कारण त्यांना त्यांचा आवाज
परिचयाचा नसतो. 6येशूने लोकांना हा दाखला सांगितला.
परंतु तो काय सांगत आहे हे लोकांना समजले नाही.

## येशू उत्तम मेंढपाळ आहे

7म्हणून येशू पुन्हा म्हणाला, "मी तुम्हांला खरे सांगतो.
मी मेंढरांचे दार आहे. 8माझ्याअगोदर आलेले सर्व चोर व
लुटारू होते. मेंढरांनी त्यांचे आवाज ऐकले नाहीत. 9मी
दार आहे. जो माझ्याद्वारे आत जातो त्याचे तारण होईल.
त्याला आत येता येईल व बाहेर जाता येईल. त्याला
पाहिजे ते सर्व त्याला मिळेल. 10चोर चोरी करायला, ठार
मारायला आणि नाश करायला येतो. परंतु मी जीवन
देण्यासाठी आलो. असे जीवन जे भरपूर आणि चांगले
आहे.

11"मी चांगला मेंढपाळ आहे. चांगला मेंढपाळ आपल्या मेंढरासाठी स्वत:चा जीव देतो. 12ज्याला मजुरी देऊन मेंढरे राखायला ठेवलेले असते तो मेंढपाळापेक्षा निराळा असतो. मजुरीवर मेंढरे राखणारा कळपाचा मालक नसतो. मेंढपाळ हाच कळपाचा मालक असतो. म्हणून मजुरीवर काम करणारा माणूस लांडगा येताना पाहून मेंढरे सोडतो आणि पळून जातो. मग लांडगा मेंढरांवर हल्ला करून त्यांची दाणादाण करतो. 13मजूर पळून जातो कारण तो रोजंदारीवरचा कामगार असतो. तो मेंढरांची खरी काळजी करीत नाही.

14–15"मी मेंढरांची (लोकांची) काळजी घेणारा मेंढपाळ आहे. जसा पिता मला ओळखतो तसा मी माझ्या मेंढरांना ओळखतो. आणि जसा मी पित्याला ओळखतो तशी माझी मेंढरे मला ओळखतात. या मेंढरांसाठी मी आपला जीव देतो. 16माझी दुसरीही मेंढरे आहेत ती येथे या कळपात नाहीत. त्यांनाही मला मार्गदर्शन केले पाहिजे. ते माझा आवाज ऐकतील आणि भविष्यकाळात एक कळप आणि एक मेंढपाळ असे होईल. 17मी आपला जीव देतो म्हणून माझा पिता मजवर प्रीति करतो. मी आपला जीव परत घेण्याकरिता देतो. 18तो कोणी माझ्यापासून घेत नाही. मी माझा स्वत:चा जीव स्वत:च्या इच्छेने देतो. माझा जीव देण्याचा मला अधिकार आहे. आणि मला तो परत घेण्याचाही अधिकार आहे. हेच करण्याची माझ्या पित्याने मला आज्ञा दिली आहे."

19येशूने सांगितलेल्या ह्या गोष्टींमुळे यहूदी लोकांचे आपापसात एकमत होईना. 20यहूदी लोकांपैकी पुष्कळजण म्हणाले, "याला भूत लागले आहे. म्हणून याचे डोके ठिकाणावर नाही. त्याचे का ऐकावे?"

21परंतु दुसरे काही जण म्हणाले, "हा करतो तशा गोष्टी भूताने डोके फिरविलेला मनुष्य करीत नाही. भूत आंधव्या माणसाचे डोळे बरे करील काय? मुळीच नाही!"

22यरुशलेमात साजरा होणारा समर्पणाचा सण* जवळ आला. तो हिवाळा होता. 23येशू मंदिरातील शलमोनाच्या देवडीत* त होता. 24यहूदी लोक येशूच्याभोवती जमा झाले. आणि म्हणाले, "किती दिवस तुम्ही आम्हांला असे गोंधळात ठेवणार आहात? जर तुम्हीच ख्रिस्त असाल तर आम्हांला तसे स्पष्टच सांगा!"

## येशूच्या विरोधात यहूदी पुढारी

25येशूने उत्तर दिले, "मी तुम्हांला आधीच सांगितले. परंतु तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवला नाही. मी माझ्या पित्याच्या नावाने जी कामे करतो. ती कामे सुध्दा मी कोण आहे याची साक्ष देतात. 26पण तुम्ही विश्वास ठेवीत नाही. कारण तुम्ही माझी मेंढरे (लोक) नाहीत. 27माझी मेंढरे माझी वाणी ऐकतात. मी त्यांना ओळखतो. आणि ती माझ्यामागे येतात. 28मी माझ्या मेंढरांना अनंतकाळचे जीवन देतो. ती कधीच मरणार नाहीत. आणि त्यांना कोणीच माझ्या हातून हिरावून घेणार नाही. 29माझ्या पित्याने माझी मेंढरे माझ्या हाती दिली आहेत. तो सर्वांहून थोर आहे. माझ्या पित्याच्या हातून ती कोणी हिरावून घेणार नाही. 30माझा पिता आणि मी एक आहोत."

31तेव्हा यहूदी पुढाऱ्यांनी येशूला ठार मारण्यासाठी पुन्हा धोंडे उचलले.

32परंतु येशू त्यांना म्हणाला, "पित्यापासून आलेल्या कितीतरी चांगल्या गोष्टी मी केल्या. त्या गोष्टी तुम्ही पाहिल्या आहेत. त्यापैकी कोणत्या चांगल्या गोष्टीसाठी तुम्ही मला जिवे मारीत आहात?"

33यहूदी पुढाऱ्यांनी उत्तर दिले, "तुम्ही केलेल्या कोणत्याही चांगल्या गोष्टींसाठी आम्ही तुम्हांला मारीत नाही. परंतु तुम्ही ज्या गोष्टी बोलता त्या देवाविरुद्ध आहेत. तुम्ही फक्त मानव आहात, पण स्वत:ला देवासारखेच आहोत असे मानता! आणि म्हणून आम्ही तुम्हांला धोंडमार करून ठार करीत आहोत!"

34येशूने उत्तर दिले, "तुमच्या नियमशास्त्रात असे लिहिले आहे; 'मी म्हणालो, तुम्ही देव आहात'* 35ज्या लोकांना देवाने त्याची आज्ञा वचने दिली त्यांच्याविषयी ते सांगते. पवित्र शास्त्रात त्या लोकांना देवाने असे म्हटले आणि पवित्र शास्त्र नेहमीच खरे आहे.

36त्याच्या कामासाठी देवाने मला निवडले. देवाने मला जगात पाठविले. मी देवाचा पुत्र आहे. आणि तुम्ही म्हणता, मी बोलतो त्या गोष्टी देवाविरुद्ध आहेत, 37जे माझा पिता करतो ते जर मी करत नाही, तर तुम्ही माझ्या सांगण्यावर विश्वास ठेवू नका. 38परंतु माझा पिता करतो तीच कृत्यांवर जर मी करतो, तर मी करतो त्या माझ्या गोष्टींवर विश्वास ठेवा. तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवणार नाही. पण मी करतो त्या गोष्टींवर तरी विश्वास ठेवा. मग तुम्ही ओळखाल आणि समजून घ्याल की, पिता माझ्यामध्ये आहे, आणि मी पित्यामध्ये आहे."

39यहूदी लोकांनी येशूला पुन्हा धरण्याचा प्रयत्न केला. परंतु येशू त्यांच्यातून निघून गेला. 40मग येशू यार्देन नदी ओलांडून माघारी गेला. येशु जेथे योहान लोकांना बाप्तिस्मा देत असे तेथे गेला. येशू तेथेच राहिला. 41आणि पुष्कळ लोक त्याच्याकडे आले. लोक म्हणाले, "योहानाने कधी चमत्कार केला नाही. परंतु योहानाने या मनुष्याविषयी जे सांगितले ते खरे आहे."

42आणि त्याठिकाणी अनेक लोकांनी येशूवर विश्वास ठेवला.

---

**समर्पणाचा सण** डिसेंबर महिन्यात यहूदी लोक साजरा करीत असलेला खास आठवडा.

**शलमोनाच्या देवडीत** मंदिराच्या पूर्वेकडील भाग. हा छप्पराने आच्छादित केलेला होता.

**मी ... आहात** स्तोत्र. 82:6

## लाजराचा मृत्यू

11 लाजर नावाचा एक मनुष्य आजारी होता. तो
बेथानी गावात राहत होता. याच गावात मार्था
आणि मरीया राहत होत्या. 2ज्या मरीयेने प्रभूला सुगंधी
तेल लावले व त्याचे पाय आपल्या केसांनी पुसले तिचा
हा भाऊ होता. 3त्या बहिणींनी येशूला निरोप पाठविला
की, हे प्रभु ज्याच्यावर तू प्रीति करतोस तो आजारी आहे.
4पण येशूने हे ऐकून म्हटले, "हा आजार मरणासाठी
नव्हे तर देवाच्या गौरवासाठी आहे. याद्वारे देवाचे गौरव
व्हावे यासाठी हा आजार आहे". 5येशू मार्था, मरीया व
लाजर यांच्यावर प्रीति करीत असे. 6म्हणून तो आजारी
आहे हे ऐकल्यावरही तो होता त्याच ठिकाणी दोन दिवस
राहिला. 7नंतर त्याने शिष्यांना म्हटले, "आपण यहूदीयात
परत जाऊ."
8शिष्य त्याला म्हणाले, "गुरुजी, यहूदी आपणांस दगडमार
करू पाहत होते आणि आपण पुन्हा तेथे जात आहात
काय?"
9येशूने उत्तर दिले, "दिवसाचे बारा तास असतात की
नाहीत? जर एखादा दिवसा चालतो, तर त्याला ठेच लागत
नाही. कारण तो या जगाचा प्रकाश पाहतो. 10पण जर
कोणी रात्री चालतो, तर त्याला ठेच लागते कारण
त्याच्याकडे प्रकाश नसतो."
11या गोष्टी बोलल्यानंतर तो त्यांना म्हणाला, "आपला
मित्र लाजर झोपी गेला आहे. पण मी त्याला झोपेतून जागे
करावे तरीही जात आहे." 12तेव्हा त्याचे शिष्य म्हणाले,
"प्रभु, तो झोपी गेला असेल तर बरा होईल." 13पण येशू
खरे तर त्याच्या मरणाविषयी बोलला होता. पण तो त्याच्या
नेहमीच्या झोपेविषयी बोलत आहे, असे त्यांना वाटले.
14तेव्हा येशूने त्यांना स्पष्ट सांगितले, "लाजर मेला आहे.
15आणि मी तेथे नव्हतो म्हणून मला तुमच्यामुळे आनंद
वाटतो. यासाठी की तुम्ही विश्वास धरावा. आपण
त्याच्याकडे जाऊ या." 16तेव्हा दिदुम म्हटलेला थोमा
शिष्यांना म्हणाला, "आपणही त्याच्याबरोबर जाऊ या
अशासाठी की आपणही त्याच्याबरोबर मरू."

## बेथानीत येशू

17येशू आल्यावर त्याला समजले की, लाजराला चार
दिवसांपूर्वीच कबरेत ठेवण्यात आले आहे. 18बेथानी
यरुशलेमापासून तीन किलोमीटर अंतरापेक्षा कमी होते.
19आणि पुष्कळसे यहूदी मार्था, मरीयेकडे त्यांचा भाऊ
मेला याबद्दल सांत्वन करण्यासाठी आले होते.
20जेव्हा मार्थाने ऐकले की, आपल्या घरी येशू येत
आहे तेव्हा ती त्याला भेटायला बाहेर गेली, पण मरीया
घरातच राहिली. 21"प्रभु" मार्था येशूला म्हणाली, "तू जर
येथे असतास तर माझा भाऊ मेला नसता, 22पण मला
माहीत आहे की, तू जे मागशील ते देव तुला देईल."
23येशू म्हणाला, "तुझा भाऊ पुन्हा उठेल."
24मार्था म्हणाली, "मला माहीत आहे शेवटच्या दिवशी
पुनरुत्थानाच्या वेळेस तो पुन्हा उठेल."
25येशू तिला म्हणाला, "मी पुनरुत्थान आणि जीवन
आहे. जो माझ्यावर विश्वास ठेवतो तो मेला असेल तरी
जगेल. 26आणि जो कोणी जगतो आणि माझ्यावर विश्वास
ठेवतो. तो कधीच मरणार नाही. तू यावर विश्वास ठेवतेस
काय?" 27"होय प्रभु," ती त्याला म्हणाली, "तू ख्रिस्त
आहेस असा मी विश्वास धरते. तू या जगात आलेला
आहे देवाचा पुत्र आहेस."

## येशू रडतो

28आणि असे म्हटल्यानंतर ती परत गेली आणि आपली
बहीण मरीया हिला एका बाजूला बोलाविले आणि म्हणाली,
"गुरुजी येथे आहेत. आणि ते तुला विचारीत आहेत."
29जेव्हा मरीयेने हे ऐकले तेव्हा ती लगेच उठली आणि
त्याच्याकडे गेली. 30आता तोपर्यंत येशू त्या खेड्याच्या
आत आला नव्हता. तर मार्था त्याला भेटली, तेथेच
अजूनपर्यंत होता. 31तेव्हा जे यहूदी तिच्या घरात तिचे
सांत्वन करीत होते ते मरीया लगबगीने उठून बाहेर गेली
असे पाहून ती कबरेकडे शोक करायला गेली असे समजून
तिच्यामागे गेले. 32मग जेथे येशू होता तेथे मरीया आल्यावर
ती त्याला पाहून त्याच्या पाया पडली व त्याला म्हणाली,
"प्रभु, आपण येथे असता तर माझा भाऊ मेला नसता."
33मग येशू तिला रडताना पाहून व तिच्याबरोबर
असलेल्या यहूद्यांनाही रडताना पाहून आत्म्यात व्याकुळ
झाला व हेलावून गेला. 34तो म्हणाला, "तुम्ही त्याला
कोठे ठेवले आहे?" ते म्हणाले, "प्रभु, या आणि पाहा."
35येशू रडला.
36तेव्हा यहूदी म्हणाले, "पहा! त्याला तो किती आवडत
होता." 37पण त्यांच्यातील कित्येक म्हणाले, "ज्याने
आंधळ्याचे डोळे उघडले, त्या या मनुष्याला लाजराला
मरणापासून वाचविता येऊ नये काय?"

## येशू लाजराला जिवंत करतो

38मग येशू पुन्हा अंत:करणात विव्हळ झाला असता
कबरेकडे आला. ती गुहा होती. आणि तिच्यावर दगड
लोटला होता. 39येशूने म्हटले, "हा दगड काढा."
मार्था म्हणाली, "पण प्रभु, लाजर मरून चार दिवस
झाले आहेत, त्याला आता दुर्गंधी येत असेल." ती मृत
लाजराची बहीण होती.
40येशूने तिला म्हटले, "जर तू विश्वास धरशील तर
देवाचे गौरव पाहशील, असे मी तुला सांगितले नव्हते
काय?"
41मग त्यांनी दगड बाजूला केला. तेव्हा येशू वर पाहून
म्हणाला, "पित्या, तू माझे ऐकले, म्हणून मी तुझे उपकार
मानतो. 42आणि तू नेहमीच माझे ऐकतोस हे मला माहीत
आहे. पण जो लोकसमुदाय आजूबाजूला उभा आहे

त्यांच्यासाठी मी हे बोललो. यासाठी की तू मला पाठविले
आहेस यावर त्यांनी विश्वास ठेवावा."
43असे बोलल्यावर त्याने मोठ्याने हाक मारली, "लाजरा,
बाहेर ये." 44मग जो मेला होता तो लाजर जिवंत होऊन
बाहेर आला. त्याचे हात पाय वस्त्रांनी बांधले होते व तोंड
रुमालाने झाकले होते. येशू लोकांना म्हणाला, "त्याला
मोकळे करा आणि जाऊ द्या."

## यहूदी पुढारी येशूला ठार मारण्याचा कट करतात
***(मत्तय 26:1-5; मार्क 14:1-2; लूक 22:1-2)***

45जे यहूदी मरीयेकडे आले होते, त्यांनी येशूने जे केले
ते पाहिले आणि त्यांच्यापैकी पुष्कळांनी त्याच्यावर विश्वास
ठेवला. 46पण त्यांच्यातील काहींनी परूश्यांकडे जाऊन
येशूने जे केले होते ते त्यांना सांगितले. 47तेव्हा मुख्य
याजकांनी व परूश्यांनी सभा भरवून म्हटले, हा मनुष्य
पुष्कळ चमत्कार करीत आहे. 48आम्ही त्याला असेच
राहू दिले तर सर्व लोक त्याच्यावर विश्वास ठेवतील
आणि रोमी येऊन आमचे मंदिर व राष्ट दोन्हीही घेतील."
49तेव्हा त्यांच्यातील कयफा नावाची व्यक्ति त्या वर्षी
प्रमुख याजक होती. तो त्यांना म्हणाला, "तुम्हांला काहीच
माहिती नाही! 50तुम्ही हे लक्षात घेत नाही की, सर्व
लोकांसाठी एका माणसाने मरणे हे सर्व राष्ट्राचा नाश
होण्यापेक्षा हिताचे आहे."
51तो हे स्वत: होऊन बोलला नाही तर त्यावर्षी तो
प्रमुख याजक होता म्हणून त्याने संदेश दिला की, येशू
त्या राष्टाकरिता मरणार आहे. 52केवळ त्या राष्टासाठी
असे नाही, तर यासाठी की, त्याने देवाच्या पांगलेल्यांना
एकत्र करावे, म्हणून तो मरणार आहे.
53म्हणून त्या दिवसापासून त्यांनी त्याला जिवे मारण्याची
मसलत केली. 54यामुळे येशू तेव्हापासून उघडपणे
यहूद्यांमध्ये फिरला नाही. त्याऐवजी तो रानाजवळच्या
प्रदेशातील एफ्राईम नावाच्या नगरात गेला व तेथे शिष्यांसह
राहिला. 55तेव्हा यहूद्यांचा वल्हांडण सण जवळ आला
होता आणि सणाअगोदर पुष्कळ लोक आपणांस शुद्ध
करायला देशातून वर यरुशलेमेस गेले.
56ते येशूचा शोध करीत राहिले. आणि मंदिरात उभे
असताना एकमेकास म्हणाले, "तुम्हाला काय वाटते? तो
सणाला येणार नाही काय?" 57पण मुख्य याजक व
परूश्यांनी अशी आज्ञा केली होती की, येशू कोठे आहे हे
ज्याला कळेल त्याने त्यांना कळवावे, म्हणजे ते त्याला
पकडू शकतील.

## येशू आपल्या मित्रांबरोबर बेथानी येथे
***(मत्तय 26:6-13; मार्क 14:3-9)***

12 मग येशू वल्हांडण सणाच्या अगोदर सहा दिवस
असताना बेथानीस आला. येशूने ज्याला
मेलेल्यातून उठविले होते तो लाजर तेथे होता. 2म्हणून
तेथे त्यांनी त्याच्यासाठी संध्याकाळचे भोजन आयोजित
केले. मार्था जेवण वाढत होती आणि लाजर त्यांच्याबरोबर
जेवायला बसला होता. 3तेव्हा मरीयेने अर्धा किलो शुद्ध
जटामांसीचे मोलवान सुगंधी तेल घेऊन येशूच्या पायावर
ओतले व आपल्या केसाने त्याचे पाय पुसले व सर्व घर
त्या सुवासाने भरले.
4पण त्याच्या शिष्यांपैकी एक, यहूदा इस्कर्योत ज्याने
नंतर त्याचा विश्वासघात केला होता, त्याने विरोध केला.
म्हणून तो म्हणाला, 5"हे सुगंधी द्रव्य विकून आलेले पैसे
गरिबांना का देण्यात आले नाहीत? ते तेल चांदीच्या तीनशे
रुपयाच्या किमतीचे होते." 6गरिबांचा कळवळा आला
म्हणून त्याने असे म्हटले नाही, तर तो चोर होता आणि
त्याच्याजवळ पेटी होती व तिच्यात जे पैसे टाकण्यात येत,
ते तो चोरून घेई म्हणून तो असे म्हणाला.
7"तिला एकटे सोडा," येशूने उत्तर दिले, "मला पुरण्याच्या
दिवसासाठी ते तेल राखून ठेवण्यात आले. 8तुमच्यात
गरीब नेहमीच असतील, पण मी तुमच्यात नेहमी असणार
नाही."

## लाजराविरुद्ध कट

9मग तो तेथे आहे हे यहूदीयांतील बऱ्याच जणांना
कळले. तेव्हा फक्त येशूसाठीच नव्हे तर ज्याला त्याने
मेलेल्यातून उठविले होते त्या लाजराला पाहावे म्हणून ते
आले.
10तेव्हा मुख्य याजकांनी लाजराला मारण्याचा कट
केला. 11कारण त्याच्यामुळे पुष्कळ लोक येशूकडे जात
होते व त्याच्यावर विश्वास ठेवीत होते.

## येशू यरुशलेमात प्रवेश करतो
***(मत्तय 21:1-11; मार्क 11:1-11; लूक 19:28-40)***

12दुसऱ्या दिवशी सणासाठी आलेल्या मोठ्या जमावाने
ऐकले की येशू यरुशलेमकडे येत आहे. 13त्यांनी खजुरीच्या
झाडाच्या फांद्या घेतल्या आणि त्याला भेटण्यास गेले. ते
ओरडून जयघोष करीत होते.

"होसान्ना! प्रभूच्या नावाने येणारा धन्यवादित असो!
इस्राएलचा राजा धन्यवादित असो!

*स्तोत्र. 118:25-26*

14येशूला एक शिंगरू दिसले त्यावर तो बसला. आणि
संदेष्ट्यांनी लिहिल्याप्रमाणे हे झाले. ते असे:

15"सीयोनेच्या कन्ये, भिऊ नको; पहा, तुझा राजा येत
आहे; गाढवीच्या शिंगरावर बसून येत आहे."

*जखऱ्या 9:9*

16सुरवातीला शिष्यांना या गोष्टी समजल्या नाहीत पण
येशूचे गौरव झाल्यावर त्यांना जाणीव झाली की,

त्याच्याविषयी या गोष्टी लिहिल्या होत्या आणि त्यांनी या गोष्टी त्याच्यासाठी केल्या.

### लोक येशूविषयी सांगतात

17मग जो जमाव त्याने लाजरला कबरेतून आणलेले व मरणातून उठविलेले पाहत होता तो जमाव सातत्याने त्याच्याविषयी सांगत होता. 18पुष्कळ लोक त्याला जाऊन भेटले कारण त्याने तो चमत्कार केला होता हे त्यांनी ऐकले होते. 19म्हणून परूशी एकमेकांस म्हणाले, "पहा, याच्यापुढे आपले काही चालत नाही. सगळे जग त्याच्यामागे चालले आहे!"

### येशू जीवन आणि मरण याविषयी बोलतो

20आता सणाच्या वेळी उपासनेसाठी जे लोक वर गेले होते त्यांच्यात काही ग्रीक होते. 21ते फिलिप्पाकडे आले, जो गालीलातील बेथसैदा येथील होता, त्यांनी विनंति केली, "महाराज, येशूला पाहावे अशी आमची इच्छा आहे." 22फिलिप्प अंद्रियाकडे हे सांगण्यास गेला; नंतर अंद्रिया व फिलिप्प यांनी येशूला सांगितले.

23येशू त्यांना म्हणाला, "मनुष्याच्या पुत्राचे गौरव होण्याची वेळ आली आहे. 24मी तुम्हांला खरे सांगतो, गव्हाचा दाणा भूमीत पडून मेला नाही, तर एकटाच राहतो, पण तो मेला तर पुष्कळ फळ देतो. 25जो आपल्या जिवावर प्रीति करतो तो त्याला गमावेल पण जो या जगात आपल्या जिवाचा द्वेष करतो तो त्याला अनंतकाळाच्या जीवनासाठी राखील. 26जो कोणी माझी सेवा करतो त्याने मला अनुसरले पाहिजे. जेथे मी असेन तेथे माझे सेवकही असतील. जो माझी सेवा करतो त्याचा सन्मान माझा पिता करील."

### येशू त्याच्या मरणाविषयी बोलतो

27"माझे अंत:करण व्याकूळ झाले आहे. आणि मी आता काय सांगू? "पित्या माझी या घटकेपासून सुटका कर? केवळ याच कारणासाठी या वेळेला मी आलो. 28पित्या, तुझे गौरव कर!"

तेव्हा आकाशातून वाणी झाली की, "मी त्याचे गौरव केले आहे व पुन्हाही त्याचे गौरव करीन." 29जो जमाव तेथे होता त्याने हे ऐकले व म्हटले, "गडगडाट झाला." दुसरे म्हणाले, देवदूत त्याच्याशी बोलला.

30येशू म्हणाला, "हा आवाज तुमच्यासाठी होता. माझ्यासाठी नव्हे. 31या जगाचा न्याय होण्याची आता वेळ आली आहे. या जगाच्या राजकुमाराला हाकलून देण्यात येईल. 32परंतु मी, जेव्हा पृथ्वीपासून वर उचलला जाईन, तेव्हा मी सर्व लोकांना माझ्याकडे ओढीन." 33त्याने हे यासाठी म्हटले की कोणत्या प्रकारच्या मरणाने तो मरणार आहे हे त्याला दाखवायचे होते.

34जमाव म्हणाला, "ख्रिस्त सर्वकाळ राहतो असे आम्ही नियमशास्त्रातून ऐकले आहे, तर मनुष्याच्या पुत्राला उंच केले पाहिजे असे तुम्ही का म्हणता? मनुष्याचा पुत्र कोण आहे?"

35मग येशू त्यांना म्हणाला, "आणखी थोडा वेळ प्रकाश तुमच्यामध्ये असणार आहे. तुमच्यामध्ये प्रकाश आहे तोपर्यंत तुम्ही चाला. यासाठी की अंधाराने तुमच्यावर मात करू नये. कारण जो अंधारात चालतो त्याला आपण कोठे जातो हे कळत नाही. 36तुम्ही प्रकाशाची मुले व्हावे म्हणून तुम्हांला प्रकाश आहे तोपर्यंत त्याच्यावर विश्वास ठेवा." येशू या गोष्टी बोलला, मग तो निघून गेला. आणि त्यांच्यापासून गुप्त राहिला.

### यहूदी येशूवर विश्वास ठेवण्याचे नाकारतात

37येशूने इतके चमत्कार त्यांच्यासमोर केलेले असतानाही ते त्याच्यावर विश्वास ठेवीनात. 38यासाठी की, यशया संदेष्टेयाचे वचन पूर्ण व्हावे :

"प्रभु, आमच्या संदेशावर कोणी विश्वास ठेवला आहे.
आणि प्रभूचा हस्तप्रताप कोणास प्रगट झाला आहे?"
*यशया 53:1*

39या कारणासाठी त्यांनी विश्वास ठेवला नाही, जसे यशया एके ठिकाणी म्हणतो,

40"त्यांनी डोळ्यांनी पाहू नये, व अंत:करणाने समजू नये, फिरू नये व मी त्यांना बरे करू नये म्हणून त्याने त्यांचे डोळे आंधळे केले आणि त्यांचे अंत:करण कठीण केले आहे." *यशया 6:10*

41यशया असे म्हणाला, कारण त्याने त्याचे गौरव पाहिले आणि तो त्याच्याविषयी बोलला. 42तरीही अधिकाऱ्यातील पुष्कळांनी त्याच्यावर विश्वास ठेवला. पण आपणांस सभास्थानाच्या बाहेर घालवू नये म्हणून परूश्यांमुळे त्यांनी हे पत्करले नाही. 43कारण त्यांना देवाच्या गौरवापेक्षा मनुष्याकडील गौरव अधिक आवडले.

### येशूची शिकवण लोकांचा न्याय करील

44तेव्हा येशू मोठ्याने बोलला, "जो माझ्यावर विश्वास ठेवतो तो माझ्यावर विश्वास ठेवतो असे नाही, तर ज्याने मला पाठविले त्याच्यावर विश्वास ठेवतो. 45आणि जो मला पाहतो, तो ज्याने मला पाठविले त्याला पाहतो. 46मी प्रकाश असा जगात आलो आहे. यासाठी की जो कोणी माझ्यावर विश्वास ठेवतो त्याने अंधारात राहू नये.

47"आणि जो कोणी माझी वचने ऐकून पाळीत नाही, त्याचा न्याय मी ठरवीत नाही. कारण मी जगाचा न्याय करण्यासाठी आलो नाही, तर जगाच्या तारणासाठी आलो आहे. 48जो माझा स्वीकार करीत नाही व माझ्या वचनाप्रमाणे वागत नाही त्याचा न्याय करणारा कोणी

एक आहे. जे वचन मी बोललो तेच शेवटच्या दिवशी
त्याचा न्याय करील. 49कारण मी स्वत:हून बोललो असे
नाही तर मी काय सांगावे व काय बोलावे याविषयी ज्या
पित्याने मला पाठविले, त्यानेच मला आज्ञा केली आहे.
50आणि त्याची आज्ञा अनंतकाळचे जीवन आहे. हे मला
ठाऊक आहे, म्हणून जे काही मी बोलतो ते जसे पित्याने
मला सांगितले तसेच बोलतो.”

## येशू त्याच्या शिष्यांचे पाय धुतो

13 मग वल्हांडण सणापूर्वी येशूने आपण या जगातून
निघून पित्याकडे जावे असा समय आला आहे,
हे जाणून आपले स्वत:चे लोक जे जगात होते त्यांच्यावर
शेवटपर्यंत प्रीति केली. 2मग संध्याकाळचे भोजन होण्याच्या
वेळेस सैतानाने शिमोनाचा मुलगा यहूदा इस्कर्योत याच्या
मनात त्याला शत्रूंच्या हाती द्यावे असे आधीच घालून दिले
असताना, 3आपल्या हाती पित्याने सर्व काही दिले आहे
आणि आपण देवापासून आलो आणि आता देवाकडे जातो
हे ओळखून, 4येशू जेवणावरून उठला, त्याने आपली
बाह्यवस्त्रे काढून ठेवली व रुमाल घेऊन आपल्या कमरेस
बांधला. 5मग तो गंगाळात पाणी ओतून शिष्यांचे पाय धुऊ
लागला. आणि कमरेस बांधलेल्या रुमालाने पुसू लागला.
6मग तो शिमोन पेत्राकडे आला; पण पेत्र त्याला म्हणाला,
“प्रभु, तू माझे पाय धुणार काय?”
7येशूने उत्तर दिले, “मी आता जे करीत आहे, ते तुला
आता कळणार नाही. तर पुढे तुला कळेल.” 8पेत्र त्याला
म्हणाला, “तू माझे पाय कधीही धुवायचे नाहीत.”
येशूने उत्तर दिले, “जर मी तुझे पाय धुतले नाहीत तर
तुला माझ्या बरोबर वाटा नाही.”
8शिमोन पेत्राने उत्तर दिले, 9“मग प्रभु माझे पायच नव्हे
तर हात व डोकेही धुवा.”
10येशूने उत्तर दिले, “ज्याची आंघोळ झाली आहे, त्याचे
फक्त पाय धुतले तरी चालेल, कारण तो स्वच्छच आहे.
तुम्ही स्वच्छ आहात पण सर्वच नाहीत.” 11आपल्याला
कोण धरून देणार हे येशूला माहीत होते, म्हणून “तुम्ही
सर्वच शुद्ध नाहीत” असे तो म्हणाला.
12जेव्हा त्याने त्याचे पाय धुण्याचे संपविले तेव्हा त्याने
आपली बाह्यवस्त्रे घातली व आपल्या जागेवर आला.
त्याने त्यांना विचारले, “मी काय केले हे तुम्हांला समजले
काय? 13तुम्ही मला ‘गुरुजी’ आणि ‘प्रभु’ म्हणता आणि
योग्य म्हणता, कारण मी तोच आहे. 14म्हणून मी जो प्रभु
आणि गुरू असूनही मी तुमचे पाय धुतले तर तुम्हीही
एकमेकांचे पाय धुवावे. 15कारण जसे मी केले तसे तुम्हीही
करावे म्हणून मी तुम्हांला उदाहरण घालून दिले. 16मी
खरे सांगतो, दास आपल्या मालकापेक्षा श्रेष्ठ नाही आणि
पाठविलेला ज्याने पाठविले त्याच्यापेक्षा श्रेष्ठ नाही. 17या
गोष्टी जर तुम्ही समजता आणि त्या तुम्ही जर केल्या तर
तुम्ही आशीर्वादित आहात.

18“मी तुम्हां सर्वांविषयी बोलत नाही. ज्यांना मी निवडले
ते मला माहीत आहेत.” परंतु पवित्र शास्त्रात जसे लिहिले
आहे तसे घडलेच पाहिजे : ‘जो माझी भाकर खातो त्याने
माझ्यावर आपली टाच उचलली आहे.’*
19हे होण्याअगोदरच मी तुम्हांस सांगतो, यासाठी की
जेव्हा हे होईल तेव्हा तुम्ही विश्वास धरावा, की मी तो
आहे. 20मी तुम्हांस खरे सांगतो ज्या कोणाला मी पाठवितो
त्याला जो स्वीकारतो, तो मला स्वीकारतो, आणि जो
मला स्वीकारतो तो ज्याने मला पाठविले त्याला
स्वीकारतो.”

## येशू त्याच्याविरुद्ध कोण असेल ते सांगतो

*(मत्तय 26:20-25; मार्क 14:17-21; लूक 22:21-23)*

21असे बोलल्यावर येशू आपल्या आत्म्यात व्याकुळ
झाला आणि उघडपणे म्हणाला, “मी तुम्हांला खरे सांगतो,
तुमच्यातील एकजण मला धरून देईल.”
22तेव्हा तो कोणाविषयी बोलतो असा संशय धरून शिष्य
एकमेकांकडे पाहू लागले. 23आणि ज्याच्यावर येशू प्रीति
करीत असे असा त्याच्या शिष्यातील एकजण येशूच्याजवळ
खेटून बसला होता. 24शिमोन पेत्राने त्या शिष्याला खुणावले
आणि म्हणाला, “ज्याच्याविषयी तो बोलतो तो कोण आहे
हे विचार.” 25तेव्हा तो तसाच येशूच्या अगदी जवळ असता
त्याला म्हणाला, “प्रभु तो कोण आहे?”
26येशूने उत्तर दिले, “ज्याला मी भाकरीचा तुकडा ताटात
भिजवून देईन तोच तो आहे.” मग त्याने भाकरीचा तुकडा
ताटात बुडवून घेतला व तो शिमोनाचा मुलगा यहूदा
इस्कर्योत याला दिला. 27त्याने भाकरीचा तुकडा घेतला
आणि सैतानाने त्याचा ताबा घेतला. मग येशूने त्याला
म्हटले, “तुला जे करायचे आहे ते लवकर कर.” 28पण
त्याने त्याला काय सांगितले हे जेवणास बसलेल्यांपैकी
कोणाला कळले नाही. 29कारण यहूदाजवळ पैशाचा
व्यवहार होता. काहींना वाटले येशू त्याला भोजनास जे
पाहिजे ते आणण्यासाठी सांगत आहे किंवा गरिबाला काही
देण्याविषयी सांगत आहे. 30यहूदाने भाकर घेतल्याबरोबर
तो बाहेर गेला कारण ती वेळ रात्रीची होती.

## येशू त्याच्या मरणाविषयी बोलतो

31तो गेल्यावर येशू म्हणाला, “आता मनुष्याच्या पुत्राचे
गौरव झाले आहे आणि त्याच्याठायी देवाचे गौरव झाले
आहे. 32देव आपल्याठायी त्याचे गौरव करील. तो त्याचे
गौरव लवकर करील. 33“माझ्या मुलांनो, अजून थोडा
वेळ मी तुमच्याबरोबर आहे. तुम्ही माझा शोध कराल
आणि जसे मी यहूद्यांस सांगितले की, जेथे मी जातो तेथे
तुमच्याने येता येणार नाही. तसेच मी तुम्हांलाही आता
सांगतो.

---

**जो माझी ... आहे** स्तोत्र. 41:9

34"मी तुम्हांला नवी आज्ञा देतो की, तुम्ही एकमेकांवर
प्रीति करा, जशी मी तुम्हांवर प्रीति केली आहे तशीच
तुम्हीही एकमेकांवर प्रीति करा. 35तुमची एकमेकांवर
प्रीति असली तर सर्व ओळखतील की तुम्ही माझे शिष्य
आहात."

## पेत्र येशूला नाकारिल

***(मत्तय 26:31-35; मार्क 14:27-31; लूक 22:31-34)***

36शिमोन पेत्र त्याला म्हणाला, "प्रभु, तुम्ही कोठे जात
आहात?"
येशूने उत्तर दिले, "जेथे मी जातो तेथे तुझ्याने येता
येणार नाही. पण नंतर तू माझ्यामागे येशील." 37पेत्र त्याला
म्हणाला, "माझ्याने आताच तुमच्या मागे का येता येणार
नाही?" मी तुमच्यासाठी मरायला तयार आहे."
38मग येशूने उत्तर दिले, "तू खरोखर आपला जीव
मजसाठी देशील? मी खरे सांगतो. तू मला तीन वेळा
नाकारीपर्यंत कोंबडा आरवणार नाही."

## येशू शिष्यांचे समाधान करतो

14 "तुमचे अंत:करण अस्वस्थ होऊ नये, देवावर
विश्वास ठेवा आणि माझ्यावरही विश्वास ठेवा.
2माझ्या पित्याच्या घरात राहण्याच्या पुष्कळ जागा आहेत,
जागा नसत्या तर मी तुम्हांला सांगितले असते. कारण मी
तुमच्यासाठी जागा तयार करायला जातो. 3मी गेल्यावर
तुमच्यासाठी जागा तयार करीन आणि पुन्हा येईन. आणि
तुम्हांला माझ्याजवळ घेईन. यासाठी की जेथे मी आहे तेथे
तुम्हीही असावे. 4आणि मी कोठे जातो तिकडे जाण्याचा
मार्गही तुम्हांला ठाऊक आहे."
5थोमा येशूला म्हणाला, "प्रभु, तुम्ही कोठे जात आहात
हे आम्हांला ठाऊक नाही. मग आम्हांला मार्ग कसा
ठाऊक असणार?"
6येशूने उत्तर दिले, "मी मार्ग, सत्य आणि जीवन आहे.
केवळ माझ्याद्वारेच पित्याजवळ जाता येते. 7जर तुम्ही
मला ओळखले असते तर माझ्या पित्यालाही ओळखले
असते, आणि आतापासून तुम्ही त्याला ओळखता व त्याला
पाहिले आहे."
8फिलिप्प येशूला म्हणाला, "प्रभु, आम्हांला पिता दाखवा.
एवढेच आमचे मागणे आहे.
9येशूने त्याला म्हटले, "फिलिप्पा, मी इतका वेळ
तुमच्याजवळ असताना तू मला ओळखले नाहीस काय?
ज्याने मला पाहिले आहे, त्याने पित्याला पाहिले आहे. तर
मग 'आम्हांला पिता दाखव' असे तू कसे म्हणतोस? 10मी
पित्यामध्ये आहे व पिता मजमध्ये आहे, असा विश्वास तू
धरत नाहीस काय? ज्या गोष्टी मी तुम्हांला सांगतो त्या
माझ्या स्वत:च्या नाहीत तर माझ्यामध्ये जो पिता आहे तो
स्वत: कामे करतो. 11मी पित्यामध्ये आहे व पिता मजमध्ये
आहे असा विश्वास धरा. नाहीतर मी केलेल्या कामावरून
तरी माझ्यावर विश्वास ठेवा. 12मी तुम्हांला खरे सांगतो
मी जी कामे करतो ती कामे माझ्यावर विश्वास ठेवणाराही
करील. आणि त्यापेक्षाही मोठी कामे करील. कारण मी
पित्याकडे जातो. 13आणि तुम्ही जे काही माझ्या नावाने
माझ्याजवळ मागाल ते मी करीन यासाठी की, पुत्रामध्ये
पित्याचे गौरव व्हावे. 14जर तुम्ही माझ्या नावाने माझ्याजवळ
काही मागाल तर ते मी करीन."

## पवित्र आत्म्याचे अभिवचन

15"जर तुम्ही माझ्यावर प्रीति करित असाल, तर ज्या
आज्ञा मी करतो त्या तुम्ही पाळाल. 16आणि मी पित्याला
सांगेन आणि तो तुम्हांला दुसरा साहाय्यकर्ता देईल, यासाठी
की त्याने तुम्हांबरोबर सर्वकाळ राहावे. 17साहाय्यकर्ता
हा सत्याचा आत्मा आहे. जग त्याचा स्वीकार करू शकत
नाहीत. कारण ते त्याला पाहत किंवा ओळखत नाही. पण
तुम्ही त्याला ओळखता, कारण तो तुमच्याबरोबर राहतो,
तो तुमच्यामध्ये वास करील.
18"मी तुम्हांला अनाथ असे सोडणार नाही. मी
तुमच्याकडे येईन. 19आणखी काही वेळाने जग मला
पाहणार नाही. परंतु तुम्ही मला पाहाल. मी जगतो आहे
म्हणून तुम्हीही जगाल. 20त्या दिवशी तुम्हांला जाणीव
होईल की, मी आपल्या पित्यामध्ये आहे आणि तुम्ही
माझ्यामध्ये आहात मी तुमच्यामध्ये आहे. 21ज्याच्याकडे
माझ्या आज्ञा आहेत आणि त्या जो पाळतो, तो असा आहे
की जो माझ्यावर प्रीति करतो. त्याच्यावर पिता प्रीति
करील. मीसुद्धा त्याच्यावर प्रीति करीन आणि स्वत:ला
त्याच्यासाठी प्रगट करीन."
22मग यहूदा (यहूदा इस्कर्योत नव्हे) त्याला म्हणाला,
"पण प्रभु, तू आम्हांसमोर स्वत:ला का प्रगट करणार
आहेस आणि जगासमोर का नाही?"
23येशूने उत्तर दिले, "जर कोणी माझ्यावर प्रीति करतो
तर तो माझी शिकवण पाळील. माझा पिता त्याच्यावर
प्रीति करील. आम्ही त्याच्याकडे येऊ व त्याच्याबरोबर
राहू. 24जो माझ्यावर प्रीति करीत नाही, तो माझी शिकवण
पाळणार नाही. हे शब्द जे तुम्ही ऐकता ते माझे नाहीत.
ज्या पित्याने मला पाठविले त्याचे हे शब्द आहेत."
25"मी तुम्हांजवळ राहत असतानाच तुम्हांस या गोष्टी
सांगितल्या आहेत. 26तरी ज्याला पिता माझ्या नावाने
पाठवील तो साहाय्यकर्ता म्हणजे पवित्र आत्मा तुम्हांस
सर्व शिकवील. आणि ज्या गोष्टी मी तुम्हांस सांगितल्या
त्या सर्वांची तुम्हांस आठवण करून देईल.
27"शांति मी तुमच्याजवळ ठेवतो, माझी शांति मी तुम्हांला
देतो. जसे जग देते तशी शांति मी तुम्हांला देत नाही.
तुमची अंत:करणे अस्वस्थ होऊ देऊ नका. आणि भिऊ
नका. 28'मी जातो आणि तुम्हांकडे येणार आहे' असे मी
तुम्हांस सांगितले ते तुम्ही ऐकले आहे, जर तुमची माझ्यावर
प्रीति असती तर मी पित्याकडे जातो याबद्दल तुम्ही आनंद

केला असता. कारण माझा पिता माझ्यापेक्षा महान आहे.
29मी तुम्हांला हे घडण्यापूर्वी सांगितले आहे. यासाठी की
जेव्हा हे घडेल तेव्हा तुम्ही विश्वास धरावा. 30मी जास्त
काळ तुमच्याशी बोलणार नाही. कारण या जगाचा अधिपती
येत आहे, तरी त्याचा माझ्यावर अधिकार नाही. 31परंतु
जगाने हे शिकले पाहिजे की, मी पित्यावर प्रीति करतो
आणि माझ्या पित्याने जी आज्ञा मला केलेली आहे, नेमके
तसेच मी करतो.
“चला आता, आपण निघू या.”

## येशू द्राक्षवेल आहे

15 मी खरा द्राक्षवेल आणि माझा पिता माळी आहे.
2तो माझ्यातील फळ न देणारी प्रत्येक फांदी
तोडून टाकतो. ज्या प्रत्येक फांद्या फळ देतात त्यांनी अधिक
फळ द्यावे म्हणून त्या द्राक्षवेलीला तो साफ करतो. 3जे
वचन मी तुम्हांला सांगितले, त्यामुळे तुम्ही आता स्वच्छ
झालाच आहा. 4तुम्ही माझ्यामध्ये राहा आणि मी तुम्हांमध्ये
राहीन. जसा फाटा वेलात राहिल्यावाचून त्याच्याने फळ
देता येत नाही तसे माझ्यामध्ये राहिल्याशिवाय तुम्हांला
फळ देता येणार नाही.
5“मी वेल आहे, तुम्ही फाटे आहा, जो माझ्यामध्ये
राहतो व मी त्याच्यामध्ये राहतो, तोच पुष्कळ फळ देतो.
कारण माझ्यापासून वेगळे असल्यास तुमच्याने काही होत
नाही. 6कोणी माझ्यामध्ये राहिला नाही तर तो फाट्याप्रमाणे
बाहेर टाकला जातो. तो वाळून जातो मग त्याला गोळा
करून अग्नीत टाकतात व ते जाळण्यात येते. 7“तुम्ही
माझ्यामध्ये राहिलात व माझी वचने तुम्हामध्ये राहिली
तर जे काही तुम्हांला पाहिजे ते तुम्ही मागा म्हणजे ते
तुम्हांस मिळेल. 8तुम्ही पुष्कळ फळ दिल्यानेच माझ्या
पित्याचे गौरव होते, आणि तुम्ही माझे शिष्य व्हाल.
9जशी पित्याने माझ्यावर प्रीति केली आहे तशीच मीही
तुम्हांवर प्रीति केली आहे. माझ्या प्रीतीत राहा. 10ज्याप्रमाणे
मी आपल्या पित्याच्या आज्ञा पाळल्या म्हणून त्याच्या प्रीतीत
राहतो तसेच तुम्ही माझ्या आज्ञा पाळाल तर माझ्या प्रीतीत
राहाल. 11माझा आनंद तुम्हांमध्ये राहावा आणि तुमचा
आनंद पूर्ण व्हावा, म्हणून मी तुम्हांला या गोष्टी सांगितल्या
आहेत. 12जशी मी तुम्हांवर प्रीति केली तशीच तुम्ही
एकमेकांवर प्रीति करा. ही माझी आज्ञा आहे. 13आपल्या
मित्रासाठी मरावे, यापेक्षा कोणाचीही प्रीति मोठी नाही.
14मी आज्ञा करतो तसे तुम्ही वागता तर तुम्ही माझे मित्र
आहात. 15आता मी तुम्हांला सेवक म्हणत नाही, कारण
आपला धनी काय करतो हे सेवकाला माहीत नसते, पण
मी तुम्हांला मित्र म्हणतो कारण ज्या गोष्टी मी आपल्या
पित्याकडून ऐकल्या त्या सर्व तुम्हांला कळविल्या आहेत.
16तुम्ही मला निवडले नाही, तर मी तुम्हांला निवडले
आणि नेमले आहे. यासाठी की, तुम्ही जाऊन फळ द्यावे.
आणि तुमचे फळ टिकावे. यासाठी की जे काही तुम्ही
माझ्या नावाने पित्याजवळ मागाल ते त्याने तुम्हांस द्यावे.
17तुम्ही एकमेकांवर प्रीति करावी म्हणून या गोष्टी मी
तुम्हांस आज्ञा देऊन सांगतो.

## येशू त्याच्या अनुयायांना सूचना देतो

18“जर जग तुमचा द्वेष करते, तर लक्षात ठेवा की,
पहिल्यांदा जगाने माझासुध्दा द्वेष केलेला आहे. 19तुम्ही
जर जगाचे असता तर जगाने तुम्हावर जशी ते स्वत:वर
करतात तशी प्रीति केली असती. पण तुम्ही जगाचे नसल्याने,
आणि तुमची जगातून निवड केल्याने, जग तुमचा द्वेष
करते. 20जे शब्द तुम्हांला सांगितले ते लक्षात ठेवा.
कोणताही नोकर आपल्या मालकापेक्षा श्रेष्ठ नसतो. त्यांनी
जर माझी छळणूक केली तर ते तुमचीही करतील. त्यांनी
जर माझी शिकवण पाळली तर ते तुमचीसुद्धा पाळतील.
21माझ्या नावामुळे ते तुमच्याशी अशाप्रकारे वागतील,
कारण ज्याने मला पाठविले, त्याला ते ओळखत नाहीत.
22जर मी आलो नसतो आणि त्यांना सांगितले नसते तर ते
पापाबद्दल दोषी ठरले नसते. आता त्यांना त्यांच्या पापाविषयी
सबब सांगता येणार नाही. 23जो माझा द्वेष करतो तो
माझ्या पित्याचाही द्वेष करतो. 24मी त्या लोकांमध्ये अशा
गोष्टी केल्या ज्या दुसऱ्या कोणीही केल्या नाहीत. मी जर
त्या गोष्टी केल्या नसत्या, तर पापाबद्दल ते दोषी ठरले
नसते, पण आता त्यांनी ते चमत्कार पाहिले आहेत आणि
तरीही त्यांनी माझा व माझ्या पित्याचा द्वेष केला. 25परंतु
नियमशास्त्रात लिहिलेले पूर्ण व्हावे म्हणून हे घडले: ‘कारण
नसताना त्यांनी माझा द्वेष केला.’*
26“पित्यापासून मी साहाय्यकर्ता पाठवीन. साहाय्यकर्ता
हा सत्याचा आत्मा आहे. तो पित्यापासून येतो. जेव्हा तो
येतो तेव्हा तो माझ्याविषयी सांगतो. 27आणि तुम्हीसुद्धा
माझ्याविषयी लोकांना सांगाल. कारण तुम्ही माझ्याबरोबर
सुरूवातीपासून आहात.”

16 मी हे सर्व तुम्हांला सांगितले आहे ते यासाठी की,
तुम्ही माझ्यावरील विश्वासाविषयी भुलविले जाऊ
नये. 2ते तुम्हांला सभास्थानाच्या बाहेर काढतील; खरे
पाहता अशी वेळ येत आहे की, जो कोणी तुमचा जीव
घेईल त्याला वाटेल की, आपण देवाची सेवाच करीत
आहोत. 3आणि ते तुम्हांला असे जरूर करतील कारण
त्यांना पिता किंवा मी माहीत नाही. 4मी तुम्हांला आता या
गोष्टी सांगितल्या आहेत, म्हणून या गोष्टी घडण्याची वेळ
येईल, तेव्हा मी तुम्हांला त्यांच्याविषयी सावध केले होते
हे तुमच्या लक्षात येईल.

## पवित्र आत्म्याचे कार्य

5“परंतु ज्याने मला पाठविले त्याच्याकडे आता मी जातो.
‘तरी तू कोठे जातोस’ असे तुम्हांतील कोणी मला विचारीत

**कारण ... केला** स्तोत्र. 69:4

नाही. 6पण या गोष्टी मी तुम्हांला सांगितल्या आहेत म्हणून
तुमचे अंत:करण दु:खाने भरले आहे. 7तरी तुम्हांस खरे
ते सांगतो, मी जातो हे तुमच्या हिताचे आहे कारण मी
गेलो नाही तर साहाय्यकर्ता तुमच्याकडे येणार नाही. पण
जर मी गेलो तर मी त्याला तुमच्याकडे पाठवीन. 8आणि
तो येऊन पाप, धार्मिकता आणि न्याय याविषयी जग दोषी
आहे हे सिद्ध करील. 9मी पापाविषयी सांगितले तर, लोक
माझ्यावर विश्‍ववास ठेवीत नाहीत. साहाय्यकर्ता (पवित्र
आत्मा ) त्यांना त्यांची जाणीव करून देईल
10नीतिमत्त्वाविषयी मी पित्याकडे जात आहे. मी देवाशी
प्रामाणिक असण्याचे तो साहाय्यकर्ता (पवित्र आत्मा) त्यांना
पटवून देईल" 11हा साहाय्यकर्ता जगाला न्यायाचे सत्य
पटवून देईल. कारण या जगाच्या अधिपतीचा (सैतान)
न्याय होऊन चुकला आहे. 12"मला आणखी पुष्कळ
सांगावयाचे आहे. तुम्हांला झेपणार नाही इतके सांगायचे
आहे. 13पण जेव्हा तो सत्याचा आत्मा येतो, तेव्हा तो
तुम्हांला सर्व सत्यात मार्गदर्शन करील. तो त्याचे स्वत:चे
असे काही बोलणार नाही. तो जे ऐकतो तेच तो बोलेल,
आणि जे अजून यावयाचे आहे. त्याविषयी तो तुम्हांला
सांगेल. 14जे माझे आहे त्यातून घेऊन आणि ते तुम्हांला
कळवून तो माझे गौरव करील. 15जे सर्व पित्याचे आहे,
ते माझे आहे. या कारणासाठीच मी म्हणालो, की आत्मा
जे माझे आहे त्यातून घेईल आणि ते तुम्हांला कळवील.

## दु:ख आनंदामध्ये बदलेल

16"थोड्या वेळाने तुम्ही मला पाहणार नाही, नंतर थोड्या
वेळाने तुम्ही मला पाहाल." 17त्याच्या शिष्यांतील काही
जण एकमेकांस म्हणाले, "तो असे म्हणतो याचा अर्थ
काय? थोड्या वेळाने तुम्ही मला पाहणार नाही. मग थोड्या
वेळाने तुम्ही मला पाहाल. कारण मी पित्याकडे जात
आहे!" 18ते विचारतच राहिले, 'थोड्या वेळाने' याचा अर्थ
काय? तो काय म्हणत आहे हे आम्हांला समजत नाही."

19येशूने पाहिले की, याविषयी त्यांना काही विचारायचे
आहे. म्हणून तो त्यांना म्हणाला, "तुम्ही एकमेकांना हे
विचारीत आहात काय की, जेव्हा मी म्हणालो, 'थोड्या
वेळाने तुम्ही मला पाहणार नाही, आणि मग थोड्या वेळाने
तुम्ही मला पाहाल?' 20मी तुम्हांला खरे सांगतो, जग आनंद
करीत असताना तुम्ही रडाल आणि शोक कराल. तुम्ही
दु:खी व्हाल, पण तुमेच दु:ख आनंदात बदलेल. 21जन्म
देणाऱ्या स्त्रीला वेदना होतात कारण तिची वेळ आलेली
असते. पण जेव्हा बाळ जन्मते तेव्हा ती सर्व वेदना विसरते.
कारण एक बाळ या जगात जन्म घेते. 22त्याप्रमाणे तुम्हाला
आता खरोखर दु:ख आहे, पण मी तुम्हांला पुन्हा भेटेन,
आणि तुम्ही आनंद कराल आणि कोणीही तुमचा आनंद
हिरावून घेणार नाही. 23त्या दिवशी तुम्ही माझ्याकडे काही
मागणार नाही. मी खरे सांगतो, माझ्या नावाने जे काही
तुम्ही मागाल ते माझा पिता तुम्हांला देईल. 24आतापर्यंत
तुम्ही माझ्या नावाने काही मागितले नाही. मागा म्हणजे
तुम्हांला मिळेल आणि तुमचा आनंद परिपूर्ण होईल."

## जगावर विजय

25"जरी मी तुम्हांला रूपकाच्या भाषेत या गोष्टी
सांगितल्या आहेत, तरी मी आणखी अशा प्रकारची भाषा
बोलणार नाही. पण साधेपणाने पित्याविषयी तुम्हांला सांगेन.
26त्या दिवशी तुम्ही माझ्या नावाने मागाल, आणि मी
तुमच्यासाठी पित्याकडे विनंति करीन असे मी म्हणत
नाही. 27कारण पिता स्वत: तुमच्यावर प्रीति करतो कारण
तुम्ही माझ्यावर प्रीति केली व माझ्यावर विश्‍वास ठेवला
की, मी देवापासून आलो. 28मी पित्यापासून आलो आणि
जगात प्रवेशलो आणि आता मी जग सोडत आहे. आणि
पित्याकडे पुन्हा जात आहे."

29मग येशूचे शिष्य म्हणाले, "आता तुम्ही स्पष्टपणे
बोलत आहात आणि रूपकाची भाषा वापरीत नाही. 30आता
आम्हांला पक्के समजले की, तुम्हांला सर्व माहीत आहे.
आणि तुम्हाला कोणी प्रश्‍न विचारण्याचीसुद्धा आवश्यकता
नाही. यामुळे आमचा विश्‍वास बसतो की, आपण देवापासून
आला आहात."

31येशूने उत्तर दिले, "आता तुम्ही विश्‍वास धरू लागला
काय? 32पण अशी वेळ येत आहे आणि आली आहे,
जेव्हा तुमची पांगापांग होईल. प्रत्येक जण त्याच्या घरी
जाईल. तुम्ही मला एकटेच सोडाल, तरीही मी एकटा
नाही कारण माझा पिता मजबरोबर आहे." 33"मी तुम्हांला
या गोष्टी सांगितल्या आहेत. यासाठी की माझ्यामध्ये तुम्हांला
शांति मिळावी. या जगात तुम्हांला त्रास होईल. पण धीर
धरा! मी जगावर मात केली आहे."

## येशू त्याच्या अनुयायांसाठी प्रार्थना करतो

17 येशूने हे बोलणे संपविल्यावर आपले डोळे
आकाशाकडे लावले आणि प्रार्थना केली: "पित्या,
वेळ आली आहे, पुत्राचे गौरव कर, यासाठी की, पुत्र तुझे
गौरव करील. 2तू त्याला जे दिले आहे त्या सर्वांना त्याने
अनंतकालचे जीवन द्यावे यासाठी सर्व मनुष्यांवर तू त्याला
अधिकार दिलास त्याप्रमाणे त्याने तुझे गौरव करावे. 3आणि
अनंतकाळचे जीवन हेच की, तू जो एकच खरा देव त्या
तुला व ज्याला तू पाठविलेस त्या येशू ख्रिस्ताला त्यांनी
ओळखावे. 4तू मला जे काम करायला दिले ते संपवून मी
पृथ्वीवर तुला गौरविले. 5तर आता हे पित्या, जग होण्यापूर्वी
तुझ्याबरोबर जे गौरव मला होते त्याद्वारे तू स्वत:बरोबर
माझे गौरव कर."

6"ज्यांना तू मला या जगातून दिलेस, त्यांना मी तुला
प्रगट केले. ते तुझे होते. व तू त्यांना माझ्या स्वाधीन
केलेस. आणि त्यांनी तुझे वचन पाळले. 7आता त्यांना
माहीत आहे की, जे काही तू मला दिले आहेस ते तुझ्यापासून
येते. 8कारण जी वचने तू मला दिली आहेस ती मी त्यांना

दिली. आणि त्यांनी ती स्वीकारली. त्यांना निश्चितार्थाने
माहीत होते की, मी तुझ्यापासून आलो आहे. आणि त्यांनी
विश्वास ठेवला की तू मला पाठविले आहेस. 9मी
त्यांच्यासाठी प्रार्थना करतो. मी जगासाठी प्रार्थना करीत
नाही. तर ज्यांना तू माझ्या स्वाधीन केलेस, त्यांच्यासाठीच
कारण ते तुझे आहेत. 10माझ्याकडे जे काही आहे ते तुझे
आहे आणि जे तुझे आहे ते माझे आहे. आणि त्यांच्याद्वारे
गौरव माझ्याकडे आले आहे. 11आणि यापुढे मी जगात
नाही, ते जगात आहेत, आणि मी तुझ्याकडे येत आहे. हे
पवित्र पित्या, जे नाव तू मला दिले आहेस, त्या तुझ्या
नावात त्यांना राख, यासाठी की, जसे आपण एक आहोत
तसे त्यांनीही एक व्हावे. 12मी त्यांच्याबरोबर होतो तोपर्यंत
जे नाव तू मला दिलेस त्या तुझ्या नावात मी त्यांना राखले.
आणि मी त्यांना संभाळले आणि ज्याने नाशाचा मार्ग
निवडला होता त्याच्याशिवाय त्यांच्यातील कोणी नाश
पावला नाही. हे यासाठी झाले की शास्त्रलेख पूर्ण व्हावा.
13"पण आता मी तुझ्याकडे येत आहे. आणि त्यांच्यामध्ये
माझा आनंद पूर्ण व्हावा म्हणून मी जगात या गोष्टी सांगतो."
14"मी त्यांना तुझे शब्द दिले आहेत आणि जगाने त्यांचा
द्वेष केला, कारण जसा मी या जगाचा नाही तसे तेही या
जगाचे नाहीत. 15या जगातून तू त्यांना काढून घ्यावेस
अशी माझी प्रार्थना नाही, पण दुष्टांपासून तू त्यांचे रक्षण
करावेस. 16जसा मी या जगाचा नाही, तसे तेसुद्धा या
जगाचे नाहीत. 17तू त्यांना सत्यात पवित्र कर. कारण
तुझा शब्द हेच सत्य आहे. 18जसे तू मला या जगात
पाठविले तसे मी त्यांना या जगात पाठवितो. 19त्यांच्यासाठी
मी स्वत:ला पवित्र करतो यासाठी की तेसुद्धा खऱ्या
अर्थाने पवित्र व्हावेत. 20आणि मी फक्त त्यांच्यासाठीच
विनंति करतो असे नाही, तर त्यांच्या वचनावरून जे
माझ्यावर विश्वास ठेवतात त्यांच्यासाठीही विनंति करतो.
21यासाठी की, त्या सर्वांनी एक व्हावे. पित्या, जसा तू
माझ्यामध्ये व मी तुझ्यामध्ये तसेच त्यांनी आम्हांमध्ये असावे.
यासाठी की, तू मला पाठविले असा जगाने विश्वास धरावा.
22आणि तू जे गौरव मला दिले आहे ते मी त्यांना दिले
आहे. यासाठी की जसे आपण एक आहो तसे त्यांनीही
एक व्हावे. 23मी त्यांच्यामध्ये आणि तू माझ्यामध्ये. ते
पूर्णपणे ऐक्यात आणले जावेत यासाठी की, हे जगाला
माहीत व्हावे की तू मला पाठविलेस आणि जशी तू माझ्यावर
प्रीति केलीस तशी मीही त्यांच्यावर केली.
24"हे पित्या, जे लोक तू मला दिलेस, त्यांनी मी जेथे
आहे तेथे माझ्याबरोबर असावे असे मला वाटते. आणि
त्यांनी माझे गौरव करावे. जगाच्या निर्मितीपूर्वी तू माझ्यावर
प्रीति केली, म्हणून जे गौरव तू मला दिलेस, तेच हे गौरव
आहे. 25नीतिमान पित्या, जरी जग तुला ओळखत नाही,
तरी मी तुला ओळखतो, आणि त्यांना माहीत आहे की, तू
मला पाठविलेले आहेस. 26मी त्यांना तुझा परिचय करून
दिला आहे. व तुझी ओळख करून देतच राहीन यासाठी
की जे प्रेम तू माझ्यावर करतोस ते त्यांच्यावरही करावेस
आणि मी स्वत: त्यांच्यामध्ये असावे."

## येशूला अटक

***(मत्तय 26:47-56; मार्क 14:43-50; लूक 22:47-53)***

18 या गोष्टी बोलल्यावर येशू आपल्या
शिष्यांबरोबर किद्रोन ओहोळाच्या पलीकडे गेला.
तेथे एक बाग होती. त्या बागेत तो व त्याचे शिष्य गेले.
2आणि त्याला धरून शत्रूच्या हाती देणारा यहूदा यालाही
ही जागा ठाऊक होती. कारण येशू आपल्या शिष्यांबरोबर
नेहमी तेथे येत असे. 3तेव्हा शिपायांची तुकडी, मुख्य
याजकाचे काही अधिकारी, परूशी यांना वाट दाखवीत
यहूदा तेथे बागेत आला. ते मशाल, कंदील आणि हत्यारे
घेऊन आले होते. 4मग येशू आपल्या बाबतीत जे काही
होणार हे सर्व जाणून पुढे जाऊन त्यांना म्हणाला, "तुम्हांला
कोण पाहिजे?"
5"नासरेथचा येशू." ते म्हणाले.
येशूने उत्तर दिले, "तो मी आहे" (आणि विश्वासघात
करणारा यहूदा तेथे त्यांच्यामध्ये उभा होता)
6जेव्हा येशू म्हणाला, "तो मी आहे," ते मागे सरले
आणि जमिनीवर पडले. 7पुन्हा त्याने त्यांना विचारले,
"तुम्हांला कोण पाहिजे?"
आणि ते म्हणाले, "नासरेथचा येशू"
8येशूने उत्तर दिले, "मी तुम्हांला सांगितले की तो मी
आहे. जर तुम्ही मला शोधत असाल तर या लोकांना
जाऊ द्या." 9हे यासाठी घडले की, जे शब्द बोलण्यात
आले होते, ते सर्व पूर्ण व्हावेत, "जे तू मला दिलेस त्यांतील
एकही मी गमावला नाही." 10मग शिमोन पेत्र, ज्याच्याकडे
तलवार होती, त्याने ती बाहेर काढली व मुख्य याजकाच्या
सेवकाचा कान कापला (सेवकाचे नाव मल्ख होते)
11येशूने पेत्राला आज्ञा केली, "तुझी तलवार तिच्या जागेवर
ठेव! पित्याने दिलेला प्याला मी पिऊ नये काय?"

## येशूला हन्नाकडे आणतात

***(मत्तय 26:57-58; मार्क 14:53-54; लूक 22:54)***

12मग शिपायांची तुकडी व त्यांचा सरदार आणि यहूदी
रक्षक यांनी येशूला अटक केली. त्याला त्यांनी बांधले
आणि 13त्याला प्रथम हन्नाकडे आणले. तो कयफा या
प्रमुख याजकाचा सासरा होता. कयफा त्या वर्षीचा प्रमुख
याजक होता. 14आणि कयफा हाच असे म्हणणारा होता
की सर्व माणसांसाठी एका माणसाने मरणे बरे.

## येशूला ओळखण्याविषयी पेत्र खोटे बोलतो

***(मत्तय 26:69-70; मार्क 14:66-68; लूक 22:55-57)***

15शिमोन पेत्र व दुसरा शिष्य येशूच्या मागून चालले.
कारण हा शिष्य प्रमुख याजकाच्या ओळखीचा होता, म्हणून
तो येशूच्या बरोबर प्रमुख याजकाच्या वाड्यात आत गेला.

16परंतु पेत्र दाराशी बाहेर उभा राहिला. म्हणून जो दुसरा शिष्य प्रमुख याजकाच्या ओळखीचा होता त्याने बाहेर जाऊन तेथे कामावर असणाऱ्या मुलीला सांगून पेत्राला आत आणले.

17ती मुलगी पेत्राला म्हणाली, “तूही त्या मनुष्याच्या शिष्यांपैकी आहेस काय?”

पेत्राने उत्तर दिले, “मी नाही.” 18थंडी असल्याने नोकरांनी व रक्षकांनी स्वत:ला गरम राखण्यासाठी शेकोटी पेटविली होती व ते शेकत उभे राहिले होते. पेत्रही त्यांच्याबरोबर शेकत उभा राहिला होता.

## मुख्य याजकाकडून येशूची चौकशी

***(मत्तय 26:59-66; मार्क 14:55-64; लूक 22:66-71)***

19तेव्हा प्रमुख याजकाने येशूला त्याच्या शिष्यांविषयी व त्याच्या शिकवणुकीविषयी विचारले, 20येशूने त्याला उत्तर दिले की, “मी उघडपणे जगाशी बोललो, सभास्थानात व मंदिरात जेथे सर्व यहूदी एकत्र जमतात तेथे मी नेहमी शिकविले आणि मी गुप्त असे काहीच बोललो नाही. 21मला तू का विचारतोस? ज्यांनी माझी शिकवण ऐकली, त्यांना विचार. मी काय बोललो ते त्यांना माहीत आहे.”

22येशूने असे म्हटले तेव्हा तेथे उभे असलेल्या रक्षकाने येशूला चपराक मारली. रक्षक म्हणाला, “तू प्रमुख याजकाला असे उत्तर देतोस काय?”

23येशूने त्याला उत्तर दिले, “जर मी वाईट बोललो असेन तर तसे सांग की मी चुकीचे बोललो पण जर चांगले बोललो असलो तर तू मला का मारतोस?” 24हन्नाने त्याला बांधलेलेच मुख्य याजक कयफाकडे पाठविले.

## पेत्र पुन्हा खोटे बोलतो

***(मत्तय 26:71-75; मार्क 14:69-72; लूक 22:58-62)***

25शिमोन पेत्र शेकत असता, त्याला विचारले गेले, “तू त्याच्या शिष्यांपैकी एक नाहीस ना?”

त्याने ते नाकारले, “मी नाही.”

26मुख्य याजकाच्या नोकरांपैकी एकजण ज्याचा कान पेत्राने कापला होता त्याचा नातेवाईक होता. तो म्हणाला, “मी तुला त्याच्याबरोबर बागेत पाहिले नाही काय?” 27पेत्राने पुन्हा ते नाकारले. आणि त्या क्षणी कोंबडा आरवला.

## येशूला पिलातासमोर आणतात

***(मत्तय 27:1-2, 11-31; मार्क 15:1-20; लूक 23:1-25)***

28नंतर यहूदी येशूला कयफाच्या घरातून रोमन राजवाड्याकडे घेऊन गेले. तेव्हा पहाट झाली होती. आपण विटाळले जाऊ नये व वल्हांडणाचे भोजन करता यावे म्हणून ते राजवाड्यात गेले नाहीत.

29म्हणून पिलात त्यांच्याकडे बाहेर येऊन म्हणाला, “तुम्ही या माणसावर कोणता आरोप करीत आहात?” 30तेव्हा त्यांनी त्याला उत्तर देऊन म्हटले, “हा जर दुष्कर्मी नसता तर आम्ही याला तुमच्या स्वाधीन केले नसते.” 31मग पिलाताने त्यांना म्हटले, “तुम्ही याला घेऊन आपल्या नियमशास्त्राप्रमाणे त्याचा न्याय करा.” यहूदी म्हणाले, “आम्हांला कोणाचा जीव घेण्याचा अधिकार नाही.” 32आपल्याला कसले मरण येणार हे सुचवून येशू जे वचन बोलला होता ते पूर्ण व्हावे म्हणून असे झाले.

33मग पिलात पुन्हा राजवाड्यात गेला. येशूला बोलावले आणि विचारले, “तू यहूद्यांचा राजा आहेस काय?” 34येशूने विचारले, “तू हे स्वत:हून विचारतोस की, दुसऱ्यांनी तुला माझ्याविषयी सांगितले.”

35पिलाताने उत्तर दिले, “मी यहूदी आहे काय? तुझे लोक आणि तुझ्या मुख्य याजकांनी तुला माझ्या हाती दिले. तू काय केले आहेस?”

36येशू म्हणाला, “माझे राज्य या जगाचे नाही. जर ते असते तर यहूद्यांपासून माझी सुटका करण्यासाठी माझे सेवक लढले नसते का? पण माझे राज्य दुसऱ्या ठिकाणचे आहे.”

37पिलात म्हणाला, “तर तू एक राजा आहेस!”

येशूने उत्तर दिले, “मी राजा आहे असे तू म्हणतोस तेव्हा बरोबर म्हणतोस. खरे पाहता, या कारणासाठी मी जन्मलो आणि सत्याविषयी साक्ष देण्यासाठी मी या जगात आलो. जे सर्व सत्याच्या बाजूचे आहेत ते माझे ऐकतात.”

38पिलाताने विचारले, “सत्य काय आहे?” असे म्हणून तो पुन्हा यहूद्यांकडे गेला. आणि म्हणाला, “मला याच्यात काहीच अपराध सापडत नाही. 39पण वल्हांडण सणात मी तुम्हांसाठी एकाला सोडावे अशी तुमच्यामध्ये रीत आहे. म्हणून मी तुमच्यासाठी यहूद्यांच्या राजाला सोडावे अशी तुमची इच्छा आहे काय?”

40ते ओरडले, “नको, त्याला नको! ‘आम्हांला बरब्बाला सोडा!’ बरब्बा एक दरोडेखोर होता.

19 मग पिलाताने येशूला नेऊन फटके मारण्याची आज्ञा दिली. 2आणि शिपायांनी काट्यांचा मुगुट गुंफून तो त्याच्या डोक्यात घातला. व त्याला जांभळे वस्त्र घातले. 3ते त्याच्याजवळ वारंवार येऊन त्याला म्हणाले,’ ‘हे यहूद्यांच्या राजा, तुझा जयजयकार असो!” आणि त्यांनी त्याच्या तोंडावर मारले.

4पुन्हा एकदा पिलात बाहेर आला आणि यहूद्यांना म्हणाला, “पाहा! मी त्याला बाहेर तुमच्याकडे आणत आहे, तुम्हांला हे समजावे म्हणून की, मला त्याच्यावर दोषारोप ठेवायला कोणतेच कारण सापडत नाही.” 5जेव्हा येशू काट्यांचा मुगुट व जांभळी वस्त्रे घालून बाहेर आला, तेव्हा पिलात त्यांना म्हणाला, “हा पहा तो मनुष्य!”

6मुख्य याजक व त्यांचे रक्षक त्याला पाहताक्षणीच मोठ्याने ओरडले, “त्याला वधस्तंभावर खिळा! वधस्तंभावर खिळा!” पण पिलाताने उत्तर दिले, “तुम्ही त्याला घ्या व वधस्तंभावर खिळा. माझ्या दृष्टीने त्याच्यावर आरोप ठेवण्यास कोणतेही कारण मला दिसत नाही.”

7यहूद्यांनी जोर देऊन म्हटले, “आम्हांला नियमशास्त्र
आहे, आणि त्या नियमशास्त्राप्रमाणे त्याने मेलेच पाहिजे.
कारण त्याने स्वत: देवाचा पुत्र असल्याचा दावा केला.”
8जेव्हा पिलाताने हे ऐकले, तेव्हा तो अधिकच घाबरला.
9आणि तो आत राजवाड्यात परत गेला. येशूला त्याने
विचारले, “तू कोठून आला आहेस?” पण येशूने त्याला
उत्तर दिले नाही 10पिलात म्हणाला, “तू माझ्याशी बोलण्यास
नकार देतोस काय? तुला वधस्तंभावर खिळण्याची किंवा
मुक्त करण्याची ताकद मला आहे, हे तुला समजत नाही
का?”

11येशूने उत्तर दिले, “जर वरून अधिकार देण्यात आला
नसता, तर तुला माझ्यावर अधिकार नसता. म्हणून ज्याने
मला तुझ्या स्वाधीन केले तो महान पापाचा दोषी आहे.”

12तेव्हापासून पिलाताने येशूला सोडण्याचा प्रयत्न केला,
पण यहूदी मोठमोठयाने ओरडत राहिले, “जर तुम्ही या
माणसाला जाऊ दिले, तर तुम्ही कैसराचे मित्र नाही. जो
कोणी स्वत: राजा असल्याचा दावा करतो, तो कैसराला
विरोध करतो.”

13जेव्हा पिलाताने हे ऐकले, तेव्हा त्याने येशूला बाहेर
आणले आणि फरसबंदी नावाची जागा, जिला इब्री भाषेत
‘गब्बाथा’ म्हणतात तेथे तो न्यायासनावर बसला. 14तो तर
वल्हांडणाची तयारी करण्याचा दिवस असून दुपारची वेळ
झाली होती.

15पिलात त्या यहूद्यांना म्हणाला, “पहा हा तुमचा राजा.”
यहूदी ओरडले, “त्याला घेऊन जा! त्याला घेऊन जा!
आणि वधस्तंभावर खिळून मारा!”

पिलाताने त्यांना विचारले, “मी तुमच्या राजाला वधस्तंभी
द्यावे काय?” मुख्य याजकांनी उत्तर दिले, “आम्हांला
कैसराशिवाय दुसरा कोणी राजा नाही.”

16मग त्याने त्याला वधस्तंभी खिळण्यासाठी त्यांच्या
हाती दिले.

## येशूला वधस्तंभावर खिळून मारतात

***(मत्तय 27:32-44; मार्क 15:21-32; लूक 23:26-43)***

मग शिपायांनी येशूचा ताबा घेतला. 17येशूने स्वत:चा
वधस्तंभ वाहिला. तो बाहेर कवटीची जागा म्हटलेल्या
ठिकाणी गेला. (इब्री भाषेत त्याला गुलगुथा म्हणतात.)
18गुलगुथा येथे त्यांनी येशूला वधस्तंभावर खिव्व्यांनी
ठोकले. त्यांनी आणखी दोन मनुष्यांनासुद्धा वधस्तंभावर
खिळले. त्या दोघांना त्यांनी येशूच्या दोन्ही बाजूंना खिळले
व मध्ये येशूला खिळले.

19आणि पिलाताने एक वाक्य लिहिले आणि ते
वधस्तंभावर लावले. त्यावर असे लिहिले होते की, “येशू
नासरेथकर- यहूद्यांचा राजा” 20ती पाटी यहूदी भाषेत
लिहिली होती. पुष्कळ यहूदी लोकांनी ती पाटी वाचली,
कारण येशूला जेथे वधस्तंभावर देण्यात आले होते ते
ठिकाण शहराच्या जवळ होते. तसेच ते लॅटीन, ग्रीक
आरामी भाषेतही लिहिले होते. 21यहूद्यांच्या मुख्य याजकांनी
पिलाताला विरोध केला. ते म्हणाले, ‘यहूद्यांचा राजा’ असे
लिहू नका, ‘तर हा मनुष्य यहूदी लोकांचा राजा आहे ’
“असा दावा करतो. असे लिहा.”

22पिलाताने म्हटले, “मी जे लिहिले ते लिहिले.”

23जेव्हा शिपायांनी येशूला वधस्तंभावर खिळले, तेव्हा
त्यांनी त्याची वस्त्रे घेतली. आणि चौघात ती वाटून घेतली.
फक्त अंतर्वस्त्रे ठेवली. हा पोशाख वरपासून खालपर्यंत
पूर्ण विणलेला होता. त्याला शिवलेले नव्हते. 24म्हणून ते
एकमेकांस म्हणाले, “हा आपण फाडू नये, तर यासाठी
चिठ्ठ्या टाकून कोणाला मिळतो ते ठरवू या.” हे यासाठी
घडले की, पवित्र शास्त्रात जे लिहिले होते ते पूर्ण व्हावे.

“त्यांनी माझी वस्त्रे आप आपसांत वाटून घेतली आणि
माझ्या वस्त्रासाठी चिठ्ठ्या टाकल्या.” *स्तोत्र. 22:18*

म्हणून शिपायांनी असे केले.

25येशूच्या वधस्तंभाशेजारी त्याची आई, त्याच्या आईची
बहीण, क्लोपाची आई मरीया आणि मरीया मग्दालिया
उभ्या होत्या. 26जेव्हा येशूने त्याच्या आईला तेथे पाहिले.
आणि ज्या शिष्यावर त्याची प्रीति होती तो जवळच उभा
होता. तेव्हा तो त्याच्या आईला म्हणाला, “आई, हा तुझा
मुलगा आहे,” 27आणि त्या शिष्याला येशू म्हणाला, “ही
तुझी आई आहे.” म्हणून त्या दिवसापासून या शिष्याने
तिला आपल्या घरी नेले.

## येशू प्राण सोडतो

***(मत्तय 27:45-56; मार्क 15:33-41; लूक 23:44-49)***

28नंतर, हे ओळखून की आता सर्व पूर्ण झाले आहे,
आणि पवित्र शास्त्रातील वचनांची परिपूर्ती व्हावी म्हणून,
येशू म्हणाला, “मला तहान लागली आहे.” 29तेथे एक
आंब भरून ठेवलेले भांडे होते, म्हणून त्यांनी बोळा आंबेत
बुडवून भरून एजोबाच्या काठीवर ठेवून त्याच्या तोंडाला
लावला. 30येशू आंब घेतल्यावर म्हणाला, “पूर्ण झाले
आहे.” मग त्याने आपले डोके लववून आपला आत्मा
सोडून दिला. 31तो तयारीचा दिवस होता व दुसऱ्या दिवशी
विशेष शब्बाथाचा दिवस होता. शब्बाथ दिवशी शरीरे
वधस्तंभावर राहू नयेत अशी यहूदी लोकांची इच्छा होती.
त्यांनी पिलाताला पाय तोडण्याची आणि शरीरे
वधस्तंभावरून खाली घेण्याविषयी विचारले. 32म्हणून
शिपायांनी येऊन येशूबरोबर वधस्तंभी खिळलेल्या
पहिल्याचे व नंतर दुसऱ्याचे पाय मोडून टाकले. 33पण
जेव्हा ते येशूकडे आले. तेव्हा त्यांना आढळून आले की,
तो अगोदरच मेला आहे. तेव्हा त्यांनी त्याचे पाय मोडले
नाहीत. 34तरी शिपायांपैकी एकाने त्याच्या कुशीत भाला
भोसकला, तेव्हा लगेच रक्त आणि पाणी बाहेर निघाले.
35ज्या मनुष्याने हे पाहिले, त्याने साक्ष दिली आहे आणि

त्याची साक्ष खरी आहे. त्याला माहीत आहे की, तो खरे
बोलतो व तो साक्ष देतो यासाठी की, तुम्ही विश्वास धरावा.
36या गोष्टी अशासाठी घडल्या की, पवित्र शास्त्राची परिपूर्ती
व्हावी: "त्याचे एकही हाड मोडणार नाही."* 37आणि
दुसऱ्या शास्त्रभागात म्हटले आहे : "ज्याला त्यांनी भोसकले
त्याला ते पाहतील."*

## येशूला कबरेत ठेवतात

**(*मत्तय 27:57-61; मार्क 15:42-47; लूक 23:50-56*)**

38नंतर अरिमथाई येथील योसेफाने पिलाताला येशूचे
शरीर मागितले. योसेफ हा येशूचा शिष्य होता, पण गुप्त
रीतीने, कारण त्याला यहूद्यांची भीति वाटत होती.
पिलाताच्या परवानगीने तो आला व शरीर घेऊन गेला.
39त्याच्याबरोबर निकदेम होता. याच मनुष्याने रात्रीच्या
वेळी येशूची भेट घेतली होती. निकदेम शंभर पौंड*
गंधरस व अगरू* घेऊन आला. 40मग त्यांनी येशूचे
शरीर घेतले आणि यहूदी लोकांच्या प्रेत पुरण्याच्या
रीतीप्रमाणे सुगंधित द्रव्यासहित तागांनी ते गुंडाळले. 41जेथे
त्याला वधस्तंभी मारले होते तेथे एक बाग होती. आणि
त्या बागेत एक नवीन थडगे होते. व त्या थडग्यात आतापर्यंत
कोणालाच ठेवलेले नव्हते. 42तो यहूद्यांच्या सणाच्या
पूर्वतयारीचा दिवस असल्याने व ते थडगे जवळ असल्याने
त्यांनी येशूला तेथेच ठेवले.

## काही अनुयायांना येशूची कबर रिकामी दिसते

**(*मत्तय 28:1-10; मार्क 16:1-8; लूक 24:1-12*)**

20 मग रविवारी सकाळी अगदी पहाटे मरीया
मग्दालिया थडग्याकडे आली आणि थडग्यावरून
धोंड काढलेली आहे असे तिला आढळले. 2म्हणून तिने
शिमोन पेत्र व ज्याच्यावर येशूची प्रीति होती तो दुसरा
शिष्य यांच्याकडे धावत येऊन म्हटले, "त्यांनी प्रभूला
थडग्यातून काढून नेऊन कोठे ठेवले हे आम्हांला माहीत
नाही."

3मग पेत्र व दुसरा शिष्य हे निघाले व थडग्याकडे गेले.
4तेव्हा ते दोघे बरोबर पळत गेले. आणि तो दुसरा शिष्य
पेत्रापेक्षा लवकर पुढे जाऊन त्याच्या आधी थडग्याजवळ
पोहोचला. 5आणि त्याने वाकून आत डोकावले. तेव्हा
त्याने तागाची वस्त्रे पडलेली पाहिली, पण तो आत गेला
नाही. 6मग शिमोन पेत्रही त्याच्यामागून आला व थडग्यात
आत गेला. 7तेव्हा तागाची वस्त्रे पडलेली आणि जो रुमाल
त्याच्या डोक्याला होता, तो तागाच्या वस्त्राबरोबर नाही,
तर निराळा एकीकडे गुंडाळलेला पडलेला त्याने पाहिला.
8शेवटी तो दुसरा शिष्य जो थडग्याकडे पहिल्यांदा पोहोचला
होता, तोसुद्धा आत गेला. त्याने पाहिले आणि विश्वास
ठेवला. 9येशूने मरणातून पुन्हा उठणे आवश्यक आहे, हे
त्यांना अजूनसुद्धा समजले नव्हते.

## येशू मरीया मग्दालियाला दिसतो

**(*मार्क 16:9-11*)**

10मग शिष्य त्यांच्या घरी गेले. 11पण मरीया थडग्यासमोर
रडत उभी राहिली. ती रडत असता आत डोकावण्यासाठी
वाकली 12आणि तिने दोन देवदूतांना पांढऱ्या पोशाखात
जेथे येशूचे शरीर होते तेथे बसलेले पाहिले. एकजण डोके
होते, तेथे बसला होता व एकजण पायाजवळ बसला होता.
13त्यांनी तिला विचारले, "बाई तू का रडत आहेस?"

ती म्हणाली, "ते माझ्या प्रभूला घेऊन गेले आहेत आणि
मला माहीत नाही, त्यांनी त्याला कोठे ठेवले आहे."
14यावेळी ती पाठमोरी वळाली. तिने तेथे येशूला उभे
असलेले पाहिले. पण तिला हे समजले नाही की तो येशू
आहे. 15तो म्हणाला, "बाई, तू का रडत आहेस? तू कोणाला
शोधत आहेस?"

तिला वाटले तो माळी आहे. ती म्हणाली, "दादा, जर तू
त्याला कोठे नेले असशील, तर मला सांग तू त्याला कोठे
ठेवले आहेस, म्हणजे मी त्याला घेऊन जाईन."

16येशू तिला म्हणाला, "मरीये"

ती त्याच्याकडे वळाली आणि अरेमी भाषेत मोठ्याने
ओरडली, "रब्बूनी!" (याचा अर्थ गुरूजी) 17येशू तिला
म्हणाला, "माझ्याजवळ येऊ नकोस, कारण मी अजून
पित्याकडे गेलो नाही. तर माझ्या भावांकडे जा आणि
त्यांना सांग : मी माझ्या पित्याकडे व तुमच्या पित्याकडे व
माझ्या देवाकडे व तुमच्या देवाकडे जात आहे."

18मरीया मग्दालिया ही बातमी घेऊन शिष्यांकडे गेली.
"मी प्रभुला पाहिले आहे!" आणि तिने त्यांना सांगितले
की, त्याने या गोष्टी सांगितल्या आहेत.

## येशू त्याच्या शिष्यांना दिसतो

**(*मत्तय 28:16-20; मार्क 16:14-18; लूक 24:36-49*)**

19आणि आठवड्याच्या पहिल्या दिवशी संध्याकाळी शिष्य
होते तेथील दार यहूदी लोकांच्या भीतीमुळे बंद असता,
येशू आला व मध्ये उभा राहिला. त्यांना म्हणाला, "तुम्हांला
शांति असो." 20असे बोलल्यावर त्याने आपले हात व
कूस त्यांना दाखविली, तेव्हा प्रभूला पाहून शिष्यांना आनंद
झाला.

21पुन्हा येशू म्हणाला, "तुम्हांबरोबर शांति असो! जसे
पित्याने मला पाठवले आहे, तसे मी तुम्हांला पाठवितो."
22आणि असे म्हणून त्याने त्यांच्यावर फुंकर टाकला
आणि म्हणाला, "पवित्र आत्मा स्वीकारा. 23जर तुम्ही

---

**त्याचे ... नाही** स्तोत्र. 34:20; निर्गम . 12:46; गणना 9:12

**ज्याला ... पाहतील** जखऱ्या 12:10

100 **रोमी पौंड** आजच्या 75 पौंडाइतके.

**गंधरस व अगरू** सुंदर सुवास असलेले मसाल्याचे पदार्थ. अत्तर म्हणून उपयोग, तसेच मृत शरीराला लावण्यास.

कोणाच्या पापांची क्षमा केली, तर त्याला पापक्षमा मिळेल. जर तुम्ही क्षमा केली नाही तर त्यांची क्षमा होणार नाही."

## येशू थोमाला दिसतो

24आता थोमा (याला दिदुम म्हणत) बारा शिष्यांपैकी एक होता. येशू आला तेव्हा तो शिष्यांबरोबर नव्हता. 25तेव्हा इतर शिष्यांनी त्याला सांगितले की, "आम्ही प्रभूला पाहिले आहे!" पण तो त्यांना म्हणाला, "त्याच्या हातांमधील खिळ्यांचे व्रण पाहिल्याशिवाय व खिळ्यांच्या व्रणांत माझे बोट घातल्याशिवाय व त्याच्या कुशीत माझा हात घातल्याशिवाय मी विश्वास धरणार नाही."

26एक आठवड्यानंतर येशूचे शिष्य त्या घरामध्ये पुन्हा बसले होते व थोमा त्यांच्याबरोबर होता. जरी दार बंद होते तरी येशू आत आला व त्यांच्यामध्ये उभा राहिला. आणि म्हणाला, "तुम्हांबरोबर शांति असो." 27मग तो थोमाला म्हणाला, "तुझे बोट इकडे कर व माझे हात पाहा आणि तुझा हात इकडे कर व माझ्या कुशीत घाल. संशय सोड आणि विश्वास ठेव." 28थोमा त्याला म्हणाला, "माझा प्रभु आणि माझा देव!"

29मग येशू त्याला म्हणाला, "तू मला पाहिले आहेस म्हणून तू विश्वास ठेवला आहेस, पण ज्यांनी मला पाहिले नाही तरीही त्यांनी विश्वास धरला ते धन्य आहेत."

## योहानाने हे पुस्तक का लिहिले?

30आणखी या पुस्तकात लिहिली नाहीत अशी पुष्कळ अद्भुत चिन्हे येशूने त्याच्या शिष्यांच्या समवेत केली. ती या पुस्तकात लिहिली नाहीत. 31पण ही लिहिली यासाठी की, तुम्ही विश्वास ठेवावा की, येशू हा ख्रिस्त आहे, देवाचा पुत्र आहे आणि विश्वास ठेवल्याने त्याच्या नावात तुम्हांला जीवन मिळेल.

## येशू सात शिष्यांना दिसतो

21 नंतर येशू त्याच्या शिष्यांना पुन्हा दिसला. तो तिबीर्या सरोवराजवळ (जे गालीलात होते) त्या ठिकाणी दिसला. हे अशा प्रकारे घडले: 2काही शिष्य एकत्र होते. ते म्हणजे शिमोन पेत्र, थोमा (दिदुम म्हणत तो), गालीलातील काना येथील नथनीएल, जब्दीचे मुलगे, व त्याच्या शिष्यांतील दुसरे दोघे असे ते होते. 3शिमोन पेत्राने त्यांना म्हटले, "मी मासे धरायला जातो." ते त्याला म्हणाले, "आम्हीही तुझ्याबरोबर येतो." नंतर ते बाहेर गेले व नावेत बसले, पण त्या रात्री त्यांना काहीही मिळाले नाही.

4दुसऱ्या दिवशी पहाटे येशू किनाऱ्यावर उभा राहिला. पण शिष्यांना समजले नाही की तो येशू आहे. 5तो त्यांना म्हणाला, "मित्रांनो, तुम्ही काही मासे पकडले का?" त्यांनी उत्तर दिले, "नाही."

6तो म्हणाला, "तुमचे जाळे नावेच्या उजव्या बाजूला टाका व मग तुम्हांला काही मासे मिळतील." जेव्हा त्यांनी तसे केले, तेव्हा त्यांना पुष्कळ मासे मिळाल्यामुळे जाळे ओढता येईना.

7तेव्हा येशूची ज्याच्यावर प्रीति होती तो पेत्राला म्हणाला, "तो प्रभु आहे!" असे म्हणता क्षणीच पेत्राने कपडे गुंडाळले. (कारण त्याने कपडे काढले होते) व पाण्यात उडी मारली. 8दुसरे शिष्य माशांचे जाळे ओढीत होडीतून आले कारण ते काठापासून दूर नव्हते. फक्त शंभर यार्ड होते. 9जेव्हा ते किनाऱ्याला आले, त्यांनी कोळशांनी पेटविलेला विस्तव पाहिला व मासे आणि भाकर त्यावर ठेवलेली पाहिली. 10येशूने त्यांना म्हटले, "तुम्ही आता धरलेल्या माशांतून काही मासे आणा."

11शिमोन पेत्राने नावेत जाऊन एकशे त्रेपन्न मोठ्या माशांनी भरलेले जाळे काठास आणले. इतके मासे असतानाही जाळे फाटले नाही. 12येशू त्यांना म्हणाला, "या, जेवा, "तेव्हा तो प्रभु आहे असे त्यांना समजले. म्हणून शिष्यांपैकी कोणी त्याला, तू कोण आहेस, हे विचारायला धजला नाही. 13मग येशूने येऊन भाकर घेतली व त्यांना दिली. तसेच मासळीही दिली.

14येशू मेलेल्यांतून उठल्यावर तो आपल्या शिष्यांस प्रगट होण्याची ही तिसरी वेळ.

## येशू पेत्राबरोबर बोलतो

15मग जेव्हा त्यांनी खाणे संपविले, येशू पेत्राला म्हणाला, "योहानाच्या मुला, शिमोना, तू माझ्यावर या सर्वांपेक्षा अधिक प्रीति करतोस काय?"

तो म्हणाला, "होय प्रभु, तुम्हांला माहीत आहे की, मी तुमच्यावर प्रीति करतो."

येशू म्हणाला, "माझ्या कोकरांना चार."

16पुन्हा येशू म्हणाला, "शिमोना, योहानाच्या मुला, तू खरोखर माझ्यावर प्रीति करतोस का?"

पेत्राने उत्तर दिले, "होय प्रभु तुम्हांला माहीत आहे की मी तुमच्यावर प्रीति करतो."

येशू म्हणाला, "माझ्या मेंढरांची काळजी घे."

17तिसऱ्या वेळी तो त्याला म्हणाला, "शिमोना, योहानाच्या मुला, तू माझ्यावर प्रीति करतोस का?"

पेत्र दु:खी झाला कारण येशूने त्याला तिसऱ्यांदा विचारले होते, 'तू माझ्यावर प्रीति करतोस का?'

तो म्हणाला, "प्रभु, तुम्हांला सर्व गोष्टी माहीत आहेत, तुम्हांला माहीत आहे की, मी तुमच्यावर प्रीति करतो."

येशू म्हणाला, "माझ्या मेंढरांना चार. 18मी खरे सांगतो, तू तरुण होतास, तेव्हा तू स्वत: पोशाख करून तुला जेथे पाहिजे तेथे जात होतास. पण जेव्हा तू म्हातारा होशील तेव्हा तू आपला हात लांब करशील, आणि दुसरा कोणीतरी तुला पोशाख घालील. आणि जेथे तुझी इच्छा नाही तेथे नेईल."

19तो कोणत्या प्रकारच्या मरणाने तो मरणार व देवाचे
गौरव करणार हे सुचविण्यासाठी येशू हे बोलला. हे
बोलल्यानंतर तो म्हणाला, "माझ्यामागे ये."
20मग पेत्राने वळून ज्या शिष्यावर येशू प्रीति करीत
असे, तो त्यांच्यामागे येत होता. (हा तोच होता, जो भोजनाच्या
वेळी येशूजवळ बिलगून बसला होता. आणि म्हणाला होता,
"प्रभु, तुझा विश्वासघात कोण करणार आहे?)" त्याला
पाहिले. 21जेव्हा पेत्राने त्याला पाहिले, तेव्हा त्याने विचारले,
"प्रभु, याचे काय?"
22येशूने उत्तर दिले, "मी परत येईपर्यंत त्याने जगावे
अशी माझी इच्छा असेल, तर तुला त्याचे काय? तू मला
अनुसर." 23या कारणामुळे अशी अफवा बंधुवर्गात पसरली
की, हा शिष्य मरणार नाही. पण येशू असे म्हणाला
नव्हता की, तो मरणार नाही, तो फक्त म्हणाला, "मी
येईपर्यंत त्याने जिवंत राहावे, अशी माझी इच्छा असेल,
तर तुला त्याचे काय?"
24जो शिष्य या गोष्टीविषयी साक्ष देतो व ज्याने या गोष्टी
लिहिल्या तोच हा शिष्य आहे. आणि त्याची साक्ष खरी
आहे, हे आम्हांला माहीत आहे. 25आणि येशूने केलेली
दुसरीही पुष्कळ कामे आहेत, ती एकेक लिहिली तर
लिहिलेली पुस्तके या जगात ठेवायला जागा पुरणार नाही,
असे मला वाटते.

# प्रेषितांचीं कृत्यें

## लूक दुसरे पुस्तक लिहितो

1 प्रिय थियफिलस, येशूने जे सर्व काही केले आणि
शिकविले त्याविषयी मी पहिले पुस्तक लिहिले.
2येशूच्या सुरुवातीपासून ते, तो स्वर्गात जाईपर्यंतच्या संपूर्ण
जीवनाविषयी मी लिहिले. हे घडण्यापूर्वी येशूने जे प्रेषित*
निवडले होते त्यांच्याशी तो बोलला. येशूने प्रेषितांना पवित्र
आत्म्याच्या सहाय्याने त्यांनी जे करायला पाहिजे त्याविषयी
सूचना दिल्या. 3हे येशूच्या मृत्यूनंतरचे होते. परंतु त्याने
प्रेषितांना दाखविले की, तो जिवंत आहे. येशूने अनेक
सामर्थ्यशाली कृत्ये करून दाखवून हे सिद्ध केले. मरणातून
उठविले गेल्यानंतर चाळीस दिवसांपर्यंत येशूला प्रेषितांनी
पुष्कळ वेळा पाहिले. येशू प्रेषितांशी देवाच्या राज्याविषयी
बोलला. 4एकदा येशू त्यांच्यासह जेवत बसलेला असताना
त्याने सांगितले की, यरुशलेम सोडू नका. येशू म्हणाला,
"पित्याने तुम्हांला अभिवचन दिले आहे; मी तुम्हांला
त्याविषयी पूर्वी सांगितले होते. येथे (यरुशलेमात) त्याचे
अभिवचन मिळण्याची वाट पाहा. 5योहानाने लोकांचा
पाण्याने बाप्तिस्मा* केला. परंतु थोड्याच दिवसांत तुमचा
बाप्तिस्मा पवित्र आत्म्याने* होईल."

## येशू वर स्वर्गात घेतला जातो

6सर्व प्रेषित एकत्र जमले होते. त्यांनी येशूला विचारले,
"प्रभूजी, ह्याच काळात यहूदी लोकांना तुम्ही त्यांचे राज्य
पुन्हा देणार काय?" 7येशू त्यांना म्हणाला, "केवळ
पित्यालाच तारखा व वेळा ठरविण्याचा अधिकार आहे.
ह्या गोष्टीची माहिती असणे तुम्हा कडे नाही. 8परंतु
पवित्र आत्मा तुम्हांकडे येईल. मग तुम्हांला शक्ति
मिळेल. तुम्ही माझे साक्षी व्हाल. तुम्ही लोकांना
माझ्याविषयी सांगाल. पहिल्यांदा यरुशलेम येथील लोकांना
तुम्ही सांगाल. नंतर तुम्ही यहूदीया, शोमरोन व जगाच्या
सर्व भागात सांगाल."

9नंतर येशूने प्रेषितांना या गोष्टी सांगितल्यावर, तो
आकाशात उचलला गेला. प्रेषित हे पाहत असताना येशू
ढगाआड गेला. आणि ते त्याला पाहू शकले नाहीत. 10येशू
दूर जात होता, आणि प्रेषित आकाशात पाहत असताना
पांढरी वस्त्रे परिधान केलेले दोन पुरुष (देवदूत) अचानक
त्यांच्याजवळ येऊन उभे राहिले.

11आणि ते दोघे प्रेषितांना म्हणाले, "गालीलकरांनो,
तुम्ही आकाशाकडे पाहत येथे का उभे राहिलात? हा येशू
तुमच्यापासून जसा वर स्वर्गात घेतला गेला व त्याला
(येशूला) जाताना तुम्ही पाहिलेत त्याच मार्गाने तो परत
येईल."

## एक नवा प्रेषित निवडण्यात येतो

12नंतर प्रेषित जैतुनाच्या डोंगरावरून यरुशलेमास परत
गेले. (हा डोंगर यरुशलेमापासून एक किलोमीटर अंतरावर
आहे.) 13प्रेषित शहरात परत आल्यावर ज्या ठिकाणी
मुक्कामाला होते, त्या ठिकाणी गेले. ही माडीवरची खोली
होती. त्या ठिकाणी हे प्रेषित होते: पेत्र, योहान, याकोब,
आंद्रिया, फिलिप्प, थोमा, बर्थलमय, मत्तय, याकोब
(अल्फीचा पुत्र), शिमोन (झिलोट* म्हणून माहीत
असलेला) आणि यहूदा (याकोबाचा पुत्र).

14हे सर्व प्रेषित एकत्र राहत होते. ते एकाच उद्देशाने
सतत प्रार्थना करीत होते. काही स्त्रिया, मरीया येशूची
आई आणि त्याचे भाऊ प्रेषितांबरोबर होते.

15काही दिवसांनी विश्वासणाऱ्यांची एक सभा झाली.
(तेथे सुमारे 120 जण होते.) तेव्हा पेत्र उभा राहिला
आणि म्हणाला, 16–17"बंधुंनो, पवित्र शास्त्रामध्ये पवित्र
आत्मा दावीदाकरवी बोलला ते, काहीतरी घडणे आवश्यक
आहे. आपल्या गटातील एक जण जो यहूदा त्याच्याविषयी
तो बोलत होता. ते असे की, यहूदा आपल्याबरोबर सेवा
करीत होता. आत्मा म्हणाला की, येशूला धरून देण्यासाठी
यहूदा लोकांचे पुढारीपण करील."

18यहूदाला हे वाईट काम करण्यासाठी पैसे देण्यात
आले होते. या पैशांनी त्याच्यासाठी शेत विकत घेतले
गेले. परंतु यहूदा आपल्या डोक्यावर पडला. त्याचे शरीर
तुटले. व त्याची सर्व आतडी बाहेर पडली. 19यरुशलेम

---

**प्रेषित** येशूने आपल्यासाठी निवडलेले खास मदतनीस.

**बाप्तिस्मा** ग्रीक शब्द याचा अर्थ बुडविणे. एखादी व्यक्ति किंवा वस्तु काही काळ पाण्याखाली बुडविणे.

**पवित्र आत्मा** याला देवाचा आत्मा, ख्रिस्ताचा आत्मा व सांत्वन करणारा असे म्हणतात. तो देव व ख्रिस्त यांच्यासह देवाच्यासाठी जगातील लोकामंध्ये कार्य करतो.

**झिलोट** हा यहूदी लोकांमधील एक राजकीय गट होता.

येथील सर्व लोकांना हे समजले. म्हणून त्यांनी त्या शेताचे
नाव हकलदमा असे ठेवले. त्यांच्या भाषेत हकलदमा
याचा अर्थ "रक्ताचे शेत" असा होता.
20पेत्र म्हणाला, "स्तोत्रसंहितेत (यहूदाविषयी) असे
लिहिले आहे:

'त्याच्या जमिनीजवळ (मालमत्तेजवळ) लोक न जावोत;
कोणीही तिच्यात वस्ती न करो!' *स्तोत्र. 69:25*

आणखी असे लिहिले आहे: 'त्याचा कारभार दुसरा
घेवो.' *स्तोत्र. 109:8*

21–22म्हणून आता दुसऱ्या व्यक्तीने आमच्यात आले
पाहिजे आणि येशूच्या मरणानंतर झालेल्या पुनरुत्थानाचे
साक्षीदार व्हावे. प्रभु येशू आपल्याबरोबर असलेल्या
संपूर्ण काळात आपल्या गटात राहिलेल्यांपैकी तो मनुष्य
असायला पाहिजे. योहान लोकांचा बाप्तिस्मा करीत असे
त्या काळापासून ते येशूला आपल्यातून वर स्वर्गात घेण्यात
आले त्या वेळेपर्यंत आपल्यामध्ये राहत असलेल्यांपैकीच
हा मनुष्य असला पाहिजे."
23प्रेषितांनी दोन मनुष्यांना गटासमोर उभे केले. एक
जण योसेफ बर्सबा होता. (त्याचे उपनाव युस्त होते.) व
दुसरा मत्थिया होता. 24–25प्रेषितांनी प्रार्थना केली, "प्रभु,
तू सर्वांची मने जाणतोस. या दोघांपैकी हे काम करण्यासाठी
तू कोणाची निवड केलेली आहेस हे आम्हांला सांग.
यहूदाने या सेवेकडे पाठ फिरवली. आणि ज्या ठिकाणचा
तो होता तिकडे गेला. " 26नंतर दोघातील एकाची निवड
करण्यासाठी प्रेषितांनी फासे (सोंगट्या) टाकले. फाशावरून
प्रभुला मत्थिया पाहिजे होता हे दिसून आले. म्हणून तो
इतर अकरा शिष्यांसह प्रेषित झाला.

## पवित्र आत्म्याचे आगमन

2 पन्नासावाचा * दिवस आला, तेव्हा सर्व प्रेषित एका
ठिकाणी एकत्र होते. 2अचानक आकाशातून आवाज
ऐकू आला. तो आवाज सोसाट्याने वाहणाऱ्या वाऱ्यासारखा
होता. ज्या ठिकाणी ते बसले होते ते घर त्या आवाजाने
भरून गेले. 3त्यांनी अग्नीच्या ज्वालांसारखे काहीतरी
पाहिले. त्या ज्वाला विभक्त होत्या. आणि तेथील प्रत्येक
मनुष्यावर एक एक अशा उभ्या राहिल्या. 4ते सर्व पवित्र
आत्म्याने भरून गेले आणि ते निरनिराळ्या भाषा बोलू
लागले. हे करण्यासाठी पवित्र आत्मा त्यांना सामर्थ्य देत
होता.
5त्यावेळी यरुशलेमामध्ये काही फार धार्मिक यहूदी
लोक होते. हे लोक जगातील प्रत्येक देशाचे होते. 6या
लोकांपैकी मोठा गट हा आवाज ऐकल्यामुळे तेथे आला.
ते आश्चर्यचकित झाले कारण प्रेषित बोलत होते आणि
प्रत्येक मनुष्याला त्याची स्वत:ची भाषा ऐकायला मिळाली.
7यामुळे यहूदी लोक अचंबित झाले. त्यांना हे समजत
नव्हते की, प्रेषित हे कसे करू शकले. ते म्हणाले, "पाहा!
ही माणसे (प्रेषित) ज्यांना आपण बोलताना ऐकत आहोत
ती सर्व गालीली* आहेत! 8पण आपण त्यांचे बोलणे
आपल्या स्वत:च्या भाषेत ऐकत आहोत. हे कसे शक्य
आहे? आपण भिन्न देशाचे आहोत: 9पार्थी, मेदी, एलाम,
मेसोपोटेमिया, यहूदा, कपदुकीया, पंत, आशिया*
10फ्रुगिया, पंफिलीया, इजिप्त, कुरेने शहराजवळचा
लिबीयाचा भाग, रोमचे प्रवासी, 11क्लेत व अरब प्रदेश
असे आपण सर्व निरनिराळ्या देशांचे आहोत. आपल्यापैकी
काही जन्मानेच यहूदी आहेत. काही जण धर्मांतरीत आहेत.
आपण या निरनिराळ्या देशांचे आहोत. परंतु आपण ह्या
लोकांचे बोलणे आपापल्या भाषेत ऐकत आहोत! आपण
सर्व ते देवाविषयीच्या ज्या महान गोष्टी बोलत आहेत त्या
समजू शकतो." 12ते लोक आश्चर्यचकित झाले, आणि
गोंधळून गेले. त्यांनी एकमेकांना विचारले, "काय चालले
आहे?" 13दुसरे लोक प्रेषितांना हसत होते. त्यांना असे
वाटले की, प्रेषित द्राक्षारस खूप प्रमाणात प्यालेले आहेत.

## पेत्राचे लोकांपुढे भाषण

14मग पेत्र अकरा प्रेषितांसह उठून उभा राहिला. आणि
तेथे असलेल्या लोकांना ऐकू जावे म्हणून मोठ्याने बोलला.
तो म्हणाला, "माझ्या यहूदी बंधूंनो, आणि तुम्ही सर्व
यरुशलेमचे रहिवासी, माझे ऐका. मी जे सांगतो, ते तुम्हांला
समजणे जरूरीचे आहे. काळजीपूर्वक ऐका. 15सकाळचे
नऊ वाजलेले आहेत आणि तुम्हांला वाटते तसे हे लोक
द्राक्षारसाच्या धुंदीत बोलत नाहीत! 16परंतु आज येथे ज्या
गोष्टी घडताना तुम्ही पाहत आहात त्याविषयी योएल
संदेष्ट्याने लिहीले होते. योएल असे लिहिले:

17'देव म्हणतो: शेवटल्या दिवसात मी अखिल मानवांवर
आपला आत्मा ओतीन तुमचे पुत्र व कन्या भविष्य सांगतील
तुमच्या तरुणांना दृष्टांत* होतील; तुमच्या वृद्धांना विशेष
स्वप्ने पडतील.
18त्यावेळी मी माझा आत्मा माझ्यासेवकांवर, पुरुषांवर
व स्त्रियांवर ओतीन आणि ते भविष्य सांगतील.
19वर आकाशात मी अद्‌भुत गोष्टी दाखवीन. खाली
पृथ्वीवर मी पुरावे देईन. तेथे रक्त, अग्नि आणि दाट धूर
असतील.

---

**पन्नासावाचा** वल्हांडण सणानंतर पन्नास दिवसांनी येणारा
यहूदी सण. गव्हाच्या कापणीचा हंगाम साजरा करतात.

**गालीली** लोकांना वाटले गालीलचे लोक केवळ त्यांची स्वत:चीच
भाषा बोलू शकतात.

**आशिया** आशिया मायनरचा पश्चिमेकडील भाग.

**दृष्टांत** जणू काय स्वप्नच. ज्याचा उपयोग देव लोकांशी
बोलण्यासाठी करतो.

20सूर्य अंधारामध्ये बदलला जाईल चंद्र रक्तासारखा
लाल होईल नंतर प्रभुचा महान व गौरवी दिवस येईल.
21प्रत्येक व्यक्ति जी प्रभुवर विश्वास ठेवते ती वाचेल.
*योएल 2:28-32*

22“माझ्या यहूदी बांधवानो, हे शब्द ऐका: नासरेथचा
येशू हा एक फार विशेष मनुष्य होता. देवाने तुम्हांला हे
स्पष्टपणे दाखविले आहे. देवाने येशूच्या हातून मोठ्या
सामर्थ्यशाली व अद्भुत गोष्टी तुमच्यामध्ये करून हे
सिद्ध केले. तुम्ही सर्वांनी या गोष्टी पाहिल्या. म्हणून तुम्ही
हे जाणता की हे सत्य आहे. 23तुमच्याकरिता येशूला
देण्यात आले आणि तुम्ही त्याला जिवे मारले. वाईट
लोकांच्या मदतीने तुम्ही येशूला वधस्तंभावर खिळले.
परंतु हे सर्व होणार हे देव जाणून होता. ती देवाचीच
योजना होती. फार पूर्वीच देवाने ही योजना तयार केली
होती. 24येशूने मरणाचे दु:ख सहन केले. परंतु देवाने
त्याला मुक्त केले. देवाने येशूला मरणातून उठविले. मरण
येशूला बांधून ठेवू शकले नाही. 25येशूविषयी दावीद असे
म्हणतो:

‘मी प्रभूला नेहमी माझ्यासमोर पाहिले आहे: मला सुरक्षित
ठेवण्यासाठी तो माझ्या उजवीकडे असतो
26म्हणून माझे हृदय आनंदात आहे आणि माझे तोंड
आनंदाने बोलते. होय, माझे शरीरदेखील आशा धरून
राहील
27कारण तू माझा जीव मरणाच्या जागेत* राहू देणार
नाहीस तू तुझ्या पवित्र लोकांच्या शरीराला कुजण्याचा
अनुभव येऊ देणार नाहीस.
28तू मला कसे जगायचे ते शिकविलेस. तू माझ्याजवळ
येशील. आणि मला मोठा आनंद देशील.’
*स्तोत्र. 16:8-11*

29“माझ्या बांधवांनो, खरोखर आपला पूर्वज दावीद
याच्याविषयी मी तुम्हांला सांगू शकतो. तो मेला आणि
पुरला गेला. आणि त्याची कबर आजच्या ह्या दिवसापर्यंत
आपल्यामध्ये आहे. 30दावीद हा संदेष्टा* होता. आणि देव
जे काही बोलला ते त्याला माहीत होते. दावीदाला देवाने
अभिवचन दिले की, तो त्याच्याच घराण्यातून एका व्यक्तीला
त्याच्या राजासनावर बसवील. 31ते घडण्यापूर्वीच दावीदाला
हे माहीत होते. यासाठीच दावीद त्या व्यक्तीबद्दल असे
म्हणतो:

‘त्याला मरणाच्या जागेत राहू दिले नाही. त्याचा देह
कबरेमध्ये कुजला नाही.’

दावीद ख्रिस्ताच्या मरणातून पुन्हा उठविण्याविषयी म्हणत
होता. 32म्हणून येशूला देवाने मरणातून उठविले, दाविदाला
नाही! आम्ही सर्व ह्या गोष्टीचे साक्षीदार आहोत. आम्ही
त्याला पाहिले! 33येशूला स्वर्गात उचलून घेण्यात आले.
आता येशू देवाच्या उजवीकडे देवाबरोबर आहे. देवाने
येशूला आता पवित्र आत्मा दिलेला आहे. हाच पवित्र
आत्मा देण्याचे वचन देवाने दिले होते. म्हणून आता येशू
तो आत्मा ओतीत आहे. हेच तुम्ही पाहत आहात व ऐकत
आहात! 34दावीद वर स्वर्गात उचलला गेला नाही, तर
येशूला वर स्वर्गात उचलून घेण्यात आले. दावीद स्वत:
म्हणाला,

‘प्रभु (देव) माझ्या प्रभुला म्हणाला: मी तुझे वैरी
35तुझ्या सामर्थ्याखाली घालीपर्यंत* माझ्या उजवीकडे
बैस.
*स्तोत्र. 110:1*

36“म्हणून, सर्व यहूदी लोकांना खरोखर हे समजले
पाहिजे की देवाने येशूला प्रभु व ख्रिस्त* असे केलेले
आहे. तुम्ही वधस्तंभावर खिळून मारलेला हाच तो मनुष्य!”
37जेव्हा लोकांनी हे ऐकले, तेव्हा त्यांना फार फार
दु:ख झाले. त्यांनी पेत्राला व इतर प्रेषितांना विचारले,
“आम्ही काय करावे?”
38पेत्र त्यांना म्हणाला, “तुमची हृदये व जीविते बदला
आणि येशू ख्रिस्ताच्या नावात तुम्ही प्रत्येकाने बाप्तिस्मा
घ्यावा. मग देव तुमच्या पापांची क्षमा करील आणि तुम्हांला
पवित्र आत्म्याचे दान प्राप्त होईल. 39हे अभिवचन
तुम्हांसाठी आहे. हे तुमच्या मुलांना आणि जे लोक खूप
दूर आहेत त्यांनासुद्धा आहे. प्रभु आपला देव, ज्यांना
स्वत:कडे बोलावितो अशा प्रत्येक व्यक्तीला ते दिलेले
आहे.”
40पेत्राने दुसऱ्या पुष्कळ शब्दांत त्यांना सावधान केले;
त्याने त्यांना विनवणी केली, “ह्या युगाच्या दुष्टाई पासून
स्वत:चा बचाव करा!” 41मग ज्यांनी पेत्राने सांगितलेल्या
गोष्टींचा स्वीकार केला, त्यांचा बाप्तिस्मा करण्याता आला.
त्या दिवशी विश्वासणाऱ्यांच्या बंधुवर्गामध्ये तीन हजार
लोकांची भर पडली. 42सर्व विश्वासणारे एकत्र भेटत
असत. ते त्यांचा वेळ प्रेषितांची शिकवण शिकण्यात
घालवीत. विश्वासणारे एकमेकांशी सहभागिता करीत. ते
एकत्र खात आणि एकत्र प्रार्थना करीत.

## विश्वासणाऱ्यांचा सहभाग

43प्रेषित अनेक सामर्थ्यशाली आणि अद्भुत गोष्टी
करीत; आणि प्रत्येक व्यक्तीला देवाविषयी आदर वाटू

**मरणाची जागा** शब्दश: मृत्युलोक, नरक.

**संदेष्टा** देवाच्या वतीने बोलणारी व्यक्ति.

**सामर्थ्याखाली घालीपर्यंत** शब्दश: मी तुझ्या शत्रूचे तुझ्या पायांखाली आसन करीपर्यंत.

**ख्रिस्त** अभिषिक्त (मशीहा) देवाचा निवडलेला.

लागला. 44सर्व विश्वासणारे एकत्र राहत. प्रत्येक गोष्ट ते
आपापसात वाटत असत. 45विश्वासणाऱ्यांनी आपल्या
मालकीच्या जमिनी व वस्तू विकल्या. नंतर त्यांनी पैसे
विभागून ज्यांना आवश्यकता होती अशा लोकांना दिले.
46सर्व विश्वासणारे मंदिरामध्ये दररोज एकत्र जमत. त्या
सर्वांचा उद्देश सारखाच होता. ते त्यांच्या घरामध्ये एकत्र
खात. आपले अन्न इतरांना वाटण्यात त्यांना फार आनंद
होत असे आणि आनंदी मनाने ते खात असत. 47विश्वासणारे
देवाची स्तुति करीत. आणि सर्व लोकांना ते आवडत
असत. आणि अधिकाधिक लोक तारले जात होते. व
विश्वासणाऱ्यांच्या गटामध्ये प्रभु रोज अनेक लोकांची
भर घालीत असे.

## पेत्र एका लंगड्या मनुष्याला बरे करतो

3 एके दिवशी पेत्र व योहान मंदिराकडे जात होते.
त्यावेळी दुपारचे तीन वाजले होते. मंदिरातील प्रार्थनेची
ती नेहमीची वेळ होती. 2जेव्हा ते मंदिरात जाऊ लागले,
तेव्हा त्या ठिकाणी एक मनुष्य होता. हा मनुष्य
जन्मापासूनचा लंगडा होता. त्याला चालता येत नव्हते.
म्हणून काही मित्र त्याला उचलून घेऊन आले. दररोज
त्याचे मित्र त्याला मंदिराकडे आणीत असत. ते त्या लंगड्या
माणसाला मंदिराच्या एका दरवाजाजवळ ठेवीत असत. या
दरवाजाचे नाव सुंदर दरवाजा असे होते. तेथे तो मनुष्य
मंदिरात येणाऱ्या लोकांकडे भीक मागत असे. 3त्या दिवशी
त्या लंगड्या मनुष्याने पेत्र व योहानाला मंदिरात जाताना
पाहिले. त्याने त्यांच्याकडे पैसे मागितले. 4पेत्र व योहान
यांनी त्या माणसाकडे पाहिले व म्हटले, "आमच्याकडे
पाहा!" 5त्या मनुष्याने त्यांच्याकडे पाहिले; त्याला वाटले
ते त्याला काही पैसे देतील. 6परंतु पेत्र म्हणाला, "माझ्याकडे
सोने किंवा चांदी काही नाही, परंतु माझ्याकडे दुसरे काही
तरी आहे, ते मी तुला देतो: नासरेथच्या येशू ख्रिस्ताच्या
नावाने ऊठ आणि चालू लाग!" 7मग पेत्राने त्या माणसाचा
उजवा हात धरला व त्याला उठविले. आणि ताबडतोब
त्या मनुष्याच्या पायात व घोट्यात शक्ति आली. 8तो माणूस
उडी मारून उभा राहिला व चालू लागला. तो चालत,
बागडत, आणि देवाचे गुणगान करीत त्यांच्याबरोबर मंदिरात
गेला. 9–10सर्व लोकांनी त्याला ओळखले. मंदिराच्या सुंदर
नावाच्या दरवाजापाशी भीक मागत बसत असे तो हाच
म्हणून त्यांनी त्याला ओळखले. आता त्यांनी त्याच
माणसाला चालताना व देवाची स्तुति करताना पाहिले.
लोक आश्चर्यचकित झाले. हे कसे घडले हे त्यांना समजत
नव्हते.

## पेत्र लोकांच्या पुढे भाषण करतो

11तो लंगडा मनुष्य पेत्र व योहान यांना बिलगून उभा
होता. सर्व लोक आश्चर्यचकित झाले होते. कारण तो
मनुष्य बरा झाला होता. ते पेत्र व योहान उभे असलेल्या
शलमोनाच्या द्वारमंडपाकडे* धावत येऊ लागले. 12जेव्हा
पेत्राने हे पाहिले, तो लोकांना म्हणाला, "माझ्या यहूदी
बंधूंनो, ह्यामुळे तुम्हांला आश्चर्य का वाटत आहे? तुम्ही
आमच्याकडे असे पाहात आहात की जणू काय आमच्या
सामर्थ्यानेच हा मनुष्य चालू लागला आहे. तुम्हांला असे
वाटते का की, आमच्या चांगुलपणामुळे असे घडले?
13नाही! देवाने हे केले! तो अब्राहामाचा देव आहे,
इसहाकाचा देव आहे आणि तो याकोबाचा देव आहे.
आमच्या पूर्वजांचा तो देव आहे. त्याचा खास सेवक येशू
याला त्याने गौरव दिलेला. परंतु तुम्ही येशूला मारण्यासाठी
दिले. पिलाताने येशूला मुक्त करण्याचा निर्णय घेतला,
परंतु तुम्ही पिलाताला सांगितले की, तुम्हांला येशू नको.
14येशू शुद्ध आणि चांगला (निष्पाप) होता. परंतु तुम्ही
म्हणाला तुम्हाला तो नको. तुम्ही पिलाताला सांगितले की
येशूऐवजी आम्हांला एक खुनी दे. 15आणि म्हणून जो
जीवन देतो त्याला तुम्ही मारले! परंतु देवाने त्याला मरणातून
उठविले. आम्ही त्याचे साक्षी आहो. आम्ही आमच्या
डोळ्यांनी ते पाहिले. 16येशूच्या सामर्थ्यानेच हा लंगडा
बरा झाला. आम्ही येशूच्या सामर्थ्यावर विश्वास ठेवला
म्हणून हे घडले. तुम्ही या मनुष्याला पाहू शकता. आणि
तुम्ही त्याला ओळखता. येशूवरील विश्वासाने तो पूर्णपणे
बरा झाला. तुम्ही हे घडलेले पाहिले!

17"माझ्या बंधूनो, तुम्ही येशूला जे केले ते तुम्ही अजाणता
केले. (तुम्हांला समजत नव्हते, तुम्ही काय करीत आहात.
तुमच्या नेत्यांनासुद्धा हे समजले नाही.) 18देवाने सांगितले
या गोष्टी घडतील. देवाने भविष्यवाद्यांकरवी हे सांगितले
की, त्याचा ख्रिस्त दुःखसहन करील व मरेल. मी तुम्हांला
सांगितलेले आहे की, देवाने हे कसे घडवून आणले.
19म्हणून तुम्ही तुमची हृदये व जीवने बदलली पाहिजेत!
देवाकडे परत या आणि तो तुमच्या पापांची क्षमा करील.
20मग प्रभु (देव) तुम्हांला आध्यात्मिक विश्रांतीसाठी वेळ
देईल. तो तुम्हाला येशू देईल, ज्याला त्याने ख्रिस्त म्हणून
निवडले. 21परंतु देवाने त्याच्या पवित्र भविष्यवाद्यांच्या
तोंडून ज्या गोष्टी आरंभापासूनच सांगितल्या त्या घडून
येईपर्यंत त्याला स्वर्गातच राहिले पाहिजे. 22मोशे म्हणाला,
'प्रभु तुमचा देव तुम्हांला संदेष्टा देईल. तो संदेष्टा तुमच्या
स्वत:च्या (यहूदी लोकांच्या) मधूनच देईल.* तो
माझ्यासारखा भविष्यवादी असेल. तो जे तुम्हांला सांगेल
ते सारे तुम्ही पाळा. 23जो कोणी संदेष्ट्याची (भविष्यवादी)
आज्ञा पाळणार नाही, त्याचे आपल्या बांधवांमधून
मुळासकट उच्चाटन होईल.' 24शमुवेल व इतर संदेष्टे
(भविष्यवादी) जे शमुवेलानंतर झाले, जे देवासाठी बोलले,
ते या आताच्या काळाविषयी बोलले. 25संदेष्टे ज्या

---

**शलमोनाचा द्वारमंडप** मंदिराचा पूर्वेकडील भाग, तो छपराने आच्छादित होता.

**प्रभु तुमचा ... देईल** अनुवाद 18:15,19

गोष्टींविषयी बोलले, त्या गोष्टी तुम्हांला मिळाल्या आहेत. देवाने तुमच्या वाडवडिलांशी (पूर्वजांशी) जो करार केला तो तुम्हांला मिळाला आहे. देवाने तुमचा पिता अब्राहाम याला म्हटले, 'तुझ्या कुटुंबामुळे पृथ्वीवरील राष्ट्रे आशीर्वादित होतील.* 26देवाने आपला खास सेवक येशू याला प्रथम तुमच्याकडे पाठविले. तुमच्या वाईट मार्गापासून तुम्हांला परावृत्त करण्याकडून.' तुम्हांला आशीर्वाद देण्यासाठी देवाने येशूला पाठविले."

## पेत्र व योहान यहूदी धर्मसभेपुढे

4 पेत्र व योहान लोकांशी बोलत असताना, काही लोक त्यांच्याकडे आले. त्यातील काही यहूदी याजक, मंदिराचे रक्षण करणाऱ्या शिपायांचा कप्तान व काही सदूकी लोक होते. 2ते चिडले होते. कारण दोन प्रेषित लोकांना शिकवीत होते. पेत्र व योहान लोकांना शिकवीत होते की, येशूच्या सामर्थ्याने मेलेली माणसे पुन्हा उठतील. 3यहूदी पुढाऱ्यांनी व नियमशास्त्र शिक्षकांनी पेत्र व योहानाला धरले व तुरुंगात टाकले. अगोदरच रात्र झाली होती, म्हणून त्यांनी पेत्र व योहान यांना दुसऱ्या दिवसापर्यंत तुरुंगात ठेवले. 4परंतु पेत्र व योहान यांचा संदेश ऐकणाऱ्या पुष्कळ लोकांनी, त्यांनी सांगितलेल्या गोष्टींवर विश्वास ठेवला. विश्वासणाऱ्यांच्या गटामध्ये सुमारे पाच हजार लोक होते. 5दुसऱ्या दिवशी यहूदी लोकांचे पुढारी, वडीलजन, व नियमशास्त्र शिकविणारे शिक्षक यरुशलेममध्ये एकत्र जमले. 6हन्ना (प्रमुख याजक), केफा, योहान आणि अलेक्सांद्र हे तेथे होते. तसेच प्रमुख याजकाच्या घरातील प्रत्येक जण हजर होता. 7त्यांनी पेत्र व योहान यांना सर्वांसमोर उभे राहण्यास सांगितले. यहूदी पुढाऱ्यांनी पुष्कळ वेळा त्यांना विचारले, "या लंगड्या माणसाला तुम्ही कसे बरे केले? कोणत्या शक्तीचा उपयोग तुम्ही केला? कोणाच्या अधिकाराने हे तुम्ही केले?"

8मग पेत्र पवित्र आत्म्याने भरला गेला. तो त्यांना म्हणाला, "अहो पुढाऱ्यांनो आणि वडीलधारी लोकांनो; 9या लंगड्या माणसाच्या बाबतीत जी चांगली गोष्ट झाली त्याबद्दल तुम्ही आम्हांला प्रश्न विचारीत आहात काय? तुम्ही आम्हांला विचारीत आहात का की याला कोणी बरे केले? 10तुम्ही सर्वांनी आणि यहूदी लोकांनी समजून घ्यावे अशी आमची इच्छा आहे, ती ही की, नासरेथच्या येशू ख्रिस्ताच्या सामर्थ्याने हा मनुष्य बरा झाला! तुम्ही येशूला वधस्तंभावर खिळले. देवाने त्याला मरणातून उठविले. हा मनुष्य लंगडा होता, पण आता तो चांगला झाला आहे. आणि येशूच्या सामर्थ्यामुळे तुमच्यासमोर उभा राहू शकत आहे!

11'तुम्ही बांधणारांनी जो दगड नापसंत केला, जो पुढे कोनशिल झाला तोच हा येशू होय.' *स्तोत्र. 118:22*

12येशू हा एकमेव आहे जो लोकांना तारू शकेल. त्याचे नाव हेच सामर्थ्य फक्त जगामध्ये आहे जे लोकांना तारण्यासाठी दिले आहे. आमचे तारण येशूद्वारे झालेच पाहिजे!"

13यहूदी लोकांना समजले की, पेत्र व योहान यांचे खास प्रशिक्षण किंवा शिक्षण झालेले नाही. पण पुढाऱ्यांनी हे सुद्धा पाहिले की, पेत्र व योहान बोलायला घाबरत नव्हते. म्हणून पुढारी आश्चर्यचकित झाले. मग त्यांना उमगले की, पेत्र व योहान येशूबरोबर होते. 14त्यांनी पाहिले की, तो लंगडा मनुष्य तेथे दोन प्रेषितांसह उभा आहे. त्यांनी पाहिले की, तो मनुष्य बरा झालेला आहे. म्हणून ते प्रेषितांविरूद्ध काही बोलू शकत नव्हते. 15यहूदी पुढारी त्यांना म्हणाले की, त्यांनी सभा सोडून जावे. मग पुढारी काय करायला हवे याविषयी एकमेकांमध्ये विचारविनिमय करू लागले. 16ते म्हणाले, "या मनुष्यांचे आपण काय करावे? यरुशलेममधील प्रत्येक व्यक्ति हे जाणते की, त्यांनी एक महान चमत्कार केला आहे. हे स्पष्ट आहे. आपण असे म्हणू शकत नाही की ते खरे नाही. 17परंतु आपण त्यांना त्या माणसाविषयी (येशूविषयी) सांगण्यास (प्रतिबंध करू) घाबरून सोडू. मग ही समस्या लोकांमध्ये पसरणार नाही."

18मग यहूदी पुढाऱ्यांनी पेत्र व योहान यांना परत आत बोलाविले. त्यांनी प्रेषितांना सांगितले की, येशूच्या नावाने काही करू नका व शिकवू नका. 19पण पेत्र व योहान यांनी त्यांना उत्तर दिले, "तुम्हांला कोणते बरोबर वाटते? देव काय इच्छितो? आम्ही तुमची की देवाची आज्ञा पाळायची? 20आम्ही शांत बसू शकत नाही. आम्ही ज्या गोष्टी पाहिल्या आणि ऐकल्या त्या आम्हांला सांगितल्याच पाहिजेत."

21–22प्रेषितांना शिक्षा करण्याचा मार्ग त्यांना सापडेना; कारण जे काही घडले होते त्याविषयी लोक देवाची स्तुति करीत होते. (हा चमत्कार देवाकडून घडला होता. शिवाय जो बरा झाला होता, तो चाळीस वर्षांहून अधिक वयाचा होता.) म्हणून यहूदी पुढाऱ्यांनी प्रेषितांना पुन्हा ताकीद दिली व त्यांना सोडून दिले.

## पेत्र व योहान विश्वासणाऱ्यांकडे परततात

23पेत्र व योहान यांची सुटका झाल्यावर ते त्यांच्या स्वत:च्या बंधुवर्गाकडे परत गेले. त्यांनी प्रमुख याजक व प्रमुख वडील यहूदी पुढारी जे बोलले ते सर्व त्यांनी बंधुवर्गास सांगितले. 24जेव्हा विश्वासणाऱ्यांनी हे ऐकले, तेव्हा त्या सर्वांनी एक मनाने देवाला प्रार्थना केली. ते म्हणाले, "सर्वसमर्थ प्रभु, तूच आकाश, जमीन, समुद्र व जगातील सर्वांचा निर्माणकर्ता आहेस. 25आमचा पिता दावीद हा तुझा सेवक होता. पवित्र आत्म्याच्या सहाय्याने त्याने हे शब्द लिहिले:

---

**तुझ्या ... होतील** उत्पत्ति 22:18, 26:24

‘राष्ट्रे का ओरडत आहेत? लोक (देवाविरुद्ध) का व्यर्थ कट रचित आहेत?

26या भूतलावरील राजे लढाईसाठी सज्ज झाले आणि प्रभु परमेश्वर व त्याचा ख्रिस्त यांच्याविरुद्ध एकवट झाले आहेत.’ *स्तोत्र. 2:1-2*

27या गोष्टी खरोखर घडल्या, जेव्हा हेरोद,* पंत पिलात, यहूदीतर राष्ट्रे व यहूदी लोक हे सर्व जण येशूविरुद्ध ‘एकत्र आले.’ 28त्यांनी तुझी योजना प्रत्यक्षात आणली. हे सर्व तुझ्या सामर्थ्याने व तुझ्या इच्छेने घडले. 29आणि आता प्रभु, ते काय म्हणत आहेत ते ऐक. ते आम्हांला भेडसावण्याचा प्रयत्न करीत आहेत! प्रभु, आम्ही तुझे सेवक आहोत. तुला आम्ही जे बोलावे असे वाटते ते न भीता बोलण्यासाठी आम्हांला मदत कर. 30तुझे सामर्थ्य दाखवून आम्ही धीट बनण्यासाठी आम्हांला मदत कर; आजारी लोकांना बरे कर, पुरावे दे आणि चमत्कार कर, जे येशू जो तुझा पवित्र सेवक याच्या सामर्थ्याने घडतील.”

31विश्वासणाऱ्यांनी प्रार्थना केल्यावर, ज्या ठिकाणी ते एकत्र जमले होते ती जागा हादरली, ते सर्व पवित्र आत्म्याने भरले गेले. व ते न भीता देवाचा संदेश सांगत गेले.

### विश्वासणाऱ्यांचा सहभाग

32विश्वासणाऱ्यांचा हा परिवार एक मनाने व ऐक्याने राहत असे. ते एकचित्त होते. परिवारामधील कोणीही आपल्या मालमत्तेवर स्वतंत्र अधिकार सांगत नसे. उलट प्रत्येक गोष्ट ते वाटून घेत. 33मोठ्या सामर्थ्याने प्रेषित लोकांना प्रभु येशू मेलेल्यांतून उठला याविषयी साक्ष देत. आणि त्या विश्वासणाऱ्यांवर देवाचा मोठा आशीर्वाद होता. 34त्यांना आवश्यकता भासे ते सर्व त्यांना मिळत असे. प्रत्येक जण ज्याची स्वत:ची शेत (जमीन) होती किंवा घर होती, त्यांनी ते पैशासाठी विकले व विकून आलेले पैसे त्यांनी प्रेषितांच्या हवाली केले. 35आणि प्रत्येक व्यक्तीला त्याच्या गरजेनुसार पुरवठा केला जात असे.

36एका विश्वासणाऱ्याचे नाव होते योसेफ. प्रेषित त्याला बर्णबा म्हणत. (याचा अर्थ, “जो इतरांना मदत करतो तो मनुष्य.”) तो लेवी वंशातला होता. आणि कुप्र बेटावर जन्मलेला होता. 37योसेफाचे स्वच:चे शेत होते, ते त्याने विकले व पैसे त्याने प्रेषितांकडे दिले.

### हनन्या आणि सप्पीरा

5 हनन्या नावाचा एक मनुष्य होता त्याच्या पत्नीचे नाव सप्पीरा होते. हनन्याने त्याच्याकडे जी काही जमीन होती ती विकली. 2परंतु विकून आलेल्या पैशातून त्याने थोडेच पैसे प्रेषितांच्या हातात दिले. त्याने त्यातील काही पैसे गुपचूप काढून स्वत:साठी ठेवले होते. त्याच्या पत्नीला हे माहीत होते. तिने या गोष्टीला संमति दिली होती. 3पेत्र म्हणाला, “हनन्या, तू तुझ्या अंत:करणावर सैतानाला का अधिकार चालवू देतोस? तू खोटे बोललास व पवित्र आत्म्याला फसविण्याचा प्रयत्न केलास. तू जमीन विकलीस, पण त्यातील काही पैसे स्वत:साठी का ठेवलेस? 4ती जमीन विकण्यापूर्वी तुझी होती. आणि विकल्यानंतर सुद्धा ते पैसे तुला जसे पाहिजे तसे खर्च करता आले असते. अशी वाईट गोष्ट करावी असा विचार तू का केलास? तू मनुष्यांशी नाही, तर देवाशी खोटे बोललास!” 5–6जेव्हा हनन्याने हे ऐकले तेव्हा तो खाली पडला आणि मरण पावला. काही तरुण लोकांनी त्याचे शरीर गुंडाळले व बाहेर नेऊन पुरले. ज्या प्रत्येक मनुष्याने हे ऐकले, तो अति भयभीत झाला.

7सुमारे तीन तासांनंतर त्याची पत्नी आत आली. सप्पीरा तिच्या नवऱ्याच्या बाबतीत जे झाले ते काहीच माहीत नव्हते.

8पेत्र तिला म्हणाला, “मला सांग, तुमच्या शेतासाठी तुम्हांला किती पैसे मिळाले, (अमुक) इतक्याच पैशांना मिळाले काय?” सप्पीरास उत्तर दिले, “होय, आम्हाला शेत विकून तेवढेच पैसे मिळाले.”

9पेत्र म्हणाला, “देवाच्या आत्म्याची परीक्षा पाहण्याचे तू व तुझ्यानवऱ्याने का ठरविले? ऐक! त्या पावलांचा आवाज ऐकतेस का? ज्या माणसांनी तुझ्या नवऱ्याला पुरले ते दाराजवळच आहेत! (तुझ्या नवऱ्याला जसे नेले) तसेच ते तुलाही नेतील.” 10त्याच क्षणी सप्पीर त्याच्या पायाजवळ खाली पडली आणि मेली. तरुण माणसे आली, त्यांनी पाहिले की, ती मेलेली आहे. त्या माणसांनी तिला बाहेर नेले आणि तिच्या नवऱ्याजवळ पुरले. 11सर्व विश्वासणारे आणि इतर दुसरे लोक ज्यांनी याविषयी ऐकले ते अतिशय भयभीत झाले.

### देवाचे पुरावे

12प्रेषितांनी पुष्कळसे चमत्कार व सामर्थ्यशाली गोष्टी केल्या. सर्व लोकांनी या गोष्टी पाहिल्या. आणि ते सर्व एकचित्ताने शलमोनाच्या द्वारमंडपात जमत असत. 13आणि इतर लोकांतील कोणी त्यांच्याजवळ उभे राहण्याचे धैर्य करीत नसत. परंतु सर्व प्रेषितांची स्तुति करीत; 14आणि किती तरी लोक पुढे येऊन प्रभु येशूवर विश्वास ठेवीत. अशा रीतीने बरेच पुरुष व स्त्रिया येऊन त्यांना मिळाल्या. 15त्यामुळे पेत्र रस्त्याने जाऊ लागला म्हणजे त्याची सावली रोगी व आजारी लोकांच्यावर पडावी यासाठी लोक त्यांना वाटेवर खाट अगर अंथरुणावर ठेवीत असत. 16लोक यरुशलेम सभोवतालच्या गावांगावातून येऊ लागले. आणि त्यांचे आजारी व भूतबाधा झालेले लोक यांना ते आणू लागले. तेव्हा ही सर्व माणसे बरी केली गेली.

---

**हेरोद** महान हेरोदचा मुलगा. त्याचे नाव अन्टीपस. हा गालीली व पेरीया प्रांताचा रोमी सत्तेच्या वतीने शासन चालवणारा राजा होता.

### यहूदी प्रेषितांना मना करण्याचा प्रयत्न करतात

17प्रमुख याजक आणि त्याचे सर्व मित्र (सदूकी नावाचा
एक गट) यांना फार हेवा वाटू लागला. 18त्यांनी प्रेषितांना
धरले आणि तुरुंगात टाकले. 19पण रात्रीच्या वेळी देवाच्या
दूताने तुरूंगाचा दरवाजा उघडला. देवदूताने प्रेषितांना बाहेर
आणले आणि म्हणाला, 20"जा आणि मंदिरात उभे राहा.
येशू ख्रिस्तामधील जे नवीन जीवन आहे त्याविषयी लोकांना
सांगा." 21जेव्हा प्रेषितांनी हे ऐकले, त्यांनी ती आज्ञा पाळली
आणि मंदिरात गेले. ती पहाटेची वेळ होती. आणि तेथे
लोकांना शिक्षण देऊ लागले. प्रमुख याजक व त्याचे मित्र
सभास्थानात आले. त्यांनी यहूदी पुढाऱ्यांची सभा आणि
सर्व वडीलजन, जे यहूदी लोकांचे नेते होते यांची एकत्र
सभा बोलाविली. मग प्रेषितांना तेथे घेऊन येण्यासाठी
काही जणांना तुरुंगात पाठविले. 22जेव्हा शिपाई तुरुंगामध्ये
त्यांना पाहावयास गेले, तेव्हा त्यांना आतमध्ये प्रेषित
आढळले नाहीत. म्हणून त्यांनी परत जाऊन यहूदी
पुढाऱ्यांना त्याविषयी सांगितले. 23शिपाई म्हणाले,
"तुरुंगाची दारे बंद केलेली व त्यांस कुलुप लावलेले होते.
तसेच पहारेकरीही दारावर पहारा देत आहेत. परंतु आम्ही
जेव्हा दार उघडले, तेव्हा आतमध्ये कोणीच आढळले
नाही!" 24मंदिराच्या पहारेकऱ्यांच्या सरदाराने आणि प्रमुख
याजकाने हे शब्द ऐकले. ते गोंधळात पडले. व यानंतर
काय होईल याबद्दल बुचकळ्यात पडले. 25नंतर कोणी
एक आला आणि म्हणाला, "ज्या लोकांना तुम्ही तुरुंगात
टाकले ते तर मंदिरात उभे राहून लोकांना शिक्षण देत
आहेत!" 26तेव्हा कप्तान व त्याचे लोक बाहेर गेले व
प्रेषितांना पुन्हा घेऊन आले. त्यावेळी त्यांनी बळाचा वापर
केला नाही, कारण त्यांना लोकांचे भय वाटले व असे
वाटले की लोक कदाचित त्यांना दगडमार करतील.

27त्यांनी प्रेषितांना आणून सभेपुढे उभे केले. प्रमुख
याजकाने प्रेषितांना प्रश्न विचारले. 28तो म्हणाला, "आम्ही
तुम्हांला (येशू) या मनुष्याच्या नावाने शिक्षण देऊ नका
म्हणून ताकीद दिली होती. आणि तरीही तुम्ही तुमच्या
शिकवणुकीचा प्रसार सर्व यरुशलेमभर केलात. आणि
या मनुष्याच्या (येशूच्या) मरणाचा दोष आमच्यावर
ठेवण्यासाठी तुम्ही प्रयत्न करीत आहात."

29पेत्र व इतर प्रेषितांनी उत्तर दिले, "आम्हांला देवाची
आज्ञा पाळलीच पाहिजे, तुमची नाही! 30तुम्ही येशूला
मारले. तुम्ही त्याला वधस्तंभावर खिळले. परंतु त्याच
देवाने, जो आमच्या वाडवडिलांचा (पूर्वजांचा) देव होता,
त्याने येशूला मरणातून उठविले! 31देवाने त्याला उठविले
व आपल्या उजवीकडे बसविले. देवाने येशूला राजपुत्र व
उद्धारकर्ता म्हणून उजवीकडे बसविले. देवाने हे यासाठी
केले की, यहूदी लोकांनी त्यांची हृदये व जीविते बदलावीत.
ह्या गोष्टी घडताना आम्ही पाहिल्या. 32पवित्र आत्मासुद्धा
हे खरे आहे हे दर्शवितो. जे लोक देवाची आज्ञा पाळतात
त्या सर्वांना त्याने पवित्र आत्मा दिलेला आहे."

33जेव्हा यहूदी सभेच्या पुढाऱ्यांनी हे शब्द ऐकले, तेव्हा
ते खूप रागावले. त्यांनी प्रेषितांना जिवे मारण्यासंबंधी विचार
सुरू केला. 34सभेमध्ये गमलीएल नावाचा एक परूशी
उभा राहिला. नियमशास्त्राचा तो शिक्षक होता. आणि
सर्व लोक त्याला मान देत असत. त्याने लोकांना सांगितले
की, काही वेळासाठी प्रेषितांना बाहेर पाठवा. 35नंतर तो
त्यांना म्हणाला, "इस्राएलच्या लोकांनो, या लोकांना जे
काही करण्याचा विचार तुम्ही करीत आहात त्याबद्दल
सावधगिरी बाळगा. 36काही काळापूर्वी थुदासचा जन्म झाला.
आपण कोणी थोर असल्याचा दावा त्याने केला. सुमारे
चारशे जण त्याला जाऊन मिळाले. पण त्याला ठार मारण्यात
आले त्याचवेळी त्याचे अनुयायीही पांगले. ते काहीच करू
शकले नाहीत.

37नंतर, गालीलातून यहूदा नावाचा माणूस आला. ती
वेळ जनगणनेची होती. त्यानेही काही अनुयायांचे नेतृत्व
केले. त्यालासुद्धा मारण्यात आले. व त्याचे सर्व अनुयायी
पांगले व पळून गेले. 38म्हणून आता मी तुम्हांला सांगतो:
या लोकांपासून दूर राहा. त्यांना एकटे सोडा. जर त्यांच्या
योजना मनुष्यांच्या असतील तर ते अपयशी ठरतील.
39पण जर हे देवापासून असतील तर तुम्ही त्यांना रोखू
शकणार नाही. उलट तुम्ही देवाविरुद्ध लढत आहात असे
होईल!"

यहूदी लोकांनी गमलीएलचा सल्ला मानला. 40त्यांनी
प्रेषितांना पुन्हा बोलाविले. त्यांना फटके मारले. आणि
येशूच्या नावाने पुन्हा त्यांनी काही बोलू नये असा आदेश
दिला. आणि त्यांनी प्रेषितांना सोडून दिले. 41प्रेषित सभा
सोडून गेले. येशूच्या नावासाठी आपण निंदानालस्ती सहन
करण्याच्या योग्यतेचे ठरलो यामुळे ते आनंदी झाले. 42आणि
नंतर प्रेषितांनी लोकांना शिकविण्याचे सोडले नाही. प्रेषित
लोकांना सातत्याने शुभवार्ता सांगत राहिले. येशू हा प्रभु
आहे, हे ते दररोज मंदिरात व लोकांच्या घरांमध्ये सांगत
असत.

### विशेष कामासाठी सात जणांची निवड केली जाते

6 अधिकाधिक लोक येशूचे अनुयायी होत होते. पण
याचवेळी ग्रीक बोलणाऱ्या अनुयायांचा यहूदी
अनुयायांशी वाद झाला. ते म्हणाले की, अनुयायांना
मिळणारा जो रोजचा अन्नाचा वाटा असतो, तो त्यांच्या
विधवांना मिळण्याविषयी दुर्लक्ष होते. 2बारा प्रेषितांनी सर्व
अनुयायांना एकत्र बोलाविले. प्रेषित त्यांना म्हणाले, "देवाचे
वचन शिकविण्याचे आमचे काम थांबलेले आहे. हे चांगले
नाही! लोकांना काही खाण्यासाठी देणे यापेक्षा देवाचे वचन
सातत्याने शिकविणे हे आमच्यासाठी अधिक चांगले.
3म्हणून बंधूनो, तुमचे स्वत:चे सात लोक निवडा. लोकांनी
त्यांना हे चांगले आहेत असे म्हटले पाहिजे. ते ज्ञानाने व
आत्म्याने पूर्ण भरलेले असावेत. आणि त्यांना ही सेवा
करण्यास आपण देऊ. 4मग आपण आपला संपूर्ण वेळ

प्रार्थना करण्यात व देवाचे वचन शिकविण्यात घालवू शकतो.”

5बंधुवर्गातील सगळ्यांना ही कल्पना आवडली. मग त्यांनी या सात जणांची निवड केली: स्तेफन (मोठा विश्वास व पवित्र आत्म्याने पूर्ण भरलेला मनुष्य, फिलिप्प),* प्रखर, नीकनोर, तिम्मोन, पार्मिना आणि निकलाव (अंतुखियाकर जो यहूदी झाला होता). 6नंतर त्यांनी या सात जणांना प्रेषितांसमोर उभे केले. प्रेषितांनी त्यांच्यावर हात ठेवले व प्रार्थना केली. 7देवाचे वचन जास्तीत जास्त लोकांपर्यंत जात होते. यरुशलेममधील अनुयायांचा गट मोठा होत होता. एवढेच नव्हे तर एका मोठ्या यहूदी याजकवर्गाने विश्वास ठेवला व आज्ञा पाळल्या.

## स्तेफनाविरुद्ध यहूदी लोक

8स्तेफन (सात लोकांपैकी एक) यास मोठा आशीर्वाद मिळाला. देवाने त्याला लोकांसमोर अद्भूत चमत्कार करण्याचे सामर्थ्य दिले होते. 9परंतु काही यहूदी आले आणि त्यांनी स्तेफनाबरोबर वाद घातला. हे यहूदी सभास्थानातून* आले होते. त्याला लिबर्तीनांसाठी सभास्थान असे म्हणत. (हे सभास्थान कुरेने, आणि अलेक्सांद्र येथील यहूदी लोकांसाठी सुद्धा होते). किलीकिया व आशियातील यहूदीसुद्धा त्यांच्याबरोबर होते. ते सर्व आले आणि स्तेफनाबरोबर वाद घालू लागले. 10परंतु ज्या ज्ञानाने व आत्म्याच्या प्रेरणेने स्तेफन बोलत होता त्यापुढे यहूदी लोकांचा टिकाव लागेना. 11तेव्हा त्यांनी काही लोकांना पैसे दिले व असे बोलायला शिकविले की, “आम्ही स्तेफनाला मोशे व देव यांच्यावरूध्द दुर्भाषण करताना म्हणजे वाईट गोष्टी बोलताना ऐकले.” 12त्यामुळे लोकसमुदाय, यहूदी वडीलजन आणि परूशी लोक भडकले. ते इतके चिडले की, त्यांनी येऊन स्तेफनाला धरले. आणि त्याला यहूदी लोकांच्या (पुढाऱ्यांच्या) सभेत नेले. 13आणि त्यांनी तेथे खोटे साक्षीदार आणले, ते म्हणाले, “हा मनुष्य (स्तेफन) पवित्र मंदिराविषयी नेहमी वाईट बोलतो. आणि तो मोशेच्या नियमशास्त्राविषयी नेहमी वाईट बोलतो. 14आम्ही त्याला असे बोलताना ऐकले आहे की, नासरेथचा येशू ही जागा नष्ट करील आणि मोशेने घालून दिलेल्या चालीरीती बदलून टाकील.” 15धर्मसभेत बसलेल्या सर्व सभासदांनी स्तेफनाकडे न्याहाळून पाहिले. तेव्हा त्याचा चेहरा देवदूताच्या चेहऱ्यासारखा दिसत होता.

## स्तेफनाचे भाषण

7 प्रमुख याजक स्तेफनाला म्हणाला, “हे सर्व खरे आहे काय?” 2स्तेफनाने उत्तर दिले, “माझ्या यहूदी वडीलजनांनो आणि बंधूंनो, माझे ऐका. आपला पिता (पूर्वज) अब्राहाम मेसोपोटेमिया येथे असताना आपल्या गौरवी देवाने त्याला दर्शन दिले. हे तो हारान येथे राहण्यापूर्वी घडले होते. 3देव अब्राहामाला म्हणाला, ‘तुझा देश व तुझे नातेवाईक सोड. आणि मी दाखवीन त्या देशात जा!’* 4म्हणून अब्राहामाने आपले वतन खास्द्यांचा देश सोडला आणि तो हारान येथे राहू लागला. अब्राहामाच्या वडिलांच्या मृत्यूनंतर देवाने त्याला या ठिकाणी पाठविले, जेथे आता तुम्ही राहत आहात. 5परंतु देवाने अब्राहामाला या जमिनीतील काही दिले नाही. देवाने यातील एक पाऊल ठेवण्या इतकी सुध्दा जमीन त्याला दिली नाही. परंतु देवाने त्याला अभिवचन दिले की भविष्यात तो त्याला ही जमीन देईल. व त्याच्या मुलांनाही देईल. अब्राहामाला संतान होण्यापूर्वी हे घडले. 6देव त्याला म्हणाला, ‘तुझी संतती उपरी होईल. ते दुसऱ्या देशात राहतील. तेथील लोक तुझ्यावंशजांना गुलाम बनवितील आणि त्यांना चारशे वर्षे वाईट रीतीने वागवतील. 7परंतु जो देश त्यांना गुलाम बनवील त्यांना मी शिक्षा देईन.’* देव असे सुद्धा म्हणाला, ‘त्या गोष्टी घडल्यानंतर, तुझे लोक त्या देशातून बाहेर येतील. मग तुझे लोक या ठिकाणी माझी उपासना करतील.’* 8देवाने अब्राहामाशी करार केला, या कराराचे चिन्ह होते सुंता. आणि म्हणून जेव्हा अब्राहामाला मुलगा झाला, तेव्हा अब्राहामाने आपल्या मुलाची, तो आठ दिवसांचा असताना, सुंता केली. त्याच्या मुलाचे नाव इसहाक होते. इसहाकानेसुद्धा आपला मुलगा याकोब याची सुंता केली. व याकोबाने आपल्या मुलांची सुंता केली. हे पुत्र नंतर बारा (पूर्वज) वडील झाले.

9“या वडिलांना (पूर्वजांना) योसेफाचा मत्सर वाटला. त्यांनी योसेफाला इजिप्तमध्ये एक गुलाम म्हणून विकले. परंतु योसेफाबरोबर देव होता. 10योसेफावर तेथे खूप संकटे आली पण देवाने त्याला सर्व संकटांतून सोडविले. देवाने योसेफाला ज्ञान व शहाणपण दिले. त्यामुळे इजिप्तचा राजा, फारो, याची मर्जी योसेफाला संपादन करता आली. फारोने योसेफाला इजिप्त देशावर व त्याच्या घरावर अधिपती म्हणून नेमले. 11मग सर्व इजिप्त व कनान देशावर दुष्काळ पडला. आणि लोकांच्या दु:खाला अंत राहिला नाही. आमच्या पूर्वजांना अन्नधान्य मिळेनासे झाले. 12जेव्हा याकोबाने ऐकले की, इजिप्त देशामध्ये धान्य आहे, त्याने आपल्या पूर्वजांना तिथे पाठविले. ही पहिली वेळ होती. 13ते दुसऱ्या वेळी आले तेव्हा योसेफाने आपली ओळख त्यांना करून दिली. आणि फारो राजाला योसेफाच्या कुटुंबाची माहिती झाली. 14मग योसेफाने काही लोकांना आपल्या वडिलांना, आणि त्याच्या कुटुंबातील पंच्याहत्तर

---

**फिलिप्प** प्रेषित फिलिप्प नव्हे.

**सभास्थान** या ठिकाणी (इमारतीत) यहूदी लोक देवाचे वचन वाचण्यासाठी व अभ्यासण्यासाठी येत असत.

**तुझा देश … देशात जा** उत्पत्ति 12:1

**तुझी संतती … शिक्षा देईन** उत्पत्ति 15:13-14

**या ठिकाणी … उपासना करतील** उत्पत्ति 15:14; निर्गम 3:12

लोकांना इजिप्त येथे. बोलावण्यासाठी पाठविले. 15मग याकोब इजिप्त देशात गेला आणि तो व आपले पूर्वज तेथेच मरण पावले. 16नंतर त्यांचे मृतदेह शेखेमला नेण्यात आले व तेथेच त्यांना पुरण्यात आले. अब्राहामाने शेखेम येथे हामोराच्या पुत्रांना पुरेपूर मोबदला देऊन विकत घेतलेल्या कबरीत त्यांना पुरण्यात आले.

17देवाने अब्राहामाला दिलेले वचन पुरे होण्याची वेळ जसजशी जवळ येऊ लागली, तसतशी इजिप्त देशातील आपल्या लोकांची संख्या वाढू लागली. 18शेवटी, ज्या राजाला योसेफाची माहिती नव्हती, असा राजा इजिप्तवर राज्य करू लागला. 19त्या (नवीन) राजाने फार हुशारीने आपल्या लोकांचा फायदा घेतला. तो आपल्या लोकांशी फार निर्दयतेने वागू लागला. तो त्यांच्या बालकांना घराबाहेर टाकून देण्यास भाग पाडू लागला. ती बालके जिवंत राहू नयेत हा त्याचा हेतु होता. 20त्या काळात मोशेचा जन्म झाला. आणि तो (देवाच्या नजरेत) फार सुंदर बालक होता. तीन महिन्यांपर्यंत त्याच्या वडिलांच्या घरात वाढला. 21आणि जेव्हा त्याला घराबाहेर ठेवण्यात आले तेव्हा फारोच्या कन्येने त्याला घेतले. तिने त्याला आपल्या मुलासारखा वाढवला. 22इजिप्तच्या लोकांनी त्याला सर्व प्रकारच्या ज्ञानात सुशिक्षित केले. तसेच तो बोलण्यात व कृतीत भारदस्त झाला.

23“जेव्हा तो चाळीस वर्षांचा झाला, त्याने विचार केला की, आपले बांधव, जे यहूदी लोक त्यांना जाऊन भेटावे, 24आणि जेव्हा त्याने आपल्या इस्राएली बांधवांपैकी एकाला वाईट वागविले जाताना पाहिले, तेव्हा त्याने त्या इजिप्तच्या रहिवाश्याला मारले. व आपल्या बांधवाची सुटका केली; छळ केला जाणाऱ्या यहूदी मनुष्याच्या वतीने त्याने बदला घेतला. 25देव त्याच्या हातून यहूदी लोकांची सुटका करीत आहे, हे यहूदी लोकांना कळेल असे मोशेला वाटले, परंतु त्यांना ते कळले नाही. 26दुसऱ्या दिवशी दोन यहूदी माणसे भांडण करताना मोशेने पाहिली, ते पाहून मोशे त्यांच्यात मध्यस्थी करू लागला. तो त्यांना म्हणाला, ‘पुरुषांनो, तुम्ही एकमेकांचे भाऊ आहात, तुम्ही एकमेकांशी का भांडत आहात?’ 27परंतु जो मनुष्य आपल्या शेजाऱ्याशी वाईट रीतीने वागत होता, त्याने मोशेला एका बाजूला सारून म्हटले, ‘आमच्यावर अधिकार गाजवायला आणि आमचा न्यायनिवाडा करायला तुला कोणी नेमिले? 28काल तू त्या इजिप्तच्या माणसाला ठार मारलेस; तसाच माझाही जीव घेण्याचे तुझ्या मनात आहे का?’*

29“जेव्हा मोशेने त्याला हे बोलताना ऐकले, तेव्हा तो इजिप्त सोडून पळून गेला. आणि मिद्यान्यांच्या देशात उपरी म्हणून राहू लागला आणि तेथेच त्याला दोन मुलगे झाले. 30चाळीस वर्षांनंतर मोशे सीनाय पर्वताजवळच्या वाळवंटात होता. एका जळणाऱ्या झुडपात मोशेला देवदूताचे दर्शन झाले. 31जेव्हा मोशेने हे पाहिले तेव्हा तो आश्चर्यचकित झाला. नीट पाहता यावे म्हणून तो त्या जळत्या झुडपाजवळ गेला. मोशेने एक वाणी ऐकली. तो आवाज प्रभूचा होता. 32प्रभु म्हणाला, ‘मी तुझ्या वाडवडिलांचा देव आहे– अब्राहाम, इसहाक, याकोब यांचा देव आहे.’ मोशे भीतीने थरथर कापू लागला. डोळे वर करून पाहण्याचे धाडस त्याला होईना. 33देव त्याला म्हणाला, ‘तुझ्या पायातील वहाणा काढ! कारण ज्या जागेवर तू उभा आहेस ती जागा पवित्र आहे. 34माझ्या लोकांचा इजिप्त देशात होणारा छळ मी पाहिला आहे. आणि त्यांचे विव्हळणे माझ्या कानी आले आहे. म्हणून त्यांची सुटका करण्यास मी खाली आलो आहे. आता ये, मी तुला परत इजिप्त देशाला पाठवीत आहे.’*

35“मोशे हाच तो मनुष्य होता, ज्याला यहूदी लोकांनी नाकारले. ‘तुला कोणी आमच्यावर अधिकार गाजवायला आणि न्याय करायला निवडले आहे काय?’ असे ते त्याला म्हणाले. मोशे हाच मनुष्य आहे की ज्याला देवाने शासनकर्ता व तारणारा म्हणून पाठविले. देवाने मोशेला देवदूताच्या मदतीने पाठविले. याच देवदूताला मोशेने जळत्या झुडपात पाहिले होते. 36म्हणून मोशेने लोकांना बाहेर काढले. त्याने सामर्थ्यशाली कृत्ये व चमत्कार केले. मोशेने ह्या गोष्टी इजिप्तमध्ये, तांबड्या समुद्राजवळ, आणि वाळवंटात चाळीस वर्षे केल्या. 37हा तोच मोशे आहे, ज्याने यहूदी लोकांना असे म्हटले: ‘देव तुम्हाला एक भविष्यवादी देईल. तो भविष्यवादी तुमच्याच लोकांमधून येईल. तो माझ्यासारखाच भविष्यवादी असेल’ 38जो अरण्यात यहूद्यांबरोबर होता, सीनाय पर्वतावर आपणाबरोबर बोलणाऱ्या देवदूताबरोबर व आपल्या वाडवडीलांबरोबर होता ज्याला आम्हास देण्यासाठी जीवनदायी वचने मिळाली होती, तोच हा मोशे होय.

39“परंतु आपले वाडवडील त्याचे ऐकायला तयार नव्हते. त्यांनी त्याचे ऐकले नाही. आणि त्यांनी त्याला नाकारले. त्यांची मने इजिप्त देशाकडे परत ओढ घेऊ लागली. 40आपले वाडवडील अहरोनाला म्हणाले, ‘आमच्यापुढे चालतील असे देव आमच्यासाठी तयार कर. कारण इजिप्त देशातून काढून आम्हांला बाहेर घेऊन येणारा हा मोशे, त्याचे काय झाले हे आम्हांला माहीत नाही’. 41त्यांनी याच काळात वासरासारखी दिसणारी एक मूर्ती तयार केली आणि त्या मूर्तीला अर्पणे सादर केली. आपल्या हातांनी घडविलेल्या या मूर्तीपुढे त्यांनी आनंदोत्सव साजरा केला! 42पण देवाने त्या लोकांकडे पाठ फिरविली आणि आकाशातील समूहांची (तारे, नक्षत्र, अशा खोट्या देवांची) भक्ति करीत राहण्यासाठी मोकळे सोडले. कारण भविष्यवाद्यांच्या पुस्तकात असे लिहिले आहे: देव म्हणतो,

---

**आमच्यावर … आहे का** निर्गम 2:14

**तुझ्या पायातील … पाठवीत आहे** निर्गम 3:5-10

'अहो यहूदी लोकांनो, तुम्ही वधलेल्या पशूंची अर्पणे मला आणली नाहीत, रानातील चाळीस वर्षांत
43तुम्ही तुमच्याबरोबर मोलेखासाठी तंबू (उपासनेचे स्थळ) आणि तुमचा देव रेफान यासाठी ताऱ्यांच्या मूर्ती नेल्यात या मूर्ती तुम्ही केल्या यासाठी की तुम्हांला उपासना करता यावी म्हणून मी तुम्हांला दूर बाबेलोनपलीकडे पाठवीन' *आमोस 5:24-27*

44"अरण्यात आपल्या वाडवडिलांच्या बरोबर साक्षीदाखल देवाचा तंबू होता. देवाने तो जसा बनविण्यास सांगितले त्याप्रमाणे व देवाने दाखविलेल्या नमुन्याप्रमाणे मोशेने तो बनविला.
45नंतर यहोशवाने आपल्या वाडवडिलांचे नेतृत्व करून इतर देशांच्या जमिनी काबिज केल्या. ती राष्ट्रे परमेश्वराने आमच्या पुढून घालविली. जेव्हा आपले लोक या नवीन प्रदेशात गेले तेव्हा हाच तंबू त्यांनी सोबत नेला. आमच्या लोकांना हा तंबू त्यांच्या वाडवडिलांकडून मिळाला व आपल्या पूर्वजांनी दावीदाच्या काळापर्यंत तो ठेवला.
46दावीद देवाच्या मर्जीचा असल्याने, याकोबाच्या देवासाठी मंदिर बांधण्याची इच्छा त्याने दर्शविली.
47परंतु देवाचे मंदिर शलमोनाने बांधले.

48"कारण सर्वोच्च देव मनुष्यांनी त्यांच्या हातांनी बांधलेल्या घरात राहत नाही. भविष्यवादी असे लिहितात:

49'प्रभु म्हणतो, स्वर्ग माझे सिंहासन आहे. पृथ्वी ही माझे पाय ठेवण्याचे आसन आहे. तुम्ही माझ्यासाठी कसले घर बांधू शकता? मला विश्रांती घेण्यासाठी दुसऱ्या ठिकाणाची गरज नाही.
50माझ्या हातांनी या सर्व गोष्टी केल्या नाहीत काय?' *यशया 66:1-2*

51"तुम्ही जे ताठ मानेचे लोक आहात त्या तुमची मने व कान विदेशी लोकांसारखी असून तुम्ही नेहमीच पवित्र आत्म्याला आपल्या पूर्वजांप्रमाणेच नाकारीत आला आहात.
52तुमच्या वाडवडिलांनी छळ केला नाही, असा कोणी एखादा भविष्यवादी होऊन गेला काय? एक धार्मिक (ख्रिस्त) येणार अशी घोषणा करणाऱ्यांचा त्यांनी वध केला. आणि आता तर तुम्ही त्याचा ही (ख्रिस्ताचा) विश्वासघात व खून केलात.
53तुम्हीच लोक आहात, ज्यांना नियमशास्त्र मिळाले. देवाने हे नियमशास्त्र देवदूतांकरवी दिले. परंतु तुम्ही ते पाळीत नाही!"

## स्तेफनाचा वध होतो

54यहूदी लोकांनी स्तेफनाला हे बोलताना ऐकले व त्यांना फार राग आला. ते त्याच्याविरुद्ध दातओठ खाऊ लागले.
55परंतु स्तेफन पवित्र आत्म्याने भरलेला होता. त्याने आपली नजर वर स्वर्गाकडे लावली. देवाचा गौरव त्याने पाहिला. त्याने येशूला देवाच्या उजवीकडे उभे असलेले पाहिले.
56तो म्हणाला, "पहा! स्वर्ग उघडलेला मला दिसत आहे. व मी मनुष्याच्या पुत्राला देवाच्या उजवीकडे उभा असलेला पाहत आहे!"

57स्तेफनाचे हे शब्द ऐकून यहूदी मोठ्याने ओरडले. त्यांनी आपले कान स्वतःच्या हातांनी झाकून घेतले. नंतर ते सर्व मिळून स्तेफनावर धावून गेले.
58त्यांनी स्तेफनाला धरून ओढीत शहराच्या बाहेर नेले व त्याला दगडमार करू लागले. जे साक्षी होते, त्यांनी आपले कपडे शौल नावाच्या एका तरुण मनुष्यापाशी ठेवले होते.
59ते स्तेफनावर दगडमार करीत असताना तो मोठ्याने प्रार्थना करीत म्हणाला, "हे प्रभु येशू, माझ्या आत्म्याचा स्वीकार कर!"
60नंतर स्तेफनाने आपले गुडघे टेकले व मोठ्याने ओरडून म्हणाला, "प्रभु, यांचे हे करणे त्यांच्या माथी पाप असे मानू नको!" असे बोलून त्याने प्राण सोडला.

## विश्वासणाऱ्यांवर संकट

8 स्तेफनाचा जो खून झाला त्याला शौलाची संमति होती. त्या दिवसापासून यरुशलेम येथील ख्रिस्ताच्या मंडळीचा मोठा छळ सुरू झाला. प्रेषितांशिवाय इतर सर्व विश्वासणारे शिष्य यहूदा व शोमरोन प्रांताच्या कानाकोपऱ्यात पांगून गेले.
2–3काही धार्मिक माणसांनी स्तेफनाला पुरले आणि त्याच्यासाठी त्यांनी फार शोक केला. शौलाने ख्रिस्ताच्या मंडळीचा छळ करण्यास सुरूवात केली. तो घरोघर जाई. स्त्रिया व पुरुष यांना धरून खेचून नेई व तुरुंगात टाकीत असे.
4विश्वासणारे सगळीकडे पांगले होते. जेथे कोठे विश्वासणारे जात, तेथे ते लोकांना सुवार्ता सांगत.

## शोमरोनात फिलिप्पाची सेवा

5फिलिप्प* शोमरोनातील एका शहरात गेला. त्याने ख्रिस्ताचा संदेश दिला. तेथील लोकांनी फिलिप्पाचे बोलणे ऐकले व त्याने केलेले चमत्कार पाहिले.
6फिलिप्प ज्या गोष्टी त्यांना सांगत असे त्या ते लक्षपूर्वक ऐकत असत.
7त्यांच्यापैकी पुष्कळांना अशुद्ध आत्मे लागले होते. पण फिलिप्पाने ते सर्व घालविले होते. ते माणसांच्या शरीरातून बाहेर पडताना मोठ्याने ओरडत बाहेर पडत असत. तेथे बरेच लंगडे व अर्धांगवायू झालेले लोक होते. फिलिप्पाने या लोकांना बरे केले.
8यामुळे शहरातील लोक फार आनंदित झाले.
9शिमोन नावाचा मनुष्य त्या नगरात राहत होता. तो जादूचे प्रयोग करीत असे. त्याच्या प्रयोगांमुळे लोक आश्चर्यचकित होत असत. तो स्वतःला फार मोठा समजत असे.

10अगदी लहानापासून थोरापर्यंत लोक लक्षपूर्वक त्याचे ऐकत. ते म्हणत असत. "देवाची महान शक्ति असे ज्याला

**फिलिप्प** प्रेषित नव्हे, दुसरा मनुष्य.

म्हणतात तोच हा मनुष्य आहे!” 11त्याने आपल्या जादूमुळे बराच काळपर्यंत लोकांना चकीत केले असल्याने लोक त्याच्याकडे लक्ष देत असत. 12परंतु जेव्हा देवाच्या राज्याविषयीची सुवार्ता आणि येशू ख्रिस्ताचे नाव फिलिप्पाने त्या लोकांना सांगितले तेव्हा त्यांनी त्याच्यावर विश्वास ठेवला. तेव्हा लोकांना बाप्तिस्मा देण्यात आला. त्यांच्यात जसे पुरुष होते, तशा स्त्रियाही होत्या. 13स्वत: शिमोनाने विश्वास ठेवला आणि त्याचा बाप्तिस्मा झाल्यावर तो फिलिप्प बरोबर राहू लागला. आणि झालेले चमत्कार आणि अद्‌भुत चिन्हे पाहून शिमोन आश्चर्याने थक्क झाला. 14यरुशलेममधील प्रेषितांनी हे ऐकले की शोमरोनातील लोकांनी देवाच्या वचनाचा स्वीकार केला, म्हणून पेत्र व योहान यांना प्रेषितांनी शोमरोनातील लोकांकडे पाठविले. 15जेव्हा पेत्र व योहान आले, तेव्हा त्यांनी शोमरोनी विश्वासणाऱ्यांना पवित्र आत्मा मिळावा म्हणून प्रार्थना केली. 16या लोकांचा प्रभु येशूच्या नावात बाप्तिस्मा झाला होता, परंतु पवित्र आत्मा अजून त्यांच्यावर आला नव्हता. 17मग पेत्र व योहान यांनी त्यांच्या डोक्यावर हात ठेवला आणि त्यांना पवित्र आत्मा मिळाला.

18शिमोनाने पाहिले की, प्रेषितांच्या हात ठेवण्याने लोकांना पवित्र आत्मा मिळाला, तेव्हा शिमोन प्रेषितांना पैसे देऊ लागला. 19शिमोन म्हणाला, “मी ज्याच्यावर हात ठेवीन त्याला पवित्र आत्मा मिळेल, अशी शक्ति मला सुध्दा द्या.”

20पेत्र शिमोनाला म्हणाला, “तुझा व तुझ्या पैशाचा नाश होवो! कारण, देवाचे दान पैशाच्या बळावर विकत घेण्याचा तू विचार केलास! 21या कामात तू आमचा सहभागी होऊ शकणार नाहीस. कारण तुझे अंत:करण देवासमोर योग्य नाही. 22आपले हृदय बदल, तू ज्या या वाईट गोष्टी केल्या आहेत, त्या सोडून दे. प्रभूला (देवाला) प्रार्थना कर. कदाचित तुझ्या पश्चात्तप्त अंत:करणामुळे तो तुला क्षमा करील. 23कारण तुझ्या मनात कटू मत्सर भरलेला आहे. व तू पापाचा दास झालेला आहेस, हे मला दिसून आले आहे!”

24शिमोनाने उत्तर दिले, “आपण दोघेही माझ्यासाठी देवाजवळ प्रार्थना करावी. यासाठी की, ज्या गोष्टीबद्दल तुम्ही बोललात त्यांपैकी एकही गोष्ट माझ्यावर न येवो!”

25नंतर दोन्ही प्रेषितांनी आपली साक्ष लोकांना दिली (जे त्यांनी येशूला करताना पाहिले होते ते सांगितले.) त्यांनी प्रभूचा संदेश त्यांना सांगितला. मग ते यरुशलेमला परत गेले. परत येताना वाटेत त्यांनी अनेक शोमरोनी गावांत सुवार्ता सांगितली.

## इथिओपियाच्या मनुष्याला फिलिप्पा शिक्षण देतो

26देवाचा दूत फिलिप्पाशी बोलला, तो म्हणाला “तयार हो आणि दक्षिणेकडे जा. यरुशलेमहून गाझाकडे जाणाऱ्या रस्त्याने जा– तो रस्ता वाळवंटातून जातो.” 27मग फिलिप्प तयार झाला व गेला. रस्त्यात त्याला एक इथिओपियाचा मनुष्य भेटला. तो मनुष्य षंढ होता. तो इथिओपियाच्या कांदके राणीकडे उच्च पदावर अधिकारी म्हणून कामाला होता. तो राणीच्या खजिन्याचा मुख्य होता. तो यरुशलेमला उपासना करण्यासाठी गेला होता. 28आता तो आपल्या घरी चालला होता. तो त्याच्या रथात बसला होता आणि यशया संदेष्टयाचे पुस्तक वाचत होता. 29पवित्र आत्मा फिलिप्पाला म्हणाला, “त्या रथाजवळ जा!” 30मग फिलिप्प त्या रथाजवळ धावत धावत गेला, तेव्हा तो मनुष्य वाचत असताना त्याने ऐकले. फिलिप्प त्याला म्हणाला, “तुम्ही जे वाचत आहात, त्याचा अर्थ तुम्हांला कळतो का?”

31तो अधिकारी म्हणाला, “मला हे कसे समजेल? कोणीतरी याचा उलगडा करून मला सांगायला हवे.” आणि त्याने फिलिप्पाला रथात चढून आपल्यापाशी बसण्यास बोलाविले. 32पवित्र शास्त्रातील जो भाग तो वाचत होता, तो भाग पुढीलप्रमाणे होता:

“वधायला नेत असलेल्या मेंढरासारखा तो होता. लोकर कातरणाऱ्यांपुढे गप्प राहणाऱ्या मेंढराप्रमाणे तो शांत राहिला. त्याने आपले तोंड उघडले नाही.

33त्याला लज्जित केले गेले, त्याचे हक्क काढून घेतले गेले. त्याच्या पिढीविषयी कोणतीही गोष्ट पुढे वर्णिली जाणार नाही. कारण पृथ्वीवरील त्याचे जीवन संपविले गेले आहे.” *यशया 53:7-8*

34तो अधिकारी फिलिप्पाला म्हणाला, “कृपा करून मला सांगा, भविष्यवादी हे कोणाविषयी बोलतो आहे? तो स्वत:विषयी बोलत आहे की दुसऱ्या कोणाविषयी बोलत आहे?” 35मग फिलिप्पाने तोंड उघडले व पवित्र शास्त्रातील या भागापासून सुरुवात करून येशूविषयीची सुवार्ता त्याला सांगितली.

36ते दोघे प्रवास करीत असताना एका पाण्याच्या ठिकाणाजवळ (तव्व्याजवळ) आले. अधिकारी म्हणाला, “पहा! येथे पाणी आहे! माझा बाप्तिस्मा करायला कोणती अडचण आहे?”

37* 38आणि षंढाने रथ थांबविण्याची आज्ञा केली. नंतर फिलिप्प व षंढ हे दोघे उतरून पाण्यात गेले आणि फिलिप्पाने त्याचा बाप्तिस्मा केला. 39जेव्हा ते पाण्याबाहेर आले, तेव्हा प्रभूच्या आत्म्याने फिलिप्पाला दूर नेले आणि त्या अधिकाऱ्याला फिलिप्प पुन्हा दिसला नाही. पण तो अधिकारी पुढे तसाच मोठ्या आनंदाने प्रवास करीत घरी गेला.

---

**वचन 37** काही अगदी अलीकडील प्रतींमध्ये असे लिहिले आहे: फिलिप्पाने उत्तर दिले, “तुम्ही अंत:करणापासून जर विश्वास ठेवत असाल, तर तुम्हीही बाप्तिस्मा घेऊ शकता.” तो अधिकारी म्हणाला, “येशू ख्रिस्त हा देवाचा पुत्र आहे, असा मी विश्वास धरतो.”

[40]आपण अजोत नगरात आहोत असे फिलिप्पाला दिसून आले आणि पुढे जात असताना जी गावे लागली त्या सर्व गावात त्याने सुवार्ता सांगितली. नंतर तो कैसरीयाला गेला.

## शौलाचे परिवर्तन

9 शौल यरूशलेममध्ये प्रभूच्या अनुयायांना अजूनही धमकावण्याचा व जिवे मारण्याचा प्रयत्न करीत होता. म्हणून तो प्रमुख याजकांकडे गेला. [2]शौलाने त्याला दिमिष्क येथील सभास्थानातील यहूदी लोकांना पत्र लिहिण्यास सांगितले. शौलाला प्रमुख याजकाकडून दिमिष्क येथील ख्रिस्ताच्या अनुयायांना पकडण्यासाठी अधिकार पाहिजे होता. जर त्याला तेथे कोणी विश्वासणारा, मग तो पुरुष असो अथवा स्त्री, सापडले असते तर त्याने त्यांना अटक करून यरूशलेमला आणले असते. [3]मग शौल दिमिष्काला गेला. जेव्हा तो शहराजवळ आला तेव्हा एकाएकी आकाशातून फारच प्रखर प्रकाश त्याच्याभोवती चमकला. [4]शौल जमिनीवर पडला. एक वाणी त्याच्याशी बोलताना त्याने ऐकली, "शौला, शौला! तू माझा छळ का करतोस?"

[5]शौल म्हणाला, "प्रभु तू कोण आहेस?"

ती वाणी म्हणाली, "मी येशू आहे. ज्याचा तू छळ करीत आहेस तो मीच आहे. [6]आता ऊठ आणि नगरात जा. तुला काय करायचे आहे, हे तुला तेथे कोणी तरी सांगेल."

[7]जी माणसे शौलाबरोबर प्रवास करीत होती, ती तेथेच स्तब्ध उभी राहिली. त्या लोकांनी आवाज ऐकला, पण त्यांना कोणी दिसले नाही. [8]शौल जमिनीवरून उठला. त्याने डोळे उघडले, पण त्याला काहीच दिसेना. म्हणून जे लोक त्याच्या बरोबर होते, त्यांनी त्याचा हात धरून त्याला दिमिष्क शहरात नेले. [9]तीन दिवसांपर्यंत शौलाला काहीच दिसत नव्हते. त्याने काहीच खाल्ले किंवा प्यायले नाही.

[10]दिमिष्कमध्ये येशूचा एक अनुयायी होता. त्याचे नाव हनन्या होते. प्रभु त्याच्याशी एका दृष्टान्तात बोलला: तो म्हणाला, "हनन्या!"

हनन्याने उत्तर दिले, "मी आहे, प्रभु!"

[11]प्रभु हनन्याला म्हणाला, "ऊठ आणि नीट नावाच्या रस्त्यावर जा. तेथे यहूदाचे* घर शोध व तार्ससहून आलेल्या शौल नावाच्या व्यक्तिबद्दल विचार. सध्या तो तेथे आहे व प्रार्थना करीत आहे. [12]शौलाने दृष्टान्त पाहिला आहे. त्यात हनन्या नावाचा मनुष्य आपल्याकडे आला असून आपल्यावर हात ठेवीत आहे, असे त्याला दिसले. व त्यानंतर त्याला पुन्हा दृष्टी प्राप्त झाली, असे त्याला दिसले."

[13]परंतु हनन्याने उत्तर दिले, "प्रभु मी त्या मनुष्याविषयी अनेक लोकांच्या तोंडून ऐकले आहे. यरुशलेम येथील तुझ्या संतांशी तो किती वाईट रीतीने वागला हे मी ऐकले आहे. [14]आणि आता जे तुझ्या नावावर विश्वास ठेवतात, अशा लोकांना बांधून नेण्यासाठी प्रमुख याजकाकडून अधिकारपत्र घेऊन हा शौल येथे आला आहे."

[15]परंतु प्रभु म्हणाला, "जा! एका महत्त्वाच्या कामाकरिता मी त्याला निवडले आहे. माझ्याविषयी त्याने राजांना, यहूदी लोकांना, आणि दुसऱ्या राष्ट्रांना सांगितले पाहिजे. [16]माझ्या नावाकरिता ज्या गोष्टी त्याला सहन कराव्या लागतील त्या मी त्याला दाखवून देईन."

[17]हनन्या निघाला, आणि यहूदाच्या घरी गेला. त्याने शौलाच्या डोक्यावर हात ठेवला आणि म्हटले, "शौला, माझ्या बंधू, प्रभु येशूने मला पाठविले. ज्याने तुला इकडे येत असता रस्त्यावर दर्शन दिले त्यानेच मला तुझ्याकडे पाठविले. येशूने मला पाठविले यासाठी की, तुला पुन्हा पाहता यावे व पवित्र आत्म्याने तू भरला जावास." [18]लागलीच खपल्यासारखे काही तरी शौलाच्या डोळ्यांवरून खाली पडले. आणि त्याला पुन्हा दृष्टी आली शौल तेथून उठल्यावर त्याचा बाप्तिस्मा करण्यात आला. [19]नंतर त्याने अन्न सेवन केल्यावर त्याच्या अंगात जोम आला. शौल काही दिवस दिमिष्क येथील शिष्यांबरोबर राहिला.

## शौल दिमिष्कात सुवार्ता सांगतो

[20]यानंतर सरळ सभास्थानात जाऊन शौल येशूच्या नावाची घोषणा करू लागला. "येशू हा देवाचा पुत्र आहे."

[21]ज्या लोकांनी शौलाचे बोलणे ऐकले त्या सर्वांना मोठे नवल वाटले. ते म्हणाले, "यरुशलेम येथील ज्या लोकांचा येशूच्या नावावर विश्वास आहे, त्या सर्वांचा नाश करू पाहणारा हाच नाही काय? तो येशूच्या अनुयायांना अटक करण्यासाठी येथे आला आहे व तो त्यांना यरुशलेम येथील प्रमुख याजकासमोर उभे करणार आहे."

[22]परंतु शौल अधिकाधिक सामर्थ्यशाली होत गेला. त्याने हे सिद्ध केले की, येशू हाच ख्रिस्त आहे. आणि त्याचे पुरावे इतके सबळ होते की, दिमिष्क येथील यहूदी त्याच्याबरोबर वाद घालू शकले नाहीत.

## शौल यहूदी लोकांपासून निसटून जातो

[23]बऱ्याच दिवसांनंतर यहूदी लोकांनी शौलाला जिवे मारण्याचा कट रचला. [24]यहूदी रात्रंदिवस शहराच्या वेशीवर पहारा देत होते. व शौलाला पकडण्याची वाट पाहत होते. त्यांना शौलाला ठार मारायचे होते, पण त्यांचा हा बेत शौलास समजला. [25]एक रात्री शौलाने ज्यांना शिक्षण दिले होते अशा काही अनुयायांनी शहरातून जाण्यासाठी शौलाला मदत केली. अनुयायांनी शौलाला एका टोपलीत ठेवले. नंतर त्यांनी टोपली गावकुसावरून रात्रीच्या वेळी खाली सोडली.

---

**यहूदा** हे कोणत्याही प्रेषिताचे नाव नाही.

### यरुशलेममध्ये शौल

26नंतर शौल यरुशलेमला गेला. तेथील विश्वास
णाऱ्यांच्या परिवारात मिसळण्याचा त्याने प्रयत्न केला,
पण ते त्याला घाबरत होते. त्यांचा विश्वासच बसत नव्हता
की, शौल खरोखर येशूचा शिष्य झाला आहे. 27परंतु
बर्णबाने शौलाचा स्वीकार केला व त्याला घेऊन प्रेषितांकडे
गेला. बर्णबाने सांगितले की, शौलाने येशूला दिमिष्कच्या
रस्त्यावर पाहिले आहे. येशू त्याच्याशी कसा बोलला हेही
त्याने सविस्तरपणे सांगितले. मग त्याने प्रेषितांना सांगितले
की, येशूविषयीची सुवार्ता शौलाने मोठ्या धैर्याने दिमिष्क
येथील लोकांना सांगितली.

28मग शौल अनुयायांसह तेथे राहिला. तो यरुशलेममध्ये
सगळीकडे गेला व धैर्याने प्रभुची सुवार्ता सांगू लागला.
29शौल नेहमी ग्रीक भाषा बोलणाऱ्या यहूदी लोकांशी
बोलत असे तो त्यांच्याशी वादविवाद करीत असे. पण ते
त्याला मारण्याचा प्रयत्न करीत होते. 30जेव्हा बंधुजनांना
(विश्वासणाऱ्यांना) हे कळाले तेव्हा त्यांनी त्याला कैसरीया
येथे नेले, व नंतर तेथून त्याला तार्सस नगराला पाठविले.

31मंडळी जेथे कोठे ती होती—यहूदीया, गालीली, शोमरोन,
तेथे त्यांना शांति लाभली. पवित्र आत्म्याच्या साहाय्याने
हा गट अधिक शक्तिशाली बनला. आपल्या वागणुकीने
विश्वासणाऱ्यांनी दाखवून दिले की, ते प्रभूचा आदर
करतात. या कारणामुळे विश्वासणाऱ्यांचा परिवार मोठा
होत गेला.

32पेत्र यरुशलेमच्या सभोवतालच्या गावामध्ये फिरला.
लोद या गावामध्ये जे विश्वासणारे होते, त्यांना भेटला.
33लोद येथे त्याला ऐनेयास नावाचा माणूस आढळला.
त्याच्या अंगातून वारे गेल्याने तो पंगू झाला होता व आठ
वर्षे अंथरुणाला खिळून होता. 34पेत्र त्याला म्हणाला,
"ऐनेयास, येशू ख्रिस्त तुला बरे करीत आहे. ऊठ, आपले
अंथरुण नीट कर!" ऐनेयास ताबडतोब उभा राहिला.
35लोद येथे राहणाऱ्या सर्व लोकांनी आणि शारोनाच्या
पठारावर राहणाऱ्यांनी त्याला पाहिले. तेव्हा ते सर्व प्रभूकडे
वळले.

### यापो येथे पेत्र

36यापो शहरात येशूची एक शिष्या राहत होती. तिचे
नाव तबिथा होते (ग्रीक भाषेत तिचे नाव दुर्कस होते,
त्याचा अर्थ हरीण) ती नेहमी लोकांसाठी चांगली कामे
करीत असे. गरीबांना दानधर्म करीत असे. 37जेव्हा पेत्र
लोदमध्ये होता. तेव्हा तबिथा आजारी पडली व मेली.
त्यांनी (लोकांनी) तिचे शरीर धुतले व ते माडीवरच्या
एका खोलीत ठेवले. 38यापो येथील अनुयायांनी ऐकले
की, पेत्र लोदमध्ये आहे. (लोद हे यापोजवळ आहे,) म्हणून
त्यांनी दोन माणसे पाठविली. त्यांनी त्याला विनंति केली.
ते म्हणाले, "त्वरा करा, आमच्याकडे लवकर या!" 39पेत्र
तयार झाला व त्यांच्याबरोबर गेला. जेव्हा तो तेथे पोहोचला
तेव्हा त्यांनी त्याला माडीवरच्या खोलीत नेले. सर्व विधवा
स्त्रिया पेत्राभोवती उभ्या राहिल्या. त्या रडत होत्या. दुर्कस
(तबीथा) जिवंत असताना जे कपडे व झगे तिने तयार
केले होते ते त्यांनी पेत्राला दाखवले. 40पेत्राने खोलीतील
सर्वांना बाहेर काढले. त्याने गुडघे टेकून प्रार्थना केली.
आणि दुर्कसच्या शरीराकडे वळून तो म्हणाला, "तबिथा
ऊठ!" तेव्हा तिने डोळे उघडले. जेव्हा तिने पेत्राला पाहिले
तेव्हा ती उठून बसली.

41त्याने तिला आपला हात देऊन उभे राहण्यास मदत
केली. नंतर त्याने विश्वासणाऱ्यांना आणि विधवा स्त्रियांना
खोलीमध्ये बोलाविले. त्याने तबिथाला त्यांना दाखवले.
ती जिवंत होती! 42यापोामधील सर्व लोकांना हे समजले.
यातील पुष्कळ लोकांनी प्रभूवर विश्वास ठेवला. 43पेत्र
यापोमध्ये बरेच दिवस राहिला. तो शिमोन नावाच्या
चांभाराकडे राहिला.

### पेत्र आणि कर्नेल्य

10 कर्नेल्य नावाचा मनुष्य कैसरीयामध्ये राहत होता.
तो इटलीक नावाच्या पलटणीत शताधिपती होता.
2कर्नेल्य हा धर्मशील असून आपल्या कुटुंबासह देवाचे
भय बाळगणारा होता. तो गोरगरिबांना पुष्कळसा दानधर्म
करीत असे आणि तो नेहमी देवाची प्रार्थना करीत असे.
3एके दिवशी दुपारी तीन वाजण्याच्या सुमारास, कर्नेल्याला
दृष्टान्त झाला. त्याने तो स्पष्टपणे पाहिला. त्या दृष्टान्तात
देवाचा एक दूत त्याच्याकडे आला आणि त्याला म्हणाला,
"कर्नेल्या!"

4कर्नेल्य देवदूताकडे पाहू लागला. तो भयभीत झाला
होता. "काय आहे, प्रभु?"

देवदूत कर्नेल्याला म्हणाला, "देवाने तुझी प्रार्थना ऐकली
आहे. ज्या गोष्टी तू गरीबांना दिल्या आहेत, त्या देवाने
पाहिल्या आहेत. देवाला तुझी आठवण आहे. 5तू यापो
गावी माणसे पाठीव आणि शिमोन नावाच्या माणसाला
घेऊन ये. शिमोनाला पेत्र असे सुद्धा म्हणततात; तो 6शिमोन
नावाच्याच चाभाराच्या घरी राहत आहे. त्याचे घर
समुद्राजवळ आहे." 7कर्नेल्याशी बोलणे झाल्यावर देवदूत
निघून गेला. नंतर कर्नेल्याने त्याचे दोन विश्वासू नोकर
व एका धर्मशील शिपायाला बोलावून घेतले. 8कर्नेल्याने
या तिघांना घडलेले सर्व काही सांगितले, आणि त्यांना
यापोला पाठविले.

9सऱ्या दिवशी ही माणसे यापो गावाजवळ आली. ती
दुपारची वेळ होती. त्याच वेळी प्रार्थना करावयास पेत्र
गच्चीवर गेला. 10पेत्राला भूक लागली होती. त्याला खायला
पाहिजे होते. ते पेत्रासाठी जेवण करीत असता पेत्राला तंद्री
लागली. 11आणि आपल्यासमोर आकाश उघडले असून
चारही कोपऱ्यांना बांधून खाली सोडल्यामुळे मोठ्या
चादरीसारखे काही तरी जमिनीवर येत आहे, असे त्याला
दिसू लागले. 12त्या चादरीत वेगवेगळ्या प्रकारचे प्राणी

होते. उदा. चालणारे, सरपटणारे, आकाशात उडणारे पक्षी
त्यात होते. 13नंतर एक वाणी पेत्राने ऐकली, "पेत्रा, ऊठ;
यापैकी कोणताही प्राणी मारून खा."

14पण पेत्र म्हणाला, "मी तसे कधीच करणार नाही,
प्रभु! जे अशुद्ध व अपवित्र आहे असे कोणतेही अन्न मी
अद्याप खाल्लेले नाही."

15पण ती वाणी त्याला पुन्हा म्हणाली, "देवाने या गोष्टी
शुद्ध केल्या आहेत. त्यांना अपवित्र म्हणू नकोस!" 16असे
तीन वेळा घडले. मग त्या सगळ्या गोष्टी वर स्वर्गामध्ये
पुन्हा घेतल्या गेल्या.

17पेत्र भयचकित होऊन या दृष्टान्ताचा अर्थ काय असावा
याविषयी विचार करू लागला. ज्या लोकांना कर्नेल्याने
पाठविले होते, त्यांना शिमोनाचे घर सापडले. ते दाराजवळ
उभे होते. 18त्यांनी विचारले, "शिमोन पेत्र येथेच राहतो
काय?"

19पेत्र अजूनसुद्धा या दृष्टान्ताविषयीच विचार करीत
होता. पण आत्मा त्याला म्हणाला, "ऐक, तीन माणसे
तुला शोधीत आहेत. 20ऊठ आणि पायऱ्या उतरून खाली
जा. कारण मीच त्यांना पाठवले आहे. काही संशय न
धरता त्यांच्याबरोबर जा." 21मग पेत्र खाली त्या माणसांकडे
गेला. तो म्हणाला, "तुम्ही ज्याचा शोध करीत आहात तो
मीच आहे. तुम्ही येथे का आलात?"

22ती माणसे म्हणाली, "एका पवित्र दूताने तुम्हांला
आमंत्रित करण्याविषयी कर्नेल्याला सांगितले होते. कर्नेल्य
हा शताधिपती आहे. तो चांगला धर्मशील मनुष्य आहे. तो
देवाची उपासना करतो. सर्व यहूदी लोक त्याचा आदर
करतात. तुम्हांला घरी बोलावून तुमचे शब्द ऐकावेत असे
देवदूताने त्याला सांगितले आहे." 23पेत्राने त्यांना आत
बोलावून घेतले व रात्रभर मुक्काम करण्यास सांगितले.

दुसऱ्या दिवशी पेत्र तयार झाला व त्या तीन मनुष्यांबरोबर
गेला. यापो येथील काही बंधुही पेत्राबरोबर गेले. 24दुसऱ्या
दिवशी पेत्र कैसरीया शहरात आला. कर्नेल्य त्याची वाट
पाहत होता. त्याने आपले जवळचे मित्र व नातेवाईक
यांनाही आपल्या घरी जमा केले होते. 25जेव्हा पेत्र आत
गेला, तेव्हा कर्नेल्य त्याला भेटला. कर्नेल्याने पेत्राच्या
पाया पडून आदराने त्याला अभिवादन केले. 26पण पेत्र
म्हणाला, "उभा राहा, मी तुझ्यासारखाच मनुष्य आहे."
27पेत्र त्याच्याशी बोलत घरात गेला आणि आतमध्ये बरेच
लोक जमलेले त्याने पाहिले. 28पेत्र त्या लोकांना म्हणाला,
"तुम्ही हे जाणता की, यहूदी मनुष्याने इतर जातींच्या
लोकांच्या घरी जाणे किंवा त्यांच्याशी संबंध ठेवणे हे
यहूदी नियमाला धरून नाही, पण देवाने मला दाखविले
आहे की, मी इतर मनुष्यमात्राला 'अशुद्ध' किंवा 'अपवित्र'
मानू नये. 29याच कारणासाठी जेव्हा हे लोक मला
बोलावण्यास आले, तेव्हा मी त्यांच्याशी वाद घातला नाही.
आता, कृपा करून मला सांगा, तुम्ही मला येथे का
बोलाविले?"

30कर्नेल्य म्हणाला, "चार दिवसांपूर्वी, माझ्या घरामध्ये
मी प्रार्थना करीत होतो. बरोबर याच वेळेला म्हणजे दुपारचे
तीन वाजता मी प्रार्थना करीत होतो. अचानक एक मनुष्य
माझ्यासमोर उभा राहिला. त्याने लखलखीत, चमकदार
कपडे घातले होते. 31तो मनुष्य म्हणाला, 'कर्नेल्या! देवाने
तुझी प्रार्थना ऐकली आहे. गरीब लोकांना ज्या वस्तू तू
दिल्या आहेत ते देवाने पाहिले आहे. देव तुझी आठवण
करतो. 32म्हणून यापो या शहरी काही माणसे पाठव व
शिमोन पेत्राला बोलावून घे. पेत्र हा शिमोन चांभाराच्या
घरी राहत आहे. आणि त्याचे घर समुद्राच्या जवळ आहे.'
33तेव्हा मी लागलीच तुम्हांला निरोप पाठविला. तुम्ही
येथे आलात ही तुमची मोठी कृपा आहे. तेव्हा आम्हांला
जे काही सांगण्याची आज्ञा प्रभूने तुम्हांला दिली आहे, ते
ऐकण्यासाठी आम्ही सर्व आता येथे देवासमोर जमलेले
आहोत."

## कर्नेल्याच्या घरात पेत्र भाषण करतो

34पेत्राने बोलायला सुरुवात केली: "मला आता हे
खरोखर समजले आहे की, देवाला प्रत्येक मनुष्य सारखाच
आहे. 35जो कोणी त्याची भक्ति करतो आणि योग्य ते
करतो, त्याला देव स्वीकारतो. व्यक्ति कोणत्या देशाची
आहे, हे महत्त्वाचे नाही. 36देव यहूदी लोकांशी बोलला.
देवाने त्यांना सुवार्ता पाठविली की, येशू ख्रिस्ताद्वारे शांति
जगात आली आहे. येशू सर्वांचा प्रभु आहे! 37सगळ्या
यहूदा प्रांतात काय घडले हे तुम्हा सर्वांना माहीत आहे.
त्याची सुरूवात योहानाने लोकांना बाप्तिस्म्याविषयी
गालीलात जो संदेश दिला, त्याने झाली. 38नासरेथच्या
येशूविषयी तुम्हांला माहिती आहे. देवाने त्याला पवित्र
आत्मा व सामर्थ्य देऊन ख्रिस्त बनविले. येशू सगळीकडे
लोकांच्यासाठी चांगल्या गोष्टी करीत गेला. जे लोक दुष्ट
आत्म्याने पछाडले होते त्यांना येशूने बरे केले. त्यामुळे
देव येशूबरोबर आहे हे दिसून आले. 39येशूने संपूर्ण यहूदी
प्रांतात आणि यरुशलेमात जे जे केले त्या सर्व गोष्टी
आम्ही पाहिल्या आणि आम्ही त्याचे साक्षीदार आहोत.
पण येशूला मारण्यात आले. लाकडाच्या वधस्तंभावर त्यांनी
त्याला खिळले.

40परंतु देवाने तिसऱ्या दिवशी त्याला जिवंत केले!
देवाने येशूला लोकांना स्पष्ट पाहू दिले. 41परंतु सर्वच
माणसांनी येशूला पाहिले नाही. देवाने त्यांना अगोदरच
साक्षीदार म्हणून निवडले होते, त्यांनीच त्याला पाहिले. ते
साक्षीदार आम्ही आहोत! येशू मरणातून उठविला
गेल्यानंतर आम्ही त्याच्याबरोबर अन्नपाणी सेवन केले.
42येशूने आम्हांला लोकांना उपदेश करायला सांगितले.
जिवंतांचा आणि मेलेल्यांचा न्याय करण्यासाठी देवाने त्याला
आपल्याला आहे हे सांगण्यासाठी त्याने आम्हांला आज्ञा
केली. 43जो कोणी येशूवर विश्वास ठेवतो, त्याला क्षमा

केली जाईल. येशूच्या नावामध्ये देव त्या व्यक्तिच्या पापांची
क्षमा करील. सर्व संदेष्टे हे खरे आहे असे म्हणतात."

## यहूदी नसलेल्यांवर पवित्र आत्मा येतो

44पेत्र हे बोलत असतानाच त्याचे बोलणे ऐकत बसलेल्या
सर्व लोकांवर पवित्र आत्मा आला. 45यहूदी विश्वासणारे
जे पेत्राबरोबर आले होते, ते चकित झाले. यहूदी नसलेल्या
लोकांवरसुद्धा पवित्र आत्मा ओतला गेला, यामुळे ते चकित
झाले. 46आणि यहूदी नसलेल्या लोकांना निरनिराळ्या
भाषा बोलताना आणि देवाची स्तुति करताना यहूदी लोकांनी
पाहिले. 47मग पेत्र म्हणाला, "या लोकांना पाण्याने बाप्तिस्मा
देण्यास आपण नकार देऊ शकत नाही. ज्याप्रमाणे आम्हांला
मिळाला, त्याचप्रमाणे त्यांनाही पवित्र आत्मा मिळाला आहे."
48म्हणून पेत्राने कर्नेल्य, त्याचे नातेवाईक आणि मित्र
यांना बाप्तिस्मा देण्याची आज्ञा केली. मग पेत्राने आणखी
काही दिवस त्यांच्याबरोबर राहावे अशी त्या लोकांनी
त्याला विनंति केली.

## पेत्र यरुशलेमला परत येतो

11 यहूदी नसलेल्या लोकांनीसुद्धा देवाच्या वचनाचा
स्वीकार केला आहे हे यहूदा प्रांतातील प्रेषितांनी
व बंधूंनी ऐकले. 2पण जेव्हा पेत्र यरुशलेमला आला,
तेव्हा काही यहूदी विश्वासणाऱ्यांनी त्याच्याशी वाद घातला.
3ते म्हणाले, "जे सुंता न झालेले व यहूदीतर आहेत अशा
लोकांच्या घरी तुम्ही गेला, एवढेच नव्हे तर तुम्ही त्यांच्यासह
जेवणही केले!"
4म्हणून पेत्राने त्यांना सर्व घटना स्पष्ट करून सांगितल्या.
5पेत्र म्हणाला, "मी यापो शहरात होतो. प्रार्थना करीत
असताना मला तंद्री लागल्यासारखे झाले व मला दृष्टान्त
घडला. मी दृष्टान्तामध्ये आकाशातून काही तरी खाली
येताना पाहिले. ते मोठ्या चादरीसारखे दिसत होते. व
त्याचे चारही कोपरे धरून ते खाली सोडले जात होते. ते
खाली आले आणि अगदी माझ्याजवळ थांबले. 6मी त्याच्या
आतमध्ये पाहिले. मी त्यात पाळीव आणि जंगली प्राणी
पाहिले. सरपटणारे प्राणी आणि उडणारे पक्षी मी त्यात
पाहिले. 7एक वाणी माझ्याशी बोलताना मी ऐकली. 'पेत्रा,
ऊठ, यातील कोणताही प्राणी मार व खा!' 8पण मी म्हणालो,
'प्रभु, मी असे कधीही करणार नाही. मी अपवित्र किंवा
अशुद्ध असे कधीच खाल्ले नाही'. 9आकाशातून त्या
वाणीने पुन्हा उत्तर दिले, 'देवाने या गोष्टी शुद्ध केल्या
आहेत. त्यांना अपवित्र म्हणू नकोस!' 10असे तीन वेळा
घडले. मग ते सर्व पुन्हा वर आकाशात घेतले गेले.
11तेवढ्यात तीन माणसे मी ज्या घरामध्ये राहत होतो, तेथे
आली. कैसरीया शहरातून या तीन माणसांना माझ्याकडे
पाठविण्यात आले होते. 12आत्म्याने मला कोणत्याही
प्रकारचा संशय न धरिता त्यांच्याबरोबर जाण्यास सांगितले.
हे सहा बंधु (विश्वासणारे) जे येथे आहेत, तेही माझ्याबरोबर
होते. आम्ही कर्नेल्याच्या घरी गेलो. 13कर्नेल्याने आपल्या
घरात देवदूत उभा असलेला कसा दिसला हे आम्हास
सांगितले. देवदूत कर्नेल्याला म्हणाला, "काही माणसे यापोस
पाठव. शिमोन पेत्राला बोलावून घे. 14तो तुझ्याशी बोलेल.
तो ज्या गोष्टी तुला सांगेल, त्यामुळे तुझे व तुझ्या कुटुंबाचे
तारण होईल.' 15त्यानंतर मी माझ्या भाषणाला सुरुवात
केली. सुरुवातीला ज्याप्रमाणे पवित्र आत्मा आपल्यावर
आला तसाच तो त्यांच्यावरही आला. 16तेव्हा मला प्रभूचे
शब्द आठवले. प्रभु म्हणाला होता, 'योहान लोकांचा
बाप्तिस्मा पाण्याने करीत असे. पण तुमचा बाप्तिस्मा पवित्र
आत्म्याने होईल!' 17आपण येशू ख्रिस्तावर विश्वास ठेवला
तेव्हा जसे आपणांस तसे त्यांसही देवाने सारखेच दान
दिले. मग देवाचे काम मी कसा थांबवू शकत होतो?"
18जेव्हा यहूदी विश्वासणाऱ्यांनी या गोष्टी ऐकल्या, तेव्हा
त्यांनी आपले म्हणणे थांबविले. त्यांनी देवाची स्तति केली
आणि म्हणाले, "म्हणजे देव यहूदी नसलेल्यांना त्यांचे
अंत:करण बदलण्यासाठी मोकळीक देत आहे आणि
आम्हांला जसे जीवन प्राप्त झाले तसे त्यांनाही देऊ इच्छीत
आहे "

## अंत्युखियाला सुवार्ता येते

19स्तेफन मारला गेल्यानंतरच्या काळात जो छळ झाला,
त्यामुळे विश्वासणारे पांगले. यातील काही दूरच्या ठिकाणी,
उदा. फेनीके, कुप्र व अंत्युखियापर्यंत गेले.
विश्वासणाऱ्यांनी या ठिकाणी फक्त यहूदी लोकांनाच सुवार्ता
सांगितली. 20यातील काही विश्वासणारे कुप्र व कुरेने
येथे राहणारे होते. जेव्हा हे लोक अंत्युखियात आले,
तेव्हा ते ग्रीक लोकांशीही बोलले. त्यांनी या ग्रीक लोकांना
येशूविषयीची सुवार्ता सांगितली. 21प्रभु विश्वासणाऱ्यांना
मदत करीत होता आणि बऱ्याच मोठ्या गटाने विश्वास
ठेवला व ते प्रभूला अनुसरू लागले.
22याविषयीची बातमी यरुशलेम येथील विवासणाऱ्या
मंडळीच्या कानावर आली. म्हणून यरूशलेम येथील
विश्वासणाऱ्यांनी बर्णबाला अंत्युखियाला पाठविले.
23–24बर्णबा चांगला मनुष्य होता. तो पवित्र आत्म्याने
आणि विश्वासाने पूर्णपणे भरलेला होता. जेव्हा बर्णबा
अंत्युखियाला गेला, तेव्हा त्याने पाहिले की, देवाने या
लोकांना खूपच आशीर्वाद दिला आहे. त्यामुळे बर्णबाला
खूप आनंद झाला. अंत्युखियातील सर्व विश्वासणाऱ्यांना
त्याने उत्तेजन दिले. त्याने त्यांना सांगितले, "कधीही तुमचा
विश्वास गमावू नका. नेहमी प्रभूची आज्ञा अंत:करणापासून
पाळा." पुष्कळ लोक खिस्ताचे अनुयायी झाले.
25जेव्हा बर्णबा तार्सस शहरी गेला तेव्हा तो शौलाचा
शोध घेत होता. 26जेव्हा बर्णबाने त्याला शोधले तेव्हा
त्याने शौलाला आपल्यासह अंत्युखियाला आणले. शौलाने
व बर्णबाने वर्षभर तेथे राहून पुष्कळ लोकांना शिकवले.
अंत्युखियामध्ये येशूच्या अनुयायांना 'ख्रिस्ती' हे नाव

पहिल्यांदा मिळाले. 27याच काळात काही संदेष्टे यरुशलेमहून अंत्युखियास आले. 28यांच्यापैकी एकाचे नाव अगाब होते. अंत्युखियात तो उभा राहिला आणि बोलू लागला. पवित्र आत्म्याच्या साहाय्याने तो म्हणाला, "फार वाईट काळ सर्व पृथ्वीवर येत आहे. लोकांना खायला अन्न मिळणार नाही." (क्लौदिया राजा राज्य करीत होता तेव्हा त्याच्या काळात हे घडले.) 29विश्वासणाऱ्यांनी ठरविले की, यहूदीया येथील आपल्या बंधु व भगिनींना जास्तीत जास्त मदत पाठविण्याचा प्रयत्न करावा प्रत्येक विश्वासणाऱ्याने जास्तीत जास्त मदत पाठवण्याचे ठरविले. 30त्यांनी पैसे गोळा करून बर्णबा व शौल यांच्याकडे दिले. मग बर्णबा व शौल यांनी ते पैसे यहूदीयातील वडीलजनांकडे आणले.

## हेरोद अग्रिप्पा ख्रिस्ती मंडळीला दुखावतो

12 त्याच काळात हेरोद राजा मंडळीतील काही विशिष्ट विश्वासणऱ्यांचा छळ करू लागला. 2हेरोदाने याकोबाला तलवारीने मारण्याची आज्ञा केली. याकोब हा योहानाचा भाऊ होता. 3हेरोदाने पाहिले की, यहूदी लोकांना हे आवडले आहे. म्हणून त्याने पेत्रालासुद्धा अटक करण्याचे ठरविले. (हे वल्हांडण सणाच्या काळात घडले.) 4हेरोदाने पेत्राला अटक करून तुरुंगात टाकले. सोळा शिपाई पेत्राभोवती पहारा देत होते. हेरोदाला वल्हांडण होईपर्यंत थांबायचे होते. मग त्याने पेत्राला लोकांसमोर आणण्याची योजना केली. 5म्हणून पेत्राला तुंगात ठेवण्यात आले. पण मंडळी सातत्याने पेत्रासाठी देवाकडे प्रार्थना करीत होती.

## पेत्र तुरूंग सोडतो

6पेत्र दोन शिपायांच्यामध्ये झोपला होता. त्याला साखळ्यांनी बांधले होते. तुरुंगाच्या दाराजवळ आणखी काही शिपाई पहारा देत होते. ती रात्रीची वेळ होती व हेरोदाने असा विचार केला की, दुसऱ्या दिवशी पेत्राला लोकांसमोर आणावे. 7अचानक देवाचा दूत तेथे उभा राहिला. तुरुंगाच्या खोलीत एकदम प्रकाश पडला. देवदूताने पेत्राच्या कुशीला स्पर्श करून त्याला उठविले. देवदूत म्हणाला, "लवकर ऊठ!" तेव्हा पेत्राच्या हातातील साखळ्या गळून पडल्या. 8देवदूत पेत्राला म्हणाला, "कपडे घाल व तुझ्या वहाणा घाल." मग पेत्राने कपडे घातले. मग देवदूत म्हणाला, "तुझा झगा अंगात घाल व माझ्यामागे ये!" 9मग देवदूत बाहेर पडला व पेत्र त्याच्या मागे चालला. पेत्राला कळत नव्हते की, देवदूत हे खरोखर काय करीत आहे. त्याला वाटले आपण दृष्टान्त पाहत आहोत. 10पहिल्या व दुसऱ्या फेऱ्यातील पहारेकऱ्यांना ओलांडून पेत्र व देवदूत लोखंडी फाटकाजवळ येऊन पोहोंचले. शहर आणि त्यांच्यामध्ये आता फक्त फाटकच होते. ते फाटक त्यांच्यासाठी आपोआप उघडले. पेत्र व देवदूत फाटकामधून बाहेर पडले. त्यांनी एक रस्ता पार केला आणि अचानक देवदूत पेत्राला सोडून निघून गेला. 11पेत्राला मग कळले की नेमके काय घडले. आणि तो म्हणाला, "आता मला समजले की प्रभूने त्याचा दूत माझ्याकडे पाठविला. व त्याने मला हेरोदापासून सोडविले. यहूदी लोकांना वाटले की, माझा छळ होईल. पण प्रभूने मला या सर्वांतून सोडविले आहे."

12या गोष्टीची जाणीव झाल्यावर पेत्र मरीयेच्या घरी गेला. ती योहानाची आई होती. (योहानाला मार्क असेही म्हणत) पुष्कळ लोक त्या ठिकाणी जमले होते. ते सर्व प्रार्थना करीत होते. 13पेत्राने बाहेरील बाजूने दार ठोठावले. तेव्हा रुदा नावाची दासी दार उघडण्यासाठी आली. 14तिने पेत्राचा आवाज लगेच ओळखला आणि ती खूप आनंदित झाली. ती दार उघडण्याचेसुद्धा विसरून गेली. ती आतमध्ये पळाली आणि लोकांना तिने सांगितले, "पेत्र दाराजवळ उभा आहे!" 15विश्वासणारे रुदाला म्हणाले, "तू बावचळलीस!" परंतु पेत्र दाराजवळ उभा आहे, असे रुदा परत परत अगदी कळकळीने सांगू लागली. म्हणून लोक म्हणाले, "तो पेत्राचा दूत असला पाहिजे!"

16पण पेत्र बाहेरून दार सारखे ठोठावत होता. जेव्हा विश्वासणाऱ्यांनी दार उघडले, तेव्हा त्यांनी पेत्राला पाहिले. ते चकित झाले होते. 17पेत्राने हाताने खुणावून शांत राहायला सांगितले. मग त्याने प्रभूने तुरुंगातून कसे आणले हे सविस्तर सांगितले. तो म्हणाला, "याकोब व इतर बांधवांना काय घडले ते सांगा." मग पेत्र तेथून निघून दुसऱ्या ठिकाणी गेला. 18दुसऱ्या दिवशी शिपाई फार हताश झाले होते. पेत्राचे काय झाले असावे याचा ते विचार करीत होते. 19हेरोदाने पेत्राला सगळीकडे शोधले पण तो त्याला शोधू शकला नाही. मग हेरोदाने पहारेकऱ्यांना प्रश्न विचारले व त्यांना मरणाची शिक्षा ठोठावली.

## हेरोद अग्रिप्पाचे मरण

नंतर हेरोद यहूदातून निघून गेला. तो कैसरीया शहरात गेला व तेथे काही काळ राहिला. 20हेरोद सोर व सिदोन नगरातील लोकांवर फार रागावला होता. ते लोक मिळून हेरोदाला भेटायला आले. ब्लस्तसला आपल्या बाजूला वळविण्यात ते यशस्वी झाले. ब्लस्तस हा राजाचा खाजगी सेवक होता. लोकांनी हेरोदाकडे शांततेची मागणी केली कारण त्यांचा देश अन्नधान्याच्या बाबतीत हेरोदाच्या देशावर अवलंबून होता.

21हेरोदाने त्यांना भेटण्यासाठी एक दिवस ठरविला. त्या दिवशी हेरोदाने आपला सुंदर दरबारी पोशाख घातला होता. तो सिंहासनावर बसून लोकांसमोर भाषण करू लागला. 22लोक मोठ्याने ओरडून म्हणाले, "ही तर देवाची वाणी आहे, मनुष्याची नव्हे!" हेरोदाने या स्तुतीचा स्वीकार केला. 23आणि त्याने देवाला गौरव दिला नाही, म्हणून देवाच्या दूताने लगेच त्याला आजारी पाडले. किड्यांनी त्याला आतून खाल्ले आणि तो मेला.

24देवाचा संदेश जास्तीत जास्त लोकांपर्यंत पसरत होता. व लोकांना प्ररित करीत होता. विश्वासणाऱ्यांचा गट दिवसेंदिवस मोठा होत होता.

25बर्णबा व शौलाने त्यांचे यरुशलेम येथील काम संपविल्यानंतर ते अंत्युखियाला परत आले. त्यांनी मार्क योहान याला त्यांच्याबरोबर घेतले.

## बर्णबा व शौल यांची खास कामासाठी निवड होते

13 अंत्युखिया येथील ख्रिस्ती मंडळीत काही संदेष्टेये व शिक्षक होते. ते पुढीलप्रमाणे: बर्णबा, निग्र शिमोन, लूक्य कुरेनेकर, मनाएन (जो हेरोदाबरोबर लहानाचा मोठा झाला), आणि शौल. 2ही सर्व माणसे देवाची सेवा करीत असत व उपास करीत असत. पवित्र आत्मा त्यांना म्हणाला, "बर्णबा व शौलाला माझ्याकडे द्या. एक खास काम त्यांच्याकडून मला करवून घ्यायचे आहे. हे काम करण्यासाठी मी त्यांना निवडले आहे"

3म्हणून मंडळीने उपास व प्रार्थना केल्या. त्यांनी बर्णबा व शौल यांच्या डोक्यांवर हात ठेवून प्रार्थना केली. मग त्यांना पाठवून दिले.

## कुप्र येथे बर्णबा व शौल

4पवित्र आत्म्याच्या द्वारे बर्णबा व शौल यांना पाठविण्यात आले. ते सलुकीया शहराला गेले. नंतर ते समुद्रमार्गे कुप्र बेटावर गेले. 5जेव्हा बर्णबा व शौल सलमीन शहरात आले, तेव्हा त्यांनी देवाचा संदेश यहूदी लोकांच्या सभास्थानात दिला. मार्क म्हटलेला योहान त्यांच्या मदतीला होता. 6ते संपूर्ण बेट पार करून पफे शहरास गेले. पफे येथे त्यांना एक यहूदी मनुष्य भेटला. तो जादूच्या करामती करीत असे. त्याचे नाव बर्येशू होते. तो खोटा संदेष्टा होता. 7बर्येशू नेहमी सिर्ग्य पौल याच्या निकट राहण्याचा प्रयत्न करायचा. सिर्ग्य पौल राज्यपाल होता. व तो हुशार होता. त्याने बर्णबा व शौल यांना आपणाकडे बोलाविले. त्याला त्यांचा संदेश ऐकावयाचा होता. 8परंतु अलीम जादूगार हा बर्णबा व शौल यांच्या विरुद्ध होता. (ग्रीक भाषेत बर्येशूसाठी अलीम शब्द वापरतात. त्याचा अर्थ तोच आहे.) राज्यपालाने येशूवर विश्वास ठेवू नये म्हणून अलीमने त्याचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. 9पण शौल आत्म्याने भरला होता. (शौलाचे दुसरे नाव पौल) पौलाने अलीमकडे (बर्येशूकडे) पाहिले व म्हणाला, 10"सैतानाच्या पुत्रा! जे काही योग्य असेल त्या सर्वांचा तू शत्रू आहेस. तू दुष्टाईने व खोटेपणाने भरलेला आहेस. तू देवाचे सत्य नेहमी खोटेपणात बदलण्याचा प्रयत्न करतोस! 11आता तुला देवाने स्पर्श करताच तू आंधळा होशील. भर दिवसाच्या उन्हातही तुला काही काळ दिसणार नाही."

मग अलीमसाठी सर्व काही अंधकारमय झाले. चाचपडत तो इकडेतिकडे फिरू लागला. कोणीतरी मदतीला घेऊन त्याचा हात धरून जाण्यासाठी प्रयत्न करू लागला. 12जेव्हा राज्यपालाने ते पाहिले (सिर्ग्य पौल) त्याने विश्वास ठेवला. प्रभूच्या शिक्षणाने तो चकित झाला.

## पौल व बर्णबा कुप्र सोडतात

13पौल व जे लोक त्याच्याबरोबर होते ते पफेकडून समुद्रमार्गे निघाले. ते पंफुल्यातील पिर्गा गावी आले. परंतु योहान (मार्क) त्यांना सोडून परत यरुशलेमला गेला. 14त्यांनी त्यांचा प्रवास पुढे चालू ठेवला. पिर्गापासून पुढे ते अंत्युखियास गेले. (जे पिसीदीयाजवळ होते.) अंत्युखियात असताना शब्बाथ दिवशी ते यहूदी सभास्थानात गेले आणि तेथे बसले.

15पवित्र शास्त्रातील नियमशास्त्र आणि संदेष्ट्यांच्या लिखाणाचे वाचन झाले. मग सभास्थानाच्या अधिकाऱ्यांनी पौल व बर्णबाला निरोप पाठविला: "बंधूनो, येथील लोकांना काही मदत होईल असे काही तरी तुम्हांला सांगायचे असेल तर कृपा करून बोला!"

16पौल उभा राहिला. आणि आपला हात उंचावून (लोकांचे लक्ष वेधून घेऊन) म्हणाला, "माझ्या यहूदी बांधवानो व इतर लोकहो, जे तुम्ही खऱ्या देवाची उपासना करता, ते कृपा करून माझे ऐका! 17इस्राएलाच्या देवाने आपल्या वाडवडिलांची निवड केली. ते ज्या काळात इजिप्तमध्ये परकी म्हणून राहत होते, त्याकाळात देवाने त्यांना यशस्वी होण्यास मदत केली. मोठ्या सामर्थ्याने देवाने त्यांना त्या देशातून बाहेर आणले. 18आणि देवाने अरण्यातील चाळीस वर्षांत त्यांना सहनशीलता दाखविली. 19देवाने कनानच्या प्रदेशातील सात राष्ट्रांना नाश केला. देवाने त्यांच्या जमिनी त्याच्या लोकांना दिल्या. 20हे सर्व साधारणपणे चारशेपन्नास वर्षांत घडले.

"त्यानंतर देवाने आपल्या लोकांना शास्ते (नेते) दिले. ते शमुवेल संदेष्ट्याच्या काळापर्यंत. 21मग लोकांनी राजाची मागणी केली. देवाने त्यांना किशाचा पुत्र शौल याला दिले. शौल हा बन्यामिनाच्या वंशातील होता. तो चाळीस वर्षेपर्यंत राजा होता. 22नंतर देवाने शौलाला काढून टाकले. देवाने दावीदाला त्यांचा राजा केले. दावीदाविषयी देव असे बोलला: दावीद, इशायाचा पुत्र, हा मला आवडला. मला ज्या गोष्टी पाहिजेत त्या सर्व तो करील. 23याच दाविदाच्या वंशजातून देवाने इस्राएल लोकांचा तारणारा आणिला. तो वंशज येशू आहे. देवाने हे करण्याचे अभिवचन दिले होते. 24येशू येण्यापूर्वी सर्व यहूदी लोकांना योहानाने उपदेश केला. त्यांच्या अंत:करणात बदल व्हावा म्हणून योहानाने लोकांना सांगितले की, त्यांनी बाप्तिस्मा घेतला पाहिजे. 25जेव्हा योहान आपले काम संपवत होता, तेव्हा तो म्हणाला, 'मी कोण आहे असे तुम्हांला वाटते? मी ख्रिस्त नाही. तो नंतर येत आहे. त्याच्या वहाणांचे बंद सोडण्याची सुद्धा माझी लायकी नाही.'

26"माझ्या बंधूनो, अब्राहामाच्या कुटुंबातील पुत्रांनो, आणि तुम्ही यहूदी नसलेले पण खऱ्या देवाची उपासना

करणारे, ऐका! या तारणाची बातमी आम्हांला सांगितली
गेली. 27जे यरूशलेममध्ये राहतात ते यहूदी व यहूदी पुढारी
यांना जाणीव झाली नाही की, येशू हा तारणारा होता.
येशूविषयी जे शब्द भविष्यवाद्यांनी लिहिले ते यहूदी
लोकांसाठी प्रत्येक शब्बाथाच्या वारी वाचले गेले. परंतु
त्यांना ते समजले नाही. यहूदी लोकांनी येशूचा धिक्कार
केला. जेव्हा त्यांनी असे केले, तेव्हा त्यांनी भविष्यावाद्यांचे
म्हणणे खरे ठरविले! 28येशूने का मरावे याचे खरे कारण
ते शोधू शकले नाहीत. पण त्यांनी पिलाताला सांगितले
की त्याला जिवे मारावे. 29शास्त्रामध्ये येशूच्याबद्दल या
गोष्टी लिहिल्या होत्या की, जे वाईट ते त्याच्याबाबतीत
घडणारे होते, ते सर्व या यहूदी लोकांनी येशूला केले. मग
त्यांनी येशूला वधस्तंभावरून खाली घेतले. व त्याला
कबरेत ठेवले. 30पण देवाने त्याला मरणातून उठविले
31यानंतर, पुष्कळ दिवसांपर्यंत जे त्याच्याबरोबर होते, त्यांना
गालीला पासून यरुशलेमपर्यंत येशूने दर्शन दिले. ते लोक
आता त्याचे साक्षीदार म्हणून लोकांसमोर आहेत. 32आम्ही
तुम्हांला देवाने जे अभिवचन आमच्या वाडवडिलांना
(पूर्वजांना) दिले त्याविषयी सुवार्ता सांगतो. 33आम्ही त्यांची
लेकरे (वंशज) आहोत आणि देवाने हे अभिवचन आमच्या
बाबतीत खरे करून दाखविले. देवाने हे येशूला मरणातून
पुन्हा उठविण्याद्वारे केले. आम्ही याविषयी
स्तोत्रसंहितातेमध्येसुद्धा वाचतो:

'तू माझा पुत्र आहेस. आज मी तुझा पिता झालो आहे.'
*स्तोत्र. 2:7*

34देवाने येशूला मरणातून उठविले. येशू पुन्हा कबरेत
जाऊन माती बनणार नाही. म्हणून देव म्हणाला:

'दाविदाला देण्यात आलेली पवित्र व सत्यअभिवचने मी
तुला देईन' *यशया 55:3*

35 पण दुसऱ्या ठिकाणी देव म्हणतो:

'तू तुझ्या पवित्र पुरुषाला कबरेत कुजण्याचा अनुभव
घडू देणार नाहीस.' *स्तोत्र. 16:10*

36ज्या काळात दावीद राहत होता तेव्हा त्याने देवाच्या
इच्छेप्रमाणे केले. मग तो मेला. आपल्या वाडवडिलांशेजारी
त्याला पुरले. आणि कबरेत त्याचे शरीर कुजले 37पण
ज्याला देवाने मरणातून पुन्हा उठविले, त्याला कुजण्याचा
अनुभव आला नाही. 38–39बंधूनो, आम्ही जे सांगत आहोत
ते तुम्ही समजून घेतले पाहिजे: या एकाकडूनच तुमच्या
पापांची क्षमा तुम्हांला मिळू शकते. मोशेचे नियमशास्त्र
तुम्हांला तुमच्या पापांपासून मुक्त करणार नाही. पण प्रत्येक
व्यक्ति जी त्याच्यावर विश्वास ठेवते, ती त्याच्याद्वारे त्या
सर्वांविषयी न्यायी ठरविली जाते. 40संदेष्टेयांनी सांगितलेल्या
काही गोष्टी घडतील. सावध राहा! या गोष्टी तुमच्याबाबत
होऊ नयत म्हणून जपा. भविष्यवादी म्हणाला:

41'ऐका, जे तुम्ही संशय धरता! तुम्ही चकित होता पण
मग दूर जाता व मरता; कारण तुमच्या काळामध्ये मी
(देव) काही तरी करीन ज्याच्यावर तुमचा विश्वास बसणार
नाही कोणी ते स्पष्ट करून सांगितले तरी तुम्ही त्याच्यावर
विश्वास ठेवणार नाही.'" *हबक्कूक 1:5*

42जेव्हा पौल व बर्णबा (सभास्थानातून) जाऊ लागले,
तेव्हा लोक म्हणाले की, पुढील शब्बाथाच्या दिवशी परत
या आणि आम्हांला याविषयी अधिक सांगा.
43सभास्थानातील बैठक संपल्यावर अनेक यहूदी लोक
आणि यहूदी मतानुसारी चालणारे इतर धार्मिक लोक
पौल व बर्णबा यांच्यामागे गेले. पौल व बर्णबा यांनी त्या
लोकांना देवाच्या कृपेत टिकून राहण्यास कळकळीची
विनंति केली.

44पुढील शब्बाथवारी शहरातील जवळ जवळ सर्व लोक
देवाचे वचन ऐकण्यासाठी एकत्र आले. 45यहूदी लोकांनी
त्या सर्वांना तेथे पाहिले. त्यामुळे यहूदी लोकांना मत्सर
वाटू लागला. तेही काही फार वाईट गोष्टी बोलले आणि
जे पौल बोलला त्याविरुद्ध वाद उपस्थित केला. 46पण
पौल व बर्णबा फार धैर्याने बोलले. ते म्हणाले, "देवाचा
संदेश तुम्हा यहूद्यांना प्रथम आम्हांला सांगितलाच पाहिजे.
पण तुम्ही ऐकण्यास नकार देत आहात. तुम्ही तुमचे
स्वत:चेच नुकसान करून घेत आहात. व अनंतकाळचे
जीवन प्राप्त करून घेण्यासाठी अपात्र ठरत आहात! म्हणून
आम्ही आता दुसऱ्या देशांतील यहूदीतर लोकांकडे जाऊ!
47प्रभूने आम्हांला हे करण्यास सांगितले आहे. प्रभु
म्हणाला:

'दुसऱ्या देशांसाठी मी तुम्हाला प्रकाश असे केले यासाठी
की, तुम्ही पृथ्वीवरील सर्व लोकांना तारणाचा मार्ग दाखवू
शकाल.'" *यशया 49:6*

48जेव्हा यहूदी नसलेल्यांनी पौलाला असे बोलताना ऐकले
तेव्हा ते फार आनंदित झाले. देवाच्या संदेशाचा त्यांनी
बहुमान केला. आणि त्या लोकांपैकी पुष्कळांनी संदेशावर
विश्वास ठेवला. कारण ते अनंतकाळच्या जीवनासाठी
निवडले गेले होते.

49आणि म्हणून देवाचा संदेश संपूर्ण देशात सांगितला
गेला. 50तेव्हा यहूदी लोकांनी शहरातील काही धार्मिक
स्त्रिया व पुढारी यांना भडकावून दिले. त्या लोकांनी पौल
व बर्णबा यांच्याविरुद्ध अनेक वाईट गोष्टी केल्या आणि
त्यांना शहराबाहेर घालवून दिले. 51मग पौल व बर्णबा
यांनी आपल्या पायाची धूळ झटकली. व ते इकुन्या शहराला

गेले. 52पण अंत्युखियातील येशूचे अनुयायी आनंदाने व पवित्र आत्म्याने भरून गेले होते.

## इकुन्या येथे पौल व बर्णबा

14 पौल व बर्णबा इकुन्या शहरात गेले. ते तेथील यहूदी सभास्थानात गेले. (प्रत्येक शहरात गेल्यावर ते असेच करीत) तेथील लोकांशी ते बोलले. पौल व बर्णबा इतके चांगले बोलले की, पुष्कळ यहूदी लोकांनी व ग्रीक लोकांनी त्यांनी जे सांगितले त्यावर विश्वास ठेवला. 2परंतु काही यहूदी लोकांनी विश्वास ठेवला नाही. त्यांनी यहूदीतर लोकांची मने भडकाविली आणि बंधुजनांविषयीची मने वाईट केली. 3म्हणून पौल व बर्णबाने त्या ठिकाणी बरेच दिवस मुक्काम केला. आणि धैर्याने येशूविषयी सांगत राहिले. पौल व बर्णबाने देवाच्या कृपेविषयी संदेश दिला. देवाने त्यांना पौल व बर्णबाला चमत्कार व अद्भुत कृत्ये करण्यास मदत करून ते जे काही सांगत होते ते खरे ठरविले. 4परंतु शहरातील काही लोकांना यहूदी लोकांची मते पटली. दुसऱ्या लोकांना पौल व बर्णबाचे म्हणणे पटले. (त्यांनी विश्वास ठेवला) त्यामुळे शहरात दोन तट पडले.

5काही यहूदीतर लोक, काही यहूदी लोक व त्यांचे पुढारी यांनी पौल व बर्णबाला बांधले व इजा करण्याचा प्रयत्न केला. त्यांना पौल व बर्णबा यांना दगडमार करून मारावयाचे होते. 6जेव्हा पौल व बर्णबा यांना त्याविषयी कळले तेव्हा त्यांनी ते शहर सोडले. ते लुस्त्र व दर्बे या लुकवनियाच्या नगरात गेले. आणि त्या शहरांच्या सभोवतालच्या परिसरात गेले. 7त्या ठिकाणीसुद्धा त्यांनी सुवार्ता सांगितली.

## लुस्त्र व दर्बे येथे पौल

8लुस्त्र येथे एक मनुष्य होता त्याचे पाय अधू होते तो जन्मत:च पांगळा जन्मला होता. व कधीच चालला नव्हता. 9पौल भाषण करीत असताना हा मनुष्य ऐकत होता. पौलाने त्याच्याकडे पाहिले, पौलाने पाहिले की, देव त्याला बरे करील असा त्या मनुष्याचा विश्वास झाला आहे. 10तेव्हा पौल मोठ्याने म्हणाला, "तुझ्या पायावर उभा राहा!" तेव्हा त्या मनुष्याने उंच उडी मारली आणि चालू लागला. 11पौलाने केलेले लोकांनी जेव्हा पाहिले, तेव्हा ते आपल्या लुकवनिया भाषेत ओरडले. ते म्हणाले, "देव माणसांसारखे झाले आहेत! ते आमच्याकडे खाली आले आहेत!" 12लोकांनी बर्णबाला ज्युपिटर* म्हटले व पौलाला मर्क्युरी* म्हटले. कारण पौल मुख्य बोलणारा होता. 13ज्युपिटरचे मंदिर जवळ होते. या मंदिराचा पुजारी काही बैल व फुले घेऊन वेशीजवळ आला. पुजारी व लोकांना पौल व बर्णबा यांची उपासना करण्यासाठी त्यांच्यापुढे बळी द्यावयाचा होता.

14परंतु ते काय करीत आहेत, हे जेव्हा पौल व बर्णबा यांना समजले तेव्हा त्यांनी आपले कपडे फाडले व लोकांच्या गर्दीत शिरले आणि मोठ्याने म्हणाले, 15"लोकांनो, ह्या गोष्टी तुम्ही का करीत आहात? आम्ही देव नाही! तुम्हांला जशा भावना आहेत, तशाच आम्हालाही आहेत! आम्ही तुम्हांला सुवार्ता सांगायला आलो. आम्ही तुम्हांला हे सांगत आहोत की या व्यर्थ गोष्टींपासून तुम्ही तुमचे मन वळवावे. खऱ्या जिवंत देवाकडे आपले मन लावावे. त्यानेच आकाश, पृथ्वी, समुद्र व जे काही आहे ते निर्माण केले. 16भूतकाळात, देवाने सर्व राष्ट्रांना त्यांना जसे पाहिजे तसे वागू दिले. 17परंतु देवाने अशा गोष्टी केल्या की त्या द्वारे तो खरा आहे हे सिद्ध व्हावे. तो तुमच्यासाठी चांगल्या गोष्टी करतो. तो तुम्हांला आकाशातून पाऊस देतो. योग्य वेळी तो तुम्हांला चांगले पीक देतो. तो तुम्हांला भरपूर अन्न देतो व तो तुमची अंत:करणे आनंदाने भरतो" 18पौल व बर्णबाने ह्या गोष्टी लोकांना सांगितल्या. व मोठ्या प्रयासाने आपणास यज्ञ अर्पिण्यापासून त्याना परावृत केले.

19नंतर अंत्युखिया व इकुन्या येथील काही यहूदी लोक तेथे आले. त्यांनी लोकसमुदायाची मने आपल्या बाजूस वळविली. आणि पौलाला दगडमार केला. त्यात पौल मेला असे समजून त्यांनी त्याला ओढत नेऊन नगराबाहेर टाकले. 20येशूचे शिष्य पौलाभोवती जमा झाले मग पौल उठून परत शहरात गेला व दुसऱ्या दिवशी ते दोघे दर्बेला गेले.

## सिरीयातील अंत्युखियाला परत येणे

21आणि त्या नगरात त्यांनी सुवार्ता सांगून अनेक लोकांना शिष्य केले. त्यानंतर ते लुस्त्र, इकुन्या आणि अंत्युखिया नगरांना परत आले. 22आणि त्यांनी तेथील शिष्यांना येशूवरील विश्वासात बळकट केले. त्यांनी आपल्या विश्वासात अढळ राहावे म्हणून उत्तेजन दिले. ते म्हणाले, "अनेक दु:खांना तोंड देत आपण देवाच्या राज्यात प्रवेश केला पाहिजे." 23पौल व बर्णबाने प्रत्येक मंडळीत वडीलजनांची नेमणूक केली. त्यांनी या वडिलांसाठी उपास आणि प्रार्थना केल्या. प्रभु येशूवर विश्वास असलेले असे सर्व वडीलजन होते म्हणून पौलाने व बर्णबाने त्यांना प्रभूच्या हाती सोपविले.

24पौल आणि बर्णबा पिसीदिया प्रदेशातून गेले नंतर ते पंफुलिया येथे आले. 25त्यांनी पिर्गा शहरात देवाचा संदेश दिला नंतर ते अत्तालिया शहरात गेले. 26नंतर तेथून पुढे पौल व बर्णबा सिरीया येथील अंत्युखियात समुद्रमार्गे गेले. जे काम त्यांनी पूर्ण केले होते त्याची सुरुवात त्यांनी अंत्युखियापासूनच केली होती.

27जेव्हा ते तेथे पोहोंचले, तेव्हा त्यांनी मंडळीला एकत्र बोलाविले आणि देवाने त्यांच्याबाबतीत ज्या ज्या गोष्टी

---

**ज्युपिटर** अनेक ग्रीक देवांमधील अत्यंत महत्त्वाचा देव.

**मर्क्युरी** ग्रीकांचा आणखी एक देव. तो इतर देवांचा निरोप्या आहे असे ते मानीत.

केल्या त्या त्यांना सांगितल्या तसेच दुसऱ्या देशातील
यहूदीतर लोकांमध्ये देवाने कसे दार उघडले ते सांगितले.
28नंतर ते शिष्यांबरोबर तेथे बरेच दिवस राहिले.

### यरुशलेम येथील सभा

15 मग काही माणसे यहूदीया प्रांतातून अंत्युखियास
आली. ती बंधुजनांना (यहूदीतर) शिक्षण देऊ
लागली: "तुमची सुंता झालेली नसेल तर तुमचे तारण
होणार नाही. मोशेने आम्हांला हे करायला शिकविले."
2पौल व बर्णबा या शिक्षणाविरुद्ध होते. या विषयावर त्या
लोकांशी पौलाने व बर्णबाने वाद घातला, म्हणून लोकांनी
असे ठरविले की, पौल, बर्णबा व इतर काही जणांना
यरुशलेमला पाठवायचे. हे लोक त्या ठिकाणी प्रेषित व
वडीलजनांशी या विषयावर अधिक बोलण्यासाठी गेले.
3मंडळीने त्यांना प्रवासास जाण्यासाठी मदत केली. हे लोक
फेनीके व शोमरोन प्रांतातून जात असता यहूदीतर विदेशी
लोक देवाकडे कसे वळले. याविषयी सविस्तर हकीगत
त्यांनी तेथील बंधुवर्गाला सांगितली. त्यामुळे ते फार आनंदित
झाले. 4ते जेव्हा यरुशलेमला पोहोंचले तेव्हा तेथील ख्रिस्ती
मंडळी, प्रेषित आणि वडीलजन यांनी त्यांचे स्वागत केले.
त्यावेळी पौल व बर्णबा यांनी आपल्या हातून देवाने जे
काम करून घेतले त्याविषयी सविस्तर सांगितले.
5परूशी गटातील काही विश्वासणारे उभे राहिले आणि
म्हणाले, "यहूदीतर विश्वासणाऱ्यांची सुंता झालीच पाहिजे.
तसेच आपण त्यांना मोशेचे नियम पाळण्याविषयी शिकविले
पाहिजे!"
6मग प्रेषित आणि वडीलजन या समस्येचा अभ्यास
करण्यासाठी एकत्र जमले. 7त्यावर प्रदीर्घ चर्चा झाली.
मग पेत्र उभा राहिला. आणि त्यांना म्हणाला, "माझ्या
बंधूंनो मला माहीत आहे, सुरुवातीला जे काही घडले, ते
तुमच्या आठवणीत आहे. जे यहूदी नाहीत, त्या लोकांना
सुवार्ता सांगण्यासाठी तुमच्यामधून देवाने माझी निवड केली.
यासाठी की, त्यांनीही विश्वास धरावा. 8देव सर्वांचे विचार
जाणतो. आणि त्याने या यहूदीतर लोकांचा स्वीकार केला
आहे. देवाने जसा आम्हांला पवित्र आत्मा दिला, तसाच
त्यांनाही देऊन त्याने हे आम्हांस दाखवून दिले. 9देवाच्या
दृष्टीने ते लोक आपल्यापेक्षा वेगळे नाहीत. जेव्हा त्यांनी
विश्वास ठेवला, तेव्हा त्याने त्यांची हृदये शुद्ध केली.
10मग आता यहूदीतर लोकांच्या मानेवर जड जू तुम्ही का
ठेवीत आहात? तुम्ही देवाला राग आणीत आहात काय?
आपण व आपले वाडवडील (पूर्वज) हे ओझे वाहण्याइतके
सशक्त नव्हतो. 11आम्ही असा विश्वास धरतो की, आम्ही
आणि हे लोक प्रभु येशूच्या कृपेमुळे तारले जाणार आहोत."
12मग सगळे लोक शांत झाले. ते पौल व बर्णबाचे
बोलणे ऐकू लागले. पौलाने व बर्णबाने लोकांना सांगितले
की, देवाने त्यांच्याद्वारे यहूदीतर लोकांमध्ये चमत्कार व
अद्भुत कृत्ये केली. 13पौलाने व बर्णबाने आपले बोलणे
संपविले. मग याकोब बोलला. तो म्हणाला, "माझ्या बंधूनो,
माझे ऐका. 14शिमोन (पेत्र) याने यहूदीतर लोकांना देवाने
आपले प्रेम कसे दाखविले ते सांगितले. पहिल्यांदाच देवाने
यहूदीतर लोकांना स्वीकारले. आणि त्यांना आपले लोक
बनविले. 15संदेष्टेयांच्या शब्दांनी सुद्धा याला सहमती
दर्शविली:

16'मी (देव) यानंतर परत येईन मी दाविदाचे घर पुन्हा
बांधीन ते पडलेले आहे त्याच्या घराचे पडलेले भाग मी
पुन्हा बांधीन मी त्याचे घर नवे करीन
17मग इतर सर्व लोक देवाचा शोध करतील सर्व
यहूदीतर लोकसुद्धा माझे लोक आहेत असे मी मानतो.
प्रभु (देव) असे म्हणाला, व हे करणारा तोच आहे.
18या सर्व गोष्टी सुरुवातीपासूनच माहीत आहेत'

*अमोस 9:11-12*

19"म्हणून मला वाटते जे यहूदीतर बंधु देवाकडे वळले
आहेत, त्याना आपण तसदी देऊ नये.

20त्याऐवजी आपण त्यांना एक पत्र लिहू या. आपण
त्यांना या गोष्टी सांगू:

मूर्तिपुढे ठेवलेले अन्न खाऊ नका. (त्यामुळे अन्न अशुद्ध
होते) कोणत्याही प्रकारचे अनैतिक पाप करू नका. रक्त
चाखू नका गुदमरून मारलेले प्राणी खाऊ नका.

21त्यांनी या गोष्टी करू नयेत. कारण अजूनसुद्धा प्रत्येक
शहरात यहूदी लोक आहेत जे मोशेचे नियम शिकवितात.
बऱ्याच वर्षांपासून दर शब्बाथ दिवशी सभास्थानातून
मोशेचे नियम वाचण्यात येतात."

### यहूदीतर विश्वासणाऱ्यांना पत्र

22प्रेषितांना, वडीलजनांना व सगळ्या मंडळीला वाटत
होते की, पौल व बर्णबा यांच्याबरोबर आणखी काही
माणसे अंत्युखियाला पाठवावीत. मंडळीने त्यांचे स्वतःचे
काही लोक निवडलले. 23त्यांनी यहूदा (बर्सब्बा) आणि
सीला यांना निवडले. यरुशलेमधील बंधुवर्गामध्ये या
माणसांचा आदर केला जात असे. मंडळीने या लोकांबरोबर
हे पत्र पाठविले. पत्रात असे लिहिले होते की,

प्रेषित, वडीलजन आणि तुमचे बंधुजन यांजकडून
अंत्युखिया शहरातील तसेच सीरीया व किलकिया
देशातील सर्व यहूदी नसलेल्या बांधवांस: प्रिय बंधूनो,
24आम्ही असे ऐकले की, आमच्यातील काही लोक
तुमच्याकडे आले. ज्या गोष्टी त्यांनी सांगितल्या
त्यामुळे तुम्हांला त्रास झाला व तुम्ही हताश झालात.
परंतु आम्ही त्यांना हे करण्यास सांगितले नाही!

25आम्ही सर्वांनी या गोष्टीला सहमती दर्शविली
की, काही लोकांची निवड करून त्यांना तुमच्याकडे
पाठवावे. आमचे प्रिय मित्र पौल व बर्णबा यांच्यासह
ते असतील. 26बर्णबा व पौल यांनी आपल्या प्रभु
येशू ख्रिस्ताच्या सेवेसाठी आपले जीवन दिले आहे.
27म्हणून आम्ही यहूदा व सीला यांना त्यांच्याबरोबर
पाठवत आहोत. ते सुद्धा तुम्हांला त्याच गोष्टी
सांगतील. 28पवित्र आत्म्याला असे वाटते की,
तुमच्यावर आता अधिक ओझे असू नये. आणि
आम्हांला ते मान्य आहे. तुम्ही फक्त पुढील गोष्टी
कराव्यात:

29कोणतेही अन्न जे मूर्तीला वाहिले आहे ते खाऊ नका
रक्त चाखू नका गुदमरून मारलेले प्राणी खाऊ नका.
कोणत्याही प्रकारचे अनैतिक पाप करू नका.

जर तुम्ही या गोष्टींपासून दूर राहाल, तर तुम्ही
चांगले कराल आता आम्ही तुमचा निरोप घेतो
कळावे.'

30मग पौल, बर्णबा, यहूदा व सीला यांनी यरुशलेम
सोडले. ते अंत्युखियास गेले. अंत्युखियात त्यांनी
विश्वासणाऱ्यांना एकत्र केले. आणि त्यांना ते पत्र दिले.
31जेव्हा त्यांनी ते पत्र वाचले. ते आनंदित झाले. पत्राने
त्यांचे समाधान झाले. 32यहूदा व सीला हेसुद्धा संदेष्टे होते.
त्यांनी विश्वासणाऱ्या बंधूंना विश्वासात भक्कम
करण्यासाठी पुष्कळ गोष्टी सांगितल्या. 33यहूदा व सीला
काही काळ तेथे राहिल्यानंतर ते निघून गेले. बंधूंकडून
त्यांना शांतीचा आशीर्वाद मिळाला. ज्या यरुशलेममधील
बंधूनी यहूदा व सीला यांना पाठवले होते, त्यांच्याकडे ते
परत गेले. 34*

35पण पौल व बर्णबा अंत्युखियातच राहिले. त्यांनी व
इतर पुष्कळ लोकांनी सुवार्ता सांगितली आणि प्रभूचा
संदेश लोकांना शिकविला.

## पौल व बर्णबा वेगळे होतात

36काही दिवसांनंतर पौलाने बर्णबाला सांगितले, "आपण
पुष्कळ गावात प्रभूचा संदेश दिला. आपण पुन्हा या गावांमध्ये
तेथील बंधुभगिनींना भेट देण्यासाठी आणि त्यांचे कसे
काय चालले आहे हे पाहण्यासाठी जायला हवे." 37बर्णबाला
त्यांच्यासोबत योहान (मार्क) यालाही घ्यायचे होते. 38पण
ज्याने पंफुलिया येथे त्यांची साथ सोडली व आपले काम
पूर्ण केले नाही, त्याला आपल्यासोबत घेऊ नये असे
पौलाचे म्हणणे होते 39पौल आणि बर्णबा यांच्यात यावरून
मोठा वाद झाला. ते विभक्त झाले व वेगळ्या मार्गांनी
गेले. बर्णबा योहानासह कुप्र येथे समुद्रमार्गे गेला. 40पौलाने
सीलाला आपल्यासोबत नेण्यासाठी निवडले.
अंत्युखियातील बांधवांनी, पौलाला देवाच्या कृपेवर सोपवले
आणि मग त्यांना रवाना केले. 41पौल, सीरीया व किलकीया
भागातील मंडळ्यांना स्थैर्य देत गेला.

## तीमथ्य पौल व सीला यांच्यासह जातो

16 पौल दर्बे व लुस्त्र या शहरांमध्ये गेला. तेथे ख्रिस्ताचा
एक शिष्य ज्याचे नाव तीमथ्य, तो होता. तीमथ्याची
आई एक यहूदी विश्वासणारी स्त्री होती. त्याचा पिता एक
ग्रीक मनुष्य होता. 2तीमथ्याविषयी लुस्त्र व इकुन्या येथील
बंधुजनांचे फार चांगले मत होते. 3तीमथ्याला
आपल्याबरोबर प्रवासाला घेऊन जावे अशी पौलाची इच्छा
होती. पण त्या भागात राहणाऱ्या यहूदी लोकांना माहीत
होते की, तीमथ्याचे वडील ग्रीक (यहूदीतर) आहेत. म्हणून
पौलाने यहूदी लोकांचे समाधान होण्यासाठी तीमथ्याची
सुंता केली. 4मग पौल व त्याच्याबरोबर असलेले लोक
इतर शहरांमधून प्रवास करीत निघाले. यरुशलेममधील
प्रेषितांनी व वडीलजनांनी दिलेले नियम व त्यावरचे निर्णय
ते विश्वासणाऱ्यांना देत गेले. त्यांनी विश्वासणाऱ्यांना त्या
नियमांचे पालन करण्यास सांगितले. 5मग मंडळ्या
विश्वासात भक्कम होत गेल्या व संख्येतदेखील त्या वाढत
गेल्या.

## पौलाला आशियातून बोलावतात

6पौल व त्याच्याबरोबर असलेले बंधू फ्रुगिया व गलतीया
या प्रदेशातून गेले. आशिया देशात पवित्र आत्म्याने त्यांना
सुवार्ता सांगण्यास मना केले. 7पौल व तीमथ्य मिसिया
देशाच्या जवळ गेले. त्यांना बिथनीया प्रांतात जायचे होते.
पण येशूच्या आत्म्याने त्यांना आत जाऊ दिले नाही. 8म्हणून
ते मिसियाजवळून जाऊन त्रोवस येथे गेले. 9त्या रात्री
पौलाने एक दृष्टान्त पाहिला. या दृष्टान्तामध्ये
"मासेदोनियाला या आणि आम्हांला मदत करा!" अशी
विनंति मासेदोनियातील कोणीतरी मनुष्य उभा राहून
पौलाला करीत होता. 10पौलाला हा दृष्टान्त झाल्यावर
आम्ही तेथे जाऊन तेथील लोकांना सुवार्ता सांगावी यासाठी
देवाने आम्हांला बोलाविले. हे आम्ही समजलो. आणि
लगेच मासेदोनियाला जाण्याच्या तयारीला लागलो.

## लीदीयाच्या मनाचा पालट

11नंतर आम्ही जहाजाने त्रोवस सोडले आणि आम्ही
समथ्राकेस येथे समुद्रमार्गे आलो. दुसऱ्या दिवशी
नियापोलीस येथे गेलो. 12नंतर आम्ही फिलिप्पैला गेलो.
ते त्या भागातील मासेदोनियातील पहिले नगर आहे. ते
रोमी लोकांचे नगर आहे. त्या नगरात आम्ही काही दिवस
राहिलो.

---

**वचन 34** प्रेषितांनी केलेले कार्याच्या काही प्रतीमध्ये वचन
34 आहे. "... पण सीलने तेथेच राहायचे ठरविले."

[13]शब्बाथवारी आम्ही त्या नगराच्या वेशीच्या बाहेर प्रार्थना करण्यासाठी नदीकाठी सुरक्षित जागा आढळेल असे वाटल्यावरून तेथे जाऊन बसलो. आणि तेथे जमा झालेल्या स्त्रियांशी बोलू लागलो. [14]त्यांच्यामध्ये लुदियाने नावाची स्त्री होती. ती थुवतीरा नगरची होती. ती किरमीजी रंगाच्या कापडाचा व्यापार करीत असे. ती चांगली देवभक्त होती. लीदीयाने पौलाचे बोलणे ऐकले. देवाने तिचे अंत:करण उघडले. पौलाने जे सांगितले त्यावर तिने विश्वास ठेवला. [15]तिचा व तिच्या घरामध्ये राहणाऱ्या सर्वांचा बाप्तिस्मा करण्यात आला. मग लुदियाच्या आम्हांला तिच्या घरी बोलाविले. ती म्हणाली, तुम्हाला जर खरोखरच वाटत असेल की मी प्रभु येशूमध्ये विश्वासणारी आहे, तर माझ्या घरी येऊन राहा. तिने आम्हांला तिच्या घरी राहावे म्हणून गळ घातली.

## पौल व सीला तुरूंगात

[16]एकदा आम्ही प्रार्थनेला जात असताना. एक दासीकाम करणारी मुलगी आम्हांला भेटली. तिच्या अंगात येत असे* ती दैवप्रश्ना सांगून आपल्या घरधन्यास पुष्कळ मिळकत करून देत असे. [17]ती मुलगी पौलाच्या व आमच्या मागे आली. ती मोठ्याने म्हणाली, 'हे लोक सर्वोच्च देवाचे सेवक आहेत! ते तुम्हांला सांगत आहेत की, तुमचे तारण कसे होईल!' [18]तिने हे असे बरेच दिवस केले. त्यामुले पौल विचलित झाला. मग तो वळला व त्या आत्म्याला म्हणाला, 'येशू ख्रिस्ताच्या सामर्थ्याने, मी तुला आज्ञा देतो, तिच्यातून बाहेर निघ!' ताबडतोब तो आत्मा बाहेर आला.

[19]ज्या लोकांची ही मुलगी नोकरी करीत असे त्यांनी हे पाहिले. त्यांनी हे ओळखले की, आता ते त्या मुलीचा वापर पैसे कमविण्यासाठी करू शकणार नाहीत. म्हणून त्यांनी पौल व सीला यांना धरून शहरातील सभेच्या ठिकाणी ओढून नेले. शहराचे अधिकारीही तेथे होते. [20]त्या लोकांनी पौल व सीला यांना पुढाऱ्यांपुढे आणले. व ते म्हणाले, "हे लोक यहूदी आहेत. आपल्या शहरात ते त्रास देत आहेत. [21]आमच्यासाठी ज्या गोष्टी योग्य नाहीत त्या करण्यासाठी ते लोकांना सांगत आहेत. आम्ही रोमी नागरिक आहोत व या गोष्टी आम्ही करणार नाही. [22]लोक पौल व सीला यांच्याविरुद्ध होते. मग पुढाऱ्यांनी पौलाचे व सीलाचे कपडे फाडले व लोकांना सांगितले की, त्यांना काठीने मारा. [23]लोकांनी पौलाला व सीला यांना पुष्कळ मारले. मग पुढाऱ्यांनी त्या दोघांना तुंरुंगात टाकले. पुढाऱ्यांनी तुंरुंगाधिकाऱ्याला सांगितले, "फार काळजीपूर्वक यांच्यावर पहारा ठेवा!" [24]अधिकाऱ्याने तो खास आदेश मिळाल्यावर पौल व सीला यांना तुरुंगात आत दूरवर ठेवले. त्याने त्यांचे पाय लाकडाच्या ओंडक्यांमध्ये बांधले.

[25]मध्यरात्रीच्या वेळी पौल व सीला, देवाची गीते गात होते व प्रार्थना करीत होते व इतर कैदी ऐकत होते. [26]अचानक मोठा धरणीकंप झाला. तो इतका जबरदस्त होता की त्यामुळे तुरुंगाचे पाये डळमळले. मग तुरूंगाचे सर्व दरवाजे उघडले. सर्व कैद्यांची त्यांच्या साखळदंडातून सुटका झाली. [27]तुरुंगाधिकारी जागा झाला. त्याने पाहिले की, तुरुंगाचे दरवाजे उघडे आहेत. त्याला वाटले कैदी अगोदरच पळाले असतील म्हणून अधिकाऱ्याने आपली तरवार काढली, तो स्वत:ला मारणार होता [28]इतक्यात पौल ओरडला, "स्वत:ला इजा करून घेऊ नकोस आम्ही सर्व येथेच आहोत!"

[29]अधिकाऱ्याने कोणाला तरी दिवा आणायला सांगितले. मग तो आतमध्ये पळाला. तो थरथर कापत होता. तो पौल व सीला यांच्यापुढे पडला. [30]मग त्यांने त्यांना बाहेर आणले आणि म्हणाला, "पुरुषांनो, माझे तारण व्हावे म्हणून मी काय करावे?"

[31]ते त्याला म्हणाले, "प्रभु येशूवर विश्वास ठेव आणि तुझे तारण होईल– तुझे व तुझ्या घरात राहणाऱ्या सर्वांचे तारण होईल."

[32]पौलाने व सीलाने तुरुंगाधिकाऱ्याच्या घरातील सर्वांना व त्यालासुद्धा प्रभूचा संदेश सांगितला. [33]त्या वेळी बरीच रात्र झाली होती, पण तुरुंगाधिकाऱ्यांने पौल व सीला यांच्या जखमा धुतल्या. मग अधिकारी व त्याच्या घरातील सर्वांना बाप्तिस्मा झाला. [34]नंतर त्याने पौल व सीला यांना घरी नेले व अन्न खावयास दिले. सर्व लोक अतिशय आनंदित झाले होते. कारण ते आता देवावर विश्वास ठेवीत होते.

[35]दुसऱ्या दिवशी सकाळी पुढाऱ्यांनी काही शिपायांना पाठविले व तुरुंगाधिकाऱ्याला निरोप दिला की, "त्या लोकांना (पौल व सीला) यांना मोकळे सोडा!"

[36]तुरुंग अधिकारी पौलाला म्हणाला, "पुढाऱ्यांनी या शिपायांना तुम्हाला सोडण्याविषयी सांगितले आहे. तुम्ही आता जाऊ शकता. शांतीने जा."

[37]परंतु पौल त्या शिपायांना म्हणाला, "तुमच्या पुढाऱ्यांनी आम्ही चूक केली आहे हे सिद्ध केले नाही. परंतु त्यांनी आम्हांला लोकांसमोर मारले व तुरूंगात टाकले. आम्ही रोमी नागरिक आहोत म्हणून आम्हांला अधिकार आहेत. आता पुढाऱ्यांना वाटते की आम्ही गुप्तपणे निघून जावे. नाही! पुढाऱ्यांनी येऊन आम्हांला बाहेर काढले पाहिजे!"

[38]शिपायांनी पुढाऱ्यांना पौल जे म्हणाला, ते सांगितले. जेव्हा पुढाऱ्यांनी ऐकले की पौल व सीला रोमी नागरिक आहेत, तेव्हा ते घाबरले. [39]मग पुढाऱ्यांनी येऊन त्यांची क्षमा मागितली. पुढाऱ्यांनी येऊन त्यांना सोडविले व शहर सोडण्याविषयी सांगितले. [40]पण जेव्हा पौल व सीला तुरुंगाबाहेर आले, तेव्हा ते लीदीयाच्या घरी गेले. त्यांनी तेथे काही विश्वासणाऱ्यांना पाहिले. व त्यांना धीर दिला. मग पौल व सीला गेले.

---

**अंगात येत असे** सैतानाचा आत्मा जो विशेष ज्ञान देतो.

## थेस्सलनीका येथे पौल

17 पौल व सीला अंफिपुली व अपुल्लोनिया या प्रदेशांतून प्रवास करीत गेले. ते थेस्सलनीका शहरात आले. त्या शहरात यहूदी लोकांचे सभास्थान होते. 2यहूदी लोकांना भेटण्यासाठी पौल सभास्थानात गेला. तो असे नेहमीच करीत असे. तीन आठवडे प्रत्येक शब्बाथवारी पवित्र शास्त्राविषयी पौलाने यहूदी लोकांशी चर्चा केली. 3पौलाने पवित्र शास्त्रातील वचने यहूदी लोकांना स्पष्ट करून सांगितली. त्याने दाखवून दिले की, ख्रिस्ताने मरणे अगत्याचे होते. तसेच त्याचे मरणातून उठणेही अगत्याचे होते. पौल म्हणाला, “हा मनुष्य ‘येशू’ ज्याच्याबद्दल मी तुम्हांला सांगत आहे तो ‘ख्रिस्त’ आहे.” 4सभास्थानांमध्ये काही ग्रीक लोक होते, जे खऱ्या देवाची उपासना करीत. तेथे काही महत्त्वाच्या स्त्रियाही होत्या. यातील पुष्कळ लोक पौल व सीला यांना जाऊन मिळाले.

5पण ज्या यहूदी लोकांनी विश्वास ठेवला नव्हता, ते जळफळू लागले. शहरातून काही दुष्ट माणसांना त्यांनी भाड्याने आणले. त्या दुष्ट माणसांनी आणखी लोकांना जमा केले व शहरात अशांतता निर्माण केली. लोक यासोनाच्या घरी गेले. पौल व सीला यांचा शोध घेत ते गेले. त्या लोकांची अशी इच्छा होती की, पौल व सीला यांना लोकांसमोर आणायचे. 6पण त्यांना पौल व सीला सापडले नाहीत. म्हणून लोकांनी यासोनाला व आणखी काही दुसऱ्या विश्वासणाऱ्यांना नगराच्या अधिकाऱ्यांपुढे ओढीत नेले. ते मोठ्याने ओरडून म्हणाले, “या लोकांनी जगात सगळीकडे उलथापालथ केली. आणि आता ते येथेसुद्धा आले आहेत! 7यासोनाने त्यांना आपल्या घरी ठेवले. कैसराच्या* नियमांविरुद्ध हे लोक करतात. ते म्हणत की, आणखी एक राजा आहे. त्याचे नाव येशू आहे.”

8शहराच्या अधिकाऱ्यांनी व इतर लोकांनी हे ऐकले. ते खूपच अस्वस्थ झाले. 9त्यांनी यासोनला व इतर विश्वासणाऱ्यांना दंड भरण्यास सांगितले. मग त्यांनी विश्वासणाऱ्यांना जाऊ दिले.

## पौल व सीला बिरुया येथे जातात

10त्याच रात्री विश्वासणाऱ्यांनी पौल व सीला यांना बिरुया नावाच्या दुसऱ्या शहरी पाठविले. बिरुयामध्ये पौल व सीला यहूदी सभास्थानामध्ये गेले. 11हे यहूदी लोक थेस्सलनीका येथील यहूदी लोकांपेक्षा बरे होते. पौल व सीला यांनी गोष्टी सांगितल्या. त्या गोष्टी त्यांनी आनंदाने ऐकल्या. बिरुया येथील हे यहूदी लोक पवित्र शास्त्राचा दररोज अभ्यास करीत. या गोष्टी खऱ्याच घडल्या आहेत की काय याविषयी जाणून घेण्यास ते उत्सुक होते. 12यातील पुष्कळ यहूदी लोकांनी विश्वास ठेवला. पुष्कळशा ग्रीक पुरुषांनी व स्त्रियांनी (ज्यांना समाजात महत्त्व होते.) त्यांनीसुद्धा विश्वास ठेवला. 13परंतु जेव्हा थेस्सलनीका येथील यहूदी लोकांना समजले की पौल बिरुया येथेही देवाचे वचन सांगत आहे, ते बिरुया येथे सुद्धा आले. थेस्सलनीका येथील यहूदी लोकांनी बिरुया येथील लोकांना हैराण केले व त्रास दिला. 14म्हणून विश्वासणाऱ्यांनी पौलाला ताबडतोब सुमुद्राकडे नेले. पण सीला व तीमथ्य तेथेच राहिले. 15विश्वासणारे जे पौलाबरोबर गेले होते त्यांनी त्याला अथेनै शहरात आणले. या बांधवांनी पौलचा संदेश जो सीला व तीमथ्यासाठी होता, तो घेऊन ते परत आले. संदेशात असे म्हटले होते, “तुम्हांला शक्य होईल तितक्या लवकर माझ्याकडे या.”

## अथेनै येथे पौल

16पौल अथेनै येथे सीला व तीमथ्य यांची वाट पाहत होता. पौलाचे मन अस्वस्थ झाले. कारण त्याने पाहिले की, ते शहर मूर्तींनी भरलेले आहे. 17सभास्थानामध्ये पौल जे खऱ्या देवाची उपासना करीत अशा यहूदी व ग्रीक लोकांशी बोलला. शहराच्या व्यापार क्षेत्रातील काही लोकांशीही पौल बोलला. पौल दररोज लोकांशी बोलत असे. 18काही एपिकूरपंथी व स्तोयिक पंथीय तत्त्वज्ञानी मंडळीने त्याच्याशी वाद घातला.

त्यांच्यातील काही म्हणाले, “या माणसाला तो काय बोलत आहे, ते त्याचे त्यालाच कळत नाही. तो काय सांगण्याचा प्रयत्न करीत आहे?” पौल त्यांना येशूच्या मरणातून पुन्हा उठण्याची सुवार्ता सांगत होता. ते म्हणाले, “असे वाटते की तो आपल्याला दुसऱ्या कोणत्या तरी देवाबद्दल सांगत आहे” 19त्यांनी पौलाला धरले व अरीयपगाच्या* सभेपुढे नेले. ते म्हणाले, “तुम्ही आम्हांला जी नवी कल्पना शिकवीत आहात ती कृपा करून स्पष्ट करून सांगा. 20तुम्ही ज्या गोष्टी सांगत आहात त्या आमच्यासाठी नवीन आहेत. यापूर्वी आम्ही हे कधीही ऐकले नाही. या शिकवणीचा अर्थ काय हे आम्हांला जाणून घ्यायचे आहे.” 21(अथेनै येथे राहणारे तसेच त्यांच्यात राहणारे विदेशी लोक नेहमी नव्या कल्पनांविषयी बोलण्यात वेळ घालवित असत).

22मग पौल अरीयपगाच्या सभेपुढे उभा राहिला. पौल म्हणाला, “अथेनैच्या लोकांनो, मी पाहत आहे की, सर्व गोष्टींमध्ये तुम्ही फार धार्मिक आहात. 23मी तुमच्या शहरातून जात होतो आणि ज्यांची तुम्ही उपासना करता ते मी पाहिले. मी एक वेदी पाहिली. त्यावर असे लिहिले होते: ‘अज्ञात देवाला’. तुम्ही अशा देवाची उपासना करता जो तुम्हांला माहीत नाही. याच देवाविषयी मी तुम्हांला सांगत आहे! 24ज्याने हे सर्व जग व त्यातील सर्व काही

---

**कैसर** रोमच्या सम्राटाला दिलेले नाव.

**अरीयपगाचीसभा** अथेनै शहरातील पुढाऱ्यांचा महत्त्वाचा गट, ह्या गटातील लोक न्यायाधीशासारखे गणले जातात.

निर्माण केले तोच हा देव आहे. तो जमीन व आकाश यांचा प्रभु आहे. मनुष्यांनी बांधलेल्या मंदिरात तो राहत नाही! 25हा देव जीवन देतो, श्वास देतो व सगळे काही देतो. त्याला जे पाहिजे ते सगळे त्याच्याकडे आहे. 26देवाने एका माणसाला (आदाम) निर्माण करून सुरुवात केली. त्याच्यापासून त्याने वेगवेगळे लोक निर्माण केले. देवाने त्यांना सगळीकडे राहण्यास मुभा दिली. देवाने त्यांना काळ व सीमा ठरवून दिल्या. 27त्यांनी देवाचा शोध करावा अशी त्याची इच्छा होती. कदाचित तो त्यांचा शोध करील व त्यांना तो सापडेल. पण तो आमच्या कोणापासूनही दूर नाही.

28आम्ही त्याच्यासह राहतो आम्ही त्याच्यासह चालतो आम्ही त्याच्यासह आहोत,'

तुमच्यातीलच काही लोकांनी असे लिहिले आहे:

'आम्ही त्याची मुले आहोत'

29आपण देवाची मुले आहोत. म्हणून इतर लोक ज्या प्रकारे समजतात त्या प्रकारचा देव आहे असे आपण मुळीच समजू नये. तो सोने, चांदी, किंवा दगडासारखा नाही. 30भूतकाळात लोक देवाला समजू शकले नाहीत पण देवाने त्याकडे दुर्लक्ष केले. पण आता, जगातील प्रत्येक व्यक्तीला देव सांगतो की, त्याने आपले हृदय व जीवन बदलावे. 31देवाने एक दिवस ठरविलेला आहे, ज्या दिवशी तो जगातील प्रत्येक व्यक्तीला न्याय करील. तो नि:पक्षपाती असेल. हे करण्यासाठी तो एका माणसाचा (येशूचा) वापर करील. देवाने त्याला फार पूर्वीच निवडले आहे. व प्रत्येक माणसाला देवाने हे दाखवून दिले आहे; त्या माणसाला मरणातून पुन्हा उठवून दाखवून दिले आहे!"

32जेव्हा लोकांनी ऐकले की, येशूला मरणातून पुन्हा उठविण्यात आले तेव्हा त्यांच्यातील काही जण हसू लागले. लोक म्हणाले, "आम्ही याविषयी नंतर पुन्हा ऐकू!" 33पौल त्यांच्यापासून निघून गेला. 34पण काही लोकांनी पौलावर विश्वास ठेवला व ते त्याला जाऊन मिळाले. त्यांच्यापैकी एक दिओनुस्य होता. तो अरीयपगा सभेचा सभासद होता. दामारि नावाच्या स्त्रीनेही विश्वास ठेवला. आणखीही काही लोक होते, ज्यांनी विश्वास ठेवला.

## करिंथमध्ये पौल

18 नंतर पौलाने अथेनै शहर सोडले व करिंथ शहरास गेला. 2करिंथमध्ये पौल एका यहूदी मनुष्याला भेटला ज्याचे नाव अक्विल्ला असे होते. तो पंत येथील रहिवासी होता. आपली पत्नी प्रिस्किल्ला हिच्यासह नुकताच तो इटलीहून आला होता. कारण सर्व यहूदी लोकांनी रोम शहर सोडून गेले पाहिजे असा हुकूम क्लौद्य* याने काढला होता. पौल त्यांना (अक्विल्ला व प्रिस्किल्ला) भेटावयास गेला. 3पौलासारखेच ते तंबू बनविणारे होते. तो त्यांच्याबरोबर राहिला व त्यांच्याबरोबर काम करू लागला. 4प्रत्येक शब्बाथवारी पौल सभास्थानात यहूदी लोकांशी व ग्रीक लोकांशी बोलत असे (चर्चा करीत असे) आणि तो यहूदी व ग्रीक लोकांची मने वळविण्याचा प्रयत्न करीत असे.

5जेव्हा सीला व तीमथ्य हे मासेदोनियाहून परत आले, तेव्हा पौल उपदेश करण्यात आपला सर्व वेळ घालवू लागला. येशू हाच ख्रिस्त आहे अशी साक्ष देऊ लागला. 6परंतु यहूदी लोकांनी पौलाला विरोध केला. त्याला ते (यहूदी लोक) वाईट रीतीने बोलले. तेव्हा आपला निषेध दर्शविण्याकरिता पौलाने आपल्या अंगावरील कपडे झटकले. तो यहूदी लोकांना म्हणाला, "जर तुमचे तारण झाले नाही, तर तो तुमचा दोष असेल! तुमचे रक्त तुमच्याच माथी असो! मी जबाबदार नाही. येथून पुढे मी यहूदीतर लोकांकडेच जाईन." 7पौल तेथून निघाला आणि सभास्थानाजवळ राहत असलेल्या तीत युस्त नावाच्या देवाच्या भक्ताच्या घरी गेला. 8त्या सभास्थानाचा क्रिस्प हा पुढारी होता. क्रिस्पने व त्याच्या घरातील सर्वांनी प्रभूवर विश्वास ठेवला. करिंथ येथील पुष्कळ लोकांनी पौलाचे बोलणे ऐकले आणि विश्वास ठेवला. करिंथ येथिल पुष्कळ लोकांनी पौलाचे बोलणे ऐकले आणि विश्वास ठवला आणि त्यांचा बाप्तिस्मा करण्यात आला.

9एके रात्री, प्रभु स्वप्नामध्ये पौलाशी बोलला, "घाबरू नको! बोलत राहा, शांत राहू नको! 10मी तुझ्याबरोबर आहे. कोणीही तुझ्यावर हल्ला करणार नाही व तुला इजा करणार नाही; कारण या शहरात माझे पुष्कळ लोक आहेत." 11म्हणून पौल तेथे दीड वर्षे देवाचे वचन त्या लोकांना शिकवीत राहिला.

## पौलाला गल्लियोपुढे उभे करतात

12जेव्हा गल्लियो अखया प्रांताचा राज्यपाल होता, त्यावेळेस काही यहूदी पौलाविरुद्ध एकत्र आले आणि त्याला न्यायसभेपुढे उभे केले. 13यहूदी लोक म्हणाले, "हा मनुष्य अशा रीतीने लोकांना देवाची उपासना करायला शिकवीत आहे की, जे नियमशास्त्राच्या विरुद्ध आहे."

14पौल काही बोलणार इतक्यात गल्लियो यहूदी लोकांना म्हणाला, "एखादा अपराध किंवा वाईट गोष्ट असती तर तुमचे म्हणणे ऐकून घेणे रास्त ठरले असते. 15परंतु ज्याअर्थी ही बाब शब्द, नावे व तुमच्या नियमशास्त्रातील प्रश्नांशी संबंधित आहे, त्याअर्थी तुम्हीच तुमची समस्या सोडवा. अशा गोष्टींबाबत न्याय करण्यास मी नकार देतो!" 16मग गल्लियोने त्यांना न्यायालयाबाहेर घालवून दिले. 17मग

**क्लौद्य** रोमचा सम्राट (इ.स. 41-54)

त्या सर्वांनी यहूदी सभास्थानाचा प्रमुख सोस्थनेस याला
मारहाण केली, पण गल्लियोने त्याकडे लक्ष दिले नाही.

### पौल अंत्युखियास परत जातो

18पौल बंधुजनांबरोबर बरेच दिवस राहिला. नंतर तो
निघाला, व सूरिया देशाला समुद्रमार्गे गेला. आणि
त्याच्याबरोबर प्रिस्किल्ला व अक्विल्ला ही दोघे होती.
पौलाने किंख्रिया येथे आपल्या डोक्याचे मुंडण केले. कारण
त्याने नवस केला होता. 19मग ते इफिस येथे आले.
पौलाने प्रिस्किल्ला व अक्विल्ला यांना तेथे सोडले. तो
सभास्थानात गेला आणि यहूदी लोकांबरोबर वादविवाद
केला. 20जेव्हा त्यांनी त्याला तेथे आणखी काही वेळ
थांबण्यासाठी सांगितले, तेव्हा तो कबूल झाला नाही. 21परंतु
जाता जाता तो म्हणाला, "देवाची इच्छा असेल तर मी
परत तुमच्याकडे येईन." मग तो समुद्रमार्गे इफिसहून
निघाला.
22जेव्हा तो कैसरीया येथे आला, तेव्हा तो तेथून वर
यरुशलेमला गेला. आणि मंडळीला भेटला. मग तो खाली
अंत्युखियाला गेला. 23तेथे काही दिवस राहिल्यानंतर तो
गेला, आणि गलतिया व फ्रुगिया या प्रदेशातून ठिकठिकाणी
प्रवास करीत गेला. त्याने येशूच्या अनुयायांना विश्वासात
बळकट केले.

### इफिस व अखया (करिंथ) येथे अपुल्लो

24अपुल्लो नावाचा एक यहूदी होता. तो आलेक्सांद्र
येथे जन्मला होता. तो उच्च शिक्षित होता. तो इफिस येथे
आला. त्याला पवित्र शास्त्राचे सखोल ज्ञान होते. 25देवाच्या
मार्गाचे शिक्षण त्याला देण्यात आले होते. तो आत्म्यात
आवेशी असल्यामुळे येशूविषयी अचूकतेने शिकवीत असे
व बोलत असे, तरी त्याला फक्त योहानाचा बाप्तिस्माच
ठाऊक होता. 26नंतर तो यहूदी लोकांच्या सभास्थानात
धैर्याने बोलू लागला. जेव्हा प्रिस्किल्ला व अक्विल्ला
यांनी त्याला बोलताना ऐकले, तेव्हा त्यांनी त्याला एका
बाजूला घेतले. आणि देवाच्या मार्गाविषयी अधिक अचूक
रीतीने त्याला स्पष्ट करून सांगितले. 27अपुल्लोला अखया
देशाला जायचे होते, तेव्हा बंधुंनी त्याला उत्तेजन दिले.
आणि तेथील येशूच्या अनुयायांना त्याचे स्वागत
करण्याविषयी लिहिले. जेव्हा तो पोहोंचला, तेव्हा ज्यांनी
कृपेमुळे (येशूवर) विश्वास ठेवला होता, त्यांना त्याने
खूप मदत केली. 28जाहीर वादविवादात त्याने यहूदी
लोकांना फार जोरदारपणे पराभूत केले. आणि पवित्र
शास्त्राच्या आधारे येशू हाच ख्रिस्त आहे हे सिद्ध केले.

### इफिस येथे पौल

19 तेव्हा असे झाले की, अपुल्लो करिंथ येथे
असताना पौल निरनिराळ्या भागातून प्रवास
करीत इफिस येथे आला. तेथे त्याला येशूचे काही अनुयायी
आढळले. 2पौलाने त्यांना विचारले, "जेव्हा तुम्ही विश्वास
ठेवला, तेव्हा तुम्हांला पवित्र आत्मा मिळाला काय?"
ते अनुयायी त्याला म्हणाले, "पवित्र आत्मा आहे हे
सुद्धा आम्ही ऐकलेले नाही!"
3तो म्हणाला, "मग कसला बाप्तिस्मा तुम्ही घेतला?"
ते म्हणाले, "योहानाचा बाप्तिस्मा."
4पौल म्हणाला, "योहानाचा बाप्तिस्मा पश्चात्तापाचा होता.
त्याने लोकांना सांगितले की, त्याच्यानंतर जो येत आहे,
त्याच्यावर लोकांनी विश्वास ठेवावा. तो येणारा म्हणजे
येशू होय."
5जेव्हा त्यांनी हे ऐकले, तेव्हा त्यांनी प्रभु येशूच्या नावात
बाप्तिस्मा घेतला. 6आणि जेव्हा पौलाने त्याचे हात त्यांच्यावर
ठेवले, तेव्हा पवित्र आत्मा त्यांच्यावर आला आणि ते
निरनिराळ्या भाषा बोलू लागले व भविष्य सांगू लागले.
7या गटात सर्व मिळून बारा पुरुष होते.
8पौल यहूदी सभास्थानात जात असे व तीन महिने
धैर्याने बोलत असे, देवाच्या राज्याविषयी चर्चा करीत व
यहूदी लोकांचे मन वळवीत असे. 9परंतु त्यांच्यातील काही
कठीण मनाचे झाले. व त्यांनी विश्वास ठेवण्यास नकार
दिला, आणि देवाच्या मार्गाविषयी वाईट बोलले. मग पौल
त्यांच्यातून निघून गेला व शिष्यांनाही त्यांच्यातून वेगळे
केले. आणि तुरन्नाच्या शाळेत दररोज त्यांच्याशी चर्चा
केली. 10हे असे दोन वर्षे चालले, याचा परिणाम असा
झाला की, आशियात राहत असलेल्या सर्व यहूदी व यहूदीतर
लोकांपर्यंत प्रभु येशूचे वचन पोहोंचले.
11देवाने पौलाच्या हातून असामान्य चमत्कार घडविले.
12पौलाने वापरलेले रुमाल आणि कपडेही काही लोक
नेत असत. लोक या गोष्टी आजारी लोकांवर ठेवीत
असत. जेव्हा ते असे करीत तेव्हा आजारी लोक बरे होत
आणि दुष्ट आत्मे त्यांना सोडून जात.
13–14काही यहूदी सुद्धा सगळीकडे प्रवास करीत असत
व लोकांमधून दुष्ट आत्मे घालवीत असत. ते दुष्ट आत्म्याने
पछाडलेल्या व्यक्तिमधून प्रभु येशूच्या नावाने ते आत्मे
घालवीत असत. ते म्हणत, "पौल ज्या येशूच्या नावाने
घोषणा करतो त्या नावाने मी तुला आज्ञा करतो." स्किवा
नावाच्या यहूदी मुख्य याजकाचे सात पुत्र असे करीत होते.
15परंतु एकदा एक अशुद्ध आत्मा त्यांना म्हणाला, "मी
येशूला ओळखतो, पौल मला माहीत आहे, पण तुम्ही
कोण आहात?"
16मग ज्याला दुष्ट आत्मा लागला होता त्या मनुष्याने
त्यांच्यावर उडी मारली. त्याने त्यांच्यावर सरशी केली व
त्यांना पराभूत केले. तेव्हा ते दोघे उघडे व जखमी होऊन
घरातून पळाले. 17इफिस येथे राहणाऱ्या सर्व यहूदी व
यहूदीतर लोकांना हे समजले. तेव्हा सर्वांना भीति वाटली.
आणि लोक प्रभु येशूच्या नावाचा अधिकच आदर करू
लागले. 18पुष्कळसे विश्वासणारे पापकबुली देऊ लागले
व ज्या वाईट गोष्टी त्यांनी केल्या होत्या, त्या सांगू लागले.

19काही विश्वासणाऱ्यांनी जादूची कामे केली होती. या विश्वासणाऱ्यांनी आपली जादूची पुस्तके सर्व लोकांसमोर आणली आणि जाळली. त्या पुस्तकांची किंमत पन्नास हजार चांदीच्या नाण्यांइतकी भरली. 20अशा रीतीने प्रभूच्या वचनाचा दूरवर प्रसार झाला व ते फार परिणामकारक ठरले. 21या गोष्टी घडल्यानंतर पौलाने मनात ठरविले की, मासेदोनिया व अखया या प्रांतांतून प्रवास करीत पुढे यरुशलेमला जायचे. तो म्हणाला, "मी तेथे गेल्यांनतर मला रोमदेखील पाहिलेच पाहिजे." 22म्हणून त्याचे दोन मदतनीस तीमथ्य व एरास्त यांना त्याने मासेदोनियाला पाठवून दिले. आणि त्याने आणखी काही काळ आशियात घालविला.

## इफिस येथे दंगा

23याकाळामध्येत्यामार्गाविषयी (ख्रिस्ती चळवळीविषयी) मोठा गोंधळ उडाला. 24देमेत्रिय नावाचा एक मनुष्य होता. तो सोनार होता. तो अर्तमी देवीचे देव्हारे बनवीत असे. जे कारागीर होते त्यांना यामुळे खूप पैसे मिळत. 25त्या सर्वांना व या धंद्याशी संबंध असलेल्या सर्वांना त्याने एकत्र केले. आणि तो म्हणाला, "लोकहो, तुम्हांला माहीत आहे की, या धंद्यापासून आपल्याला चांगला पैसा मिळतो. 26पण पहा तो पौल नावाचा मनुष्य काय करीत आहे! तो काय म्हणत आहे ते ऐका! पौलाने पुष्कळ लोकांना प्रभावित केले आहे व बदलले आहे. त्याने हे इफिसमध्ये व सगळ्या आशियामध्ये केले आहे. तो म्हणतो, माणसांच्या हातून बनविलेले देव खरे देव नाहीत. 27यामुळे केवळ आपल्या धंद्याची बदनामी होण्याची भीति नसून अर्तमी या महान देवीच्या मंदिराचे महत्त्व नाहीसे होईल व तिचे मोठेपण नाहीसे होण्याची भीति आहे. ही अशी देवी आहे की, जिची पूजा सर्व आशियात व जगात केली जाते."

28जेव्हा त्यांनी हे ऐकले तेव्हा ते फार रागावले. आणि मोठ्याने ओरडून म्हणू लागले, "इफिसकरांची अर्तमी थोर आहे!" 29शहरातील लोकांमध्ये गोंधळ उडाला. आणि लोकांनी गायस व अरीस्तार्ख या पौलाबरोबर सोबती म्हणून प्रवास करणाऱ्या मासेदोनियाच्या रहिवाश्यांना पकडून नाट्यगृहात नेले. 30पौल लोकांच्या पुढे जाऊ इच्छीत होता पण येशूचे अनुयायी त्याला असे करू देईनात 31पौलाचे काही मित्र जे प्रांताधिकारी होते, त्यांनी निरोप पाठवून त्याने नाट्यगृहात जाऊ नये अशी कळकळीची विनंति केली. 32एकत्र जमलेल्या जमावातून काही लोक एक घोषणा करू लागले तर दुसरे लोक इतर घोषणा करू लागले. त्यामुळे सगळा जमाव अगदी गोंधळून गेला. आणि त्यातील पुष्कळ जणांना माहीत नव्हते की, आपण या नाट्यभवनात एकत्र का आलोत. 33यहूदी लोकांनी अलेक्सांद्र नावाच्या एका मनुष्याला ढकलीत नेऊन सर्वांच्या समोर उभे केले. तो आपल्या हातांनी खुणावून त्यांना समजावण्याचा प्रयत्न करू लागला. 34पण जेव्हा लोकांना समजले की, तो एक यहूदी आहे, तेव्हा जवळ जवळ दोन तास सातत्याने ते एका आवाजात ओरडत राहिले, "इफिसकरांची अर्तमी देवी थोर आहे!"

35शहराचा लेखनिक लोकांना शांत करीत म्हणाला, "इफिसच्या लोकांनो, थोर अर्तमी देवीचे व स्वर्गातून पडलेल्या पवित्र दगडाचे इफिस हे रक्षणकर्ते आहे. हे ज्याला माहीत नाही असा एक तरी माणूस जगात आहे काय? 36ज्याअर्थी या गोष्टी नाकारता येत नाहीत त्याअर्थी तुम्ही शांत राहिलेच पाहिजे. उतावळेपणा करू नये. 37तुम्ही या दोघांना (गायस व अरिस्तार्ख) येथे घेऊन आलात. वस्तुत: त्यांनी मंदिरातील कशाचीही चोरी केली नाही किंवा आपल्या देवीची निंदा केलेली नाही. 38जर देमेत्रिय व त्याच्याबरोबर असलेल्या कारागिरांच्या काही तक्रारी असतील, तर त्यासाठी न्यायालये उघडी आहेत. तेथे ते एकमेकांवर आरोप करू शकतात! 39परंतु जर तुम्हांला एखाद्या गोष्टीची चौकशी करायची असेल तर नियमित सभेत त्यासंबंधी विचार केला जाईल. 40आज येथे जे काही घडलेले आहे, त्याबद्दल योग्य ते कारण आपणांस सांगता येणार नाही, त्यामुळे आपणच ही दंगल सुरू केली असा आरोप आपल्यावर केला जाण्याची भीति आहे." 41असे सांगून झाल्यानंतर त्याने जमावाला जाण्यास सांगितले.

## पौल मासेदोनिया व ग्रीसला जातो

20 जेव्हा गोंधळ थांबला, तेव्हा पौलाने येशूच्या अनुयायांना भेटायला बोलाविले आणि त्यांना उत्तेजन दिल्यानंतर त्यांचा निरोप घेतला. आणि तो मासेदोनियाला निघाला. 2मासेदोनियातून जात असताना निरनिराळ्या ठिकाणी असलेल्या येशूच्या अनुयायांना त्याने अनेक गोष्टी सांगून धीर दिला. मग पौल ग्रीसला आला. 3त्या ठिकाणी तो तीन महिने राहिला. पौल सूरियाला समुद्रमार्गे निघाला असता, यहूदी लोकांनी त्याच्याविरुद्ध कट रचला. हे पाहून त्याने मासेदोनियातून परत फिरण्याचे ठरविले. 4त्याच्याबरोबर काही लोक होते ते असे: बिरुया शहराच्या पुर्राचा मुलगा सोपत्र, थेस्सलनीका येथील अरिस्तार्ख व सकूंद, दर्बे येथील गायस आणि तीमथ्य, तुखिक व त्रफिम हे आशिया प्रांतातील होते. 5ही माणसे आमच्यापुढे गेली व त्रोवस येथे आमची वाट पाहू लागली. 6बेखमीर भाकरीच्या यहूदी सणानंतर आम्ही फिलीप्पै येथून समुद्रमार्गे निघालो आणि पाच दिवसांनी त्रोवस येथे त्यांना जाऊन भेटलो व तेथे सात दिवस राहिलो.

## पौलाची त्रोवसला शेवटची भेट

7मग आठवड्याच्या पहिल्या दिवशी म्हणजे रविवारी आम्ही सर्व भाकर मोडण्यासाठी* एकत्र जमलो असताना,

---

**भाकर मोडणे** याचा सरळ अर्थ जेवण करणे असा होतो. परंतु येथे त्याचा अर्थ प्रभुच्या भोजनामध्ये सहभागी होणे असा होतो.

पौल त्यांच्याबरोबर बोलू लागला कारण दुसऱ्या दिवशी
निघण्याचा त्याचा बेत होता. तो मध्यरात्रीपर्यंत बोलत
राहिला. 8वरच्या मजल्यावरील ज्या खोलीत आम्ही जमा
झालो होतो तेथे पुष्कळ दिवे होते. 9युतुख नावाचा एक
तरुण खिडकीत बसला होता. पौल बोलत असताना
त्याच्यावर झोपेचा इतका अंमल चढला की, तो तिसऱ्या
मजल्यावरून खाली पडला. जेव्हा त्याला उचलले, तेव्हा
तो मेलेला आढळला. 10पौल खाली गेला व त्याच्यावर
ओणवा पडला आणि त्याला आपल्या हातांनी कवेत धरून
म्हणाला, “चिंता करू नका! त्याच्यात अजून जीव आहे.”
11मग पौल वर गेला. त्यांने भाकर मोडली व ती खाल्ली.
पहाट होईपर्यंत तो त्यांच्याशी बोलला. मग तो गेला. 12त्या
तरुणाला त्यांनी जिवंत असे घरी नेले. त्या सर्वांना फार
समाधान झाले.

## त्रोवसापासून मिलेतापर्यंत प्रवास

13तेथून आम्ही पुढे निघालो व अस्सा या नगरी समुद्रमार्गे
निघालो. तेथे आम्ही पौलाला घेणार होतो. त्यानेच अशा
प्रकारे योजना केली होती, ती म्हणजे त्याने स्वत: पायी
जायचे. 14जेव्हा आम्हांला तो अस्सा येथे भेटला, तेव्हा
आम्ही त्याला जहाजात घेतले. आणि आम्ही मितुलेनाला
गेलो. 15दुसऱ्या दिवशी आम्ही जहाजाने मितुलेनाहून
निघालो व खियासमोर आलो. मग दुसऱ्या दिवशी सामा
बेट ओलांडले आणि एक दिवसानंतर मिलेतला आलो.
16कारण पौलाने ठरविले होते की इफिस येथे थांबायचे
नाही. आशियात त्याला जास्त वेळ थांबायचे नव्हते. तो
घाई करीत होता कारण शक्य झाल्यास पन्नासाव्या
दिवसाच्या सणासाठी त्याला यरुशलेम येथे राहावयास हवे
होते.

## पौल इफिस येथील वडीलजनांशी बोलतो

17मिलेताहून इफिस येथे निरोप पाठवून पौलाने तेथील
मंडळीच्या वडीलजनांना बोलावून घेतले. 18जेव्हा ते आले,
तेव्हा तो त्यांना म्हणाला, “आशियात आलो त्या दिवसापासून
मी तुमच्या सोबत असताना कसा राहिलो हे तुम्हांला
माहीत आहे. 19मी प्रभूची सेवा पूर्ण नम्रतेने व रडून
केली. यहूदी लोकांनी केलेल्या कटामुळे निर्माण झालेल्या
उपद्रवांना तोंड देत मी त्याची सेवा केली. 20जे काही
तुमच्या चांगल्यासाठी होते ते तुम्हांला सांगण्यासाठी
कोणतीही कसर ठेवली नाही, हे तुम्हांला माहीत आहे.
आणि या गोष्टी जाहीरपणे व घराघरातून सांगण्यासाठी मी
कधीही मागेपुढे पाहिले नाही. 21पश्चात्ताप करून देवाकडे
वळण्याविषयी आणि आपल्या प्रभु येशूवरील
विश्वासाविषयी यहूदी व ग्रीक लोकांना सारखीच साक्ष
दिली. 22आणि आता आत्म्याच्या आज्ञेने यरुशलेमला
चाललो आहे, आणि तेथे माझ्याबाबतीत काय घडेल हे
माहीत नाही. 23मला फक्त एकच गोष्ट माहीत आहे की
प्रत्येक शहरात पवित्र आत्मा मला सावध करतो. तुरुंगवास
व संकटे माझी वाट पाहत आहेत हे तो मला सांगतो 24मी
माझ्या जीवनाविषयी काळजी करीत नाही. सर्वांत महत्त्वाची
गोष्ट म्हणजे मी माझे काम पूर्ण करणे. प्रभु येशूने जे
काम मला दिले ते मला पूर्ण करायला पाहिजे– ते काम
म्हणजे– देवाच्या कृपेबद्दल (दयाळूपणाबद्दल) ची सुवार्ता
लोकांना सांगितली पाहिजे.

25“राज्याची घोषणा करीत ज्या लोकांत मी फिरलो
त्या तुम्हांतील कोणालाही मी पुन्हा कधीही दिसणार नाही
हे आता मला माहीत आहे. 26म्हणून मी तुम्हांला जाहीरपणे
सांगतो की, सर्वांच्या रक्तासंबंधाने मी निर्दोष असा आहे.
27देवाची संपूर्ण इच्छा काय आहे हे प्रगट करण्यास मी
कधीही मागेपुढे पाहिलेले नाही. 28तुमची स्वत:ची व देवाच्या
सर्व लोकांची, ज्यांना देवाने तुम्हांला दिलेले आहे, त्यांची
काळजी घ्या. कळपाची (देवाच्या लोकांची) काळजी
घेण्याचे काम पवित्र आत्म्याने तुम्हांला दिलेले आहे. तुम्ही
मंडळीसाठी मेंढपाळासारखे असले पाहिजे. ही मंडळी देवाने
स्वत:चे रक्त देऊन विकत घेतली. 29मला माहीत आहे
की, मी गेल्यावर तुमच्यामध्ये भयंकर असे दुष्ट लांडगे
येतील. ते कळपाला सोडणार नाहीत. 30तुमच्यामधूनसुद्धा
लोक उठतील. चुकीचे असे तुम्हांला शिकवून आपल्या
मागे घेऊन जातील.

31यासाठी सावध राहा. तुम्हांतील प्रत्येकाला गेले तीन
वर्षे डोळ्यांत अश्रु आणून सावध करण्याचे मी कधीच
थांबविले नाही हे आठवा. 32आणि आता मी तुम्हांला
देवाच्या व वचनाच्या कृपेच्या अधीन करतो. जी तुमची
वाढ करण्यासाठी समर्थ आहे. व सर्व पवित्र केलेल्यांमध्ये
वतन द्यावयाला समर्थ आहे. 33मी कोणाच्याही सोन्याचा,
चांदीचा व कपड्यांचा लोभ धरला नाही. 34मी आपल्या
स्वत:च्या व माझ्याबरोबर राहणाऱ्यांच्या गरजा माझ्या
हातांनी भागविल्या हे तुम्हांला चांगले माहीत आहे. 35अशा
रीतीने मी तुम्हास उदाहरण घालून दिले आहे की जे
दुर्बल आहेत अशांना आपण स्वत: मेहनत करून मदत
केली पाहिजे. व प्रभु येशूचे शब्द लक्षात ठेवले पाहिजेत.
तो स्वत: म्हणाला, ‘घेण्यापेक्षा देणे अधिक आशीर्वादाचे
असते.’”

36आणि हे बोलल्यावर पौलाने गुडघे टेकले आणि
प्रार्थना केली. 37तेव्हा प्रत्येकाला खूपच रडू आले. ते
पौलाच्या गळ्यात पडले व त्याचे मुके घेत राहिले. 38ते
पुन्हा त्याला कधीही पाहू शकणार नाहीत, या वाक्याने
त्यांना फार दु:ख झाले. मग ते त्याला जहाजापर्यंत निरोप
देण्यास गेले.

## पौल यरुशलेमला जातो

21 त्यांचा निरोप घेतल्यानंतर आम्ही समुद्रमार्गे
निघालो. आणि सरळ प्रवास करीत कोस येथे

आलो. दुसऱ्या दिवशी आम्ही रुदास गेलो. तेथून आम्ही पातरा येथे गेलो. 2तेथे फेनीकेला जाणारे जहाज आम्हांला आढळले. तेव्हा आम्ही जहाजात बसून पुढे निघालो. 3तेव्हा कुप्र आमच्या नजरेत आले. परंतु ते डाव्या अंगाला टाकून आम्ही थेट सूरीया देशाला रवाना झालो व सोर येथे उतरलो. कारण तेथे जहाजातील माल उतरावयाचा होता. 4तेथे येशूचे काही शिष्य आम्हाला आढळले. आणि आम्ही त्यांच्याबरोबर सात दिवस राहिलो. पवित्र आत्म्याच्या सूचनेवरून त्यांनी पौलाला असे सांगितले की, त्याने यरुशलेमला जाऊ नये 5आमच्या भेटीचे दिवस संपत आल्यावर आम्ही तेथून निघून आमचा पुढील प्रवास परत सुरू केला. त्यावेळी तेथील बंधुजन आपल्या पत्नी, मुलांच्याबरोबर आमच्यासह शहराबाहेर आले व तेथील समुद्रकिनाऱ्यावर आम्ही गुडघे टेकले व प्रार्थना केली. 6मग एकमेकांचा निरोप घेऊन आम्ही जहाजात बसलो व ते लोक आपापल्या घरी गेले.

7सोर पासून आम्ही आमचा प्रवास सुरू केला व पोलेमा येथे उतरलो. आणि तेथील बंधुवर्गास भेटलो. त्यांच्याबरोबर एक दिवस राहिलो. 8आणि दुसऱ्या दिवशी निघून आम्ही कैसरीयास आलो व सुवार्तिक फिलिप्प याच्या घरी जाऊन राहिलो. तो निवडलेल्या सात सेवकांपैकी* एक होता. 9त्याला चार मुली होत्या. त्यांची लग्ने झालेली नव्हती. या मुलींना देवाच्या गोष्टी (भविष्याविषयीचे) सांगण्याचे दान होते. 10त्या बंधूच्या बरोबर बरेच दिवस राहिल्यावर अगब नावाचा संदेष्टा यहूदीयाहून तेथे आला. 11त्याने आमची भेट घेऊन पौलाच्या कमरेचा पट्टा मागून घेतला. त्याने स्वत:चे हात व पाय बांधले आणि तो म्हणाला, “पवित्र आत्मा असे महणतो: हा पट्टा ज्या मनुष्याच्या कमरेचा आहे, त्याला यरुशलेमा येथील यहूदी लोक असेच बांधतील व यहूदीतरांच्या हाती देतील.”

12आम्ही व तेथील सर्वांनी ते शब्द ऐकले. तेव्हा आम्ही व इतर लोकांनी पौलाला कळकळीची विनंति केली की, त्याने यरुशलेमला जाऊ नये. 13पण पौल म्हणाला, “तुम्ही हे काय करीत आहा, असे रडून तुम्ही मला हळवे बनवीत आहात काय? मी फक्त बांधून घेण्यासाठीच नव्हे तर प्रभु येशूच्या नावासाठी यरुशलेममध्ये मरायलादेखील तयार आहे.”

14यरुशलेमापासून दूर राहण्यासाठी आम्ही त्याचे मन वळवू शकलो नाही. म्हणून आम्ही त्याला विनंति करायची सोडली आणि म्हटले, “प्रभूच्या इच्छेप्रमाणे होवो.”

15त्यानंतर आम्ही तयार झालो आणि यरुशलेमला निघालो. 16कैसरीया येथील येशूचे काही शिष्य आमच्याबरोबर आले आणि आम्हांला म्नासोनकडे घेऊन गेले. कारण त्याच्याकडेच आम्ही राहणार होतो. तो (म्नासोन) कुप्रचा होता. तो सुरुवातीच्या काळात प्रथम शिष्य झालेल्यांपैकी एक होता.

## पौल याकोबाची भेट घेतो

17आम्ही जेव्हा यरुशलेमला पोहोंचलो, तेव्हा तेथील बंधुजनांनी मोठ्या आनंदाने आमचे स्वागत केले. 18दुसऱ्या दिवशी पौल आमच्यासह याकोबाला भेटायला आला. तेव्हा सर्व वडीलजन हजर होते. 19पौल त्यांना भेटला. नंतर त्याच्या हातून देवाने यहूदीतर लोकांत कशीकशी सेवा करून घेतली, याविषयी क्रमवार सविस्तर माहिती सांगितली. 20जेव्हा त्यांनी हे ऐकले तेव्हा त्यांनी देवाचा गौरव केला. आणि ते त्याला म्हणाले, “बंधु, तू पाहशील की हजारो यहूदी विश्वासणारे झालेत. पण त्यांना असे वाटते की, मोशेचे नियम पाळणे फार महत्त्वाचे आहे. 21या यहूदी लोकांनी तुझ्याविषयी ऐकले आहे की, जे यहूदी इतर देशांत राहतात त्यांना तू मोशेचे नियम पाळू नका असे सांगतोस. तसेच आपल्या मुलांची सुंता करू नका असे सांगतो व आपल्या चालीरीति पाळू नका असे सांगतो. 22मग आता काय केले पाहिजे? तू येथे आला आहेस हे त्यांना नक्की कळेल.

23तेव्हा आता आम्ही सांगतो तसे कर: आमच्यातील चार लोकांनी नवस केला आहे. 24त्या चौघांना घे व स्वत:चे त्यांच्यासह शुद्धीकरण करून घे. त्या चौघांना त्यांच्या डोक्याचे मुंडण करता यावे म्हणून त्यांचा खर्च तू कर. मग सर्वांना हे समजेल की, त्यांनी जे काही तुझ्याबद्दल ऐकले आहे ते खरे नाही, उलट तू नियमशास्त्राचे पालन करतोस हे दिसेल.

25जे विदेशी विश्वासणारे आहेत त्यांना आम्ही पत्र लिहिले आहे. ते असे

‘मूर्तीला वाहिलेले अन्न त्यांनी खाऊ नये.
रक्त अगर गुदमरून मारलेले प्राणी
त्यांनी खाऊ नयेत
अनैतिक कृत्ये करू नयेत.’”

26मग पौलानेच त्या चार लोकांना आपल्याबरोबर घेतले. दुसऱ्या दिवशी शुद्धीकरणाच्या विधीमध्ये तो सहभागी झाला. मग तो मंदिरात गेला. शुद्धीकरणाचे दिवस केव्हा संपतील हे जाहीर केले. शेवटच्या दिवशी प्रत्येकासाठी अर्पण देण्यात येईल.

27सात दिवस जवळ जवळ संपत आले होते. परंतु आशियातील काही यहूदी लोकांनी पौलाला मंदिरात पाहिले. त्यांनी लोकांना भडकाविले व त्याला (पौलाला) धरले. 28ते मोठ्याने ओरडून म्हणाले, “इस्राएलच्या लोकांनो, मदत करा! हाच तो मनुष्य आहे, जो सर्व लोकांना सगळीकडे आपल्या लोकांविरुद्ध, आपल्या नियमांविरुद्ध व या जागेबद्दल शिकवीत आहे, आणि आता त्याने विदेशी लोकांना देखील मंदिरात आणले आहे, आणि ही पवित्र

---

**सेवक** सात लोक ज्यांची खास कामाकरिता नेमणूक झाली होती. (प्रे. कृ. 6:1-6)

जागा विटाळविली आहे." 29ते असे म्हणाले, कारण
इफिसच्या त्रफिमला त्यांनी पौलाबरोबर यरुशलेम येथे
पाहिले होते. त्रफिम यहूदी नव्हता, तो ग्रीक होता. लोकांना
वाटले, पौलानेच त्याला मंदिरात नेले आहे.

30सर्व शहर खवळून उठले. सगळे लोक धावू लागले.
त्यांनी पौलाला पकडले व मंदिरातून बाहेर ओढून काढले.
लगेच दारे बंद करण्यात आली. 31ते त्याला ठार मारण्याचा
प्रयत्न करीत असतानाच रोमी सैन्याच्या सरदाराकडे बातमी
गेली की, शहरात सगळीकडे गोंधळ उडालेला आहे.
32ताबडतोब त्याने काही शिपाई व काही शताधिपती घेतले.
व तो यहूदी जेथे पौलाला मारीत होते, तेथे धावत गेला.
जेव्हा यहूदी लोकांनी रोमी सरदाराला व सैन्याला पाहिले
तेव्हा त्यांनी पौलाला मारण्याचे थांबविले. 33मग सरदार
पौलाकडे आला व त्याला अटक केली व त्याला
साखळदंडानी बांधण्याचा आदेश दिला. मग सरदाराने पौल
कोण आहे व त्याने काय केले आहे याविषयी विचारले.
34गर्दीतून वेगवेगळ्या प्रकारचे आवाज ऐकू येऊ लागले.
गोंधळामुळे व ओरडण्यामुळे सरदाराला सत्य काय आहे
हे जाणून घेता येईना. म्हणून सरदाराने शिपायांना हुकूम
दिला की, पौलाला इमारतीत घेऊन जावे. 35जेव्हा पौल
इमारतीच्या पायऱ्यांजवळ आला तेव्हा शिपायांना त्याला
उचलून आत न्यावे लागले. 36कारण जमाव हिंसक बनत
चालला होता. जमाव त्याच्यामागे चालला होता व ओरडत
होता, "त्याला जिवे मारा!"

37शिपाई पौलाला इमारतीत घेऊन जाणार इतक्यात
पौल सरदाराला म्हणाला, "मी काही बोलू शकतो काय?"
तो सरदार म्हणाला, "तुला ग्रीक बोलता येते काय? 38मग
मला वाटते, तो मनुष्य तू नाहीस. मला वाटले इजिप्तच्या
ज्या मजुराने काही दिवसांपूर्वी बंड करून सरकारला
त्रास देण्याचा प्रयत्न केला, तोच तू आहेस. त्या इजिप्तच्या
मनुष्यांने चार हजार दहशतवाद्यांना अरण्यात नेले."

39पौल म्हणाला, "किलकिया प्रांतातील तार्सस नगरात
राहणारा मी एक यहूदी आहे. मी एका महत्त्वाच्या शहराचा
नागरिक आहे. मी तुम्हांला विनवितो, मला लोकांशी
बोलू द्या."

40जेव्हा सरदाराने त्याला बोलण्याची परवानगी दिली
तेव्हा तो पायऱ्यांवर उभा राहिला आणि आपल्या हाताने
त्याने लोकांना शांत राहण्यास सांगितले. जेव्हा सगळीकडे
शांतता पसरली तेव्हा पौल हिब्रू भाषेत बोलू लागला:

### पौल लोकांसमोर भाषण करतो

22 "बंधूनो व वडीलजनांनो, "मी माझ्या बचावासाठी
जे काही सांगतो ते ऐका." 2जेव्हा लोकांनी
पौलाला हिब्रू भाषेत बोलताना ऐकले तेव्हा ते अधिकच
शांत झाले. पौल म्हणाला, 3"मी एक यहूदी आहे. आणि
किलिकीया प्रांतातील तार्स येथे माझा जन्म झाला. परंतु
याच शहरात मा लहानाचा मोठा झालो. आपल्या पूर्वजांच्या
नियमांचे सविस्तर शिक्षण मी गमालीएल यांच्या पायाजवळ
बसून घेतले. जसे तुम्ही आज देवाविषयीच्या आवेशाने
भरलेले आहात तसाच मी देखील देवाविषयीच्या आवेशाने
भरलेला होतो. 4या मार्गाचा (ख्रिस्ती चळवळीचा) पुरस्कार
करणाऱ्यांचा मी त्यांच्या मरणापर्यंत छळ केला. मी स्त्री
व पुरुषांना अटक करून तुरुंगात टाकले. 5याची मुख्य
याजक व धर्मसभेचे सर्व वडीलजन साक्ष देतील.
त्यांच्याकडून दिमिष्कातील त्यांच्या बंधुजनांच्या नावाने
मी पत्रे घेतली. आणि तेथे ह्या मार्गाचे (ख्रिस्ती) जे लोक
होते, त्यांना कैदी म्हणून यरुशलेमास घेऊन येणार होतो,
यासाठी की त्यांना शिक्षा व्हावी.

### पौल त्याचा पालट कसा झाला हे सांगतो

6"तेव्हा असे झाले की, मी प्रवास करीत दिमिष्क
शहराजवळ आलो असताना दुपारच्या वेळी माझ्याभोवती
आकाशातून लख्ख प्रकाश पडला. 7मी जमिनीवर पडलो.
आणि मी एक वाणी माझ्याशी बोलताना ऐकली. 'शौला,
शौला, माझा छळ तू का करतोस? 8मी उत्तर दिले, 'प्रभु,
तू कोण आहेस?' तो मला म्हणाला, 'तू ज्याचा छळ करीत
आहेस तो नासरेथचा येशू मी आहे.' 9जे माझ्याबरोबर
होते त्यांनी प्रकाश पाहिला, पण जो आवाज माझ्याशी
बोलत होता तो त्यांना ऐकू आला नाही. 10मी म्हणालो,
'प्रभु मी काय करु?' आणि प्रभु मला म्हणाला, 'ऊठ
आणि दिमिष्कात जा. तेथे तुला जे काम नेमून देण्यात
आले आहे ते सांगण्यात येईल. 11त्या प्रकाशामुळे मला
काही दिसेनासे झाले. तेव्हा माझ्या सोबत्यांनी मला हाताला
धरून नेले आणि मी दिमिष्कला पोहोंचलो.

12"नियमशास्त्राचे भक्तिभावाने पालन करणारा हनन्या
नावाचा एक मनुष्य होता. तेथे राहणारे सर्व यहूदी
त्याच्याबद्दल चांगले बोलत. 13तो माझ्याकडे आला, आणि
माझ्याजवळ उभा राहून तो म्हणाला, 'बंधु शौल, तू पुन्हा
पाहू लागशील!' आणि त्याच घटकेला मला दिसू लागले.
14तो म्हणाला, 'आपल्या पूर्वजांच्या (वाडवडिलांच्या) देवाने
तुला निवडले आहे. यासाठी की त्याची इच्छा तुला कळावी.
त्या धार्मिकाला तू पहावेस. आणि त्याच्या तोंडचे शब्द
तुला ऐकायला मिळावेत. 15कारण तू जे काही पाहिलेस
आणि ऐकलेस, याविषयी तू त्याचा सर्वांसमोर साक्षीदार
होशील. 16मग आता, कशाची वाट पाहतोस? ऊठ, आणि
बाप्तिस्मा घे व तुझी पापे धुवून टाक. येशूवर विश्वास
ठेवून हे कर.'

17"मग असे झाले की, जेव्हा मी यरुशलेमला परत
आलो, आणि मंदिरात प्रार्थना करीत होतो, तेव्हा मला
दृष्टान्त झाला. 18मी येशूला पाहिले, आणि येशू मला
म्हणाला, 'घाई कर! यरुशलेम ताबडतोब सोड! येथील
लोक माझ्याविषयीचे सत्य स्वीकारणार नाहीत.' 19पण
मी म्हणालो, 'प्रभु जे लोक तुझ्यावर विश्वास ठेवीत होते,
त्यांना अटक करून मारण्यासाठी मी जात असे, हे या

लोकांना माहीत आहे. 20आणि जेव्हा तुझा साक्षीदार स्तेफन
याचे रक्त सांडले तेव्हा तेथे उभा राहून मी त्याला संमति
दर्शवीत होतो. आणि ज्या लोकांनी स्तेफनाला मारले
त्यांचे कपडे मी राखीत होतो.' 21तेव्हा प्रभु मला म्हणाला,
'जा! मी तुला दूरवरच्या यहूदीतर विदेशी लोकांकडे
पाठवीन.'"

22येथपर्यंत यहूदी लोकांनी पौलाचे बोलणे ऐकले मग ते
मोठमोठ्याने ओरडून म्हणू लागले, "अशा मनुष्याला
पृथ्वीवरून नाहीसे केले पाहिजे! तो जिवंत राहण्याच्या
लायकीचा नाही!" 23ते मोठमोठ्याने ओरडत होते, आपल्या
अंगावरील कपडे काढून फेकीत होते, आणि हवेत धूळ
उधळीत होते. हे पाहून सरदाराने पौलाला किल्ल्यात
नेण्याची आज्ञा केली. 24त्याने शिपायांना सांगितले, पौलाला
चाबकाने मारा. अशा प्रकारे हे लोक पौलाविरुद्ध का
ओरड करीत आहेत हे सरादाराला जाणून घ्यायचे होते.
25परंतु जेव्हा पौलाला चाबकाने मारण्यासाठी बाहेर काढले.
तेव्हा पौल जवळ उभ्या असलेल्या शताधिपतीला म्हणाला,
"ज्याच्यामध्ये काही अपराध आढळत नाही अशा रोमी
नागरिकाला तुमचे हे चाबकाचे मारणे कायदेशीर ठरते
काय?"

26जेव्हा शताधिपतीने हे ऐकले तेव्हा तो सरदाराकडे
गेला आणि म्हणाला, "तुम्ही काय करीत आहात? तो
मनुष्य तर रोमी नागरिक आहे." 27सरदार पौलाकडे
आला व म्हणाला, "मला सांग, तू रोमी नागरिक आहेस
काय?" पौल म्हणाला, "होय."

28शताधिपती म्हणाला, "रोमी नागरिकत्व मिळ
विण्यासाठी मला पुष्कळ पैसे द्यावे लागले."

पौल म्हणाला, "मी जन्मत:च रोमी नागरिक आहे."

29जे लोक त्याला प्रश्न विचारणार होते, ते ताबडतोब
मागे सरकले. सरदार घाबरला, कारण त्याने पौलाला
बांधले होते, व पौल हा रोमी नागरिक होता. त्यामुळे तो
घाबरला.

## पौल यहूदी पुढाऱ्यांशी बोलतो

30दुसऱ्या दिवशी यहूदी लोक पौलावर नेमके कशामुळे
दोष ठेवीत होते हे समजून घेण्यासाठी सरदाराने त्याला
मोकळे सोडले. मग त्याने मुख्य याजक व धर्मसभेचे
सभासद यांना एकत्र जमण्याची आज्ञा केली. मग त्याने
पौलाला आणून त्यांच्यापुढे उभे केले.

23 पौल यहूदी धर्मसभेच्या सभासदांकडे रोखून पाहत
म्हणाला, "माझ्या बंधूनो, मी आजपर्यंत चांगला
विवेकभाव बाळगून देवासमोर माझे जीवन जगत आलो
आहे." 2तेव्हा मुख्य याजक हनन्या याने पौलाच्या जवळ
उभे राहिलेल्यांना पौलाच्या थोबाडीत मारण्यास सांगितले.
3पौल हनन्याला म्हणाला, "सफेती लावलेल्या भिंतीसारख्या
माणसा, देव तुला मारील! त्या ठिकाणी बसून
नियमशास्त्राप्रमाणे माझा न्याय करतो आणि तरीही
नियमशास्त्राच्या विरुद्ध मला थोबाडीत मारण्याचा आदेश
देतोस?" 4जे लोक पौलाच्या जवळ उभे होते ते म्हणाले,
"देवाच्या मुख्य याजकाविरुद्ध तू असे बोलू शकत नाहीस.
तू त्याचा अपमान करतोस काय?"

5पौल म्हणाला, "बंधूनो, तो मनुष्य मुख्य याजक आहे
हे मला माहीत नव्हते. कारण असे लिहिले आहे की, 'तू
आपल्या शासन करणाऱ्याविरुद्ध बोलू नकोस.'"*

6जेव्हा पौलाच्या लक्षात आले की, धर्मसभेतील एक
गट सदूकी आहे तर दुसरा परूशी. तेव्हा पौल मोठ्याने
ओरडून सर्व धर्मसभेपुढे म्हणाला, "बंधूनो, मी एक परुशी
आहे, परूश्याचा मुलगा आहे! मेलेल्यांच्या पुन्हा
उठण्यासंबंधी माझी जी आशा आहे, त्यामुळे माझ्यावर हा
चौकशीचा प्रसंग आला आहे."

7पौलाने असे म्हणताच, परूशी व सदूकी या दोन गटांमध्ये
कलह सुरू झाला. आणि धर्मसभेत फूट पडली. 8(सदूकी
असे म्हणतात की, मृतांचे पुनरुत्थान नाही आणि देवदूत
व आत्मे नसतात, परूशी दोन्हीवर विश्वास ठेवतात.)
9सर्व यहूदी मोठमोठ्याने ओरडून बोलू लागले. तेव्हा
नियमशास्त्राचे काही शिक्षक उभे राहिले व जोरदारपणे
आपले म्हणणे मांडू लागले. ते म्हणाले, "या मनुष्यात
आम्हांला काहीच दोष आढळत नाही. कदाचित एखादा
देवदूत किंवा आत्मा त्याच्याशी बोलला असेल!"

10वादविवादाला हिंसक रूप येऊ लागले. तेव्हा लोक
पौलाचे कदाचित तुकडे तुकडे करतील, अशी सरदाराला
भीति वाटू लागली. म्हणून त्याने शिपायांना पौलाला तेथून
घेऊन जाण्याची आज्ञा केली. व त्याला किल्ल्यात घेऊन
जाण्यास सांगितले.

11त्या रात्री प्रभु पौलाजवळ उभा राहिला. आणि म्हणाला,
"धीर धर! कारण जशी तू माझ्याविषयी यरुशलेममध्ये
साक्ष दिलीस तशी तुला माझ्याविषयी रोम येथे साक्ष द्यावी
लागेल."

12दुसऱ्या सकाळी काही यहूदी लोकांनी एकजूट करून
कट रचला, त्यांना पौलाला जिवे मारायचे होते. यहूदी
लोकांनी अशा प्रकारची शपथ वाहिली की, पौलाला
ठार मारेपर्यंत अन्नपाणी सेवन करायचे नाही. 13अशा
प्रकारे कट करणाऱ्यांची संख्या चाळीस होती. 14या यहूदी
पुढाऱ्यांनी जाऊन मुख्य याजक व वडीलजनांशी बोलणी
केली. यहूदी म्हणाले, "आम्ही एक गंभीर शपथ घेतली
आहे. पौलाला मारेपर्यंत आम्ही काही खाणार वा पिणार
नाही! 15म्हणून तुम्ही आता असे करा: तुम्ही (मुख्य
याजक) व धर्मसभेने अशा प्रकारचा विनंति अर्ज सरदाराला
लिहा की, पौलासंबंधी अधिक बारकाईने चौकशी करायची
असल्याने पौलाला आमच्याकडे घेऊन यावे. तो येथे
येण्याअगोदरच आम्ही त्याला ठार मारण्याच्या तयारीत
असू."

---

**तू आपल्या ... नकोस** निर्गम 22:28

[16]पण पौलाच्या बहिणीच्या मुलाने या सर्व गोष्टी ऐकल्या व तो किल्ल्यात गेला. त्याने पौलाला सर्व काही सांगितले. [17]पौलाने एका शताधिपतीला बोलाविले आणि सांगितले, या तरुणाला सरदाराकडे घेऊन जा. कारण सरदाराला सांगण्यासारखे याच्याकडे काहीतरी आहे. [18]मग त्याने त्या मुलाला घेतले व सरदाराकडे गेला व त्याला म्हणाला, “कैदेत असलेल्या पौलाने मला बोलावून या तरुणाला तुमच्याकडे घेऊन जायला सांगितले. कारण हा तुम्हांला काही तरी सांगणार आहे.”

[19]सरदाराने त्या तरुणाचा हात धरून बाजूला नेले आणि तो त्याला म्हणाला, “तू मला काय सांगणार आहेस?”

[20]तो मुलगा म्हणाला, “यहूदी लोकांनी असे ठरविले आहे की, पौलाला घेऊन तुम्हांला उद्या धर्मसभेपुढे यायला सांगायचे, व अशा बहाण्याने त्याला आणायचे की, जणू काय त्यांना पौलाची अधिक बारकाईने चौकशी करायची आहे. [21]पण त्यांच्यावर विश्वास ठेवू नका! कारण चाळीस लोकांहून अधिक लोक लपून बसणार आहेत व पौलाला गाठून मारणार आहेत. त्यांनी अशा प्रकारची शपथ वाहिली आहे की, जोपर्यंत ते पौलाला मारणार नाहीत तोपर्यंत कोणीही काहीही खाणार वा पिणार नाही. म्हणून ते आता तुमच्या होकाराची वाट पाहत अगदी तयारीत आहेत.”

[22] “तू मला ह्यांविषयी सांगितले आहेस, हे कोणाला सांगू नको!” असे म्हणून सरदाराने त्याला जाण्याची आज्ञा केली.

## पौलाला कैसरीया येथे पाठवितात

[23]मग सरदाराने दोघा शताधिपतींना बोलाविले. आणि म्हणाला, “दोनशे शिपाई कैसरीयाला जाण्यासाठी तयार ठेवा. तसेच सत्तर घोडेस्वार व दोनशे भालेदार रात्री नऊ वाजता येथून जाण्यासाठी तयार ठेवा! [24]खोगीर घातलेला घोडा पौलासाठी तयार ठेवा. आणि त्याला राज्यपाल फेलीक्स यांच्याकडे सुखरूप न्या.” [25]सरदाराने एक पत्र लिहिले. त्यात असे लिहिलेले होते:

[26]क्लौद्य लुसिया याजकडून,
राज्यपाल फेलिक्स महाराज यांस,
सलाम.

[27]या मनुष्याला यहूदी लोकांनी धरले होते. ते त्याला ठार मारण्याच्या बेतात होते. पण तेवढ्यात माझ्या शिपायांसह मी तेथे गेलो व त्याला सोडविले. तो रोमी नागरिक आहे हे समजल्यावरून मी त्याची सुटका केली. [28]यहूदी लोक त्याच्यावर का दोषारोप करीत आहेत हे कळावे म्हणून मी त्याला धर्मसभेपुढे घेऊन गेलो. [29]यहूदी लोकांच्या नियमशास्त्राच्या प्रश्नावरून त्यांनी त्याला दोषी ठरविले हे मला दिसून आले. पण त्याच्यावर असा कोणताही आरोप नव्हता, ज्याची शिक्षा मरणदंड किंवा तुरूंगवास होईल. [30]जेव्हा या मनुष्याला जिवे मारण्याचा कट रचला गेल्याचे मला कळले तेव्हा मी त्याला ताबडतोब आपल्याकडे पाठविले.

[31]शिपायांनी त्यांना मिळालेल्या हुकुमाचे पालन केले. ते पौलाला घेऊन रात्रीच अंतिपत्रिसास गेले. [32]दुसऱ्या दिवशी घोडेस्वार पौलासोबत कैसरियास गेले. व शिपाई किल्ल्यात परतले. [33]जेव्हा पौल व घोडेस्वार कैसरियास पोहोंचले, तेव्हा त्यांनी राज्यपालाला पत्र दिले. व पौलाला त्याच्या स्वाधीन केले. [34]राज्यपालाने ते पत्र वाचले. व पौल कोणत्या प्रांताचा आहे हे विचारले. जेव्हा त्याला समजले की, तो किलिकीयाचा आहे, तेव्हा तो म्हणाला, [35]“तुझ्यावर दोष ठेवणारे आले म्हणजे तुझे ऐकेन.” पौलाला हेरोदाच्या* राजवड्यात पहाऱ्यात ठेवावे असा हुकूमराज्यपालाने दिला.

## यहूदी लोक पौलावर दोष ठेवतात

24 पाच दिवसांनतर हनन्या कैसरिया येथे गेला. हनन्या मुख्य याजक होता. हनन्याने आपल्याबरोबर काही यहूदी वडीलजन आणि तिर्तुल्ल नावाचा वकील यांना कैसरिया येथे नेले; त्यांनी राज्यपालापुढे पौलावरील दोषारोप सादर केले. [2]जेव्हा पौलाला आत नेण्यात आले तेव्हा तिर्तुल्ल याने पौलावरील आरोप सांगण्यास सुरुवात केली.

तो म्हणाला, “फेलिक्स महाराज, तुमच्यामुळे आम्हांला फार शांतता लाभली असून, तुमच्या दूरदृष्टीमुळे जरूर असलेल्या सुधारणासुद्धा या देशात झाल्या आहेत. [3]फेलिक्स महाराज, आम्ही हे सर्व प्रकारांनी व सर्व ठिकाणी हे कृतज्ञतेने मान्य करतो. [4]परंतु तुमचा अधिक वेळ न घेता, आम्ही जे काही तुम्हांला थोडक्यात सांगतो, ते ऐकून घेण्याची कृपा करावी, ही विनंति करतो. [5]हा मनुष्य त्रास देणारा आहे. जगात सगळीकडे यहूदी लोकांना त्याने त्रास दिलेला आहे. तो नासरेथकराच्या पंथाचा पुढारी आहे. [6–7]त्याने देवाचे मंदिर विटाळण्याचा प्रयत्न केला. परंतु आम्ही त्याला धरले* [8]या गोष्टी खऱ्या आहेत की नाही हे तुम्ही ठरवू शकता. त्याला काही प्रश्न विचारा.” [9]इतर यहूदी लोकांनी याला मान्यता दिली व सांगितले की, “हे सर्व खरे आहे!”

[10]जेव्हा राज्यपालाने पौलाला बोलण्यास खुणावले, तेव्हा पौल म्हणाला, “फेलिक्स महाराज, बरीच वर्षे या देशाचे

---

**हेरोद** पहिला हेरोद (महान) यहूदा प्रांतातील (खि. पू. 40-4)

**वचने 6-8** काही ग्रीक प्रतींमध्ये (6ब-8अ) जोडलेले आढळते. “आणि आमच्या नियमशास्त्राप्रमाणे या मनुष्याला आम्हांला न्याय करायचा होता. पण लुसिया अधिकारी आला व बळाचा वापर करून याला आमच्यातून घेऊन आला. आणि लुसियाने त्याच्या माणासांना तुमच्याकडे जाण्याची व आम्हांवर आरोप ठेवण्याची आज्ञा केली.”

न्यायाधीश म्हणून आपण काम करीत आहात, म्हणून मला आपणा समोर स्वत:चा बचाव करायला आनंद वाटत आहे. 11यरुशलेम येथे उपासनेसाठी जाऊन मला बारापेक्षा जास्त दिवस झालेले नाहीत, ही गोष्ट खरी आहे की नाही, हे आपण पडताळून पाहू शकता 12मी मंदिरात कोणाशी वाद घालताना, सभास्थानात किंवा बाहेर कोठे कोणाला चिथावून देताना या लोकांना आढळलो नाही. 13हे लोक माझ्यावर जो आरोप ठेवीत आहेत, तो त्यांना तुमच्यासमोर सिद्ध करता येणार नाही. 14मात्र मी हे आपल्यासमोर कबूल करतो: या मार्गाने (ख्रिस्ती मार्गाने) जाऊन मी आपल्या वाडवडिलांच्या देवाची उपासना करतो त्या मार्गाला हे लोक पंथ म्हणतात. जे काही नियमशास्त्रात सांगितले आहे आणि जे काही आमच्या संदेष्ट्यानी सांगितलेले आहे. त्या सर्वांवर मी विश्वास ठेवतो. 15आणि धार्मिकांचे व वाईटांचेही मरणातून पुन्हा उठणे होणार आहे, ही गोष्ट हे लोकही माझ्याबरोबर मानतील अशी मी देवामध्ये आशा बाळगतो. 16यासाठी देवापुढे आणि मनुष्यांपुढे आपला विवेक शुद्ध असावा याचा मी नेहमी आटोकाट प्रयत्न करीत असतो.

17"अनेक वर्षे दूर राहिल्यानंतर माझ्या लोकांतील गरीबांना दान देऊन यरुशलेममध्ये स्वत:साठी अर्पण करावे म्हणून मी मंदिरात जाऊन हा विधी करीत असताना, शुद्धीकरण झालेला असा मी त्यांस आढळलो. 18तेथे मी कसलाही जमाव केला नव्हता अगर दंगा ही केला नव्हता 19पण आशियातील काही लोक तेथे हजर होते. 20जर त्यांना माझ्याविरुद्ध काही म्हणायचे असेल, तर त्यांनी आपणांपुढे हजर होऊन मला दोषलावावा. किंवा मी जेव्हा धर्मसभेपुढे उभा राहिलो, त्यावेळी माझ्यामध्ये काही चूक त्यांना आढळली असेल, तर त्यांनी तसे सांगावे. 21मी या लोकांमध्ये उभे राहून मोठ्याने म्हणालो की, 'मेलेल्यांतून पुन्हा उठण्याच्या प्रश्नावरून माझा न्यायनिवाडा होत आहे.' या एका गोष्टीशिवाय दुसरा आरोप माझ्यावर करायचा असेल तर यांनी तसे सांगावे."

22फेलिक्सला (ख्रिस्ती) मार्गाविषयी चांगली माहिती असल्याने त्याने सुनावणी थांबवली. फेलिक्स म्हणाला, "जेव्हा लुसिया सरदार येथे येईल, तेव्हा तुझ्या प्रकरणाचा काय निर्णय घ्यायचा ते मी ठरवीन." 23मग फेलिक्सने शताधिपतीला आज्ञा केली की, पौलाला पहाऱ्यात ठेवावे, परंतु त्याला थोडी मोकळीक देण्यात यावी. आणि असाही हुकूम केला की, त्याच्या मित्रांना त्याची गरज भागविण्यास मना करू नये.

## पौल फेलिक्स व त्याच्या पत्नीशी बोलतो

24काही दिवसांनंतर फेलिक्स आपली पत्नी द्रुसिल्ला हिच्याबरोबर आला. ती एक यहूदी स्त्री होती. फेलिक्सने पौलाला बोलावणे पाठविले. आणि त्याने येशू ख्रिस्तावरील विश्वासाबाबत पौलाचे बोलणे ऐकून घेतले. 25परंतु जेव्हा पौलाने धार्मिकपणा, आत्मसंयमन, आणि होणाऱ्या न्यायाविषयी सांगितले, तेव्हा फेलिक्सला भीति वाटली. तो पौलाला म्हणाला, "आता तू जा, परत वेळ मिळाला म्हणजे मी तुला बोलावीन." 26यावेळी पौल त्याला पैसे देऊ करील असे त्याला वाटत होते म्हणून फेलिक्स त्याला वरचेवर बोलावणे पाठवत असे आणि त्याच्याशी बोलत असे. 27दोन वर्षे झाल्यावर फेलिक्सच्या जागी पुर्क्य फेस्त हा राज्यपाल झाला. आणि यहूदी लोकांचे मन मोडण्याची फेलिक्सची इच्छा नव्हती, म्हणून त्याने जाण्यापूर्वी पौलाला तुरुंगातच ठेवले.

## पौल कैसराची भेट घेऊ इच्छितो

25 मग त्या प्रांतात फेस्त आला. आणि तीन दिवसांनी तो कैसरीयाहून वर यरुशलेमला गेला. 2मुख्य याजकांनी आणि यहूदी पुढाऱ्यांनी फेस्तच्या पुढे पौलावरील आरोप सादर केले. 3आणि पौलाला यरुशलेमला पाठवून द्यावे, अशी त्याला विनंति केली. पौलाला वाटेत ठार मारण्याचा ते कट करीत होते. 4फेस्तने उत्तर दिले, "पौल कैसरीया येथे बंदिवासात आहे आणि मी स्वत: लवकरच कैसरीयाला जाणार आहे. 5तुमच्यातील काही पुढाऱ्यांनी माझ्याबरोबर तिकडे खाली यावे, आणि जर त्या मनुष्याने काही चूक केली असेल तर त्याच्यावर दोषारोप ठेवावा."

6त्यांच्याबरोबर आठ ते दहा दिवस घालविल्यानंतर फेस्त खाली कैसरीयाला परत गेला. दुसऱ्या दिवशी फेस्त न्यायालयात बसला आणि त्याने आपल्यासमोर पौलाला हजर करण्याचा आदेश दिला. 7जेव्हा पौल तेथे हजर झाला, तेव्हा यरुशलेमहून तेथे आलेले यहूदी लोकही पौलाच्या सभोवती उभे राहिले. त्यांनी त्याच्यावर पुष्कळ गंभीर आरोप ठेवले, परंतु ते आरोप यहूदी लोक सिद्ध करू शकले नाहीत. 8पौल आपला बचाव करण्यासाठी असे म्हणाला, "मी यहूदी लोकांच्या नियमशास्त्राच्या, मंदिराच्या किंवा कैसराच्या विरुद्ध काही गुन्हा केलेला नाही."

9फेस्तला यहूदी लोकांना खूष करायचे होते म्हणून तो पौलाला म्हणाला, "यरुशलेम येथे जाऊन माझ्यासमोर तुझी चौकशी व्हावी अशी तुझी इच्छा आहे काय?"

10पौल म्हणाला, "मी आता कैसराच्या न्यायासनासमोर उभा असून त्याच्यासमोर माझा न्यायनिवाडा व्हावा, अशी माझी इच्छा आहे. मी यहूदी लोकांचा काहीही अपराध केलेला नाही, हे आपणांस चांगले माहीत आहे. 11मी जर काही गुन्हा केला असेल तर मला मरणदंड झाला पाहिजे. आणि त्यापासून सुटका व्हावी असा प्रयत्न मी करणार नाही. परंतु जे आरोप हे लोक माझ्यावर करीत आहेत, ते खरे नसतील तर मला कोणी यांच्या हाती देऊ शकणार नाही. मी आपले गाऱ्हाणे कैसरासमोर मांडू इच्छितो."

12यावर फेस्तने आपल्या सभेशी सल्लामसलत केली. मग त्याने पौलाला सांगितले, "तू कैसरापुढे आपला

न्यायनिवाडा व्हावा अशी इच्छा दाखविली आहे, म्हणून
तुला कैसरासमोर पाठविण्यात येईल."

## हेरोद अग्रिप्पासमोर पौल

13काही दिवसांनंतर फेस्ताचे स्वागत करण्याच्या हेतूने
राजा अग्रिप्पा* आणि बर्णीका* कैसरीयाला येऊन त्याला
भेटले. 14ती दोघे तेथे बरेच दिवस राहिल्यावर फेस्तने
पौलाचे प्रकरण राजाला समजावून सांगितले. तो म्हणाला,
"फेलिक्सने तुरुंगात ठेवलेला एक कैदी येथे आहे. 15जेव्हा
मी यरुशलेम येथे होतो, तेव्हा यहूदी लोकांचा मुख्य याजक
आणि वडीलजन यांनी त्याच्याविरुद्ध फिर्याद केली. आणि
त्याला दोषी ठरवावे अशी मागणी केली. 16वादी व प्रतिवादी
यांना एकमेकांसमोर आणल्याशिवाय आणि आरोपीला
आपला बचाव करण्याची संधि मिळेपर्यंत, त्याला इतरांकडे
सोपविण्याची रोमी लोकांची रीत नाही. असे मी यहूदी
लोकांना सांगितले. 17म्हणून ते जेव्हा माझ्याबरोबर येथे
आले, तेव्हा मी उशीर न करता दुसऱ्याच दिवशी
न्यायासनावर बसलो, आणि त्या मनुष्याला समोर
आणण्याची आज्ञा केली. 18त्याच्यावर आरोप करणारे
जेव्हा त्याच्याविरुद्ध बोलण्यास उभे राहिले, तेव्हा माझ्या
अपेक्षेप्रमाणे कसल्याही गुन्ह्याबाबत त्यांनी त्याच्यावर
आरोप केले नाहीत. 19उलट आपल्या धर्माविषयी आणि
कोणा एका मनुष्याविषयी ज्याचे नाव येशू आहे,
त्याच्यावरून यहूदी लोकांनी त्या माणसाशी वाद केला.
येशू हा जरी मेलेला असला, तरी पौलाचा असा दावा
आहे की, येशू जिवंत आहे. 20या प्रश्नाची चौकशी कशी
करावी हे मला समजेना. तेव्हा त्या यहूदी मनुष्याविरुद्ध
यहूदी लोकांचे जे आरोप आहेत, त्याबाबत त्याला यरुशलेम
येथे नेऊन त्याचा न्याय केला जावा अशी त्याची इच्छा
आहे काय, असे मी त्याला विचारले. 21सम्राटाकडून
आपल्या न्यायनिवाडा होईपर्यंत आपण कैदेत राहू असे
जेव्हा पौल म्हणाला, तेव्हा मी आज्ञा केली की, कैसराकडे
पाठविणे शक्य होईपर्यंत त्याला तुरुंगातच ठेवावे."

22यावर अग्रिप्पा फेस्तला म्हणाला, "मला स्वत:ला या
मनुष्याचे म्हणणे ऐकावेसे वाटते."

फेस्तने त्याला उत्तर दिले, "उद्या त्याचे म्हणणे तुम्ही
ऐकू शकाल."

23म्हणून दुसऱ्या दिवशी अग्रिप्पा आणि बर्णीका मोठ्या
थाटामाटात आले. व लष्करी सरदार व शहरातील मुख्य
नागरिकांसह दरबारात प्रवेश केला. तेव्हा फेस्तच्या
आज्ञेनुसार पौलाला तेथे आणण्यात आले. 24मग फेस्त
म्हणाला, "राजे अग्रिप्पा महाराज आणि आमच्याबरोबर
येथे उपस्थित असलेले सर्वजण, या मनुष्याला पाहा! याच्याच
विषयी यरुशलेम व कैसरिया येथील सर्व यहूदी लोकांनी
माझ्याकडे अर्ज दिलेला आहे. याला जिवंत राहू देऊ
नये, असा आकांत ते करतात. 25परंतु याला मरणदंड
द्यावा असे याने काहीही केले नाही, असे मला आढळून
आले. आणि त्याने स्वत:च आपणांला सम्राटाकडून
(कैसराकडून) न्याय मिळावा अशी मागणी केली, म्हणून
मी त्याला कैसरासमोर न्यायासाठी पाठविण्याचे ठरविले
आहे. 26परंतु सम्राटाला याच्याविषयी निश्चित असे
कळवावे, असे माझ्याकडे काही नाही. म्हणून मी याला
तुमच्यापुढे आणि विशेषत: राजा अग्रिप्पापुढे आणून उभे
केले आहे. ते अशाकरिता की, या चौकशीनंतर मला या
मनुष्याविषयी काहीतरी लिहिता यावे. 27शेवटी एखाद्या
कैद्याला कसलाही आरोप न ठेवता कैसराकडे पाठविणे
मला योग्य वाटत नाही."

## राजा अग्रिप्पापुढे पौल

26 अग्रिप्पा पौलाला म्हणाला, "तुला तुझी बाजू
मांडायला परवानगी आहे." यावर पौलाने आपला
हात उंच करून आपल्या बचावाचे भाषण सुरू केले:
2"अग्रिप्पा महाराज, मी स्वत:ला धन्य समजतो कारण
मला आपल्यासमोर माझ्याविरुद्ध केलेल्या आरोपांचा
बचाव करण्याची संधि आज मिळाली. 3विशेषत: यहूदी
चालीरीति आणि प्रश्न इत्यादी गोष्टींची आपणांला चांगल्या
प्रकारे माहिती असल्याने तर हे जास्तच खरे म्हणावे
लागेल. तेव्हा आपण माझे बोलणे धीराने ऐकून घ्यावे
अशी मी विनंति करतो.

4"मी माझे जीवन तरुणपणापासून माझ्या प्रांतात व
यरुशलेमात कशा रीतिने जगत आलो हे सर्व यहूदी लोकांना
चांगले माहीत आहे. 5ते मला बऱ्याच काळापासून
ओळखतात. आणि त्यांची इच्छा असेल तर मी एक परूशी
म्हणजे आमच्या यहूदी धर्माच्या एका कट्टर गटाचा सभासद
या नात्याने कसा जगत आलो याविषयी ते साक्ष देऊ
शकतील. 6आता मी आमच्या वाडवडिलांना देवाने जे
वचन दिले होते, त्याच्या आशेकरिता माझा न्याय व्हावा
यासाठी येथे उभा आहे. 7आपल्या देवाची रात्रंदिवस
कळकळीने उपासना करीत असताना हे जे वचन देवाने
दिले ते पुरे होण्याची आशा आमच्या बाराही वंशाना वाटत
आहे. या आशेमुळेच महाराज, यहूदी लोक माझ्यावर
दोषारोप करीत आहेत. 8देव मेलेल्यांना परत उठवितो,
असे तुमच्यापैकी कित्येकांना विश्वास न ठेवण्यासारखे
का वाटावे. 9नासरेथच्या येशूच्या नावाविरुद्ध जे जे काही
करता येईल ते ते मी करावे असे मलादेखील वाटत होते.
10आणि नेमके हेच मी यरुशलेम येथे केले. कारण मुख्य
याजकांकडून मला तसा अधिकार मिळाला होता. म्हणून
मी देवाच्या अनेक संतांना तुरुंगात टाकले. आणि हे जे
संतगण जिवे मारले गेले, त्यांच्याविरुद्ध मी माझे मत
नोंदविले. 11अनेक सभास्थानात मी त्यांना शिक्षा केली.

---

**अग्रिप्पा** दुसरा हेरोद. महान हेरोद अग्रिप्पाचा हा नातू.

**बर्णीका** अग्रिप्पाची बहिण, पहिल्या हेरोद अग्रिप्पाची ती सर्वांत
मोठी मुलगी होती.

आणि देवाविरुद्ध जबरीने वाईट भाषण करायला लावण्याचा मी प्रयत्न केला. या लोकांवरील माझा राग इतक्या पराकोटीला गेला होता की, मी त्यांचा छळ करण्याकरिता इतर शहरांमध्ये देखील जात असे.

## येशूचे दर्शन झाल्याचे पौल सांगतो

[12]"एकदा दिमिष्क शहराला जाण्यासाठी मुख्य याजकांनी मला अधिकार व परवानगी दिली तेव्हा महाराज,
[13]वाटेत भर दुपारच्या वेळी मी माझ्या व माझ्यासमवेत असणाऱ्यांच्या भोवती स्वर्गीय प्रकाश फाकलेला पाहिला. तो प्रकाश सूर्यापेक्षाही जास्त प्रखर होता.
[14]आम्ही सर्व खाली जमिनीवर पडलो आणि हिब्रू भाषेत माझ्याशी बोलताना एक वाणी मी ऐकली. ती वाणी म्हणाली, 'शौला, शौला, माझा छळ तू का करतोस? अणुकुचीदार काठीवर लाथ मारणे तुला हानिकारक आहे,'
[15]आणि मी म्हणालो, 'प्रभु, तू कोण आहेस?' प्रभूने उत्तर दिले, 'मी येशू आहे, ज्याचा तू छळ करीत आहेस.
[16]पण ऊठ आणि उभा राहा! या कारणांसाठी मी तुला दर्शन दिले आहे: तुला सेवक म्हणून नेमावे व जे काही तुला दाखविले व जे दाखवीन त्याचा साक्षीदार म्हणून तुला नेमावे.
[17]मी तुझी यहूदी व यहूदीतर विदेशी यांच्यापासून सुटका करीन. आणि यहूदीतर विदेशी लोकांकडे पाठवीन.
[18]यासाठी की, त्यांचे डोळे उघडावे व याविषयीचे सत्य काय आहे हे तू लोकांना दाखवून द्यावेस व त्यामुळे त्यांना त्यांच्या पापांची क्षमा मिळेल आणि माझ्यामध्ये विश्वासामुळे पवित्र झालेल्या लोकांमध्ये जागा मिळेल.' "

## पौल त्याच्या कामाविषयी सांगतो

[19]यासाठी, "अग्रिप्पा महाराज मला जो स्वर्गीय दृष्टान्त झाला, त्याचा मी आज्ञाभंग केला नाही.
[20]उलट पहिल्यांदा दिमिष्कातील आणि नंतर यरुशलेमातील, यहूदा प्रांतातील सर्व आणि यहूदीतर विदेशी लोकांनासुद्धा प्रभुच्या वचनाची साक्ष दिली. त्यांनी पश्चात्ताप करावा, देवाकडे वळावे आणि पश्चात्तापाला साजेल अशी कामे करावी असे मी त्यांना सांगितले.
[21]या कारणांमुळे मी मंदिरात असताना यहूदी लोकांनी मला धरले आणि जिवे मारण्याचा प्रयत्न केला. परंतु देवाने मला मदत केली म्हणून मी आज येथे उभा राहून समाजातील लहानथोरांना साक्ष देत आहे.
[22]जे काही पुढे होणार होते, त्याविषयी संदेष्ट्यांनी व मोशेने जे सांगितले त्यापेक्षा दुसरे मी सांगत नाही.
[23]त्यानुसार देवाचा अभिषिक्त जो ख्रिस्त (मशीहा) तो दु:ख सहन करील. आणि मेलेल्यांतून उठविला जाणाऱ्यांत तो पहिला असेल. यहूदी लोकांना तसेच इतर विदेशी लोकांना देव प्रकाशात नेईल."

## पौल अग्रिप्पाचे मन वळविण्याचा प्रयत्न करतो

[24]पौल आपल्या बचावासंबंधी बोलत असताना फेस्त त्याला मोठ्याने म्हणाला, "पौला, तू वेडा आहेस. जास्त ज्ञानामुळे तुला वेड लागले आहे!"

[25]पौलाने उत्तर दिले, "फेस्त महाराज, मी वेडा नाही; तर ज्या गोष्टी खऱ्या आहेत आणि अगदी योग्य आहेत, त्यांच्याविषयीच मी बोलत आहे.
[26]येथे हजर असलेल्या महाराजांना याविषयी चांगली माहिती आहे, आणि यामुळे मी त्यांच्याशी उघडपणाने बोलू शकतो. त्याच्या ध्यानातून काही सुटले नसेल, असे मला खात्रीने वाटते. मी हे म्हणतो, कारण ही गोष्ट एखाद्या कानाकोपऱ्यात झाली नाही.
[27]अग्रिप्पा महाराज, भविष्यावाद्यांनी जे लिहिले त्यावर तुमचा विश्वास आहे काय? तुमचा त्यावर विश्वास आहे हे मला नक्की माहीत आहे."

[28]यावर अग्रिप्पा म्हणाला, "एवढ्या थोड्या वेळात ख्रिस्ती होण्यासाठी तू माझे मन वळवू शकशील असे तुला वाटते काय?"

[29]पौलाने उत्तर दिले, "थोड्या वेळात म्हणा अगर जास्त वेळात म्हणा, मी जसा आहे तसे केवळ तुम्हीच नव्हे तर आज जे जे येथे बसून माझे बोलणे ऐकत आहेत त्या सर्वांनी माझ्यासारखे या साखळदंडाखेरीज, विश्वास ठेवणारे व्हावे, अशी माझी देवाला नम्र विनंति आहे."

[30]यानंतर राजा, बर्णीका, राज्यपाल आणि त्यांच्याबरोबर इतर जे तेथे बसले होते, ते सर्व उठले.
[31]ते न्यायालयातून बाहेर पडल्यावर एकमेकांशी बोलत होते. ते म्हणाले, "ज्यामुळे तुरुंगवास किंवा मरणदंड द्यावा असे काहीही या मनुष्याने केले नाही."
[32]अग्रिप्पा फेस्तला म्हणाला, "या मनुष्याने कैसराकडे न्याय मागितला नसता, तर त्याला सोडून देता आले असते."

## पौल समुद्रमार्गे रोमला निघतो

27 जेव्हा आम्ही समुद्रमार्गे इटलीला जाण्याचे ठरविले तेव्हा पौल व इतर काही कैद्यांना युल्य नावाच्या शताधिपतीच्या हाती सोपविण्यात आले. युल्य हा सम्राटाच्या सेनेतील एक अधिकारी होता.
[2]अद्रमुत्तिय येथील एका जहाजातून आम्ही जाणार होतो. हे जहाज आशियाच्या किनाऱ्यावरील बंदरे घेत पुढे जाणार होते. आम्ही या जहाजातून प्रवासाला निघालो. तेव्हा मासेदोनियातील थेस्सलनीका येथे राहणारा अरिस्तार्ख आमच्याबरोबर होता.

[3]दुसऱ्या दिवशी आम्ही सिदोन नगराला पोहोंचलो. युल्य पौलाशी फार चांगला वागला. पौलाच्या मित्राना त्याची काळजी घेता यावी म्हणून त्याने मोकळीक दिली.
[4]तेथून आम्ही समुद्रमार्गे पुढे निघालो. आणि कुप्रच्या किनाऱ्याकिनाऱ्याने निघालो कारण वारा समोरचा होता.
[5]किलकिया व पंफुल्याजवळच्या समुद्राला पार करून लुक्या प्रांतातील मुर्या बंदरात पोहोंचलो.
[6]तेथे शताधिपतीला इटलीला जाणारे आलेक्झांद्रीयाचे एक जहाज आढळले. त्याने आम्हांला त्या जहाजात बसविले.

7आम्ही बरेच दिवस हळूहळू प्रवास करीत होतो. कनिदा
येथपर्यंत येण्यासाठी आम्हांला फार कष्ट पडले कारण
वारा तोंडचा होता. आम्हांला पुढे जाता येईना. म्हणून
आम्ही क्रेताच्या दक्षिणेकडून सलमोनाच्या समोरच्या बाजूस
गेलो. 8यापुढे आमचे जहाज क्रेतच्या किनाऱ्याने मोठ्या
अडचणींतून सुरक्षित बंदर येथे पोहोंचले. तेथे जवळच
लसया नगर होते.

9बराच वेळ वाया गेला होता. आणि पुढील प्रवास करणे
बरेच अवघड झाले होते. कारण एव्हाना यहूद्यांच्या उपासाचा
काळही* निघून गेला होता. तेव्हा पौलाने त्यांना
सावधानतेचा इशारा दिला. पौल म्हणला, 10“पुरुषांनो,
मला वाटते, आपल्या प्रवासात जहाजातील मालाला आणि
जहाजालाच नव्हे तर आपल्या जीवालाही धोका होईल!”
11परंतु पौलाच्या मताशी जहाजाचा कप्तान व मालक
सहमत झाले नाहीत, उलट जहाजाच्या कप्तानाच्या व
मालकाच्या बोलण्यावरच शताधिपतीचा जास्त विश्वास
होता. 12परंतु हे बंदर (सुरक्षित म्हटलेले) हिवाळ्यात
मुक्काम करायला सोईचे नव्हते. म्हणून बहुमताने पुढे
निघावे असे ठरले. आणि फेनिकेला जाण्याचा प्रयत्न
करावा आणि शक्य झाले तर तेथेच हिवाळा घालवावा
असे ठरले. (फेनिके हे क्रेत बेटावरील शहर होते. त्याचे
बंदर नैऋत्य व वायव्य दिशेला होते.)

### वादळ

13जेव्हा दक्षिणेकडून मंद वारे वाहू लागले, तेव्हा ते
नांगर उचलून क्रेताच्या किनाऱ्याकिनाऱ्याने तारू
हाकारीत जाऊ लागले. जहाजावरच्या लोकांना वाटू लागले
की, अशाच प्रकारचे वारे आम्हांला पाहिजे होते. व तसेच
ते वाहत आहे. 14परंतु लवकरच क्रेत बेटावरून ‘ईशान्येचे’
म्हटलेले वादळी वारे वाहू लागले. 15आणि जहाज वादळी
वाऱ्यात सापडले. व त्याला पुढे जाता येईना. तेव्हा पुढे
जाण्याचा प्रयत्न सोडून आम्ही वाऱ्याने जहाज भरकटू
दिले. 16मग कौदा नावाच्या लहानशा बेटाच्या
किनाऱ्याकिनाऱ्याने आम्ही जाऊ लागलो. मग थोड्या
खटपटीनंतर जीवनरक्षक होडी वर उचलून घेतली.
17जीवन रक्षक होडी आत घेतल्यावर लोकांनी जहाज
दोरखंडाने आवळून बांधले. जहाज वाळू असलेल्या सूर्ती*
नावाच्या उथळ जागी आदळेल या भीतीने त्यांनी शीड
खाली काढले. तेव्हा वाऱ्याने ते भरकटू लागले. 18जोरदार
वादळी वाऱ्याचे तडाखे खावे लागल्याने लोकांनी दुसऱ्या
दिवशी जहाजावरील सामान बाहेर टाकून दिले. 19तिसऱ्या
दिवशी जहाजाची काही सामग्री त्यांनी आपल्या हातांनी
बाहेर काढून टाकली. 20बरेच दिवस आम्हांला सूर्य किंवा
तारे दिसले नाहीत. वादळ फारच भयंकर होते. आम्ही
आमच्या सर्व आशा सोडून दिल्या. आम्ही मरणार असे
आम्हांला वाटू लागले.

21बराच काळपर्यंत लोकांनी अन्नपाणी घेतले नव्हते.
मग पौल त्यांच्यासमोर उभा राहिला आणि म्हणाला,
“गृहस्थांनो, क्रेतावरून मुक्काम हलवू नका, हा माझा
सल्ला तुम्ही ऐकायला पाहिजे होता. म्हणजे हा त्रास व ही
हानि तुम्हांला टाळता आली असती. पण आता तुम्ही धीर
धरावा अशी माझी विनंति आहे. 22कारण तुमच्यापैकी
एकाच्याही जीवाला धोका पोहोंचणार नाही. आपले जहाज
मात्र गमवावे लागेल. 23मी ज्या देवाचा सेवक आहे आणि
ज्याची भक्ति मी करतो, त्याचा दूत काल रात्री माझ्या
बाजूला उभा राहीला. 24आणि तो दूत म्हणाला, ‘पौला
भिऊ नको! तुला कैसरापुढे उभे राहिलेच पाहिजे.
तुझ्याबरोबर प्रवास करणारे जे लोक आहेत, त्यांच्या
जीवाचे रक्षण करण्याचे वचन देवाने मला दिले आहे.’
25तेव्हा गृहस्थांनो, तुम्ही सर्व धीर धरा! कारण मला जसे
दूताने सांगितले, अगदी तसे होणार असा मला विश्वास
आहे. 26परंतु आपणास एखाद्या बेटावर उतरून थांबावे
लागले.”

27चौदाव्या रात्री आमचे जहाज अद्रिया समुद्रातून चालले
होते, तेव्हा खलाशांनी जहाज एखाद्या भूमीजवळ पोहोंचले
असावे असा अंदाज केला. 28त्यांनी पाण्याची खोली मोजली
तेव्हा ती वीस वाव भरली. आणखी काही वेळाने त्यांनी
परत एकदा समुद्राची खोली मोजली तेव्हा ती पंधरा वाव
भरली. 29ओबडधोबड खडकाळ जागेवर आपले जहाज
आदळेल अशी भीति वाटल्याने त्यांनी चार नांगर जहाजाच्या
मागील बाजूने टाकले आणि दिवस उजाडण्याची वाट पाहू
लागले. 30खलाशांनी जहाजातून सुटका करून घेण्याचा
प्रयत्न केला. त्यांनी जहाजाच्या पुढील भागातून नांगर
टाकल्याचे भासवून जीवनरक्षक होड्या समुद्रात टाकल्या.
31परंतु पौल शताधिपतीला व इतर शिपायांना म्हणाला,
“जर हे लोक जहाजात राहणार नाहीत, तर तुम्ही वाचणार
नाही.” 32यावर शिपायांनी जीवनरक्षक होड्यांचे दोर कापून
टाकले. आणि त्या खाली पाण्यात पडू दिल्या.

33पहाट होण्याअगोदर पौलाने त्या सर्वांना काहीतरी
खाण्याचा आग्रह केला. तो म्हणाला, “आज चौदावा दिवस
आहे. तुम्ही आतुरतेने वाट पाहत आहात पण खाणेपिणे
काही केले नाही. अन्नाचा कणही खाल्ला नाही. 34तुम्ही
थोडे तरी खा. कारण तुमचा टिकाव लागण्यासाठी तुम्ही
खाणे जरूरीचे आहे. तुम्ही खावे अशी मी तुम्हांला विनंति
करतो. तुमच्यापैकी कोणाच्या केसालाही धक्का लागणार
नाही.” 35असे बोलल्यानंतर पौलाने भाकर घेतली आणि
सर्वांच्या समक्ष देवाचे उपकार मानले. ती भाकर मोडून
तो खाऊ लागला. 36ते पाहून त्या सर्वांना धीर आला
आणि ते जेवले. 37आम्ही सर्व मिळून जहाजात दोनशे
शाहातर लोक होतो. 38त्या सर्वांनी पुरेसे खाल्ल्या

---

**उपासाचा काळ** हा वर्षातील प्रायश्चित्ताचा दिवस असे. यहूदी लोकांचा महत्वाचा पवित्र दिवस.

**सूर्ती** लिबीयाच्या किनाऱ्यालगत असलेली उथळ जागा.

प्यायलयांनंतर धान्य समुद्रात टाकून दिले आणि जहाजातील भार कमी केला.

## जहाज नष्ट होते

39दिवस उजाडल्यावर त्यांना भूभागाची ओळख पटली नाही. परंतु तेथे किनारा असलेल्या उपसागरासारखी ती जागा दिसून आली. म्हणून शक्य झाल्यास तेथील किनाऱ्याला जहाज लावण्याचे त्यांनी ठरविले. 40म्हणून त्यांनी नांगर कापले आणि समुद्रात पडू दिले. त्याचबरोबर सुकाणूंच्या दोऱ्या एकत्र केल्या. नंतर त्यांनी जहाजाच्या पुढच्या भागाचे शीड वारा भरावे म्हणून उभे केले आणि जहाज किनाऱ्याला आणले. 41परंतु दोन समुद्रांमधील वर आलेल्या वाळूच्या ढिगावर जहाज जोराने आदळले. तेव्हा जहाजाची पुढची बाजू वाळूमध्ये रुतून बसली आणि गलबताचा मागचा भाग लाटांच्या तडाख्यामुळे तुटू लागला. 42तेव्हा शिपायांनी कैद्यांना मारण्याचे ठरविले. यासाठी की त्यांच्यातील कोणी पोहोत जाऊन पळू नये. 43परंतु शताधिपतीला पौलाला वाचवायचे होते म्हणून त्याने शिपायांना तो विचार सोडून देण्यास सांगितले. आणि ज्यांना पोहता येत असेल त्यांनी जहाजातून उड्या टाकून किनाऱ्याला जावे अशी आज्ञा केली. 44बाकीच्या लोकांनी फळ्यांच्या अगर जहाजाच्या तुटलेल्या लाकडांच्या आधारे भूमी गाठावी असे सांगितले. अशा रीतीने जहाजातील सर्व जण सुखरूपपणे भूमीवर पोहोंचले.

## माल्ता बेटावर पौल

28 जेव्हा आमचे पाय सुखरूपपणे तेथील जमीनीला लागले. तेव्हा आम्हांला कळले की, त्या बेटाचे नाव माल्ता असे आहे. 2तेथील रहिवाश्यांनी आम्हांला अतिशय ममतेने वागविले. त्यांनी एक शेकोटी पेटविली आणि आमचे स्वागत केले. कारण पाऊस पडू लागला होता. व थंडीही होती. 3पौलाने काटक्या गोळा केल्या आणि तो त्या शेकोटीत टाकू लागला. उष्णतेमुळे तेथून एक साप निघाला. आणि त्याने पौलाच्या हाताला विळखा घातला. 4ते पाहून तेथील रहिवासी एकमेकांना म्हणू लागले, “हा मनुष्य खुनी असला पाहिजे. समुद्रातून जरी हा वाचला असला तरी देवाच्या न्यायामुळे याचे आयुष्य संपुष्टातच आले आहे!” 5परंतु पौलाने तो प्राणी शेकोटीत झटकून टाकला. आणि पौलाला काही अपाय झाला नाही. 6त्या बेटावरील लोकांना पौलाचे अंग सुजून येईल किंवा पौल एकाएकी मरून पडेल असे वाटत होते. बराच वेळ वाट पाहूनही पौलाला काहीही विकार झाल्याचे दिसेना, तेव्हा त्या लोकांचे विचार पालटले, आणि पौल देवच आहे असे ते म्हणू लागले.

7तेथून जवळच पुब्ल्य नावाच्या मनुष्याची शेती होती. पुब्ल्य हा त्या बेटाचा मुख्य अधिकारी होता. त्याने आम्हा सर्वांचे त्याच्या घरी स्वागत केले आणि तीन दिवस आमचा चांगला पाहुणचार केला. 8पुब्ल्याचे वडील तापाने व हगवणीने आजारी होते, त्यामुळे अंथरुणाला खिळून होते. पौल त्या आजारी व्यक्तिला भेटायला गेला प्रार्थना करून पौलाने आपला हात त्याच्यावर ठेवला आणि त्या मनुष्याला बरे केले. 9हे घडलेले पाहिल्यावर त्या बेटावरील इतर आजारी लोक पौलाकडे आले आणि बरे झाले. 10त्यांनी आम्हांला सन्मानपूर्वक पुष्कळ वस्तू भेटीदाखल दिल्या. आणि जेव्हा आम्ही परत प्रवासाला निघालो तेव्हा आम्हांला लागणाऱ्या अनेक गोष्टी पुरविल्या.

## पौल रोमला रवाना होतो

11आम्ही तेथे हिवाळ्यात राहिल्यावर आलेक्सांद्रा शहरातील एका जहाजातून पुढील प्रवासाला निघालो. ते जहाज त्या बेटावर हिवाळाभर मुक्कामाला होते. त्या जहाजाच्या समोरील बाजूस ‘जुळ्या देवाचे’* चिन्ह होते. 12मग आम्ही सुराकूस येथे जाऊन पोहोंचलो आणि तेथे तीन दिवस राहिलो. 13तेथून शिडे उभारून आम्ही निघालो, आणि रेगियोन नगराला गेलो. तेथे एक दिवस मुक्काम केला. नंतर दक्षिणेकडील वारा सुटल्यावर दुसऱ्या दिवशी पुत्युलास गेलो. 14त्या शहरात आम्हांला काही बंधु (विश्वासणारे) आढळले. त्या बंधूंच्या सांगण्यावरून आम्ही तेथे सात दिवस राहिलो. मग आम्ही रोम येथे जाऊन पोहोंचलो. 15तेथील बंधुनी आमच्याबद्दलची वार्ता ऐकली होती. ते आमच्या भेटीसाठी अप्पीयाच्या बाजारपेठेपर्यंत आणि तीन धर्मशाळेपर्यंत आले. पौलाची त्यांची भेट झाल्यावर त्याने देवाचे उपकार मानले. व त्याला धीर आला.

## रोम येथे पौल

16आम्ही रोम येथे पोहोंचल्यावर पौलाला एकटे राहायला परवानगी मिळाली. परंतु त्याच्यावर देखरेख करण्यासाठी एक शिपाई ठेवण्यात आला. 17तीन दिवसांनंतर पौलाने सर्व यहूदी पुढाऱ्यांना एकत्र बोलावले. जेव्हा सर्व जण जमा झाले तेव्हा पौल त्यांना म्हणाला, “बंधूंनो, आपल्या बांधवांविरुद्ध मी काहीही केलेले नाही. तरी मला यरुशलेम येथे पकडून रोमी लोकांच्या हाती कैदी म्हणून देण्यात आले. आणि 18त्यांनी माझी चौकशी केली. तेव्हा त्यांची मला सोडून देण्याची इच्छा होती. कारण मरणदंडाला योग्य असा कोणताही गुन्हा मी केला नव्हता. 19परंतु यहूदी लोकांनी जेव्हा माझ्या सुटकेला हरकत घेतली, तेव्हा कैसराकडे न्याय मागणे मला भाग पडले. याचा अर्थ असा नाही की, यहूदी लोकांविरुद्ध मला दोषारोप करण्याची

**जुळे देव** केस्टर व पुलुक्स या ग्रीक देवांचे पुतळे.

इच्छा आहे. 20या कारणासाठी तुम्हाला भेटण्याची आणि
तुमच्याशी बोलण्याची मी इच्छा दाखविली. कारण
इस्राएलाच्या आशेच्या निष्ठेमुळेच मी या साखळदंडानी
जखडलो गेलो आहे."

21यहूदी पुढारी पौलाला म्हणाले, "आम्हांला तुमच्या
बाबत यहूदीयाहून कसलेही पत्र आलेले नाही, अगर
तिकडून येणाऱ्या बंधुजनांपैकी एकाही भावाने
तुमच्याविषयी वाईट कळविले अथवा बोललेले नाही.
22परंतु तुमची मते काय आहेत हे समजून घेण्याची आमची
इच्छा आहे. कारण या गटाविरुद्ध (ख्रिस्ती गटाविरुद्ध)
सगळीकडे लोक बोलतात हे आम्हांला माहीत आहे."

23तेव्हा (रोम शहरातील) यहूदी लोकांनी एक बैठकीचा
दिवस ठरविला. जेथे पौल राहत होता, तेथे ते मोठ्या
संख्येने जमा झाले. तेव्हा पौलाने त्यांना समजावून सांगितले
आणि देवाच्या राज्याविषयी आपली साक्ष दिली. मोशेच्या
नियमशास्त्रापासून आणि संदेष्ट्यांच्यापासून फोड करून
येशूविषयी त्यांची खात्री पटविण्याचा प्रयत्न केला. हे तो
(पौल) सकाळपासून संध्याकाळपर्यंत करीत होता. 24त्याने
फोड करून सांगितलेल्या गोष्टींविषयी काही जणांची खात्री
पटली, तर काहींनी तो बोलत असलेल्या गोष्टींवर विश्वास
ठेवला नाही.

25पौल पुढील एक गोष्ट बोलला, त्यावरून मतभेद
होऊन त्यांच्यापैकी काही जण उठले आणि तेथून जाऊ
लागले. पौल म्हणाला, "यशया संदेष्टयांच्चया द्वारे पवित्र
आत्मा आपल्या वाडवडिलांशी जे बोलला, ते खरोखरच
किती खरे आहे! यशया म्हणाला होता:

26'या लोकांकडे (यहूदी) तुम्ही जा, आणि त्यांना सांगा:
तुम्ही एकाल तर खरे पण तुम्हांला समजणार नाही. तुम्ही
पाहाल तुम्हाला दिसेल पण तुम्हा काय पाहात ते तुम्हाला
कळणार नाही

27कारण या लोकांचे विचार मंद झाले आहेत त्यांच्या
कानांनी त्यांना ऐकू येत नाही. आणि त्यांनी आपले डोळे
बंद केले आहेत नाहीतर त्यांनी आपल्या डोळ्यांनी पाहिले
असते आणि आपल्या कानांनी ऐकले असते आणि
माझ्याकडे वळाले असते आणि मी त्यांना बरे केले असते.'

*यशाया 6:9-10*

28"म्हणून देवाचे हे तारण यहूदीतर विदेशी लोकांकडे
पाठविण्यात आले आहे. हे तुम्हा यहूदी लोकांना कळावे.
ते ऐकतील." 29*

30पूर्ण दोन वर्षे तो त्याच्या भाड्याच्या घरात राहिला. जे
जे त्याला भेटायला येत, त्यांचे तो स्वागत करी. 31त्याने
देवाच्या राज्याविषयी प्रचार केला. त्याने प्रभु येशूविषयी
शिक्षण दिले. तो हे काम फार धैर्याने करीत असे. आणि
कोणीही त्याला बोलण्यात अडवू शकले नाही.

---

**वचन 29** काही प्रतीमध्ये 29 वे वचन घालण्यात आले आहे:
"पौलाने असे म्हटल्यावर यहूदी लोक तेथून निघाले. ते आपापसात
फार वादविवाद करीत होते."

# पौलाचे रोमकरांस पत्र

1 प्रेषित होण्यासाठी पाचारण केलेला; देवाची सुवार्ता
सांगण्यासाठी वेगळा केलेला ख्रिस्त येशूचा सेवक पौल
याजकडून,
2 देवाच्या संदेष्ट्याच्या द्वारे पवित्र शास्त्रात पूर्वी सांगितलेली
होती, 3 ती ही सुवार्ता देवाचा पुत्र प्रभु येशू ख्रिस्त जो देहाने
एक मनुष्य म्हणून दाविदाच्या वंशात जन्माला आला
याच्याविषयी आहे. 4 पण पवित्रतेच्या आत्माच्याद्वारे तो
मरणातून पुन्हा जिवंत झाला त्यामुळे त्याच्या सामर्थ्यासह
“देवाचा पुत्र” असा गणला गेला. 5 त्या आपल्या प्रभु येशू
ख्रिस्ताद्वारे आम्हांला कृपा आणि प्रेषित पद मिळाले आहे.
अशासाठी की जे यहूदी नाहीत त्यांच्यामध्ये त्याच्या
नावांकरिता विश्वासाच्या आज्ञापालनामुळे जो
आज्ञाधारकपणा निर्माण होतो तो निर्माण करावा. 6 तुम्हीही
त्या यहूदी नसलेल्यांमध्ये आणि देवाकडून येशू ख्रिस्ताचे
अनुयायी होण्यासाठी बोलाविलेले आहात.
7 ज्या लोकांवर देवाने प्रेम केले आहे व त्याचे पवित्र
जन होण्यासाठी बोलाविलेले असे जे लोक रोममध्ये आहेत
त्या सर्वांना मी लिहित आहे. आपला पिता व प्रभु येशू
ख्रिस्त यांजकडून तुम्हांस कृपा व शांति असो.

## आभाराची प्रार्थना

8 सुरूवातीलाच तुम्हां सर्वांसाठी येशू ख्रिस्ताद्वारे मी देवाचे
आभार मानतो, कारण तुमचा विश्वास जगात सगळीकडे
जाहीर होत आहे. 9 देव माझा साक्षी आहे, ज्याची सेवा मी
आत्म्याने त्याच्या पुत्राची सुवार्ता सांगून करतो. मी तुमची
नेहमी आठवण करतो. 10 माझ्या प्रार्थनेत मी नेहमी मागतो,
जर देवाची इच्छा असेल तर शेवटी मला तुम्हांला भेटता
येणे शक्य व्हावे. 11 मला तुम्हांला भेटण्याची फार इच्छा
आहे. यासाठी की काही आध्यात्मिक दानांविषयी
तुम्हांबरोबर सहभागी व्हावे आणि तुम्ही बलवान व्हावे.
12 म्हणजे जोपर्यंत मी तुमच्यामध्ये आहे तोपर्यंत आपण
एकमेकांना विश्वासामध्ये मदत करू. माझ्या विश्वासामुळे
तुम्हांला व तुमच्या विश्वासामुळे मला फायदा होईल.
13 बंधूनो, पुष्कळ वेळा तुम्हांला भेट देण्याची मला इच्छा
झाली. यासाठी की, जसे मला यहूदीतरांमध्ये मिळाले, तसे
तुमच्यामध्येसुद्धा फळ मिळावे. परंतु आतापर्यंत मला
तुमच्यापर्यंत येण्यास अडथळे आले हे तुम्हांला माहीत
असावे.
14 मी सर्व लोकांची–ग्रीक आणि ग्रीक नसलेले, शहाणे
आणि मूर्ख– सेवा केली पाहिजे. 15 त्यासाठीच तुम्ही जे
रोममध्ये आहात त्या तुम्हांला सुद्धा सुवार्ता सांगण्याची
माझी फार इच्छा आहे.
16 मला सुवार्तेची लाज वाटत नाही. कारण देवाचे सामर्थ्य
जो कोणी विश्वास ठेवतो त्या सर्वांसाठी तारण आहे.
प्रथम यहूद्याकारिता आणि नंतर ग्रीकांसाठी. 17 कारण
सुवार्तेमध्ये देवाचे नितिमत्त्व ते विश्वासापासून विश्वास
असे प्रगट झाले आहे. पवित्र शास्त्रात असे लिहिले आहे
की, ‘नितिमान विश्वासाद्वारे वाचेल.’*

## सर्व लोकांनी चुका केल्या आहेत

18 लोकांनी केलेल्या प्रत्येक अनितीच्या कृत्यांमुळे व
जे आपल्या अनीतीने सत्य दाबून ठेवतात, त्यांच्यामुळे
स्वर्गातून देवाचा क्रोध प्रगट होतो. 19 हे असे होत आहे
कारण देवाविषयीचे ज्ञान त्यांच्यात दिसून येते व देवाने ते
त्यांना दाखवून दिले आहे. 20 जगाच्या निर्मितीपासून देवाचे
अदृश्य गुण, त्याचे सनातन सामर्थ्य व त्याचे देवपण हे
देवाने ज्या गोष्टी निर्माण केल्या त्यावरून प्रगट होतात.
आणि जर तुम्हांला हे कळत नाही, तर ह्याचे तुम्हांला
कसलेच समर्थन करता येणार नाही. 21 कारण जरी त्यांना
देव माहीत होता तरी त्यांनी देव म्हणून त्याचा आदर
केला नाही, किंवा त्याचे आभार मानले नाहीत, उलट ते
आपल्या विचारात निष्फळ झाले आणि मूर्ख अंत:करणे
अंधकारमय झाली. 22 जरी गर्वाने त्यांनी स्वत:ला शहाणे
समजले तरी ते मूर्ख ठरले. 23 आणि अविनाशी देवाचे
गौरव याची मर्त्य मानव, पक्षी, चार पायाचे प्राणी, सरपटणारे
प्राणी यांच्यासारख्या दिसणाऱ्या प्रतिमांशी अदलाबदल
केली.
24 यासाठी देवाने त्यांना त्यांच्या मनातील वाईट वासनांच्या
व वैषयिक अशुद्धतेमुळे सोडून दिले आणि त्यांनी
एकमेकांच्या देहाचा अनादर करावा यासाठी त्यांस
मोकळीक दिली. 25 त्यांनी देवाच्या खरेपणाशी लबाडीची
अदलाबदल केली व निर्माणकर्त्याऐवजी जे निर्मिलेले त्याची
उपासना केली. निर्माणकर्ता सर्वकाळ धन्यवादित आहे.
आमेन. 26 तेव्हा त्याची त्यांना शिक्षा मिळावी म्हणून देवाने

**नीतिमान ... वाचेल** हबक्कूक 2:4

नाईलाजाने त्यांना त्यांच्यावर सोडून दिले. त्यांना लाजिरवाण्या वासनांच्या स्वाधीन केले. त्यांच्या स्त्रियांनी स्त्रियांशी अनैसर्गिक संबंध ठेवले. 27तसेच पुरुषांनी स्त्रियांबरोबर नैसर्गिक संबंध ठेवणे बाजूला ठेवले व ते एकमेकाविषयी वासनेने पेटून निघाले. पुरुषांनी पुरुषांशी अनुचित कर्म केले आणि आपल्या ह्या निर्लज्ज कृत्यांमुळे त्यांना त्यांच्यामध्ये हे फळ मिळाले.

28आणि जेव्हापासून त्यांनी देवाला ओळखण्याचे नाकारले, तेव्हापासून देवाने त्यांना अशुद्ध मनाच्या हवाली केले व ज्या अयोग्य गोष्टी त्यांनी करू नयेत त्या करण्यास मोकळीक दिली. 29ते सर्व प्रकारची अनीति, दुष्टपणा, लोभ, वाईटपणा, हेवा, खून, भांडणे, कपट, कुबुद्धि यांनी भरलेले असून दुसऱ्याविषयी नेहमी वाईट विचार करतात. 30ते चहाडखोर, दुसऱ्याची निंदा करणारे, देवाचा तिटकारा करणारे, उद्धट, बढाया मारणारे, वाईट मार्ग शोधून काढणारे, आईवडिलांची आज्ञा न मानणारे; तसेच 31मूर्ख, दिलेले वचन मोडणारे, कुटुंबियांबद्दल वात्सल्य नसणारे, दुष्ट असे आहेत. 32देवाच्या नितिमत्वाचा जो नियम सांगतो की, जे लोक असे वागतात ते मरणास योग्य आहेत असे जरी त्यांना माहीत होते तरी ते त्या गोष्टी करतात इतकेच नव्हे तर जे असे करतात त्यांना मान्यताही देतात.

## तुम्ही यहूदीसुद्धा पापी आहात

2 म्हणून हे मनुष्या, तू जो कोणी आहेस व जेव्हा तू न्यायासनासमोर बसतोस तेव्हा तुला सबब नाही, कारण जेव्हा तू दुसऱ्यांचा न्याय करतोस तेव्हा तू स्वत:लाही दोषी ठरवितोस कारण जो तू न्याय करतोस, तो तूही तीच गोष्ट करतोस. 2आता आपणांला माहीत आहे की, जे अशा वाईट गोष्टी करतात त्यांचा न्याय देव करतो. आणि देवाचा न्याय योग्य असतो. 3तुम्हीसुद्धा जे अशा वाईट गोष्टी करतात त्यांचा न्याय करता पण तुम्हीसुद्धा त्याच गोष्टी करता म्हणून निश्चितपणे तुम्हांला माहीत आहे की, देव तुमचा न्याय करील आणि स्वत:ची सुटका करून घेणे तुम्हांला शक्य होणार नाही. 4देव तुमच्याशी अत्यंत दयाळूपणे वागतो. तो तुमच्याशी सहनशीलतेने वागतो, तुमच्यामध्ये बदल व्हावा म्हणून देव वाट पाहतो, पण त्याच्या दयाळूपणाबद्दल तुम्ही काहीच विचार करीत नाही. कदाचित तुम्ही तुमचे मन व जीवन बदलावे म्हणून देव तुमच्याशी दयाळूपणे वागतो हे तुम्हांला समजत नसेल. 5पण तुम्ही लोक कठीण व उद्धट मनाचे आहात, तुम्ही बदलण्यास तयार नाही, त्यामुळे तुम्ही स्वत:च तुमची शिक्षा अधिकाधिक वाढवित आहात. जेव्हा देव (तुम्हाला) त्याचा क्रोध दर्शवील, त्यावेळी तुम्हांला शिक्षा होईल. त्या दिवशी लोक देवाचा यथायोग्य न्याय पाहतील. 6देव प्रत्येकाला ज्याच्या त्याच्या कृत्यांप्रमाणे फळ देईल. 7नेटाने चांगले करीत राहून गौरव, मान, अमरत्व मिळविण्याचा जे लोक प्रयत्न करतात त्यांना तो अनंतकाळचे जीवन देईल. 8परंतु जे स्वार्थीपणामुळे सत्यात चालणे नाकारतात, व अनीतिने चालतात त्यांची तो क्रोधाने भरपाई करील. 9जो जे वाईट ते करतो, त्या प्रत्येक मानवावर संकटे आणि दु:खे येतील. म्हणजे पहिल्यांदा यहूद्यांवर व नंतर ग्रीक लोकांवर येतील. 10परंतु जो चांगली कृत्ये करतो त्या प्रत्येकाला गौरव, मान आणि शांति मिळेल. प्रथम यहूद्यांना व मग ग्रीक लोकांना मिळेल. 11देवाजवळ पक्षपात नाही.

12जे सर्व नियमशास्त्राबाहेर असून पाप करतात, ते नियमशास्त्राबाहेर नाश पावतील. व जितक्यांनी नियम शास्त्राधीन असून पाप केले तितक्यांना नियमशास्त्रानुसार शिक्षा होईल. 13कारण जे नियमशास्त्र ऐकतात ते देवाच्या दृष्टीने नितिमान आहेत असे नाही. परंतु जे नियमशास्त्र पाळतात आणि नियमशास्त्रांत सांगितल्याप्रमाणे करतात ते नीतिमान ठरतील. 14कारण जेव्हा यहूदी नसलेले (विदेशी) ज्यांना नियमशास्त्र नाही, मूलत: जरी त्यांना नियमशास्त्र नाही, तरीही नियमशास्त्राप्रमाणे करतात ते स्वत:च नियमशास्त्र आहेत. 15म्हणजे ते त्याच्या ह्दयात नियमशास्त्र लिहिले आहे, असे दाखवतात त्यांची सद्सद्विवेक बुद्धीसुध्दा साक्ष देते आणि त्यांचे एकमेकां विषयीचे विचार त्यांना आरोपी किंवा दोषमुक्त करतात. 16जेव्हा देव येशू ख्रिस्ताद्वारे मनुष्यांच्या रहस्यांचा, माझ्या सुवार्तेप्रमाणे न्याय करील त्या दिवशी या गोष्टी घडतील.

## यहूदी आणि नियमशास्त्र

17परंतु आता तुम्ही जे स्वत:ला यहूदी समजता आणि नियमशास्त्रावर विश्वास ठेवता व आपण देवाच्या जवळचे आहोत असा अभिमान बाळगता, 18त्या तुम्हांला त्याची इच्छा कळते आणि ज्या सर्वोत्तम गोष्टी आहेत, त्या तुम्ही स्वीकारता कारण नियमशास्त्राद्वारे तुम्हांला शिक्षण मिळाले आहे. 19तुम्हाला वाटतें की ज्यांना योग्य मार्ग माहित नाही त्यांचे तुम्ही मार्गदर्शक आहात. जे लोक अंधारात (पापांत) आहेत, त्यांचा तुम्ही प्रकाश आहात आणि तुमची खात्री झाली आहे की तुम्ही आंधळ्यांचें पुढारी, जे अंधारात आहेत त्यांचा प्रकाश, 20मूर्खांचे शिक्षक, बालकांचे गुरु आहात. कारण नियमशास्त्रात तुम्हांला ज्ञान आणि सत्याचे मूर्त स्वरूप मिळाले आहे. 21तर मग तुम्ही जे दुसऱ्यांना शिकविता ते तुम्ही स्वत:ला का शिकवित नाही? तुम्ही चोरी करू नये असा उपदेश करता पण तुम्ही स्वत: चोरी का करता? 22तुम्ही व्यभिचार करू नये असे म्हणता ते तुम्ही व्यभिचार का करतां? तुम्ही मूर्तिचा तिरस्कार करता पण देवळात चोरी करता? 23तुम्ही नियमशास्त्राविषयी बढाई मारता, ते तुम्ही नियमशास्त्र मोडून देवाचा अपमान का करता? 24शास्त्रलेखात लिहिल्यानुसार तुमच्यामुळे ‘विदेशी लोकांमध्ये देवाच्या नावाचा अपमान होत आहे.’* 25तुम्ही

---

**विदेशी … आहे** यशया 52:5

नियमशास्त्र पाळीत असला तर सुंतेला मोल आहे. पण जर तुम्ही नियमशास्त्र पाळीत नाही तर, तुमची सुंता न झाल्यासारखी आहे. 26सुंता न झालेला मनुष्य जर नियमशास्त्राचे पालन करतो, तर त्याची सुंता न होणे हे सुंता झाल्याप्रमाणे समजण्यात येणार नाही काय? 27ज्या मनुष्याची शारीरिक रीतीने सुंता झाली नाही आणि जो नियमशास्त्र पूर्ण करतो, तो ज्या तुम्हांला लिखित नियम व सुंता आहे, तरी नियमशास्त्र मोडता त्या तुमचा न्याय करील. 28कारण जो बाहेरून यहूदी आहे तो खरोखर यहूदी नाही व देहाची बाह्यत्कारी सुंता ही सुंता नव्हे. 29पण जो अंत:करणाचा यहूदी, तो यहूदी आहे आणि खरी सुंता लेखी नियमांद्वारे नव्हे तर आत्म्याने अंत:करणाची केलेली सुंता होय. त्याची प्रशंसा माणसांकडून नव्हे, तर देवाकडून होते.

3 तर मग यहूदी असण्यात फायदा काय? किंवा सुंतेपासून फायदा काय? 2सर्व बाबतीत पुष्कळच आहे. कारण सर्वप्रथम त्यांना देवाची वचने विश्वासाने सोपविण्यात आली होती. 3हे खरे आहे की त्यातील काही अविश्वासू होते; देवाच्या विश्वासूपणाला अविश्वासूपणा नाहीसा करील काय? 4खात्रीने नाही! देव खरा असलाच पाहिजे आणि प्रत्येक मनुष्य खोटा. पवित्र शास्त्रात असे लिहिले आहे की,

"तू बोलशील तेव्हा योग्य ठरशील आणि तुझा न्याय होत असता तू विजय मिळविशील." *स्तोत्र. 51:4*

5जर आपल्या दुष्टपणामुळे देवाचा न्याय स्पष्ट होत असेल तर त्याला काय म्हणावे? देव जो आपणावर क्रोध आणतो त्याला अनीतिमान म्हणावे काय? (मी हे मानवाप्रमाणे बोलतो). 6खात्रीने नाही! कारण मग देव जगाचा न्याय कसा करील?

7परंतु तुम्ही असे म्हणाल की, "जर देवाचा खरेपणा माझ्या खोटेपणामुळे त्याच्या गौरवासाठी उठून दिसत असेल, तर मग मी पापी का गणला जातो?" 8आपण का वाईट करू नये जर त्याचा परिणाम चांगला होत असेल. कारण काही जण आपल्या विरुध्द वाईट बोलत आहेत, आणि त्यानां मिळणारी शिक्षा त्याबद्दलचा न्याय आहे.

## सर्व लोक दोषी आहेत

9तर मग काय? आम्ही यहूदी, विदेशी लोकांपेक्षा अधिक चांगल्या स्थितीत आहोत काय? मुळीच नाही! कारण यहूदी आणि ग्रीक हे सारखेच पापाच्या अधिकाराखाली आहेत. 10शास्त्रात असे लिहिले आहे:

"पापाशिवाय असा कोणीही नाही. एकही नाही.
11समंजस असा कोणी नाही. कोणीही देवाचा शोध करीत नाही.
12ते सर्व दूर गेले आहेत, आणि सर्व लोक निरुपयोगी झाले आहेत. चांगले करणारा कोणी नाही, एकही नाही."
*स्तोत्र. 14:1-3*

13"लोकांची तोंडे उघड्या कबरांसारखी आहेत ते आपल्या जिभांनी लोकांना फसवितात." *स्तोत्र. 5:9*

"ते ज्या गोष्टी बोलतात त्यात सापाचे विष असते."
*स्तोत्र. 140:3*

14"त्यांची तोंडे शापांनी आणि कडूपणाने भरली आहेत."
*स्तोत्र. 10:7*

15"त्यांचे पाय रक्तपात करण्यास नेहमी तयार असतात.
16जेथे कोठे ते जातात तेथे विध्वंस व विपत्ती आणतात.
17त्यांना शांतीचा मार्ग माहीत नाही." *यशया 59:7-8*

18"त्यांच्या डोळ्यांपुढे देवाचे भय नाही." *स्तोत्र. 36:1*

19आता आपणाला माहीत आहे की, नियम शास्त्र जे सांगते ते नियमशास्त्राच्या आधिन असणाऱ्यांकरिता आहे व मनुष्यांच्या कामचुकार पणाला आळा घालण्यासाठी व सर्व जगाला चांगले व पूर्ण होण्यासाठी आहे.त्या नियमशास्त्र प्रमाणे सर्व दोषी आहेत. 20नियमशास्त्राच्या कर्मांनी कोणीही देवासमोर नीतिमान ठरणार नाही. कारण नियमशास्त्राद्वारे पापाची जाणीव होते.

## देव लोकांना नीतिमान कसे करतो?

21परंतु आता देवाची मानवाविषयीची नीतिमत्त्वाची कृती नियमशास्त्राव्यतिरिक्त प्रगट झाली आहे. त्याला नियमशास्त्र आणि संदेष्ट्यांची साक्ष आहे. 22देवाची नीतिमत्त्वाची कृती ही येशू ख्रिस्तावरील विश्वासाद्वारे आहे आणि जे विश्वास ठेवतात त्या सर्वांसाठी दाखविली आहे. त्यात भेदभाव नाही. 23सर्वांनी पाप केले आहे आणि ते देवाच्या गौरवाला उणे पडले आहेत. 24परंतु त्यांना देवाने त्याच्या कृपेने येशू ख्रिस्ताद्वारे खंडणी भरून नीतिमान ठरविले आहे. 25लोकांच्या पापांची क्षमा व्हावी म्हणून ख्रिस्ताचे रक्त सांडून देवाने त्याला जाहीरपणे पुढे केले. देवाने हे यासाठी सिद्ध केले की तो नीतिमान आहे हे सिद्ध व्हावे. 26देवाच्या सहनशीलतेमुळे त्याने हे सिद्ध केले की, या सध्याच्या काळी तो नीतिमान आहे. यासाठी जो ख्रिस्तावर विश्वास ठेवतो, तो नीतिमान असावा.

27मग आमच्या बढाई मारण्याचे प्रयोजन काय? ती वगळण्यात आली. कोणत्या प्रकारच्या नियमाने? कर्माच्या काय? नाही, तर ज्यामध्ये विश्वास आहे, त्याच्या आधारे. 28कारण आपण असे मानतो की, मनुष्य देवावरील विश्वासाने नियमशास्त्रातील कर्मांशिवाय नीतिमान ठरतो.

29किंवा देव फक्त यहूद्यांचाच आहे काय? तो विदेशी
लोकांचा नाही काय? होय, तो विदेशी लोकांचादेखील
आहे. 30ज्याअर्थी देव एकच आहे, त्याअर्थी तो ज्यांची
सुंता झाली आहे, त्यांच्या विश्वासाने आणि ज्यांची सुंता
झालेली नाही अशांनाही विश्वासाने नीतिमान ठरवील.
31तर मग आपण या विश्वासाचा आग्रह धरून नियमशास्त्र
निरर्थक ठरवितो काय? खात्रीने नाही, आपण तर
नियमशास्त्राला मान्यता देतो.

## अब्राहामाचे उदाहरण

4 तर मग अब्राहाम जो मानवी रितीने आपला पूर्वज
याच्याविषयी आपण काय म्हणावे? 2जर अब्राहाम
आपल्या कर्मांनी नीतिमान ठरला तर त्याला अभिमान
बाळगण्यास जागा आहे, परंतु त्याला देवासमोर अभिमान
बाळगणे शक्य नाही. 3कारण शास्त्र काय सांगते?
“अब्राहामाने देवावर विश्वास ठेवला आणि त्याचा विश्वास
त्याला नीतिमत्त्व असा गणण्यात आला.” 4जो कोणी काम
करतो, त्याला मजुरी ही मेहरबानी म्हणून नव्हे तर त्याचा
मोबदला म्हणून दिली जाते. 5कोणताही मनुष्य कर्मे करून
देवाच्या दृष्टीने नीतिमान ठरू शकत नाही. म्हणून त्याने
देवावरच भरवसा ठेवावा. मग देव त्या मनुष्याचा भरवसा
स्वीकारून त्याला आपला दृष्टीने नीतिमान ठरवतो.
दुराचारी मनुष्यालाही नीतिमान ठरविणारा देवच आहे.
6ज्याला देव कर्मावाचून नीतिमान ठरवितो,
त्याच्याविषयीही दावीद म्हणतो;

7“ज्याच्या अपराधांची क्षमा झाली आहे. ज्याच्या पापावर
पांघरूण घातले आहे तो धन्य!
8धन्य तो पुरुष ज्याच्या पापांचा हिशेब प्रभु करणार
नाही.”

*स्तोत्र. 32:1-2*

9तर मग हे नीतिमत्त्व ज्यांची सुंता झाली आहे आणि
ज्यांची सुंता झाली नाही अशांनाही लागू होते काय? जे
बेसुंती आहेत अशांनाही ते लागू पडते कारण आम्ही
म्हणतो, “अब्राहामाचा विश्वास त्याला नीतिमान असा
गणण्यात आला.” 10आणि तो कसा गणण्यात आला, तो
सुंता झालेला असताना का सुंता झालेली नसताना? 11सुंता
झालेली नसताना ही त्याने जो विश्वास दाखविला त्याचा
परिणाम व नीतिमत्त्वाचा शिक्का म्हणून त्याला सुंता ही
खूण मिळाली, यासाठी की, जे सुंता झाली नसताही विश्वास
ठेवतात, त्यांच्याकडे ते नीतिमत्त्व गणले जावे. (त्यांचा तो
पिता आहे.) 12आणि तो ज्यांची सुंता झाली आहे त्यांचाही
पिता आहे. पण त्यांची सुंता झालेली आहे म्हणून तो
त्यांचा पिता झाला नाही, तर आपला पूर्वज अब्राहाम याची
सुंता होण्यापूर्वीसुद्धा तो जसा विश्वासात जगत होता, तसे
जर ते जगले तरच अब्राहाम त्यांचा पिता होऊ शकतो.

## विश्वासाद्वारे मिळालेले देवाचे अभिवचन

13अब्राहाम आणि त्याच्या वंशजांना जे अभिवचन मिळाले
की, ते जगाचे वारस होतील, ते अभिवचन नियमशास्त्रामुळे
आले नाही, तर विश्वासाचा परिणाम असलेल्या
नीतिमत्त्वामुळे आले. 14लोकांना देवाने दिलेले अभिवचन
जर नियमशास्त्र पाळण्याने मिळत असेल तर विश्वास
व्यर्थ आहे. आणि देवाने अब्राहामाला दिलेले अभिवचन
व्यर्थ आहे. 15कारण नियमशास्त्र मनुष्यांच्या आज्ञाभंगामुळे
देवाचा क्रोध निर्माण करते आणि जेथे नियमशास्त्र नाही,
तेथे आज्ञा मोडणेही नाही.

16म्हणून देवाचे वचन हे विश्वासाचा परिणाम आहे
यासाठी की ते कृपेद्वारे मिळावे. अशा रीतीने ते अभिवचन
अब्राहामाच्या सर्व संततीला आहे, फक्त नियमशास्त्रावर
अवलंबून राहतात अशांसाठीच नव्हे तर आब्राहामा प्रमाणे
विश्वासाने जगणाऱ्या प्रत्येकासाठी आहे. 17पवित्र शास्त्रात
असे लिहिले आहे: “मी तुला पुष्कळ राष्ट्रांचा पिता केले
आहे.”* आब्राहामाचा देव जो मेलेल्यांना जीवन देतो, जे
अस्तित्वात नाही त्यांना अस्तित्वात आणतो त्या देवासमोर
हे खरे आहे.

18आपल्या अंत:करणात आशा धरून सर्व मानवाच्या
अपेक्षेपेक्षा विरुद्ध असा विश्वास धरला म्हणून, “तुझी
संतती ताऱ्यांसारखी अगणित होईल आणि तुझे असंख्य
वंशज होतील,” असे जे म्हटले आहे त्याप्रमाणे तो ‘अनेक
राष्टांचा पिता’ झाला. 19अब्राहाम जवळ जवळ शंभर
वर्षांचा झाला होता, त्यामुळे त्याचे शरीर मृतवतच
झाल्यासारखे होते. तसेच सारेलासुद्धा मूल होणे शक्य
नव्हते. अब्राहामाने याविषयी विचार केला होता, तरीपण
त्याने त्याचा विश्वास कमकुवत होऊ दिला नाही. 20देवाने
जे अभिवचन दिले आहे त्याविषयी त्याने कधीच संशय
बाळगला नाही. त्याने विश्वास ठेवण्याचे कधीच थांबविले
नाही. तो विश्वासात बळकट होत गेला आणि त्याने देवाला
गौरव दिले. 21त्याची पूर्ण खात्री होती की, देवाने जे
अभिवचन दिले ते पूर्ण करण्यास तो समर्थ आहे.
22“म्हणूनच त्याला नीतिमान असे गणण्यात आले.”*
23ते अभिवचन केवळ अब्राहामासाठीच होते असे नव्हे,
24तर आपल्यासाठीसुद्धा होते, ज्याने आपल्या प्रभु येशुला
मेलेल्यांतून उठविले आपण त्याच्यावर विश्वास ठेवतो,
25येशूला आमच्या पापांकरिता मरण्यासाठी दिले गेले.
आणि त्याला मरणातून उठविण्यात आले यासाठी की,
देवासमोर आम्ही नीतिमान ठरविले जावे.

## देवाशी नीतिमान

5 ज्याअर्थी विश्वासाने आपल्याला नीतिमान ठरविले
आहे त्याअर्थी आपल्या विश्वासाचा परिणाम म्हणून

---

**मी ... आहे** उत्पत्ति 17:5

**म्हणूनच ... आले** उत्पत्ति 15:6

आपल्याला येशू ख्रिस्ताद्वारे देवाकडून शांति मिळाली आहे.
2आता आपण ज्या कृपेमध्ये आहोत, त्यात त्याच्याद्वारे
विश्वासाने आम्हीसुद्धा प्रवेश मिळविला आहे. आणि आम्ही
देवाच्या गौरवाचे भागीदार होण्याच्या आशेने अभिमान
बाळगतो. 3याशिवाय आम्ही संकटांतही अभिमान बाळगतो;
कारण आम्हांस ठाऊक आहे की, या संकटांमुळे आम्हांला
अधिक धीर येतो, 4आणि धीराने आम्ही कसोटीस उतरतो
आणि कसोटीस उतरल्याने आशा उत्पन्न होते 5आणि
आशा लाजवित नाही. कारण आपणांस दिलेल्या पवित्र
आत्म्याकडून आपल्या अंत:करणात देवाची प्रीति ओतली
आहे.

6आम्ही जेव्हा आमचे स्वत:चे तारण करण्यासाठी अशक्त
होतो तेव्हा ख्रिस्त योग्य वेळी आमच्यासाठी मरण पावला.
7आता नीतिमान मनुष्यासाठी सुध्दा कदाचित कोणी मरणार
नाही. एखादा मनुष्य चांगला असेल तर त्याच्यासाठी
मरण्याचे धाडस कदाचित कोणीतरी करील. 8परंतु आम्ही
पापी असतानाच ख्रिस्त आमच्यासाठी मरण पावला. त्याद्वारे
त्याने दाखवून दिले की, तो आमच्यावर फार प्रेम करतो.
9तर मग आता आपण खिस्ताच्या रक्ताने नीतिमान
ठरलो आहोत, म्हणून ख्रिस्ताद्वारे देवाच्या रागापासून आपण
वाचले जाणार आहोत. 10आम्ही देवाचे शत्रू असताही
त्याच्या पुत्राच्या मरणाद्वारे त्याने आमच्याशी समेट केला.
त्यामुळे आता आम्ही देवाचे मित्र असल्यामुळे देव आम्हांला
त्याच्या पुत्राच्या जीवनाद्वारे रक्षील. 11इतकेच नव्हे तर
ज्याच्याद्वारे आमचा देवाबरोबर समेट झाला त्या आपल्या
प्रभु येशू ख्रिस्ताद्वारे आम्हीसुद्धा देवाविषयी अभिमान
बाळगतो.

## आदाम आणि ख्रिस्त

12म्हणून पाप जसे एका मनुष्याद्वारे, जगात आले आणि
पापाद्वारे मरण आले, तसेच सर्वांनी पाप केल्यामुळे सर्व
माणसांमध्ये मरण आले.

13नियमशास्त्र जगात येण्यापूर्वी पाप जगात आले होते.
परंतु नियमशास्त्र नसल्यामुळे कोणाच्याही हिशेबी पाप
गणले जात नव्हते. 14परंतु मरणाने आदामाच्या काळापासून
ते मोशेच्या काळापर्यंत राज्य केले. ज्यांनी पाप केले
नाही, त्याच्यांवरसुद्धा मरणाने राज्य केले.

देवाची आज्ञा न मानून आदामाने पाप केले म्हणून तो
मेला आदाम, ख्रिस्त जो येणार होता, त्याचे प्रतिरूप आहे.
15पण देवाची मोफत देणगी आदामाच्या पापासारखी नाही.
कारण आदामाच्या पापामुळे पुष्कळ जण मरण पावले.
देवाची कृपा आणि दान, एक मानव येशू ख्रिस्ताच्या
कृपेद्वारे आली व विशेषेकरून सर्व लोकांकरिता विपुल
झाली.

16आदामाने पाप केल्यानंतर तो दोषी ठरला होता पण
देवाची देणगी वेगळी आहे. देवाची मोफत देणगी पुष्कळ
पापांनंतर आली आणि त्या देणगीमुळे तिने आपल्या
लोकांना देवासमोर नीतिमान केले. 17एका मनुष्याच्या
पापामुळे मरणाने राज्य केले. पण आता काही लोक
देवाच्या कृपेची विपुलता आणि देणगी जिच्यामध्ये नीतिमत्त्व
आहे, ते अनुभवतात. ते विशेषेकरून येशू ख्रिस्ताद्वारे
जीवनात राज्य करतील.

18म्हणून एका पापामुळे सर्व मनुष्यांना शिक्षा झाली
तसेच एका नीतिमत्त्वाच्या कृत्याने सर्व लोकांना
अनंतकालचे जीवन देणारे नीतिमत्त्व मिळाले.

19वास्तव आदामाच्या आज्ञाभंगामुळे पुष्कळांना पापी
ठरविण्यात आले. त्याचप्रमाणे ख्रिस्ताच्या आज्ञापालनाने
पुष्कळांना नीतिमान ठरविण्यात येईल. 20पापे
वाढवण्यासाठी म्हणून नियमशास्त्राचा प्रवेश झाला. परंतु
जेथे पाप वाढले तेथे देवाची कृपाही विपुल झाली.
21अशासाठी की, जसे पापाने मरणाच्या योगे राज्य केले,
त्याच रीतीने देवाची कृपाही, नीतिमत्त्वाने आपल्या प्रभु
येशू ख्रिस्ताद्वारे अनंतकाळच्या जीवनासाठी राज्य करील.

## पापात मेलेले पण ख्रिस्तात जिवंत

6 तर मग आपण काय म्हणावे? देवाची कृपा वाढावी
म्हणून आपण पापांत राहावे काय? 2खात्रीने नाही.
आपण जे पापाला मेलो ते अजूनही जिवंत कसे राहू?
3तुम्हांला माहीत नाही का की ज्या आपण प्रभु येशू
ख्रिस्तामध्ये बाप्तिस्मा घेतला होता त्या आपला त्याच्या
मरणातही बाप्तिस्मा झाला. 4म्हणून आपण त्याच्या
मरणातील बाप्तिस्म्याने त्याच्याबरोबर पुरले गेलो यासाठी
की, पित्याच्या गौरवाने ख्रिस्त जसा मेलेल्यांतून उठविला
गेला तसे आम्हीही जीवनाच्या नवीनपणात चालावे.

5कारण जर त्याच्या मरणाच्या प्रतिरूपाने आपण
त्याच्याशी जोडलो आहोत, तर त्याच्या पुनरुत्थानाच्या
प्रतिरूपाने त्याच्याशी जोडले जाऊ. 6आपणांला हे माहीत
आहे की, आपल्यातील जुना मनुष्य ख्रिस्ताबरोबर
वधस्तंभावर खिळला गेला यासाठी की आपल्या पापमय
शरीराचा नाश व्हावा व यापुढे आपण पापाचे दास होऊ
नये. 7कारण जो कोणी ख्रिस्ताबरोबर मरतो तो पापापासून
मुक्त होऊन नीतिमान होतो.

8आणि जर आपण ख्रिस्ताबरोबर मेलो तर आम्ही
विश्वास धरतो की, त्याच्याबरोबर जिवंतही राहू. 9कारण
आम्हांस माहीत आहे की, ख्रिस्त जो मेलेल्यांतून उठविला
गेला तो यापुढे मरणार नाही. मरणाची त्याच्यावर सत्ता
चालणार नाही. 10जे मरण तो मेला ते एकदाच पापासाठी
मेला, परंतु जे जीवन तो जगतो ते तो देवासाठी जगतो.
11त्याच रीतीने तुम्ही स्वत:ला पापाला मेलेले पण ख्रिस्त
येशूमध्ये व देवासाठी जिवंत असे समजा.

12यासाठी की तुम्ही पापाच्या वाईट वासना पाळाव्यात
म्हणून पापाने तुमच्यावर राज्य करू नये. 13आणि अनीतिची
साधने व्हावीत म्हणून तुम्ही आपल्या शरीराचे अवयव
पापाच्या स्वाधीन करू नका. त्याऐवजी तुम्ही जे मरणातून

उठविलेले लोक व जे आता जिवंत आहात ते आपणांला देवाच्या स्वाधीन करा. आपल्या शरीराचे अवयव नीतिची साधने व्हावीत म्हणून देवाच्या स्वाधीन करा.
14पाप तुम्हांवर राज्य करणार नाही. कारण तुम्ही नियमशास्त्राधीन नाही तर देवाच्या कृपेच्या अधीन आहात.

## नीतिमत्तेचे दास

15तर मग आपण काय करावे? आपण नियमशास्त्राधीन नसून देवाच्या कृपेच्या अधीन आहोत म्हणून पाप करावे
काय? 16खात्रीने नाही. तुम्हांला माहीत नाही काय की जेव्हा तुम्ही स्वत:ला आज्ञापालनाकरता एखाद्याच्या स्वाधीन करता तर ज्याची आज्ञा तुम्ही पाळता त्याचे गुलाम आहात. तुम्ही पापांत चालू शकता किंवा देवाची आज्ञा पाळू शकता. पापांमुळे आध्यात्मिक मरण येते. पण
देवाची आज्ञा पाळल्याने तुम्हांला नीतिमत्त्व मिळते. 17पूर्वी
तुम्ही पापाचे गुलाम होता. पाप तुम्हांला काबूत ठेवीत होते. पण देवाचे उपकार मानू या की, ज्या गोष्टी तुम्हांला
शिकविल्या गेल्या त्या तुम्ही पूर्णपणे पाळल्या. 18तुम्हांला
पापांपासून मुक्त केले गेले. आणि नीतिमत्त्वाचे गुलाम करण्यात आले.
19तुमच्या शरीराच्या दुर्बलतेमुळे व लोकांना समजावे म्हणून मी उदाहरणाचा उपयोग करीत आहे. कारण जसे तुम्ही आपले अवयव अशुद्धतेच्या आणि परिणाम म्हणून गुलाम होण्यासाठी स्वैरतेच्या अधीन केले त्याच रीतीने आता आपल्या शरीराचे अवयव देवाच्या सेवेला नीतिमत्त्वाचे गुलाम व्हावे म्हणून अर्पण करा.
20कारण जेव्हा तुम्ही पापाचे गुलाम होता, तेव्हा
नीतिमत्त्वासंबंधाने मोकळे होता. 21आणि त्यावेळेला
तुम्हांला काय फळ मिळाले, त्या गोष्टीची तुम्हांला आता
लाज वाटते, ज्याचा शेवट मरण आहे. 22परंतु आता तुम्हांला
पापापासून मुक्त करून देवाचे गुलाम केले आहे. देवाच्या सेवेसाठी तुमचे फळ तुम्हांला मिळाले आहे व त्याचा शेवटचा परिणाम म्हणजे अनंतकाळचे जीवन आहे.
23कारण पापाची मजुरी मरण आहे. परंतु देवाची ख्रिस्त येशूमध्ये दिलेली मोफत देणगी म्हणजे अनंतकाळचे जीवन आहे.

## विवाहावरून उदाहरण

7 बंधूनो, तुम्हांस माहीत नाही काय? कारण नियमशास्त्र माहीत असलेल्या लोकांबरोबर मी बोलत आहे की, जोपर्यंत मनुष्य जिवंत आहे, तोपर्यंत नियमशास्त्र त्याच्यावर
सत्ता चालविते. 2कारण लग्न झालेली स्त्री जोपर्यंत तिचा
पती जिवंत आहे तोपर्यंत ती नियमशास्त्राने त्याला बांधलेली असते, पण जर तिचा नवरा मेला तर ती पतीविषयीच्या
नियमातून मोकळी होते. 3म्हणून पती जिवंत असताना ती
दुसऱ्याची झाली, तर तिला व्यभिचारिणी असे म्हणतील. पण जर तिचा पती मरण पावला तर ती लग्नाच्या नियमातून मुक्त होते आणि जरी ती दुसऱ्या पुरुषाची पत्नी झाली तरी ती व्यभिचारिणी होत नाही.
4माझ्या बंधूनो, अशाच प्रकारे नियमशास्त्राप्रमाणे तुम्हांलाही ख्रिस्ताच्या शरीराद्वारे ठार मारण्यात आले यासाठी की तुम्ही दुसऱ्या पुरुषाचे, जो मेलेल्यातून उठविला गेला होता त्याचे व्हावे, यासाठी की देवाच्या सेवेसाठी
आमचा वापर व्हावा. 5कारण जेव्हा आम्ही आमच्या
पापी मानवी स्वभावाप्रमाणे जगत होतो तेव्हा पापी वासना नियमशास्त्राच्या द्वारे मरणाला फळ देण्यासाठी आपल्या
अवयवामध्ये कार्य करीत होत्या. 6ज्या नियमशास्त्रामध्ये
आम्ही कैदी झालो होतो त्यात आम्ही मेलेलो असल्याने आता आम्ही नियमशास्त्रापासून मुक्त आहोत तेव्हा आता आम्ही देव, आमचा प्रभु याची पवित्र शास्त्राच्या जुनेपणाप्रमाणे नव्हे तर आत्म्याच्या नवेपणाप्रमाणे सेवा करतो.

## पापाविरुद्धची लढाई

7तर मग आता आपण काय म्हणतो? नियमशास्त्र पाप आहे असे आम्ही म्हणावे काय? खात्रीने नाही! कारण नियमशास्त्रावाचून पाप काय आहे हे मला समजले नसते. खरोखर “लोभ धरू नको” असे नियमशास्त्राने सांगितले
नसते तर लोभ म्हणजे काय हे मला माहीत झाले नसते.*
8परंतु पापाने संधी साधली आणि मजमध्ये सर्व प्रकारचा
लोभ भरला. कारण नियमशास्त्राशिवाय पाप मृतवत आहे.
9एके काळी मी नियमशास्त्राशिवाय जगत होतो, परंतु
जेव्हा नियमशास्त्र आले तेव्हा पाप संजीवित झाले. 10आणि
मी मरण पावलो, जी आज्ञा जीवन आणण्यासाठी योजण्यात
आली होती तिचा परिणाम माझ्यासाठी मरण असा झाला.
11कारण पापाने संधी साधली आणि त्या आज्ञेयोगे मला
फसविले व तिच्याद्वारे ठार केले. 12म्हणून आम्ही असा
निष्कर्ष काढतो की, नियमशास्त्र पवित्र आहे आणि आज्ञा
पवित्र, नीतिमान आणि उत्तम आहेत. 13याचा अर्थ असा
आहे का, की जे उत्तम होते ते माझ्यासाठी मरण होते काय? खात्रीने नाही! परंतु पाप हे पाप म्हणून ओळखले जावे म्हणून त्याने जे उत्तम त्याद्वारे मजमध्ये मरण निर्माण केले. यासाठी की, पाप त्या आज्ञेमुळे कमालीचे पापिष्ठ व्हावे.

## मनुष्याच्या मनातील लढा

14कारण आम्हांला माहीत आहे की, नियमशास्त्र आत्मिक आणि मी दैहिक मनुष्य आहे. मी गुलाम म्हणून
पापांत शरणागत राहावे म्हणून विकलेला असा आहे.
15मी काय करतो हे मला माहीत नाही कारण काय करायचे हे मला माहीत नाही. कारण ज्या गोष्टींचा मी
द्वेष करतो, त्याच गोष्टी मी करतो. 16आणि ज्या गोष्टी

---

**लोभ ... नसते** निर्गम . 20:17; अनुवाद 5:21

मला कराव्याशा वाटत नाही त्याच करतो तर नियमशास्त्र
उत्तम आहे हे मान्य करतो. 17परंतु खरे तर मी त्या
करतो असे नव्हे तर माझ्या ठायी वसत असलेले पाप त्या
गोष्टी करते.

18होय, मला माहीत आहे की, जे चांगले आहे ते
माझ्यामध्ये वसत नाही. 19चांगले करण्याची माझ्या ठायी
इच्छा आहे, परंतु तसे मी करीत नाही, त्याऐवजी जे फार
वाईट व जे मला करावेसे वाटत नाही तेच करतो.

20आणि ज्याअर्थी, ज्या गोष्टी मला कराव्याशा वाटत
नाहीत त्या मी करतो, तेव्हा खरे तर त्या गोष्टी मी करतो
असे नाही तर माझ्याठायी असणारे पाप त्या गोष्टी करते.

21तर माझ्यामध्ये मला हा नियम आढळतो की,
माझ्यातील मनुष्याला चांगले करावेसे वाटते पण वाईट
ही एकच गोष्ट माझ्याबरोबर आहे. 22माझ्या आत असलेला
मनुष्य देवाच्या नियमशास्त्रामुळे आनंद करतो.

23परंतु माझ्या अवयवात मला निराळाच नियम कार्य
करताना दिसतो. तो माझ्या मनावर अमल करणाऱ्या
नियमाबरोबर लढतो. आणि पापाने मजवर लादलेल्या
नियमाचा, जो माझ्या शरीरात कार्य करतो, त्याचा कैदी
करतो. 24मी अत्यंत दुःखी मनुष्य आहे! मरणाधीन
असलेल्या शरीरापासून मला कोण सोडवील? 25परंतु
आमचा प्रभु येशू ख्रिस्त याच्याद्वारे देवाचे आभार मानतो.

तर मग माझ्या मनाने मी देवाच्या नियमाचा गुलाम
आहे. पण माझ्या पापी स्वभावाने मी पापाने माझ्यावर
लादलेल्या नियमाचा गुलाम आहे.

## पवित्र आत्म्यात जीवन

8 म्हणून आता जे ख्रिस्त येशूमध्ये आहेत त्यांना शिक्षा
नाही. 2कारण आत्म्याचा जो नियम ख्रिस्त येशूमध्ये
जीवन देतो त्याने पापाचा नियम जो तुम्हांला मरणाकडे
नेतो त्यापासून मुक्त केले आहे. 3नियमशास्त्र समर्थ आहे
पण आपण दूर्बळ आहोत त्यामुळे वाचु शकत नाही, देवाने
आपल्या पुत्राला पापी देहाच्या प्रतिरूपाने व पापाकरिता
पाठवून ख्रिस्ताच्या देहामध्ये पापाला न्यायदंड ठरविला.
4यासाठी की, नीतिच्या व आवश्यक गोष्टी आपण जे
देहाच्या पापमय स्वभावाप्रमाणे नव्हे तर आत्म्याप्रमाणे
चालतो, त्या आमच्याद्वारे पूर्ण व्हाव्यात.

5कारण जे त्यांच्या मानवी पापी देहाप्रमाणे जगतात ते
देहाच्या गोष्टींचा विचार करतात, परंतु जे आत्म्याने
चालतात व ज्यांचे मन आत्म्याच्या गोष्टींकडे लागलेले
असते ते त्याप्रमाणे जीवन जगतात. 6देहाचे चिंतन हे मरण
आहे. पण आत्म्याचे मनन हे जीवन आणि शांति आहे.
7मानवी स्वभावाचे अधिकार असलेले पापी मन म्हणजे
देवाबरोबर वैर आहे. कारण ते देवाच्या नियमाच्या आधीन
होत नाही, व त्याला आधीन होताही येत नाही. 8कारण जे
देहस्वभावाच्या आधीन आहेत त्यांना देवाला प्रसन्न करता
येत नाही.

9देवाचा आत्मा तुम्हांमध्ये राहतो, तर तुम्ही देहाचे नसून
आत्म्याचे आहात. परंतु जर कोणाला ख्रिस्ताचा आत्मा
नसेल तर तो ख्रिस्ताचा नाही. 10उलट जर ख्रिस्त तुम्हांमध्ये
आहे व तुमचा देह पापामुळे मेला आहे तरी नीतिमत्त्वामुळे
तुमच्या आत्म्यातच जीवन आहे. 11आणि ज्या आत्म्याने
येशूला मरणातून उठविले तो त्याचा आत्मा तुम्हांमध्ये
राहतो त्या तुमच्या मर्त्य शरीराला जीवन देईल.

12तर मग बंधूनो, आम्ही कर्जदार आहोत, देहाप्रमाणे
जगण्यास देहाचे नव्हे, 13कारण जर तुम्ही तुमच्या पापी
देहस्वभावाप्रमाणे जीवन जगाल तर तुम्ही मरणार आहात,
परंतु आत्म्याच्या करवी जर तुम्ही देहाची कर्मे ठार माराल
तर तुम्ही जगाल.

14कारण जितक्यांना देवाचा आत्मा चालवितो, तितके
देवाची मुले आहेत. 15पुन्हा भीति वाटू नये म्हणून तुम्हांला
गुलामगिरीचा आत्मा मिळाला नाही, तर तुम्हांला
दत्तकपणाचा आत्मा मिळाला आहे. त्याच्यायोगे आम्ही
"अब्बा, बापा" अशी हाक मारतो. 16तो आत्मा स्वतः
आपल्याबरोबर दुजोरा देतो की, आपण देवाची मुले आहोत.
17आपण जर देवाची मुले आहोत तर आम्ही वारसही
आहोत आणि ख्रिस्ताबरोबर वारस आहोत. खरोखर आपण
त्याच्याबरोबर दुःख भोगतो यासाठी की, त्याच्याबरोबर
आपणांस गौरवही मिळावे.

## भविष्यात आम्हांला गौरव मिळेल

18कारण भविष्यकाळात आपल्याला प्रगट करण्यात
येणाऱ्या गौरवाच्या तुलनेने सध्याच्या काळातील दुःखे
काहीच नाहीत असे मी मानतो. 19कारण निर्माण केलेले
जग पुत्राच्या प्रगट होण्याच्या काळाची वाट पाहत आहे.
20निर्माण केलेले जग सर्व स्वाधीन होते ते इच्छेने नव्हे
तर देवाने ते अधीन ठेवले होते म्हणून, 21या आशेने की,
निर्माण केलेले जग त्याच्या अशुद्धतेच्या गुलामगिरीतून
मुक्त व्हावे. व देवाच्या मुलांचे वैभवी गौरव त्याने उपभोगावे.

22कारण आपल्याला माहीत आहे की, आजपर्यंत, निर्माण
केलेले संपूर्ण जग कण्हत, वेदना भोगीत आहे. 23परंतु
निर्माण केलेले जगच नव्हे तर आपणांस ज्यांना आत्म्याचे
प्रथम फळही मिळाले आहे ते, आपणही संपूर्ण
दत्तकपणासाठी आपल्या शरीराच्या नाशवंत, मर्त्य
स्वभावापासून मुक्ती व्हावी म्हणून आतल्याआत कण्हत
आहोत. 24आपण आपल्या मनातील या आशेने तारले
गेलो आहोत. परंतु आपण ज्याची आशा धरली ते पाहू
शकलो तर ही आशा नसेल. कारण जे पाहतो त्याची
आशा कोण धरील? 25परंतु जर आपण जे पाहत नाही
त्याची आशा धरतो तर आपण धीराने त्याची वाट पाहतो.

26जेव्हा आपण कण्हतो तेव्हा आत्माही आपल्या
अशक्तपणात आपणांस मदत करतो. कारण कशासाठी
आपण प्रार्थना करावी, हे आपणांस माहीतसुद्धा नसते.
परंतु आत्मा स्वतः आपणांसाठी शब्दांनी जे व्यक्त करता

येत नाही, अशा कण्हण्याने मध्यस्थी करतो. 27परंतु जो
देव आपली अंत:करणे शोधतो त्याला आत्म्याचा हेतू
काय आहे हे माहीत आहे. कारण देवाच्या इच्छेने आत्मा
संताच्या वतीने मध्यस्थी करतो.

28आणि आपणास माहीत आहे की, प्रत्येक गोष्टीत
हेतूप्रमाणे आत्मा जे देवावर प्रेम करतात व त्याच्या
संकल्पाप्रमाणे बोलाविलेले असतात त्यांच्यासह जे चांगले
आहे ते करण्याचे काम करतो. 29ज्यांना देवाने अगोदरच
निवडले होते त्यांना त्याच्या पुत्राच्या सारखे व्हावे म्हणून
नेमले होते. यासाठी की देवाचा पुत्र पुष्कळ बंधूंमध्ये
ज्येष्ठ व्हावा. 30देवाने ज्यांना अगोदरच नेमले होते, ज्यांना
बोलाविले होते त्यांना नीतिमान केले आणि ज्यांना नीतिमान
केले त्यांना गौरवसुद्धा दिले.

## देवाची ख्रिस्त येशूमधील प्रीति

31यावरून आपण काय म्हणावे? देव जर आपल्या
बाजूचा आहे तर आपल्या विरुद्ध कोण? 32ज्याने आपल्या
पुत्राला राखून ठेवले नाही, परंतु आपणा सर्वांसाठी
मरण्यासाठी दिले तो आपणांला पुत्रासह सर्व काही देणार
नाही काय? 33देवाच्या निवडलेल्या लोकांवर आरोप कोण
ठेवील? देव हाच एक त्यांना निरपराध ठरवितो. 34दोषी
ठरवितो तो कोण? जो मेला आणि याहीपेक्षा अधिक
महत्त्वाचे म्हणजे जो उठविला गेला व देवाच्या उजवीकडे
बसला आहे, जो आपल्या वतीने मध्यस्थी करतो तो ख्रिस्त
येशू आहे. 35ख्रिस्ताच्या प्रेमापासून आपणांस कोण वेगळे
करील? त्रास, कष्ट, छळ, भूक, नग्नता, संकटे किंवा
तलवारीने वध हे वेगळे करतील काय? 36असे लिहिले
आहे की,

> "दिवसभर आम्ही तुझ्यामुळे वधले जात आहोत.
> आम्हांला कापायला नेत असलेल्या मेंढराप्रमाणे
> समजतात." *स्तोत्र. 44:22*

37तरी या सर्व गोष्टींमध्ये आम्ही ज्याने आम्हांवर प्रीति
केली त्याच्याद्वारे अत्यंत वैभवी जय मिळवीत आहोत.
38कारण माझी खात्री आहे की, मरण किंवा जीवन,
देवदूत, अधिकारी आत्मे हल्लीच्या किंवा भविष्यकाळात,
39येशूचे सामर्थ्य, उंच किंवा खाली, जगात निर्माण केलेली
कुठलीही गोष्ट आपणांस देवाचे प्रेम जे ख्रिस्तामध्ये आढळते
त्यापासून वेगळे करू शकणार नाही.

## देव आणि यहूदी लोक

9 मी ख्रिस्तामध्ये खरे बोलतो, खोटे बोलत नाही. पवित्र
आत्म्याने बोध केलेला माझा विवेक मजविषयी साक्ष
देतो 2की, मला मोठे दु:ख आहे आणि माझ्या अंत:करणात
सतत वेदना आहेत, 3कारण माझे भाऊ, वंशाने माझे
नातेवाईक यांच्याकरिता शापित व्हावे आणि ख्रिस्तापासून
मी वेगळा केलेला असावा अशी मी इच्छा करतो. 4इस्राएली
कोण आहेत? ते देवाचे निवडलेले लोक आहेत. या
लोकांकडे देवाचे गौरव आणि देवाने त्यांच्याशी केलेला
करार आहे. देवाने त्यांना नियमशास्त्र दिले. आणि उपासना
करण्याचा योग्य मार्ग दिला. आणि देवाने त्यांना त्याचे
अभिवचन दिले आहे. 5त्यांचे पूर्वज थोर आहेत. मानवी
दृष्टीने सांगताना ख्रिस्त त्यांच्यापासून आला, जो
सदासर्वकाळ सर्व लोकांवर धन्यवादित देव आहे. आमेन.

6परंतु देवाचे वचन व्यर्थ झाले असे नाही. कारण सर्व
जण जे इस्त्रएलापासून आले आहेत ते खरोखरच इस्राएली
आहेत असे नाही. 7याचा अर्थ असाही नाही की, ते
अब्राहामापासून आलेले आहेत, म्हणून खरोखरच ती
अब्राहामाची मुले आहेत, तर देवाने म्हटल्याप्रमाणे,
"इसहाकाच्या वंशातील लोकांना तुझे संतान म्हटले
जाईल."* 8म्हणजे देहदृष्ट्या जन्मली ती देवाची मुले आहेत
असे नाही तर वचनाच्या मुलांना संतान म्हटले आहे.
9"नेमलेल्या वेळी मी परत येईन त्यावेळेला सारेला पुत्र
होईल."* आणि हे ते वचन आहे.

10इतकेच नव्हे तर रिबेकासुद्धा एकाकडून म्हणजे
आपला पूर्वज इसहाक याच्याकडून गरोदर झाली. 11मुले
जन्माला येण्यापूर्वी आणि त्यांनी काही बरे किंवा वाईट
केले नव्हते, तेव्हा निवडीवरून असणारा देवाचा पूर्वसंकल्प
कायम राहावा, म्हणजे कर्मावरून नाही तर
बोलावणाऱ्याच्या इच्छेवरून घडावे. 12म्हणून तिला
सांगितले होते की, "वडील धाकट्याची सेवा करील."*

13पवित्र शास्त्रात लिहिले आहे की, "मी याकोबावर
प्रेम केले आणि एसावाचा द्वेष केला."*

14तर मग आपण काय म्हणावे? देवाच्या ठायी अन्याय
नाही. आहे काय? खात्रीने नाही. 15कारण तो मोशेला
म्हणाला, "ज्याच्यावर मला दया करायची त्यावर मी दया
करीन, आणि ज्याच्यावर करुणा करायची त्याच्यावर
करुणा करीन."* 16म्हणून ते इच्छा करणाऱ्या वर
किंवा पाळणाऱ्यावर नव्हे तर दयाळू देवावर अवलंबून
आहे. 17कारण पवित्र शास्त्रात देव फारोला म्हणाला,
"याच हेतूसाठी मी तुला उच्च केले यासाठी की मी तुझ्यामध्ये
आपले सामर्थ्य दाखवावे आणि माझे नाव सर्व पृथ्वीवर
गाजविले जावे."* 18म्हणून देव ज्याच्यावर दया करायची
त्यास दया करतो आणि ज्यास कठीण करायचे त्यास
कठीण करतो.

---

**इसहाकाच्या ... जाईल** उत्पत्ति 21:12

**नेमलेल्या ... होईल** उत्पत्ति 18:10,14

**वडील ... करील** उत्पत्ति 24:23

**मी ... केला** मलाखी 1:2-3

**ज्याच्यावर ... करीन** निर्गम 33:19

**याच ... जावे** निर्गम 9:16

19तुमच्यापैकी एखादा मला म्हणेल, “देव जर आमच्या
कृति नियंत्रित करतो तर तो अजूनही आमचे दोष का
काढतो? शेवटी त्याच्या इच्छेला कोण विरोध करील?”
20होय, हे मानवा, देवाला उलट उत्तर देणारा तू कोण
आहेस? जे घडले आहे ते घडणाऱ्याला, “तू मला असे का
केलेस” असे विचारील काय? 21एका ठराविक
गोळ्यापासून एक भांडे गौरवासाठी आणि एक भांडे
अपमानासाठी करावे असा कुंभाराला मातीवर अधिकार
नाही काय?
22परंतु देवाला जरी त्याचा राग आणि सामर्थ्य व्यक्त
करावेसे वाटत होते, तरी त्याने जी माणसे नाशासाठी
नेमलेली होती, त्यांचे मोठ्या धीराने सहन केले नाही
काय?
23जी त्याच्या दयेची पात्रे होणार होती, त्यांना त्याने
गौरव मिळण्यासाठी तयार केले, त्यांचे त्याने सहन केले
यासाठी की त्यांना त्याच्या दयेची विपुलता कळावी. 24ज्या
आपणांला त्याने फक्त यहूद्यांतूनच नव्हे तर विदेशातूनही
बोलाविले होते. 25होशेयाच्या ग्रंथात पवित्र शास्त्र सांगते,

“जे माझे लोक नव्हते, त्यांना मी माझे लोक म्हणेन.
आणि ज्या स्त्रीवर प्रीति केली नव्हती तिला प्रिय म्हणेन.”
*होशेय 2:23*

26“आणि असे होईल की, जेथे ‘तुम्ही माझे लोक नाहीत’
असे म्हटले होते तेथे त्यांना जिवंत देवाची मुले म्हणण्यात
येईल.” *होशेय 1:10*

27आणि यशया इस्राएलाविषयी असे ओरडून सांगतो
की,
“जरी इस्त्राएलाविषयी मुलांची संख्या समुद्राच्या
वाळूसारखी असली तरी त्यांच्यातील फक्त थोडेच तारण
पावतील. 28कारण पूर्ण करून व आटोपते घेऊन प्रभु
पृथ्वीवर आपला शब्द अंमलात आणील.”*
29आणि जसे यशयाने पूर्वी सांगितले होते,
“जर सेनाधीश परमेश्वराने आम्हांसाठी बीज राहू दिले
नसते तर आम्ही सदोम आणि गमोरासारखे झालो
असतो.”*
30तर मग आपण काय म्हणावे? आम्ही असे अनुमान
काढतो की, जे यहूदीतर देवाला अपेक्षित असलेल्या
नीतिमत्त्वाच्या मागे लागले नव्हते त्यांना त्यांचे न्यायीपण
विश्वासाचा परिणाम म्हणून मिळाले. 31परंतु इस्राएल लोक
जे नियमशास्त्राच्या पालनातून मिळणाऱ्या नीतिमत्त्वाच्या
मागे लागले होते त्यांना नियमशास्त्र मिळाले नाही. 32का
नाही? कारण ते हे नीतिमत्त्व विश्वासाने नाही तर त्यांनी
केलेल्या कर्मांनी मिळेल असे समजून त्याच्या मागे लागले
होते व ते अडखळण्याच्या दगडावर ठेचाळले. 33पवित्र
शास्त्रात असे लिहिले आहे,

“पाहा मी सीयोनात अडखळण्याचा दगड आणि अपाय
करणारा खडक ठेवतो. परंतु जो त्याच्यावर विश्वास
ठेवतो तो लज्जित होणार नाही.”
*यशया 8:14; 28:16*

10 बंधूनो, इस्राएलाच्या वतीने माझी मनीषा आणि
देवाजवळ प्रार्थना आहे की, 2त्यांचे तारण व्हावे,
कारण मी त्यांच्याविषयी साक्ष देतो की, त्यांना देवाविषयी
कळकळ आहे, परंतु ती ज्ञानावर आधारित नाही.
3देवापासून मिळणाऱ्या नीतिमत्त्वाविषयी त्यांना माहिती
नसल्यामुळे ते आपलेच नीतिमत्त्व स्थापावयास पाहत होते.
त्यामुळे ते देवाच्या नीतिमत्त्वाला वश झाले नाहीत. 4कारण
ख्रिस्त नियमशास्त्राचा शेवट आहे यासाठी की, जे विश्वास
ठेवतात त्यांना नीतिमत्त्व मिळावे.
5नियमशास्त्राद्वारे मिळणाऱ्या नीतिमत्त्वाविषयी मोशे
लिहितो, “जो मनुष्य या गोष्टी करतो तो त्याकडून जगेल.”*
6विश्वासाने मिळणारे नीतिमत्त्व हे सांगते, “तुम्ही आपल्या
मनात म्हणू नका की स्वर्गात कोण जाईल? (म्हणजे
ख्रिस्ताला खाली आणावयास) 7किंवा “खाली अधोलोकात
कोण जाईल? (म्हणजे ख्रिस्ताला मेलेल्यातून वर
आणायला). 8नाही! शास्त्र काय म्हणते? “ते वचन
तुमच्याजवळ, तुमच्या मुखात, तुमच्या अंत:करणात
आहे.”* ते वचन हे आहे 9की, जर तू तुझ्या मुखाने
“येशू प्रभु आहे” असा विश्वास धरतोस आणि आपल्या
अंत:करणात देवाने त्याला मेलेल्यांतून उठविले असा
विश्वास धरतोस तुझे तारण होईल 10कारण नीतिमत्त्वासाठी
मनुष्य अंत:करणाने विश्वास ठेवतो आणि तारणासाठी
विश्वासाने कबूल करतो. 11शास्त्र सांगते, “जो कोणी
त्याच्यावर विश्वास ठेवतो तो लज्जित होणार नाही.”*
12याचे कारण की, यहूदी आणि ग्रीक यांच्यात भेद नाही.
कारण प्रभु हा सर्वांचा प्रभु आहे. जे हाक मारतात त्या
सर्वांवर दया करण्या इतका तो संपन्न आहे. 13कारण “जे
कोणी प्रभूचे नाव घेऊन हाक मारतील, त्यांचे तारण
होईल.”*
14परंतु ज्याच्यावर त्यांनी विश्वास ठेवला नाही त्याला
हाक मारणे त्यांना कसे शक्य होईल? ज्याच्याविषयी त्यांनी
ऐकले नाही त्याच्यावर विश्वास ठेवणे त्यांना कसे शक्य

---

**जरी … आणील** यशया 10:22-23

**जर … असतो** यशया 1:9

**जो मनुष्य … जगेल** लेवीय 18:5

**वचन 6–8** अनुवाद 30:12-14

**जो कोणी … नाही** यशय 28:16

**जे कोणी … होईल** योएल 1 2:32

होईल? आणि जर कोणी त्यांना उपदेश केला नाही, तर
ते कसे ऐकतील? [15]त्यांना जर पाठविले नाही तर उपदेश
करणे त्यांना कसे शक्य होईल? असे लिहिले आहे की,
“शुभवार्ता आणणाऱ्याचे पाय किती सुंदर आहेत!”*

[16]परंतु सर्वच यहूद्यांनी ती शुभवार्ता स्वीकारली नाही.
यशयाने म्हटल्याप्रमाणे “प्रभो, आम्ही ज्या गोष्टी त्यांना
सांगितल्या, त्यावर कोणी विश्वास ठेवला?” [17]म्हणून जे
ऐकले त्याचा परिणाम विश्वास आणि जेव्हा कोणी
येशूविषयी उपदेश केला.

[18]परंतु मी म्हणतो, “त्यांनी आमचा उपदेश ऐकला
नव्हता काय?” होय. त्यानी ऐकला; आत्मा म्हणतो:

“त्यांच्या आवाजाचा नाद सर्व पृथ्वीवर गेला आहे आणि त्यांचे शब्द पृथ्वीच्या शेवटापर्यंत गेले आहेत.”
*स्तोत्र. 11:4*

[19]परंतु मी म्हणतो, “इस्राएल लोकांना कळले नव्हते
काय?” होय, त्यांना कळले. प्रथम मोशे म्हणतो,

“खरे तर ज्या लोकांचे राष्ट्र नाही त्यांचा उपयोग करून मी तुम्हांला मत्सरी करीन. विश्वासहीन राष्ट्राचा उपयोग करून मी तुम्हांला राग आणीन.” *अनुवाद 32:21*

[20]नंतर यशया फार धीट होऊन म्हणतो,

“जे मला शोधीत नव्हते त्यांना मी सापडलो, जे माझी चौकशी करीत नसत त्यांना मी प्रगट झालो.”
*यशया 65:1*

[21]परंतु देव इस्राएल लोकांविषयी म्हणतो, “ज्या लोकांनी
माझी आज्ञा मोडली, आणि मला विरोध केला त्यांच्याकडे
सर्व दिवसभर मी आपले हात पसरले आहेत.”*

## देव त्याच्या लोकांना विसरला नाही

11 तर मग मी म्हणतो, “देवाने आपल्या लोकांना
सोडून दिले आहे काय?” खात्रीने नाही! कारण
मीही इस्राएली आहे. अब्राहामापासूनचा, बन्यामिन
वंशातला. [2]देवाला ज्यांचे पूर्वज्ञान होते त्या इस्राएली लोकांना
त्याने सोडून दिले नाही. एलियासंबंधी पवित्र शास्त्र काय
म्हणते ते तुम्हांस ठाऊक नाही काय? तो देवाजवळ इस्राएल
लोकांविरुद्ध अशी विनंति करतो की,

[3]“हे प्रभु, त्यांनी तुझ्या भविष्यवाद्यांना ठार मारले आहे.
त्यांनी तुझ्या वेद्या पाडून टाकल्या आहेत. तुझ्या संदेष्ट्यां
पैकी मीच एकटा राहिलो आहे. आणि ते माझाही जीव
घ्यावयास पाहतात.”* [4]परंतु त्याला देवाचे काय उत्तर
मिळाले? देव म्हणतो, “ज्यांनी बालापुढे गुडघे टेकले नाहीत
अशी सात हजार माणसे मी आपणासाठी राखून ठेवली
आहेत.”* [5]त्याच प्रमाणे हल्ली देवाच्या कृपेच्या
निवडीप्रमाणे काही शिल्लक राहिले आहेत. [6]आणि जर
तो देवाच्या कृपेचा परिणाम असेल तर तो लोकांच्या
कर्माचा नाही. नाही तर देवाची कृपा ही कृपाच राहत
नाही. [7]तर मग काय? इस्राएल लोक जे मिळविण्याचा
प्रयत्न करीत होते ते त्यांना मिळाले नाही. परंतु जे निवडलेले
त्यांना मिळाले आणि बाकीचे कठीण झाले. [8]पवित्र शास्त्रात
लिहिल्याप्रमाणे:

“देवाने त्यांना बधीरपणाचा आत्मा, पाहू न शकणारे डोळे ऐकू न शकणारे कान दिले आणि आजपर्यंत हे असे चालूच आहे.” *अनुवाद 29:4*

[9]दाविद म्हणतो,

“त्यांचे मेज त्यांस सापळा आणि फास होवो. त्यांचे पतन
होवो आणि त्यांना अपराधाबद्दल शिक्षा व प्रायश्चित्त मिळो.
[10]दिसू नये म्हणून त्यांचे डोळे अंधकारमय होवोत.
आणि त्यांच्या कष्टाच्या ओझ्याखाली तू सर्वकाळ त्यांच्या
पाठी वाकीव.” *स्तोत्र. 69:22-23*

[11]म्हणून मी असे म्हणतो, यहूद्यांचा नाश व्हावा म्हणून
ते अडखळले नाहीत काय? खात्रीने नाही! त्यांच्या चुकीमुळे
विदेशी लोकांना तारण प्राप्त व्हावे आणि त्यामुळे
त्यांच्यामध्ये ईर्षा उत्पन्न व्हावी म्हणून असे झाले. [12]परंतु
त्यांनी केलेल्या चुकीचा अर्थ जगास विपुलता आणि आमचा
बोध उपदेश न ऐकल्याने त्यांच्या संख्येत झालेला ऱ्हास
याचा अर्थ यहूदीतरास विपुलता तर आमचा बोध
स्वीकारल्याने त्यांचा समावेश झाल्यास किती तरी अधिक
विपुलता येईल.

[13]तर तुम्ही जे यहूदी नाही त्यांना मी निश्चितपणे सांगतो
कारण मी यहूदीतरांसाठी प्रेषित आहे. मी माझ्या सेवेला
मान देतो. [14]या आशेने की, माझ्या हाडामांसातल्यांना
ईर्ष्यावान करून त्यांच्यातील काही जणांचे तारण करावे.
[15]जर देवाने त्यांच्या केलेल्या अव्हेराचा परिणाम जगासाठी
समेट झाला. तर देवाकडून स्वीकार याचा अर्थ मेलेल्यांतून
जिवंत होणे, नाही का? [16]जर प्रथम भाग पवित्र आहे, तर
संपूर्ण पिठाचा गोळा पवित्र आहे. जर झाडाचे मूळ पवित्र
आहे तर फांद्यासुद्धा पवित्र आहेत.

[17]परंतु काही डहाळ्या तोडून टाकण्यात आल्या आणि
तुम्ही रानटी जैतून असता कलम करून लावले गेलात व

---

**शुभवार्ता ... आहेत** यशया 52:7

**ज्या ... आहेत** यशया 65:2

**हे प्रभु ... पाहतात** 1राजे 19:10,14

**ज्यांनी ... आहेत** 1राजे 19:18

जैतुनाच्या पौष्टिक मुळाचे भागीदार झालात. 18तर तुम्ही
त्या तोडलेल्या फांद्यांहून मोठे आहात अशी बढाई मारू
नका. लक्षात ठेवा, तुम्ही मुळाला आधार देत नाही, तर
मूळ तुमचे पोषण करते.
19आता तुम्ही म्हणाल, "होय, आमचे कलम व्हावे
यासाठीच फांद्या तोडल्या होत्या." 20त्या त्यांच्या
अविश्वासामुळे तोडून टाकण्यात आल्या हे खरे आहे
परंतु तुम्ही तुमच्या विश्वासामुळे स्थिर आहात. यास्तव
अभिमान बाळगू नका. तर भीति बाळगा. 21कारण देवाने
जर मूळ फांद्याही राखल्या नाहीत तर तो तुम्हांलाही राखणार
नाही.
22अशा प्रकारे तुम्ही देवाचा दयाळूपणा आणि कठोरताही
पाहा. जे पतन पावले आहेत त्यांच्याविषयी कठोरता परंतु
देवाचा तुमच्याविषयीचा दयाळूपणा, जर तुम्ही त्याच्या दयेत
राहिला नाहीत तर तुम्हांला झाडापासून छाटून टाकले
जाईल. 23आणि इस्राएल त्याच्या अविश्वासात राहिले नाही
तर तेही कलम पुन्हा लावण्यात येईल. कारण देव त्यांना
कलम म्हणून लावण्यास समर्थ आहे. 24म्हणून तुम्ही जे
निसर्गत: रानटी जैतुनांची फांदी म्हणून तोडले गेलात आणि
निसर्गक्रम सोडून मशागत केलेल्या जैतुनाच्या झाडास
कलम असे लावले गेलात तर किती सहजपणे मशागत
केलेल्या जैतुनांच्या फांद्या त्या मूळच्या झाडात कलम
केल्या जातील!
25परंतु बंधूनो, तुम्ही आपल्या शहाणपणावर अवलंबून
या रहस्याविषयी अजाण असावे असे मला वाटत नाही.
इस्राएली लोकांत अंशत: कठीणपणा आला आहे आणि
तो देवाच्या कुटुंबात विदेशी लोकांचा भरणा पूर्ण होईपर्यंत
राहणार आहे. 26आणि नंतर इस्राएलाचे राष्ट्र म्हणून तारण
होईल. असे लिहिले आहे,

"मुक्त करणारा सीयोनातून येईल, तो याकोबाच्या
घराण्यातून त्यांची सर्व अभक्ती दूर करील.
27जेव्हा मी त्यांच्या पातकांची क्षमा करीन. तेव्हा
त्यांच्याशी मी हा करार करीन."

*यशया 59:20-21; 27:9*

28जेथ पर्यंत सुवार्तेचा संबंध आहे ते तुमच्यामुळे शत्रू
आहेत परंतु देवाच्या निवडीमुळे त्याने पूर्वजांना दिलेल्या
वचनाप्रमाणे देव त्यांच्यावर प्रेम करतो. 29कारण देवाने
ज्यांना बोलाविले आहे आणि तो जे देतो त्याच्याविषयी
कधीही आपले मत बदलत नाही.
30कारण जसे तुम्ही पूर्वी देवाची आज्ञा पाळत नव्हता,
परंतु आता तुम्हांला त्यांच्या आज्ञाभंगामुळे देवाची दया
मिळाली आहे. 31त्याचप्रमाणे तेही आता आज्ञा मोडणारे
झाले आहेत, यासाठी की त्यांना आता देवाची कृपा मिळावी.
32कारण देवाने सर्व लोकांना आज्ञाभंगाच्या तरुंगात कोंडले
आहे, यासाठी की, त्याने त्यांच्यावर दया करावी.

## देवाचे गौरव

33देवाच्या बुद्धीची आणि ज्ञानाची संपत्ती किती अगाध
आहे. त्याच्या निर्णय आणि त्याच्या मार्गाचा माग काढणे
कठीण आहे. 34पवित्र शास्त्र सांगते,

"प्रभूचे मन कोणाला माहीत आहे किंवा त्याचा सल्लागार
कोण असेल?" *यशया 40:13*

35"प्रथम कोणी काही त्याला दिले का यासाठी की
त्याची परतफेड देवाने करावी?" *ईयोब 41:11*

36कारण सर्व गोष्टी त्याने निर्माण केल्या आणि त्याच्या
द्वारे अस्तित्वात आहेत. त्याला युगानुयुग गौरव असो.
आमेन.

## आपले जीवन देवाला द्या

12 म्हणून बंधूंनो, देवाच्या दयेमुळे मी तुम्हांला
विनवितो की, तुमची शरीरे देवाला संतोष देणारा
जिवंत यज्ञ अशी अर्पण करा. ही तुमची आध्यात्मिक
सेवा आहे. 2आणि यापुढे या जगाच्या आदर्शाप्रमाणे आचरण
करू नका, त्याऐवजी तुमच्या मनाच्या नवीनपणामुळे तुमचा
बदल होऊ द्या. यासाठी की देवाची पूर्ण आणि त्याला
आनंद देणारी उत्तम इच्छा काय आहे हे तुम्हांला कळावे
व तिचा तुम्ही स्वीकार करावा. 3मला देण्यात आलेल्या
कृपादानाच्या दृष्टीने मी तुम्हांतील प्रत्येकाला सांगतो की,
विचार करण्यास योग्य आहे त्या आपल्या योग्यतेपेक्षा
आपणांला अधिक श्रेष्ठ मानू नका. तर देवाने सोपवून
दिलेल्या परिमाणाप्रमाणे समंजस असा जो मार्ग त्या दृष्टीने
विचार करा. 4कारण एका शरीरात आपले अनेक अवयव
आहेत तरी सर्व अवयवांचे कार्य एकच नसते. 5त्याचप्रमाणे,
आपण पुष्कळ अंग असून ख्रिस्तामध्ये एक शरीर व
एकमेकांचे अवयव आहोत. 6देवाने दाखविलेल्या दयेनुसार
आपणांस निरनिराळी दाने आहेत, जर कोणाला देवाचा
संदेश देण्याचे दान आहे तर त्याने ते आपल्या विश्वासाच्या
प्रमाणाने उपयोगात आणावे. 7जर कोणाला सेवेचे दान
असेल तर त्याने सेवेला वाहून घ्यावे. कोणाला शिक्षणाचे
दान असेल तर त्याने शिक्षणाला वाहून घ्यावे. 8कोणाला
बोध करण्याचे दान असेल तर त्याने बोध करण्यास
वाहून घ्यावे. ज्याला दानधर्म देण्याचे दान असेल त्याने ते
सद्हेतूने द्यावे. ज्याला अधिकाराचे दान असेल त्याने दक्षतेने
ते काम करावे. ज्याला दयेचे दान असेल त्याने आनंदाने
दया करावी.
9तुमची प्रीति प्रामाणिक असावी. जे वाईट त्याचा द्वेष
करा व बऱ्याला चिकटून राहा. 10बंधूप्रेमाच्याबाबतीत
एकमेकांशी ममतेने वागा. आदराच्या बाबतीत स्वत:पेक्षा
इतरांचा बहुमान करा. 11आस्थेविषयी आळशी होऊ नका.
आत्म्यात उत्सुक असा. प्रभूची सेवा करा. 12आपल्या

घरात आनंदी राहा. संकटात सहनशील राहा. चिकाटीने
प्रार्थना करा. 13पवित्र जनांच्या गरजा भागवा. आदरातिथ्य
करण्यात तत्पर असा.
14जे तुमचा छळ करतात त्यांना आशीर्वाद द्या.
आशीर्वादच द्या. शाप देऊ नका. 15जे आनंद करतात
त्यांच्याबरोबर आनंद करा. रडणाऱ्यांबरोबर रडा.
16एकमेकांबरोबर ऐक्याने रहा, गर्व करू नका. त्याऐवजी
नम्र लोकांच्या सहवासात रहा. स्वत:स शहाणे समजू नका.
17कोणाचीही वाईटाबद्दल वाईट अशी फेड करून नका.
सर्व लोकांच्या दृष्टीने चांगले ते करण्याचा प्रयत्न करा.
18शक्य असेल तर ते तुमच्यावर अवलंबून असल्याने
सर्व लोकांबरोबर शांतीने राहा.
19प्रिय बंधूंनो, सूड उगवू नका. देवाच्या रागाला वाट
द्या. असे लिहिले आहे, “सूड घेणे माझ्याकडे आहे. मी
फेड करीन असे प्रभु म्हणतो.”* 20“तुमचा शत्रू भुकेला
असल्यास त्यास खावयास द्या, तहानेला असेल तर प्यावयास
द्या. कारण असे केल्याने तुम्ही त्याच्या डोक्यावर
निखाऱ्यांची रास कराल.”* 21वाइटाने जिंकले जाऊ
नका तर चांगल्याने वाइटास जिंका.
13 प्रत्येकाने वरिष्ठ अधिकाऱ्याच्या अधीन असावे,
कारण देवाने नेमल्यावाचून अधिकार स्थापित
होत नाही व जे आहेत ते देवाने नेमलेले आहेत. 2परिणामी,
जो अधिकाऱ्याला विरोध करतो, तो स्वत:ला जे देवाने
आज्ञापिले आहे त्याला विरोध करतो व जे देवाच्या आज्ञेस
विरोध करतात ते स्वत:वर न्याय ओढवून घेतील.
3अधिकारी चांगल्या कृत्यांसाठी नाही तर वाईट कृत्यांसाठी
धाक असतात. तुला अधिकाऱ्याची भीति वाटू नये काय?
चांगले ते कर म्हणजे तुझी प्रशंसा होईल. 4होय, तो तुझे
चांगले करणारा देवाचा सेवक आहे, परंतु वाईट करशील
तर त्याची भीति बाळग. कारण तो तलवार व्यर्थ बाळगीत
नाही. त्याचे वाईट करणाऱ्याचा सूड घेणारा तो देवाचा
सेवक आहे. 5यासाठी देवाचा राग जो केवळ शिक्षेद्वारे
प्रगट होतो त्याच्यामुळे नव्हे, तर तुझ्या सद्सदविवेकबुध्दीने
अधीन राहणे आवश्यक आहे.
6आणि त्यामुळेच तुम्ही कर देता. कारण ते देवाचे
अधिकारी आहेत. व हेच काम ते करतात. 7तू ज्यांचा
ऋ णी आहेस त्यांचे देणे देऊन टाक. ज्यांना कर द्यावयाचा
त्यांना कर दे. ज्यांना जकात द्यावयाची त्यांना जकात दे.
ज्यांचा धाक धरायचा त्यांचा धाक धर. ज्याला मान
द्यायचा त्याला मान दे.

## लोकांवर प्रीति करणे हाच एक नियम

8एकमेकांवर प्रीति करण्याशिवाय कोणाच्याही ऋ णात
राहू नका. कारण जो इतरांवर प्रीति करतो, त्याने
नियमशास्त्र पाळले आहे. 9“व्यभिचार करू नको, खून
करू नको, चोरी करू नको, वाईटाचा लोभ धरू नको”*
या आज्ञांमुळे मी असे म्हणतो आणि आणखी एखादी आज्ञा
असेल तर ती आज्ञा “जशी आपणांवर तशी आपल्या
शेजाऱ्यावर प्रीति कर”* या शब्दात सामावलेली आहे.
10प्रीति शेजाऱ्याचे वाईट करीत नाही, म्हणून प्रीति
नियमशास्त्राची पूर्णता आहे.
11आणि तुम्ही हे करा कारण तुम्हांस ठाऊक आहे
की, आपण ज्या काळात राहतो त्यातून तुम्ही उठावे अशी
वेळ आली आहे. कारण जेव्हा आम्ही विश्वास ठेवला
त्यापेक्षाही आमचे तारण अधिक जवळ आले आहे. 12रात्र
जवळ जवळ संपत आली आहे आणि ‘दिवस’ जवळ आला
आहे. म्हणून आपण अंधाराची कामे बाजूला टाकू या
आणि प्रकाशाची शस्त्रसामुग्री धारण करू. 13दिवसा आपण
जसे काळजीपूर्वक वागतो, तसे वागू या. खादाडपणात,
मद्यपानात, लैंगिकतेत, स्वैरपणात, भांडणात, द्वेषात नको,
14तर त्याऐवजी येशू ख्रिस्ताला परिधान करा. आणि
आपल्या पापी वासना मध्ये गुंतून राहू नका.

## इतर लोकांवर टीका करू नका

14 जो विश्वासात दुर्बल आहे त्याचा स्वीकार करा.
पण मतभेदावरून भांडणाच्या हेतूने नव्हे.
2एखाद्याचा विश्वास असा असतो की, तो सर्व गोष्टी खाऊ
शकतो, परंतु दुर्बल मनुष्य भाजीच खातो. 3जो कोणत्याही
प्रकारचे अन्न खातो त्याने जो काही विशिष्ट गोष्टी खात
नाही, त्याला तुच्छ मानू नये. आणि जो काही विशिष्ट
गोष्टी खातो त्याने त्याला दोष देऊ नये कारण देवाने
त्याचा स्वीकार केला आहे. 4दुसऱ्याच्या नोकराला दोष
लावणारा तू कोण आहेस? त्याच्या मालकाच्या दृष्टीने तो
स्थिर राहील किंवा त्याचे पतन झाले असताही स्थिर
राहील. कारण त्याला स्थिर करण्यास मालक समर्थ
आहे.
5एखादा मनुष्य एक दिवस दुसऱ्या दिवसापेक्षा अधिक
मानतो परंतु दुसरा मनुष्य प्रत्येक दिवस सारखाच मानतो.
प्रत्येकाने आपल्या मनाची पूर्ण खात्री करून घ्यावी. 6जो
विशेष दिवस पाळतो तो प्रभूचा मान राखण्यासाठी पाळतो
आणि जो कोणत्याही प्रकारचे अन्न खातो तो प्रभूचा मान
राखण्यासाठी खातो. विशिष्ट प्रकारचे अन्न खात नाही तो
प्रभूचा मान ठेवण्यासाठी खात नाही. तो सुद्धा देवाचे आभार
मानतो. 7कारण कोणीही स्वत:साठी जगत नाही. किंवा
मरत नाही. जर आपण जगतो तर प्रभूचे लोक म्हणून
जगतो आणि मरतो तर प्रभूचे लोक म्हणून मरतो. 8म्हणून
जर आपण जगतो किंवा मरतो तर आपण प्रभूचे आहोत.
9ख्रिस्त मेला आणि जिवंत झाला यासाठी की त्याने जे

---

**सूड ... म्हणतो** अनुवाद 32:35

**तुमचा ... कराल** नीतिसूत्रें 25:21-22

**व्यभिचार ... धरू नको** निर्गम 20:13-15,17

**जशी ... प्रीति कर** लेवीय 19:18

आता मेलेले आहेत आणि जे अजूनही जिवंत आहेत त्या
दोघांचा प्रभु व्हावे. 10तेव्हा तू आपल्या बलवान भावाला
दोष का लावतो? किंवा जो अशक्त आहे त्या भावाला
तुच्छ का मानतोस? कारण आपण सर्व जण देवाच्या
न्यायासनासमोर उभे राहणार आहोत. 11असे लिहिले आहे
की,

“प्रभु म्हणतो खात्रीने मी जिंवत आहे प्रत्येक गुडघा
माझ्यासमोर टेकला जाईल आणि प्रत्येक जीभ देवाचे
उपकार मानील.”

यशया *45:23*

12म्हणून प्रत्येक जण आपापल्यासंबंधी देवाला हिशेब देईल.

## इतरांना पाप करू देऊ नका

13म्हणून आपण एकमेकांचा न्याय करण्याचे थांबवू
या. तुम्ही असा निश्चय करावा की, तुम्ही आपल्या भावाच्या
मार्गात पाप करण्यासाठी मोह किंवा अडखळण ठेवणार
नाही. 14मला माहीत आहे आणि मी जो प्रभु येशूमध्ये
आहे त्या माझी खात्री झाली आहे की, जो पदार्थ खाण्यास
अशुद्ध आहे असे समजतो त्याशिवाय कोणताही पदार्थ
मूळचा अशुद्ध नाही. त्याच्यासाठी ते अशुद्ध आहे. 15जर
खाण्यामुळे तुझा भाऊ दु:खी झाला आहे तर तू प्रीतीने
वागत नाहीस. ज्याच्यासाठी ख्रिस्त मरण पावला त्याचा
तुझ्या अन्नाने नाश करू नकोस. 16म्हणून तुम्हांसाठी जे
चांगले आहे त्याची निंदा होऊ नये. 17खाणे पिणे यात
देवाचे राज्य नाही. परंतु नीतिमत्त्व, शांति आणि आनंद,
जो पवित्र आत्म्यात आहे त्यामध्ये आहे. 18जो कोणी अशा
प्रकारे जगून ख्रिस्ताची सेवा करतो तो देवाला आनंद
देणारा आणि सर्व लोकांनी पसंत केलेला असा आहे.
19तर मग आपण शांतीला आणि एकमेकांच्या वाढीला
मदत करणाऱ्या गोष्टींच्या मागे लागावे. 20तुम्ही खाता
त्या अन्नामुळे देवाच्या कार्याचा नाश करू नका. सर्व
गोष्टी शुद्ध आहेत. असंतोषाने खाणे मनुष्यासाठी चुकीचे
आहे. 21मांस न खाणे, द्राक्षारस न पिणे, तुझा भाऊ न
अडखळेल असे करणे चांगले आहे. 22तुझा जो विश्वास
आहे तो देवासमोर तुझ्या ठायी असू दे. ज्याला योग्य आहे
असे वाटते व त्यामुळे जो स्वत:चा द्वेष करीत नाही तो
धन्य. 23जर तो पुढे जाऊन आपण हे टाळावे असा विश्वास
ठेवूनखातो तो देवासमोर दोषी ठरतो. कारण त्याची कृति
विश्वासावर आधारित नाही. ते पाप आहे.

15 आपण जे आत्मिकरीत्या सशक्त आहोत त्या आपण
आपणाला सुखी न करता अशक्तांच्या दुर्बलतेचा
भार वाहिला पाहिजे. 2आपल्यापैकी प्रत्येकाने त्याच्या
शेजाऱ्याला त्यांच्याकरिता व त्यांची उन्नती व्हावी
या हेतूने सुखी करावे. 3ख्रिस्ताने सुद्धा स्वत:ला सुखी
केले नाही. याउलट पवित्र शास्त्रात लिहिले आहे. “तुझी
निंदा करणाऱ्यांनी केलेली निंदा माझ्यावर आली आहे.”*
4आता पवित्र शास्त्रात पूर्वी जे लिहिले होते ते आपल्या
शिक्षणाकरिता लिहिले होते यासाठी की, शास्त्रापासून
मिळणारे उत्तेजन आणि धीर यांची आपण आशा धरावी
म्हणून शिकवितो. 5आणि देव जो धीराचा आणि उत्तेजनाचा
उगम आहे, तो तुम्ही ख्रिस्त येशूच्या उदाहरणाप्रमाणे
एकमेकांबरोबर एकमताने राहावे असे करावे. 6म्हणजे
तुम्ही सर्व जण एक मुखाने देव जो आपला प्रभु येशू
ख्रिस्ताचा पिता याला गौरव द्यावे. 7म्हणून ख्रिस्ताने देवाच्या
गौरवासाठी तुम्हाला स्वीकारले, तसे तुम्ही एकमेकांचा
स्वीकार व स्वागत करा. 8मी तुम्हांस सांगतो देवाच्या
सत्यतेसाठी ख्रिस्त सुंती लोकांचा, यहूदी लोकांचा सेवक
झाला यासाठी की पूर्वजांना दिलेली वचने निश्चित व्हावीत.
9यासाठी की यहूदीतर लोक देवाने त्यांच्यावर दाखविलेल्या
दयेबद्दल गौरव करतील. पवित्र शास्त्रात लिहिले आहे:

“म्हणून विदेशी लोकांमध्ये मी तुझे उपकार मानीन.
आणि तुझ्या नावाची स्तुति करीन.” *स्तोत्र. 18:49*

10आणि पुन्हा शास्त्र असे म्हणते,

“विदेशी लोकांनो, देवाच्या निवडलेल्या लोकांबरोबर
आनंद करा.” *अनुवाद 32:43*

11आणि पुन्हा शास्त्र असे म्हणते,

“अहो सर्व विदेशी लोकांनो, प्रभूचे स्तवन करा आणि
सर्व लोक त्याची स्तुति करोत.” *स्तोत्र. 117:1*

12यशयासुद्धा असे म्हणतो,

“इशायाचे मूळ प्रगट होईल, ते राष्ट्रावर राज्य करावयास
उत्पन्न होईल. ती राष्ट्रे त्याच्यावर आपला विश्वास
ठेवतील.” *यशया 11:10*

13देव जो सर्व आशेचा उगम, त्याच्यावर विश्वास
ठेवणाऱ्या तुम्हांला तो आनंदाने व शांतीने भरो, यासाठी
की, तुम्ही पवित्र आत्म्याच्या सामर्थ्याने आशेत विपुल
व्हावे.

## पौल त्याच्या कामाविषयी बोलतो

14माझ्या बंधूंनो, मी तुम्हांविषयी निश्चिंत आहे की,
तुम्ही चांगुलपणाने, ज्ञानाने पूर्ण भरलेले व एकमेकांस
बोध करावयास समर्थ आहात. 15परंतु तुम्हांला धीटपणे

---

**तुझी … आहे** स्तोत्र. 69:9

काही गोष्टींची आठवण देण्यासाठी लिहिले आहे. मी हे
देवाने दिलेल्या देणगीमुळे असे केले. 16ते हे की, विदेशी
लोकांची सेवा करण्यासाठी मी ख्रिस्त येशूचा सेवक व्हावे
व देवाच्या सुवार्तेचे याजकपण करावे, अशासाठी परराष्ट्रीय
हे देवाला मान्य, पवित्र आत्म्याचे समर्पित असे व्हावे.

17तर मग मी जो आता ख्रिस्त येशूमध्ये आहे तो देवाशी
संबंधित असलेल्या गोष्टीत अभिमान बाळगतो. 18कारण
माझ्या शब्दांनी आणि कृत्यांनी विदेशी लोकांनी आज्ञापालन
करावे अशा ज्या गोष्टी ख्रिस्ताने माझ्या करवी घडविल्या
नाहीत, त्या सांगण्याचे धैर्य मी करणार नाही. 19अद्भुते,
चमत्काराच्या व देवाच्या आत्म्याच्या सामर्थ्याने मी
यरुशलेमेपासून इल्लूरिकमाच्या सभोवती ख्रिस्ताची सुवार्ता
सांगण्याचे पूर्ण केले आहे. 20जेथे ख्रिस्ताचे नाव सांगितले
जात नाही अशा ठिकाणी सुवार्ता सांगण्याची माझी आकांक्षा
आहे. यासाठी की मी दुसऱ्याच्या पायावर बांधु नये. 21परंतु
असे लिहिले आहे,

"ज्यांना त्याचे वर्तमान आले नाही ते ऐकतील आणि
ऐकले नाही ते समजतील." *यशया 52:15*

22या कारणांमुळे मला तुमच्याकडे येण्यास पुष्कळ वेळा
अडथळा झाला.

23परंतु ज्या अर्थी मला या प्रांतात एकही ठिकाण राहिले
नाही, व पुष्कळ वर्षांपासून तुम्हांला भेटण्याची माझी इच्छा
आहे. 24जेव्हा मी स्पेनला जाईल तेव्हा तुम्हांला भेटण्याचा
विचार करीत आहे व तुमच्याविषयी माझे मन भरल्यावर
माझ्या त्या प्रवासात तुम्ही मला मदत कराल अशी आशा
आहे. 25पण मी यरुशलेमातील संतांच्या सेवेसाठी जात
आहे. 26कारण मासेदोनिया आणि अखिया येथील
मंडव्यांनी यरुशलेमेतील गरीब संत जनांना मदत करण्याचे
ठरविले आहे. 27ते त्यांचे ऋणी आहेत. व त्यांनी हे
करण्याचे ठरविले आहे, कारण जर यहूदीतरांना
इस्राएलाच्या आशीर्वादात भागी मिळाली आहे, तर त्यांनी
त्यांच्या ऐहिक गरजा भागवून त्यांची सेवा करावी. 28मग
हे काम संपवून त्याचे फळ सुरक्षितपणे त्यांच्या हाती
सोपविल्यावर जेव्हा मी स्पेनला जाण्यासाठी निघेन, तेव्हा
मी त्या मार्गाने जात असता तुमच्या शहरातून जाईन.
29आणि मला माहीत आहे की, मी जेव्हा तुमच्याकडे
येईन, तेव्हा ख्रिस्ताच्या पूर्ण आशीर्वादाने भरलेला असा
येईन.

30बंधूंनो, आपल्या प्रभु येशू ख्रिस्तामुळे आणि
आत्म्याकडून जे प्रेम आपणांकडे येते त्यामुळे माझ्या वतीने,
माझ्याबरोबर देवाजवळ आग्रहाने प्रार्थना करण्याची विनंति
करतो. 31यासाठी की यहूदीयात जे अविश्वासू आहेत
त्यांच्यापासून माझी सुटका व्हावी आणि यरुशलेमेतील
मंडळीतील माझी सेवा संताना मान्य व्हावी. 32यासाठी की,
देवाच्या इच्छेने मी तुम्हांकडे आनंदाने यावे आणि
तुम्हांबरोबर ताजेतवाने व्हावे. 33शांतीचा देव तुम्हा
सर्वांबरोबर असो. आमेन.

## पौलाला काही गोष्टी शेवटी सांगायच्या आहेत

16 किंख्रिया येथील मंडळीची सेविका, आमची बहीण
फिबी हिची मी तुम्हांला शिफारस करतो 2की,
संतांना योग्य अशा प्रकारे तुम्ही तिचा स्वीकार करावा.
आणि तिला तुमच्याकडून जी मदत लागेल ती करावी.
कारण माझ्यासह ती पुष्कळांना मदत करणारी होती.

3ख्रिस्तामध्ये माझे सहकारी प्रिस्किल्ला आणि अक्विला
यांना सलाम सांगा. 4ज्यांनी माझ्यासाठी आपले जीव धोक्यात
घातले होते. त्यांचे केवळ मीच आभार मानतो असे नाही,
तर विदेशात स्थापन झालेल्या मंडळयाही आभार मानतात.
5त्याशिवाय त्यांच्या घरी जी मंडळी जमते तिलाही सलाम
सांगा.

माझा प्रिय मित्र अपैनत जो ख्रिस्तासाठी आशिया
खंडातील प्रथम फळ आहे यालाही सलाम सांगा. 6मरीया
जिने तुमच्यासाठी फार काम केले तिला सलाम सांगा.
7अंद्रोनीक आणि युनिया, माझे नातेवाईक आणि
सहबंदिवान जे प्रेषितांमध्ये नामांकित आहेत व ख्रिस्तात
माझ्यापूर्वी होते त्यांना सलाम सांगा. 8प्रभूमध्ये माझा प्रिय
आंप्लियात याला सलाम सांगा. 9ख्रिस्तामध्ये आमचा
सहकारी उर्बान व माझा प्रिय मित्र स्ताखु यांना सलाम
सांगा.

10ख्रिस्तामध्ये पसंतीस उतरलेला अपिल्लेस याला सलाम
सांगा. अरिस्तबूल याच्या घरातील मंडळीस सलाम सांगा.
11माझा नातेवाईक हेरोदियोन आणि नार्किसास याच्या
घरातली मंडळी जी प्रभूमध्ये आहे, त्यांना सलाम सांगा.
12त्रुफैना आणि त्रुफीसा जे प्रभूमध्ये श्रम करणारे आहेत
त्यांना सलाम सांगा. प्रिय पर्सिस जिने प्रभूमध्ये फार श्रम
केले आहेत तिला सलाम सांगा.

13प्रभूमध्ये निवडलेला रूफ आणि त्याची आई जी माझीही
आई आहे तिला सलाम सांगा. 14असुंक्रित, फ्लगोन, हर्मेस,
पत्रबास, हर्मास आणि त्यांच्याबरोबर जे बंधु आहेत त्यांना
सलाम सांगा. 15फिललग, युलिया, निरिय, त्याची बहीण
ओलुंपा आणि त्याच्याबरोबर असलेले सर्व संतगण यांना
सलाम सांगा. 16पवित्र चुंबनाने एकमेकांना सलाम करा.
ख्रिस्ताच्या सर्व मंडव्या तुम्हांला सलाम सांगतात.

17बंधूजनहो, मी तुम्हांस विनंति करतो की, तुम्हांला जे
शिक्षण मिळाले आहे त्याविरुद्ध जे कलह आणि असंतोष
निर्माण करतात त्यांच्यावर लक्ष ठेवा व त्यांच्यापासून दूर
राहा. 18असे लोक आपल्या प्रभूची सेवा करीत नाहीत,
परंतु स्वत:च्या पोटाची सेवा करतात. आपल्या मधुर व
खुशामत करणाऱ्या भाषणाने भोव्व्या लोकांची फसवणूक
करता. 19त्यांच्यापासून दूर राहा कारण सर्व विश्वास
णाऱ्यांना तुम्ही किती आज्ञाधारक आहात हे माहीत आहे,
म्हणून तुम्हाविषयी मी फार आनंदात आहे. परंतु मला

तुम्ही जे चांगले त्याविषयी शहाणे आणि वाईटाविषयी भोळे
असावे असे वाटते. 20शांतीचा देव लवकरच सैतानाला
तुमच्या पायदळी तुडवील आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताची
कृपा तुम्हांबरोबर असो. 21माझा सहकारी तिमथ्य
त्याचप्रमाणे माझे नातेवाईक लुक्य, यासोन व सोसिपतेर
हे तुम्हांला सलाम सांगतात. 22पौलासाठी हे पत्र लिहून
देणारा मी तर्तिय तुम्हांला प्रभूमध्ये सलाम सांगतो.

23माझे व सर्व मंडळीचे आतिथ्य करणारा गायस तुम्हांला
सलाम सांगतो. नगराचा खजिनदार एरास्त आणि आमचा
भाऊ क्वर्त तुम्हांला सलाम सांगतात. 24(आपला प्रभु येशू
ख्रिस्त याची कृपा तुम्हा सर्वांबरोबर असो. आमेन.) 25आता
देव जो तुमच्या विश्वासात, तुम्हांला मी सांगत असलेल्या
सुवार्तेप्रमाणे आणि प्रभु येशू ख्रिस्ताविषयी विदित करण्यास
व तुमच्या विश्वासात स्थिर करण्यास समर्थ आहे, त्याला
व देवाच्या रहस्याच्या प्रकटीकरणाला, धरून जे पुष्कळ
काळपर्यंत गुप्त ठेवले होत ते प्रकट करणाऱ्या देवाला
गौरव असो. 26परंतु आता आपणांला भविष्यवाद्यांच्या
लिखाणाद्वारे दाखवून दिले आहे की, हे गुप्त सत्य सनातन
देवाच्या आज्ञेप्रमाणे सर्व परराष्ट्रीयांनी विश्वासापासून
आज्ञाधारकपणा निर्माण करावा यासाठी माहीत करून
दिले आहे. 27एकच ज्ञानी देव त्याला येशू ख्रिस्ताद्वारे
युगानुयुगे गौरव असो. आमेन.

# पौलाचे करिंथकरांस पहिले पत्र

1 देवाच्या इच्छेप्रमाणे ख्रिस्त येशूचा प्रेषित होण्याकरिता
निवडलेला, मी पौल आणि बंधु सोस्थनेस यांजकडून
2देवाच्या सेवेला समर्पित केलल्या करिंथ येथील मंडळीस
तसेच देवाने पवित्र होण्यास बोलाविलेल्या (पाचारलेल्या)
व येशू ख्रिस्ताच्या नावावर विश्वास ठेवणऱ्या सर्व बंधूजनांस:
3देव पिता आणि त्यांचा व आपला प्रभु (येशू ख्रिस्त)
यांजपासून कृपा व शांति असो.

## पौल देवाचे उपकार मानतो

4मी नेहमीच माझ्या देवाचे तुमच्यासाठी उपकार मानतो.
कारण ख्रिस्त येशूमध्ये देवाची कृपा तुम्हांला मिळाली
आहे, 5–6त्याच्यामध्ये तुम्ही प्रत्येक बाबतीत संपन्न झाला
आहात : सर्व प्रकारच्या बोलण्यात व सर्व प्रकारच्या
ज्ञानात, जशी आम्ही ख्रिस्ताविषयी साक्ष दिली, तुमच्यात
ती पक्की झाली, याचा परिणाम असा झाला की, 7तुम्ही
कोणत्याही दानात कमी पडत नाही, कारण तुम्ही ख्रिस्ताच्या
येण्याची वाट पाहता. 8तो सुद्धा आपल्या प्रभु येशूच्या
दिवशी शेवटपर्यंत तुम्हांस निर्दोष असे प्रस्थापित करील.
9ज्याने आपला पुत्र येशू ख्रिस्त, आपला प्रभु याच्या
सहभागीपणात तुम्हांला बोलावले होते तो देव विश्वसनीय
आहे.

## करिंथ येथील मंडळीतील समस्या

10परंतु बंधूनो, प्रभु येशू ख्रिस्ताच्या नावांमध्ये मी तुम्हांस
विनंति करतो की, तुम्ही सर्वांनी सारखेच बोलावे आणि
तुमच्यात मतभेद असू नयेत, तर तुम्ही एकाच विचाराने
व एकाच हेतूने परिपूर्ण व्हावे. 11कारण क्लोएच्या घरातील
माणसांकडून मला असे कळविण्यात आले की, तुमच्यात
भांडणे आहेत, 12माझे म्हणणे असे आहे की तुमच्यातील
प्रत्येक जण म्हणतो, "मी पौलाचा आहे," "मी अपुल्लोचा
आहे," "मी पेत्राचा आहे," "मी ख्रिस्ताचा आहे." 13ख्रिस्त
विभागला गेला आहे का? पौल वधस्तंभावर तुमच्यासाठी
खिळला गेला होता का?" पौलाच्या नावाने तुमचा बाप्तिस्मा,
झालाय का? 14मी देवाचे आभार मानतो की, क्रिस्प व
गायस यांच्याशिवाय मी कोणाचाही बाप्तिस्मा केला नाही.
15यासाठी की कोणीही म्हणू नये की, माझ्या नावात
तुमचा बाप्तिस्मा करण्यात आला. 16स्तेफनाच्या
घरच्यांचासुद्धा मी बाप्तिस्मा केला, पण उरलेल्यांविषयी
म्हणाल, तर इतर कोणाचाही बाप्तिस्मा केल्याचे मला
आठवत नाही. 17कारण ख्रिस्ताने मला बाप्तिस्मा
करण्यासाठी नाही तर सुवार्ता सांगण्यासाठी पाठविले, ती
भाषणाच्या ज्ञानाने नव्हे, तर अशासाठी की, ख्रिस्ताच्या
वधस्तंभाचे सामर्थ्य निरर्थक होऊ नये.

## ख्रिस्तामध्ये देवाचे सामर्थ्य आणि ज्ञान

18कारण ज्यांचा नाश होत आहे अशांसाठी
वधस्तंभाविषयीचा संदेश मूर्खपणाचा आहे, परंतु ज्यांचे
तारण होत आहे, अशांसाठी तो देवाचे सामर्थ्य आहे.
19कारण पवित्र शास्त्रांत असे लिहिले आहे,

"शहाण्यांचे शहाणपण मी नष्ट करीन, आणि बुद्धिवंतांची
बुध्दि मी बाजूला करीन." *यशया 29:14*

20ज्ञानी मनुष्य कोठे आहे? विद्वान कोठे आहे? या
जगातील वाद घालणारा कोठे आहे? देवाने जगाचे ज्ञान
मूर्खपणाचे ठरविले नाही का? 21म्हणून, देवाच्या ज्ञानात
असतानाही, जगाला स्वत:च्या ज्ञानाने देवाला ओळखता
आले नाही, आम्ही जो "मूर्खपणाचा" संदेश गाजवितो त्यामुळे
जे विश्वासणारे आहेत त्यांचे तारण करण्याचे देवाने
निवडले. 22कारण अनेक यहूदी लोक चमत्काराची चिन्हे
विचारतात आणि ग्रीक लोक ज्ञानाचा शोध घेतात, 23परंतु
आम्ही वधस्तंभावर खिळलेला ख्रिस्त गाजवितो. हा संदेश
यहूदी लोकांसाठी अडखळण, आणि यहूदीतरांसाठी
मूर्खपणा असा आहे. 24परंतु ज्यांना बोलावलेले आहे,
अशा यहूदी व ग्रीक दोघांसही ख्रिस्त हा संदेश आहे तो
देवाचे सामर्थ्य व देवाचे ज्ञान असाही आहे. 25तथापि
ज्यांस तुम्ही देवाचा 'मूर्खपणा' म्हणता ते मानवप्राण्याच्या
शहाणपणापेक्षा अधिक शहाणपणाचे आहे. आणि ज्यांस
तुम्ही देवाचा 'दुर्बळपणा' समजता ते मानवप्राण्याच्या
सशक्तपणाहून अधिक शक्तिशाली आहे.
26तर आता बंधुभगिनींनो, देवाने तुम्हांला केलेल्या
पाचारणाबद्दल विचार करा. मानवी दृष्टिकोनातून
तुमच्यातील पुष्कळसे शहाणे नव्हते. तुमच्यापैकी पुष्कळसे
सामर्थ्यशाली नव्हते. तुमच्यापैकी पुष्कळसे उच्च कुळातले
नव्हते, 27त्याऐवजी जगातले जे मूर्ख पण त्यांना त्याने
निवडले, यासाठी की, शहाण्या माणसास फजित करावे.

28आणि देवाने दीन, तुच्छ मानलेले, जे “नगण्य” त्यांना
निवडले. यासाठी की जे “काहीतरी” आहेत त्यांना नगण्य
करावे. 29यासाठी की कोणीही देवासमोर बढाई मारू नये.
30कारण तो ख्रिस्त येशूमध्ये तुमच्या जीवनाचा उगम आहे.
व तो देवाची देणगी म्हणून आपले ज्ञान, आपले नीतिमत्त्व,
आपले पवित्रीकरण आणि आपली खंडणी असा झाला.
31यासाठी की शास्त्रात असे लिहिले आहे, “जो बढाई
मारतो त्याने देवाविषयी बढाई मारावी.”

## ख्रिस्ताविषयीचा वधस्तंभावरील संदेश

2 म्हणून बंधूनो, जेव्हा मी तुमच्याकडे आलो, तेव्हा
मी देवाचे रहस्यमय सत्य मानवी ज्ञानाने किंवा
वक्तृत्वकलेने सांगण्यासाठी आलो नाही. 2कारण
तुमच्यामध्ये असताना फक्त येशू ख्रिस्त आणि तोही
वधस्तंभावर खिळलेला याशिवाय कशाचेही ज्ञान असू
नये असा मी निश्चय केला आहे. 3तेव्हा मी तुमच्याकडे
अशक्तपणाने, भीतियुक्त असा व थरथर कापत आलो
आहे. 4माझे भाषण व संदेश हे मन वळविणाऱ्या मानवी
ज्ञानाद्वारे दिलेले नव्हते, ते आत्मा आणि सामर्थ्य यांचा
पुरावा असलेले होते. 5यासाठी की, तुमचा विश्वास मानवी
ज्ञानावर नव्हे तर देवाच्या सामर्थ्यावर असावा.

## देवाचेज्ञान

6परंतु जे प्रौढ आहेत त्यांना आम्ही ज्ञान देतो. या युगाच्या
अधिकाऱ्यांना नव्हे, ज्यांचा शेवट करण्यासाठी आणण्यात
येत आहे. 7त्याऐवजी, जे लपविलेले आहे, आणि हे युग
सुरू होण्यापूर्वी देवाने आमच्या गौरवासाठी नेमले होते ते
देवाचे रहस्यमय ज्ञान देतो. 8जे या युगाच्या कोणाही
सत्ताधीशाला माहीत नव्हते, कारण जर त्यांना कळले
असते, तर त्यांनी गौरवी प्रभूला वधस्तंभावर खिळले
नसते. 9परंतु ज्याप्रमाणे पवित्र शास्त्र म्हणते,

“डोळ्यांनी पाहिले नाही, कानांनी ऐकले नाही, आणि
मनुष्याच्या अंत:करणाने जे उपजविले नाही, ते देवाने
त्याच्यावर प्रेम करणाऱ्यांसाठी तयार केले आहे.”
*यशया 64:4*

10परंतु देवाने ते आत्म्याच्या द्वारे आपणांस प्रकट केले
आहे. कारण आत्मा हा प्रत्येक गोष्टीचा शोध घेतो, एवढेच
नव्हे तर तो देवाच्या सखोलतेच्या गुप्ततेचाही शोध घेतो.
11कारण मनुष्याच्या आत्म्याशिवाय त्या मनुष्याच्या गोष्टी
ओळखणारा दुसरा कोण मनुष्य आहे? याप्रमाणेच देवाच्या
आत्म्याशिवाय देवाचे विचार कोणीच ओळखू शकत नाही.
12परंतु आम्हांला जगाचा आत्मा मिळाला नाही, तर
देवापासूनचा आत्मा मिळाला आहे. यासाठी की, देवाने
ज्या गोष्टी फुकट दिल्या आहेत त्यांचे आम्हांला ज्ञान
व्हावे. 13मानवी ज्ञानाने शिकविलेल्या शब्दांनी आम्ही या
गोष्टी सांगत नाही, तर आत्म्याने शिकविलेल्या शब्दांनी,
आध्यात्मिक शब्द उपयोगात आणून आध्यात्मिक गोष्टींचे
स्पष्टीकरण करतो. 14स्वाभाविक मनुष्य देवाच्या
आत्म्याने प्रगट झालेल्या गोष्टी ग्रहण करीत नाही. कारण
त्या त्याला मूर्खपणाच्या आहेत. आणि त्या त्याला समजत
नाहीत, कारण त्यांची आध्यात्मिक रितीने पारख केली
जाते. 15परंतु आध्यात्मिक मनुष्य सर्व गोष्ट पारखू शकतो
कारण त्याची पारख करणे कोणालाही शक्य नसते. कारण
पवित्र शास्त्र म्हणते,

16“प्रभूचे मन कोण जाणतो, जो त्याला शिकवू शकेल?”
*यशया 40:13*

परंतु आमच्या ठायी ख्रिस्ताचे मन आहे.

## माणसांना अनुसरणे चुकीचे आहे

3 परंतु बंधूंनो आध्यात्मिक लोक म्हणून मी तुमच्याशी
बोलू शकत नव्हतो. त्याऐवजी मला तुमच्याशी देहिक
लोकांसारखे आणि ख्रिस्तामधील बालकासारखे बोलावे
लागले. 2मी तुम्हांला पिण्यासाठी दूध दिले, जड अन्न दिले
नाही. कारण तुम्ही जड अन्न खाऊ शकत नव्हता. व
आतासुद्धा तुम्ही खाऊ शकत नाही. 3कारण तुम्ही
अजूनसुद्धा दैहिक आहात. कारण तुमच्यात मत्सर व
भांडणे चालू आहेत, तर तुम्ही दैहिक नाही काय, व
जगातील लोकांसारखे वागत नाही काय? 4कारण जेव्हा
काही म्हणतात, “मी पौलाचा आहे,” आणि इतर दुसरे
म्हणतात, “मी अपुल्लोसाचा आहे,” तेव्हा तुम्ही जगिक
लोकांसारखे वागत नाही काय?

5तर मग अपुल्लोस कोण आणि पौल कोण? आम्ही
केवळ सेवक आहोत, ज्यांच्याद्वारे तुम्ही विश्वासणारे झाला
आणि आम्हा प्रत्येकाला देवाने जे काम नेमून दिले ते
काम आम्ही केले. 6मी बी लावले, अपुल्लोसाने त्याला
पाणी घातले, पण देवाने त्याची वाढ केली. 7म्हणून जो बी
पेरतो तो किंवा जो पाणी घालतो तो महत्त्वाचा नाही, तर
देव जो त्याची वाढ करतो तो महत्त्वाचा आहे. 8जे बी
पेरतात व पाणी घालतात ते एक आहेत व प्रत्येकाला
त्याच्या फळावर आधारित अशी मजूरी मिळेल 9कारण
देवा समवेत आपण सर्वजण कामगार आहोत.

तुम्ही देवाचे शेत आहात व देवाची इमारत आहात.
10आणि देवाच्या दानाप्रमाणे जे मला दिले होते त्याप्रमाणे
सूज्ञ, कुशल बांधणाऱ्यांप्रमाणे पाया घातला. पण दुसरा
कोणी तरी त्यावर बांधतो, परंतु प्रत्येकाने आपण त्यावर
कसे बांधतो याविषयी खबरदारी घ्यावी. 11येशू ख्रिस्त जो
पाया आहे त्याच्यावाचून इतर कोणीही दुसरा पाया घालू
शकत नाही. 12जर कोणी त्या पायावर सोने, चांदी,
मौल्यवान दगड, लाकूड, गवत किंवा पेंढा यांनी बांधतो.
13तर प्रत्येक व्यक्तीचे काम स्पष्ट दिसून येईल. कारण

तो दिवस ते स्पष्ट करील, तो दिवस अग्नीने प्रगट होईल
व तोच अग्नि प्रत्येक माणसाचे काम कसे आहे हे
ठरविण्यासाठी परीक्षा घेईल. 14ज्या कोणाचे बांधकाम, जे
त्या पायावर बांधलेले आहे ते टिकेल. 15त्याला बक्षीस
मिळेल. जर एखाद्याचे काम जळून गेले, तर त्याचे नुकसान
होईल, परंतु जेव्हा तो इमारतीला लागलेल्या अग्नीपासून
बचावासाठी पळून जाईल. तेव्हा तो तारला जाईल.

16तुम्ही देवाचे मंदिर आहात आणि देवाचा आत्मा
तुमच्यामध्ये राहतो हे तुम्हांला माहीत नाही काय? 17जर
कोणी देवाच्या मंदिराचा नाश करतो तर देव त्याचा नाश
करील. कारण देवाचे मंदिर पवित्र आहे आणि ते तुम्ही
आहात. 18कोणीही स्वत:ला फसवू नये. जर कोणी स्वत:ला
या जगाच्या दृष्टिकोणानुसार शहाणा समजत असेल तर
त्याने खरोखर ज्ञानी होण्यासाठी "मूर्ख" व्हावे. 19कारण
या जगाचे ज्ञान देवाच्या दृष्टीने मूर्खपणाचे आहे. असे
लिहिले आहे, "देव शहाण्यांना हुशारीमध्ये पकडतो."
20आणि पुन्हा "देव जाणतो की, शहाण्यांचे विचार निरर्थक
आहेत." 21म्हणून मनुष्यांविषयी कोणीही फुशारकी मारू
नये. कारण सर्व गोष्टी तुमच्या आहेत. 22तर तो पौल,
अपुल्लोस, पेत्र, जग, जीवन किंवा मरण असो,
वर्तमानकाळाच्या गोष्टी असोत अथवा भविष्यकाळाच्या
गोष्टी असोत, सर्व गोष्टी तुमच्या आहेत. 23तुम्ही ख्रिस्तामध्ये
आहात आणि ख्रिस्त देवाचा आहे.

## ख्रिस्ताचे प्रेषित

4 एखाद्या व्यक्तीने आम्हाविषयी अशा प्रकारे समजावे:
ख्रिस्ताचे सेवक व देवाच्या रहस्याचे कारभारी.
2आणखी असे की, जबाबदारी असलेल्या कारभाऱ्याने
विश्वासू असले पाहिजे. 3पण तुम्हांकडून किंवा कोणा
मानवी न्यायाधीशाकडून माझा न्याय व्हावा याबद्दल मला
काही वाटत नाही, किंवा मी माझा स्वत:चादेखील न्याय
करीत नाही. 4कारण माझी विवेकबुद्धी शुद्ध आहे. पण
त्यामुळे मी निर्दोष ठरत नाही. प्रभु हाच माझा न्यायनिवाडा
करतो. 5म्हणून योग्य समय येईपर्यंत म्हणजे प्रभु येईपर्यंत
न्यायनिवाडा करू नका. तो अंधारामध्ये दडलेल्या गोष्टींवर
प्रकाश टाकील व अंत: करणातील हेतू उघडकीस आणील,
त्यावेळी देवाकडून प्रत्येकाची प्रशंसा होईल.

6बंधूनो, तुमच्यासाठी मी या गोष्टी माझ्याकरीता व
अपुल्लोसाभरीता लागू केल्या आहेत. यासाठी की "पवित्र
शास्त्र सांगते त्यापलीकडे जाऊ नका," हे आमच्या
उदाहरणावरून तुम्ही शिकावे व तुम्ही गर्वाने फुगून जाऊ
नये म्हणजे एखाद्याला चांगली वागणूक देऊन दुसऱ्याला
विरोध करू नये. 7कोण म्हणतो की तू दुसऱ्यापेक्षा चांगला
आहेस? आणि तुझ्याजवळ असे काय आहे जे तुला मिळाले
नाही? ज्याअर्थी तुला सर्व मिळाले आहे, तर तुला मिळाले
नाही अशी बढाई का मारतोस?

8तुम्हांला असे वाटते की, तुम्ही अगोदरच श्रीमंत झाला
आहात, तृप्त झाला आहात, तुम्हांला असे वाटते की
आमच्याशिवाय तुम्ही राजे झाला आहात आणि माझी
अशी इच्छा आहे की तुम्ही खरोखरच राजे होता, यासाठी
की आम्ही तुमच्यासह राजे झालो असतो. 9कारण मला
वाटते की देवाने आम्हांला मरण्यासाठी शिक्षा दिलेल्या
अशा लोकांसारखे शेवटचे प्रेषित केले कारण आम्ही
जगाला, देवदूतांना तसेच माणसांना जाहीर प्रदर्शनासारखे
झालो आहोत. 10आम्ही ख्रिस्तासाठी मूर्ख, तर तुम्ही
ख्रिस्तामध्ये किती हुशार आहात! आम्ही अशक्त आहोत,
पण तुम्ही किती बलवान आहात! तुम्ही आदरणीय आहात,
पण आम्ही तुच्छ आहोत!

11अगदी या क्षणापर्यंत आम्ही भुकेले आणि तहानलेले,
फाटकेतुटके कपडे घातलेले, ठोसे मारलेले, आम्ही बेघर
असे आहोत. 12आणि आम्ही श्रम करतो, आम्ही स्वत:च्या
हातांनी काम करतो, 13जेव्हा आमची निंदा होते, तेव्हा
आम्ही आशीर्वाद देतो. जेव्हा आमचा छळ होतो तेव्हा
आम्ही सहन करतो. जेव्हा आमची निंदा होते, आम्ही
दयाळूपणे त्यांच्याशी बोलतो, या क्षणापर्यंत आम्ही जगासाठी
गाळ आणि कचरा असे झालो आहोत.

14मी तुम्हांला हे लाजविण्यासाठी लिहित नाही; तर
उलट मी तुम्हांला माझ्या प्रिय लेकरांप्रमाणे चांगल्या
गोष्टींची जाणीव करून देतो, 15कारण जरी तुम्हांला
ख्रिस्तामध्ये दहा हजार पालक असले तरी पुष्कळ वडील
नाहीत. कारण ख्रिस्त येशूमध्ये सुवार्तेच्या योगे मी तुम्हांला
जन्म दिला आहे, 16यास्तव मी तुम्हांला बोध करतो की,
माझे अनुकरण करा. 17यासाठीच तिमथ्याला तुमच्याकडे
पाठविले आहे. प्रभूमध्ये तो माझा प्रिय व विश्वासू पुत्र
आहे. ज्याप्रमाणे मी त्यांना सगळीकडे प्रत्येक मंडळीमध्ये
शिकवितो, तसेच तो ख्रिस्तामधील माझ्या शिकवणूकीची
आठवण करून देईल.

18पण जणू काय मी तुमच्याकडे येणारच नव्हतो, म्हणून
काही जण गर्वाने फुगले होते. 19तरीही जर प्रभूची इच्छा
असेल तर मी लवकरच तुमच्याकडे येईन. आणि मग
मला समजेल की, जे गर्वाने फुगून गेले ते किती चांगले
वक्ते आहेत हे नव्हे, तर ते किती सामर्थ्यशाली आहेत, हे
मला समजेल. 20कारण देवाचे राज्य बोलण्यावर अवलंबून
नसते तर सामर्थ्यावर असते. 21तुम्हांला कोणते पाहिजे?
मी तुमच्याकडे तुम्हांला शिक्षा करण्यासाठी काठी घेऊन
यावे की, प्रीतीने व सौम्यतेच्या आत्म्याने यावे?

## मंडळीतील एक नैतिक समस्या

5 खरोखरच असे सांगण्यात आले आहे की,
तुमच्यामध्ये जारकर्म चालू आहे. ते असे की,
आपणामध्ये कोणी आपल्या सावत्र आईशी अनैतिक संबंध
ठेऊन आहे. वास्तविक असले दुष्कृत्य विदेशी
लोकांमध्येही आढळणार नाही. 2आणि तरीही तुम्ही गर्वाने

फुगला आहात, परंतु तुम्हांला त्याबद्दल शोक व्हायला नको होता का? ज्या कोणी हे कर्म केले असेल त्याला तुमच्यातून काढून टाकले पाहिजे. 3कारण जरी मी शरीराने तुमच्यात नसलो तरी आत्म्याने हजर आहे. आणि हजर असल्याप्रमाणे त्यांचा मी अगोदरच न्याय केलेला आहे, ज्याने हे अयोग्य कृत्य केले आहे, 4-5जेव्हा तुम्ही प्रभु येशूच्या नावात आणि माझ्या आत्म्यात एकत्र जमता व आपल्या प्रभू येशूच्या सामर्थ्यात एकत्र येता, तेव्हा अशा माणसाला त्याच्या देहस्वभावाचा नाश व्हावा म्हणून सैतानाच्या स्वाधीन करावे यासाठी की त्याचा आत्मा प्रभूच्या दिवशी तारला जावा.

6तुमचे बढाई मारणे चांगले नाही. तुम्हांला माहीत नाही का की, "थोडेसे खमीर सगळे पीठ फुगविते." 7जुने खमीर काढून टाका. यासाठी की, तुम्ही नवीन पीठाचा गोळा व्हावे आणि ख्रिस्ती लोकांसारखे तुम्ही असे आहात: बेखमीर, कारण ख्रिस्त, आपला वल्हांडणाचा कोकरा आम्हांला शुद्ध करण्यासाठी त्याचे अर्पण झाले. 8यासाठी चला आपण वल्हांडणाचा सण पाळू या. जुन्या खमीराच्या भाकरीने नव्हे तर खरेपणाच्या बेखमीर भाकरीने पाळावा.

9जे जारकर्मी आहेत त्यांची संगत धरू नये असे मी माझ्या पूर्वीच्या पत्रात लिहिले होते. 10माझ्या म्हणण्याचा असा अर्थ नाही की, तुम्ही या जगातील जे लोक जारकर्मी, लोभी, फसविणारे किंवा मूर्तिपूजक यांची संगत धरू नये असे नाही. त्याबाबतीत तुम्हांलाच हे जग सोडून द्यावे लागेल. 11परंतु असे आहे की, मी तुम्हांला लिहिले होते, तुम्हांतील जो कोणी स्वत:ला बंधु म्हणतो, परंतु जर तो जारकर्मी, लोभी, मूर्तीपूजक निंदक, मद्यपि, फसविणारा असेल तर त्याची संगत धरू नये. अशा माणसाबरोबर भोजनसुद्धा करू नये. 12परंतु जे मंडळीबाहेर आहेत त्यांचा निवाडा करणे माझे काम आहे काय? जे मंडळीत आहेत त्यांचा न्याय तुम्ही करीत नाही काय? 13देव जे मंडळीबाहेर आहेत त्यांचा न्याय करील. पवित्र शास्त्र म्हणते, "तुमच्यामधून दुष्ट मनुष्याला काढून टाका."

## ख्रिस्ती लोकांमधील समस्यांचा न्याय

6 जेव्हा तुमच्यापैकी एखाद्याचा दुसऱ्या व्यक्तीबरोबर भांडणतंटा असेल तर ती समस्या (वाद) देवाच्या पवित्र लोकांपुढे न आणता ती व्यक्ति तो वाद न्यायालयात अनीतिमान लोकांसमोर नेण्याचे धाडस का करते?

2किंवा तुम्हांला माहीत नाही का की देवाचे पवित्र लोक जगाचा न्याय करतील? आणि जर जगाचा न्याय तुमच्याकडून होणार आहे तर लहानशा बाबींमध्ये त्याचा न्याय करण्यासाठी तुम्ही अपात्र आहात काय?

3आपण देवदूतांचा न्याय करणार आहोत हे तुम्हांला माहीत नाही का? तर मग रोजच्या जीवनातील साध्या गोष्टींचा विचारसुद्धा कशाला? 4म्हणून जर दररोज तुम्हांला प्रकरणे निकालात काढायची असतील, तर ज्यांना मंडळीत काही पाठिंबा नाही, अशा माणसांना न्यायाधीश म्हणून का नियुक्त करता? 5तुम्हाला लाज वाटावी म्हणून मी हे म्हणत आहे. गोष्टी इतक्या वाईट होत आहेत का की, तुमच्यामध्ये एकही सुज्ञ मनुष्य नाही जो त्याच्या (ख्रिस्ती) भावांचा समेट घडवून आणू शकेल?

6पण एक भाऊ दुसऱ्या भावाविरुद्ध न्यायालयात जातो आणि तुम्ही हे सर्व अविश्वासणाऱ्यांसमोर करीत आहात?

7वास्तविक, तुमचे एकमेकांविरुद्ध खटले आहेत यातच तुमचा संपूर्ण पराभव झाला आहे. त्याऐवजी तुम्ही स्वत:वर अन्याय का होऊ देत नाही? त्याऐवजी तुम्ही स्वत:ची लुबाडणूक का होऊ देत नाही? 8उलट तुम्ही स्वत: अन्याय करता व लुबाडणूक करता, आणि तुम्ही हे सर्व तुमच्या ख्रिस्ती बांधवांना करता!

9किंवा तुम्हांला माहीत नाही का की, अनीतिमान लोकांना देवाच्या राज्यात वतन मिळणार नाही? तुमची स्वत:ची फसवणूक होऊ देऊ नका! जारकर्मी, मूर्तिपूजक, व्यभिचारी, पुरुषवेश्या (पुरुष जे समलिंगी संबंधास तयार होतात), समलिंगी संबंध ठेवणारे पुरुष, किंवा

10दरोडेखोर, लोभी, दारूडे, निंदा करणारे, फसविणारे यांपैकी कोणीही देवाच्या राज्यात प्रवेश करणार नाही. 11आणि तुमच्यातील काही असे होते. पण तुम्ही स्वत:स धुतलेले होते, तुम्हाला देवाच्या सेवेला समर्पित केलेले होते. प्रभु येशू ख्रिस्ताच्या नावामध्ये तुम्ही नीतिमान ठरला होता व देवाच्या आत्म्यामध्ये नीतिमान ठरला होता.

## देवाच्या गौरवासाठी तुमच्या शरीरांचा उपयोग करा

12"मी काहीही करण्यास मुक्त आहे," पण प्रत्येक गोष्ट हितकारक नसते. होय, "मी काहीही करण्यास मुक्त आहे, पण कोणत्याही गोष्टीचे वर्चस्व माझ्यावर होऊ देणार नाही. 13"अन्न पोटासाठी आहे व पोट अन्नासाठी आहे." आणि हे खरे आहे. पण देव अन्नाचा व पोटाचा अशा दोघांचाही नाश करील. आणि आमची शरीरे ही जारकर्मासाठी नाही तर देवाच्या सेवेसाठी आणि प्रभूच्या शरीराच्या हितासाठी आहेत. 14आणि देवाने केवळ प्रभूलाच मरणातून उठविले असे नाही तर तो आम्हांलाही आपल्या सामर्थ्याने मरणातून उठवील. 15तुम्हाला माहीत नाही का की, तुमची शरीरे ख्रिस्ताला जोडलेली आहेत? तर मग जे ख्रिस्ताशी जोडलेले आहे ते घेऊन मी वेश्येला जोडावे काय? निश्चितच नाही! किंवा तुम्हांस ठाऊक नाही काय की, जो वेश्येशी जडतो तो तिच्याशी एकदेह होतो. 16"कारण ती दोघे एकदेह होतील असे शास्त्रच सांगते." 17परंतु जो स्वत: प्रभूशी जडतो तो त्याच्याशी आत्म्यात एक आहे.

18जारकर्मापासून दूर पळा. मनुष्य एखादे पाप करणे शक्य आहे ते त्याच्या शरीराबाहेरचे आहे. परंतु जो जारकर्म करतो तो त्याच्या स्वत:च्या शरीराविरुद्ध पाप करतो. 19किंवा तुम्हाला हे माहीत नाही काय तुमची शरीरे ही तुमच्यामध्ये जो पवित्र आत्मा आहे व जो तुम्हांला देवाकडून

प्राप्त झाला त्यांचे मंदिर आहे, आणि स्वत:चे असे तुम्ही
नाही? 20कारण तुम्हांला किंमत देऊन विकत घेतले
आहे. म्हणून तुमच्या शरीराने देवाला गौरव द्या.

## विवाहाविषयी

7 आता, तुम्ही ज्याविषयी आपणा त्यासंबंधाने: एखाद्या
मनुष्याने एखाद्या स्त्रीला स्पर्श न करणे हे त्याच्यासाठी
चांगले आहे, 2परंतु जारकर्माचा मोह टाळण्यासाठी, प्रत्येक
पुरुषाला त्याची स्वत:ची पत्नी असावी. व प्रत्येक स्त्रीला
तिचा स्वत:चा पती असावा. 3पतीने त्याच्या पत्नीला पत्नी
म्हणून तिचा हक्क द्यावा आणि त्याप्रमाणे पत्नीने तिच्या
पतीला पतीचा हक्क द्यावा. 4पत्नीला तिच्या स्वत:च्या
शरीरावर अधिकार नाही तर तो तिच्या पतीला आहे.
5विषयसुखासाठी एकमेकाला वंचित करू नका. तुम्हालं
प्रार्थनेला वेळ देता यावा म्हणून एकमेकांच्या संमतीने
ठराविक वेळेकरीता दूर राहा. आणि मग पुन्हा एक व्हा
यासाठी की, सैतानाने तुमच्यात आत्मसंयमन नसल्याने
मोहात पाडू नये. 6परंतु मी हे तुम्हांला सवलत म्हणून
सांगतो. आज्ञा म्हणून नव्हे. 7मला असे वाटते की, सर्व
लोक माझ्यासारखे असावेत पण प्रत्येक व्यक्तीला त्याचे
स्वत:चे असे देवापासून दान आहे. एकाला एका प्रकारे
राहण्याचे आणि दुसऱ्याला दुसऱ्या प्रकारे राहण्याचे. 8परंतु
जे अविवाहित व विधवा आहेत त्यांना मी म्हणून की,
म्हपासारखीचराहिली तर त त्यांना बरे.
9–10आता जे विवाहित आहेत त्यांना मी आज्ञा देतो. मी
ती आज्ञा देत नसून प्रभु देत आहे. पत्नीने तिच्या पतीपासून
वेगळे होण्याचे पाहू नये. 11पण जर ती वेगळे राहते तर
तिने लग्न न करताच राहावे किंवा पतीबरोबर समेट
करावा. आणि पतीने आपल्या पत्नीला सोडचिठ्ठी देऊ
नये.
12आता इतरासाठी सांगतो, आणि हे मी सांगत आहे,
प्रभु नाही: जर एखाद्या ख्रिस्ती बांधवाची पत्नी विश्वास
ठेवणारी नसेल, आणि त्याच्याबरोबर राहण्यास ती राजी
असेल तर त्याने तिला सोडचिठ्ठी देऊ नये. 13आणि एखाद्या
स्त्रीचा नवरा जर विश्वास ठेवणारा नसेल आणि तो
तिच्याबरोबर राहण्यास राजी असेल तर तिने त्याला
सोडचिठ्ठी देऊ नये, 14कारण विश्वास न ठेवणाऱ्या पतीचे
त्याच्या ख्रिस्ती पत्नीबरोबरच्या निकट सहवासाद्वारे
पवित्रीकरण झाले आहे आणि विश्वास न ठेवणाऱ्या
पत्नीचे त्या ख्रिस्ती पतीबरोबरच्या निकट सहवासाद्वारे
त्यांचे नाते देवाच्या दृष्टीनेही कायदेशीर आहे. नाहीतर
तुमची मुले अशुद्ध झाली असती, परंतु आता ती पवित्र
आहेत. 15तरीही विश्वास न ठेवणारा वेगळा होत असेल
तर त्याने वेगळे व्हावे. याबाबतीत ख्रिस्ती बंधु किंवा
बहीण यांना मोकळीक आहे. देवाने आपल्याला शांतीने
राहण्यासाठी बोलावले आहे. 16कारण पत्नी, तू तुझ्या
विश्वास न ठेवणाऱ्या पतीला तारू शकशील हे तुला
कसे माहीत? किंवा पती, तू आपल्या विश्वास न ठेवणाऱ्या
पत्नीला तारशील हे तुला कसे माहीत?

## देवाने पाचारण केल्याप्रमाणे राहा.

17फक्त, देवाने प्रत्येकाला जसे नेमले आहे आणि देवाने
जसे प्रत्येकाला पाचारण केले आहे त्याप्रमाणे त्याने राहावे.
आणि अशी मी सर्व मंडळ्यांना आज्ञा करतो. 18एखाद्याला
जेव्हा देवाने पाचारण केले होते तेव्हा त्याची अगोदरच
सुंता झाली होती काय? त्याने आपली सुंता लपवू नये.
कोणाला सुंता न झालेल्या स्थितीत पाचारण झाले काय,
तर त्याने सुंता करू नये. 19सुंता म्हणजे काही नाही व
सुंता न होणे म्हणजेही काही नाही. तर देवाची आज्ञा
पाळणे यात सर्व काही आहे. 20प्रत्येकाने ज्या स्थितीत
त्याला पाचारण झाले त्या स्थितीत राहावे. 21तुला गुलाम
म्हणून पाचारण झाले होते काय? त्यामुळे तुला त्रास होऊ
नये, परंतु तुला स्वतंत्र होणे शक्य असेल तर पुढे हो व
संधीचा उपयोग करून घे.
22कारण जो कोणी प्रभूमध्ये गुलाम असा पाचारण
केलेला होता तो देवाचा मुक्त केलेला मनुष्य आहे.
त्याचप्रमाणे ज्या मुक्त मनुष्याला देवाचे पाचारण झाले
आहे तो देवाचा गुलाम आहे. 23तुम्हांला किंमत देऊन
विकत घेतले होते. मनुष्यांचे गुलाम होऊ नका. 24बंधूनो,
तुम्हांतील प्रत्येकाने ज्या स्थितीत त्याला पाचारण झाले
होते, त्याच स्थितीत त्याने देवासमोर राहावे.

## विवाह करून घेण्याविषयीचे प्रश्न

25आता कुमारिकेविषयी, मला प्रभूपासून आज्ञा नाही,
पण मी माझे मत देतो. जो मी विश्वसनीय आहे कारण
प्रभूने आम्हावर दया दाखविली. 26मी हे असे समजतो:
सध्याच्या दुर्दशेत हे चांगले आहे, (होय) हे चांगले आहे
की, एखाद्याने माझ्यासारखे एकटे राहावे. 27तुम्ही पत्नीशी
बांधलेले आहात काय? तर मोकळे होण्यास पाहू नका.
स्त्रीपासून मोकळे आहात काय? लग्न करण्याचे पाहू
नका. 28पण जरी तुम्ही लग्न केले तरी तुम्ही पाप केलेले
नाही. आणि जर कुमारिका लग्न करते तर तिने पाप
केले नाही. पण अशा लोकांना शारीरिक पीडा होतील
आणि या पीडा टाळण्यासाठी मी तुम्हाला मदत करण्याचा
प्रयत्न करीत आहे.
29हेच मी म्हणत आहे, बंधूनो, वेळ थोडा आहे. येथून
पुढे ज्यांना पत्न्या आहेत त्यांनी त्या नसल्यासारखे राहावे.
30जे शोक करीत आहेत त्यांनी शोक करीत नसल्यासारखे,
जे आनंदी आहेत त्यांनी आनंदी नसल्यासारखे, जे वस्तु
विकत घेत आहेत, त्यांनी जणू काही त्यांच्याकडे स्वत:चे
काहीच नाही 31आणि जे लोक जग त्यांना ज्या गोष्टी देऊ
करते व त्या गोष्टींचा जे उपयोग करून घेतात, त्यांनी
जणू काय त्या गोष्टींचा पूर्ण उपयोग करून घेतला नाही,
असे राहावे. कारण या जगाची सध्याची स्थिती लयास
जात आहे.

32माझी अशी इच्छा आहे की, तुम्ही काळजीपासून मुक्त असावे. अविवाहित पुरुष प्रभूच्या कामाविषयी आणि त्याला कसे संतोषविता येईल याबाबत काळजीत असतो. 33परंतु विवाहित पुरुष जगिक गोष्टीविषयी आणि आपल्या पत्नीला कसे आनंदीत ठेवता येईल या काळजीत असतो. 34त्यामुळे तो द्विधा अवस्थेत असतो. आणि एखादी अविवाहित स्त्री किंवा कुमारिका, प्रभूच्या कामाबद्दल उत्सुक असते. यासाठी की, तिने शरीराने आणि आत्म्याने पवित्र असावे. परंतु विवाहित स्त्री जगिक गोष्टी आणि तिच्या पतीला कसे आनंदी ठेवता येईल याचीच चिंता करते. 35मी हे तुमच्याच फायद्यासाठी सांगत आहे. तुमच्यावर बंधने लादण्यासाठी सांगत नाही. आचरणातील, सुव्यवस्थेतील फायद्यासाठी व प्रभूच्या सेवेसाठी विनाअडथळा तुम्हाला समर्पण करणे शक्य व्हावे म्हणून सांगतो. 36जर एखाद्याला असे वाटते की, तो त्याच्या कुमारिकेविषयी योग्य ते करीत नाही आणि जर त्याच्या भावना तीव्र आहेत, तर त्या दोघांनी पुढे होऊन लग्न करून घेणे आवश्यक आहे. त्याला जे वाटते ते त्याने करावे. 37तो पाप करीत नाही. त्याने लग्न करून घ्यावे. परंतु जो स्वत: मनाचा खंबीर आहे व जो कोणत्याही दडपणाखाली नाही पण ज्याचा स्वत:च्या इच्छेवर ताबा आहे. व ज्याने आपल्या मनात विचार केला आहे की आपल्या कुमारिकेला ती जशी आहे तशीच ठेवावी म्हणजे तिच्याशी विवाह करू नये, तर तो चांगले करतो. 38म्हणून जो कुमारिकेशी लग्न करतो तो चांगले करतो पण जो तिच्याशी लग्न करीत नाही तो अधिक चांगले करील.

39पति जिवंत आहे तोपर्यंत स्त्री लग्नाने बांधलेली आहे, पण तिचा पति मेला तर तिला पाहिजे त्याच्याशी परंतु केवळ प्रभूमध्ये लग्न करण्यास ती मोकळी आहे. 40परंतु माझ्या मते ती आहे तशीच राहिली तर ती अधिक सुखी होईल आणि मला असे वाटते की, मलाही प्रभूचा आत्मा आहे.

## मूर्तीला अर्पिलेल्या अन्नाविषयी

8 आता, मूर्तिंना अर्पण केलेल्या गोष्टींविषयी: आम्हाला माहीत आहे की, “आम्हा सर्वांना ज्ञान आहे.” ज्ञान लोकांना गर्वाने फुगविते. परंतु प्रीति लोकांना बलवान होत जाण्यास मदत करते. 2जर एखाद्याला वाटत असेल की, त्याला काही माहीत आहे, तर जसे त्याला कळायला पाहिजे तसे त्याला माहीत नसते. 3पण जर कोणी देवावर प्रीति करतो तर देवाला तो माहीत असतो. 4म्हणून मूर्तिला वाहिलेल्या अन्नाविषयी आपल्याला माहीत आहे की, “जगामध्ये खरी मूर्तिच नाही.” आणि त्या एकाशिवाय दुसरा देव नाही. 5आणि जरी लोक त्यांना देव म्हणतात, तरी असे अनेक तथाकथित देव आहेत जे स्वर्गात किंवा पृथ्वीवर आहेत (आणि पुष्कळ देव व पुष्कळ प्रभु आहेत) 6परंतु आमच्यासाठी फक्त एकच देव जो पिता तो आहे. आणि ज्याच्यासाठी आपण जगतो आणि ज्याच्यापासून सर्व गोष्टी येतात आणि फक्त एकच प्रभु येशू ख्रिस्त आहे. ज्याच्याद्वारे सर्व गोष्टी अस्तित्वात येतात व ज्याच्याद्वारे आपण जगतो.

7पण प्रत्येकाला हे ज्ञान नसते. काहींना, ज्यांना आतापर्यंत मूर्तीची उपासना करण्याची सवय होती ते असे मांस खातात व असा विचार करतात ते मूर्तीला वाहिलेले होते. आणि त्यांची सद्सद्विवेकबुद्धि दुर्बल असल्याने त्यांच्या कृत्यांना डागाळलेली आहे. 8परंतु अन्न आपणाला देवाजवळ आणणार नाही. जर आम्ही खाल्ले नाही तर वाईट होणार नाही किंवा खाल्ले तर अधिक चांगले होणार नाही.

9तुमचा हा अधिकार जे दुर्बल आहेत त्यांच्यासाठी अपराध तर नाही याकडे लक्ष द्या. 10कारण तू जो या गोष्टीचे ज्ञान असलेला त्या तुला दुर्बल बुद्धिच्या कोणी मूर्तिच्या मंदिरात जेवताना पाहिले, तर तो दुर्बल असून त्याची विवेकबुद्धि आत्यंतिक प्रबळ झाल्याने मूर्तीला वाहिलेले मांस खाण्यास त्याला उत्तेजन मिळणार नाही काय? 11तो जो दुर्बल आहे, त्या तुझ्या भावासाठी ख्रिस्त मरण पावला त्याचा तुझ्या ज्ञानामुळे नाश होतो. 12आणि अशा प्रकारे तुझ्या बंधूविरुद्ध पाप करून आणि त्याच्या दुर्बल विवेकबुध्दीला जखम करून तुम्ही ख्रिस्ताविरुद्ध पाप करता. 13म्हणून अन्न जर माझ्या बंधूना पाप करायला लावते तर मी कधीही मांस खाणार नाही. यासाठी की माझ्या बंधूने पाप करू नये.

9 मी मुक्त नाही का? मी प्रेषित नाही का? आमचा प्रभु येशू याला मी पाहिले नाही का? तुम्ही माझे प्रभूमधील काम नाही का? 2जरी मी इतरांच्यासाठी प्रेषित नसलो तरीही तुमच्यासाठी मी एक आहे. कारण तुम्ही प्रभूमध्ये असलेल्या माझ्या प्रेषितपणाचा शिक्का आहात.

3जे माझी परीक्षा घेऊ पाहतात, त्यांच्याविरुद्ध माझा बचाव असा आहे. 4मला खाण्याचा आणि पिण्याचा हक्क नाही काय? 5इतर प्रेषित, प्रभूचे भाऊ आणि पेत्र यांच्यासारखे एखाद्या विश्वासणाऱ्या व्यक्तीला पत्नी करून घेण्याचा मला हक्क नाही काय? 6का फक्त बर्णबा व मलाच आमच्या उपजीविकेकरिता काम न करण्याचा हक्क आहे? 7स्वत:च्या खर्चाने सैनिक म्हणून सेवा करणारा असा कोण आहे? द्राक्षमळा लावून द्राक्षे खात नाही असा कोण आहे? किंवा मेंढ्यांचे कळप पाळून कळपाचे काही दूध पित नाही असा कोण आहे?

8फक्त मानवी दैनंदिन व्यवहारानुसार मी हे सांगत नाही. तर नियमशास्त्रसुद्धा हेच सांगत नाही का? 9मोशेच्या नियमशास्त्रात असे लिहिले आहे, “मळणी करीत असताना बैलाला मुसके घालू नकोस.”* देव बैलांची काळजी करीत नाही, 10तो खात्रीने आमच्याविषयीच सांगत नाही काय? होय, ते आमच्यासाठीच लिहिले होते, कारण जो

---

**मळणी करीत … नकोस** अनुवाद 25:4

नांगरतो त्याने अपेक्षेने नांगरावे. आणि जो मळणी करतो त्याने पिकात वाटा असावा या हेतूने मळणी करावी. 11जर आम्ही तुमच्या फायद्यासाठी आध्यात्मिक बी पेरले, तर तुमच्यापासून ऐहिक गरजांची कापणी केली तर ती मोठी गोष्ट आहे काय? 12जर इतरही तुमच्यापासून ऐहिक गोष्टींची कापणी करण्याच्या या अधिकारात सहभागी होत असतील तर तसे करण्याचे आम्हालाही यापेक्षा अधिक मोठे कारण नाही काय? परंतु आम्ही हा अधिकार बजावला नाही. त्याऐवजी ख्रिस्ताच्या सुवार्तेच्या मार्गात अडथळा येऊ नये म्हणून आम्ही सर्व गोष्टी सहन करतो. 13तुम्हाला माहीत नाही काय मंदिरात जे काम करतात ते त्यांचे अन्न मंदिरातून घेतात, आणि जे नियमितपणे वेदीची सेवा करतात, ते वेदीवर जे अर्पण केले जाते त्यात सहभागी होतात. 14त्याचप्रकारे, प्रभूने आज्ञा केली आहे की, जे सुवार्ता गाजवितात त्यांनी त्या सुवार्ता गाजविण्याकडून आपला चरितार्थ चालवावा.

15परंतु मी या कोणत्याही अधिकाराचा वापर केला नाही. आणि माझ्या बाबतीत असे घडावे म्हणूनही मी हे लिहिले नाही. कारण माझे अभिमान बाळगण्याचे कारण कोणी हिरावून घेण्यापेक्षा मी मरण पत्करीन, 16कारण जर मी सुवार्ता गाजवितो, तर मला अभिमान बाळगण्याचे काही कारण नाही, कारण मला ते करणे आवश्यक आहे. आणि जर मी सुवार्ता गाजविली नाही तर माझ्यासाठी ते किती वाईट असेल! 17कारण जर मी हे स्वेच्छेने करतो तर मी बक्षिसास पात्र आहे, पण जर एखादे कार्य माझ्यावर सोपविले आहे जे माझ्या आवडीने नव्हे 18तर माझे बक्षीस कोणते? ते हे की मी फुकट सुवार्ता सांगावी यासाठी की, सुवार्ता सांगत असताना मी वेतन मिळण्याच्या अधिकाराचा पूर्ण उपयोग करू नये.

19कारण, जरी मी सर्व लोकांपासून मुक्त असलो तरी मी स्वत:ला सर्व लोकांचा गुलाम करून घेतले आहे. 21यासाठी की, मी अधिक मिळवावे. 20यहूदी लोकांना जिंकण्यासाठी यहूदी लोकांसाठी मी यहूदी झालो. जे नियमशास्त्राधीन आहेत त्यांच्यासाठी 21मी नियम शास्त्राधीन असणाऱ्या लोकांसारखा झालो. (जरी मी नियमशास्त्राधीन नाही तरी तसा झालो). यासाठी की जे नियमशास्त्रविरहीत आहेत त्यांना मी नियमशास्त्रविरहीत असा झालो. (जरी मी देवाच्या नियमशास्त्राशिवाय नाही) तरी मी ख्रिस्ताच्या नियमाधीन आहे. यासाठी की, जे नियमशास्त्रविरहीत आहेत त्यांना जिंकता यावे. 22-23जे दुर्बल आहेत त्यांच्यासाठी मी दुर्बल झालो यासाठी की दुर्बलांना मला जिंकता यावे. मी सर्वांसाठी सर्व काही झालो आहे यासाठी की त्या आशीर्वादाचा वाटेकरी मला होता यावे. 24तुम्हांला माहीत नाही का मैदानातील शर्यतीत धावणारे सर्व धावतात, परंतु एकालाच बक्षिस मिळते? अशा प्रकारे धावा की तुम्ही ते जिंकाल. 25प्रत्येक जण जो शर्यतीत धावतो तो सर्व बाबतीत कडक रीतीने प्रशिक्षण घेतो (आत्मसंयमन करतो.) ते नाशवंत गौरवाचा मुगुट मिळविण्यासाठी असे करतात, परंतु आम्ही अविनाशी मुगुट मिळविण्यासाठी करतो. 26यास्तव मी अनिश्चितपणे नाही तर ज्याला ध्येय आहे अशासारखा धावतो. तसेच जो कोणी नुसताच वाऱ्यावर प्रहार करीत नाही, तसे मी मुष्टीयुद्ध करतो, 27त्याऐवजी मी आपल्या शरीराला कठोरपणे वागवितो आणि त्याला ताब्यात आणतो म्हणजे दुसऱ्यांना उपदेश केल्यानंतर देवाकडून मी नाकारला जाऊ नये.

## यहूदी लोकांसारखे होऊ नका

10 बंधूनो, तुम्हांला हे माहीत असावे असे मला वाटते की, आपले सर्व पूर्वज मेघाखाली होते. ते सर्व तांबड्या समुद्रातून सुखरूप पार गेले. 2मोशेचे अनुयायी म्हणून त्या सर्वांचा मेघात व समुद्रात बाप्तिस्मा झाला. 3-4त्यांनी एकच आध्यात्मिक अन्न खाल्ले. व ते एकच आध्यात्मिक पेय प्याले. कारण ते त्यांच्यामागून चालणाऱ्या खडकातून पीत होते. आणि तो खडक ख्रिस्त होता. 5परंतु देव त्यांच्यातील पुष्कळ लोकांविषयी आनंदी नव्हता, आणि त्यांना अरण्यात ठार मारण्यात आले.

6आणि या गोष्टी आमच्यासाठी उदाहरण म्हणून घडल्या, कारण ज्याप्रमाणे त्यांनी वाईट गोष्टींची अपेक्षा केली, त्याप्रमाणे आपण वाईटाची इच्छा धरणारे लोक होऊ नये. 7त्यांच्यापैकी काही जण होते तसे मूर्तिपूजक होऊ नका. पवित्र शास्त्रात लिहिल्याप्रमाणे, “लोक खाण्यापिण्यास खाली बसले आणि ते नाचणे, मौजमजा करण्यासाठी उठले.” 8ज्याप्रमाणे त्यांच्यातील काही जणांनी केले तसे जारकर्म आपण करू नये. त्याचा परिणाम असा झाला की, एका दिवसात तेवीस हजार लोक मरण पावले. 9आणि त्यांच्यातील काही जणांनी पाहिली तशी आपण ख्रिस्ताची परीक्षा पाहू नये. याचा परिणाम असा झाला की, सापांकडून ते मारले गेले. 10कुरकूर करू नका, ज्याप्रमाणे त्यांच्यातील काहीजणांनी केली, याचा परिणाम असा झाल की, मृत्युदूताकडून ते मारले गेले.

11या गोष्टी त्यांच्याबाबतीत उदाहरणार्थ होत्या म्हणून घडल्या. व त्या गोष्टी लिहिल्या गेल्या यासाठी की आम्ही ज्यांच्यावर युगाचा शेवट आला आहे अशा आपणासाठी त्या इशारा अशा व्हाव्यात 12म्हणून मी खंबीरपणे उभा आहे असा जो विचार करतो त्याने आपण पडू नये म्हणून जपावे. 13जे मनुष्याला सामान्य नाही अशा कोणत्याही मोहाने तुम्हाला पकडले नाही. परंतु देव विश्वसनीय आहे. तुम्हांला सहन करता येते त्यापलीकडे तो तुमची परीक्षा घेणार नाही. परंतु त्या मोहाबरोबर, त्यातून बाहेर पडण्याचा मार्गही तयार करील. म्हणजे तुम्हांला सहन करणे शक्य होईल. 14तेव्हा, माझ्या प्रियांनो, मूर्तिपूजा टाळा. 15मी तुमच्याशी बुद्धिमान लोक समजून बोलत आहे. मी काय बोलत आहे याचा तुम्हीच न्याय करा. 16“आशीर्वादाचा

प्याला" जो आशीर्वादित करण्यास सांगतो, तो ख्रिस्ताच्या
रक्तात सहभागी आहे, नाही का? 17वस्तुस्थिती अशी
आहे की फक्त भाकरीचा एकच तुकडा आहे म्हणजे
आपण सर्व एकाच शरीरापासून आहोत, आपण पुष्कळजण
एक भाकर, एक शरीर आहोत. कारण आपला सर्वांचा
त्या भाकरीत भाग आहे. 18इस्राएल राष्ट्राकडे पाहा. जे
अर्पण केलेले खातात ते वेदीचे भागीदार आहेत. नाही
का? 19तर मी काय म्हणतो ? माझ्या म्हणण्याचा अर्थ
असा आहे का की मूर्तिला वाहिलेले अन्न काहीतरी आहे
किंवा ती मूर्ति काहीतरी आहे? 20नाही, परंतु उलट माझ्या
म्हणण्याचा अर्थ असा आहे की, जे अर्पण ते लोक करतात
ते अर्पण भुतांना करतात, देवाला करीत नाहीत आणि
तुम्ही भूताचे भागीदार व्हावे असे मला वाटत नाही! 21तुम्ही
देवाचा आणि भुताचासुद्धा असे दोन्ही प्याले पिऊ शकत
नाही. तुम्ही प्रभूच्या मेजाचे आणि भुताच्या मेजाचे भागीदार
होऊ शकत नाही. 22आपण प्रभूला ईर्षेस पेटाविण्याचा
प्रयत्न करीत आहोत का? कारण तो जितका सामर्थ्यशाली
आहे तितके आम्ही नाही.

## तुमचे स्वातंत्र्य देवाच्या गौरवासाठी उपयोगात आणा

23"काहीही करण्यास आम्ही मुक्त आहोत." पण सर्वच
हितकारक नाही. "आम्ही काहीही करण्यास मुक्त आहोत."
परंतु सर्व गोष्टी लोकांना सामर्थ्ययुक्त होण्यास मदत करीत
नाहीत. 24कोणीही स्वत:चेच हित पाहू नये तर दुसऱ्यांचेही
पाहावे. 25मांसाच्या बाजारात जे मांस विकले जाते ते
कोणतेही मांस खा. विवेकबुध्दीला त्या मांसाविषयीचे
कोणतेही प्रश्न न विचारता खा. 26कारण ज्याप्रमाणे पवित्र
शास्त्र म्हणते, "पृथ्वी व तिच्यावरील सर्व काही प्रभूचे
आहे."

27विश्वास न ठेवणाऱ्यांपैकी जर कोणी तुम्हांला
जेवावयास बोलाविले आणि तुम्हांस जावेसे वाटले तर
सद्सद्विवेकबुद्धिने कोणतेही प्रश्न न विचारता तुमच्यापुढे
वाढलेले सर्व खा. 28परंतु जर कोणी तुम्हांस सांगितले
की, 'हे मांस यज्ञात देवाला अर्पिलेले होते,' तर
विवेकबुद्धिसाठी किंवा ज्या मनुष्याने सांगितले त्याच्यासाठी
खाऊ नका.

29आणि जेव्हा मी 'विवेक' म्हणतो तो स्वत:चा असे मी
म्हणत नाही तर इतरांचा. आणि हेच फक्त एक कारण
आहे. कारण माझ्या स्वातंत्र्याचा इतरांच्या
सद्सद्विवेकबुद्धिने न्याय का करावा? 30जर मी
आभारपूर्वक अन्न खातो तर माझ्यावर टीका होऊ नये.
कारण या गोष्टींबद्दल देवाला मी धन्यवाद देतो. 31म्हणून
खाताना, पिताना किंवा काहीही करताना सर्व काही देवाच्या
गौरवासाठी करा. 32यहूदी लोक, ग्रीक लोक किंवा देवाच्या
मंडळीला अडखळण होऊ नका. 33जसा मी प्रत्येक बाबतीत
सर्वांना संतुष्ट करण्याचा प्रयत्न करतो आणि माझ्यासाठी
काय हितकारक आहे हे न पाहता इतर प्रत्येकासाठी
काय हितकारक आहे ते पाहतो यासाठी की त्यांचे तारण
व्हावे.

11 मी जसे ख्रिस्ताचे अनुकरण करतो तसे माझे
अनुकरण करणारे व्हा.

## अधिकाराखाली असणे

2मी तुमची प्रशंसा करतो कारण तुम्ही माझी नेहमी
आठवण करता आणि मी जी शिकवण तुम्हाला दिली, ती
तुम्ही काटेकोरपणे पाळता. 3परंतु तुम्हाला हे माहीत व्हावे
असे मला वाटते की, ख्रिस्त हा प्रत्येक पुरुषाचे मस्तक
आहे. आणि प्रत्येक पुरुष हा स्त्रीचे मस्तक आहे, आणि
देव ख्रिस्ताचे मस्तक आहे. 4प्रत्येक मनुष्य जो प्रार्थना
करताना किंवा देवाकडून आलेला संदेश देताना आपले
मस्तक आच्छादितो तो मस्तकाला लज्जा आणतो. 5परंतु
प्रत्येक स्त्री जी आपले मस्तक न झाकता लोकांमध्ये
देवाचा संदेश सांगते ती मस्तकाचा अपमान करते. कारण
ती स्त्री मुंडलेल्या स्त्री सारखीच आहे. 6जर स्त्री आपले
मस्तक आच्छादित नाही तर तिने आपले केस कापून
घ्यावेत. परंतु केस कापणे किंवा मुंडण करणे स्त्रीस
लज्जास्पद आहे. तिने आपले मस्तक झाकावे. 7ज्याअर्थी
मनुष्य देवाची प्रतिमा आणि वैभव प्रतिबिंबित करतो
त्याअर्थी त्याने मस्तक झाकणे योग्य नाही. परंतु स्त्री
पुरुषाचे वैभव आहे. 8पुरुष स्त्रीपासून नाही परंतु स्त्री
पुरुषापासून आली आहे. 9आणि मनुष्य स्त्रीकरिता निर्माण
केला गेला नाही, तर स्त्री पुरुषासाठी निर्माण केली गेली.
10यासाठी देवाने स्त्रीला अधिकार दिलेला आहे त्याचे
चिन्ह म्हणून तिने आपले मस्तक आच्छादावे व
देवदूतांकरितासुद्धा तिने हे करावे.

11तरीही प्रभूमध्ये स्त्री पुरुषापासून स्वतंत्र नाही व पुरूष
स्त्रीपासून स्वतंत्र नाही. 12कारण स्त्री जशी पुरूषापासून
आहे, तसा पुरुषही स्त्रीपासून जन्माला येतो. परंतु सर्व
गोष्टी देवापासून आहेत. 13हे तुम्हीच ठरवा की, मस्तक
न आच्छादिता सभेत देवाची प्रार्थना करणे स्त्रीसाठी योग्य
आहे का? 14पुरुषांनी लांब केस वाढविणे हे त्याच्यासाठी
लज्जास्पद आहे. असे निसर्गसुद्धा तुम्हाला शिकवीत नाही
काय? 15परंतु स्त्रीने लांब केस राखणे हा तिचा मान आहे
कारण तिला तिचे केस निसर्गत: आच्छादनासाठी दिले
आहेत. 16जर कोणाला वाद घालायचा असेल तर मला
दाखवून द्या की, आमची अशी रूढी नाही व देवाच्या
मंडळ्यांचीही नाही.

## प्रभु भोजन

17पण आता ही पुढची आज्ञा देत असताना मी तुमची
प्रशंसा मंडळी म्हणून करीत नाही, कारण तुमच्या एकत्र
येण्याने तुमचे चांगले न होता तुमची हानि होते. 18प्रथम,
मी ऐकतो की, जेव्हा मंडळीमध्ये तुम्ही एकत्र जमता, तेथे
तुमच्यामध्ये गट असतात, आणि काही प्रमाणात ते खरे

मानतो. 19(तरीही तुम्हांमध्ये पक्ष असावेत) यासाठी की, जे तुमच्यामध्ये पसंतीस उतरलेले आहेत ते प्रगट व्हावेत. 20म्हणून जेव्हा तुम्ही एकत्र येता तेव्हा तुम्ही खऱ्या अर्थाने प्रभुभोजन घेत नाही. 21कारण तुम्ही भोजन करता तेव्हा तुम्हांतील प्रत्येक जण अगोदरच आपले स्वत:चे भोजन करतो. एक भुकेला राहतो तर दुसरा प्यायलेला असतो. 22खाण्यापिण्यासाठी तुम्हांला घरे नाहीत का? का तुम्ही देवाच्या मंडळीला तुच्छ मानता आणि जे गरीब आहेत त्यांना खिजविता? मी तुम्हांला काय म्हणू? मी तुमची प्रशंसा करू काय? याबाबतीत मी तुमची प्रशंसा करीत नाही. 23कारण प्रभूपासून जे मला मिळाले तेच मी तुम्हांला दिले. प्रभु येशूला ज्या रात्री मारण्यासाठी धरून देण्यात आले. त्याने भाकर घेतली. 24आणि उपकार मानल्यावर ती मोडली आणि म्हणाला, "हे माझे शरीर आहे, जे मी तुमच्यासाठी देत आहे. माझी आठवण करण्यासाठी हे करा." 25त्याचप्रमाणे त्यांनी भोजन केल्यावर त्याने द्राक्षारसाचा प्याला घेतला आणि म्हणाला, "हा द्राक्षारसाचा प्याला माझ्या रक्ताने स्थापित केलेला नवा करार आहे. जेव्हा जेव्हा तुम्ही द्राक्षारस प्याल तेव्हा माझी आठवण करण्यासाठी हे करा." 26कारण जितके वेळा तुम्ही ही भाकर खाता व हा द्राक्षारसाचा प्याला पिता, तितके वेळा तुम्ही प्रभूच्या मरणाची तो येईपर्यंत घोषणा करीता. 27म्हणून जो कोणी अयोग्य रीतीने प्रभूची भाकर खातो किंवा द्राक्षारसाचा प्याला पितो. तो प्रभूच्या शरीराविषयी आणि रक्ताविषयी दोषी ठरेल. 28परंतु मनुष्याने स्वत:ची परीक्षा करावी. आणि नंतर भाकर खावी किंवा द्राक्षारसाचा प्याला प्यावा. 29कारण जर तो प्रभूच्या शरीराचा अर्थ न जाणता ती भाकर खातो व द्राक्षारसाचा प्याला पितो तर तो खाण्याने आणि पिण्याने स्वत:वर न्याय ओढवून घेतो. 30याच कारणामुळे तुम्हांतील अनेक जण आजारी आहेत. आणि पुष्कळजण झोपलेले आहेत. 31परंतु जर आम्ही आमची परीक्षा करू तर आमच्यावर न्यायाचा प्रसंग येणार नाही. 32प्रभूकडून आमचा न्याय केला जातो तेव्हा आम्हांला शिस्त लावण्यात येते, यासाठी की, जगातील इतर लोकांबरोबर आम्हांलाही शिक्षा होऊ नये.

33म्हणून माझ्या बंधूनो, जेव्हा तुम्ही भोजनास एकत्र येता, तेव्हा एकमेकांसाठी थांबा. 34जर कोणी खरोखरच भुकेला असेल तर त्याने घरी खावे यासाठी की तुम्ही न्यायनिवाड्यासाठी एकत्र जमू नये. मी येईन तेव्हा इतर गोष्टी सुरळीत करून देईन.

## पवित्र आत्म्याची दाने

12 आता, बंधूनो, आध्यात्मिक दानांसबंधी तुम्ही अज्ञान असावे असे मला वाटत नाही. 2तुम्हाला माहीत आहे की जेव्हा तुम्ही यहूदीतर होता तेव्हा मूर्तिपूजेकडे तुमचा कल होता. 3म्हणून मी तुम्हांला सांगत आहे की, देवाच्या आत्म्याने बोलणारा कोणीही मनुष्य असे म्हणत नाही की, "येशू शापित असो." आणि पवित्र आत्म्याशिवाय कोणीही "येशू प्रभु आहे," असे म्हणू शकत नाही.

4आध्यात्मिक दाने विभागलेली आहेत पण तोच आत्मा ही विभागणी करतो. 5सेवेचे प्रकार आहेत, परंतु ज्याची आम्ही सेवा करतो तो एकच आहे. 6कार्य करण्याचे वेगवेगळे विभाग आहेत पण ह्या सेवा एकाच देवाकडून येतात. 7कारण प्रत्येकाच्या फायद्यासाठी एकेकाला आत्म्याचे प्रकटीकरण दिले आहे. 8एका व्यक्तीला आत्म्याच्या द्वारे दैवी ज्ञानाचे वचन सांगण्याचे शहाणपण दिले जाते. आणि दुसऱ्या व्यक्तीला त्याच आत्म्याच्या द्वारे दैवी ज्ञानाने बोलण्याचे, 9कोणाला त्याच आत्म्याने विश्वास व दुसऱ्याला फक्त त्याच एका आत्म्याद्वारे बरे करण्याचे दान दिले आहे. 10दुसऱ्या कोणाला अद्भुत कार्ये करण्याची शक्ति व दुसऱ्याला भविष्य सांगण्याची शक्ति, तर दुसऱ्याला आत्म्या आत्म्यातील फरक ओळखण्याची, दुसऱ्या कोणाला वेगवेगळ्या भाषा बोलण्याची, दुसऱ्याला भाषांतर करुन अर्थ सांगण्याची शक्ति दिली आहे. 11परंतु तो एकच आत्मा जो त्याच्या इच्छेप्रमाणे एकेकाला वाटून देऊन ही सर्व कार्ये पूर्णत्वास नेतो.

## ख्रिस्ताचे शरीर

12कारण ज्याप्रमाणे आपणातील प्रत्येकाला एकच शरीर आणि त्याला अनेक अवयव असतात, आणि तरीही सर्व अवयव जरी ते पुष्कळ असले तरी त्यांचे मिळून एक शरीर बनते. तसाच ख्रिस्तसुद्धा आहे. 13जर आपण यहूदी किंवा ग्रीक, गुलाम किंवा स्वतंत्र असून आपणांला एकच आत्मा देह म्हणून दिला आहे. कारण एका आत्म्याने आपणाला एक शरीर होण्यासाठी बाप्तिस्मा दिलेला आहे.

14आता एका मानवी शरीरात एकच अवयव असत नाही, तर पुष्कळ असतात 15जर पाय म्हणतो, "मी हात नाही म्हणून मी शरीराचा नाही," तर तो या कारणासाठी शरीराचा नाही असे होत नाही, होते का? 16आणि जर कान म्हणेल, "मी डोळा नाही म्हणून मी शरीराचा नाही," तर तो या कारणासाठी शरीराचा नाही असे होत नाही. होते का? 17संबंध शरीरच जर डोळा असते तर आपल्याला ऐकता कसे आले असते? 18परंतु प्रत्यक्षात शरीरातील प्रत्येक अवयव देवाने त्याच्या इच्छेप्रमाणे ठेवला आहे. 19आणि सर्व अवयव जर एकच अवयव असते तर शरीर कोठे असते? 20पण असे आहे की, अवयव अनेक आहेत, शरीर मात्र एकच आहे.

21डोळा हाताला म्हणू शकत नाही की, "मला तुझी गरज नाही." किंवा दुसरे उदाहरण द्यायचे तर डोके पायांना म्हणू शकत नाही, "मला तुमची गरज नाही." 22याच्या उलट जे अवयव आपण कमी महत्त्वाचे समजतो, त्यांची आपण अधिक काळजी घेतो. 23आणि जे न दाखवण्याजोगे

अवयव त्यांना मोठ्या सभ्यतेने वागवतो. 24पण आपल्या
दाखविता येण्याजोग्या अवयवांना तशी गरज नसते. त्याऐवजी
जे अवयव उणे आहेत त्यांना मोठा मान देण्यासाठी देवाने
असे शरीर जुळविले आहे, 25यासाठी की शरीरात कोणतेही
मतभेद नसावेत तर उलट अवयवांनी एकमेकांची काळजी
घ्यावी. 26जर शरीराचा एक अवयव दुखत असेल तर
सर्व अवयव त्याच्याबरोबर दुःख सोसतात. एका अवयवाचा
सन्मान झाला तर सर्व अवयव त्याच्याबरोबर आनंदीत
होतात.

27म्हणून तुम्ही ख्रिस्ताचे शरीर आहात आणि
वैयक्तिकरीत्या अवयव आहात 28शिवाय देवाने मंडळीत
प्रथम प्रेषित, दुसरे संदेष्टे, तिसरे शिक्षक, जे चमत्कार
करतात ते, ज्यांना आरोग्य देण्याचे दान आहे ते, 29जे
लोक मदत करतात, जे पुढारीपण करतात व ज्या लोकांना
भिन्न भिन्न भाषा बोलण्याचे दान आहे, असे लोक ठेवले
आहेत. म्हणजे सर्वच प्रेषित नाहीत, सर्वच संदेष्टे नाहीत,
सर्वच शिक्षक नाहीत, सर्वांनाच चमत्कार करण्याची शक्ति
नाही. 30सर्वांनाच आरोग्य देण्याची दाने नाहीत, सर्वच
अन्य भाषेत बोलत नाहीत, सर्वांनाच भाषांचा अर्थ
सांगण्याची शक्ति नाही. 31तथापि आत्म्याच्या अधिक मोठ्या
दानांसाठी प्रयत्न करा. आणि आता मी तुम्हांस ह्याहूनही
उत्तम मार्ग दाखवितो.

## प्रीति

13 मी माणसांच्या जिभांनी बोललो व देवदूतांच्यासुद्धा
भाषेत बोलणे मला शक्य असले, माझ्या ठायी
प्रीति नसली तर मी वाजणारी थाळी किंवा मोठा आवाज
करणारी झांज आहे. 2जर मला देवासाठी संदेश देण्याची
शक्ति असली आणि मला सर्व रहस्ये माहीत असली, सर्व
दैवी ज्ञान असले आणि डोंगर ढळविता येतील असा दृढ
विश्वास असला, परंतु माझ्या ठायी प्रीति नसली, 3तर मी
काहीच नाही. आणि मी जर माझे सर्व धन गरजवंताच्या
अन्नदानासाठी दिले आणि मी माझे शरीर जाळण्यासाठी
दिले पण जर माझ्यात प्रीति नसली, 4तरी मी काहीच
मिळवीत नाही. प्रीति गर्व करीत नाही.

प्रीति सहनशील आहे, प्रीति दयाळू आहे. ती हेवा करीत
नाही. प्रीति बढाई मारीत नाही. 5ती गर्वाने फुगत नाही. ती
अयोग्य रीतीने वागत नाही. ती स्वार्थी नाही, ती चिडत
नाही. तिच्याविरुद्ध केलेल्याची नोंद ती ठेवीत नाही.
6वाईटात ती आनंद मानीत नाही. परंतु सत्याविषयी
इतरांबरोबर ती आनंद मानते. 7सर्व काही खरे मानण्यास
सिध्द असते 8ती नेहमी विश्वास ठेवते. आशा धरते. नेहमी
सहन करते. प्रीति कधी संपत नाही. पण भविष्य सांगण्याची
दाने ती बाजूला केली जातील. इतर भाषा बोलण्याचे दान
असेल तर ते थांबेल. ज्ञानाचे दान असेल तर ते बाजूला
केले जाईल. 9कारण आमचे ज्ञान अपूर्ण आहे. आम्ही
देवासाठी बोलतो (भविष्य सांगतो). आम्ही अपूर्ण भविष्य
सांगतो. 10पण जेव्हा पूर्णत्व येते तेव्हा जे अपूर्ण आहे ते
नाहीसे केले जाईल. 11जेव्हा मी मूल होतो, तेव्हा मूलासारखा
बोलत असे, मी मूलासारखा विचार करीत असे. मुलासारखा
उहापोह करीत असे. परंतु जेव्हा मी मोठा झालो, तेव्हा
मी लहानपणाच्या गोष्टी सोडून दिल्या आहेत. 12आता
आपण आरशात अस्पष्ट प्रतिबिंब पाहतो, परंतु जेव्हा
पूर्णत्व येते तेव्हा आपण समोरासमोर पाहू. आता मला
अंशत: कळते. परंतु ती वेळ येईल तेव्हा देव मला ओळखतो,
तसा मी पूर्णपणे ओळखीन. 13सारांश, या तीन गोष्टी
राहतात : विश्वास, आशा आणि प्रीति पण यातील सर्वांत
महान प्रीति आहे.

## मंडळीला मदत करण्यासाठी आध्यात्मिक दाने वापरा

14 प्रीतीसाठी प्रयत्न करा. आणि आध्यात्मिक
दानांची विशेषत: तुम्हांला संदेश देता यावा याची
मनापासून इच्छा बाळगा. 2ज्याला इतर भाषांमध्ये बोलण्याचे
दान आहे तो खरे पाहता माणसांबरोबर बोलत नाही तर
देवाबरोबर बोलतो. कारण तो काय बोलतो हे कोणालाही
कळत नाही. आत्म्याच्या द्वारे तो गूढ गोष्टी बोलतो. 3परंतु
जो संदेश देतो तो लोकांशी बोध, उन्नती, उपदेश याविषयी
बोलतो. 4ज्याला दुसऱ्या भाषेत बोलण्याचे दान आहे, तो
स्वत:चीच आध्यात्मिकदृष्ट्या उन्नती करून घेतो, पण
ज्याला संदेश देण्याचे (देवासाठी बोलण्याचे) दान आहे तो
संपूर्ण मंडळीची उन्नती करतो. 5आता तुम्ही सर्वांनी भाषांमध्ये
बोलावे अशी माझी इच्छा आहे, परंतु त्याहीपेक्षा जर
तुम्हांला संदेश देता आले तर मला अधिक आवडेल. जो
संदेश देतो, (देवासाठी बोलतो) तो भाषा बोलणाऱ्यापेक्षा
श्रेष्ठ आहे, पण भाषा बोलणारा हा संदेश देणाऱ्यासारखाच
(देवासाठी बोलणाऱ्यासारखाच) आहे, जर त्याने जी भाषा
तो बोलतो तिचा अर्थ सांगितला तर, त्याद्वारे संपूर्ण मंडळी
आध्यात्मिकदृष्ट्या बळकट होते.

6आता, बंधूनो, जर मी तुमच्याकडे अन्य भाषा
बोलण्यासाठी आलो तर तुमचा कसा फायदा होईल? तुमचा
फायदा होण्यासाठी मी तुमच्याकडे प्रकटीकरण, दैवी ज्ञान,
देवाकडून संदेश किंवा शिकवणूक आणायला नको का?
7हे निर्जीव वस्तू उदा. बासरी, वीणा यासारखे आवाज
काढण्यासारखे आहे: जर ते वाद्य ते निर्माण करीत
असलेल्या वेगवेगळ्या आवाजातील फरक स्पष्ट करीत
नाही, तर एखाद्याला बासरीवर किंवा वीणेवर कोणते
संगीत वाजवले जात आहे ते कसे कळेल? 8आणि जर
कर्णा अस्पष्ट आवाज काढील तर लढाईसाठी कोण तयार
होईल? 9त्याचप्रमाणे सहज समजेल अशा भाषेतून
बोलल्याशिवाय तुम्ही काय बोलला हे कोणाला कसे
समजेल? कारण तुम्ही हवेत बोलल्यासारखे होईल.
10नि:संशय, जगात पुष्कळ प्रकारच्या भाषा आहेत, व

कोणतीही अर्थविरहीत नाही. 11म्हणून जर मला भाषेचा अर्थ समजला नाही तर जो बोलत आहे त्याच्यासाठी मी विदेशी ठरेन व जो बोलणारा आहे तो माझ्यासाठी विदेशी होईल. 12नेमके तेच तुम्हांलाही लागू पडते जर तुम्ही आध्यात्मिक दाने मिळावीत म्हणून उत्सुक आहात तर मंडळीच्या उन्नतीसाठी, मंडळीला आध्यत्मिक मजबूती येण्यासाठी जोरदार प्रयत्न करा.

13म्हणून, जो दुसऱ्या भाषेत बोलतो त्याने तो जे बोलला आहे त्याचा अर्थ सांगता यावा म्हणून प्रार्थना करावी. 14कारण जर मी दुसऱ्या भाषेतून प्रार्थना केली तर माझा आत्माही प्रार्थना करतो पण माझे मन रिकामे राहते. 15मग काय केले पाहिजे? मी माझ्या आत्म्याने प्रार्थना करीन पण त्याचप्रमाणे मी माझ्या बुद्धिनेही प्रार्थना करीन. 16कारण जर तू तुझ्या आत्म्याने देवाचे धन्यवाद करशील तर जो फक्त ऐकणारा सामान्य तेथे बसला असेल तर तो तुझ्या उपकारस्तुतीच्या प्रार्थनेत "आमेन" कसे म्हणेल? कारण तू काय म्हणतोस ते त्याला कळत नाही. 17आता तू धन्यवाद देत असलास हे जरी चांगले असले तरी दुसरी व्यक्ति आध्यात्मिकदृष्ट्या बलवान झालेली नसते.

18मी देवाचे उपकार मानतो, कारण मी तुम्हा सर्वांपेक्षा अधिक भाषा बोलू शकतो ज्याचे दान मला आहे, 19परंतु सभेत इतरांनाही बोध करता यावा म्हणून इतर भाषेत दहा हजार शब्द बोलण्यापेक्षा माझ्या मनाप्रमाणे पाच शब्द सांगणे मी पसंत करतो.

20बंधूनो, तुमच्या विचार करण्यात मुलासारखे असू नका. त्याऐवजी दुष्टतेच्या बाबतीत लहान बाळासारखे निरागस परंतु आपल्या विचारात प्रौढ व्हा. 21नियमशास्त्र म्हणते,

"इतर भाषा बोलणाऱ्याचा उपयोग करून, मी या लोकांशी बोलेन तरीसुद्धा ते माझे ऐकणार नाहीत."*

*यशया 28:11-12*

हे असे प्रभु म्हणतो.

22म्हणून इतर भाषांमध्ये बोलण्याचे दान हे अविश्वासणाऱ्यांसाठी नसून विश्वासणाऱ्यांसाठी आहे. 23म्हणून जर संपूर्ण मंडळी एकत्र येते व प्रत्येकजण दुसऱ्या भाषेत बोलत असेल (आणि) जर एखादा बाहेरचा किंवा अविश्वासणारा आत आला, तर तुम्ही वेडे आहात असे ते तुम्हाला म्हणणार नाही का?

24परंतु जर प्रत्येक जण संदेश देऊ लागला आणि जर अविश्वासणारा किंवा बाहेरचा आत आला, तर सर्वजण जे बोलत असतील त्यामुळे त्या ऐकणाऱ्याला त्याच्या पापाची जाणीव होते, ते सर्व त्याचा न्याय करतात; 25त्याच्या अंत:करणातील गुपिते माहीत होतात. आणि मग तो पालथा पडतो आणि देवाची उपासना करतो व म्हणतो "खरोखर देव तुमच्यामध्ये आहे!"

### तुमच्या भेटींनी मंडळीला मदत व्हावी

26बंधूनो, मग काय करावे? जेव्हा तुम्ही एकत्र येता, प्रत्येकाकडे गाण्यासाठी स्तोत्र असते कोणाकडे शिक्षण असते. कोणाकडे प्रकटीकरण असते. कोणी दुसऱ्या भाषेत बोलतो, कोणी त्या भाषेचा अर्थ सांगतो. प्रत्येक गोष्ट मंडळीच्या वाढीसाठी केली गेली पाहिजे. 27जर कोणी दुसऱ्या भाषेत बोलणार असेल तर दोघांनी किंवा जास्तीत जास्त तिघांनी बोलावे, एका वेळी एकानेच बोलावे. आणि एका व्यक्तीने त्या बोलण्याचा अर्थ सांगावा. 28जर मंडळीत अर्थ सांगणारा कोणी नसेल तर भाषा बोलणाऱ्याने सभेत गप्प बसावे. व स्वत:शी व देवाशी बोलावे.

29दोघा किंवा तिघांनी संदेश द्यावा व इतरांनीही ते काय बोलतात याची परीक्षा करावी. 30बसलेल्यांपैकी एखाद्या व्यक्तीला जर काही प्रकट झाले तर पहिल्या संदेश देणाऱ्याने गप्प बसावे. 31जर तुम्हा सर्वांना संदेश देता येत असेल, तर एका वेळी एकानेच बोलावे, यासाठी की सर्वजण शिकतील. सर्वांना बोधपर मार्गदर्शन मिळेल. 32जे आत्मे भविष्यवाद्यांना प्रेरणा देतात, ते त्या संदेष्ट्यांच्या स्वाधीन असतात. 33कारण देव हा बेशिस्तपणा आणणारा नसून, शांति आणणारा देव आहे. जशा सर्व मंडळ्या देवाच्या पवित्र लोकांच्या बनलेल्या असतात,

34स्त्रियांनी सभेत गप्प बसावे. कारण त्यांच्यासाठी सभेत बोलण्याची परवानगी देण्यात आलेली नाही, कारण नियमशास्त्रसुद्धा असेच म्हणते, 35त्यांना जर काही शिकायचे असेल, तर त्यांनी स्वत:च्या पतीला घरी विचारावे. कारण स्त्रीने सभेत बोलणे हे तिला लज्जास्पद आहे. 36तुमच्याकडूनच देवाचा संदेश बाहेर गेला होता काय? किंवा ते फक्त तुमच्यापर्यंतच आले आहे?

37एखादा जर स्वत:ला संदेष्टा समजत असेल किंवा जर तो धार्मिक मनुष्य असेल तर त्याने हे ओळखले पाहिजे की, जे मी तुम्हाला लिहित आहे ती देवाकडून देण्यात आलेली आज्ञा आहे. 38म्हणून जर कोणी ती मानत नसेल, तर त्यालाही मानण्यात येणार नाही. 39म्हणून माझ्या बंधूंनो, देवासाठी संदेश देण्यासाठी उत्सुक असा, दुसऱ्या भाषेत बोलणाऱ्याला मना करू नका. 40तर सर्व गोष्टी योग्य रीतीने आणि व्यवस्थित असाव्यात.

### ख्रिस्ताविषयीची सुवार्ता

15 आता बंधूंनो, मला तुम्हाला आठवण करून द्यावीशी वाटते, की ज्या सुवार्तेविषयी मी तुम्हाला उपदेश केला व जी तुम्हीसुद्धा स्वीकारलीत व जिच्यात तुम्ही बळकट आहात. 2आणि जिच्यामुळे तुमचे तारण झाले आहे. ज्या वचनाने मी तुम्हांस सुवार्ता सांगितली ते तुम्ही दृढ धरता तर तुम्ही विश्वास धरल्याशिवाय काही उपयोग नाही, नाहीतर तुमची स्वीकृती व्यर्थ आहे.

3कारण मलासुद्धा पहिल्यांदा जे मिळाले ते मी तुमच्या स्वाधीन केले: ते हे की ख्रिस्त आमच्या पापांसाठी मरण

पावला, हे जे वचनात लिहिले आहे. 4व त्याला पुरण्यात
आले. व तिसऱ्या दिवशी त्याला उठविण्यात आले, 5व
तो पेत्राला दिसला, नंतर बारा प्रेषितांना, 6नंतर तो एकाच
वेळी पाचशे हून अधिक बांधवांना दिसला. त्यांच्यापैकी
बहुसंख्य अजूनही जिवंत आहेत, तर काही मेले आहेत.
7नंतर तो याकोबाला दिसला, मग पुन्हा तो सर्व प्रेषितांना
दिसला, 8आणि शेवटी मी जो अवेळी जन्मलो, त्या मलासुद्धा
तो दिसला. 9कारण प्रेषितांमध्ये मी कनिष्ठ आहे. मी
प्रेषित म्हणून घेण्याच्यासुद्धा योग्यतेचा नाही. कारण देवाच्या
मंडळीचा मी छळ केला. 10पण देवाच्या दयेने मी जो आहे
तो मी (प्रेषित) आहे. आणि त्याची माझ्यावरची कृपा
व्यर्थ गेली नाही. उलट त्या सर्वांपेक्षा अधिक काम मी
केले आहे, करणारा मी नव्हतो. तर देवाची दया जी
माझ्याबरोबर होती, ती करीत होती. 11म्हणून, जरी मी
तुम्हांला उपदेश केला किंवा त्यांनी उपदेश केला, तरी
आम्ही सर्व हाच उपदेश करू, आणि तुम्ही यावरच विश्वास
ठेवला.

## आम्हांला मेलेल्यांतून उठविण्यात येईल

12पण जर आम्ही ख्रिस्त मेलेल्यांतून उठविला गेला
आहे अशी सुवार्ता गाजवितो, तर मृतांचे पुनरुत्थान नाही
असे तुमच्यातील काहीजण म्हणतात हे कसे? 13जर मृतांचे
पुनरुत्थान नाही, तर ख्रिस्त मरणातून उठविला गेला
नाही, 14आणि जर ख्रिस्त मरणातून उठविला गेला नाही
तर आमचा संदेश व्यर्थ आहे आणि तुमचा विश्वासही
व्यर्थ आहे. 15आणि आम्हीसुद्धा देवाविषयीचे खोटे साक्षीदार
ठरू कारण आम्ही देवासमोर शपथपूर्वक साक्ष दिली
आहे की, ख्रिस्ताला मेलेल्यांतून त्याने उठविले, पण जसे
ते म्हणतात त्याप्रमाणे जर देवाने ख्रिस्ताला उठविले नाही,
तर मेलेले मरणातून उठविले जात नाहीत. 16आणि जर
मृतांना उठविले जात नाही, तर ख्रिस्ताला मरणातून
उठविण्यात आले नाही. 17आणि जर ख्रिस्त मरणातून
उठविला गेला नाही, तर तुमचा विश्वास व्यर्थ आहे;
तुम्ही अजूनसुद्धा पापातच आहात; 18होय, आणि जे ख्रिस्तात
मेलेले आहेत, त्यांचा नाश झाला आहे. 19जर ख्रिस्तावर
असलेली आमची आशा ही, फक्त या पृथ्वीवरील
जीवनासाठीच असली, तर सर्व मनुष्यात आम्ही दयनीय
असे आहोत. 20परंतु आता प्रत्यक्षात ख्रिस्त मरणातून
उठविला गेला आहे. जे मेलेले आहेत त्यांच्यातील तो
प्रथम फळ आहे. 21कारण ज्याअर्थी मनुष्याद्वारे मरण
आले त्याप्रमाणे मृतांचे पुनरुत्थानसुद्धा मनुष्याद्वारेच आले.
22कारण जसे आदामाद्वारे सर्व मरण पावतात तसेच सर्वजण
ख्रिस्ताद्वारे जिवंत केले जातील. 23पण प्रत्येक जण त्याच्या
क्रमानुसार, ख्रिस्त जो प्रथम फळ आहे, आणि मग ख्रिस्त
येण्याच्या वेळी त्याचे असलेले, 24मग शेवट येईल. प्रत्येक
अधिपती, प्रत्येक सत्ता, व प्रत्येक सामर्थ्य जेव्हा ख्रिस्त
नाहीसे करील, तेव्हा ख्रिस्त देवपित्याला राज्य देईल.
25कारण देवाने ख्रिस्ताचे शत्रू ख्रिस्ताच्या पायाखाली
ठेवीपर्यंत ख्रिस्ताने राज्य केले पाहिजे. 26शेवटचा शत्रू
असल्यासारखा मृत्यूचा नाश केला पाहिजे. 27कारण 'देवाने
सर्व काही त्याच्या अधिकारात ठेवले आहे." आता जेव्हा
पवित्र शास्त्र म्हणते की, "सर्व गोष्टी" अंकीत केल्या
आहेत तेव्हा सर्व स्पष्ट आहे की, ज्याने सर्व गोष्टी त्याच्या
अंकीत केल्या आहेत, तो देव सोडून इतर सर्व गोष्टी
त्याच्या अधिकार क्षेत्रात आहेत. 28आणि सर्व गोष्टी जेव्हा
स्वाधीन केलेल्या आहेत, तेव्हा पुत्रसुद्धा देवाच्या, ज्याने
सर्व गोष्टी स्वाधीन केल्या आहेत, स्वत: स्वाधीन केला
जाईल यासाठी की, देव सर्वांवर संपूर्णपणे अधिपती असावा.
29नाहीतर, मेलेल्यांसाठी व त्यांची पुन्हा भेट होईल या
आशेने ज्यांनी बाप्तिस्मा घेतला आहे ते काय करतील?
जर मेलेले उठविले जात नाहीत तर त्यांच्यासाठी लोक
बाप्तिस्मा का घेतात?
30आम्हीसुद्धा प्रत्येक घटकेला धोक्याला का तोंड देतो?
31बंधूजनहो, मी शपथपूर्वक सांगतो की, ख्रिस्त येशूमध्ये
माझा तुमच्याविषयी अभिमान आहे, मी दररोज मरतो
32इफिसात मी रानटी प्राण्याबरोबर लढलो, तर मी काय
मिळविले? जर मेलेले उठविले जात नाहीत तर "आपण
खाऊ पिऊ, कारण आपण उद्या मरून जाऊ!" 33फसू
नका, "वाईट सोबती चांगल्या सवयी बिघडवितात."
34शुद्धीवर या. जसे तुम्ही यायला पाहिजे आणि पाप करीत
जाऊ नका. कारण तुम्हांपैकी काहीजण देवाविषयी अज्ञानी
आहेत. हे मी तुम्हांस लाजविण्यासाठी बोलतो.

## आपले शरीर कोणत्या प्रकारचे असेल?

35परंतु कोणीतरी म्हणेल? "मेलेले कसे उठविले जातात?
कोणत्या प्रकारच्या शरीराने ते येतात?" 36तू किती मूर्ख
आहेस? तू जे पेरतोस ते प्रथम मेल्याशिवाय जिवंत होत
नाही. 37आणि तू लावतोस (पेरतोस) त्यासंबंधी तू जे
जमिनीत पेरतोस ते वाढलेले रोपटे नसून जे वाढतच
राहणार आहे, ते नव्हे तर फक्त धान्य (दाणा). तो गव्हाचा
किंवा इतर कोठला तरी असेल. 38आणि मग देवाने
निवडल्याप्रमाणे तो त्याला आकार देतो. तो प्रत्येक दाण्याला
त्याचे स्वत:चे 'शरीर' देतो. 39जिवंत प्राणीमात्रांचे सर्वांचे
देह सारखेच नसतात. त्याऐवजी मनुष्याचे शरीर एक
प्रकारचे असते. प्राण्यांचे शरीर दुसऱ्या प्रकारचे असते,
पक्ष्यांचे वेगळ्या प्रकारचे असते; आणि माशांचे आणखी
वेगळ्या प्रकारचे असते. 40तसेच स्वर्गीय शरीरे आहेत
आणि पृथ्वीवरील शरीरे आहेत, पण स्वर्गीय शरीराचे
वैभव एक प्रकारचे असते, तर जगिक शरीराला दुसरे
असते. 41सूर्याचे तेज वेगळ्या प्रकारचे तर चंद्राचे तेज
वेगळ्या प्रकारचे असते. ताऱ्यांचे तेज वेगळ्या प्रकारचे
असते. आणि तेजाबाबत एक तारा दुसऱ्या ताऱ्यांहून निराळा
असतो.

**42**म्हणून मृतांच्या पुनरुत्थानाबाबत असे असेल. शरीर जे जमिनीत पुरले गेले आहे. ते नाश पावणारे आहे, जे शरीर उठविण्यात येते ते अविनाशी आहे. **43**जे शरीर जमिनीत पुरले आहे, ते अपमानात पुरलेले असते. ते अशक्त असते पण उठविले जाते ते सशक्त शरीर असते **44**जे जमिनीत पुरले जाते ते नैसर्गिक शरीर आहे जे उठविले जाते ते आध्यात्मिक शरीर आहे. जर नैसर्गिक शरीरे आहेत तर आध्यात्मिक शरीरेसुद्धा असतात. **45**आणि तेच पवित्र शास्त्र सांगते, “पहिला मनुष्य, आदाम हा जिवंत प्राणी झाला,” पण ख्रिस्त जो शेवटचा आदाम झाला तो जीवन देणारा आत्मा झाला. **46**परंतु जे आध्यात्मिक ते प्रथम नाही, जे जगिक ते प्रथम, मग जे आध्यात्मिक आहे ते. **47**पहिला मनुष्य मातीतून आला म्हणजे तो धुळीपासून बनविला गेला, तर दुसरा मनुष्य स्वर्गातून आला. **48**ज्याप्रमाणे तो मनुष्य मातीपासून बनविला गेला, त्याप्रमाणे लोकसुद्धा मातीपासूनच बनविले गेले आणि त्या स्वर्गीय मनुष्याप्रमाणे स्वर्गीय लोकही तसेच आहेत. **49**ज्याप्रमाणे तयार केलेल्या माणसाची प्रतिमा आपण धारण केली आहे, तशी आपणसुद्धा स्वर्गीय माणसाची प्रतिमा धारण करू.

**50**बंधूनो, मी तुम्हांला सांगतो, आपल्या मांस व रक्त असलेल्या जगिक शरीराला देवाच्या राज्यात वाटा मिळू शकत नाही. तसेच विनाशीपण अविनाशीपणाचा वारसा मिळवू शकत नाही. **51**पाहा! मी तुम्हांला एक रहस्यमय सत्य सांगत आहे. आपण सर्व मरणार नाही. आपण सर्व बदलून जाऊ.

**52**क्षणात, डोळ्यांची उघडझाप होते इतक्या लवकर, जेव्हा शेवटचा कर्णा वाजेल, कारण कर्णा वाजेल आणि मेलेले अविनाशीपणात उठविले जातील आणि आपण जे अजूनही जिवंत आहोत ते बदलून जाऊ. **53**कारण या विनाशी शरीराने अविनाशीपण धारण करावे आणि या मर्त्य शरीराने अमरत्व धारण केलेच पाहिजे. **54**जेव्हा हे विनाशी शरीर अविनाशीपण धारण करील व हे मर्त्य शरीर अमरत्व धारण करील, तेव्हा पवित्र शास्त्रात सांगितल्याप्रमाणे होईल.

“विजयात मरण गिळले गेले आहे.”*

*यशया 25:8*

**55**“अरे मरणा तुझा विजय कोठे आहे? मरणा, तुझी नांगी कोठे आहे?”*

*होशेय 13:14*

**56**मरणाची नांगी पाप आहे आणि पापाचे सामर्थ्य नियमशास्त्रापासून येते. **57**पण देवाला धन्यवाद असो, जो प्रभु येशू ख्रिस्ताद्वारे आम्हाला विजय देतो!

**58**म्हणून माझ्या प्रिय बंधूनो, स्थिर आणि अचल राहा. नेहमी स्वत:ला प्रभूच्या कार्यासाठी वाहून घ्या. कारण तुम्ही जाणता की प्रभूमध्ये तुमचे काम व्यर्थ नाही.

## इतर विश्वासणाऱ्यांसाठी वर्गणी

**16** आता, देवाच्या लोकांकरिता वर्गणी गोळा करण्याविषयी, जसे मी गलतीयातील मंडळ्यांना आज्ञा केली त्याप्रमाणे तुम्हीही तसे करावे. **2**प्रत्येक रविवारी तुम्हांतील प्रत्येकाने आपल्या घरी, जो काही त्याला नफा मिळाला असेल त्यातून काढून ठेवावे आणि बचत करावी. **3**मी येईन तेव्हा ज्या माणसांना तुम्ही मान्यता द्याल त्यांना मी ओळखपत्रे देऊन तुमच्या देणग्या यरुशलेमला नेण्यासाठी पाठवीन. **4**आणि जर माझेसुद्धा जाणे योग्य असेल तर ते माझ्याबरोबर येतील.

## पौलाच्या योजना

**5**मी मासेदोनियातून जाईन तेव्हा तुमच्याकडे येईन कारण मासेदोनियातून जाण्याची माझी योजना आहे. **6**परंतु कदाचित शक्यतो मी तुमच्याबरोबर काही काळ घालवीन किंवा हिवाळासुद्धा तुमच्यात घालवीन. यासाठी की मी जिकडे जाणार आहे तिकडे तुम्ही मला पाठवावे. **7**जाता जाता तुम्हांला भेटण्याची माझी इच्छा नाही. कारण जर देवाची इच्छा असेल तर तुमच्यासमवेत काही काळ घालवावा अशी इच्छा मी धरतो. **8**पन्नासाव्या दिवसाच्या सणापर्यंत मी इफिसात राहीन **9**कारण माझ्यासाठी मोठे आणि परिणामकारक दार उघडले आहे. आणि असे अनेक आहेत जे मला विरोध करतात.

**10**जर तीमथ्य आला तर तो तुमच्याजवळ निर्भयपणे कसा राहील याकडे लक्ष द्या. कारण तोही माझ्यासारखेच प्रभूचे कार्य करीत आहे. **11**यास्तव कोणीही त्याला तुच्छ मानू नये. तर मग त्याने माझ्याकडे यावे म्हणून त्याला शांतीने पाठवा. कारण इतर बंधूंबरोबर त्याच्या येण्याची मी वाट पाहत आहे.

**12**आता आपला बंधु अपुल्लोविषयी, इतर बंधूंबरोबर त्याने तुमच्याकडे यावे म्हणून मी त्याला भरपूर उत्तेजन दिले. परंतु आताच त्याने तुमच्याकडे यावे अशी देवाची इच्छा नव्हती. त्याला संधी मिळाल्यावर तो येईल.

## पौल आपले पत्र संपवितो

**13**सावध असा, तुमच्या विश्वासात बळकट राहा. **14**धैर्यशील व्हा. सशक्त व्हा. प्रत्येक गोष्ट जी तुम्ही कराल ती प्रीतीत करा. **15**बंधूंनो, मी तुम्हांला बोध करतो तुम्हांला स्तेफनच्या घराची माहिती आहे आणि जाणीवही आहे की ते अखयाचे प्रथम फळ आहे. त्यांनी स्वत: संतांची सेवा करण्याचे ठरविले आहे. **16**प्रत्येक जण जो या कार्यात सामील होतो व प्रभूसाठी श्रम करतो अशा लोकांच्या तुम्हीसुद्धा अधीन व्हा.

[17]स्तेफन, फर्तुतात आणि अखायिक हे आल्याने मला आनंद झाला. कारण तुम्ही माझ्यासाठी जे केले ते तुम्ही करू शकला नसता. [18]कारण त्यांनी माझा व तुमचा आत्मा प्रफुल्लीत केला आहे. अशा लोकांना मान्यता द्या. [19]आशियातील मंडळ्या तुम्हांला सलाम सांगतात. अक्विला, प्रिस्कील्ला व जी मंडळी त्यांच्या घरात जमते, ती प्रभूमध्ये तुम्हांला फार सलाम सांगतात. [20]सर्व बंधु तुम्हांला सलाम सांगतात. पवित्र चुंबनाने एकमेकांना सलाम करा.

[21]मी, पौल स्वत: माझ्या स्वत:च्या हाताने हा सलाम लिहीत आहे. [22]जर कोणी प्रभूवर प्रीति करीत नाही, तर तो शापित होवो. “मारानाथा; हे प्रभु ये” [23]प्रभु येशूची कृपा तुम्हांबरोबर असो! [24]ख्रिस्त येशूमध्ये माझी प्रीति तुम्हां सर्वांबरोबर असो.

# पौलाचे करिंथकरांस दुसरे पत्र

1 देवाच्या इच्छेने ख्रिस्त येशूचा प्रेषित झालेला पौल
याजकडून, तसेच आपला बंधु तीमथ्य याजकडून,
देवाची करिंथ येथील मंडळी आणि अखयातील संपूर्ण
प्रदेशातील देवाच्या लोकांना 2देव आपला पिता आणि प्रभु
येशू ख्रिस्त याजकडून कृपा व शांति असो.

## पौल देवाचे उपकार मानतो

3आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताचा देव आणि पिता,
करूणायुक्त देवपिता. तो सांत्वन करणारा देव आहे. 4तो
आमच्या सर्व कठीण काळात आमचे सांत्वन करतो; यासाठी
की, आम्ही इतर लोकांचे त्यांच्या अडचणीत सांत्वन करू
शकू. देव जे सांत्वन आम्हाला देतो त्याच सांत्वनाने आम्ही
इतरांचे सांत्वन करू शकतो.

5आणि ख्रिस्ताच्या पुष्कळ दु:खामध्ये सहभागी होतो,
त्याच प्रकारे ख्रिस्ताद्वारे आम्हांला पुष्कळ सांत्वन मिळते
6जर आमच्यावर संकटे येतात तर ती संकटे तुमच्या
सांत्वनासाठी आणि तारणासाठी आहेत, जर आमच्याकडे
सांत्वन आहे तर ते तुमच्या सांत्वनासाठी आहे. यामुळे
आम्हाला जे दु:ख आहे तशाच प्रकारचे दु:ख सहन
करायला, धीराने सहन करायला मदत होते. 7आमची
तुमच्याविषयीची आशा बळकट आहे. कारण आम्हांला
ठाऊक आहे की, जसे तुम्ही दु:खाचे भागीदार आहात
तसे सांत्वनाचेही भागीदार आहात.

8बंधूंनो, आशिया प्रांतात जो त्रास आम्ही सहन केला
त्याविषयी तुम्ही अंधारात असावे अशी आमची इच्छा
नाही. आम्हांला तेथे मोठे ओझे होते. आमच्या
शक्तिपलीकडचे ते ओझे होते. आम्ही जीवनाविषयीची
आशासुद्धा सोडून दिली होती. 9खरोखर आम्हांला वाटत
होते की, आम्ही मरू, पण आम्ही आपल्या स्वत:वर भरंवसा
ठेवू नये, यासाठी हे घडले . हे यासाठी घडले की, जो
मनुष्यांना मरणातून उठवितो त्याच्यावर आम्ही विश्वास
ठेवावा. 10देवाने आम्हांला मरणाच्या मोठ्या संकटातून
वाचविले. आणि देव आम्हांला पुढेदेखील वाचवील. आम्ही
त्याच्यावर आमची आशा ठेवली आहे. यासाठी की, तो
यापुढे ही आम्हांस सोडवील. 11तुम्ही प्रार्थना करण्याने
आम्हांला मदत करावी. मग पुष्कळ लोक आमच्यासाठी
उपकार मानतील की त्यांच्या पुष्कळ प्रार्थनांमुळे देवाने
आम्हाला आशीर्वादित केले आहे.

## पौलाच्या योजनेत बदल

12कारण आम्हाला अभिमान बाळगण्याचे कारण,
म्हणजे आमच्या सद्सद्विवेकबुद्धीची साक्ष होय. ती अशी
की आम्ही मानवी ज्ञानाने नव्हे तर देवाच्या कृपेने, देवाच्या
पवित्रतेने व प्रामाणिकपणे जगात व विशेषकरून
तुमच्याजवळ वागलो. 13कारण ज्या गोष्टी तुम्ही वाचता
किंवा मान्य करता, त्याशिवाय दुसऱ्या गोष्टी आम्ही तुम्हांस
लिहित नाही. आणि शेवटपर्यंत तुम्ही नीट जाणून घ्याल
अशी आशा धरतो. 14आणि त्याप्रमाणे तुम्ही आम्हांस
काही अंशी जाणता की प्रभु येशूच्या दिवशी जसे आम्ही
तुमच्याविषयी अभिमान बाळगतो तसे तुम्हीही
आमच्याविषयी अभिमान बाळगता.

15मला याविषयीची खात्री असल्याने तुम्हांला पहिल्याने
भेटण्याची योजना केली, यासाठी की तुम्हांला फायदा
व्हावा. 16मी मासेदोनियाला जाताना तुम्हांला भेटण्याची
योजना केली आणि मासेदोनियाहून परत येताना तुमच्याकडे
येण्याचे ठरविले आणि त्यानंतर तुम्ही मला यहूदीयाला
जाण्यासाठी मदत करावी. 17जेव्हा मी असा बेत केला,
तेव्हा तो मी गंभीरपणे विचार न करता केला काय?
किंवा मी माझ्या योजना जगाच्या रीतीप्रमाणे करतो काय,
म्हणजे मी एकाच वेळेला "होय, होय" आणि "नाही, नाही"
असे म्हणतो काय?

18पण देव खात्रीने विश्वासपात्र आहे. म्हणून तुम्हांजवळ
आम्ही तुम्हांला होय किंवा नाही म्हणून असे वचन दिलेले
नाही, असे नाही. 19कारण देवाचा पुत्र येशू ख्रिस्त जो
आम्हांकडून, म्हणजे मी, सिल्वान व तीमथ्य यांजकडून
तुम्हांमध्ये गाजविला गेला, तो होय किंवा नाही असा झाला
नाही, तर तो फक्त होकारार्थीच आहे. 20कारण देवाची
वचने कितीही असली तरी ती त्याच्यामध्ये होकारार्थी
आहेत, यामुळे त्याच्याद्वारे आम्हांकडून देवाचे गौरव व्हावे
म्हणून त्याच्याद्वारे विशेष आशीर्वाद आहे (आमेन). 21आता
जो तुम्हांसहित आम्हांस ख्रिस्तामध्ये स्थिर करतो व ज्याने
आम्हांस अभिषेक केला तो देव आहे. 22मालकीपणाचा
शिक्का आमच्यावर मारला व जो येणार आहे त्याबद्दलची
खात्री म्हणून आपला आत्मा आमच्या अंतरंगात ठेव म्हणून
ठेवला.

23मी देवाला साक्षी होण्यासाठी हाक मारून आपल्या
जिवाची शपथ घेऊन सांगतो की तुमच्याशी कठोर व्यवहार

करू नये म्हणून मी करिंथला आलो नाही. 24आम्ही तुमच्या विश्वासावर स्वामित्व करतो असे नाही, पण तुमच्या आनंदासाठी आम्ही तुमच्याबरोबर काम करतो. कारण विश्वासाने तुम्ही स्थिर राहता.

2 म्हणून मी असा निश्चय केला की, मी पुन्हा तुमची दु:खदायक अशी भेट घेणार नाही. 2कारण जर मी तुम्हांला दु:ख देतो तर मला तुमच्याशिवाय आनंद कोण देईल? 3आणि मी तुम्हांस हे यासाठी लिहिले की, मी आल्यावर ज्यांच्यापासून मी आनंदी व्हावे त्यांच्यापासून मला दु:ख होऊ नये. मला तुम्हा सर्वांविषयी विश्वास आहे की, माझा आनंद तो तुम्हा सर्वांचादेखील आहे. 4कारण मी अत्यंत दु:खाने व कळवळून हे लिहित आहे पण तुम्हांला खिन्न करावे म्हणून नव्हे तर तुमच्याविषयी माझ्या मनात जी प्रीति आहे तिची खोली तुम्हांला समजावी म्हणून लिहित आहे.

## ज्याने चूक केली त्याला क्षमा करा

5जर कोणी कोणाला दु:ख दिले असेल तर त्याने फक्त मलाच ते दिले असे नाही, तर काही प्रमाणात तुम्हा सर्वांना दिले आहे. त्यासंबंधी मी फार कठीण होऊ इच्छित नाही. 6अशा मनुष्यांना सगळ्यांनी मिळून दिलेली शिक्षा पुरे. 7आता त्याऐवजी तुम्ही त्याला क्षमा केली पाहिजे आणि त्याचे सांत्वन केले पाहिजे. यासाठी की अति दु:खाने तो दबून जाऊ नये. 8मी विनंति करतो, म्हणून तुमचे त्याच्यावरील प्रेम पुन्हा व्यक्त करा. 9मी तुम्हांला लिहिण्याचे कारण हेच की तुम्ही परीक्षेत टिकता की नाही व प्रत्येक बाबतीत तुम्हा आज्ञाधारक राहता की नाही हे पाहावे. 10जर तुम्ही एखाद्याला क्षमा करता तर मीसुद्धा त्याला क्षमा करीन. आणि ज्याची ज्या कशाची मी क्षमा केली आहे, आणि त्यातूनही जर काही क्षमा करण्याचे राहिले असेल–तर मी ख्रिस्ताच्या नजरेत तुमची क्षमा केली आहे. 11यासाठी की सैतानाने आम्हांवर वरचढ होऊ नये. कारण त्याच्या योजना आम्हाला माहीत नाहीत असे नाही.

## त्रोवस येथील पौलाची काळजी

12जेव्हा मी ख्रिस्ताच्या सुवार्तेकरिता त्रोवसास आलो तेव्हा प्रभूमध्ये मजसाठी दार उघडल्यावर, 13माझा भाऊ तीत मला तेथे सापडला नाही, म्हणून माझ्या आत्म्याचे समाधान झाले नाही. पण तेथील लोकांचा निरोप घेऊन मी मासेदोनियास गेलो.

## ख्रिस्ताद्वारे विजय

14पण देवाचे आभार मानतो जो ख्रिस्तामध्ये नेहमी आम्हांला विजयी करतो व त्याच्याविषयीच्या ज्ञानाचा सुगंध आमच्याद्वारे सगळीकडे पसरवितो. 15कारण आम्ही, जे तारले जात आहेत व जे नाश पावत आहेत ते देवाला वाहिलेला ख्रिस्ताचा सुगंध असे आहोत. 16हरवलेल्यांसाठी आम्ही मरणाचा वास आहोत तर जे तारले गेले आहेत, त्यांच्यासाठी आम्ही जीवनाचा सुगंध आहोत. आणि या कामासाठी बरोबरीचा कोण आहे? 17इतरांसारखे आम्ही फायद्यासाठी देवाच्या वचनाचे काम करीत नाही. याउलट ख्रिस्तामध्ये देवासमोर आम्ही देवाने पाठविलेल्या माणसांसारखे प्रामाणिकपणे बोलतो.

## देवाच्या नव्या कराराचे सेवक

3 पुन्हा, आम्ही आमची प्रशंसा करायला लागलो काय? किंवा आम्हांला काही लोकांसारखी तुमच्याकडे येण्यास किंवा तुमच्याकडून येण्यास शिफारसपत्रांची आवश्यकता आहे काय? 2तुम्ही स्वत:च आमची शिफारसपत्रे आहात, आमच्या अंत:करणावर लिहिलेले, प्रत्येकाने वाचलेले व प्रत्येकाला माहीत असलेले. 3तुम्ही दाखवून देता की, तुम्ही ख्रिस्ताकडून आलेले पत्र आहात, आणि ते आमच्या सेवेचा परिणाम शाईने लिहिलेले पत्र नव्हे, तर जिवंत देवाच्या आत्म्याने लिहिलेले, दगडी पाट्यावर नव्हे तर मानवी हृदयाच्या पाट्यांवर लिहिलेले आहात.

4देवासमोर ख्रिस्ताद्वारे अशा प्रकारचा आमचा विश्वास आहे. 5असे नाही की आम्ही स्वत:हून आमच्यासाठी सर्वकाही करण्यास समर्थ आहोत, तर आमचे सामर्थ्य देवापासून येते. 6त्याने आम्हांला नव्या कराराचे सेवक म्हणून समर्थ बनविले आहे– पत्राने नव्हे तर आत्म्याने, कारण पत्र मारून टाकते, पण आत्मा जीवन देतो.

## नवा करार महान गौरव आणतो

7आता जर सेवेमुळे मरण येते, जी दगडावर अक्षरांनी कोरलेली होती आणि जर ती सेवा गौरवाने आली, यासाठी की, इस्राएल लोकांना मोशेच्या चेहऱ्याचे तेजोवलय पाहता येऊ नये, जरी ते तेज कमी होत चालले होते. 8तर आत्म्याची सेवा त्यापेक्षा गौरवी होणार नाही काय? 9कारण जर सेवा जी माणसाचा निषेध करते ती गौरवी असेल, तर तिच्यापेक्षा कितीतरी गौरवी ती सेवा असेल जी नीतिमत्त्व आणते! 10त्यात गौरव होते, पण जेव्हा त्यापेक्षा महान गौरवासमोर तुलना केली जाते, तेव्हा ते कमी होते. 11आणि जर ते निस्तेज होत जाणारे गौरवाने आले तर जे टिकते त्याचे गौरव किती महान असेल!

12म्हणून आम्हांला अशी आशा असल्यामुळे, आम्ही फार धीट आहोत. 13आम्ही मोशेप्रमाणे नाही, ज्याने तोंडावर आवरण घेऊन त्याच्या चेहऱ्याच्या तेजामुळे (इस्राएली लोकांचे डोळे दिपून जाऊ नयेत) त्याचा चेहरा लोकांना दिसणार नाही म्हणून तोंड झाकून घेतले. जरी त्या वेळेला त्याचे तेज कमी होत चालले होते.

14पण त्यांची मने मंद करण्यात आली होती. कारण आजपर्यंत तोच पडदा (आवरण) राहतो, जेव्हा जुना करार वाचला जातो. तो हटवण्यात आलेला नाही. कारण केवळ

ख्रिस्तामध्येच तो बाजूला घेतला जाईल. 15तरी आजपर्यंत
जेव्हा मोशेचे ग्रंथ वाचतात तेव्हा त्यांच्या मनावर आच्छादन
राहते. 16पण जेव्हा केव्हा कोणी प्रभूकडे वळतो तेव्हा ते
आवरण काढून घेतले जाते.
17प्रभु आत्मा आहे आणि जेथे प्रभूचा आत्मा आहे तेथे
मोकळेपणा आहे. 18तर आपण सर्वजण आवरण नसलेल्या
चेहऱ्याने प्रभुचे गौरव आरशात पाहिल्याप्रमाणे पाहत
असता, प्रभु जो आत्मा याच्यापासून गौरवातून गौरवात
असे त्याच्या प्रतिरूपात रूपांतरीत होत जातो.

## मातीच्या भांड्यातील आध्यात्मिक ठेवा

4 म्हणून देवाच्या दयेद्वारे आम्हाला ही सेवा मिळाली
आहे, आम्ही धीर सोडत नाही. 2तर आम्ही लज्जास्पद
गुप्त गोष्टी सोडून दिल्या आहेत, आम्ही कपटाने वागत
नाही. आणि कपटदृष्टीने देवाच्या वचनाचा उपयोग करीत
नाही, तर देवासमोर खरेपण प्रगट करण्यास आम्ही
आपणांसमोर सर्व लोकांच्या सद्सद्विवेकबुध्दिला पटवितो.
3आणि जरी आमचे शुभवर्तमान आवरण घातलेले आहे,
जे नाश पावत आहेत अशांसाठी ते आच्छादित आहे. 4या
जगाच्या देवाने अविश्वासणाऱ्यांची मने आंधळी केली
आहेत. यासाठी की ख्रिस्ताच्या गौरवी सुवार्तेचा प्रकाश
त्यांना पाहता येऊन नये. जो देवाच्या प्रतिमेचा आहे.
5कारण आम्ही आमचीच सुवार्ता सांगत नाही तर ख्रिस्त
येशू हाच प्रभु आहे अशी घोषणा करतो आणि आम्ही येशू
ख्रिस्तासाठी तुमचे सेवक आहोत असे स्वत:विषयी सांगतो.
6कारण देव, जो म्हणाला, “अंधारातून प्रकाश होवो.”
त्याने तो प्रकाश, आमच्या अंत:करणात ख्रिस्ताच्या
चेहेऱ्यात देवाच्या गौरवाच्या ज्ञानात दाखवावा. 7पण आमचा
हा ठेवा मातीच्या भांड्यामध्ये आहे. यासाठी की, सामर्थ्याची
पराकोटी देवापासून येते, आम्हांकडून नाही. 8आम्हांवर
चारी दिशांनी संकटे येतात, पण आम्ही अजून चिरडले
गेलो नाही, गोंधळलेलो आहोत, पण निराश झालो नाही.
9छळ झालेलै असे आहोत पण टाकून दिलेले असे आम्ही
नाही, खाली पडलेलो असलो तरी आमचा नाश झालेला
नाही.
10आम्ही नेहमी येशूचे मरण आमच्या शरीरात घेऊन
जात असतो. यासाठी की ख्रिस्ताचे जीवनही आमच्या
शरीराद्वारे प्रकट व्हावे. 11कारण आम्ही जे जिवंत आहोत
ते आम्ही नेहमीच ख्रिस्ताकरिता मरणाला सोपविलेले
आहोत. यासाठी त्याचे जीवन आमच्या मर्त्य शरीराद्वारे
प्रकट व्हावे. 12म्हणून मग, आमच्यामध्ये मृत्यू काम करीत
आहे, पण तुमच्यामध्ये जीवन काम करीत आहे.
13असे लिहिले आहे: “मी विश्वास ठेवला; म्हणून मी
बोललो आहे.” विश्वासाच्या त्याच आत्म्याने आम्हीसुद्धा
विश्वास ठेवतो आणि म्हणून बोलतो. 14कारण आम्हांला
माहीत आहे ज्याने प्रभु येशूला उठविले, तो त्याच्याबरोबर
आम्हांला उठवील व आम्हांला तुमच्याबरोबरच
त्याच्यासमोर सादर करील. 15कारण या सर्व गोष्टी
तुम्हाकरिता आहेत. यासाठी की, पुष्कळांच्या द्वारे विपुल
झालेली कृपा अनेकांच्या उपकारस्तुतीमुळे देवाचे भरघोस
गौरव होण्याला कारण व्हावी.

## विश्वासाचे जगणे

16म्हणून आम्ही धीर सोडीत नाही. जरी बाह्यदृष्ट्या
आम्ही व्यर्थ ठरत आहोत तरी अंतरीकदृष्ट्या आम्ही
दिवसेंदिवस नवीन होत आहोत. 17कारण आमची हलकी
व क्षणिक दु:खे ही आमच्यासाठी अनंतकाळचे गौरव
मिळवीत आहेत, जे दु:खापेक्षा कितीतरी मोठे आहे. 18म्हणून
आम्ही ज्या गोष्टी कायमस्वरूपात दिसत नाहीत तिकडे
आमचे डोळे लावीत नाही पण जे दिसत नाही, पण अविनाशी
आहे त्याकडे डोळे लावतो. कारण जे दिसते ते क्षणिक
आहे, पण जे दिसत नाही, ते अनंतकालीक आहे.
5 आता आम्हांला माहीत आहे की, जेव्हा जगिक घर
ज्यामध्ये आम्ही राहतो, नष्ट झाले, तर आम्हाला
देवापासून मिळालेले अनंतकाळचे घर स्वर्गात आहे. ते
मानवी हातांनी बांधलेले नाही. 2दरम्यान आम्ही कण्हतो,
आमच्या स्वर्गीय निवासस्थानासह पोशाख करण्यास आम्ही
आतुर झालो आहोत. 3कारण जेव्हा आम्ही पोशाख करू,
तेव्हा आम्ही नग्न दिसणार नाही. 4कारण या घरामध्ये
आम्ही असताना आम्ही कण्हतो, आणि ओझ्याने दबले
जातो. कारण वस्त्रहीन असण्याची आमची इच्छा नसते,
पण आमची इच्छा आहे की, आमच्या स्वर्गीय
निवासस्थानाने पोशाख करावा. यासाठी की जे मर्त्य आहेत
ते जीवनाने गिळावे. 5आता देवानेच आम्हांला नेमक्या
याच कारणासाठी निर्माण केले, आणि हमी म्हणून पवित्र
आत्मादिला, जो येणार आहे त्याबद्दलची खात्री बाळगा.
6म्हणून आम्हांला नेहमीच विश्वास असतो आणि माहीत
असते की, जोपर्यंत आम्ही या शरीरात राहत आहोत,
तोपर्यंत आम्ही प्रभूपासून दूर आहोत. 7आम्ही विश्वासाने
जगतो, जे बघतो त्याने 8आम्हांला विश्वास आहे, मी
म्हणतो, आणि शरीरापासून दूर राहण्याचे आम्ही पसंत
करू. आणि प्रभुसंगती राहू. 9म्हणून त्याला संतोषविणे हे
आम्ही आमचे ध्येय करतो, आम्ही शरीराने जगत असलो
किंवा प्रभूपासून दूर असलो तरी. 10कारण आम्हांला
सर्वांना ख्रिस्ताच्या न्यायासनासमोर उभे राहायचे आहे.
आणि प्रत्येकाला त्याचे जे प्रतिफळ मिळणार आहे. म्हणजे
शरीरात असताना ज्या वाईट किंवा चांगल्या गोष्टी केल्या
त्याप्रमाणे बक्षिस मिळेल.

## देवाचे मित्र होण्यासाठी लोकांना मदत करणे

11म्हणून आम्ही जाणतो की देवाचे भय कशासाठी
धरायचे व त्यासाठी आम्ही मनुष्यांना वळविण्याचे प्रयत्न
करतो. आम्ही जे आहोत ते देवासमोर स्पष्ट आहोत.
आणि माझी आशा आहे की, तुमची सद्सद्विवेकबुध्दि

आम्हांला जाणते. [12]आम्ही तुमच्यासमोर आमची पात्रता पुन्हा एकदा सिद्ध करण्याचा प्रयत्न करीत नाही. पण आमच्याविषयी तुम्ही अभिमान बाळगावा यासाठी संधी देत आहोत, यासाठी की तुम्ही अशांना उत्तर द्यावे की जे पाहिलेल्या गोष्टीविषयी अभिमान बाळगतात आणि अंत:करणात जे आहे त्याविषयी बाळगत नाहीत. [13]जरी आम्ही वेडे असलो तरी ते ख्रिस्तासाठी, जर आम्ही आमच्या योग्य मन:स्थितीत असलो तर ते तुमच्यासाठी. [14]कारण ख्रिस्ताचे प्रेम आम्हाला भाग पाडते, कारण आमची खात्री झाली आहे की, जर एक सर्वांसाठी मेला आणि म्हणून सर्व मेले. [15]आणि तो सर्वांसाठी मेला, यासाठी की जे जगतात त्यांनी स्वत:साठीच जगू नये तर जो त्यांच्यासाठी मेला व पुन्हा उठला त्याच्यासाठी जगावे.

[16]म्हणून आतापासून जगिक दृष्टीकोनातून आम्ही कोणाल मानत नाही. तरी एकेकाळी आम्ही ख्रिस्ताला अशाप्रकारे मानले. पण आता आम्ही तसे करीत नाही. [17]म्हणून, जर कोणी ख्रिस्तामध्ये आहे, तर तो नवी उत्पत्ति आहे. जुने गेले आहे. नवीन आले आहे! [18]हे सर्व देवापासून आहे त्याने ख्रिस्ताद्वारे आमच्याशी स्वत:चा समेट केला आणि आम्हांला समेटाची सेवा दिली. [19]देव ख्रिस्तामध्ये जगाशी स्वत:चा समेट करीत होता. मनुष्यांची पापे त्यांच्याविरुद्ध मोजत नव्हता. आणि त्याने आम्हांला समेटाचा संदेश दिला आहे. [20]म्हणून आम्ही ख्रिस्ताचे राजदूत आहोत, जणू काय देव आमच्या द्वारे त्याचे आवाहन करीत होता. ख्रिस्ताच्या वतीने आम्ही तुम्हांला विनंति करतो. देवाशी समेट करा. [21]ज्याच्याठायी पाप नव्हते त्याला आमच्यासाठी देवाने पाप केले. यासाठी की त्याच्यामध्ये आम्ही देवाचे नीतिमत्त्व व्हावे.

6 देवाचे सहकर्मचारी म्हणून आम्ही तुम्हांला विनंति करतो की, जी देवाची कृपा आपल्याला मिळते ती व्यर्थ घालवू नका. [2]कारण तो म्हणतो,

"माझ्या सोयीच्या वेळी मी तुझे ऐकले आणि तारणाच्या दिवसात मी तुला मदत केली." *यशया 49:8*

मी तुम्हांला सांगतो, देवाच्या "सोयीची वेळ" आताच आहे. आताच "तारणाचा दिवस" आहे.

[3]आमची सेवा दोषी ठरू नये यासाठी आम्ही कोणालाही दोष देत नाही. [4]उलट सर्व प्रकारच्या परिस्थितीत आम्ही देवाचे सेवक होतो हे आम्ही दाखवून दिले. मग आम्हांला त्रास सोसावा लागो, नाहीतर अडचणी येवोत, छळ होवो नाहीतर वेदना होवोत. छळात, आणि दु:खात [5]फटके खाण्यात, तुरुंगवासात आणि दंग्यात, कठोर श्रमात, जागून काढलेल्या रात्रीत, भुकेले असताना, [6]शुद्धतेत, समजूतदारपणात, सहनशीलतेत, आणि दयाळूपणात, पवित्र आत्म्याच्या आणि निर्व्याज प्रीतीमुळे, [7]सत्य बोलण्यात, आणि देवाच्या सामर्थ्यात, आक्रमक आणि संरक्षक पद्धतीने नीतिमत्त्वाच्या शस्त्रांसह, [8]गौरव व अपमानाद्वारे, आमच्याबद्दलच्या वाईट व चांगल्या बातमीने शहाणपणाने, तरीही फसविणारे ठरले गेलेलो. [9]जरी आम्ही प्रसिद्ध असलो, तरी अप्रसिद्ध असे समजले गेलेलो, मरत असलेले तरी जगत असलेलो, मारलेले तरी अजून ठार न केलेले, [10]दु:खी तरी नेहमी आनंद करीत, गरीब तरी पुष्कळांना श्रीमंत करणारे, जवळ काही नसलेले तरी सर्व काही जवळ असणारे असे आहोत.

[11]आम्ही मोकळेपणाने तुमच्याशी बोललो, करिंथकरांनो, आणि आमची अंत:करणे तुमच्यासमोर अगदी पूर्णपणे रीतीने उघडी केली. [12]आम्ही तुमच्याबद्दल प्रेमभावना ठेवण्याचे थांबवले नाही, पण तुमची आमच्याबद्दलची प्रेमभावना मात्र थबकली आहे. [13]आपल्यातली देवाणघेवाण चांगली असावी म्हणून मी तुमच्याशी माझ्या मुलांप्रमाणे बोलतो. तुम्हीही तुमची अंत:करणे विशाल करा.

### ख्रिस्ती नसलेल्यांबरोबर राहण्याविषयी सूचना

[14]जे तुमच्या बरोबरीचे नाहीत त्यांच्याबरोबर एका जुवाखाली एकत्र येऊ नका. नाहीतर नीतिमान व दुष्टपणा यात काय फरक उरला? किंवा प्रकाश व अंधार यात कोणते साम्य आहे? [15]ख्रिस्त आणि बलियाल* यांचा सलोखा कसा होणार? विश्वासणाऱ्याचा अविश्वासणाऱ्या बरोबर काय सारखेपणा आहे? [16]देवाचे मंदिर आणि मूर्ति यांच्या मान्यता एक कशा असतील? कारण आम्ही जिवंत देवाचे मंदिर आहोत. ज्याप्रमाणे देवाने म्हटले आहे:

"मी त्यांच्याबरोबर राहीन, आणि त्यांच्याबरोबर चालेन, मी त्यांचा देव होईन आणि ते माझे लोक होतील."
*लेवीय 26:11-12*

[17]"म्हणून त्यांच्यामधून बाहेर या आणि स्वत:ला त्यांच्यापासून वेगळे करा. प्रभु म्हणतो, अशुद्ध वस्तूला स्पर्श करू नका, आणि मी तुम्हांला स्वीकारीन."
*यशया 52:11*

[18]"मी तुम्हांला पिता असा होईन, तुम्ही माझी मुले व कन्या व्हाल, असे सर्वसमर्थ प्रभु म्हणतो."
*2 शमुवेल 7:14; 7:8*

7 प्रिय मित्रांनो, देवाची अभिवचने आमच्याकडे असल्याने जे शरीर व आत्म्याला दुषित करते त्या प्रत्येक गोष्टीपासून स्वत:ला शुद्ध ठेऊ या. देवाविषयी असलेल्या आदराने पवित्रतेत परिपूर्ण होऊ या.

---

**बलियाल** सैतान

## पौलाचा आनंद

2तुमच्या अंत:करणात आमच्यासाठी जागा करा: आम्ही
कोणाचेही वाईट केले नाही. आम्ही कोणाला भ्रष्ट केले
नाही. आम्ही कोणाचा गैर फायदा घेतला नाही. 3मी तुम्हांला
तुमचा निषेध करावा म्हणून असे म्हणत नाही. मी तुम्हांला
अगोदरही सांगितले आहे की, आमच्या अंत:करणात
तुमच्याविषयी असे स्थान आहे की, आम्ही तुमच्याबरोबर
जगू किंवा मरू. 4मला तुमच्याविषयी मोठा विश्वास वाटतो,
मला तुमच्याविषयी खूप अभिमान वाटतो. तुमच्या बाबतीत
मी अधिक उत्तेजित झालो आहे. अनेक त्रास झाले तरी
आमच्या सर्व त्रासात आमच्या आनंदाला उधाण आले
आहे.

5कारण जेव्हा आम्ही मासेदोनियाला आलो, तेव्हा
आमच्या या शरीराला विसावा नव्हता. पण आम्हांला
प्रत्येक ठिकाणी त्रास देण्यात आला, बाहेरून भांडणे, आतून
भीति होती. 6पण जे हताश झाले आहेत त्याचे सांत्वन देव
करतो, त्याने तीताच्या येण्याने आमचे सांत्वन केले.
7त्याच्यामुळेच नव्हे तर तुम्ही त्याला दिलेल्या
सांत्वनामुळेसुद्धा. तुमच्या आमच्याबद्दल असलेल्या
ओढीबद्दल त्याने आम्हांला सांगितले आहे. तुमचे खोलवरचे
दु:ख, माझ्याबद्दलची तुमची असलेली तीव्र सदिच्छा याविषयी
सांगितले. त्यामुळे माझा आनंद पूर्वीपेक्षा वाढला आहे.

8जरी मी माझ्या पत्रामुळे तुम्हांला दु:खावले असले तरी
त्याबद्दल मला खेद होत नाही. जरी मला खेद होत असला
तरी मला आता जाणवले आहे की, माझ्या पत्रामुळे तुम्हांला
दु:ख झाले. पण फक्त थोड्या वेळापुरते असावे. 9तरी
आता मी आनंदी आहे. यासाठी नाही की, तुम्हांला दु:खी
केले, तर यासाठी की तुमच्या दु:खामुळे तुम्ही पश्चात्ताप
केला. कारण देवाने इच्छिल्याप्रमाणे तुम्ही दु:खी झाला
आणि म्हणून आमच्याकडून कुणाची कोणत्याही प्रकारे
हानि झाली नाही. 10दैवी दु:ख तारणाप्रत नेणारा पश्चात्ताप
आणते आणि कोणताही खेद बाळगीत नाही, पण जगिक
दु:ख मरण आणते. 11पहा दैवी दु:खामुळे तुमच्यात काय
निर्माण झाले आहे: किती तरी गंभीरपणा आणि आत्मियता,
स्वत:ला स्पष्ट करण्यासाठी किती उत्सुकता, किती संताप,
किती सावधानता, किती ओढ, किती सदिच्छा व न्याय
मिळवून देण्यासाठी किती तत्परता, या बाबतीत प्रत्येक
गोष्टीत तुम्ही स्वत:ला निर्दोष असे सिद्ध केले. 12म्हणून
जरी मी तुम्हांला लिहिले तरी ते कोणी चूक केली म्हणून
किंवा कोणी दुसऱ्याला दु:ख दिले म्हणून नाही तर उलट
देवासमोर तुम्ही आमच्या बाबतीतील तुमची आत्मियता
दाखवली हे तुम्हांला पाहता यावे. 13यामुळे आम्हास
उत्तेजन मिळाले.

आमच्या स्वत:च्या उत्तेजनाशिवाय आणखी आम्ही
विशेषत: तीताला आनंदीत पाहून आम्हांला आनंद झाला
कारण त्याचा आत्मा तुम्हा सर्वांमुळे ताजातवाना झाला
आहे. 14मी त्याला तुमच्याविषयी अभिमानाने सांगितले
आणि तुम्ही मला लज्जित केले नाही. पण जे सर्व काही
आम्ही तुम्हांला सांगितले ते खरे खरे होते. तसा आमचा
तुमच्याविषयीचा अभिमान जो तीताला सांगितला ह्याच
रीतीने स्वत:चा खरेपणा सिद्ध केला. 15आणि जेव्हा त्याला
तुमचा आज्ञाधारकपणा आठवतो तेव्हा त्याचे तुमच्या
विषयीचे प्रेम अधिकच वाढते. त्याचा स्वीकार तुम्ही भीत
व कांपत केला 16मला आनंद वाटतो की मला
तुमच्याविषयी पूर्ण विश्वास वाटू शकतो.

## ख्रिस्ती देणे

8 आणि आता, बंधूनो, आम्हांला असे वाटते की, तुम्ही
हे जाणून घ्यावे की, मासेदोनियातील मंडळ्यांना देवाने
कशी कृपा दिली. 2अत्यंत खडतर अशी संकटे असली
तरी त्यांचा ओसंडून वाहणारा आनंद आणि त्यांचे आत्यंतिक
दारिद्य विशाल उदारतेत उभे राहिले. 3कारण मी साक्ष
देतो की, त्यांना जितके शक्य होते तितके त्यांनी दिले.
आणि त्यांच्या क्षमतेपेक्षाही जास्त दिले. त्यांनी उत्स्फूर्तपणे
स्वत:ला दिले. 4संतांच्या सेवेमुळे मिळणाऱ्या
आशीर्वादामध्ये सहभागी होण्याचा बहुमान मिळावा म्हणून
त्यांनी आस्थेवाईकपणे आम्हांला विनंति केली. 5आणि
आम्ही अपेक्षा केली त्याप्रमाणे त्यांनी केले नाही, तर
त्यांनी स्वत:ला प्रथम देवाला दिले. आणि मग देवाच्या
इच्छेला राखून आम्हांला दिले.

6मग आम्ही तीताला विनंति केली, त्याने अगोदर जशी
सुरुवात केली होती तशीच त्याने तुम्हामध्ये या कृपेची
पूर्णताही करावी. 7 म्हणून जसे तुम्ही सर्व गोष्टीत, म्हणजे
विश्वासात, बोलण्यात ज्ञानात व सर्व आस्थेत व आम्हांवरील
आपल्या प्रीतीत वाढला आहा, तसे तुम्ही या कृपेतही फार
वाढावे.

8मी तुम्हांला आज्ञा करीत नाही. पण मला तुमच्या
प्रेमाच्या प्रामाणिकतेची तुलना इतरांच्या आस्थेशी करायची
आहे. 9कारण तुम्हांला आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताची कृपा
माहीत आहे की, जरी तो श्रीमंत होता तरी तुमच्याकरिता
तो गरीब झाला, यासाठी की, त्याच्या गरिबीने तुम्ही श्रीमंत
व्हावे. 10आणि तुमच्या फायद्यासाठी माझा सल्ला असा
आहे की, गेल्या वर्षी तुम्ही केवळ देण्यातच नव्हे तर तशी
इच्छा करण्यात पहिले होता. 11आता ते काम पूर्ण करा,
यासाठी की कार्य करण्याची तुमची उत्सुकता ही ती
तुमच्याकडे ज्या प्रमाणात आहे त्यानुसार पूर्ण करण्यात
यावी.

12कारण जर इच्छा असेल, तर एखाद्याकडे जे असेल
तसे मान्य होईल. जर नसेल तर मान्य होणार नाही.
13दुसऱ्याचे ओझे हलके करण्यासाठी तुमच्यावर ओझे
लादावे असे नाही तर समानता असावी म्हणून. 14सध्याच्या
काळात तुमच्या विपुलतेतून त्यांची गरज भागावी. यासाठी
की नंतर त्याच्या विपुलतेमुळे तुमच्या गरजा भागविल्या
जाव्यात. मग समानता येईल. 15पवित्र शास्त्र म्हणते,

"ज्याने पुष्कळ गोळा केले होते, त्याला जास्त झाले नाही. ज्याने थोडे गोळा केले होते, त्याला कमी पडले नाही." *निर्गम 16:18*

## तीत आणि त्याचे सोबती

16जी आस्था माझ्यामध्ये तुमच्याविषयी आहे ती आस्था देवाने तीताच्या अंत:करणात घातली याबद्दल मी देवाचे आभार मानतो, 17कारण तीताने आमच्या आवाहनाचे स्वागतच केले असे नाही तर तो पुष्कळ उत्सुकतेने आणि त्याच्या स्वत:च्या मोठ्या आस्थेने तुमच्याकडे येत आहे. 18आणि आम्ही त्याच्याबरोबर एका बंधूला ज्याची त्याच्या सुवार्तेबद्दलच्या मंडळ्यातील सेवेबद्दल वाहवा होत आहे, त्याला पाठवीत आहोत. 19यापेक्षा अधिक म्हणजे मंडळ्यांनी आम्हासंगती दानार्पण घेऊन जाण्यासाठी त्याची निवड केली. जे आम्ही प्रभुच्या गौरवासाठी करतो आणि मदत करण्याची आमची उत्सुकता दिसावी म्हणून हे करतो. 20ही जी विपुलता आम्हांकडून सेवेस उपयोगी पडत आहे तिच्या कामात कोणीही आम्हांवर दोष लावू नये म्हणून आम्ही काळजीपूर्वक वागत आहोत. 21कारण जे प्रभूच्या दृष्टीने चांगले तेच आम्ही योजितो, एवढेच नाही तर माणसांच्या दृष्टीने जे चांगले ते योजितो.

22त्याला सोडून आम्ही त्यांच्याबरोबर आमच्या बंधूलाही पाठवित आहोत. ज्याने आम्हाला स्वत:ला पुष्कळ बाबतीत आवेशी असल्याचे सिद्ध करून दाखविले आहे आणि आता त्याला तुमच्याबद्दल वाटत असलेल्या विश्वासामुळे तो अधिक आवेशी झाला आहे.

23तीताच्या बाबतीत सांगायाचे तर, तो तुमच्यामधील माझा एक सहकारी व सहकर्मचारी आहे, आमच्या इतर बंधूंच्या बाबतीत सांगायचे तर, ते ख्रिस्ताला गौरव व मंडळ्यांचे प्रतिनिधी आहेत. 24म्हणून या लोकांना तुमच्या प्रेमाचा पुरावा द्या. आणि आम्हांला तुमच्याबद्दल वाटत असलेल्या अभिमानाबद्दलचे समर्थन करा. यासाठी की, मंडळ्यांनी ते पाहावे.

## ख्रिस्ती बांधवांकरिता मदत

9 या संताच्या सेवेसाठी मी तुम्हांला काही लिहावे याची गरज भासत नाही. 2कारण मदत करण्याबद्दलची तुमची उत्सुकता मला माहीत आहे. आणि मी मासेदोनियातील लोकांना याविषयी अभिमानाने सांगत होतो की, गेल्या वर्षापासून अखयातील तुम्ही लोक देण्यासाठी तयार आहात आणि तुमच्या जोशामुळे पुष्कळ जण कृति करण्यास आवेशाने पुढे आले आहेत. 3परंतु मी भावांना यासाठी पाठवीत आहे की, आमचा तुमच्याविषयी या बाबतीत अभिमान पोकळ ठरू नये. पण जसे आम्ही तुम्हांला सांगितले तसे तुम्ही तयार असावे. 4कारण कोणी मासेदोनियाचा मनुष्य माझ्याबरोबर आला, आणि जर त्याने तुम्हांला तयार नसलेले पाहिले, तर तुम्ही लज्जित व्हाल असे आम्हाला म्हणायचे नाही. तर आम्ही लज्जित होऊ. 5म्हणून मला हे आवश्यक आहे की, बंधूनी आम्हांला आगाऊ भेट देण्यासाठी त्यांना विनंति करावी आणि उदार देणगी जी तुम्ही देण्याचे अभिवचन दिले आहे, तिच्याविषयीची व्यवस्था संपवावी. मग ती उदारहस्ते दिलेली देणगी ठरेल व कुरकुर करीत दिलेले दान ठरणार नाही.

6हे लक्षात ठेवा: जो हात राखून पेरतो तो त्याच मापाने कापणी करील, आणि जो उदार हाताने पेरील तो त्याच मापाने कापणी करील. 7प्रत्येक माणसाने अंत:करणात ठरविल्याप्रमाणे द्यावे, खेदाने किंवा बळजबरीने देणे भाग पडते म्हणून देऊ नये. कारण आनंदाने देणाऱ्यावर देव प्रेम करतो. 8आणि देव तुम्हाला कृपेने विपुल देण्यास समर्थ आहे. यासाठी की सर्व गोष्टीत सर्व वेळी, तुम्हांला विपुलता मिळेल आणि चांगल्या कामासाठी अधिक तत्पर व्हाल. 9असे लिहिले आहे:

"तो गरीबांना उदारहस्ते देतो, त्याची दया अनंतकाळपर्यंत राहील."

*स्तोत्र. 112:9*

10जो पेरणाऱ्याला बी व खाणाऱ्याला अन्न पुरवितो, तो तुम्हाला पेरायला बी पुरवील आणि ते अनेकपट करील. आणि तुमच्या नीतिमत्त्वाची फळे वाढवील. 11सर्व प्रकारच्या उदारपणाकरिता प्रत्येक गोष्टीत धनवान व्हाल. यामुळे तुम्हीदेखील उदारपणे द्यावे ज्यामुळे देवाची स्तुति होईल. 12कारण या अर्पणकार्याची ही सेवा संताच्या गरजा पुरविते. इतकेच केवळ नाही तर देवाला अनेक गोष्टी दिल्याने विपुलता येते. 13कारण या सेवेमुळे तुम्ही स्वत:ला योग्य शाबित करता, आणि ते देवाचे गौरव करतात. तुम्ही ज्यावर विश्वास ठेवता त्या ख्रिस्ताच्या शुभवर्तमानाला अधीन असल्याने तुमचे स्वीकारणे. 14आणखी ते तुम्हाकरिता प्रार्थना करीत असता तुम्हावर देवाने जी विपुल कृपा केली आहे, त्यामुळे तुमची भेट व्हावी अशी उत्कंठा ते धरतात. 15देवाच्या अनिर्वाच्य देणग्यांबद्दल त्याचे आभार मानतो.

## पौल त्याच्या सेवेचे समर्थन करतो

10 ख्रिस्ताच्या नम्रतेने व सौम्यतेने मी तुम्हांला उत्तेजन देतो. मी, पौल, जेव्हा तुमच्या समोर येतो तेव्हा 'भित्रा' असतो पण जेव्हा तुमच्यापासून दूर असतो तेव्हा "धीट" असतो! 2मी आशा करतो की, जेव्हा मी येतो तेव्हा, काही लोक ज्यांना असे वाटते की आम्ही जगाच्या रीतीप्रमाणे जगतो त्यांच्याबाबतीत लोक जितकी अपेक्षा करतात, तितका मी धीट असणार नाही, जितकी मी अपेक्षा करतो. 3कारण जरी आम्ही जगामध्ये राहत असलो, तरी जगाप्रमाणे लढाई करीत नाही. 4 ज्या शस्त्राने आम्ही

लढाई करतो ती जगातल्या शस्त्रांसारखी नाहीत. उलट,
त्यांच्यामध्ये दैवी शक्ति आहे ज्यामुळे शत्रूचे बुरूज नष्ट
होतात. 5आम्ही वाद आणि जे देवाविषयीच्या ज्ञानाविरुद्ध
उभे राहते ते नष्ट करतो आणि प्रत्येक विचार पकडून
त्याला ख्रिस्ताच्या आज्ञा पाळायला लावतो. 6आणि तुमचा
आज्ञाधारकपणा पूर्ण झाल्यावर आम्ही प्रत्येक
आज्ञाभंगाच्या कृतीला शिक्षा करण्यास तयार असू.

7तुम्ही वरवर बघता, जर कोणी तो ख्रिस्ताचा आहे
याविषयी खात्री बाळगतो तर त्याने हे लक्षात घ्यावे की
जितका तो ख्रिस्ताचा आहे तितके आम्हीसुद्धा आहोत.
8आणि जो आमचा अधिकार प्रभूने आम्हांस खाली
पाडण्यास नव्हे, तर तुमच्या वाढीसाठी दिला आहे त्याविषयी
जरी काही विशेष अभिमान बाळगला, तरी मी लज्जित
होणार नाही. 9हे मी यासाठी बोलतो की, मी माझ्या पत्राद्वारे
तुम्हांला भीति घालणारा असा वाटू नये. 10कोणी म्हणतो
की, त्याची पत्रे वजनदार आणि जोरदार आहेत पण व्यक्तिश:
तो प्रभावहीन आणि बोलण्यात कमकुवत असा आहे.
11अशा लोकांना हे समजावे की, जेव्हा आम्ही नसतो
तेव्हा आम्ही आमच्या पत्रात जे असतो तसे जेव्हा आम्ही
प्रत्याक्षात हजर राहू आमच्या कृतीमध्ये सुद्धा असू.

12जे कित्येक स्वत:ची प्रशंसा करतात, त्यांच्याबरोबर
आम्ही आपणांस समजायला किंवा त्यांच्याशी आपली तुलना
करायचे धाडस करीत नाही, ते तर स्वत:स स्वत:कडून
मोजत असता व स्वत:ची स्वत:बरोबर तुलना करीत असता
बुध्दिहीन असे आहेत. 13परंतु आम्ही आमच्या आम्हांला
आखून दिलेल्या मर्यादेपलीकडच्या गोष्टींविषयी प्रशंसा
करणार नाही. तर जी मर्यादा देवाने आम्हांस घालून दिली
आहे, तिच्याप्रमाणे आम्ही प्रशंसा करून घेतो. ती मर्यादा
तर तुम्हापर्यंतही पोहोंचणारी आहे. 14आमच्या अभिमान
बाळगण्यामध्ये आम्ही फार दूर जात आहोत असे नाही.
तसे असते तर आम्ही तुमच्याप्रत आलो नसतो. ख्रिस्ताचे
शुभवर्तमान सांगण्यासाठी तुमच्यापर्यंत आलो. 15आम्ही
आपल्या मर्यादेपलीकडच्या गोष्टींविषयी, दुसऱ्याच्या
श्रमाविषयी नावाजून घेत नाही. किंवा आम्हांला नेमून
दिलेल्या कामापेक्षा जास्त करणार नाही, तर आम्हांस
अशी आशा आहे की, तुमचा विश्वास वाढेल तेव्हा आम्ही
आपल्या मर्यादेच्या प्रमाणात तुम्हांकडून अगदी विस्तार
पावलेले असे होऊ.

16यासाठी की, शुभवर्तमानाचा तुमच्या पलीकडील
प्रदेशात प्रसार करू. कारण दुसऱ्या माणसाच्या प्रदेशात
अगोदरच झालेल्या कामाविषयी अभिमान बाळगण्याचे
आम्हाला काही कारण नाही. 17पण "जो अभिमान
बाळगतो, त्याने प्रभूमध्ये बाळगावा."* 18कारण जो
स्वत:ची प्रशंसा करतो तो योग्य नाही, पण ज्याची देव
प्रशंसा करतो तो मान्य असतो.

## पौल आणि खोटे प्रेषित

11 माझी आशा आहे की, आपण माझा थोडासा
मूर्खपणा माझ्यासाठी सहन कराल. पण तो तुम्ही
करीतच आहा. 2मला तुमचा हेवा वाटतो व तो दैवी हेवा
वाटतो. मी तुम्हांला एक पती देण्याचे (म्हणजे) ख्रिस्ताला
देण्याचे अभिवचन दिले होते. यासाठी की मला तुम्हांला
शुद्ध कुमारिका असे त्याला सादर करता येईल. 3पण
मला भीति वाटते की जसे हव्वेला फसविण्यात आले व ते
सर्पाच्या धुर्ततेने फसविण्यात आले, तसे तुमचे मनही
कसेतरी तुमच्या प्रामाणिकपणापासून आणि ख्रिस्ताच्या शुद्ध
भक्तीपासून दूर नेले जाईल.

4कारण जर एखादा तुमच्याकडे येऊन आम्ही जो येशू
गाजवितो त्यापेक्षा वेगळा किंवा तुम्ही जे शुभवर्तमान
स्वीकारले, त्यापेक्षा वेगळे शुभवर्तमान स्वीकारले तर
तुम्ही ते सहज सहन करता.

5पण मला वाटते मी अति श्रेष्ठ प्रेषितांपेक्षा कुठल्या
प्रकारे कमी आहे असे नाही. 6मी प्रशिक्षित वक्ता नसेन.
परंतु मला ज्ञान आहे. आम्ही हे तुम्हांला प्रत्येक प्रकारे
पूर्णपणे स्पष्ट केले आहे.

7तुम्ही उंच व्हावे म्हणून मी आपणांला नीच केले
म्हणजे मी देवाचे शुभवर्तमान तुम्हांला फुकट सांगितले
यात मी पाप केले काय? 8तुमची सेवा करण्यासाठी मी
दुसऱ्या मंडळ्यांकडून वेतन घेऊन त्यांना लुटले. 9आणि
मी तुम्हांजवळ होतो तेव्हा मला कमी पडले असतानाही
मी कोणाला भार असा झालो नाही. कारण मासेदोनियाहून
जे बंधु आले त्यांनी माझी गरज पुरविली. आणि सर्व
गोष्टीत मी तुम्हांस ओझे होऊ नये म्हणून मी स्वत:स
ठेवले आणि यापुढेही ठेवीन. 10ख्रिस्ताचे खरेपण माझ्यामध्ये
आहे म्हणून मी सांगतो की, अखया प्रांतात कुणीही माझ्या
आभिमानास विरोध करणार नाही. 11का? कारण मी
तुम्हांवर प्रेम करीत नाही काय? देव जाणतो की, मी
तुमच्यावर प्रेम करतो!

12आणि मी जे करतो ते मी करीत राहीन यासाठी की,
जे आमच्याबरोबर समानता साधण्याची संधी शोधत आहेत.
ज्या गोष्टीविषयी ते अभिमान बाळगतात, त्यांना मी त्यांच्या
पायाखालची जमीन सरकेल असे करीन.

13कारण असे लोक खोटे प्रेषित आहेत, ते फसविणारे
कामगार आहेत, ख्रिस्ताच्या प्रेषितांचे रूप धारण करणारे
आहेत 14आणि यात आश्चर्य नाही, कारण सैतानदेखील
प्रकाशाच्या दूताचे रूप धारण करतो. 15म्हणून त्याचे
सेवकही जर न्यायीपणाच्या सेवकाचे रूप धारण करतात,
त्यामुळे त्यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. त्यांचा
शेवट त्यांच्या कार्याप्रमाणे होईल.

## पौल त्याच्या दुःखसहनाविषयी सांगतो

16मी पुन्हा म्हणतो: कोणीही मला मूर्ख समजू नये. पण
जर तुम्ही समजता तर जसा मूर्खाचा तसा माझा स्वीकार

---

**जो ... बाळगावा** यिर्मया 9:24

करा. यासाठी की मी थोडासा अभिमान बाळगीन. 17या
आत्मप्रौढी मिरविण्याच्या प्रकारामध्ये मी जसा प्रभु बोलतो
तसे बोलत नाही. तर मूर्खासारखे बोलतो. 18जसे बरेच
लोक जगिक गोष्टीविषयी प्रौढी मिरवितात, तशी मीही
प्रौढी मिरवीन. 19तुम्ही शहाणे असल्याने मूर्खांचे आनंदाने
सहन करता! 20वस्तुत: जे कोणी तुम्हाला गुलाम करते,
किंवा छळ करते किंवा तुमचा गैर फायदा घेते किंवा
स्वत: पुढे येण्याचा प्रयत्न करते किंवा तुमच्या तोंडावर
मारते तरी तुम्ही त्यांचे सहन करता. 21आम्ही जणू अशक्त
असल्यासारखे मी लज्जेने बोलतो.

पण ज्याविषयी कोणी अभिमान धरण्याविषयी धीट असेल
त्याविषयी मीही धीट आहे (हे मी मूर्खपणाने बोलतो) 22ते
इब्री आहेत काय? मीही आहे. ते ख्रिस्ताचे सेवक आहेत
काय? (मी हे मूर्खासारखे बोलतो) मी अधिक आहे. 23मी
पुष्कळ कठीण काम केले आहे. सारखा तुरूंगात जात
होतो, पराकाष्ठेचे फटके खाल्ले, पुन्हा आणि पुन्हा मरणाला
सामोरे गेलो. 24पाच वेळेला यहूद्यांकडून मला एकोणचाळीस
फटके बसले. 25तीन वेळा काठीने मारण्यात आले, एकदा
मला दगडमार करण्यात आला, तीन वेळा माझे जहाज
फुटले, खुल्या समुद्रात मी एक रात्र व एक दिवस घालविला.
26मी सातत्याने फिरत होतो, नदीच्या प्रवासात धोका होता.
लुटारूंकडून धोका होता. माझ्या स्वत:च्या देशबांधवांकडून
धोका होता. विदेशी लोकांकडून, शहरांमध्ये धोका होता.
डोंगराळ प्रदेशात धोका होता. समुद्रात धोका होता, खोट्या
बंधूंकडून धोका होता. 27मी कष्ट केले आणि घाम गाळला,
व पुष्कळ वेळा जागरण केले. मला भूक माहीत आहे.
तहान माहीत आहे. पुष्कळ वेळा मी अन्नाशिवाय राहिलो.
थंडीत व उघडा असा मी राहिलो, 28या सर्व गोष्टींशिवाय
मी दररोज मंडळ्यांप्रती माझ्या असलेल्या आस्थेमुळे
दबावाखाली होतो. 29कोण अशक्त आहे, आणि मला
अशक्तपणा माहीत नाही? कोण पापात पडला आहे? आणि
मी माझ्यामध्ये जळत नाही?

30जर मला अभिमान बाळगायचा असेल तर, माझ्या
अशक्तपणा दाखविणाऱ्या गोष्टीविषयी मी अभिमान
बाळगीन. 31देव आणि प्रभु येशूचा पिता, ज्याची
अनंतकाळपर्यंत स्तुति केली पाहिजे, तो हे जाणतो की मी
खोटे बोलत नाही. 32दिमिष्कात अरीतास राजाचा राज्यपाल
याने मला अटक करण्यासाठी शहराला पहारा दिला
होता. 33पण मला टोपलीत बसवून खिडकीतून
गावकुसावरून उतरविण्यात आले आणि त्याच्या हातून
मी निसटलो.

## पौलाच्या जीवनातील खास आशीर्वाद

12 मी प्रौढी मिरविलीच पाहिजे. जरी त्यापासून
कोणताही लाभ नाही. मी आता प्रभूचे दृष्टान्त व
प्रकटीकरण याकडे वळतो. 2ख्रिस्तामधील एक माणूस
मला माहीत आहे जो चौदा वर्षांपूर्वी तिसऱ्या स्वर्गात
घेतला गेला. तो शरीरात किंवा शरीराबाहेर घेतला गेला
हे मला माहीत नाही, देव जाणतो. 3आणि मला माहीत
आहे, हा मनुष्य शरीरात किंवा शरीराबाहेर मला माहीत
नाही पण देव जाणतो. 4तो सुखलोकात घेतला गेला, त्याने
व्यक्त न करता येण्यासारख्या गोष्टी ऐकल्या. अशा गोष्टी,
ज्या माणसांना सांगण्याची परवानगी नाही. 5मी अशा
माणसाविषयी प्रौढी बाळगीन. परंतु माझ्या
अशक्तपणाशिवाय मी स्वत:विषयी अभिमान बाळगणार
नाही. 6जरी मी ख्रिस्ताचा अभिमान बाळगण्याचे निवडले.
तरी मी मूर्ख असणार नाही. कारण मी सत्य बोलत असेन
पण मी स्वत:ला आवरतो. यासाठी की कोणी माझ्या मागे
जे काही पाहतो किंवा माझ्यापासून जे काही ऐकतो त्यापेक्षा
कोणीही मला अधिक मानू नये.

7आणि माझ्या प्रकटीकरणाच्या अतिशय मोठेपणामुळे
मी खूप जास्त चढून जाऊ नये म्हणून माझ्या शरीरात
रूतणारा काटा, (सैतानाचा दूत) मला ठोसे मारण्यासाठी
ठेवण्यात आला. 8तीन वेळा मी प्रभूला विनंति केली की,
तो माझ्यातून काढून टाक. 9पण तो मला म्हणाला, “माझी
कृपा तुला पुरे. कारण माझे सामर्थ्य अशक्तपणात पूर्णत्वास
येते.” म्हणून मी माझ्या अशक्तपणाबद्दल आनंदाने प्रौढी
मिरवीन. यासाठी की ख्रिस्ताचे सामर्थ्य माझ्यावर स्थिर
राहावे. 10या कारणासाठी ख्रिस्ताकरिता अशक्तपणात
आनंद करतो. अपमानात, कठीण परिस्थितित, छळात,
अडचणीच्या वेळी, कारण जेव्हा मी अशक्त, तेव्हा मी
सशक्त असतो.

## करिंथ येथील ख्रिस्ती लोकांविषयी पौलाचे प्रेम

11मी स्वत:च मूर्ख झालो पण तसे होण्यास तुम्ही मला
भाग पाडले तुमच्याकडून माझी प्रशंसा व्हावयाची होती.
जरी मी काही नसलो तरी अतिश्रेष्ठ प्रेषितांपेक्षा मी कमी
नव्हतो. 12प्रेषितांची चिन्हे ही आहेत: चिन्हे, चमत्कार,
अद्भुत कृत्ये ही खरोखरच सर्व सहनशीलतेने मी तुम्हांमध्ये
केली. 13कारण मी तुम्हांला भार झालो नाही, ही गोष्ट
सोडली तर, इतर मंडळ्यांपेक्षा ही गोष्ट सोडली तर तुम्ही
कशात उणे आहात? या चुकीबद्दल मला क्षमा करा.

14पाहा, आता तिसऱ्यांदा तुम्हाकडे येण्यासाठी मी तयार
आहे. आणि मी तुम्हांला भार होणार नाही. कारण मी
तुमची संपत्ती मिळवायला येणार नाही. तर तुम्हांला
मिळवण्यासाठी येणार आहे. शेवटी मुलांनी त्यांच्या
आईवडिलांसाठी बचत करायची नसते तर आईवडिलांनी
मुलांसाठी बचत करायची असते. 15म्हणून मी फार आनंदाने
माझ्याकडे जे काही आहे, ते तुमच्यासाठी खर्च करीन
आणि स्वत:देखील खर्ची पडेन. जर मी तुमच्यावर अधिक
प्रेम करतो तर तुम्ही माझ्यावर कमी प्रेम कराल?

16तर असो, मी चतुर असल्याने, मी तुमच्यासाठी ओझे
झालो नाही, तर मी तुम्हांला चकविले व पकडले, असे

खुशाल म्हणा. 17ज्यांना मी तुमच्याकडे पाठविले
त्यांच्यातील कोणाकडून तरी मी तुम्हांपासून काही फायदा
घेतला आहे का? 18मी तीताला तुमच्याकडे जाण्यास विनंति
केली आणि मी त्याच्याबरोबर भावाला पाठविले. तीताने
तुम्हांपासून काही फायदा करून घेतला काय? आम्ही
एकाच आत्म्याने जगत नाही काय? एका आत्म्याने एकाच
मार्गाने चाललो नाही काय?

19तुम्ही असा विचार करीत आहा काय की आम्ही
आमचे समर्थन तुमच्यासमोर करीत आहोत? ख्रिस्तामध्ये
असल्याप्रमाणे आम्ही देवासमोर बोलत आहोत. आणि प्रिय
मित्रांनो, जे काही आम्ही करतो ते तुम्हांला बळकट
करण्यासाठी. 20कारण मला भय वाटते की, मी आल्यावर
कदाचित जसे मी इच्छितो तसे तुम्ही मला आढळणार
नाही. आणि जसे तुम्ही इच्छित नाही तसा असलेला मी
तुम्हांस आढळेन. म्हणजे कदाचित भांडणे, मत्सर, राग,
कलह, चहाड्या, कुजबूज रूसणे, अव्यवस्था ही दिसून
येतील. 21म्हणजे मी पुन्हा आल्यावर माझा देव मला
तुम्हाजवळ नीच करील. आणि ज्यांनी पूर्वी पाप केले होते
आणि आपण केलेल्या जारकर्माचा, अशुद्धपणाचा, व
कामातुरपणाचा त्याग केला नाही, व त्यांच्याबद्दल पश्चात्ताप
केला नाही, अशा अनेकांसाठी मला शोक करावा लागेल.

## शेवटची सूचना आणि सलाम

13 ही माझी तुम्हांला भेटण्याची तिसरी वेळ आहे.
"प्रत्येक गोष्ट दोन किंवा तीन साक्षीदारांच्या
साक्षीने सिद्ध करावी."* 2मी अगोदरच सूचना दिलेली
होती जेव्हा दुसऱ्यावेळी मी तुमच्याबरोबर होतो. आता मी
तुमच्यात नसताना ती सूचना पुन्हा सांगतो: माझ्या परत
येण्याच्या वेळी अगोदर ज्यांनी पाप केले त्यांना मी सोडणार
नाही किंवा दुसऱ्यांनाही नाही. 3ख्रिस्त माझ्याद्वारे
बोलतो याविषयीच्या पुराव्याची तुम्ही मागणी करीत
आहात. तुमच्याशी व्यवहार करताना तो अशक्त नाही तर
सामर्थ्यशाली आहे. 4कारण जरी तो अशक्तपणात
वधस्तंभावर खिळला गेला तरी तो देवाच्या सामर्थ्याने
जिवंत आहे, कारण आम्हीही त्याच्यामध्ये अशक्त आहोत.
तरी देवाच्या सामर्थ्याने त्याच्याबरोबर तुमच्यासाठी आम्ही
जिवंत असू.

5तुम्ही विश्वासात आहा की नाही याविषयी स्वत:ची
परीक्षा पाहा. पारख करा. ख्रिस्त तुमच्यामध्ये आहे, ह्याची
जाणीव तुम्हांला होत नाही का? जर अर्थात तुम्ही परीक्षेत
उतरला नाही तर. 6आणि माझा विश्वास आहे की, तुम्ही
हे शोधाल की, या परीक्षेत आम्ही अनुत्तीर्ण झालो नाही.
7आता आम्ही देवाजवळ अशी प्रार्थना करतो की, तुम्ही
काहीही चुकीचे करणार नाही. आम्ही परीक्षेत उत्तीर्ण
व्हावे यासाठी नव्हे तर अशासाठी की, आम्ही जरी
नाकारलेल्यासारखे असलो तरी तुम्ही चांगले काम करावे.
8कारण खरेपणाविरुद्ध आम्हांस काही करता येत नाही.
तर खरेपणासाठी करता येते. 9जेव्हा आम्ही अशक्त आहो
आणि तुम्ही शक्तीमान आहा, तेव्हा आम्ही आनंद
करतो. आणि आम्ही प्रार्थनाही करतो, ती अशी की,
तुम्ही पूर्ण व्हावे. 10यामुळे तुम्हापासून आम्ही दूर असताना
हे तुम्हांला लिहितो, यासाठी की, प्रभूने जो अधिकार
तुम्हांला खाली पाडून टाकण्यासाठी नव्हे तर वृद्धीसाठी
मला दिला त्याप्रमाणे जवळ आल्यावर मी कठोर वागू
नये.

11शेवटी बंधूनो, आपण भेटू या. परिपूर्णतेकडे ध्येय
असू द्या. जसे मी तुम्हांला सांगितले तसे करा. एका मनाचे
व्हा, शांतीने राहा. आणि प्रीतीचा व शांतीचा देव
तुमच्याबरोबर असेल. 12पवित्र चुंबनाने एकमेकास भेटा.
13सर्व संत आपणंस सलाम सांगतात. 14प्रभु येशू ख्रिस्ताची
कृपा आणि देवाची प्रीति आणि पवित्र आत्म्याची सहभागिता
तुम्हा सर्वांबरोबर असो.

---

**प्रत्येक ... करावी** अनुवाद 19:15

# पौलाचे गलतीकरांस पत्र

1 प्रेषित पौलाकडून, प्रेषित होण्यासाठी मी मनुष्यांकडून निवडला गेलो नाही. मनुष्यांकडून मला पाठविण्यात आले नव्हते. देव जो पिता त्याने व येशू ख्रिस्ताने मला प्रेषित केले. देवानेच येशूला मरणातून उठविले.

2हे पत्र ख्रिस्तामधील जे बंधु माझ्याबरोबर आहेत त्यांच्याकडूनही आहे. आणि हे गलतीया* येथील मंडळ्यांना (विश्वासणाऱ्यांच्या गटांना) लिहिले आहे.

3याची कृपा चांगुलपण व शांति तुम्हाबरोबर असो. 4येशूने स्वत:ला आमच्या पापांसाठी दिले. ज्या दुष्ट जगात आम्ही राहतो त्यापासून आम्हांला मुक्त करण्यासाठी त्याने असे केले आणि देव जो पिता त्याची हीच इच्छा होती. 5त्याला सदासर्वकाळ गौरव असो. आमेन.

## फक्त एकच सुवार्ता खरी आहे

6मला आश्चर्य वाटते की ज्या देवाने तुम्हांला ख्रिस्ताद्वारे बोलाविले आहे त्याच्यापासून तुम्ही इतक्या लवकर दुसऱ्या सुवार्तेकडे वळत आहात. 7ती खरी सुवार्ता नाही पण असे काही जण आहेत की ते तुम्हांला गोंधळात टाकीत आहेत व ख्रिस्ताविषयीची सुवार्ता बदलण्याचा प्रयत्न करीत आहेत. 8आम्ही तुम्हाला सांगितली त्याहून निराळी सुवार्ता आम्ही किंवा स्वर्गातील दूतांनी जर तुम्हांला सांगितली तर देवाचा शाप त्याच्यावर येवो. 9आम्ही अगोदर सांगितल्याप्रमाणे आणि आता पुन्हा सांगतो तुम्ही जी स्वीकारली आहे तिच्याहून वेगळी सुवार्ता जर कोणी तुम्हांस सांगत असेल तर देव त्याला शाप देवो.

10आता मी मनुष्याला किंवा देवाला संतोषविण्याचा प्रयत्न करीत आहे काय? मी मनुष्यांना संतुष्ट करीत राहिलो असतो तर ख्रिस्ताचा गुलाम झालो नसतो.

## पौलाचा अधिकार देवाकडून आहे

11बंधूनो, तुम्हांला माहीत असावे असे मला वाटते ते हे की जी सुवार्ता मी तुम्हांस सांगितली तो मानवी संदेश नाही. 12कारण मला ती मनुष्यांकडून झालेल्या प्रकटीकरणामुळे कळली नाही तर येशू ख्रिस्ताने मला ती दाखविली.

13यहूदी धर्मातील माझ्या पूर्वीच्या जीवनाविषयी तुम्ही ऐकले आहे. आणि हे जाणता की देवाच्या मंडळीचा मी भयंकर छळ केला होता. आणि तिचा नाश करण्याचा ही प्रयत्न केला. 14माझ्या यहूदी धर्माच्या पालनाबाबत मी माझ्या वयाच्या लोकांपेक्षा कितीतरी पुढे होतो. माझ्या पूर्वजांनी दिलेल्या शिकवणीविषयी मी त्याला पूर्ण वाहिलेला होतो.

15त्यामुळे मी जन्मण्याअगोदरच देवाने माझ्यासाठी वेगळी योजना आखली होती आणि त्याच्या कृपेत त्याची सेवा करण्यासाठी त्याने मला बोलावले. 16आणि जेव्हा देवाने त्याचा पुत्र मला प्रगट करण्याचे ठरविले ते यासाठी की, विदेशी लोकांमध्ये पुत्राविषयीची सुवार्ता मी सांगावी. मी कोणत्याही मनुष्याबरोबर सल्लामसलत केली नाही. 17किंवा जे माझ्यापूर्वी प्रेषित होते त्यांना भेटण्यासाठी यरुशलेमात वर गेलो नाही. त्याऐवजी मी ताबडतोब अरबस्तानात गेलो आणि मग दिमिष्कास परत आलो.

18मग तीन वर्षांनंतर पेत्राबरोबर ओळख करून घेण्यासाठी यरुशेलमला गेलो. आणि त्याच्याबरोबर मी पंधरा दिवस राहिलो. 19परंतु प्रेषितांपैकी दुसऱ्यांना मी पाहिले नाही; मी फक्त प्रभु येशूचा भाऊ याकोब यालाच पाहिले. 20आणि मी देवासमोर शपथ घेऊन सांगतो की जे काही मी तुम्हांला लिहित आहे, ते खोटे नाही. 21नंतर मी सूरीया व किलीकिया प्रांतांत गेलो.

22परंतु यहूदीया येथे विश्वासात ज्या ख्रिस्ताच्या मंडळ्या आहेत त्यांना मी व्यक्तीश: माहीत नव्हतो. 23त्यांनी फक्त ऐकले होते. लोक म्हणतात: "ज्या मनुष्याने ज्या विश्वासासाठी पूर्वी आपला छळ केला, ज्या विश्वासाचा त्याने नाश करण्याचा प्रयत्न केला तो आता त्याचीच घोषणा करीत आहे." 24आणि माझ्यामुळे त्यांनी देवाचे गौरव केले.

## इतर प्रेषितांनी पौलाचा स्वीकार केला

2 मग चौदा वर्षांच्या काळानंतर मी पुन्हा यरुशलेमास गेलो. मी बर्णबाबरोबर गेलो. तीतालासुद्धा माझ्याबरोबर घेतले. 2मी जावे असे देवाने मला प्रगट केले, म्हणून मी गेलो. ज्याप्रमाणे मी पूर्वी यहूदीतर लोकांमध्ये सुवार्ता सांगितली तशी मी खाजगीपणे पुढाऱ्यांच्या सभेतसुद्धा सुवार्ता सांगितली. यासाठी की, भूतकाळातील

---

**गलतीया** कदाचित पौलाने सुवार्ता कार्यासाठी केलेल्या पहिल्या प्रवासात ज्या मंडळ्यांची सुरूवात केली तो भाग. पाहा. प्रे कृ. 23 व 24 अध्याय.

किंवा चालू स्थितीला माझे काम व्यर्थ जाऊ नये. 3त्याचा
परिणाम असा झाला की, तीत, जो माझ्याबरोबर होता, तो
ग्रीक असतानाही त्याला सुंता करवून घेण्यास भाग पाडण्यात
आले नाही. 4कारण ख्रिस्त येशूमध्ये आम्हांला जे स्वातंत्र्य
मिळाले ते हेरण्यासाठी व आम्हांला गुलाम करता यावे
म्हणून ज्या खोट्या विश्वासणाऱ्यांना आत आणण्यात आले
त्यामुळे हे झाले. 5सुवार्तेमधील सत्य तुमच्याजवळच राहावे
म्हणून आम्ही क्षणभरदेखील त्यांना वश झालो नाही.

6जे लोक महत्त्वाचे आहेत असे लोक समजत होते
त्यांच्याकडून मला काहीही मिळाले नाही. जे कोणी ते
होते त्यांच्यामुळे मला काही फरक पडला नाही; सर्व
माणसे देवासमोर सारखीच आहेत. काहीही असो, त्या
प्रतिष्ठित माणसांनी माझ्यामध्ये किंवा माझ्या संदेशांमध्ये
कोणतीही भर टाकली नाही. 7उलट, जेव्हा ते म्हणतात
की, विदेशी लोकांना सुवार्ता सांगण्याचे कार्य माझ्यावर
सोपविण्यात आले आहे, ज्याप्रमाणे पेत्राला यहूदी लोकांना
सुवार्ता सांगण्याचे कार्य सोपविलेले आहे. 8कारण ज्याने
पेत्राला यहूदी लोकांकरिता प्रेषित बनविले त्यानेच मला
विदेशी लोकांकरिता प्रेषित बनविले. 9म्हणून याकोब,
पेत्र व योहान ज्यांची मंडळीचे आधारस्तंभ म्हणून प्रसिद्धी
होती, त्यांनी देवाने मला दिलेला अधिकार ओळखला
आणि बर्णबा व माझ्याशी सहभागितेचे चिन्ह म्हणून हात
मिळविला व सहमती दर्शविली की आम्ही विदेशी
लोकांमध्ये जाऊन संदेश द्यावा. आणि त्यांनी जाऊन यहूदी
लोकांना उपदेश करावा. 10त्यांनी फक्त हेच सांगितले
की, त्यांच्या गरिबांना मदत करण्याची आम्ही आठवण
ठेवावी. आणि मी ते सर्व करण्यास राजी होतो एवढेच
नव्हे तर ते करण्यास अधीर झालो होतो.

## पेत्राची चूक झाली असे पौल दाखवून देतो

11पण, जेव्हा पेत्र अंत्युखियात आला तेव्हा मी त्याला
उघडपणे विरोध केला. कारण त्याने स्पष्टपणे चूक केली
होती. 12कारण याकोबाने पाठविलेली काही माणसे
येण्यापूर्वी पेत्र विदेशी लोकांबरोबर जेवत असे. पण जेव्हा
ते (याकोबाने पाठविलेले यहूदी) आले तेव्हा त्याने अंग
काढून घेतले आणि तो विदेशी लोकांपासून वेगळा झाला.
कारण या यहूदी लोकांचा विश्वास होता की, विदेशी
माणसांची सुंता झालीच पाहिजे, म्हणून त्यांची त्याला भीती
वाटत होती. 13व बाकीचे यहूदी लोकसुद्धा त्याच्या ढोंगामध्ये
सामील झाले, येथपर्यंत की, बर्णबासुद्धा त्यांच्या ढोंगाला
वश झाला. 14जेव्हा मी पाहिले की, सुवार्तेच्या सत्याच्या
सरळ मार्गात ते योग्य प्रकारे वागत नाहीत, तेव्हा मी
सर्वांसमोर पेत्राला म्हणालो, "जर तू जो यहूदी आहेस व
यहूदीतरांप्रमाणे वागत आहेस व यहूदी माणसाप्रमाणे वागत
नाहीस तर तू विदेशी लोकांना यहूदी लोकांच्या चालीरीतींचे
अनुकरण करण्यास त्यांना कसे भाग पाडू शकतोस?"

15आम्ही जन्माने यहूदी आहोत आणि "पापी यहूदीतर
लोकांपैकी" नाही. 16तरीही आम्हांला माहीत होते की,
मनुष्य नियमशास्त्रातील कृत्यांनी नीतिमान ठरत नाही,
तर येशू ख्रिस्तावर विश्वास ठेवण्याने ठरतो. म्हणून आम्ही
आमचा विश्वास येशू ख्रिस्तावर ठेवला आहे. यासाठी
की, ख्रिस्तावरील विश्वासाने आम्ही नीतिमान ठरावे,
नियमशास्त्रातील कृत्यांनी नव्हे. कारण कोणीही देहधारी
मनुष्य नियमाशास्त्रातील कृत्यांनी नीतिमान ठरणार नाही.
17पण जर, आम्ही ख्रिस्तामध्ये नीतिमान होण्याचे पाहतो,
तर आम्ही यहूदीसुद्धा विदेश्यांप्रमाणे पापी असे आढळतो.
याचा अर्थ असा आहे की, ख्रिस्त पापाचा सेवक आहे
काय?

18अर्थातच नाही! कारण जर मी या सोडून दिलेल्या
पद्धतीप्रमाणे पुन्हा शिकविण्यास सुरुवात केली, तर मी
नियमशास्त्र मोडणारा होतो. 19कारण नियमशास्त्रामुळे मी
नियमशास्त्राला "मेलो" यासाठी की मी देवासाठी जगावे.
मी ख्रिस्ताबरोबर वधस्तंभावर खिळला गेलो. 20यासाठी
की यापुढे मी जगतो असे नाही, तर ख्रिस्त माझ्यामध्ये
जगतो. आता देहामध्ये जे जीवन मी जगतो ते मी ज्याने
माझ्यावर प्रीती केली आणि माझ्याऐवजी स्वत:ला दिले
त्या देवाच्या पुत्रावरील विश्वासाने जगतो. 21मी देवाची
कृपा नाकारीत नाही. कारण जर नीतिमत्त्व नियम
शास्त्रामुळे मिळत असेल तर ख्रिस्त विनाकारण मरण
पावला.

## विश्वासाद्वारे देवाचा आशीर्वाद येतो

3 अहो मूर्ख गलतीकरांनो! ज्या तुमच्या डोळ्यांसमोर
येशू ख्रिस्ताला वधस्तंभावर खिळलेले जाहीर रितीने
तुम्हांला वर्णन करून सांगितले होते त्या तुम्हांला कोणी
भुरळ घातली आहे? 2मला तुमच्याकडून ही एक गोष्ट
शिकायची आहे? आत्म्याची दाने तुम्हाला नियमशास्त्राचे
पालन करण्याने मिळाली आहेत की सुवार्ता ऐकून
तिच्यावर विश्वास ठेवल्याने मिळाली आहेत? 3तुम्ही इतके
मूर्ख आहात का की, जे जीवन तुम्ही आत्म्यात सुरू केले
ते आता देहाने पूर्ण करीत आहात? 4तुम्ही व्यर्थच इतकी
दु:खे अनुभवली का? माझी आशा आहे की ती व्यर्थ
नव्हती. 5देव जो तुम्हांला आत्मा पुरवितो आणि तुम्हामध्ये
चमत्कार करतो, तो तुम्ही नियमशास्त्राचे पालन करता
म्हणून का सुवार्ता ऐकून तीवर विश्वास ठेवला म्हणून तो
हे करतो.

6ते, अब्राहामाविषयी पवित्र शास्त्र सांगते तसे आहे:
"त्याने देवावर विश्वास ठेवला, आणि ते त्याच्यासाठी
देवाकडून नीतिमत्त्व असे गणण्यात आले." 7मग तुम्हाला
समजले पाहिजे की जे विश्वास ठेवतात, तेच अब्राहामाचे
खरे वंशज आहेत. 8पवित्र शास्त्राने आधीच सांगितले
आहे की, देव विदेशी लोकांना त्यांच्या विश्वासाने नीतिमान
ठरवील. त्याने अब्राहामाला पूर्वीच सुवार्ता सांगितली की,

"तुझ्याद्वारे सर्व राष्ट्रे आशीर्वादित होतील." [9]म्हणून ज्यांचा
विश्वास आहे त्यांना विश्वासणाऱ्या अब्राहामासह
आशीर्वाद मिळेल. [10]परंतु नियमशास्त्राच्या कृतीवर जे
अवलंबून राहतात ते शापित आहेत. कारण शास्त्रात असे
लिहिले आहे की, "नियमशास्त्राच्या पुस्तकात लिहिलेल्या
सर्व गोष्टी करण्यात जो कोणी टिकून राहत नाही, तो
शापित असो." [11]नियमशास्त्रामुळे कोणीही मनुष्य
देवासमोर नीतिमान ठरत नाही, हे उघड आहे. कारण
शास्त्र सांगते की, "विश्वासामुळे नीतिमान मनुष्य जगेल."
[12]नियमशास्त्र विश्वासाचे नाही. त्याऐवजी पवित्र शास्त्र
असे सांगते की, "जो कोणी ते पाळतो तो त्यामुळे जगेल."
[13]ख्रिस्ताने आपल्याला नियमशास्त्राच्या शापापासून मुक्त
केले आहे. आपणासाठी शाप होऊन त्याने हे केले. असे
लिहिले आहे: "प्रत्येकजण जो कोणी झाडावर टांगला
आहे तो शापित असो." [14]ख्रिस्ताने आम्हाला मुक्त केले
यासाठी की, अब्राहामाला मिळालेला आशीर्वाद ख्रिस्ताद्वारे
विदेश्यांना मिळावा. यासाठी की विश्वासाद्वारे आम्हांला
आत्म्याचे अभिवचन मिळावे.

## नियमशास्त्र आणि अभिवचन

[15]बंधूंनो, मी तुम्हांला रोजच्या जीवनातील उदाहरण
देतो. ज्याप्रमाणे मनुष्यांनी केलेला करार कोणीही रद्द
करत नाही किंवा त्यात भर घालीत नाही. याबाबतीतसुद्धा
तसेच आहे. [16]अब्राहामाला व त्याच्या वंशजांना अभिवचने
दिलेली होती. लक्षात घ्या की, ते "आणि त्याच्या वंशजांना"
असे अनेकजणांसंबंधी म्हणत नाही, तर जसे काय ते
एका व्यक्तीला म्हणते, "आणि तुझ्या संतानाला" (आणि
तो वंशज) ख्रिस्त आहे. [17]माझ्या म्हणण्याचा अर्थ असा
की, देवाने अगोदर निश्चित केलेला करार चारशे तीस
वर्षे उशिरा आलेल्या नियमशास्त्राने अभिवचन रद्द
करण्यास केला नव्हता. [18]कारण वतन जर नियम
शास्त्रावर अवलंबून होते, तर येथून पुढे ते अभिवचनावर
अवलंबून असणार नाही. परंतु देवाने अभिवचनामुळे
अब्राहामाला मुक्तपणे हे वतन दिले.

[19]तर मग, नियमशास्त्राचा उद्देश काय होता? ज्या
संतानाला वचन दिले होते त्याच्या येण्यापर्यंत पापामुळे ते
अभिवचनाला जोडण्यात आले होते. नियमशास्त्र हे
देवदूताकरवी मोशे या मध्यस्थाच्या हाती देण्यात आले.
[20]आता मध्यस्थ हा फक्त एकाच पक्षाचा नसतो. पण देव
एकच आहे आणि त्याची अभिवचने दुसऱ्या पक्षावर
अवलंबून नाहीत.

## मोशेच्या नियमशास्त्राचा हेतु

[21]नियमशास्त्र हे देवाच्या अभिवचनाविरुद्ध आहे, असा
याचा अर्थ होतो का? अर्थातच नाही! कारण लोकांना
जीवन आणण्यासाठी जर नियमशास्त्र देण्यात आले असेल,
तर मग नीतिमत्त्व त्याच नियमशास्त्राद्वारे येईल. [22]पण
पवित्र शास्त्राने स्पष्ट केले आहे की, संपूर्ण जग हे पापाच्या
सामर्थ्याने जखडून टाकले होते, यासाठी की, जे अभिवचन
देण्यात आले होते ते जे येशू ख्रिस्तावर विश्वास ठेवतात,
त्यांना देण्यात यावे.

[23]हा विश्वास येण्याअगोदर नियमशास्त्राने आपणांस
कैद्याप्रमाणे पहाऱ्यात ठेवले होते. आणि हा येणारा विश्वास
आम्हांला प्रगट होईपर्यंत आम्हांला कैदी म्हणून ठेवण्यात
आले होते. [24]त्यामुळे आपल्या विश्वासाच्या आधारे आपण
नीतिमान ठरविले जावे म्हणून नियमशास्त्र जे आपणांला
ख्रिस्ताकडे घेऊन येणारे होते, ते आपले पालक होते.
[25]पण आता हा विश्वास आलाच आहे, तर यापुढे आम्ही
या कडक पालकाच्या अधीन नाही. [26]कारण तुम्ही सर्व
सुवार्तेवर विश्वास ठेवल्यामुळे येशू ख्रिस्ताद्वारे देवाचे पुत्र
आहात. [27]कारण तुम्ही जितक्यांनी ख्रिस्तात बाप्तिस्मा
घेतला तितक्यांनी ख्रिस्ताला परिधान केले आहे. [28]तेथे
यहूदी किंवा ग्रीक, गुलाम किंवा स्वतंत्र, पुरुष किंवा स्त्री
हा भेदच नाही. कारण तुम्ही सर्व ख्रिस्त येशूमध्ये एक
आहात. [29]आणि जर तुम्ही ख्रिस्ताचे आहात तर तुम्ही
अब्राहामाचे संतान आणि देवाने अब्राहामाला दिलेल्या
वचनानुसार वारस आहात.

4 मी जे म्हणत आहे ते हे की, जोपर्यंत वारसदार हा
लहान मूल आहे तोपर्यंत तो गुलामापेक्षा वेगळा नाही.
जरी तो सर्वांचा मालक असला तरी, [2]तो जोपर्यंत त्याच्या
पित्याने नेमून दिलेला वेळ आहे तोपर्यंत पालकांच्या आणि
विश्वस्तांच्या ताब्यात असतो. [3]याच प्रकारे जोपर्यंत आम्ही
"मुले" होतो तोपर्यंत आम्हीसुद्धा या जगाच्या निरर्थक
नियमांचे गुलाम होतो. [4]परंतु जेव्हा काळाची पूर्णता झाली,
तेव्हा देवाने आपला पुत्र पाठविला, जो स्त्रीपासून जन्मला,
व नियम शास्त्राप्रमाणे वागला. [5]यासाठी की, त्याने जे
नियमशास्त्राधीन होते त्यांना सोडवावे व देवाची मुले म्हणून
स्वीकारावे.

[6]आणि तुम्ही त्याचे पुत्र आहात, म्हणून देवाने आपल्या
पुत्राच्या आत्म्याला तुमच्या अंत:करणात पाठविले आहे.
आत्मा "अब्बा"* म्हणजे "पित्या" अशी हाक मारतो.
[7]म्हणून तू आता गुलाम नाही, तर एक पुत्र आहेस, आणि
जर पुत्र आहेस तर देवाने तुला त्याचा वारसदारही बनविले
आहे.

## गलतीया येथील ख्रिस्ती लोकांकरिता पौलाचे प्रेम

[8]गतकाळात जेव्हा तुम्ही देवाला ओळखीत नव्हता, तेव्हा
खऱ्या अर्थाने जे देव नव्हते, त्यांचे तुम्ही गुलाम होता.
[9]परंतु आता तुम्ही देवाला ओळखता किंवा आता देवाने
तुमची ओळख करून घेतली आहे. तर मग आता तुम्ही
ज्यांचे गुलाम होण्याचे प्रयत्न करीत आहात त्या दुर्बल

---

**अब्बा** हा अरेमी शब्द आहे. याचा अर्थ पिता.

आणि निरुपयोगी नियमाकडे कसे वळता? **10**तुम्ही विशेष दिवस, महिने, ऋतू आणि वर्षे पाळता. **11**मला तुमच्याविषयी भीती वाटते मला वाईट वाटते की, मी तुमच्यासाठी केलेले श्रम व्यर्थ आहेत.

**12**बंधूनो, मी तुम्हांला कळकळीची विनंति करतो की कृपा करून माझ्यासारखे व्हा. कारण मी तुमच्यासारखा झालो. असे काही नाही की, तुम्ही माझे काही वाईट केले होते. **13**तुम्हांला माहीत आहे की, माझ्या शारीरिक दुर्बलतेमुळे प्रथमत: मी तुम्हांला सुवार्ता सांगितली. **14**आणि माझ्या शारीरिक दुर्बलतेबाबत तुमची कठीण परीक्षा होत असतानाही उलट माझे एखाद्या देवदूतासारखे तुम्ही स्वागत केले. जणू काय मीच स्वत: ख्रिस्त असल्यासारखे स्वागत केले. **15**मग जो आनंद तुम्हांला मिळाला तो कोठे आहे? कारण मी तुम्हांविषयी साक्ष देतो की, जर तुम्ही समर्थ असता तर तुम्ही तुमचे स्वत:चे डोळे काढून ते मला दिले असते. **16**तुम्हांला खरे सांगितले म्हणून मी तुमचा वैरी झालो काय?

**17**तुम्ही नियमशास्त्र पाळावे असे ज्यांना वाटते त्यांना तुमच्याविषयी उत्साहवर्धक आस्था आहे, पण चांगल्या हेतूसाठी नाही. माझ्यापासून तुम्हांला वेगळे करण्याचा ते प्रयत्न करीत आहेत. यासाठी की तुम्हांला त्यांच्याविषयी उत्साहवर्धक आस्था वाटेल. **18**हे नेहमीच चांगले असते की, कोणासाठी तरी विशेष (उत्साहवर्धक) आस्था असावी पण ती कोणत्या तरी चांगल्या गोष्टीसाठी आणि मी जेव्हा तुमच्याबरोबर असतो, फक्त तेव्हाच नव्हे. **19**माझ्या प्रिय मुलांनो, तुमच्यामुळे मी पुन्हा एकदा प्रसूतिवेदनातून जात आहे आणि तुम्ही ख्रिस्तासारखे होईपर्यंत मला तसे करावेच लागेल. **20**आता मला तुमच्याबरोबर तेथे हजर राहावेसे व स्वर बदलून वेगळ्या प्रकारे बोलावेसे वाटते, कारण तुमच्याविषयी मी गोंधळात पडलो आहे.

## हागार आणि साराचे उदाहरण

**21**जे तुम्ही नियमशास्त्राधीन राहू इच्छिता त्या तुम्हांला मला विचारू द्या की, नियमशास्त्र काय म्हणते, ते तुम्हांला माहीत आहे का? **22**असे लिहिले आहे की, अब्राहामाला दोन पुत्र होते. एक त्याला गुलाम मुलीपासून झाला व दुसरा स्वतंत्र स्त्रीपासून जन्मलेला **23**देवाच्या वचनाचा परिणाम म्हणून जन्मला.

**24**या गोष्टी दृष्टांतरूप आहेत. त्या स्त्रिया दोन करार आहेत. एक करार सीनाय पर्वतावर झाला. आणि ज्यांच्या नशिबी गुलामगिरी होती अशा लोकांना त्याने जन्म दिला. हा करार हागारशी संबंध दर्शवितो. **25**हागार ही अरबस्तानातील सीनाय पर्वताचे दर्शक हल्लीच्या यरुशलेमचे बाह्यरूप आहे. कारण ती आपल्या मुलासह गुलामगिरीत आहे. **26**परंतु स्वर्गीय यरुशलेम स्वतंत्र आहे. स्वर्गीय यरुशलेम ही आमची आई आहे. **27**कारण असे लिहिले आहे,

> जिने जन्म दिला नाही, त्या मूल नसलेल्या (स्त्रीने) आनंद करावा! ज्या तुला प्रसूतिवेदना झालेल्या नाहीत ती तू आनंदाने घोष कर, आरोळी मार, कारण जिला पती आहे तिच्या मुलांपेक्षा सोडलेल्या स्त्रीची मुले अधिक आहेत” *यशया 54:1*

**28–29**बंधूनो, आता तुम्ही इसहाकासारखी देवाच्या वचनाचा परिणाम म्हणून जन्मलेली मुले आहात. परंतु तो त्यावेळी जसा देहस्वभावाप्रमाणे जन्मला होता व त्याने आत्म्याच्या सामर्थ्याने जन्मलेल्यांचा छळ केला तसे आता आहे. **30**पण पवित्र शास्त्र काय सांगते? “त्या गुलाम मुलीला व तिच्या पुत्राला घालवून दे. कारण गुलाम मुलगा स्वतंत्र स्त्रीच्या मुलाबरोबर वारस होणार नाही.” **31**यासाठी बंधूंनो, आपण गुलाम मुलीची नाही तर स्वतंत्र स्त्रीची मुले आहोत.

## तुमचे स्वातंत्र्य राखा

**5** आम्ही स्वातंत्र्यात राहावे म्हणून ख्रिस्ताने आम्हांला मुक्त केले, म्हणून स्थिर राहा. आणि नियमशास्त्राच्या जुवाच्या गुलामगिरीचे ओझे पुन्हा लादून घेऊ नका. **2**ऐका! मी पौल, तुम्हांला सांगत आहे की, जर सुंता करून घेऊन तुम्ही नियमशास्त्राकडे वळला तर ख्रिस्त तुमच्यासाठी कोणत्याही किंमतीचा नाही. **3**सुंता करून घेणाऱ्या प्रत्येक माणसाला मी पुन्हा एकदा जाहीर करतो की, तो संपूर्ण नियमशास्त्र पाळण्यास बांधलेला आहे. **4**तुमच्यापैकी जे नियमशास्त्राने नीतिमान ठरू पाहतात, त्यांचा ख्रिस्ताबरोबरचा संबंध तुटला आहे. देवाच्या दयेच्या बाहेर आता तुम्ही आहात. **5**आम्ही तर आत्म्याने विश्र्वासाकडून न्यायीपणाच्या आशेची वाट पाहात आहोत. **6**कारण ख्रिस्त येशूमध्ये सुंता झालेले व सुंता न झालेले यांना काही अर्थ नाही तर विश्वास जो प्रीतीद्वारे कार्य करतो त्याला आहे.

**7**तुम्ही इतकी चांगली ख्रिस्ती शर्यत धावत होता तर तुम्हाला सत्याचे पालन करण्यास कोणी अडथळा केला? **8**सत्यापासून मन वळवणारे तुमचे कठोर वर्तन ज्याने तुम्हांला बोलाविले त्या देवापासून येत नाही. **9**“थोडेसे खमीर कणकेचा गोळा फुगवून टाकते.” **10**प्रभूमध्ये मला तुमच्याविषयी खात्री आहे की, जे मी तुम्हांला शिकविले त्याच्याशिवाय इतर विचार तुम्ही करणार नाही. परंतु जो तुम्हांला त्रास देत आहे, तो कोणी का असेना, दंड भोगील.

**11**बंधूजनहो, काही जण असा आरोप करतात की, अजूनही सुंतेची गरज आहे असा उपदेश मी करतो. जर तसे आहे तर अजूनही माझा छळ का होत आहे? आणि जर मी सुंतेच्या आवश्यकतेविषयी उपदेश करीत असतो तर वधस्तंभाविषयीची तत्त्वे राहिली नसती. **12**माझी इच्छा आहे की, जे तुम्हामध्ये अस्थिरता उत्पन्न करतात त्यांनी सुंतेबरोबर स्वत:ला नामर्द करून घ्यावे.

13परंतु स्वतंत्रतेमध्ये राहावे म्हणून तुम्हा बंधूना देवाने
बोलावले आहे. फक्त तुमच्या देहाला जे आवडते ते
करण्याची एक सबब म्हणून तुमच्या स्वातंत्र्याचा उपयोग
करू नका. त्याऐवजी प्रीतीमध्ये एकमेकांची सेवा करा
(दास व्हा). 14कारण संपूर्ण नियमशास्त्राचा सारांश एकाच
वचनात सामावला आहे. ते सांगते, “जसे आपणांवर तसे
आपल्या सोबतीच्या व्यक्तीवरही प्रेम करा.” 15पण जर
तुम्ही एकमेकांना चावत राहिला व खाऊन टाकीत असला,
तर एकमेकांना गिळून टाकणार नाही, याविषयी सावध
राहा.

### आत्मा आणि मानवी स्वभाव

16पण मी म्हणतो: तुम्ही आत्म्यात चाला, आणि तुम्ही
देहाच्या पापी इच्छा पूर्ण करणार नाही. 17कारण आपला
देह ज्याची इच्छा करतो ते आत्म्याविरुद्ध आहे, आणि
आत्मा जी इच्छा करतो, ती देहाविरुद्ध आहेत. परिणाम
म्हणून तुम्हांला जे करावयास पाहिजे ते करता येत नाही.
18पण जर तुम्ही आत्म्याकडून चालविले जाता तर तुम्ही
नियमशास्त्राधीन नाही. 19देहाची कर्मे तर उघड आहेत,
ती म्हणजे, जारकर्म, अशुद्धता, कामातुरपणा, 20मूर्तिपूजा,
चेटूक, द्वेष, मारामारी, मत्सर, राग, स्वार्थी हेवेदावे, पक्षभेद,
21दारूबाजी, रंगेलपणा, अशासारख्या दुसऱ्या सर्व गोष्टी.
या गोष्टींविषयी मी तुम्हाला सूचना देत आहे. ज्याप्रमाणे
मी पूर्वी तुम्हांला सूचना केल्या होत्या. जे लोक अशा
गोष्टी करतात त्यांना देवाच्या राज्यात वाटा मिळणार नाही.
22पण आत्मा या गोष्टी निर्माण करतो; प्रीति, आनंद,
शांति, सहनशीलता, दयाळूपणा, चांगुलपणा, विश्वास,
23सौम्यता व आत्मसंयमन. अशा गोष्टींविरुद्ध नियमशास्त्र
नाही. 24जे ख्रिस्त येशूचे आहेत त्यांनी देहस्वभावाला त्यांच्या
वासना व इच्छांसह वधस्तंभावर खिळले आहे. 25जर
आम्ही आत्म्याने जगतो, तर तो जसा चालवितो तसे
आम्हीसुद्धा त्याच्यामागे चालू या. 26आम्ही पोकळ बढाई
मारणारे, एकमेकांना चीड आणणारे, एकमेकांचा हेवा
करणारे होऊ नये.

### एकमेकांना मदत करा

6 बंधूंनो, कोणी दोषात सापडला, तर तुम्ही जे
आध्यात्मिकदृष्ट्या पुढारलेले आहात त्या तुम्ही त्याला
सुधारावे. पण ते सौम्यतेच्या आत्म्याने हे करा. आणि
स्वत:कडे लक्ष ठेवा. यासाठी की तुम्हीही मोहात पडू नये.
2एकमेकांची ओझी वाहा. अशा रितीने तुम्ही ख्रिस्ताचा
नियम पूर्ण कराल. 3कारण जर कोणी स्वत:ला महत्त्वाचा
समजतो, प्रत्यक्षात तो नसला तरी, तर तो स्वत:ची फसवणूक
करून घेतो. 4प्रत्येकाने आपल्या कामाची परीक्षा करावी
आणि मगच स्वत:ची इतरांबरोबर तुलना न करता
स्वत:विषयी अभिमान बाळगणे त्याला शक्य होईल. 5कारण
प्रत्येकाला त्याची स्वत:ची जबाबदारी असलीच पाहिजे.
6ज्याला कोणाला देवाच्या वचनांचे शिक्षण मिळाले आहे,
त्याने जो शिक्षण देत आहे त्याला सर्व चांगल्या गोष्टीत
वाटा द्यावा.

### जीवन हे शेत पेरणाऱ्यासारखे आहे

7तुम्ही फसू नका. देवाची थट्टा होणे शक्य नाही. कारण
एखादी व्यक्ति जे पेरीते त्याचेच त्याला फळ मिळेल. 8जो
कोणी आपल्या देहस्वभावाचे बीज पेरतो त्याला
देहस्वभावापासून नाशाचे पीक मिळेल. पण जो आत्म्यात
बीज पेरतो, त्याला आत्म्यापासून सार्वकालिक जीवनाचे
पीक मिळेल. 9जे चांगले आहे ते करण्याचा आपण कंटाळा
करू नये. कारण आपण आळस केला नाही, तर योग्य
वेळी आपणांस आपले पीक मिळेल. 10तर मग ज्याप्रमाणे
आपणांस संधि मिळेल, तसे सर्व लोकांचे आणि विशेषत:
ज्यांनी सुवार्तेवर विश्वास ठेवला आहे त्यांच्या घराण्याचे
चांगले करू या.

11पाहा किती मोठे अक्षरे मी लिहिलीत. 12ज्यांना बाह्य
देखावा करणे आवडते, ते तुम्हांला सुंता करून घेण्याची
सक्ती करतात. परंतु ते अशासाठी की ख्रिस्ताच्या
वधस्तंभामुळे त्यांचा छळ होऊ नये. 13परंतु सुंता करून
घेणारेही नियमशास्त्र पाळीत नाहीत आणि तरीही तुमची
सुंता व्हावी असे त्यांना वाटते. यासाठी की, त्यांना तुमच्या
देहावरून फुशारकी मारता यावी. 14आपल्या प्रभु येशू
ख्रिस्ताच्या वधस्तंभाशिवाय मी कशाचाही अभिमान बाळगू
नये. त्याच्या द्वारे मला जग वधस्तंभावर खिळलेले, व मी
जगाला वधस्तंभावर खिळलेला आहे. 15कारण सुंता होणे
किंवा न होणे काही नाही, तर नवी उत्पत्ति हीच महत्त्वाची
आहे. 16तर जितके हा नियम पाळतील तितक्यांवर आणि
देवाच्या सर्व इस्राएलावर शांति व दया असो.

17आता इथून पुढे मी एवढेच मागतो की, यापुढे कोणीही
मला त्रास देऊ नये. कारण आधीच मी येशूच्या खुणा
माझ्या शरीरावर धारण केलेल्या आहेत. 18बंधूनो, आपल्या
प्रभु येशू ख्रिस्ताची कृपा तुमच्याबरोबर असो. आमेन.

# पौलाचे इफिसकरांस पत्र

1 देवाच्या इच्छेने झालेला येशू ख्रिस्ताचा दास पौल
याजकडून,
इफिस* येथे जे देवाचे लोक आहेत त्यांना व येशू
ख्रिस्तावर विश्वास ठेवणाऱ्यांना,
2देव आपला पिता आणि आपला प्रभु येशू ख्रिस्त
यांजकडून कृपा व शांति असो.

### ख्रिस्तात आध्यात्मिक आशीर्वाद

3आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताचा देव व पिता धन्यवादित
असो. त्याने स्वर्गराज्यातील प्रत्येक आध्यात्मिक आशीर्वाद
देऊन आम्हांला ख्रिस्तामध्ये आशीर्वादित केले आहे.
4ख्रिस्तामध्ये देवाने आम्हांला जग निर्माण होण्यापूर्वी त्याच्या
आमच्यावरील प्रेमामुळे त्याच्यासमोर आम्ही निर्दोष व
पवित्र असावे म्हणून निवडले आहे. 5त्याच्या कृपायुक्त
हेतूनुसार येशू ख्रिस्ताद्वारे त्याने दत्तक होण्यासाठी आमची
नेमणूक केली. 6त्याने हे त्याच्या गौरवी कृपेची स्तुति
व्हावी म्हणून केले. ही कृपा त्याने त्याच्या प्रिय पुत्राद्वारे
आम्हांला फुकट दिली. 7त्याच्यामध्ये ख्रिस्ताच्या रक्ताने
आम्ही स्वतंत्र केले गेलो, त्याच्या कृपेच्या समृद्धीने
आम्हांला आमच्या पापांची क्षमा मिळाली आहे. 8त्याची
कृपा आपले ज्ञान आणि समजबुद्धी वाढविण्यास कारणीभूत
ठरली आहे. 9ख्रिस्तामध्ये आपणांला दाखविण्याच्या त्याच्या
अनुग्रहाप्रमाणे त्याच्या इच्छेचे रहस्य आपल्याला कळविले.
10पृथ्वीवरील आणि स्वर्गातील सर्व गोष्टी ख्रिस्तामध्ये
एकत्र आणण्यासाठी अशी ती योजना काळाच्या पूर्णतेसाठी
होती.
11ख्रिस्तामध्ये आम्ही देवाचे लोक म्हणून निवडले गेलो
होतो. यासाठी आम्ही अगोदरच निवडले गेलो होतो. देवाचा
हेतू लक्षात घेऊन जो सर्व गोष्टी त्याच्या इच्छेच्या हेतूनुसार
पूर्णत्वास नेतो 12यासाठी की, ज्या आम्ही ख्रिस्तावर
अगोदरच आशा ठेवली होती, त्या आम्हांकडून त्याच्या
गौरवाची स्तुति व्हावी. 13ख्रिस्ताद्वारे तुम्हीसुद्धा जेव्हा
सत्याची म्हणजे तुमच्या तारणाची सुवार्ता ऐकली आणि
ख्रिस्तावर विश्वास ठेवला, तेव्हा पवित्र आत्म्याच्या
अभिवचनाचा देवाने तुम्हांवर शिक्का मारला 14जोपर्यंत
देव, आम्ही जे त्याचे
आहोत त्यांना पूर्ण आणि शेवटचे स्वातंत्र्य देईपर्यंत पवित्र
आत्मा हा आमच्या वतनाच्या हिश्शाचा विसार आहे.
आणि यामुळे त्याच्या गौरवाची स्तुति होईल.

### पौलाची प्रार्थना

15यासाठी, जेव्हापासून मी तुमच्या प्रभु येशूवरील
विश्वासाविषयी ऐकले आणि देवाच्या लोकांबद्दलच्या
तुमच्या प्रेमाविषयी ऐकले, 16तेव्हापासून तुमच्यासाठी देवाचे
उपकार मानण्याचे मी थांबविले नाही. 17मी प्रार्थना करतो
की, आमच्या प्रभु येशू ख्रिस्ताचा देव, गौरवी पिता, तुम्हाला
ज्ञान व प्रकटीकरणाचे आध्यात्मिक सामर्थ्य जे पित्याविषयी
ज्ञान तुम्हांला पुरवील, ते देवो.
18मी असे सांगतो की, तुमच्या अंत:करणाचे डोळे
प्रकाशित होवोत यासाठी की तुम्हाला तुमच्या पाचारणाची
आशा व संतांमध्ये त्याच्या वतनाच्या वैभवाची श्रीमंती
किती आहे हे कळावे. 19आणि आम्हांला
विश्वासणाऱ्यांसाठी त्याचे अतुलनीय सामर्थ्य किती महान
आहे, जणू काय त्याच्या प्रचंड सामर्थ्याचा तो सराव आहे.
20जो तो ख्रिस्तामध्ये करतो. जेव्हा त्याला (ख्रिस्ताला)
मरणातून उठविले आणि स्वर्गाच्या राज्यात देवाच्या उजव्या
हाताला बसविले. 21देवाने ख्रिस्ताला प्रत्येक अधिपती,
अधिकारी, सामर्थ्य, प्रभूत्व आणि प्रत्येक सामर्थ्याचे नाव
जे या युगातच नव्हे तर येणाऱ्या युगातही दिले जाईल त्या
सर्वांपेक्षा उंच ठिकाणी ठेवले. 22आणि देवाने ख्रिस्ताला
मंडळीचा सर्वोच्च प्रमुख केले. 23मंडळी ख्रिस्ताचे शरीर
आहे. जी पूर्णता त्याने सर्व गोष्टींमध्ये सर्व रीतीने भरली
आहे, ती पूर्णता तो मंडळीला देतो.

### मरणाकडून जीवनाकडे

2 पूर्वी तुम्ही आपले अपराध आणि पातके यांमुळे
आध्यात्मिक रीतीने मेला होता, 2ज्यामध्ये तुम्ही पूर्वी
जगत होता, जगातील दुष्ट मार्गाचे अनुकरण करीत होता,
आणि आपल्याला न दिसणारे आध्यात्मिक सामर्थ्य
ज्याच्याकडे आहे त्या सत्ताधीशाचे अनुकरण करीत होता.
जे देवाच्या आज्ञा पाळीत नाहीत त्यांच्या जीवनामध्ये हाच
आत्मा कार्य करीत आहे. 3एके काळी आम्हीसुद्धा
त्यांच्यामध्ये आमच्या मानवी देहाच्या दुष्ट इच्छांचे समाधान
करीत होतो आणि आमच्या मानवी मनाच्या दुष्ट वासनांची

---

**इफिस** काही प्राचीन प्रतींमध्ये ‘इफिस’ हा शब्द वगळलेला आहे.

पूर्तता करीत होतो. तसेच जगातील इतरांप्रमाणेच आम्ही त्याच्या क्रोधाची मुले झालो होतो.

4पण देव खूप दयाळू आहे. त्याच्या महान प्रीतीने त्याने आमच्यावर प्रेम केले. 5आम्ही आध्यात्मिकदृष्ट्या आमच्या पापांमध्ये मेलेले असतानाच त्याने आम्हांला ख्रिस्ताबरोबर जीवन दिले. (तुमचे तारण देवाच्या कृपेने झाले आहे.) 6देवाने आम्हांला ख्रिस्ताबरोबर नविन जीवनात उठविले आणि स्वर्गाच्या राज्यात त्याच्याबरोबर त्याच्या आसनावर बसविले, कारण आम्ही ख्रिस्त येशूमध्ये आहोत. 7देवाने हे केले यासाठी की, येणाऱ्या युगात त्याच्या अतुलनीय कृपेची संपत्ती दाखविता यावी आणि ख्रिस्त येशूमध्ये आम्हांविषयीची ममता व्यक्त करावी. 8कारण देवाच्या कृपेने विश्वासाच्या द्वारे तुमचे तारण झाले आणि ते तुमच्याकडून झाले नाही, तर ते देवापासूनचे दान असे आहे. 9आणि एखादा काही काम करतो त्याचा परिणाम म्हणून नव्हे. यासाठी कोणी बढाई मारू नये. 10कारण आम्ही देवाच्या हाताने घडविलेले आहोत. ख्रिस्तामध्ये आम्हांला चांगल्या कामासाठी निर्माण केले. जे देवाने अगोदरच तयार केले होते. यासाठी की, त्यामध्ये चालणे आम्हांला शक्य व्हावे.

### ख्रिस्तामध्ये एक

11म्हणून, आठवा की एके काळी, तुम्ही यहूदीतर म्हणून जन्मला होता आणि त्यांना (विदेश्यांना) सुंता न झालेले असे, ज्यांची सुंता झालेली होती ते यहूदी लोक म्हणत होते. 12आठवा की, त्यावेळी तुम्ही ख्रिस्तविरहित, देवाचे लोक जे इस्राएल त्या समाजातून तुम्हाला बहिष्कृत केले होते, आणि देवाच्या अभिवचनाशी निगडित अशा कराराशी तुम्ही परके असे होता, तुम्ही या जगात आशेशिवाय आणि देवाशिवाय जगला. 13पण आता, ख्रिस्तामध्ये जे तुम्ही एके काळी देवापासून दूर होता, ते तुम्ही ख्रिस्ताच्या रक्ताने त्याच्याजवळ आणलेले आहात. 14कारण त्याच्याद्वारे आम्हांला शांतीचा लाभ झाला आहे. त्याने दोन्ही गोष्टी एक केल्या आणि आपल्या शरीराने त्याने वैराचा, दुभागणाऱ्या भिंतीचा अडथळा पाडून टाकला. 15त्याने नियमशास्त्र त्याच्या नीतिनियमांसहित रद्द केले. यासाठी की स्वत:मध्ये दोघांचा एक मानव निर्माण करून शांति करणे त्याला शक्य व्हावे. 16आणि त्याच्या वधस्तंभावरील मरणाद्वारे देवाबरोबर एका शरीरात त्या दोघांमध्ये समेट घडवून आणता यावा, ज्यामुळे या दोन गोष्टीतील वैमनस्य संपवता येईल. 17म्हणून तो आला आणि त्याने जे तुम्ही देवापासून दूर होता व जे तुम्ही देवाजवळ होता त्या तुम्हाला शांतीची सुवार्ता सांगितली, 18कारण त्याच्या द्वारे, आम्हा दोघांचा एका आत्म्याच्या द्वारे देवाजवळ प्रवेश होतो.

19यामुळे, तुम्ही आता परके आणि यहूदीतर नाहीत. तर तुम्ही देवाच्या लोकांबरोबरचे सहनागरिक आणि देवाचे कुटुंबीय आहात. 20तुम्ही प्रेषित आणि संदेष्टे या पायावर बांधलेली इमारत आहा, आणि ख्रिस्त येशू स्वत: तिचा कोनशिला आहे. 21संपूर्ण इमारत त्याच्याद्वारे जोडली गेली आणि प्रभूमध्ये एक पवित्र मंदिर होण्यासाठी वाढत आहे. 22त्याच्यामध्ये तुम्हीही इतरांबरोबर आत्म्याच्या द्वारे देवाचे राहण्याचे ठिकाण तयार करण्यासाठी एकत्र रचले जात आहात.

### पौलाचे विदेशी लोकांसाठी कार्य

3 या कारणासाठी मी, पौल तुम्हा विदेशी लोकांसाठी ख्रिस्त येशूचा कैदी आहे. 2देवाची कृपा तुमच्यापर्यंत पोचविण्याची व्यवस्था करण्याचे काम माझ्यावर सोपवल्याचे तुम्ही जाणता 3आणि जशी मी अगोदर तुम्हांला थोडक्यात लिहिली होती ती देवाची गूढ योजना मला प्रकटीकरणाच्या द्वारे कळविण्यात आली. 4जर तुम्ही ती वाचाल तर तुम्हांला माझ्या ख्रिस्ताच्या रहस्याविषयीचे पूर्ण ज्ञान होणे शक्य होईल. 5मागील पिढ्यांमध्ये हे रहस्य मनुष्यांच्या पुत्रांना सांगण्यात आले नव्हते, जसे आता त्याच्या पवित्र प्रेषितांना आणि संदेश देणाऱ्यांना आत्म्याच्या द्वारे प्रकट करण्यात आले आहे. 6हे रहस्य ते आहे की, सुवार्तेद्वारे विदेशी लोक हे यहूदी लोकांबरोबर सहवारसदार आहेत, ते एकाच शरीराचे अवयव आहेत. आणि ख्रिस्त येशूमध्ये देवाने दिलेल्या अभिवचनामध्ये सहभागीदार आहेत.

7देवाच्या प्रभावी कृतीच्या सामर्थ्याचा परिणाम म्हणून जे कृपेचे दान मला देण्यात आले होते त्यामुळे मी सुवार्ता सांगण्याची जबाबदारी दिलेला सेवक झालो. 8जरी मी देवाच्या सर्व लोकांमध्ये लहानातील लहान आहे तरी मला हे देवाच्या गहन अशा संपत्तीची सुवार्ता यहूदीतरांना सांगावी हे कृपेचे दान मला दिले गेले,

9आणि रहस्यमय योजना सर्व लोकांना कळविण्यास सांगितली. ज्या देवाने सर्व गोष्टी निर्माण केल्या, त्याच्याकडे काळाच्या सुरूवातीपासून ही रहस्यमय योजना देवामध्ये लपून अशी राहिली होती. 10यासाठी की आता मंडळीद्वारे सत्ताधीश आणि आकाशातील शक्ती यांना देवाचे वेगवेगळ्या प्रकारचे ज्ञान व्हावे. 11देवाच्या अनंतकाळच्या हेतूला अनुसरून जे त्याने आपला प्रभु येशू ख्रिस्त याच्यामध्ये पूर्णत्वास नेले. 12त्या ख्रिस्तामध्ये आम्हांला देवाच्या समक्षतेत आमच्या ख्रिस्तावरील विश्वासामुळे धैर्य आणि पूर्ण विश्वास आहे. 13म्हणून, मी प्रार्थितो की, तुमच्यासाठी मला होणाऱ्या क्लेशामुळे तुम्ही माघार घेऊ नये. कारण हे क्लेश आमचे गौरव आहेत.

### ख्रिस्ताची प्रीति

14-15या कारणासाठी ज्याच्यापासून स्वर्गातील आणि पृथ्वीवरील प्रत्येक घराण्याला नाव मिळाले आहे, त्या पित्यासमोर गुडघे टेकून प्रार्थना करतो. 16मी प्रार्थना करतो की, त्याने आपल्या वैभवी संपत्तीप्रमाणे तुम्हांला

त्याच्या आत्म्याच्या द्वारे, पराक्रमाने तुमच्या अंतर्यामी बलवान होण्यास मान्यता द्यावी. 17आणि विश्वासाद्वारे ख्रिस्त तुमच्या अंत:करणात राहावा. व तुमची मुळे चांगली रुजलेली व प्रीतीत मुळावलेली असावी. 18यासाठी की, सर्व संतांच्यासह ख्रिस्ताच्या प्रीतीची रूंदी, लांबी, उंची आणि खोली किती आहे हे समजून घेण्यास तुम्हांला सामर्थ्य प्राप्त व्हावे. 19आणि ख्रिस्ताची प्रीति जी ज्ञान्यांना मागे टाकते हे कळावे यासाठी की तुम्ही देवाच्या पूर्णत्वाने भरावे.

20आणि आता देव जो आपल्या सामर्थ्यानुसार आम्हांमध्ये कार्य करतो इतकेच नव्हे तर आम्ही मागितल्यापेक्षा किंवा आमच्या अपेक्षेपेक्षा अधिक कार्य करण्यास तो समर्थ आहे, 21त्याला मंडळी आणि ख्रिस्त येशूमध्ये सर्व पिढ्यानपिढ्यासाठी सदासर्वकाळ गौरव असो.

## शरीराचे ऐक्य

4 म्हणून मी, जो प्रभूमधील कैदी, (दास) तो तुम्हांला विनंती करतो, देवाकडून तुम्हाला जे पाचारण झालेले आहे, त्याला शोभेल अशा प्रकारे राहा. 2नेहमी नम्रता, सौम्यता दाखवा. आणि सहनशीलतेने एकमेकांबरोबर प्रीतीने राहा. 3शांतीच्या बंधनाने आत्म्याचे ऐक्य राखण्यासाठी प्रत्येक गोष्टीत प्रयत्न करा. 4एक शरीर व एकच आत्मा आहे. ज्याप्रमाणे तुम्हालाही एकाच आशेत सहभागी होण्यास बोलाविले होते. 5एक प्रभु, एक विश्वास, एक बाप्तिस्मा, 6एक देव आणी पिता जो सर्वांचा मालक आहे. जो प्रत्येक गोष्टीद्वारे कार्य करतो आणि जो प्रत्येकात आहे,

7ख्रिस्ताच्या दानाच्या मोजमापाप्रमाणे आपणांस प्रत्येकाला कृपेचे विशेष दान दिले आहे. 8यासाठीच पवित्र शास्त्र असे म्हणते,

"जेव्हा तो उच्चस्थानी चढला, तेव्हा त्याने युद्धकैद्यांस आपणांबरोबर नेले आणि त्याने लोकांना देणग्या दिल्या."

*स्तोत्र. 68:18*

9आता, जेव्हा ते असे म्हणते, "वर चढला" तर त्याचा अर्थ काय? म्हणजे तो पृथ्वीच्या खालील प्रदेशात सुध्दा उतरला असाच होतो की नाही? 10जो खाली उतरला तोच वर सर्व स्वर्गांहून उंच ठिकाणी चढला. यासाठी की सर्व गोष्टी त्याला भरता याव्यात. 11आणि त्याने स्वत:च काही लोकांना प्रेषित, इतर काही जणांना भविष्य सांगणारे सुवार्तिक, तर दुसऱ्यांना मेंढपाळ व शिक्षक असे होण्याची दाने दिली. 12ख्रिस्ताने त्या देणग्या देवाचे लोक सेवेच्या कार्यासाठी तयार करण्यास व आत्मिकरीतीने ख्रिस्ताचे शरीर सामर्थ्यवान होण्यासाठी दिल्या. 13आम्हा सर्वांना आमच्या पित्यातील एकत्वापणामुळे विश्वासाची आणि देवाच्या पुत्राविषयीच्या ज्ञानाची जाणीव होते आणि पूर्णत्वाची जी परिमाणे ख्रिस्ताने आणली आहेत त्या उच्चतेपर्यंत पोहोंचून परिपक्व मनुष्य होण्यासाठी आमची वाढ होते.

14हे असे आहे म्हणून यापुढे आपण लहान बाळकासारखे नसावे. म्हणजे माणसांच्या कपटाने त्यांची लबाडी जी कपटयोजनेला महत्त्व देते, अशा प्रत्येक नव्या शिकवणुकीच्या वाऱ्याने तुमचे मार्ग लाटांनी इकडे तिकडे हेलकावणारे होऊ नयेत 15त्याऐवजी आपण प्रेमाने सत्य बोलावे आणि प्रत्येक मार्गाने ख्रिस्तासारखे होण्यासाठी वाढावे. ख्रिस्त हा मस्तक आहे. 16ज्यावर सर्व शरीर आधारित आहे, ते आधार देणाऱ्या प्रत्येक अस्थिबंधनाने जोडलेले आणि एकत्र बांधलेले असते. आणि प्रत्येक भाग त्याने जसे कार्य करायला पाहिजे तसे करतो. संपूर्ण शरीर वाढते व प्रीतीत बळकट होत जाते.

## अशा मार्गाने तुम्ही जगावे

17म्हणून मी हे म्हणतो व प्रभूच्या नावात सावध करतो: ज्याप्रमाणे विदेशी त्यांच्या मनाच्या व्यर्थतेप्रमाणे चालतात तसे चालू नका. 18त्यांची अंत:करणे अंधकारमय अशा स्थितीत आहेत आणि देवापासून जे जीवन येते त्यापासून ते वेगळे झाले आहेत. कारण ते अजाण आहेत, आणि त्यांची अंत:करणे कठीण झाली आहेत. 19त्यांना आता कशाचीच लाज वाटत नाही व त्यांनी स्वत:ला कामातुरपणाला वाहून घेतले आहे व प्रत्येक प्रकारच्या अशुद्धतेच्या सवयीला वाहून घेतले आहे. 20परंतु तुम्ही अशा प्रकारे ख्रिस्त शिकला नाही. आणि 21मला यात काही शंका नाही की, तुम्ही त्याच्याविषयी ऐकले आहे. आणि येशूमध्ये जे सत्य आहे त्याप्रमाणे त्याचे अनुयायी म्हणून ते सत्य तुम्ही शिकला असाल. 22तुमच्या पूर्वीच्या जीवनाविषयी, तुम्हांला तुमच्या जुन्या मनुष्यापासून सुटका करून घेण्यास शिकविले होते, जो मनुष्य फसवणुकीच्या इच्छेने अशुद्ध झाला आहे, 23यासाठी तुम्ही अंत:करणामध्ये व आत्म्यात नवे केले जावे आणि 24नवा मनुष्य तुम्ही धारण करावा, जो देवाप्रमाणे निर्माण केलेला आहे. 25"म्हणून लबाडी करू नका! प्रत्येक व्यक्तीने त्याच्याबरोबरच्या व्यक्तीशी खरे तेच बोलावे." 26"तुम्ही रागवा पण पाप करू नका." सूर्यास्तापूर्वी तुम्ही तुमचा राग सोडून द्यावा. 27तुमचा पराभव करण्याची सैतानाला संधी देऊ नका. 28जो कोणी चोरी करीत असेल तर त्याने यापुढे चोरी करू नये. उलट, त्याने आपल्या हातांनी काम करावे यासाठी की जो कोणी गरजू असेल त्याला त्यातून वाटा देण्यासाठी त्याच्याकडे काहीतरी असावे.

29तुमच्या तोंडून कोणतीही वाईट भाषा न निघो, तर आध्यात्मिक सामर्थ्यासाठी ज्याची लोकांना गरज आहे ते चांगले मात्र निघो. यासाठी की, जे ऐकतील त्यांना आशीर्वाद प्राप्त होईल. 30आणि देवाच्या पवित्र आत्म्याला दु:खी करू नका. कारण तुम्ही आत्म्याबरोबर देवाची संपत्ती

म्हणून तारणाच्या दिवसासाठी शिक्का मारलेले असे आहात.
31सर्व प्रकारची कटुता, संताप, राग, ओरडणे, देवाची
निंदा ही सर्व प्रकारच्या दुष्टाईबरोबर तुम्हामधून दूर करावी.
32एकमेकांबरोबर दयाळू आणि कनवाळू व्हा. आणि देवाने
ख्रिस्तामध्ये क्षमा केली तशी एकमेकांना क्षमा करा.

5 प्रिय मुलांप्रमाणे देवाचे अनुकरण करणारे व्हा, 2आणि
ख्रिस्ताने जशी आमच्यावर प्रीति केली तसे प्रीतीमध्ये
चाला, त्याने आमच्याकरिता मधुर सुगंध असे देवाला
अर्पण व यज्ञ केला.

3जारकर्म, कोणत्याही प्रकारची अशुद्धता किंवा
अधाशीपणा याचे तुमच्यामध्ये नावही निघू नये, हे देवाच्या
पवित्र लोकांसाठी योग्य नाही. 4तसेच कोणतेही लाजिरवाणे
भाषण, मूर्खपणाचे बोलणे किंवा घाणेरडे विनोद तुमच्यात
असू नयेत. ते योग्य नाही. उलट उपकारस्तुति असावी.
5कारण तुम्हांला हे माहीत असावे की: जो मनुष्य जारकर्मी,
अशुद्ध किंवा अधाशी जे मूर्तिपूजेसारखेच आहे, त्या
मनुष्याला देवाच्या आणि ख्रिस्ताच्या राज्यात वतन असणार
नाही.

6पोकळ भाषणाने कोणी तुम्हांला फसवू नये. कारण
या कारणांमुळे जे आज्ञा मोडतात, त्यांच्यावर देवाचा क्रोध
येणार आहे. 7म्हणून त्यांचे भागीदार होऊ नका. 8मी हे
सांगतो कारण एके काळी तुम्ही पूर्णपणे अंधारात होता,
पण आता तुम्ही प्रभूचे अनुयायी म्हणून पूर्ण प्रकाशात
आहात. प्रकाशात चालणाऱ्या लेकरांसारखे व्हा. 9कारण
प्रकाशाची फळे प्रत्येक चांगुलपणात, नीतीमत्त्वात, आणि
सत्यात दिसून येतात. 10नेहमी प्रभूला कशाने संतोष होईल
हे शोधण्याचा प्रयत्न करा. 11आणि अंधाराची जी निष्फळ
कार्ये आहेत त्यांचे भागीदार होऊ नका. तर उलट, ती
उघडकीस आणा. 12कारण ज्या गुप्त गोष्टी त्यांनी केल्या
आहेत, त्याविषयी बोलणेही लज्जास्पद आहे. 13पण जेव्हा
सर्व काही प्रकाशाद्वारे उघड होते, तेव्हा प्रत्येक गोष्ट
दिसते, 14आणि जी प्रत्येक गोष्ट दिसते, ती प्रकाश आहे.
म्हणूनच आम्ही असे म्हणतो:

"हे झोपलेल्या जागा हो व मेलेल्यांतून ऊठ, आणि
ख्रिस्त तुझ्यावर प्रकाशेल."

15म्हणून, तुम्ही कसे जगता, याविषयी सावध असा.
मूर्ख लोकांसारखे होऊ नका. तर शहाण्या लोकांसारखे
व्हा. 16जे चांगल्या संधीचा उपयोग करतात. कारण हे
दिवस वाईट आहेत. 17म्हणून मूर्खासारखे वागू नका, तर
उलट देवाची इच्छा काय आहे ते जाणून घ्या. 18द्राक्षारस
पिऊन झिंगल्यासारखे राहू नका. त्यामुळे मनुष्य सर्वच
बाबतीत बेताल होतो. उलट आत्म्याने पूर्ण भरले जा.
19स्तोत्रे, गीते, आणि आध्यात्मिक गीतांनी एकमेकाबरोबर
सुसंवाद साधा. गाणी गा. आणि आपल्या अंत:करणात
प्रभूसाठी गायन गा. 20आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या नावात
देव जो आपला पिता आहे त्याचे प्रत्येक गोष्टीबद्दल नेहमी
उपकार माना.

## पती–पत्नी

21ख्रिस्ताच्या भयात एकमेकांच्या अधीन असा.
22पत्नींनो, जशा तुम्ही प्रभूच्या अधीन होता, तशा आपल्या
पतींच्या अधीन असा. 23कारण ख्रिस्त जसा मंडळीचे मस्तक
आहे, तसा पती पत्नीचे मस्तक आहे. ख्रिस्त स्वत:च
शरीराचा तारणारा आहे. 24पण, ज्याप्रमाणे मंडळी ख्रिस्ताला
शरण जाते, त्याचप्रमाणे पत्नीने प्रत्येक बाबतीत आपल्या
पतीच्या अधीन असावे. 25पतींनो, ज्याप्रमाणे ख्रिस्त
मंडळीवर प्रीति करतो, तशी तुम्ही आपल्या पत्नीवर प्रीति
करा. त्याने तिच्यासाठी स्वत:ला दिले, 26यासाठी की,
त्याने तिला देवाच्या वचनरूपी पाण्याने धुऊन निर्मळ
करावे. 27यासाठी की, तो मंडळीला स्वत:साठी गौरवी
वधू म्हणून सादर करील. तिला कोणताही डाग नसेल.
किंवा सुरकुती किंवा कोणत्याही प्रकारची अपूर्णता नसेल
तर ती पवित्र व निर्दोष असेल.

28याप्रकारे पतींनी सुद्धा आपल्या पत्नींवर असेच प्रेम
करावे, जसे ते स्वत:च्या शरीरावर प्रेम करतात. जो
कोणी त्याच्या स्वत:च्या पत्नीवर प्रेम करतो, तो स्वत:वर
प्रेम करतो. 29कारण आतापर्यंत कोणीही आपल्या शरीराचा
द्वेष केला नाही. उलट तो त्याचे पोषण करतो. त्याची
काळजी घेतो. ज्याप्रमाणे ख्रिस्त मंडळीचे पोषण करतो व
काळजी घेतो. 30कारण आपण त्याच्या शरीराचे अवयव
आहोत. 31शास्त्र सांगते त्याप्रमाणे, "म्हणून मनुष्य त्याचे
वडील व आई यांना सोडील व त्याच्या पत्नीशी जडून
राहील. आणि ते दोघे एकदेह होतील."*

32हे गूढ सत्य फार महत्त्वाचे आहे आणि मी हे सांगत
आहे की ते ख्रिस्त व मंडळीला लागू पडते. 33तरीही,
तुमच्यातील प्रत्येकाने त्याच्या स्वत:च्या पत्नीवर प्रेम केले
पाहिजे. व पत्नीनेही पतीचा मान राखाला पाहिजे.

## मुले आणि आईवडील

6 मुलांनो, प्रभूशी प्रामाणिक राहून आपल्या
आईवडिलांच्या आज्ञा पाळा. कारण ते योग्य आहे.
2"तुझ्या वडिलाचा व आईचा मान राख."*
3अभिवचनाबरोबरची ही पहिली आज्ञा असल्याने,
"तुझ्यासाठी सर्व काही चांगले असावे आणि पृथ्वीवर
तुला दीर्घ आयुष्य लाभावे."* 4आणि वडिलांनो, आपल्या
मुलांना राग येईल असे करू नका. उलट, देवापासून जी
माहिती व शिक्षण येते त्यात त्यांना वाढवा.

---

**म्हणून ... होतील** उत्पत्ति 2:24

**तुझ्या ... राख** निर्गम 20:12; अनुवाद 5:16

**तुझ्यासाठी ... लाभावे** निर्गम 20:12; अनुवाद 5:16

## गुलाम आणि मालक

5गुलामांनो, तुमच्या पृथ्वीवरील मालकांची आज्ञा
आदराने, थरथर कांपत, आणि तुमच्या अंत:करणाच्या
प्रामाणिकतेने पाळा. ज्याप्रमाणे तुम्ही ख्रिस्ताची आज्ञा पाळता
तशी पाळा. 6जेव्हा माणसे तुमच्याकडे पाहत असतील
तेव्हाच फक्त काम करू नका. मनुष्याला पसंत पडावे
यासाठी प्रयत्न करू नका. उलट ख्रिस्ताच्या गुलामासारखे
काम करा, कारण (ख्रिस्ताचे गुलाम) देवाची इच्छा आपल्या
अंत:करणापासून पूर्ण करतात. 7गुलाम म्हणून उत्साहाने
जणू काय माणसांची नव्हे, तर “प्रभूची” सेवा करीत
आहात, असे काम करा.

8लक्षात ठेवा की, तुम्हांतील प्रत्येकजण जर काही
चांगले करतो तर तो गुलाम असो किंवा स्वतंत्र असो, ते
त्याला प्रभूकडून परत मिळेल. 9आणि मालकांनो, तुम्हीही
त्यांच्याशी तसेच वागा आणि धमकाविण्याचे सोडून द्या.
लक्षात ठेवा की तुमचा आणि त्यांचा धनी स्वर्गात आहे.
आणि त्याच्याजवळ पक्षपात नाही.

## देवाची संपूर्ण शस्त्रसामग्री धारण करा

10शेवटी, प्रभूमध्ये तुम्ही त्याच्या महान शक्तीसामर्थ्याने
सशक्त व्हा. 11देवाने दिलेले संपूर्ण चिलखत धारण करा.
यासाठी की तुम्हांला सैतानाच्या दुष्ट योजनांविरुद्ध उभे
राहता यावे. 12कारण आपले झगडणे, रक्तमांसाबरोबर
नाही, तर सत्ताधीशांविरुद्ध, अधिकाऱ्याविरुद्ध, या
अंधकारातील जगाच्या सामर्थ्याबरोबर आणि
आकाशातील दुष्ट आत्म्यांविरुद्ध आहे. 13म्हणून देवाने
दिलेली संपूर्ण शस्त्रसामग्री घ्या. म्हणजे तुम्हाला सर्व ते
केल्यावर टिकून राहता येईल व वाईट दिवस आल्यावर
तुम्हाला प्रतिकार करता येईल.

14म्हणून भक्कमपणे उभे राहा! सत्याने आपली कंबर
बांधा, नीतीमत्त्वाचे उरस्त्राण धारण करा. 15आणि सुवार्ता
व शांती यांची घोषणा करण्यासाठी सज्जतेच्या वहाणा
पायी घाला. 16या सर्व गोष्टींबरोबर ढाल म्हणून विश्वास
घ्या. ज्यामुळे त्या दुष्टाने मारलेले सर्व जळते बाण तुम्हांला
विझविणे शक्य होईल. 17आणि तारणाचे शिरस्त्राण घ्या,
आणि आत्म्याची तलवार जो देवाचा संदेश आहे, तो घ्या.
18प्रत्येक प्रसंगी सर्व प्रकारे प्रार्थनापूर्वक विनंति करून
आत्म्यात प्रार्थना करा. चिकाटी व प्रार्थनेसह सर्व संतांसाठी
प्रार्थना करीत जागृत राहा.

19आणि माझ्यासाठी प्रार्थना करीत राहा. कारण जेव्हा
मी तोंड उघडेन तेव्हा मला संदेश प्राप्त व्हावा. यासाठी
की धैर्याने मला सुवार्तेचे रहस्य माहीत करून देणे शक्य
व्हावे. 20त्याच्या वतीने मी साखळदंडानी बांधलेला राजदूत
म्हणून सेवा करीत आहे. धैर्याने मला ती सांगता यावी
म्हणून प्रार्थना करा.

## शेवटच्या शुभेच्छा

21यासाठी तुम्हाला हे कळावे की मी कसा आहे आणि
काय करीत आहे, म्हणून तुखिक तुम्हांला सर्व काही
सांगेल. तो आमचा प्रिय भाऊ आणि प्रभूमध्ये विश्वासू
सेवक आहे. 22मी त्याला केवळ या कारणासाठीच
तुमच्याकडे पाठवीत आहे की माझ्याविषयीचे वर्तमान
तुम्हांला कळावे आणि तुमच्या अंत:करणाचे समाधान
व्हावे. 23देवपिता आणि प्रभु येशू ख्रिस्तापासून आता बंधु
बहिर्णीना विश्वासासह प्रीति आणि शांति लाभो. 24जे सर्व
जण आपल्या प्रभु येशू ख्रिस्तावर अविनाशी प्रीति करतात,
त्या सर्वांबरोबर देवाची कृपा असो.

# पौलाचे फिलिप्पैकरांस पत्र

1 ख्रिस्त येशूचे दास असलेल्या पौल व तीमथ्य
यांजकडून, फिलिप्पै येथे राहणाऱ्या ख्रिस्त येशूमधील
देवाच्या सर्व पवित्र लोकांना, तसेच सर्व वडील मंडळीला
व खास मदतनिसांना, 2देव आपला पिता आणि आपला
प्रभु येशू ख्रिस्त याजपासून तुम्हांस कृपा असो.

## पौलाची प्रार्थना

3प्रत्येक वेळी जेव्हा मी तुमची आठवण करतो, तेव्हा
देवाचे आभार मानतो. 4नेहमीच तुमच्यासाठी केलेल्या
प्रत्येक प्रार्थनेच्यावेळी मी आनंदाने प्रार्थना करतो. 5कारण
अगदी पहिल्या दिवसांपासून ते आजपर्यंत सुवार्तेच्या कामात
तुमचा सहभाग आहे. 6मला याची खात्री आहे की, ज्या
देवाने तुमच्यामध्ये अशा प्रकारचे चांगले कार्य सुरू केले
आहे, तो ख्रिस्त येशू येण्याच्या वेळेपर्यंत ते पूर्ण करीत
आणील.

7तुम्हा सर्वाविषयी असा विचार करणे मला योग्य वाटते
कारण तुम्ही माझ्या हृदयात आहात. आणि मी तुरूंगात
असतानाच केवळ नव्हे तर जेव्हा मी सुवार्तेचे सत्य ठासून
सिद्ध करीत होतो, तेव्हा ही देवाने जी कृपा मला दिली
आहे त्यात तुम्हीसुद्धा माझ्याबरोबर वाटेकरी होता. 8देव
माझा साक्षी आहे, कारण ख्रिस्त येशूने जे प्रेम दाखविले
त्यामुळे तुम्हां सर्वांसाठी मी अधीर झालो होतो.

9आणि माझी हीच प्रार्थना आहे:

की तुमचे प्रेम अधिकाधिक वाढत जाईल पूर्ण ज्ञान व
सर्व प्रकारच्या समजबुद्धीने वाढत जाईल.

10मी अशी प्रार्थना करतो की, तुमच्याठायी हे गुण
असावेत, यासाठी की जे शुद्ध व निर्दोष ते तुम्ही निवडावे,
आणि अशा प्रकारे ख्रिस्ताच्या येण्याच्या दिवसासाठी तुम्ही
शुद्ध व निर्दोष असावे,

11आणि देवाच्या गौरवासाठी, स्तुति साठी आणि
नीतिमत्त्वाचे फळ देण्यासाठी भरून जावे.

## पौलाच्या त्रासामुळे प्रभूच्या कार्याला मदत होते

12बंधूनो, जे काही माझ्या बाबतीत घडले त्यामुळे
सुवार्ताकार्यात प्रत्यक्ष वाढ झाली हे तुम्हाला कळावे अशी
माझी इच्छा आहे. 13याचा परिणाम असा झाला की,
राजवाड्याच्या सर्व पहारेकऱ्यांना व येथे असणाऱ्या सर्वांना
हे माहीत झाले की, मी ख्रिस्ताला अनुसरतो म्हणून मला
तुरूंगवास भोगावा लागत आहे. 14शिवाय, पुष्कळशा
बांधवांना माझ्या तुरूंगवासामुळे उत्तेजन मिळाले. व ते
बोलण्यात ख्रिस्तामध्ये अधिकाधिक धीट होत चालले
आहेत व न भिता संदेश देत आहेत.

15हे खरे आहे की त्यांच्यातील काही जण हेव्याने व
वैरभावाने ख्रिस्ताचा संदेश देतात, पण इतर चांगल्या
भावनेने ख्रिस्ताचा संदेश देतात. 16हे लोक प्रेमापोटी असे
करतात, कारण त्यांना माहीत आहे की, सुवार्तेचे समर्थन
करण्यासाठी देवाने मला येथे ठेवले आहे. 17पण दुसरे
ख्रिस्ताची घोषणा स्वार्थी ध्येयाने करतात आणि
प्रामाणिकपणे करीत नाहीत, कारण त्यांना वाटते की, मी
तुरूंगात असताना मला त्रास देणे त्यांना शक्य होईल.

18पण त्यामुळे काय होते? महत्त्वाची गोष्ट अशी आहे
की, प्रत्येक मार्गाने चांगला हेतू असो की वाईट हेतू असो,
ख्रिस्त गाजविला जातो. आणि त्यामुळे मला आनंद होतो.
आणि मला आनंद होतच राहील. 19कारण मला माहीत
आहे तुमच्या प्रार्थनेमुळे आणि येशू ख्रिस्ताच्या आत्म्याद्वारे
येणाऱ्या मदतीमुळे याचा परिणाम माझ्या सुटकेत होणार
आहे. 20हे माझ्या उत्सुक अपेक्षेप्रमाणे व आशेप्रमाणे आहे,
कारण मला खात्री आहे की, माझी निराशा होणार नाही,
पण आता नेहमीसारखे माझ्या सर्व धैर्याने माझ्या जगण्याने
किंवा मरण्याने ख्रिस्ताचा माझ्या शरीराद्वारे महिमा होईल.
21कारण माझ्यासाठी जगणे म्हणजे ख्रिस्त आणि मरणे
म्हणजे लाभ आहे. 22पण जर मी या शरीरातच राहिलो
तर त्याचा अर्थ असा की, माझ्या कामाचे फळ, आनंद
मी अनुभवीन. मला माहीत नाही की मी काय निवडीन.
23या दोन पर्यायातून निवडण्यासाठी माझ्यावर मोठा दबाव
आहे. माझी अशी इच्छा आहे की, या जीवनातून जाऊन
ख्रिस्ताबरोबर असावे कारण ते फार फार चांगले होईल.
24पण तुमच्यासाठी या शरीरात राहणे हे माझ्यासाठी अधिक
आवश्यक आहे. 25आणि मला याची खात्री असल्याने
मला माहीत आहे की मी येथेच राहीन व तुमच्याबरोबर
असेन. 26यासाठी की तुमच्याबरोबर पुन्हा असण्याचा
परिणाम म्हणून तुम्हांला अभिमान बाळगण्यास अधिक
योग्य कारण मिळेल.

27पण कोणत्याही परिस्थितीत ख्रिस्ताच्या सुवार्तेला योग्य
अशा प्रकारे तुम्ही वागा. यासाठी की, जरी मी तुम्हांला
येऊन भेटलो किंवा तुमच्यापासून दूर असलो तरी मला

तुमच्याविषयी असे ऐकायला मिळो की तुम्ही एका आत्म्यात खंबीर असे उभे आहात, तुम्ही सुवार्तेच्या विश्वासाने, एकजीवाने धडपड करीत आहात. 28आणि जे तुम्हांला विरोध करतात त्यांना तुम्ही भ्याला नाहीत. तुमचे हे धैर्य त्यांच्या नाशाचा पुरावा होईल. पण तुमच्या तारणाचा पुरावा होईल. आणि हे देवाकडून असेल. 29कारण, ख्रिस्ताच्या वतीने केवळ त्याच्यावर विश्वास ठेवणे एवढेच नव्हे तर त्याच्यासाठी दु:ख भोगणे असा हक्क तुम्हांला देण्यात आलेला आहे. 30माझ्यामध्ये चाललेले युंद्ध तुम्ही अनुभवलेले आहे आणि पाहिले आहे आताही ते माझ्यामध्ये चालले असल्याचे तुम्ही ऐकत आहात.

### संघटित व्हा आणि एकमेकाची काळजी घ्या

2 जर मग खिस्तात तुमच्यामध्ये काही उत्तेजन आहे, जर तुमच्यामध्ये तुमच्या प्रीतीतून वाढणारे सांत्वन आहे, जर तुमच्यामध्ये आत्म्यात काही भाग आहे, जर तुमच्यामध्ये जिव्हाळा व कळवळा आहे, 2तर मला पूर्णपणे आनंदी करा. मी सांगतो की, तुम्ही त्याच गोष्टीचा विचार करता, एकमेकांविषयी सारखेच प्रेम आहे तर आत्म्यात एक व्हा, आणि एकच उद्देश असू द्या. 3हेवा किंवा पोकळ व्यर्थ अभिमानाने काहीही करू नका. उलट नम्रतेने एकमेकांना स्वत:पेक्षा चांगले माना. 4प्रत्येक व्यक्तीने केवळ आपलेच हित पाहू नये, तर प्रत्येकाने दुसऱ्यांचे हितसुद्धा पाहावे.

### ख्रिस्ताकडून निस्वार्थी होण्याचे शिका

5ख्रिस्त येशूच्या ठायी जे विचार होते तसेच तुमचेही असू द्या. 6जरी तो देवाच्या स्वरूपाचा होता तरी देवासारखे असणे हे संपत्ती राखून ठेवण्यासारखे मानले नाही. 7उलट त्याने सर्व काही सोडून दिले, आणि त्याने गुलामाचे स्वरूप धारण केले आणि मनुष्याचे रूप धारण केले व तो आपल्या दिसण्यात मनुष्यासारखा झाला. 8त्याने स्वत:ला नम्र केले. आणि मरेपर्यंत तो आज्ञाधारक राहिला. होय, वधस्तंभावरच्या मरणापर्यंत तो नम्र झाला. 9म्हणून देवाने सुद्धा त्याला अत्युच्च केले, व सर्व नावाहून जे नाव श्रेष्ठ आहे ते त्याला दिले. 10यासाठी की, स्वर्गात, पृथ्वीवर व पृथ्वीखाली जे आहेत त्या सर्वांनी येशूच्या नावाच्या महिम्यासाठी गुडघे टेकावेत. 11व प्रत्येक जिभेने जाहीर करावे की, “येशू ख्रिस्त हा देव पिता आहे.”

### देवाला पाहिजे तसे लोक व्हा

12म्हणून माझ्या प्रियांनो, जसे तुम्ही मी प्रत्यक्ष असतानाच नव्हे तर आता दूर असतानासुद्धा आज्ञा पाळता तसे भीतीने कापत तुमचे तारण पूर्ण होण्यासाठी कार्य करीत राहा. 13कारण देवच असा एक आहे जो तुमच्यामध्ये कार्य करण्याची इच्छा निर्माण करतो व तो संतुष्ट होईल अशा रीतीने कार्य पूर्णत्वास नेतो.

14प्रत्येक गोष्ट तक्रार किंवा भांडण न करता करा, यासाठी की, 15तुम्ही निर्दोष व शुद्ध असे या कुटिल व विपरीत पिढीतील लोकांमध्ये असावे. आणि त्यांच्यामध्ये अंधाऱ्या जगातील प्रकाशासारखे चमकावे. 16तुम्ही त्यांना जीवनाचे वचन सांगत असता, माझे शर्यतीत धावणे व्यर्थ झाले नाही असे मला दिसते, यासाठी की ख्रिस्ताच्या परत येण्याच्या दिवशी मला तुमचा अभिमान वाटावा. 17तुमच्या यज्ञार्पणासमवेत तसेच तुमच्या विश्वासाच्या सेवेसमवेत जरी मी अर्पिला गेलो तरी ते आनंदाने करतो आणि तुमच्या समवेत आनंदी बनतो. 18त्याच प्रकारे, तुम्हीसुद्धा आनंदी असावे, आणि तुमच्या आनंदात मला सहभागी करावे.

### तीमथ्यी व एपफ्रदीत यांच्याविषयी बातमी

19पण मला आशा आहे, प्रभु येशूच्या साहाय्याने मी लवकरच तीमथ्यीला तुमच्याकडे पाठवीन यासाठी की, तुमच्याविषयीच्या बातमीने मला उत्तेजन मिळावे. 20तोच एक आहे ज्याला पाठविण्याची माझी इच्छा आहे कारण माझ्यासारख्याच भावना असणारा दुसरा कोणी माझ्याजवळ नाही आणि त्याला तुमच्या कल्याणाची मनापासून कळकळ आहे. 21सर्व जण त्यांच्या हिताकडेच लक्ष देतात व ख्रिस्ताच्या हिताकडे लक्ष देत नाहीत. 22आणि तुम्हांला त्याचा स्वभाव माहीत आहे, सुवार्ता वाढविण्यासाठी जसे मुलगा पित्याची सेवा करतो तशी त्याने त्याच्या योग्यतेने माझ्याबरोबर सेवा केली आहे. 23त्याला तुमच्याकडे पाठविण्याविषयी मी आशा करीत आहे. माझ्याबाबतीत काय होते ते कळताच त्याला तुमच्याकडे पाठवीन. 24आणि माझा असा विश्वास आहे की, देवाच्या साहाय्याने मला स्वत:लासुद्धा तुमच्याकडे येणे लवकरच शक्य होईल.

25एपफ्रदीत, जो माझा बंधु आहे, सहकारी व सहशिपाई आहे, त्याला तुमच्याकडे पाठविण्याची आवश्यकता आहे, असे मला वाटले. तसेच तो तुमचा प्रतिनिधी आहे जो माझ्या गरजेच्या वेळी मला साहाय्य करतो. मी असे करण्याचे ठरविले आहे कारण तो तुम्हा सर्वांना भेटण्यास आतुर झाला आहे. 26मी त्याला पाठवितो कारण त्याला तुम्हांला फार भेटावेसे वाटते. तुम्ही तो आजारी असल्याचे जे ऐकले त्यामुळे त्याला काळजी वाटत आहे. 27तो खरोखरच आजारी होता, अगदी मरणाला टेकला होता, पण देवाने त्याच्यावर करुणा केली; त्याच्यावरच केली असे नाही, तर माझ्यावरही केली, यासाठी की, मला आणखी दु:ख होऊ नये. 28म्हणून, अधिक अधीरतेने, मी त्याला पाठवीत आहे. यासाठी की जेव्हा तुम्ही त्याला पाहाल तेव्हा पुन्हा एकदा तुम्ही आनंदी व्हाल आणि मी निश्चिंत असेन. 29म्हणून, प्रभूमध्ये त्याचे स्वागत करा आणि अशा लोकांचा सन्मान करा, कारण ख्रिस्ताच्या कामासाठी तो जवळजवळ मेला होता. 30त्याने त्याचे जीवन धोक्यात घातले, यासाठी की, माझी सेवा करण्यात तुमच्यात जी उणीव होती ती भरून काढावी.

## कोणत्याही गोष्टीपेक्षा ख्रिस्त अधिक महत्त्वाचा आहे

3 शेवटी, माझ्या बंधूंनो, प्रभूमध्ये आनंद करा. त्याच गोष्टी मी पुन्हा लिहिण्यास मला त्रासदायक वाटत नाहीत, आणि ते तुमच्यासाठी सुरक्षित आहे. 2“कुत्र्या” विषयी सावध असा! दुष्कर्मांविषयी सावध असा! शरीराला इजा करणाऱ्यांपासून सावध असा, 3कारण आम्हीच खरे सुंता झालेले लोक आहोत, आणि आम्ही जे देवाच्या आत्म्याने त्याची सेवा करतो ते आम्ही येशू ख्रिस्ताचा अभिमान बाळगतो आणि ऐहिक गोष्टींवर विश्वास ठेवीत नाही. 4जरी मला स्वत:ला जगिक गोष्टींवर विश्वास ठेवण्यास जागा आहे. जर दुसऱ्या कोणाला जगिक गोष्टीवर विश्वास ठेवण्यास कारण आहे असे वाटते. 5तर मला अधिक वाटते. मी जेव्हा आठ वर्षांचा होतो, तेव्हा माझी सुंता झाली. मी इस्राएल देशाचा आहे. बन्यामिन वंशाचा आहे, इब्री आईवडिलांपासून झालेला मी इब्री आहे. नियमशास्त्राच्या माझ्या दृष्टिकोनाबद्दल म्हणाल तर मी परूशी आहे. 6माझ्या आस्थेविषयी म्हणाल तर मी मंडळीचा छळ केला. नियमशास्त्राने ठरवून दिलेल्या नीतिमत्त्वाविषयी मी निर्दोष आहे. 7त्याऐवजी जो मला लाभ होता तो आता मी ख्रिस्तासाठी नुकसान असे समजतो. 8शिवाय माझ्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या विषयीच्या सर्वश्रेष्ठ ज्ञानामुळे मी इतर सर्व काही हानि समजतो. त्याच्यासाठी सर्व काही मी गमावलेले आहे. ख्रिस्ताला मिळविण्यासाठी मी सर्व काही कचरा समजतो. 9आणि त्याला शोधण्यासाठी माझे नीतिमत्त्व नसताही म्हणजे नियमशास्त्रावर आधारित नव्हे, परंतु नीतिमत्त्व जे ख्रिस्तावरील विश्वासाच्या द्वारे प्राप्त होते ते देवापासून प्राप्त होणारे आणि विश्वासावर आधारित आहे. 10मला ख्रिस्ताला जाणून घ्यायचे आहे आणि जेव्हा तो मरणातून पुन्हा उठला तेव्हा जे सामर्थ्य प्रगट झाले त्याचा अनुभव घ्यायचा आहे, मला त्याच्या दु:खसहनामध्ये सुद्धा त्याचा अनुभव घेण्यासाठी त्यात भाग घ्यायचा आहे आणि त्याच्या मरणाशी अनुरूप व्हायचे आहे. 11या आशेने की, मला मृतांमधून पुनरुत्थान मिळावे.

## ध्येय साध्य करण्यासाठी प्रयत्न

12हे असे नाही की मी अगोदरच बक्षिस मिळविले आहे किंवा अगोदरच परिपूर्ण झालो आहे. ज्या बक्षिसासाठी ख्रिस्त येशूने मला ताब्यात घेतले ते बक्षिस मिळविण्याचा मी प्रयत्न करतो. 13बंधूंनो, ते मी मिळविले असे मानीत नाही, परंतु एक गोष्ट आहे की, जी करण्याचा मी निश्चय करतो, जे भूतकाळात आहे ते मी विसरतो, आणि ते माझ्यापुढे आहे ते मिळविण्याचा प्रयत्न करतो. 14ख्रिस्त येशूमध्ये वरील पाचारण जे देवाचे बक्षीस त्या उद्दीष्टासाठी मी झटतो. 15तेव्हा आपण सर्व जे परिपक्व (प्रौढ) त्या आमची एकच प्रवृत्ती आहे आणि एखाद्या मुद्यावर तुम्ही वेगळा विचार केला तरी देव तुम्हांस तेही प्रकट करील. 16फक्त आपण ज्या सत्यापर्यंत पोहोंचलो त्याच्याच मागे चालत राहावे. 17बंधूंनो, माझे अनुकरण करण्यासाठी इतरांबरोबर सहभागी व्हा. आणि आम्ही जसे तुमच्यासमोर उदाहरणादाखल आहोत, त्याप्रमाणे जे चालतात त्यांच्याकडे लक्ष द्या. 18कारण यापूर्वी मी तुम्हांला जसे अनेक वेळा सांगितले व आताही पुन्हा रडत सांगतो, पुष्कळ जण असे आहेत की, जे ख्रिस्ताच्या वधस्तंभाच्या वैऱ्यासारखे वागतात. 19नाश हा त्यांचा शेवट, पोट हा त्यांचा देव आहे आणि त्यांच्या निर्लज्जपणामध्ये त्यांचे गौरव आहे ते फक्त ऐहिक गोष्टीविषयीच विचार करतात. 20आमचा स्वदेश स्वर्गात आहे, तेथून येणारा तारणारा प्रभु येशू ख्रिस्त याची आम्ही वाट पाहत आहोत. 21त्याच्या ज्या सामर्थ्याने तो सर्व काही आपल्या स्वाधीन करण्यास समर्थ आहे त्याने तो आपले शरीर बदलून टाकील. आणि त्याच्या वैभवी शरीरासारखे करील.

## काही गोष्टी करणे

4 म्हणून माझ्या प्रिय आणि भेटीस आतुर झालेल्या बंधूंनो, माझा आनंद आणि मुकुट असलेल्यांनो मी तुम्हांला सांगितल्याप्रमाणे प्रभूमध्ये स्थिर राहा. 2मी युवदीया आणि संतुखेला सुद्धा प्रभूमध्ये बहिणी या नात्याने एकच विचार करण्यासाठी उत्तेजन देत आहे. 3माझ्या विश्वासू सहकाऱ्यांनो, मी तुम्हाला सांगतो की, ज्या स्त्रियांनी माझ्याबरोबर सुवार्तेच्या प्रसारासाठी कष्ट घेतले आणि ज्यांची नावे जीवनाच्या पुस्तकात लिहिली आहेत त्यांना कृपा करून मदत करा.

4प्रभूमध्ये नेहमी आनंद करा. 5मी पुन्हा म्हणेन: आनंद करा! तुमची सौम्यता सर्व लोकांना समजावी. प्रभु जवळ आहे. 6कशाचीही काळजी करू नका, तर प्रत्येक परिस्थितीत प्रार्थना आणि विनंत्या उपकार मानून तुमच्या विनंत्या देवाला कळवा. 7जी शांति देवापासून येते, जी शांति सर्व मानवी समजबुद्धीच्या पलीकडे आहे, ती तुमचे अंत:करण व मन ख्रिस्त येशूमध्ये सुरक्षित ठेवील.

8शेवटी, बंधूंनो, जे काही सत्य आहे, जे काही उदात्त आहे, जे काही योग्य आहे, जे काही शुद्ध आहे, जे काही सुंदर आहे, जे काही प्रशंसनीय आहे, जर सद्‌गुण आहे, आणि जर काही स्तुति आहे, या गोष्टींनी तुमची मने भरून टाका. 9जे काही तुम्ही शिकला आहात, जे तुम्हांला मिळाले आहे व जे माझ्याकडून ऐकले आहे आणि जे मी करताना तुम्ही पाहिले आहे, त्या गोष्टी करीत राहा. आणि देव जो शांतीचा उगम आहे तो तुमच्याबरोबर राहील.

## फिलिप्पैच्या ख्रिस्ती लोकांचे पौल आभार मानतो

10मी प्रभूमध्ये खूपच आनंदित झालो कारण शेवटी तुमची माझ्याबद्दलची काळजी जागृत झाली. अर्थात तुम्ही नेहमीच माझी काळजी घेतली. परंतु ती दाखविण्याची संधी तुम्हांला मिळाली नाही. 11मी हे गरजेपोटी बोलतो

असे नाही कारण आहे त्या स्थितीत मी समाधानी राहण्याचे शिकलो आहे. 12गरजू स्थितीत किंवा सर्व विपुल असताना कसे राहायचे ते मी जाणतो. कोणत्याही वेळी आणि सर्व परिस्थितीत तृप्त राहण्याचे व भुकेले राहण्याचे, भरपूर बाळगण्याचे आणि अपूरेपणात राहाण्याचे अशा सर्व परिस्थितीत राहण्याचे रहस्य मी शिकलो आहे. 13जो ख्रिस्त मला सामर्थ्य देतो त्याच्या द्वारे मी सर्व परिस्थितीचा सामना करू शकतो.

14तरीही माझ्या संकटकाळात तुम्ही साहाय्य केलेत हे चांगले केले. 15तुम्हा फिलिप्पैकरांना माहीत आहे की, सुवार्ता सांगण्याच्या सुरुवातीच्या काळात जेव्हा मी मासेदोनिया सोडले, तेव्हा तुमच्याशिवाय कोणत्याही मंडळीने माझ्याशी देवाणघेवाण केली नाही. 16कारण जेव्हा मी थेस्सलनीकात होतो, तेव्हा बऱ्याचदा तुम्ही माझी गरज भागविण्यासाठी मदत पाठविली. 17मी तुमच्याकडून केवळ देणगीची अपेक्षा करतो असे नाही, उलट, तुमच्या हिशेबी अधिक फळवृद्धी व्हावी असे पाहतो. 18माझ्या गरजेपुरते माझ्याजवळ सर्व काही आहे आणि ते विपुल आहे. एपफ्रदीताच्या करवी ज्या गोष्टी तुम्ही पाठविल्या त्या मिळाल्यामुळे गरजेपेक्षा अधिक माझ्याजवळ आहे. ते मधुर सुगंधी अर्पण स्वीकारण्यास योग्य असा यज्ञ जो देवाला संतोष देणार असा आहे.

19आणि माझा देव तुमच्या सर्व गरजा ख्रिस्त येशूच्या ठायी असलेल्या त्याच्या गौरवी संपत्तीला साजेल अशा रीतीने पुरवील. 20आपला देव व पिता याला अनंतकाळ गौरव असो. आमेन.

21ख्रिस्त येशूमधील प्रत्येक संताला सलाम सांगा. माझ्याबरोबर जे बंधु आहेत ते तुम्हांला सलाम सांगतात. 22येथील सर्व संत विशेषेकरून कैसराच्या घरातील संत तुम्हांला सलाम सांगतात.

23प्रभु येशू ख्रिस्ताची कृपा तुमच्या आत्म्याबरोबर असो.

# पौलाचे कलस्सैकरांस पत्र

1 देवाच्या इच्छेने येशू ख्रिस्ताचा प्रेषित पौल आणि आमचा
बंधु तीमथ्यी याजकडून,
2ख्रिस्तामध्ये आमचे जे विश्वासू बंधु आहेत, त्या कलस्सै
येथील देवाच्या पवित्र लोकांना: देव, आमचा पिता
याजकडून तुम्हास कृपा व शांति असो.
3आम्ही जेव्हा तुमच्यासाठी प्रार्थना करतो, तेव्हा आम्ही
नेहमी देवाचे, जो आमच्या प्रभू येशू ख्रिस्ताचा पिता आहे
त्याचे, आभार मानतो. 4कारण आम्ही ख्रिस्त येशूवरील
तुमच्या विश्वासाविषयी आणि देवाच्या सर्व लोकांविषयी
तुम्हाला वाटत असलेल्या प्रेमाविषयी ऐकले आहे. 5कारण
स्वर्गामध्ये जी आशा तुमच्यासाठी राखून ठेवली आहे.
तुम्ही पहिल्यांदा त्या आशेविषयी खऱ्या संदेशाद्वारे म्हणजेच
सुवार्तेद्वारे ऐकले. 6जी सुवार्ता तुमच्याकडे आली आहे,
संपूर्ण जगातून त्या सुवार्तेचे फळ मिळत आहे व ती वाढत
आहे. ज्याप्रमाणे ती तुमच्यामध्येसुद्धा तशीच वाढत होती व
फळ देत होती, ज्या दिवसापासून तुम्ही देवाच्या कृपेविषयी
ऐकले व ती खरोखर काय आहे हे समजून घेतले तेव्हापासून
ती कार्य करीत आहे.
7तुम्ही ते, आमचा सहसेवक एपफ्रास, जो आमच्या
वतीने ख्रिस्ताचा विश्वासू सेवक आहे, त्याच्याकडून शिकून
घेतले आहे. 8त्याने आम्हांला तुमचे प्रेम आत्म्यापासून
आहे त्याविषयीही सांगितले. 9या कारणासाठी, आम्हीसुद्धा
तुमच्याविषयी ज्या दिवसापासून ऐकले, तेव्हापासून
तुमच्यासाठी प्रार्थना करण्याचे थांबविले नाही. आम्ही
प्रार्थना करीत आहोत की:

तुम्ही देवाच्या इच्छेच्या सर्व प्रकारच्या ज्ञानाने आणि
आध्यात्मिक समंजसपणाने भरले जावे.
10यासाठी की, त्याला योग्य असे तुम्ही चालावे. आणि
सर्व बाबतीत त्याला आनंद द्यावा; आणि तुम्ही देवाच्या
ज्ञानात वाढावे;
11त्याच्या गौरवी सामर्थ्यात त्याच्या महान सामर्थ्यामुळे
समर्थ बनण्यासाठी तुम्हांला सहनशीलता व धैर्य प्राप्त व्हावे.

12आणि आनंदाने पित्याला धन्यवाद द्यावेत, ज्याने
तुम्हाला प्रकाशात राहणाऱ्या देवाच्या लोकांचे जे वतन
आहे त्यात वाटा मिळण्यासाठी पात्र केले. 13देवाने
अंधाराच्या अधिपत्यापासून आमची सुटका केली आणि
त्याच्या प्रिय पुत्राच्या राज्यात आणले. 14पुत्राद्वारे आम्हांला
आमच्या पापांची क्षमा मिळाली.

### जेव्हा आम्ही ख्रिस्ताकडे पाहतो तेव्हा आम्ही देवाला पाहतो

15तो अदृश्य देवाची प्रतिमा आहे आणि निर्माण केलेल्या
सर्व गोष्टीत तो प्रथम आहे. 16कारण स्वर्गात आणि पृथ्वीवर
सर्व काही त्याच्या सामर्थ्याने निर्माण केले गेले. जे काही
दृश्य आहे आणि जे काही अदृश्य आहे, सिंहासने असोत
किंवा सामर्थ्य असो, सत्ताधीश असोत किंवा अधिपती
असोत सर्व काही त्याच्याद्वारे निर्माण केले गेले. 17सर्व
गोष्टी निर्माण होण्याच्या अगोदरपासून तो अस्तित्वात आहे.
सर्व गोष्टी त्याच्याद्वारे चालतात. 18आणि तो शरीराचा
म्हणजे मंडळीचा मस्तक आहे. तो प्रारंभ आहे. मृतांमधून
पुनरुत्थान पावलेल्यांमध्ये तो प्रथम आहे. यासाठी की
प्रत्येक गोष्टीत त्याला प्रथम स्थान मिळावे. 19कारण
देवाने त्याच्या सर्व पूर्णतेत त्याच्यामध्ये राहण्याचे निवडले.
20आणि ख्रिस्ताद्वारे सर्व गोष्टींचा स्वत:शी म्हणजे त्या
पृथ्वीवरील गोष्टी असोत, किंवा स्वर्गातील गोष्टी असोत
समेट करण्याचे ठरविले. ख्रिस्ताने जे रक्त वधस्तंभावर
सांडले त्याद्वारे देवाने शांति केली.
21एके काळी तुम्ही परके होता आणि तुमच्या विचारांमुळे
आणि तुमच्या दुष्ट कृत्यांमुळे तुम्ही देवाचे शत्रू होता.
22परंतु आता, ख्रिस्ताच्या शारीरिक देहाने व त्याच्या
मरणाने देवाने तुमचा त्याच्याशी समेट घडवून आणला
आहे यासाठी की, त्याच्यासमोर पवित्र, निष्कलंक आणि
दोषविरहीत असे सादर करावे. 23तुम्ही तुमच्या विश्वासात
दृढ व स्थिर असावे आणि जी सुवार्ता तुम्ही ऐकली आहे
तिच्याद्वारे तुम्हांला दिलेल्या आशेपासून दूर जाऊ नये,
ज्याचा मी पौल सेवक झालो.

### मंडळीकरिता पौलाचे कार्य

24आता, तुमच्यासाठी मला झालेल्या दु:खात मला आनंद
वाटतो आणि माझ्या स्वत:च्या शरीरात मी ख्रिस्ताचे त्याच्या
देहाचे म्हणजे मंडळीच्या वतीने ख्रिस्ताचे जे दु:ख कमी
पडत आहे ते मी पूर्ण करीत आहे. 25देवाच्या आज्ञेप्रमाणे
मी एक त्यांच्यापैकी सेवक झालो. ती आज्ञा तुमचा फायदा

व्हावा म्हणून दिली होती. ती म्हणजे देवाचा संदेश पूर्णपणे गाजवावा. 26हा संदेश एक रहस्य आहे, जे अनेक युगांपासून आणि अनेक पिढ्यांपासून लपवून ठेवले होते. परंतु आता ते देवाने त्याच्या लोकांना माहीत करून दिले आहे. 27देवाला त्याच्या लोकांना माहीत करून द्यायचे होते की, विदेशी लोकांमध्ये या वैभवी रहस्याची संपत्ती ख्रिस्त येशू जो तुम्हांमध्ये आहे आणि जो देवाच्या गौरवामध्ये सहभागी होण्याची आमची आशा आहे. 28आम्ही त्याची घोषणा करतो. प्रत्येक व्यक्तीला सूचना देतो, व प्रत्येक व्यक्तीला शक्य ते ज्ञानाने शिकविण्याचा प्रयत्न करतो यासाठी की, आम्हांला प्रत्येक व्यक्ति ख्रिस्तामध्ये पूर्ण अशी देवाला सादर करता यावी. 29या उद्देशाने मी झगडत आहे. ख्रिस्ताच्या शक्तीच्या उपयोगाने, जी माझ्यामध्ये सामर्थ्यशाली रीतीने कार्य करीत आहे.

2 कारण माझी अशी इच्छा आहे की, तुमच्यावतीने जो महान झगडा मी करीत आहे आणि जे लावादिकीयात आहेत त्यांच्या वतीने आणि ज्यांची माझी व्यक्तिश: भेट झाली नाही अशा सर्वांसाठी जो महान झगडा मी केला तो तुम्हांला माहीत व्हावा. 2यासाठी की, त्यांच्या मनाला समाधान वाटावे. आणि ते प्रेमाने एकत्र जोडले जावेत, आणि खात्रीची सर्व संपत्ती जी समजबुद्धीने येते ती मिळावी. तसेच देवाचे रहस्य जो ख्रिस्त त्याच्याविषयी पूर्ण ज्ञान मिळावे. 3ज्यामध्ये ज्ञानाची आणि शहाणपणाची सर्व संपत्ती लपलेली आहे.

4मी हे म्हणत आहे ते यासाठी की, तुम्हांला दिसायला चांगल्या पण खोट्या कल्पनांनी फसवू नये. 5कारण मी जरी शरीराने तुम्हांपासून दूर असलो तरीही आत्म्यात मी तुम्हाबरोबर आहे आणि तुमच्या जीवनातील नीटनेटकेपणा आणि ख्रिस्तावरील विश्वासासाठी खंबीरता पाहून मी आनंदीत आहे.

## ख्रिस्तात जगत राहा

6म्हणून ज्याप्रमाणे तुम्हांला दिलेल्या शिक्षणाद्वारे तुम्हाला येशू ख्रिस्त व प्रभु म्हणून मिळाला, तसे त्याच्यामध्ये एक होत चला. 7त्याच्यामध्ये मुळावलेले, त्याच्यावर उभारलेले, तुमच्या विश्वासात दृढ झालेले असे व्हा आणि देवाची उपकारस्तुति करीत ओसंडून जा.

8मूलभूत शिक्षण जे ख्रिस्तापासून नाही व मनुष्यांनी हस्तांतरित केले आहे त्या मानवी तत्त्वज्ञानाने व पोकळ फसव्या कल्पनांनी तुम्हांला कोणीही कैद्यासारखे घेऊन जाऊ नये म्हणून सावध असा. 9कारण देवाचे पूर्णत्व त्याच्यात शरीरात राहते. 10आणि तो जो प्रत्येक सत्तेच्या व अधिकाराच्या उच्चस्थानी आहे, त्याच्यामध्ये तुम्ही पूर्ण झाले आहात.

11मानवी हातांनी न केलेल्या सुंतेने तुम्हीसुद्धा त्याच्यामध्ये सुंता झालेले आहात. ख्रिस्ताने केलेल्या सुंतेद्वारे तुम्ही तुमच्या पापाच्या सामर्थ्यापासून मुक्त झाला होता. 12हे असेच घडले जेव्हा तुम्ही बाप्तिस्मा करण्याच्या कृतीमध्ये त्याच्याबरोबर पुरले गेला आणि तुम्ही त्याच्यामध्ये देवाच्या कृतीमध्ये तुमच्या विश्वासाद्वारे उठविले गेला, ज्याने (देवाने) ख्रिस्ताला मेलेल्यांतून उठविले. 13तुमच्या पापांमुळे आणि तुमची सुंता न झाल्याने तुम्ही आध्यात्मिकरीत्या मृत झाला होता, परंतु देवाने ख्रिस्ताबरोबर तुम्हाला जीवन दिले आणि त्याने आमच्या सर्व पापांची क्षमा केली. 14त्याने आमच्याविरुद्ध असलेल्या आरोपपत्राचा निवाडा असलेला दस्तऐवज आणि ज्यात आम्हांला विरोध होता, तो त्याने आमच्यातून काढून घेतला, आणि वधस्तंभावर खिळ्यांनी ठोकून रद्द केला. 15त्याने स्वत: वधस्तंभाद्वारे सत्ता आणि अधिकार हाणून पाडून त्यांवर विजय मिळविला आहे.

## मनुष्यांनी केलेल नियम पाळू नका

16म्हणून कोणीही तुमच्यावर खाण्याविषयी आणि पिण्याविषयी किंवा मेजवान्यांविषयी, नवचंद्रोउत्सवाविषयी किंवा शब्बाथ दिवसांविषयी टीका करू नये. 17कारण ते फक्त येणाऱ्या गोष्टींची सावली आहेत. परंतु खरे शरीर ज्यामुळे सावली पडते ते तर ख्रिस्ताचे आहे. 18कोणीही जो स्वत:चा अपमान, नम्रतेची कृत्ये व देवदूतांची उपासना यात समाधान मानून घेतो, त्याने तुम्हाला बक्षिसासाठी अपात्र ठरवू नये. असा मनुष्य नेहमी हे सर्व दृष्टान्त पाहिल्यासारखे बोलतो आणि कोणतेही कारण नसता त्याच्या आध्यात्मिक नसलेल्या अंत:करणामुळे गर्वाने फुगलेला असतो. 19आणि असा मनुष्य ख्रिस्त जो मस्तक त्याला धरीत नाही. संपूर्ण शरीर त्याच्या अस्थिबंधाचे स्नायू, स्नायूंनी आधार दिलेले आणि एकत्रित धरल्याने देवापासून होणारी वाढ यात वाढते त्याबद्दल त्याला धन्यवाद असो. 20जर तुम्ही ख्रिस्ताबरोबर मेला आहात व या जगाच्या प्राथमिक शिक्षणापासून मुक्त झाला आहात, तर मग का तुम्ही या जगाचे असल्यासारखे त्यांच्या नियमांच्या अधीन राहाता 21"याला स्पर्श करू नका!" "त्याची चव पाहू नका!" 22या सर्व गोष्टी त्यांच्या वापराबरोबर नाहीशा होणार आहेत. अशा नियमांच्या अधीन होताना, तुम्ही मानवी नियम व शिकवणूक यांचे पालन करता. 23खरोखर, मनुष्यांनी केलेला धर्म, स्वत:चा अपमान, नम्रतेची कृत्ये, शरीराचा छळ, या विषयीच्या ज्ञानाबद्दल त्यांची कीर्ति आहे, परंतु शरीराच्या समाधानाविरुद्ध लढताना ते काही किंमतीचे नाहीत.

## ख्रिस्तातील तुमचे नवे जीवन

3 म्हणून जसे तुम्हांला ख्रिस्ताबरोबर मेलेल्यामधून उठविले गेले आहे तर, स्वर्गातील म्हणजे ज्या वरील गोष्टी आहेत त्यासाठी प्रयत्न करा. जेथे ख्रिस्त देवाच्या उजव्या हाताला बसलेला आहे. 2ज्या वरील (स्वर्गातील) गोष्टी आहेत त्याबद्दलचा विचार करा. ज्या गोष्टी

पृथ्वीवरच्या आहेत त्यांचा विचार करू नका. 3कारण
तुम्ही मेलेले आहात आणि तुमचे नवे जीवन देवामध्ये
ख्रिस्ताबरोबर लपलेले आहे. 4जेव्हा ख्रिस्त, जो आमचे
जीवन आहे, त्याच्या दुसऱ्या येण्याच्या वेळेस प्रगट होईल.
तेव्हा तुम्हीही त्याच्याबरोबर गौरवात प्रकट व्हाल.

5म्हणून तुमच्यामध्ये पृथ्वीतलावरील जे काही आहे ते
सर्व जिवे मारा. जारकर्म, अशुद्धता, लोभ, दुष्ट इच्छा,
अधाशीपणा, जी एक प्रकारची मूर्तिपूजा आहे. 6कारण या
गोष्टींमुळे देवाचा राग ओढवणार आहे.* 7तुम्हीसुद्धा असेच
जीवन जगत होता जेव्हा तुम्ही अशा गोष्टी करीत होता,

8पण आता, तुम्ही या सर्व गोष्टी बाजूला केल्या पाहिजेत:
राग, क्रोध, दुष्टता, निंदा आणि तुमच्या मुखातील लज्जास्पद
बोलणे, या सर्व गोष्टी तुम्ही दूर केल्याच पाहिजेत.
9एकमेकाशी लबाडी करू नका. कारण तुम्ही जुना मनुष्य
त्याच्या कृतीसह काढून टाकला आहे. 10आणि तुम्ही
नवीन मनुष्य धारण केला आहे. हे नवे रूप त्याच्या
निर्माणकर्त्याच्या प्रतिमेप्रमाणे सतत नवे होत जाते. यासाठी
की या नव्या मनुष्याला देवाचे पूर्ण ज्ञान मिळावे. 11परिणाम
म्हणून यहूदी व विदेशी असा कोणताही फरक नाही.
एखाद्याची सुंता झालेला किंवा एखाद्याची सुंता न झालेला,
बेताल, व असंस्कृत, गुलाम आणि स्वतंत्र मनुष्य असा
कोणताही फरक नाही. पण ख्रिस्त हाच सर्व काही आहे
आणि तो सर्व विश्वासणाऱ्यात आहे.

12म्हणून, जसे देवाचे निवडलेले लोक जे पवित्र आहेत,
तसे करुणा, दयाळूपणा, नम्रता, सौम्यता, आणि धीर हे
परिधान करावे. 13एकमेकांचे सहन करा. जशी प्रभूने
तुम्हांला क्षमा केली तशी एखाद्याविरुद्ध तक्रार असेल तर
एकमेकांना क्षमा करा. 14या सर्वांवर प्रीतीचे वस्त्र परिधान
करा. जे त्या सर्वांना एकत्र ठेवते आणि त्यांना परिपूर्ण
करते. 15आणि ख्रिस्ताची शांति जिच्यासाठी तुम्ही जे एका
देहातील लोक त्या तुम्हांला बोलाविले होते ती तुमच्या
अंत:करणावर राज्य करो आणि नेहमी उपकार मानणारे
व्हा. 16ख्रिस्ताचा संदेश तुमच्यामध्ये त्याच्या सर्व वैभवाने
राहावा. एकमेकांना महान असा शहाणपणाने शिकवा व
बोध करा. स्तोत्रे, व गीते गा, आणि आध्यात्मिक गीते
गाऊन उपकारस्तुतीसह आपल्या अंत:करणात देवाला
गीते गा. 17आणि प्रत्येक गोष्ट जी तुम्ही बोलता किंवा
करता ते प्रभु येशूच्या नावात करावे. यामुळे तुम्ही
देवपित्याचे त्याच्याद्वारे आभार मानता.

## लोकांबरोबर तुमचे जीवन

18पत्नींनो, जसे प्रभूमध्ये योग्य आहे तसे तुम्ही आपल्या
पतींच्या अधीन राहा.

19पतींनो, आपल्या पत्नीवर प्रेम करा आणि
त्यांच्याबरोबर कठीणतेने वागू नका.

20मुलांनो, सर्व गोष्टीत आपल्या आईवडिलांची आज्ञा
पाळा. कारण प्रभूच्या अनुयायांचे असे वागणे देवाला आनंद
देणारे आहे.

21वडिलांनो, आपल्या मुलाला चिडवू नका. म्हणजे ते
निराश होणार नाहीत.

22गुलामांनो, तुमच्या जगिक मालकाच्या सर्व आज्ञा
पाळा आणि मनुष्याला संतोषविणाऱ्या, डोळ्यांनी देखरेख
करण्यासाठी नव्हे तर त्याऐवजी पूर्ण मनाने प्रभूला भिऊन
आज्ञा पाळा. कारण तुम्ही प्रभूचा आदर करता. 23तुमच्या
अंत:करणापासून काम करा. जणू काय तुम्ही प्रभूसाठी
काम करीत आहात, मनुष्यांसाठी नव्हे असे काम करा.
24लक्षात ठेवा, प्रभू तुम्हांला तुमच्या स्वर्गीय वारशाचे
बक्षीस देईल. ख्रिस्त जो तुमचा खरा धनी त्याची सेवा
करीत राहा. 25कारण जो कोणी वाईट करतो, त्याचेसुद्धा
तसेच होईल. देव असेच वागवील कारण त्याच्याकडे
पक्षपात नाही.

4 मालकांनो, आपल्या गुलामांना जे न्याय्य व योग्य ते
द्या.

## पौल ख्रिस्ती लोकांना काही गोष्टी करावयास सांगतो

2नेहमी प्रार्थना करीत राहा. उपकारस्तुति करीत
त्यामध्ये दक्ष राहा. 3त्याचवेळी आमच्यासाठीसुद्धा प्रार्थना
करा, यासाठी की, ख्रिस्ताविषयीचे जे रहस्य देवाने आम्हांला
कळविले, त्याविषयी बोलण्यासाठी, त्याचा संदेश
ऐकण्यासाठी, देवाने आमच्यासाठी दार उघडावे. कारण
त्या उपदेश करण्याने मी बंधनात आहे. 4ते रहस्य ज्या
रीतीने मी सांगावयास पाहिजे, त्याप्रकारे सांगण्यासाठी
माझ्यासाठी प्रार्थना करा.

5बाहेरच्या लोकांबरोबर सुज्ञतेने वागा आणि प्रत्येक
संधीचा चांगला फायदा करून घ्या. 6तुमचे बोलणे नेहमी
कृपायुक्त आणि मिठाने रुचकर केल्यासारखे असावे.
यासाठी की प्रत्येक मनुष्याला कसे उत्तर द्यावे हे तुम्हांला
कळावे.

## पौलाबरोबर असलेल्या लोकांविषयीची बातमी

7तुखिक, प्रिय बंधु, विश्वासू सेवक आणि प्रभूमधील
सहकारी तो तुम्हांला माझ्याविषयी सगळी माहिती देईल.
8त्याला मी याच कारणाने पाठवीत आहे की,
आमच्याविषयीची बातमी तुम्हांला कळावी आणि तुमची
अंत:करणे उत्तेजित व्हावीत. 9मी त्याला आमचा विश्वासू
व प्रिय बंधु अनेसिम, जो तुमच्यातील एक आहे,
याच्याबरोबर पाठवीत आहे. ते तुम्हांला येथे काय घडत
आहे ते सांगतील.

10अरिस्तार्ख, माझ्या सोबतीचा कैदी, तुम्हाला सलाम
सांगतो. त्याचप्रमाणे बर्णबाचा चुलत भाऊ मार्क

---

**कारण ... आहे** काही प्राचीन पुढील शब्द जोडतात, जे आज्ञा पाळीत नाहीत त्याजवर.

ज्याच्याविषयी तुम्हाला अगोदरच माहिती मिळाली आहे,
तो जर तुमच्याकडे आला तर त्याचे स्वागत करा. 11येशू
ज्याला युस्त म्हणतात तोसुद्धा तुम्हाला सलाम सांगतो.
यहूदी विश्वासणाऱ्यांपैकी फक्त हेच काय ते देवाच्या
राज्याचा प्रसार करण्यात माझ्याबरोबर काम करीत आहेत.
ते मला आधीच फार मोठा आधार आहेत.

12एपफ्राससुद्धा तुम्हाला सलाम सांगतो, तो तुमच्यापैकीच
ख्रिस्त येशूचा सेवक आहे. तुम्ही आध्यात्मिकदृष्ट्या
परिपक्व वाढलेले आणि देवाच्या इच्छेप्रमाणे करण्यात
तुम्ही पूर्णपणे गुंतलेले असावे. 13जे लवादिकीयात व
हेरापल्लीत राहत आहेत त्यांच्यासाठी तो फार श्रम करीत
आहे. याचा मी साक्षी आहे. 14प्रिय वैद्य लूक आणि देमास
तुम्हांला सलाम सांगतात. 15लावदिकीयात राहणारे बंधु
आणि नेफा आणि तिच्या घरी जमणारी मंडळी यांना सलाम
सांगा. 16आणि जेव्हा तुम्हाला हे पत्र वाचून दाखविले
जाईल, तेव्हा ते लावदकीयाच्या मंडळीतसुद्धा वाचले जाते
की नाही ते पाहा आणि तू सुध्दा माझे पत्र वाच. 17आणि
अर्खिप्पाला सांगा, “जी सेवा तुला प्रभूमध्ये मिळाली आहे
ती पुढे चालू ठेव.”

18मी, पौल, हा सलाम माझ्या स्वत:च्या हस्ताक्षरात
लिहितो. मी तुरुंगात आहे हे लक्षात ठेवा. देवाची कृपा
तुम्हांबरोबर असो.

# पौलाचे थेस्सलनीकाकरांस पहिले पत्र

1 पौल, सिल्वान आणि तीमथ्य यांच्या द्वारे देव जो पिता
त्यामध्ये तसेच प्रभु येशू ख्रिस्तामध्ये दृढ असलेल्या
थेस्सलनीकाच्या मंडळीस, देवाची कृपा व शांति लाभो.

### थेस्सलनीकाकरांचा विश्वास आणि जीवन

2आम्ही नेहमीच प्रार्थनांमध्ये तुमची आठवण करून
तुम्हा सर्वांसाठी देवाचे आभार मानतो. 3आम्ही आमचा
देव व पित्यासमोर तुमचे विश्वासाचे कार्य, तुम्ही प्रेमाने
केलेले श्रम, आणि आपल्या प्रभु येशू ख्रिस्तावरील दृढ
आशेने सोशिकपणे धरलेला धीर याची सतत आठवण
करतो. 4माझ्या बंधूंनो, देवाने प्रीतीत केलेली तुमची निवड
ही आम्हाला माहीत आहे. 5कारण आमची सुवार्ता
तुमच्याकडे केवळ शब्दांनी आली नाही तर पवित्र आत्म्याने
व पूर्ण खात्रीने आली हे तुम्हांला माहीत आहे, आम्ही
तुमच्यामध्ये कसे राहिलो तुम्हांला माहीत आहे. ते तुमच्या
फायद्यासाठी होते. 6आणि तुम्ही आमचे व प्रभूचे अनुकरण
करणारे झाला, पवित्र आत्म्याकडून मिळणाऱ्या आनंदात
तुम्ही मोठ्या कष्टाने संदेश स्वीकारलात. 7त्याचा परिणाम
म्हणजे तुम्ही सर्व विश्वासणाऱ्यासाठी जे मासेदोनियात व
अखियात होते त्यांच्यासाठी आदर्श असे झालात 8कारण
तुमच्याकडून गाजविण्यात आलेला संदेश केवळ
मासेदोनिया आणि अखियातच ऐकला गेला असे नाही तर
तुमचा देवावरील विश्वास सगळीकडे माहीत झाला आहे.
म्हणून आम्हांला काही सांगण्याची गरज नाही. 9कारण ते
स्वत:च आमच्याविषयी सांगत आहेत म्हणजे कशा प्रकारे
तुम्ही आमचे स्वागत केले तसेच तुम्ही मूर्तिपासून देवाकडे
कसे वळलात व खऱ्या आणि जिवंत देवाची सेवा
करण्यासाठी कसे वळलात. 10आणि आता ज्याला देवाने
मेलेल्यांतून उठविले त्या त्याच्या स्वर्गातून येणाऱ्या पुत्राची
तुम्ही वाट पाहत आहात. तोच येशू देवाच्या येणाऱ्या
क्रोधापासून आपले रक्षण करतो.

### पौलाचे थेस्सलनीकातील कार्य

2 बंधूंनो, तुमचे तुम्हांलाच माहीत आहे की, आम्ही
तुम्हाला दिलेली भेट व्यर्थ झाली नाही. 2पण तुम्हाला
माहीत आहे की, आम्हांला मागे फिलिप्पै येथे त्रास आणि
अपमान सहन करावा लागला. पण देवाच्या साहाय्याने
मोठा विरोध झाला असताना देवाकडून येणारी सुवार्ता
सांगण्यासाठी आम्हांला धैर्य प्राप्त झाले. 3खरोखर आमची
घोषणा आमच्याकडून झालेल्या चुकांमुळे किंवा अशुद्ध
हेतूने किंवा भ्रमाने येत नाही. 4उलट, ज्याप्रमाणे देवाने
पसंत केलेले, सुवार्तेचे कार्य सोपविलेले असे आम्ही आहोत
म्हणून आम्ही बोलतो. आम्ही मनुष्याला संतुष्ट
करण्यासाठी नाही, तर देवाला, जो आमच्या उद्दिष्टांची
परीक्षा घेतो 5खरोखर, तुम्हांला माहीत आहे की, आम्ही
तुमच्यासमोर खुशामत करणाऱ्या शब्दांनी बोललो नाही,
किंवा आमचे उपदेश करणे हे आमचा लोभ झाकण्याचे
खोटे कारण नव्हते, कारण देव आमचा साक्षी आहे!
6किंवा आम्ही लोकांकडून, तुमच्याकडून किंवा दुसऱ्या
कोणाकडून सन्मान मिळावा म्हणून अपेक्षा करीत नव्हतो.
ख्रिस्ताचे प्रेषित या नात्याने, जरी आम्हांला आमचा
अधिकार तुमच्यावर दाखविता आला असता,

7तरीही आम्ही तुमच्यामध्ये आई जशी प्रेमाने तिच्या
मुलाला स्वत:चे दूध पाजते आणि काळजी घेते, तसे आम्ही
तुमच्यात सौम्य होतो.* 8कारण आम्हाला तुमच्याविषयी
इतके प्रेम वाटले की, आम्ही तुमच्याबरोबर देवाकडून
येणारी सुवार्ताच नव्हे तर आमचे स्वत:चे जीवनसुद्धा देण्यास
तयार होतो. याचे कारण म्हणजे, तुम्ही आमच्यासाठी प्रिय
झाला होता. 9बंधूंनो, आम्ही देवाकडून आलेली सुवार्ता
सांगत असताना, तुम्हाला आठवत असेल की आम्ही
रात्रंदिवस किती कष्ट केले. आमचे कष्ट आणि श्रम
तुम्ही जाणता ते यासाठी केले की, तुम्हा कोणावरही भार
पडू नये. 10तुम्ही साक्षी आहात आणि देवसुद्धा साक्षी आहे
की, आम्ही किती धार्मिकतेने, न्यायाने आणि निर्दोष रीतीने
तुम्हा विश्वासणाऱ्यांबरोबर वागलो. 11आणि तुम्हाला हे
चांगले माहीत आहे की, जसा पिता आपल्या मुलांना
वागवितो तसे आम्ही तुम्हातील प्रत्येकाला वागविले आहे.
12अशा प्रकारे आम्ही तुम्हांला उत्तेजन दिले, सांत्वन केले.
आणि तुम्हांला साक्ष दिली की, देवाला आवडेल अशा
प्रकारे वागा. जो त्याच्या राज्यात व गौरवात तुम्हाला
बोलावितो.

13आणि, या कारणासाठी आम्हीसुद्धा देवाचे सातत्याने
आभार मानतो, कारण जेव्हा तुम्ही आमच्याकडून देवाचा

---

**आम्ही ... होतो** पुष्कळ जुन्या प्रतीत "आम्ही तुमच्यामते लहान
बालके असे झालो." असे लिहिले आहे.

संदेश ऐकला, तेव्हा तुम्ही तो मनुष्याकडून आलेला म्हणून
स्वीकारला नाही, तर देवापासून आलेला जसा खरा होता
तसाच स्वीकारला. देवाचा संदेश, जो तुम्हा विश्वास
ऱ्यांच्यामध्ये सुद्धा कार्य करीत आहे. 14कारण बंधूनो,
तुम्ही येशूमध्ये देवाच्या ज्या मंडळ्या यहूदीयात आहेत
त्याचे अनुकरण करणारे झाला आहात, कारण त्यांनी
यहूद्यांच्या हातून जसे दु:ख सोसले, तसेच तुम्ही तुमच्या
देशबांधवांकडून दु:ख सोसले. 15त्यांनी प्रभु येशूला आणि
संदेष्ट्यांना मारले, त्यांनी आम्हांला बाहेर हाकलून लावले,
ते देवाला संतोष देत नाहीत आणि ते सर्व लोकांच्या
विरुद्ध आहेत. 16यहूदीतर लोकांचे तारण होण्यासाठी आम्ही
त्यांच्याशी बोलायला हवे, परंतु ते आम्हांला मना करून
एक प्रकारे पापच करीत आहेत. ते या पापाद्वारे जे ते
नेहमी करीत आले आहेत आपल्या पापाचे माप भरत
आले आहेत. आणि आता शेवटी आणि पूर्णतेने देवाचा
क्रोध त्यांच्यावर ओढवला आहे.

### पौलाची त्यांना पुन्हा भेटण्याची इच्छा

17बंधूंनो, आमच्यासाठी, आम्ही तुमच्यापासून थोड्या
वेळासाठी वेगळे झालो होतो. आम्ही शरीराने वेगळे झालो
होतो, विचाराने नाही आणि आम्ही तुम्हाला भेटण्यासाठी
फार अधीर झालो होतो. आणि तुम्हाला भेटण्याची फार
इच्छा होती. 18होय, तुमची भेट घेण्याचा खरोखर आम्ही
प्रयत्न केला होता. खरोखर मी पौलाने एकदा दोनदा
प्रयत्न केला परंतु सैतानाने असे करण्यापासून आम्हाला
परावृत्त केले. 19शेवटी, जेव्हा आपला प्रभु येशू दुसऱ्यांदा
येईल, तेव्हा त्याच्यासमोर उभे राहू तेव्हा आमची आशा,
किंवा आनंद किंवा मुकुट काय असेल, ज्याचा आम्हांला
अभिमान वाटेल? ते तुम्हीच नाही का? 20होय, तुम्ही
आमचा गौरव व आनंद आहात!

3 म्हणून, आम्हाला अधिक वाट पाहणे शक्य नसल्याने,
आम्ही अथेन्स येथेच राहण्याचे ठरविले. 2आणि
आम्ही तीमथ्याला पाठविले. जो आमचा भाऊ आणि
देवाच्या कामाकरीता ख्रिस्ताच्या सुवार्तेची घोषणा
करण्याकरीता सहकारी असा आहे, आम्ही त्याला तुम्हाला
दृढ करण्यासाठी आणि तुमच्याविषयीच्या विश्वासात
तुम्हाला उत्तेजन देण्यासाठी पाठविले आहे. 3यासाठी की,
सध्या होणाऱ्या छळामुळे तुम्ही कोणी अस्वस्थ होऊ नये.
कारण तुम्हाला स्वत:लाच माहीत आहे की, यासाठीच
आमची दैवी नेमणूक झाली आहे. 4खरे तर जेव्हा आम्ही
तुमच्याबरोबर होतो तेव्हा आम्ही तुम्हांला अगोदरपासूनच
सातत्याने सांगत होतो की, आपला छळ होणार आहे आणि
तुम्हांला माहीत आहे की, नेमके तसेच घडले आहे. 5म्हणून
मी अधिक काळ वाट पाहू शकत नसल्याने तुमच्या
विश्वासाविषयी माहिती करून घेण्याविषयी तीमथ्याला
पाठविले. कारण मोहात टाकणाऱ्याने तुम्हाला मोहात
टाकले असेल आणि आमचे श्रम व्यर्थ गेले असतील
अशी मला भीति वाटत होती.

6पण तीमथ्य आताच तुमच्याकडून परत आला आहे.
आणि त्याने आम्हांला तुमचा विश्वास व प्रीति याविषयी
चांगली बातमी सांगितली आहे. त्याने आम्हाला सांगितले
की, तुम्ही नेहमीच आमच्याविषयीच्या चांगल्या आठवणी
काढता आणि ज्याप्रमाणे आम्ही तुम्हांला भेटण्यासाठी आतुर
झालो आहोत, तसे तुम्हीही झाला आहात. 7म्हणून आमच्या
सर्व अडचणीत व त्रासात बंधूंनो, तुमच्याविषयी आम्ही
उत्तेजित झालो याला कारण म्हणजे तुमचा विश्वास. 8होय
आम्हाला माहीत आहे तुम्ही प्रभूमध्ये भक्कमपणे उभे आहात
आणि ही गोष्ट आमच्यासाठी जीवनदायी श्वास आहे.
9तुमच्यामुळे आमच्या देवासमक्ष ज्या सर्व आनंदाचा अनुभव
आम्ही घेत आहोत त्याबद्दलचे देवाकडे तुमच्यासाठी आम्ही
पुरेसे आभार कसे मानायचे? 10दिवस आणि रात्र आम्ही
कळकळीने प्रार्थना करीत आहोत की, आम्हाला तुमची
व्यक्तिश: भेट घेणे शक्य व्हावे आणि अजुनही तुमच्या
विश्वासात जी उणीव आहे ती पुरवावी.

11आता देव स्वत: आमचा पिता आहे आणि आमचा
प्रभु येशू ख्रिस्त तो आम्हांला तुमच्याकडे येण्याचा मार्ग
दाखवो. 12प्रभु करो आणि तुम्हाला प्रीतीत वाढवो. आणि
भरून टाको. जसे आम्ही तुम्हावरील प्रेमाने भरभरून
वाहत आहोत तसे तुम्हीही एकमेकासाठी व सर्वांसाठी
प्रीतीने भरभरून वाहावे. 13यासाठी की, जेव्हा आमचा
प्रभु येशू त्याच्या पवित्र जनांसह येतो तेव्हा तो अशा
प्रकारे तुमची अंत:करणे बळकट करो आणि त्यांना
पवित्रतेने निर्दोष करो.

### देवाला संतोषविणारे जीवन

4 बंधूंनो, मला आता तुम्हाला काही इतर गोष्टींविषयी
सांगायचे आहे: प्रभु येशूचे अनुयायी या नात्याने आम्ही
तुम्हाला विनंति करतो व बोध करतो की, देवाला कसे
संतोषवायचे याचे शिक्षण तुम्हांला आमच्याकडून जसे
मिळाले, तसे तुम्ही खरोखरच जगत आहात, आणि तुम्ही
ते जास्तीत जास्त करा. 2कारण तुम्हांला हे माहीत आहे
की, प्रभु येशूच्या अधिकाराने कोणत्या आज्ञा आम्ही
तुम्हांस दिल्या होत्या. 3आणि हेच देवाला पाहिजे आहे.
तुम्ही पवित्र असावे ही त्याची इच्छा आहे. तुम्ही
जारकर्मापासून दूर असावे ही त्याची इच्छा आहे. 4त्याची
अशी इच्छा आहे की, तुम्हातील प्रत्येकाने स्वत:च्या
शरीरावर ताबा मिळविण्यास शिकावे.* 5आणि ज्यांना
देव माहीत नाही, ज्यांना देवाची ओळख नाही त्या विदेशी
लोकांप्रमाणे कामवासनेने नव्हे. 6त्याची हीसुद्धा इच्छा
आहे की, तुम्ही प्रत्येकाने आपआपल्या बंधूचा याबाबतीत
गैरफायदा घेऊ नये. कारण जसा आम्ही पूर्वी इशारा

**तुम्हातील ... शिकावे** याचा अर्थ असासुद्धा होऊ शकतो की,
'आपल्या स्वत:च्या पत्नीबरोबर कसे राहायचे ते शिकावे.'

देऊन सांगितले होते की, प्रभु या सर्व गोष्टींचा सूड घेणारा
आहे. 7कारण देवाने आम्हाला अमंगळ जीवनासाठी नव्हे,
तर शुद्ध जीवनासाठी बोलाविले होते. 8म्हणून जो कोणी
हे शिक्षण नाकारतो, तो मनुष्याला नव्हे तर पवित्र आत्मा
देणाऱ्या देवाला नाकारतो.

9आता ख्रिस्तातील तुमच्या भाऊ बहिणीच्या प्रीतीविषयी
आम्ही तुम्हाला लिहिण्याची गरज आहे असे नाही. कारण
एकमेकावर प्रीति करावी असे देवानेच तुम्हांला शिकविले
आहे. 10आणि हे खरे पाहता, जे तुम्ही तुमच्या सर्व बंधूंबरोबर
सर्व मासेदोनियाभर प्रीती करीत आहात. परंतु बंधूंनो,
आम्ही तुम्हांस कळकळीने सांगतो की ती विपुलतेने करा.
11आम्ही तुम्हांला आज्ञा केल्याप्रमाणे शांततापूर्ण जीवन
जगण्याची, आपले काम आपण करण्याची, आणि आपल्या
स्वत:च्या हातांनी काम करण्याची इच्छा करा. 12यासाठी
की बाहेरचे लोक तुम्ही ज्या प्रकारे जगता ते पाहून
तुमचा आदर करतील आणि यासाठी की, तुमच्या
गरजांसाठी इतर कोणावरही अवलंबून राहावे लागू नये.

## प्रभूचे येणे

13बंधूंनो, तुम्हाला हे माहीत असावे अशी माझी इच्छा
आहे, जे मेलेले आहेत, अशांसाठी इतरांसारखे दु:ख करू
नये. कारण इतरांना आशा नाही. 14कारण जर आम्ही
विश्वास ठेवतो की येशू मेला होता आणि नंतर मरणातून
पुन्हा जिवंत झाला, तसेच देवही येशूबरोबर, त्याच्यावर
(येशूवर) विश्वास ठेवून मेलेले आहेत, त्यांना त्याप्रमाणे
परत जिवंत करील. 15आता आम्ही जे तुम्हांला सांगत
आहोत तो एक संदेश आहे. जे आम्ही जिवंत आहोत, ते
आम्ही प्रभूच्या दुसऱ्या येण्याच्या वेळेपर्यंत तग धरू. जे
मेलेले आहेत त्यांच्या अगोदर आम्ही निश्चितच जाणार
नाही. 16कारण, जेव्हा मोठ्याने मुख्य देवदूताच्या आवाजात
आणि देवाच्या कर्ण्याच्या आवाजात आज्ञा दिली जाईल,
तेव्हा, प्रभु स्वत: स्वर्गातून खाली उतरेल आणि जे ख्रिस्तात
मेले होते ते प्रथम उठतील. 17मग आपल्यापैकी जे जिवंत
असतील ते प्रभूला अंतराळात भेटण्यासाठी त्यांच्याबरोबर
ढगात वर घेतले जातील. आणि अशा प्रकारे आम्ही
प्रभूबरोबर सदासर्वकाळ राहू. 18म्हणून या शब्दांनी
एकमेकाचे समाधान करा.

## प्रभूच्या येण्यासाठी तयार राहा

5 बंधूंनो, वेळ आणि तारीखवार मी तुम्हांला लिहिण्याची
गरज नाही. 2कारण तुम्ही स्वत:च हे चांगल्या प्रकारे
जाणता की, प्रभूच्या परत येण्याचा दिवस येईल. तो जणू
काय रात्रीचा चोर जसा येतो तसा येईल. 3जेव्हा लोक
म्हणतात, "सगळीकडे शांतता व सुरक्षितता आहे." तेव्हा
त्यांच्यावर अचानक विनाश ओढवेल, ज्याप्रमाणे गर्भवती
स्त्रीला अचानक वेदना होतात व मग ते सुटू शकणार
नाहीत! 4परंतु बंधूंनो, त्या दिवसाने चोराप्रमाणे अचानक
येऊन आपल्याला गाठून आश्चर्यात टाकावे अशा प्रकारे
आपण अंधारात नाही. 5कारण तुम्ही सर्वजण प्रकाशाचे
पुत्र आहात व दिवसाचे पुत्र आहा, आम्ही अंधाराचे किंवा
रात्रीचे नाही. 6म्हणून आपण इतरांसारखे झोपू नये. उलट
आपण सावध राहू व आमच्या स्वत:वर ताबा ठेवण्याचा
प्रयत्न करू. 7कारण जे झोपतात ते रात्री झोपतात व जे
दारू पितात ते रात्री दारू पितात, 8परंतु आपण दिवसाचे
असल्याने स्वत:वर ताबा ठेवण्याचा प्रयत्न करू या. आपण
विश्वास आणि प्रीतीचे छातीला उरस्त्राण घालू या. आणि
आमचे शिरस्त्राण म्हणून तारणाची आशा ठेवू या. 9कारण
देवाने आम्हाला त्याचा क्रोध सहन करण्यासाठी निवडले
नाही, तर आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताद्वारे तारण मिळावे
म्हणून निवडले आहे. 10तो आमच्यासाठी मरण पावला
यासाठी की, आम्ही मेलेले असू किंवा जिवंत असू, जेव्हा
येशू येईल तेव्हा आम्हाला त्याबरोबर एकत्र राहता यावे.
11म्हणून एकमेकांना उत्तेजन द्या. आणि जसे आता तुम्ही
करीत आहात तसे आध्यात्मिक रीतीने एकमेकांना पूर्ण
मनाने बळकट करा.

## शेवटच्या सूचना आणि सलाम

12परंतु बंधूंनो, आम्ही तुम्हांला विनंति करतो, की जे
तुम्हामध्ये श्रम व प्रभूमध्ये मार्गदर्शन करतात आणि शिक्षण
देतात, त्यांना तुम्ही मान द्या. 13आम्ही तुम्हाला अशी
विनंति करतो की, त्यांनी तुमच्याबरोबर केलेल्या कामामुळे
त्यांना प्रेमाने मोठा मान द्या. एकमेकांबरोबर शांतीने राहा.
14बंधूंनो, आम्ही तुम्हाला आग्रह करतो की, "आळशी
लोकांना ताकीद द्या." भित्र्यांना उत्तेजन द्या आणि अशक्तांना
मदत करा. व सर्व लोकांबरोबर सहनशीलतेने राहा.
15कोणीही वाईटाची फेड वाईटाने करू नये म्हणून लक्षात
ठेवा. परंतु नेहमी एकमेकांचे आणि सर्व लोकांचे चांगले
करण्याचा प्रयत्न करा. 16सर्वदा आनंद करा. 17नेहमी
प्रार्थना करीत राहा. 18प्रत्येक परिस्थितीत देवाचे उपकार
माना. 19आत्म्याला विझविण्याचा प्रयत्न करू नका.
20संदेष्ट्यांच्या संदेशाचा उपहास करू नका. 21पण हे
देवाकडून आले आहेत याची परीक्षा करून खात्री करून
घेण्याची सवय करा. जे चांगले ते धरून ठेवा. 22दुष्टाईच्या
प्रत्येक प्रकारापासून दूर राहा. 23देव स्वत: जो शांतीचा
उगम आहे. तो तुम्हांला त्याच्यासाठी पूर्णपणे समर्पित करो
आणि तुमचे सर्व मनुष्यपण म्हणजे तुमचा आत्मा, जीव
आणि शरीर प्रभु येशू ख्रिस्ताच्या आगमनाच्या वेळी पूर्णपणे
निर्दोष राखो. 24देव जो तुम्हाला बोलावितो तो विश्वासू
आहे आणि खरोखरच तो तसे करील.

25बंधूंनो, कृपा करून आमच्यासाठीसुद्धा प्रार्थना करा.
26पवित्र चुंबनाने सर्व बंधूंना सलाम करा. 27मी तुम्हांला
प्रभूची शपथ घ्यावयाला सांगतो की, हे पत्र सर्व बंधूना
वाचून दाखविण्यात यावे. 28आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताची
कृपा तुम्हा सर्वांबरोबर असो.

# पौलाचे थेस्सलनीकाकरांस दुसरे पत्र

1 पौल सिल्वान आणि तीमथ्य याजकडून, थेस्सलनीका येथील मंडळीला जो देव आपला पिता आणि प्रभु येशू ख्रिस्ताची आहे त्यांना

2देवपिता आणि प्रभु येशू ख्रिस्ताची कृपा आणि शांति तुम्हांबरोबर असो.

3बंधूंनो, आम्ही नेहमीच तुमच्यासाठी देवाचे आभार मानतो व तसे करणे योग्य आहे. कारण तुमचा विश्वास अद्भुत रीतीने वाढत आहे आणि जे प्रेम तुम्हांतील प्रत्येकाचे एकमेकांवर आहे ते वाढत आहे. 4म्हणून आम्हाला स्वत: देवाच्या मंडव्यांमध्ये सर्व छळात व तुम्ही सहन करीत असलेले दु:ख, त्याविषयीची तुमची सहनशीलता सोशिकपणा आणि विश्वासाचा अभिमान वाटतो.

### देवाच्या न्यायाविषयी पौल सांगतो

5देव त्याच्या न्याय करण्यामध्ये योग्य आहे हा त्याचा पुरावा आहे. त्याचा हेतू हा आहे की ज्यासाठी आता तुम्हांला त्रास सोसावा लागत आहे, त्या देवाच्या राज्यात प्रवेश करण्यास तुम्हांला पात्र ठरविले जावे. 6खरोखर जे तुम्हांला दु:ख देतात त्याची दु:खाने परतफेड करणे हे देवाच्या दृष्टीने त्याच्यासाठी योग्य आहे. 7आणि आमच्याबरोबर जे तुम्ही दु:ख भोगीत आहात त्यांना आमच्याबरोबर विश्रांती देण्यासाठी, प्रभु येशू प्रकट होताना तो स्वर्गातून आपले सामर्थ्यवान दूत आणि अग्निज्वालेसह येईल. 8आणि ज्यांना देव माहीत नाही आणि आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या सुवार्तेसाठी आवश्यक त्या आज्ञा पाळीत नाहीत त्यांना देव शिक्षा करील. 9ते अनंतकाळच्या नाश असलेला असा शिक्षेचा दंड भरतील. ते प्रभु येशूच्या समक्षतेतून आणि वैभवी सामर्थ्यातून वगळले जातील. 10त्या दिवशी जेव्हा तो त्याच्या पवित्र लोकांत गौरविला जाण्यासाठी सर्व विश्वासणाऱ्याकडून आश्चर्यचकित केले जाण्यासाठी येईल तेव्हा त्यात तुमचाही समावेश आहे कारण त्याविषयी आम्ही सांगितलेल्या साक्षीवर तुम्ही विश्वास ठेवला.

11या कारणासाठी आम्ही नेहमी तुमच्यासाठी प्रार्थना करतो व विनंति करतो की, आमच्या देवाने त्याच्या पाचारणासाठी योग्य असे तुम्हाला गणावे तुमच्या विश्वासापासून निर्माण होणारे प्रत्येक काम व चांगुलपणाचा निश्चय समर्थपणे पूर्ण करावा. 12यासाठी की आमचा देव आणि प्रभु येशूच्या कृपेने आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताचे नाव तुमच्यामध्ये आणि तुम्ही त्याच्यामध्ये गौरविले जावे.

### वाईट गोष्टी घडतील

2 आता बंधूंनो, आम्ही तुम्हांला विनंति करतो, ती प्रभु येशू ख्रिस्ताच्या येण्याविषयी, आणि त्याच्याबरोबर आमच्या एकत्र भेटण्याविषयी. 2आम्ही तुम्हांला विनंती करतो की, तुम्ही तुमचे मन पूर्णपणे अस्वस्थ होऊ देऊ नका किंवा सतत विचलित होऊ नका, जर तुम्ही ऐकले की, प्रभूचा दिवस आला आहे, काही लोक अशा प्रकारचे भविष्य वर्तवतील. किंवा काही लोक शिकवणुकीद्वारे किंवा काही लोक आम्हांकडून पत्र लिहिले आहे असे भासवून असा दावा करतील. 3तर कोणीही तुम्हाला कोणत्याही प्रकारे फसवू नये. म्हणून सावध असा. मी असे म्हणतो कारण पहिल्यांदा मोठी बंडखोरी झाल्याशिवाय प्रभूचा दिवस येणार नाही. आणि जो नाशासाठी नेमला आहे, तो नियम मोडणारा प्रकट होईल. 4तो विरोध करील आणि स्वत:ला सर्व गोष्टींच्या वर उच्च करील. त्याला देव किंवा उपासना करण्याची कोणतीही एखादी वस्तु असे म्हणतील. येथपर्यंत की तो देवाच्या मंदिरात जाईल आणि सिंहासनावर बसेल आणि तो स्वत:ला देव असे जाहीर करील.

5मी तुमच्याबरोबरच होतो तेव्हा तुम्हाला मी ह्या गोष्टींबद्दल सांगत होतो. ते तुम्हाला आठवत नाही काय? 6आणि म्हणून अशा प्रकारे त्याला कशाचा प्रतिबंध होत आहे हे तुम्हांला माहीत आहे. यासाठी तो योग्य वेळी प्रकट व्हावा. 7मी हे म्हणतो कारण दुष्टपणाची रहस्यमय शक्ति आधीपासूनच जगात काम करीत आहे. पण असा एक आहे जो दुष्टाची रहस्यमय शक्ति थोपवीत आहे. आणि जोपर्यंत ती शक्ति मार्गातून काढून बाजूला टाकली जात नाही, तोपर्यंत तो ती शक्ति थोपवून धरील 8आणि मग दुष्ट प्रकट होईल. प्रभु येशू त्याला आपल्या मुखातील श्वासाने मारून टाकील आणि प्रभु जेव्हा त्याच्या येण्याच्या वेळी मोठ्या वैभवाने प्रकट होईल तेव्हा तो त्याचा नाश करील. 9दुष्टाचे येणे सैतानाच्या सामर्थ्याने होईल आणि त्याच्या येण्याबरोबर खोटे चमत्कार, चिन्हे आणि अद्भुत गोष्टी घडतील.

10आणि जे नरकाच्या वाटेवर आहेत त्यांच्याविरुद्ध
प्रत्येक प्रकारची दुष्टता फसवणूक व्हावी म्हणून तो
आणील, कारण त्यांनी सत्यावर प्रेम करण्याचे नाकारले.
यासाठी की त्यांचे तारण होणे शक्य व्हावे. 11आणि या
कारणासाठी देवाने त्यांना भ्रम पडेल असे केले. यासाठी
की, जे खोटे आहे त्यावर त्यांनी विश्वास ठेवावा. 12आणि
त्यांनी सत्यावर विश्वास ठेवला नाही तर दुष्टतेत आनंद
मानला, त्यांना शिक्षा मिळावी.

## तारणासाठी तुमची निवड झाली आहे

13पण आम्ही देवाकडे तुमच्याविषयी नेहमीच आभार
मानले पाहिजेत. ज्यांच्यावर देव प्रेम करतो असे तुम्ही
आमचे बंधु आहात. कारण आत्म्याच्या द्वारे शुद्धीकरण
आणि सत्यावर विश्वास ठेवून तारण व्हावे म्हणून देवाने
तुम्हाला प्रारंभापासून निवडले आहे. 14आणि या
तारणासाठीच,आम्ही सांगितलेल्या सुवार्तेद्वारेच देवाने
तुम्हांला बोलाविले. यासाठी की, आमच्या प्रभु येशू ख्रिस्ताचे
जे गौरव ते तुम्हांलाही मिळावे 15म्हणून बंधूंनो, दृढ उभे
राहा. आणि आमच्या तोंडच्या वचनाद्वारे किंवा आमच्या
पत्राद्वारे जी परंपरा आम्ही तुम्हाला शिकविली आहे तिला
धरून उभे राहा. 16आता प्रभु येशू ख्रिस्त स्वत: आणि
देव आमचा पिता ज्याने आम्हावर प्रेम केले आणि ज्याने
आपल्या कृपेमध्ये आम्हाला अनंतकाळचे समाधान आणि
चांगली आशा दिली. 17ते तुमच्या अंत:करणाला समाधान
देवोत व तुम्ही ज्या प्रत्येक चांगल्या गोष्टी करता अथवा
सांगता त्यामध्ये तुम्हाला बळकट करो.

## आमच्यासाठी प्रार्थना करा

3 आम्हाला आणखी काही गोष्टी तुम्हाला सांगावयाच्या
आहेत: बंधूंनो, कृपा करून आमच्यासाठी प्रार्थना
करा. यासाठी की जसा तुमच्यामध्ये झाला तसा प्रभूच्या
संदेशाचा प्रसार लवकर व्हावा आणि ते गौरविले जावे.
2आणि प्रार्थना करा की, हेकट व दुष्ट माणसांपासून
आमची सुटका व्हावी कारण सर्वच लोकांचा प्रभूवर
विश्वास नाही. 3पण प्रभु विश्वासू आहे. तो तुम्हांला बळकट
करील व दुष्टांपासून तुमचे रक्षण करील. 4प्रभूमध्ये
आम्हांला तुमच्याविषयी विश्वास आहे आणि खात्री आहे
की, जे आम्ही तुम्हाला करण्यासाठी सांगत आहोत ते
तुम्ही करीत आहात व ते पुढे करीतच राहाल. 5प्रभु
तुमची अंत:करणे देवाच्या प्रीतीत आणि ख्रिस्ताच्या सोशिक
सहनशीलतेकडे नेवो.

## कार्य करण्यासाठी अटी

6आता, बंधूंनो, आम्ही तुम्हांला आमच्या प्रभु येशू
ख्रिस्ताच्या नावात आज्ञा करतो की, जो कोणी बंधु, ज्या
परंपरा त्यांना आमच्याकडून मिळाल्या त्या परंपरांप्रमाणे
चालत नाही, तर आळशी जीवन जगत आहे तर
त्याच्यापासून दूर राहा. 7मी तुम्हांला हे सांगतो कारण
तुम्ही स्वत: जाणता की तुम्ही आमचे अनुकरण कसे
करायचे, कारण आम्ही तुमच्यामध्ये आळशी नव्हतो.
8किंवा कोणाकडूनही आम्ही फुकटची भाकर खाल्ली
नाही. उलट, रात्रंदिवस आम्ही काबाडकष्ट केले यासाठी
की तुमच्यावर आम्ही ओझे होऊ नये. 9याचा अर्थ असा
नाही की, आम्हांला तुमच्याकडून मदत मागण्याचा
अधिकार नाही, पण आम्ही आमच्या गरजा भागविण्यासाठी
काम केले ते यासाठी की, आम्ही तुमच्यासमोर उदाहरण
ठेवावे व तुम्ही आमचे अनुकरण करावे. 10कारण आम्ही
जेव्हा तुमच्याबरोबर होतो, तेव्हा आम्ही तुम्हांला हा नियम
दिला: “जर एखाद्याला काम करायचे नसेल, तर त्याने
खाऊ नये.”

11आम्ही हे सांगतो कारण आम्ही ऐकतो की तुमच्यापैकी
काही जण आळशीपणाचे जीवन जगत आहेत. ते काहीच
काम करीत नाहीत. उलट कोणत्याही दिशाहीन
असल्यासारखे इकडे तिकडे फिरत असतात. (इतरांच्या
कामात दखल देतात) 12आम्ही अशा लोकांना आज्ञा
करतो व प्रभु येशू ख्रिस्तामध्ये बोध करतो की, त्यांनी
शांतीने काम करावे आणि स्वत:ची भाकर स्वत:च मिळवून
खावी. 13पण बंधूंनो, तुम्ही तुमच्यासाठी चांगले करीत
असता थकू नका.

14जर कोणी या पत्राद्वारे आमच्या सूचनांचे पालन करीत
नाही, तर तो कोण आहे हे लक्षात ठेवा व त्याच्याबरोबर
राहू नका, यासाठी की त्याला लाज वाटावी. 15पण त्याला
शत्रू समजू नका, परंतु धाक द्या, जसे त्याला तुमचा
भाऊ समजा.

## शेवटचे शब्द

16आता प्रभु स्वत: जो शांतीचा उगम आहे. तो तुम्हाला
सर्वकाळ आणि सर्व प्रकारे शांति देवो. प्रभु तुम्हा सर्वांबरोबर
असो. 17मी पौल माझ्या स्वत:च्या हातांनी हा सलाम
लिहितो. माझ्या प्रत्येक पत्राची ही खूण आहे. ह्या प्रकारे
मी प्रत्येक पत्र लिहितो व अशा प्रकारे लिहितो.

18आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताची कृपा तुम्हा सर्वांबरोबर
असो.

# पौलाचे तीमथ्थाला पहिले पत्र

1 आपला तारणारा देव आणि आपली आशा ख्रिस्त
येशू यांच्या आज्ञेने ख्रिस्त येशूचा प्रेषित पौल याजकडून
2 विश्वासातील माझा खरा पुत्र तीमथ्य याला: देव जो
पिता आणि आपला ख्रिस्त येशू, आमचा प्रभु याच्याकडून
तुला कृपा, दया आणि शांति लाभो.

### खोट्या शिक्षणाविरुद्ध इशारा

3 मी मासेदोनियाला जात असता तुला कळकळीने विनंति
केल्याप्रमाणे तू इफिस येथे राहावेस असे माझे म्हणणे
आहे. यासाठी की, काही ठराविक लोकांना खोटे शिक्षण
देऊ नका अशी तुला त्यांना आज्ञा करता यावी. किंवा
4 कथा-कहाण्यांच्या आहारी जाऊ नका आणि न संपणाऱ्या
वंशावळ्या याकडे लक्ष देऊ नका असे तू त्यांना सांगावेस.
कारण त्यामुळे भांडण वाढते आणि विश्वासाने देवाची
योजना जी पूर्ण होते ती या गोष्टीमुळे पूर्ण होत नाही.
5 आणि या आज्ञेचे उद्दिष्ट प्रीति आहे, जी शुद्ध
अंत:करणातून, चांगल्या सदसदविवेकबुद्धीतून व
प्रामाणिक विश्वासातून उगम पावते. 6 काहींनी पतनामुळे
या गोष्टीकडून आपले लक्ष दुसरीकडे लावले आहे व ते
व्यर्थ बडबडीकडे वळले आहेत. 7 त्यांना नियमशास्त्राचे
शिक्षक व्हायचे होते, पण ते ज्या गोष्टीविषयी मोठ्या
आत्मविश्वासाने बोलतात व सांगतात त्या त्यांनाच कळत
नाहीत.

8 आता आम्हाला हे माहीत आहे की, नियमशास्त्र
खरोखरच चांगले आहे. जर कोणी त्याचा चांगला वापर
करतो. 9 म्हणजे हे जाणून घेऊन की, नियमशास्त्र हे
नीतिमान लोकांसाठी केलेले नाही तर नियमशास्त्राचा
भंग करणाऱ्या आणि बंडखोर लोकांसाठी, तिरस्करणीय
लोकांसाठी, पाप्यांसाठी, भक्तिहीन आणि अधर्मी
लोकांसाठी, वडिलांना ठार मारणाऱ्या, आईला ठार
मारणाऱ्यासाठी,

10 खुनी लोकांसाठी, जारकर्मी, समलिंगसंभोगी, इतर
मनुष्यांना फसविणारे, खोटारडे, खोटी शपथ घेणारे
यांच्यासाठी आहे. इतर जे दुसरे सगळे करतात ते चांगल्या
शिक्षणाविरुद्ध आहेत, 11 गौरवी सुवार्ता जी धन्यवादित
देवाकडून येते आणि जी माझ्यावर सोपविली आहे, तिला
हे अनुसरून आहे.

### देवाच्या दयेबद्दल उपकार

12 जो मला सामर्थ्य देतो त्या ख्रिस्त येशू आपल्या प्रभूचे
मी उपकार मानतो कारण त्याने मला विश्वासू
समजले आणि त्याने मला त्याची सेवा करण्यासाठी नियुक्त
केले. 13 जरी मी पूर्वी निंदा करणारा, मनस्ताप देणारा
आणि हिंसक होतो, तरी माझ्यावर दया दाखविण्यात आली.
तोपर्यंत मी विश्वासणारा नव्हतो म्हणून अज्ञानामुळे मी
तसा वागलो. 14 परंतु विश्वास आणि दया जी ख्रिस्त येशूमध्ये
सापडते ती आपल्या प्रभूच्या कृपेने ओसंडून वाहिली.

15 एक विश्वसनीय वचन आहे जे स्वीकारावयास पूर्णपणे
योग्य आहे. येशू ख्रिस्त पाप्यांना तारावयास या जगात
आला. मी त्या पाप्यातील पहिला आहे. 16 परंतु केवळ
याच हेतूने माझ्यावर दया दाखविण्यात आली. यासाठी की
माझ्यासारख्या अत्यंत वाईट पाप्याच्या उदाहरणावरून,
पुढील काळात जे त्याजवर विश्वास ठेवतील त्यांना
अनंतकाळचे जीवन मिळावे. 17 आता अनंतकाळचा राजा
जो अविनाशी व अदृश्य आहे अशा एकाच देवाला महिमा
आणि गौरव अनंतकाळासाठी असो. आमेन.

18 तिमथ्या, माझ्या मुला, मी तुला तुझ्याविषयी पूर्वीच
सांगण्यात आलेल्या संदेशानुसार ही आज्ञा सोपवीत आहे.
यासाठी की सुयुद्ध करण्यात तिचा उपयोग करता यावा.
19 तुम्हांला विश्वास आणि चांगला विवेक असावा.
कित्येकांनी चांगला विवेक नाकारून विश्वास
तारवाप्रमाणे उद्ध्वस्त केला आहे. 20 त्यात हूमनाय आणि
आलेक्सांद्र आहेत त्यांना मी सैतानाच्या स्वाधीन केले
आहे यासाठी की, देवाविरुद्ध न बोलण्याविषयी त्यांनी
शिकावे.

### पुरुष आणि स्त्रियांसाठी काही नियम

2 सर्वांत प्रथम मी कळकळीने विनंति करतो की,
मागण्या, प्रार्थना, विनंत्या व आभारप्रदर्शन सर्व
माणसांच्या वतीने करावे. 2 आणि विशेषत: राजांच्या वतीने
करावे आणि अधिकाऱ्याच्या वतीने करावे. प्रार्थना करा
की, आम्हांला स्थिर, शांत आणि देवाच्या पूर्ण भक्तीत
सन्मानाने जगता यावे. 3 हे आपला तारणारा देव याच्या
दृष्टीने चांगले व स्वीकार करण्यास योग्य आहे, 4 ज्याला
सर्व लोकांचे तारण व्हावे आणि त्यांना सत्य समजावे असे
वाटते. 5 कारण फक्त एकच देव आहे. आणि देव व

मनुष्य यांच्यामध्ये एकच मध्यस्थ आहे: तो म्हणजे ख्रिस्त येशू जो स्वत: मनुष्य होता. 6सर्व लोकांच्या पापांची खंडणी म्हणून त्याने स्वत:ला दिले. अशा प्रकारे देवाच्या योजनेविषयी त्याने योग्य वेळी साक्ष दिली. 7आणि या साक्षीचा प्रसार करण्यासाठी मला घोषणा करणारा आणि प्रेषित (मी खरे सांगतो, खोटे सांगत नाही!) असा विदेशी लोकांमध्ये विश्वास आणि सत्याचा शिक्षक म्हणून नेमण्यात आले.

8म्हणून प्रत्येक ठिकाणी पुरुषांनी प्रार्थना करावी अशी माझी इच्छा आहे. ते प्रार्थना करीत असताना त्यांनी आपले हात उंचवावेत, जे देवाला पवित्र असे आहेत. व असे न रागावता व न भांडण करता करावे.

9त्याचप्रमाणे, माझी अशी इच्छा आहे की, स्त्रियांनी स्वत:ला साध्यासुध्या वेशाने, नम्रतेने, मर्यादेने, शोभित करावे. त्यांनी वेगळ्या पद्धतीच्या केसरचना करू नयेत. तसेच सोने, किंवा मोती किंवा महाग कपडे वापरू नयेत. 10उलट देवासाठी समर्पित जीवन जगणाऱ्या स्त्रियांनी स्वत:ला चांगल्या कृत्यांनी सुशोभित करणे अगदी योग्य आहे.

11स्त्रीने शांतपणे, पूर्ण अधीनतेने शिकावे. 12मी स्त्रीला शिकविण्याची परवानगी देत नाही किंवा पुरुषावर अधिकार गाजवण्यास परवानगी देत नाही. त्याऐवजी तिने शांत राहावे. 13मी असे म्हणतो, कारण प्रथम आदाम निर्माण करण्यात आला. 14त्यानंतर हवा. आदाम फसविला गेला नाही तर स्त्री फसविली गेली. आणि ती पापात पडली. 15परंतु स्त्रिया जर विश्वास, प्रीती, पवित्रता व योग्य आत्मसंयमनात राहिल्या तर बालकाला जन्म देण्यामुळे त्यांचे तारण होईल.

## मंडळीतील पुढारी

3 हे सत्य वचन आहे: जर कोणी (मंडळीत) अध्यक्ष* (सर्वांगीण काळजीवाहक) होण्याची इच्छा धरतो तर तो चांगल्या कामाची इच्छा धरतो. 2आता अध्यक्षाने (सर्वांगीण काळजीवाहकाने) त्याचे जीवन लोकांनी टीका करू नये अशा रीतीने जगावे. त्याला एकच पत्नी असावी. 3तो मद्य पिणारा नसावा, तो हिंसक वृत्तीचा नसावा तर तो सभ्य, आत्मसंयमी, आदरणीय, व आदरातिथ्य करणारा असावा. तो शिकविण्यात प्रवीण असावा. 4तो पैशावर प्रेम करणारा नसावा. त्याने त्याच्या कुटुंबाचा चांगला पुढारी असावे आणि त्याने त्याची लेकरे त्याच्या आज्ञेत ठेवावीत. 5(जर एखाद्याला स्वत:च्या कुटुंबाची देखभाल करता येत नसेल तर तो देवाच्या मंडळीची काळजी कशी घेईल?) 6तो ह्या कार्यात नवशिका नसावा म्हणजे तो गर्वाने फुगून जाणार नाही. व सैतानाला जशी शिक्षा झाली तशी शिक्षा होऊन त्याचा अंत होणार नाही. 7आणखी म्हणजे बाहेरच्या लोकांमध्ये त्याचे चांगले नाव असावे. यासाठी की त्याच्यावर टीका होऊ नये. व त्याने सैतानाच्या जाव्व्यात सापडू नये

## मंडळीत सेवाकार्य करणारे

8त्याचप्रमाणे, विशेष मदतनीस* आदरणीय असावेत, ते दुटप्पी नसावेत, ते विश्वसनीय असावेत. ते अति मद्यपान करणारे व दुतोंडे नसावेत आणि अनीतिने पैसे मिळवून श्रीमंत होण्याची त्यांना आवड नसावी. 9देवाने जे आम्हांला प्रकट केले आहे ते आमच्या विश्वासाचे सखोल सत्य त्यांनी स्वच्छ विवेकाने धरून ठेवावे. 10वडिलांप्रमाणे यांचीसुद्धा प्रथम परीक्षा व्हावी, मग जर त्यांच्या विरुद्ध असे आढळले नाही, तर त्यांनी मदतनीसाचे काम करावे. 11त्याचप्रमाणे,* (विशेष मदतनीस) स्त्रियांनीही आदरणीय असावे. त्या चुगलखोर नसाव्यात. तर सभ्य व प्रत्येक बाबतीत विश्वसनीय असाव्यात. 12जे खास मदतनीस आहेत त्यांना फक्त एकच पत्नी असावी. आणि त्यांनी त्यांच्या मुलांची व कुटुंबाची चांगल्या प्रकारे काळजी घ्यावी. 13कारण मदतनीस म्हणून जे चांगली सेवा करतात, ते त्यांच्यासाठी आदरणीय स्थान मिळवितात आणि ख्रिस्त येशूमध्ये त्यांच्या विश्वासात महान आत्मविश्वास मिळवितात.

## आपल्या जीवनाचे रहस्य

14मी तुझ्याकडे लवकरच येण्याची इच्छा धरून असलो तरी मी तुला या गोष्टी लिहीत आहे. 15यासाठी की, जरी मला उशीर झाला तरी देवाच्या घरात म्हणजे जिवंत देवाच्या मंडळीत एखाद्या व्यक्तीने कसे वागावे हे तुला माहीत असावे. ती मंडळी सत्याचा खांब व पाया अशी आहे. 16आणि आपल्या सुभक्तीचे रहस्य निर्विवाद मोठे आहे.

तो मानवी शरीरात दिसला; आत्म्याने तो नीतिमान ठरविला गेला, देवदूतांनी त्याला पाहिले होते; राष्ट्रांमध्ये तो गाजविला गेला. जगाने त्याच्यावर विश्वास ठेवला आणि स्वर्गामध्ये तो गौरवाने घेतला गेला.

---

**अध्यक्ष** शब्दश: मुकादम (देखरेख करणारा), बऱ्याच लोकांपैकी जे मंडळीचे नेतृत्व करतात, त्यांच्यापैकी एक. त्यांना पाळक (मेंढपाळ) ही म्हणतात. देवाच्या लोकांची काळजी घेण्याचे त्यांचे काम असते. (प्रे. कृ. 20:26).

**मदतनीस** शब्दश: डीकन्स हा ग्रीक शब्द आहे. त्याचा अर्थ सेवक असा आहे. या लोकांनी मंडळीत विशेष सेवा करावी म्हणून त्यांची नियुक्ती होत असे.

**त्याचप्रमाणे** या कदाचित मदतनीसांच्या पत्नीही असाव्यात. पण बहुधा त्या खास सेवेसाठी नियुक्त केलेल्या स्त्रिया असाव्यात.

## खोट्या शिक्षकांविरुद्ध इशारा

4 आत्मा स्पष्ट म्हणतो की, नंतरच्या काळात काही
जण विश्वास सोडतील, ते भविष्य सांगणारे आत्मे,
जे फसविणारे आहेत त्यांच्याकडे लक्ष देतील, 2आणि
भूतापासून येणाऱ्या शिक्षणाकडे आणि ढोंगी फसविणाऱ्यां
कडे लक्ष देतील. 3ते लोकांना लग्न करण्यास मना करतात
व काही अन्नपदार्थ टाळण्यासाठी सांगतात. जे विश्वासणारे
आहेत, व ज्यांना सत्य माहीत आहे अशांनी उपकार
मानून घेण्यासाठी देवाने ते निर्माण केले आहेत. 4कारण
देवाने केलेली प्रत्येक गोष्ट चांगली आहे व जर उपकार
मानून आम्ही घेतो तर कोणतीही गोष्ट नाकारू नये.
5कारण प्रत्येक वेळी ती देवाच्या शब्दाने आणि प्रार्थनेने
पवित्र केली जाते.

## ख्रिस्त येशूचा चांगला सेवक हो

6तेव्हा बंधु, जर तू या गोष्टी ख्रिस्ती बंधुभगिनींना
शिकविल्या, तर तू जो सत्यात व विश्वासात वाढलास व
चांगल्या शिक्षणाला अनुसरलास तो तू ख्रिस्त येशूचा चांगला
सेवक होशील. 7परंतु देवहीन गोष्टी, ज्या म्हाताऱ्या स्त्रियांचे
लक्षण आहे ते टाळ आणि स्वत:ला सतत देवाच्या भक्तीमध्ये
गुंतवण्याची सवय ठेव. 8कारण शारीरिक शिकवणुकीला
अल्प महत्त्व आहे पण देवाच्या सेवेला सर्व प्रकारे महत्त्व
आहे, कारण ते सध्याच्या जीवनाविषयी आणि भविष्यातील
जीवनाविषयी आशीर्वादाचे अभिवचन आहे. 9हे सत्य वचन
आहे जे सर्वथा स्वीकारावयास योग्य आहे. 10म्हणून आम्ही
जास्त काम करतो आणि धडपड करतो. कारण आम्ही,
जो सर्व लोकांचा व विशेषेकरून जे विश्वास ठेवतात,
अशा विश्वासणाऱ्यांचा विशेषकरून तारणारा आहे त्या
जिवंत देवावर आशा ठेवली आहे.
11आज्ञा कर आणि या गोष्टी शिकव. 12तू तरुण आहेस
म्हणून कोणी तुला तुच्छ मानू नये. त्याऐवजी,
विश्वासणाऱ्यांसाठी तू तुझ्या बोलण्याने, तुझ्या वागण्याने,
तुझ्या प्रेम दर्शविण्याने, तुझ्या असलेल्या विश्वासाने व
तुझ्या शुद्ध जीवनाने त्यांचा आदर्श हो. 13मी येईपर्यंत
लोकांमध्ये देवाचे वचन वाचण्यात, बोध करण्यात व
शिकविण्यात स्वत:ला वाहून घे. 14जेव्हा वडीलजनांनी
तुझ्यावर हात ठेवला त्यावेळी भविष्याच्या संदेशाचा परिणाम
म्हणून तुला मिळालेली देणगी जी तुझ्यामध्ये आहे, त्याविषयी
निष्काळजी राहू नको. 15या सर्व गोष्टींकडे पूर्ण लक्ष दे,
त्यात पूर्ण गढून जा. यासाठी की तुझी प्रगती सर्व लोकांना
दिसून यावी. 16आपणांकडे व आपल्या शिकवणुकीकडे
लक्ष दे. त्यामध्ये टिकून राहा. कारण असे केल्याने तू
स्वत:चे व जे तुझे ऐकतात, त्यांचे तारण करशील.

## इतर लोकांबरोबर राहण्याचे काही नियम

5 वडील माणसाला कठोरपणे बोलू नको, उलट
पित्याप्रमाणे त्याला बोध कर. 2तरुणांना भावासारखे,
वृद्ध स्त्रियांना आईसारखे, तरुण स्त्रियांना बहिणीसारखे
पूर्ण शुद्ध भावाने वागीव.
3ज्या विधवा खरोखरच निराधार आहेत त्यांची काळजी
घे. 4पण जर एखाद्या विधवेला मुले किंवा नातवंडे असतील
तर त्यांनी प्रथम आपल्या घरच्यांची काळजी घेऊन आपला
धर्म प्रत्यक्षात आणावा आणि अशा प्रकारे आपल्या
आईवडिलांची किंवा आजीआजोबांची परतफेड करावी.
कारण हे देवाला मान्य आहे. 5जी स्त्री खरी विधवा आहे,
व तिची काळजी घेण्यासाठी कोणी नाही तिची आशा
देवावर असते व ती रात्रंदिवस देवाकडे प्रार्थना व विनंत्या
करीत असते. 6पण जी विधवा चैनीत राहते, ती जरी
जिवंत असेल तरी ती खरोखर मेलेली आहे. 7म्हणून
लोकांना याविषयी निक्षून सांग. यासाठी की, कोणालाही
त्यांच्याकडे दोष दाखविण्यास वाव राहणार नाही. 8पण
जर कोणी त्याच्या स्वत:च्या नातेवाईकासाठी आणि
विशेषत: त्याच्या कुटुंबातील जवळच्यांसाठी तरतूद करीत
नाही, तर त्याने विश्वास नाकारलेला आहे. व तो अविश्वासू
माणसांपेक्षा वाईट आहे.
9एखादी विधवा जी कमीत कमी साठ वर्षांची असेल,
जिला सोडचिठ्ठी देण्यात आली नाही व जिचे दुसऱ्यांदा
लग्न झाले नाही, अशाच स्त्रियांची विधवा म्हणून नोंद
घ्यावी. 10चांगले काम करण्याबद्दल तिचा नावलौकिक
असेल व तिने मुलाबाळांना वाढवल असेल, जिने अनोळखी
लोकांचे स्वागत केले असेल, संताचे पाय धुतले असतील,
त्रासात असलेल्यांना मदत केली असेल व सर्व चांगले
काम करण्यात स्वत:ला वाहून घेतले असेल, तिचा
विधवांच्या खास यादीत समावेश करावा.
11पण तरुण विधवांची यादीत नोंद करण्याचे टाळावे.
कारण जेव्हा त्या ख्रिस्ताला सोडून अविचारी होतात, तेव्हा
त्यांना पुन्हा लग्न करावेसे वाटते. 12आणि त्या दोषी धरल्या
जातील, कारण त्यांनी त्यांचे मूळ वचन मोडलेले असते.
13आणखी, त्या आळशी बनतात व घरोघरी फिरतात. त्या
आळशी बनतात एवढेच नाही तर इतर लोकांच्या भानगडीत
स्वत:ला गुरफटून घेतात व इतरांविषयी खोटनाटे बोलतात.
ज्या गोष्टी बोलू नयेत, त्या गोष्टी बोलतात. 14यासाठी
माझी अशी इच्छा आहे की, तरुण स्त्रियांनी (विधवांनी)
लग्ने करावीत. मुलांचे संगोपन करावे व आपले घर
चालवावे. आपल्या शत्रूला आपली निंदा करण्यास वाव
मिळू देऊ नये. 15मी तर असे म्हणतो कारण काही
विधवा सैतानामागे जाण्यासाठी वळाल्यादेखील आहेत.
16जर एखाद्या विश्वासणाऱ्या स्त्रीच्या घरात विधवा
स्त्रिया असतील तर तिनेत्यांची काळजी घ्यावी* व
मंडळीवर भार टाकू नये. यासाठी की ज्या खरोखरच

---

**जर एखाद्या ... घ्यावी** काही प्राचीन ग्रीक प्रतींमध्ये लिहिले आहे, जर एखादा मनुष्य किंवा स्त्री जी विश्वासणारी आहे त्याच्याकडे विधवा असेल तर त्याने त्यांना मदत करावी.

विधवा आहेत त्यांना ते मदत करू शकतील. 17जे वडील मंडळीची चांगली सेवा करतात त्यांना दुप्पट मान देण्याच्या योग्यतेचे समजावे, विशेषत: जे उपदेश करण्याचे व शिकविण्याचे काम करतात त्यांना. 18कारण पवित्र शास्त्र म्हणते, “धान्याची मळणी करताना बैलाला मुसक्या बांधू नको,”* आणि मजुरचा त्याच्या मजुरीवर हक्क आहे.”*

19दोन किंवा तीन साक्षीदारांनी पाठिंबा दिल्याशिवाय वडिलावरील आरोप दाखल करू नकोस. 20जे पाप करीत राहतात त्यांचा जाहीरपणे निषेध कर. यासाठी की, इतरांनाही भय वाटावे.

21देव, येशू ख्रिस्त व निवडलेले देवदूत यांच्यासमोर मी निक्षून आज्ञा करतो की, तू कोणताही पूर्वग्रह न ठेवता या गोष्टी पाळ व पक्षपाताने काहीही करू नको.

22देवाच्या सेवेसाठी नियुक्ती करण्याठी कोणावरही घाईने हात न ठेवण्याची सवय कर. इतरांच्या पापांत वाटेकरी होऊ नको. नेहमी स्वत:ला शुद्ध राख.

23नुसतेच पाणी पिण्याचे थांबव आणि तुझ्या पचनासाठी व वारंवारच्या दुखण्यासाठी द्राक्षारसाचा वापर कर.

24काही लोकांची पापे स्पष्ट आहेत. व ती त्यांच्याअगोदर न्यायालयात जातात पण दुसऱ्या लोकांची पापे त्यांच्या मागून जातात. 25त्याचप्रमाणे, चांगली कामेही स्पष्ट आहेत ती सुध्दा कायमची लपविता येत नाहीत.

6 जे सर्व गुलाम म्हणून विधर्मी मालकाच्या जुवाखाली काम करीत आहेत त्यांनी त्यांच्या मालकांना पूर्ण आदर देण्यायोग्य समजावे. यासाठी की देवाच्या नावाची आणि आमच्या शिक्षणावर अशीतशी टीका होणार नाही. 2व ज्या गुलामांचे मालक विश्वासणारे आहेत, त्यांनी त्यांच्या मालकांना कमी मान देऊ नये. कारण वस्तुस्थिती अशी आहे की, ते मालक त्यांचे बंधू आहेत. उलट त्या गुलामांनी त्यांच्या मालकांची सेवा अधिक चांगल्या प्रकारे करावी. कारण ज्यांना लाभ मिळतो ते विश्वासणारे व प्रियजन आहेत. या गोष्टी लोकांना शिकीव व बोध करून तसे करायला सांग.

## खोटे शिक्षण आणि खरी संपत्ती

3जर कोणी काही वेगळे शिकवितो व ख्रिस्त येशू आपला प्रभू याची जी निकोप वचने आणि देवाच्या सेवेचे खरे शिक्षण मान्य करीत नाही 4तर तो गर्वाने फुगलेला आहे व त्याला काही समजत नाही. त्याऐवजी तो भांडणे व शब्दकलह यांनी वेडापिसा झालेला आहे. या गोष्टींपासून हेवा, भांडण, निंदा, दुष्ट तर्क 5आणि ज्यांची मने डागाळलेली आणि सत्यापासून हिरावलेली आहेत अशा माणसांची सततची भांडणे होतात, त्यांना असे वाटते की, देवाची सेवा करणे हे श्रीमंत होण्याचे माध्यम आहे.

6वास्तविक पाहता संतोषाने देवाची सेवा करीत असताना मिळणारे समाधान हा फार मोठा लाभ आहे. 7कारण आपण जगात काहीही आणले नाही म्हणून आपण हे ओळखावे की, आपणसुद्धा या जगातून काहीही बाहेर घेऊन जाऊ शकणार नाही. 8जर आपणांस अन्न, वस्त्र (आसरा) असेल तर त्यामध्ये आपण संतुष्ट असावे. 9पण जे श्रीमंत होऊ पाहतात ते मोहात आणि सापळ्यात व अति मूर्खपणाच्या आणि हानिकारक वासनांच्या आहारी जाऊन नाश पावतात. 10कारण पैशाचे प्रेम हे सर्व वाईटाचे मूळ आहे. काही लोक त्याची इच्छा धरल्याने विश्वासापासून दूर गेले आहेत. त्यामुळे त्यांनी स्वत:लाच पुष्कळ दु:ख करून घेतले आहे.

## तू लक्षात ठेवाव्यास अशा काही गोष्टी

11पण देवाच्या माणसा, तू या गोष्टींपासून दूर राहा. न्यायीपणा, सुभक्ती, विश्वास आणि प्रेम, सहनशीलता, आणि लीनता यासाठी जोराचा प्रयत्न कर. 12विश्वासाच्या चांगल्या स्पर्धेत टिकून राहा. ज्यासाठी तुला बोलाविले होते, त्या अनंतकाळच्या जीवनाला दृढ धर. तू अनेक साक्षीदारांसमोर चांगली साक्ष दिलीस 13जो सर्वांना जीवन देतो त्या देवासमोर आणि पंतय पिलातासमोर ज्याने चांगली साक्ष दिली त्या ख्रिस्त येशूसमोर मी तुला आज्ञा करतो. 14आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या प्रकट होण्याच्या समयापर्यंत निष्कलंक आणि दोषरहित राहावे म्हणून ही आज्ञा पाळ. 15जो धन्य, एकच सार्वभौम, राजांचा राजा आणि प्रभूंचा प्रभु ह्या धन्यवादिताच्या निर्णयानुसार, योग्य समय आल्यावर हे घडवून आणील.

16ज्या एकालाच अमरत्व आहे, ज्यापर्यंत पोहोंचता येणार नाही अशा प्रकाशात राहतो. ज्याला कोणीही पाहिले नाही किंवा पाहू शकत नाही, त्याला सन्मान आणि अनंतकाळचे सामर्थ्य असो. 17या युगातील श्रीमंतास आज्ञा कर की, गर्विष्ठ होऊ नका. पैसा जो चंचल आहे त्यावर त्यांनी आशा ठेवू नये, परंतु देव जो विपुलपणे उपभोगासाठी सर्व पुरवितो त्यावर आशा ठेवावी.

18चांगले करण्याची त्यांना आज्ञा कर. चांगल्या कृत्यात धनवान आणि उदार असावे. व स्वत:जवळ जे आहे त्यात इतरांबरोबर सहभागी होण्याची इच्छा असावी. 19असे करण्याने ते स्वत:साठी स्वर्गीय धनाचा साठा करतील जो भावी काळासाठी भक्कम पाया असे होईल त्यामुळे त्यांना खऱ्या जीवनाचा ताबा मिळेल.

20तिमथ्या, तुझ्याजवळ विश्वासाने सांभाळावयास दिलेल्या ठेवीचे रक्षण कर. रिकाम्या वटवटीपासून आणि चुकीने ज्याला तथाकथित “ज्ञान” म्हणतात त्याच्याशी संबंधित असलेल्या परस्परविरोधी विश्वासापासून दूर जा. 21ज्यांनी हा दावा केला ते या “विद्येमुळे” विश्वासाच्या खुणेपासून ढळले आहेत. देवाची कृपा तुम्हांबरोबर असो.

---

**धान्याची ... बांधू नको** अनुवाद 25:4

**मजुराचा ... हक्क आहे** लूक 10:7

# पौलाचे तीमथ्याला दुसरे पत्र

1 येशू ख्रिस्तामध्ये असलेल्या जीवनाविषयीच्या
अभिवचनाची घोषणा करण्यास, देवाच्या इच्छेने
पाठविलेला ख्रिस्त येशूचा प्रेषित पौल याजकडून,
2प्रिय मुलगा तीमथ्य याला, देवपिता आणि आमचा प्रभु
येशू ख्रिस्त याच्यापासून कृपा दया व शांति असो.

## आभारप्रदर्शन आणि उत्तेजन

3माझ्या पूर्वजांप्रमाणे ज्या देवाची मी शुद्ध विवेकभावाने
भक्ती करतो, त्या देवाचे मी उपकार मानतो; आणि
रात्रंदिवस माझ्या प्रार्थनेत तुझी नेहमी आठवण करतो.
4माझ्यासाठी तू ढाळलेल्या अश्रूंची आठवण करताना तुला
भेटण्याची आतुरतेने वाट पाहतो. यासाठी की मी आनंदाने
भरून जावे. 5तुझ्यातील प्रामाणिक विश्वासाचे मला स्मरण
होते जो पहिल्यांदा तुझी आजी लोईसमध्ये होता आणि
तुझी आई युनीकेमध्ये होता. आणि माझी खात्री आहे की
तोच विश्वास तुझ्यामध्येही आहे. 6या कारणासाठी मी
तुला आठवण करून देतो की, जेव्हा मी माझे हात तुझ्यावर
ठेवले तेव्हा देवाच्या दानाची जी ज्योत तुला मिळाली ती
तेवत ठेव. 7कारण देवाने आम्हांला भित्रेपणाचा आत्मा
दिला नाही. तर तो सावधानतेचा व सामर्थ्याची स्फूर्ति
देणारा आत्मा दिला आहे.
8म्हणून आपल्या प्रभूविषयी साक्ष देण्यासाठी लाज धरू
नको किंवा मी जो त्याच्यासाठी कैदी झालो त्या माझी
लाज धरू नको. तर माझ्याबरोबर सुवार्तेसाठी दु:ख सोस.
देव तुला जे सामर्थ्य देतो त्याच्या साहाय्याने दु:ख सोस.
9त्याने आम्हांला तारले आणि त्याने आम्हांला समर्पित
जीवनासाठी पाचारण केले. आम्ही काही सत्कृत्ये केली
म्हणून नाही तर त्याच्या स्वत:च्या हेतूने व कृपेने केले.
ही कृपा काळाच्या सुरूवातीलाच देवाने ख्रिस्त येशूमध्ये
आम्हांस दिली होती. 10पण जी आता आम्हाला आमचा
तारणारा ख्रिस्त येशू याच्या भूतलावर अवतीर्ण होण्याने
प्रगट करण्यात आली आहे. ख्रिस्ताने मरणाचा नाश केला
आणि सुवार्तेद्वारे अमरत्व व जीवन प्रकाशात आणले.
11मला त्या सुवार्तेचा उपदेशक, प्रेषित आणि शिक्षक असे
नेमले होते. 12आणि या कारणांमुळे मीसुद्धा दु:ख भोगीत
आहे. परंतु मी लाजत नाही कारण ज्याच्यावर मी विश्वास
ठेवला आहे त्याला मी जाणतो आणि माझी खात्री पटली
आहे की, तो दिवस येईपर्यंत त्याने जे माझ्याकडे सोपविले
आहे त्याचे तो रक्षण करील. 13माझ्याकडून ऐकून
घेतलेल्या सत्य शिक्षणाचा गाभा दृढ धर. आणि ख्रिस्त
येशूमध्ये सापडणाऱ्या विश्वासाने व प्रीतीने ते कर.
14आपणामध्ये वस्ती करणाऱ्या पवित्र आत्म्याद्वारे त्या
चांगल्या ठेवीचे रक्षण कर.
15आशिया प्रांतामध्ये असणाऱ्या सर्वांनी मला सोडले
आहे हे तुला ठाऊकच आहे. त्यामध्ये फुगल व हर्मगनेस
आहेत. 16अनेसिफराच्या घरावर प्रभु दया दाखवो. कारण
त्याने अनेकदा माझे समाधान केले आहे. आणि माझ्या
तुरूंगात असण्याची त्याला लाज वाटली नाही. 17उलट
रोममध्ये असताना त्याने माझा तपास लागेपर्यंत कसोशीने
माझा शोध केला. 18प्रभु करो आणि त्याला त्या दिवशी
प्रभूकडून दया मिळो कारण माझ्या इफिसातील वास्तव्य
काळात त्याने अनेक प्रकारे माझी सेवा केली हे तुला
चांगले माहीत आहे.

## ख्रिस्त येशूचा एकनिष्ठ सैनिक

2 माझ्या मुला तू ख्रिस्त येशूच्या ठायी असलेल्या कृपेत
बलवान हो. 2माझ्याकडून ज्या गोष्टी तू पुष्कळ
साक्षीदारांसमोर ऐकल्यास त्या घे व इतरांना शिकविण्यास
समर्थ अशा विश्वासू लोकांवर सोपवून दे. 3ख्रिस्त येशूचा
चांगला सैनिक या नात्याने आपल्या दु:खाचा सहभागी
बनून राहा.
4सैनिकाचे काम करणारा कोणीही जीवनातील
संसाराच्या कामकाजात अडकत नाही. यासाठी की त्याला
आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्याला संतुष्ट करता यावे. 5जर
कोणी मैदानी स्पर्धेत भाग घेतो तर नियमाप्रमाणे स्पर्धेत
घेतल्याशिवाय त्याला विजयाचा मुकुट मिळविता येत नाही.
6अति श्रम करणारा शेतकरी हा पहिल्या फळाचा वाटा
घेणारा असावा. 7मी काय म्हणतो याविषयी तू विचार
करावा अशी माझी इच्छा आहे. प्रभु तुला या सर्व गोष्टी
समजून घेण्याचे सामर्थ्य देईल.
8येशू ख्रिस्त जो मेलेल्यांतून उठला व दाविदाचा वंशज
आहे त्याची आठवण करीत राहा. जी सुवार्ता मी सांगतो
तिचा हा गाभा आहे.
9कारण सुवार्तेमुळे मी दु:ख सहन करतो. येथपर्यंत
की, गुन्हेगाराप्रमाणे साखळदंडानी मला बांधण्यात आले.
पण देवाचे शिक्षण बांधले गेले नाही. 10म्हणून, देवाच्या

निवडलेल्यांसाठी मी सर्व काही सोशीत आहे, म्हणजे
त्यांनाही ख्रिस्त येशूद्वारे मिळणारे तारण व अनंतकाळचे
गौरव प्राप्त व्हावे.
11येथे एक विश्वसनीय सत्य आहे:

जर आम्ही त्याच्यासह मेलेले आहोत. तर त्याच्याबरोबर
जीवंतही राहू
12जर आम्ही दु:खसहन केले तर आम्ही त्याच्याबरोबर
राज्यसुद्धा करू जर आम्ही त्याला नाकारले तर तोही
आम्हाला नाकारील
13जरी आम्ही अविश्वासू आहोत तरी तो अजूनही
विश्वासू आहे कारण तो स्वत:ला नाकारू शकत नाही.

## मान्य सेवक

14लोकांना या गोष्टीची आठवण करून देत राहा.
देवासमोर त्यांना निक्षून ताकीद दे की, शब्दांविषयी भांडू
नका. असे भांडण कोणत्याही फायद्याचे नाही. फक्त जे
ऐकतात त्यांचा ते नाश करते. 15देवाने पसंत केलेला व
देवाचे वचन योग्य रीतीने शिकवण्यास पात्र असा आणि
जे काम करतोस त्यात लाज वाटण्यासारखे काहीही
नसलेला असा देवाने पसंत केलेला कामकरी होण्याचा
प्रयत्न कर. 16पण ऐहिक वादविवाद टाळ कारण ते लोकांना
देवापासून अधिकाधिक दूर नेतात. 17आणि अशा प्रकारे
वादविवाद करणाऱ्यांची शिकवण कर्करोगासारखी
पसरते. या लोकांमध्ये हुमनाय आणि फिलेत आहेत, 18जे
सत्यापासून दूर गेले आहेत. ते म्हणतात की, मरणानंतरचे
सर्व लोकांचे पुनरुत्थान आधीच झाले आहे व ते काही
लोकांच्या विश्वासाचा नाश करीत आहेत. 19तथापि देवाने
घातलेला भक्क म पाया त्यावर असलेला शिक्क ा यासह
स्थिर राहतो. "प्रभु जे त्याचे आहेत त्यांना ओळखतो."*
"जो कोणी प्रभूचे नाव घेतो त्याने वाईटापासून वळलेच
पाहिजे."
20मोठ्या घरात केवळ सोन्याचांदीची भांडी असतात असे
नाही तर लाकूड व माती यापासून बनविलेलीही असतात.
काही प्रतिष्ठेच्या कामात वापरण्यासाठी असतात तर दुसरी
काही कनिष्ठ प्रतीच्या कामी वापरण्यासाठी नेमलेली
असतात. 21म्हणून जर मनुष्य या अशुद्धतेपासून स्वत:ला
शुद्ध करील तर तो मानसन्मानास योग्य असे भांडे होईल
व धन्यासाठी प्रत्येकसमर्पित कामासाठी पवित्र केलेले व
उपयुक्त पात्र होईल.
22पण तरुणपणाच्या वासनांपासून दूर पळ जे प्रभूला
शुद्ध अंत:करणाने हाक मारतात व प्रभूवर विश्वास
ठेवतात, अशांच्या बरोबर, नीतिमत्त्व, विश्वास, प्रीति आणि
शांति यांच्या मागे लाग. 23नेहमी मूर्ख व निरर्थक अशा
वादविवादापासून दूर राहा. कारण तुला माहीत आहे की,
त्यामुळे भांडणे निर्माण होतात. 24देवाच्या सेवकाने भांडू
नये, तर सर्व लोकांशी दयाधर्माने वागावे तसेच शिक्षणात
कुशल व सहनशील असावे. 25जे त्याला विरोध करतात,
त्यांना विनयाने शिक्षण द्यावे या आशेने की देवाने त्यांना
पश्चात्ताप करण्यास सहाय्य करावे आणि त्यांना सत्याची
ओळख व्हावी. 26ते शुद्धीवर यावेत व सैतानाच्या
सापळ्यांतून जेथे सैतानाने त्यांना त्याच्या इच्छेप्रमाणे
करण्यासाठी ठेवले आहे, तेथून त्यांची सुटका व्हावी.

## शेवटचे दिवस

3 हे लक्षात ठेव: शेवटच्या दिवसांत कठीण समय
आपल्यावर येतील. 2लोक स्वार्थी, धनलोभी,
बढाईखोर, गर्विष्ठ, शिव्याशाप देणारे, आईवडिलांची आज्ञा
न मानणारे, कृतघ्न, अधार्मिक 3इतरांवर प्रीति नसणारे,
क्षमा न करणारे, चहाडखोर, मोकाट सुटलेले, क्रूर,
चांगल्याच्या विरुद्ध असले, 4विश्वासघातकी, उतावीळ,
गर्वाने फुगले, देवावर प्रेम करण्यापेक्षा चैनीची अधिक
आवड धरणारे असे होतील; 5ते देवाच्या सेवेचे बाहेरचे
स्वरूप चांगले राखतील, परंतु त्याचे सामर्थ्य नाकारतील.
त्यांच्यापासून नेहमी दूर राहा. 6मी हे म्हणतो कारण
त्यांच्यांपैकी काही घरात शिरकाव करतात व पापाने
भरलेल्या, सर्व प्रकारच्या वासनांनी बहकलेल्या,
कमकुवत स्त्रियांवर ताबा मिळवितात. 7अशा स्त्रिया नेहमी
शिकण्याचा प्रयत्न करतात. पण सत्याच्या पूर्ण ज्ञानापर्यंत
त्या कधीही जाऊ शकत नाहीत. 8यान्नेस व यांब्रेस यांनी
जसा मोशेला विरोध केला तसा ही माणसे सत्याला विरोध
करतात. ज्यांची मने भ्रष्ट आहेत व सत्य अनुसरण्यात
अयशस्वी ठरलेली अशी ही माणसे आहेत. 9ते पुढे अधिक
प्रगती करणार नाहीत. कारण जसा यान्नेस व यांब्रेस यांचा
मूर्खपणा प्रकट झाला तसा यांचा मूर्खपणा सर्वांना प्रकट
होईल.

## शेवटच्या सूचना

10तरीही तू माझी शिकवण, वागणूक, जीवनातील माझे
ध्येय, माझा विश्वास, माझा धीर, माझी प्रीति, माझी
सहनशीलता ही पाळली आहेस. 11अंत्युखिया, इकुन्या,
आणि लुस्त्र येथे ज्या गोष्टी माझ्या बाबतीत घडल्या, जो
भयंकर छळ मी सोसला ते माझे दु:ख तुला माहीत आहे!
परंतु प्रभूने या सर्व त्रासांपासून मला सोडविले. 12खरे
पाहता, जे जे ख्रिस्त येशूमध्ये शुद्ध जीवन जगू इच्छितात,
त्या सर्वांचा छळ होईल. 13पण दुष्ट लोक व भोंदू लोक
इतरांना वरचेवर फसवीत राहतील आणि स्वत:ही फसून
अधिक वाईटाकडे जातील.
14पण तुझ्या बाबतीत, ज्या गोष्टी तू शिकलास व
ज्याविषयी तुझी खात्री झाली आहे त्या तू तशाच पुढे चालू
ठेव. ती सत्ये ज्या कोणापासून तू शिकलास ते तुला
ठाऊक आहे. तू त्यांच्यावर विश्वास ठेवू शकतोस. 15तुला

---

**प्रभु ... ओळखतो** गणना 16:5

माहीत आहे की, तू आपल्या अतिबाल्यावस्थेत असल्यापासूनच तुला पवित्र शास्त्र वचनांची माहिती आहे. त्यांच्या ठायी तुला शहाणे बनविण्याचे व तारणाकडे घेऊन जाण्याचे सामर्थ्य आहे. ते तुला तारणाकडे नेण्यासाठी लागणारे ज्ञान देण्यास समर्थ आहे. 16प्रत्येक शास्त्रलेख देवाच्या प्रेरणेने लिहिला असल्यामुळे तो सत्य समजण्यास, वाईटाचा निषेध करण्यास, चुका सुधारण्यास व योग्य जीवन जगण्याचे मार्गदर्शन करण्यास उपयुक्त आहे. 17यासाठी की, देवाचा माणूस प्रवीण होऊन पूर्णपणे प्रत्येक चांगल्या कामासाठी सज्ज व्हावा.

4 देवासमोर आणि ख्रिस्त येशूसमोर मी तुला गांभीर्याने आज्ञा करतो, जे जिवंत आहेत व जे मेलेले आहेत त्यांचा येशू ख्रिस्त हाच न्याय करणार आहे. येशू ख्रिस्ताचे राज्य व त्याचे परत येणे याविषयी घोषणा कर. मी तुला देवासमोर व ख्रिस्तासमोर ही आज्ञा करतो. 2वचन गाजवीत राहा. सोयीच्या किंवा गैरसोयीच्या अशा कोणत्याही वेळी तुझे कार्य करण्यास तयार राहा. लोकांना जे करायचे आहे, त्याविषयी त्यांची खात्री पटव. जेव्हा ते चुका करतील तेव्हा त्यांना सावध कर; लोकांना उत्तेजन दे. आणि हे सर्व काळजीपूर्वक शिक्षण देण्याने व मोठ्या सहनशीलतेने कर. 3मी असे म्हणतो कारण अशी वेळ येईल जेव्हा लोक चांगले शिक्षण ऐकण्याची इच्छा धरणार नाहीत. त्याऐवजी त्यांच्या स्वत:च्या इच्छांना पूरक असे शिक्षक ते त्यांच्यासाठी जमा करतील. त्यांची कानउघडणी कर. 4सत्यापासून ते आपले कान दुसरीकडे वळवतील व आपले लक्ष ते भाकड कथांकडे लावतील. 5पण तुझ्याबाबतीत स्वत: सावधानतेने वाग, दु:ख सहन कर; सुवार्तेची घोषणा करण्याचे काम कर; देवाने दिलेली सेवा पूर्ण कर.

6माझ्याबाबतीत म्हणायचे तर, मी अगोदरच पेयार्पणा सारखा ओतला जात आहे. व माझी या जीवनातून जाण्याची वेळ आली आहे. 7मी सुयुद्ध जिंकेले आहे. मी माझी शर्यत संपविली आहे. मी विश्वास राखला आहे. 8आता माझ्यासाठी विजेत्यासाठी असलेला मुकुट जो नीतिमत्त्व, तो वाट पाहत आहे. आणि प्रभु जो नीतिमान न्यायाधीश, तो मला त्या दिवशी मुकुट देईल आणि केवळ मलाच तो देईल असे नाही तर जे सर्व त्याच्या येण्याची प्रेमाने वाट पाहत आहेत, अशा सर्वांना देईल.

### व्यक्तिगत संदेश

9तुला शक्य होईल तितक्या लवकर मला भेटावयाला येण्याचा प्रयत्न कर. 10कारण देमास मला सोडून थेस्सलनीकास गेला आहे. कारण त्याला आजचे हे जग प्रिय आहे. क्रेस्केस गलतीयास गेला आहे. व तीत दालमतीयास गेला आहे. 11लूक एकटा असा आहे की, जो अजूनदेखील माझ्याजवळ आहे. जेव्हा तू येशील तेव्हा मार्कलाही तुझ्याबरोबर घेऊन ये. कारण सेवेकरिता तो मला उपयोगी आहे. 12तुखिकाला मी इफिसास पाठविले आहे.

13त्रोवसात कार्पाच्या घरी राहिलेला माझा झगा येताना घेऊन ये. तसेच माझी पुस्तके, विशेषत: चर्मपत्राच्या गुंडाळ्या घेऊन ये. 14आलेक्सांद्र तांबटाने माझे खूप नुकसान केले आहे. त्याने केलेल्या त्याच्या कृत्यांबद्दल देव त्याची फेड करील. 15त्याच्यापासून स्वत:चे रक्षण कर. कारण त्याने आपल्या शिक्षणाला जोरदारपणे विरोध केला होता.

16पहिल्यांदा जेव्हा मला माझा बचाव करायचा होता तेव्हा मला कोणीही साथ केली नाही. त्याऐवजी ते सर्व मला सोडून गेले. देवाकडून हे त्यांच्याविरुद्ध मोजले जाऊ नये.

17प्रभु माझ्या बाजूने उभा राहिला आणि मला सामर्थ्य दिले यासाठी की, माझ्याकडून संदेशाची पूर्ण घोषणा व्हावी व सर्व विदेश्यांनी ती ऐकावी. सिंहाच्या मुखातून त्याने मला सोडविले. 18प्रभु मला सर्व दुष्कृत्यांपासून सोडवील व त्याच्या स्वर्गाच्या राज्यात सुखरूपपणे आणील. त्याला सदासर्वकाळपर्यंत गौरव असो.

### शेवटचा सलाम

19प्रिस्कीला अक्विल्ला आणि अनेसिफरच्या घरातील लोकांना सलाम सांग. 20एरास्त करिंथात राहिला. त्रफिमाला मी मिलेता येथे सोडले कारण तो आजारी होता. 21तू हिवाळ्यापूर्वी येण्याचा अधिक प्रयत्न कर. युबुल, पुदेश, लीन, क्लौदिया व इतर सर्व बंधु तुला सलाम सांगतात. 22प्रभु तुझ्या आत्म्याबरोबर असो. देवाची कृपा तुम्हां सर्वांबरोबर असो.

# पौलाचे तीताला पत्र

1 देवाचा सेवक व येशू ख्रिस्ताचा प्रेषित पौल याजकडून, देवाच्या निवडलेल्या लोकांच्या विश्वासात त्यांना मदत करण्यासाठी मला पाठविण्यात आले. त्या लोकांना सत्याची ओळख करवून देण्यासाठी मला पाठविले. व ते सत्य लोकांना देवाची सेवा कशी करायची हे दाखविते. 2तो विश्वास आणि ते ज्ञान अनंतकाळच्या जीवनाच्या आमच्या आशेमुळे येते. काळाची सुरुवात होण्यापूर्वी देवाने त्या जीवनाचे अभिवचन आम्हांला दिले. आणि देव खोटे बोलत नाही. 3देवाने आपल्या योग्य वेळी त्या जीवनाविषयीचा संदेश जगाला प्रकट केला. देवाने ते काम माझ्यावर सोपविले. त्या गोष्टींविषयी मी संदेश दिला कारण आमच्या तारणाऱ्या देवाने मला तसे करण्याची आज्ञा केली होती.

4विश्वासातील माझा खरा मुलगा तीत याला मी लिहीत आहे. देव पिता व ख्रिस्त येशू आपला तारणारा याजकडून तुला कृपा, दया व शांति असो.

### तीताचे क्रेतातील कार्य

5मी तुला क्रेत येथे सोडून या कारणासाठी आलो: की जे अजून अपूर्ण राहिले होते ते तू व्यवस्थित करावेस व मी तुला आज्ञा केल्याप्रमाणे प्रत्येक गावी वडील नेमावेत. 6ज्याच्यावर दुराचरणाचा दोष नसेल, ज्याला एकच पत्नी असेल, ज्याला मुले असून ती विश्वासणारी असतील. ज्याच्यावर स्वैर जीवन जगल्याचा आरोप नसेल, अशा प्रकारच्या व्यक्तीस नेमावे. 7कारण अध्यक्ष (सर्वांगीण काळजीवाहक) हा देवाचा कारभारी असल्यामुळे तो दोषी नसावा. तो उद्धट नसावा, त्याला लवकर राग येऊ नये; तो मद्यपान करणारा नसावा, तो भांडणची आवड नसणारा, अप्रामाणिकपणे पैसे मिळविण्याची आवड नसणारा असावा. 8तर तो आदरातिथ्य करणारा, चांगुलपणावर प्रेम करणारा, शहाणा, नीतिमान, भक्तीशील व स्वत:वर संयम ठेवणारा असावा. 9विश्वसनीय संदेश जसा तो शिकविला गेला त्याला दृढ धरून राहावे यासाठी की, हितकारक शिक्षणाने लोकांना बोध करण्यास समर्थ असावे. व जे विरोध करतात, त्यांची चूक कौशल्याने त्यांना पटवून द्यावी.

10हे महत्त्वाचे आहे कारण पुष्कळ लोक बंड करणारे आहेत. जे व्यर्थ गोष्टींविषयी बडबड करतात व लोकांना फसवितात. मी विशेषेकरून, जे सुंता झालेले आहेत त्यांना संबोधून बोलत आहे. 11त्यांची तोंडे बंद केलीच पाहिजेत, ज्या गोष्टी शिकवू नयेत त्या ते शिकवीत आहेत. ते हे यासाठी करीत आहेत की, अयोग्य मार्गाने पैसे मिळवावेत. अशा रीतीने ते संपूर्ण घराण्याचा नाश करीत आहेत. 12त्यांच्यापैकीच एक क्रेतीय संदेष्टा (भविष्यवादी) स्वत: म्हणाला, “क्रेतीय नेहमीच खोटारडे आहेत. दुष्ट पशू आणि आळशी, खादाड आहेत.” 13हे वाक्य खरे आहे. म्हणून नेहमीच त्यांना कडक रीतीने धमकाव. यासाठी की, त्यांनी विश्वासात खंबीर व्हावे. 14आणि यहूदी भाकडकथा व जे सत्य नाकारतात अशा लोकांच्या आज्ञांकडे लक्ष देऊ नये. 15शुद्ध असणाऱ्या सर्वांना, सर्व गोष्टी शुद्ध आहेत; पण ज्यांचे विचार व विवेकभाव ही दोन्हीही पापाने भ्रष्ट झाली आहेत व जे विश्वास ठेवीत नाहीत त्यांना काहीच शुद्ध नाही. 16ते देवाला ओळखत असल्याचा दावा करतात, पण ते त्यांच्या कृत्यांनी देवाला ओळखल्याचे नाकारतात. ते अमंगळ व आज्ञा मोडणारे, व कोणतेच चांगले कृत्य करण्यास लायक नसलेले असे त्यांचे त्यांनीच दाखवून दिले आहे.

### खऱ्या शिक्षणाला अनुसरणे

2 तू मात्र नेहमी सत्य किंवा निकोप शिक्षणाला शोभणाऱ्या अशा गोष्टी बोल. 2वडील माणसांनी आत्मसंयमित, आदरणीय व शहाणे असावे आणि विश्वासात, प्रीतीत व सहनशीलतेत बळकट असावे.

3त्याचप्रमाणे वृद्ध स्त्रियांना आपल्या वागण्यात आदरणीय असण्याबाबत शिकीव. त्यां चहाडखोर नसाव्यात. तसेच त्यांना मद्यपानाची सवयनसावी व त्यांना जे चांगले तेच शिकवावे. 4यासाठी की, त्यांनी तरुण स्त्रियांना, त्यांच्या पतींवर प्रेम करण्यास, त्यांच्या मुलांवर प्रेम करण्यास शिकवावे. 5त्यांनी शहाणे व शुद्ध असण्यास, त्यांच्या घराची काळजी घेण्यास व दयाळू असण्यास, आपल्या पतींच्या अधीन असण्यास शिकवावे. यासाठी की देवाच्या संदेशाची कोणालाही निंदा करता येऊ नये. 6त्याचप्रमाणे, तरुण मनुष्यांनी शहाणे व्हावे यासाठी त्यांना उत्तेजन देत राहा. 7प्रत्येक गोष्टीत स्वत:ला तू चांगल्या कामाचा कित्ता असे दाखवून दे. तुझ्या शिक्षणात शुद्धता व गंभीरता असावी. 8ज्यावर कोणी टीका करू शकत नाही असा चांगल्या बोलण्याचा उपयोग कर. यासाठी की, जे तुला विरोध

करतात त्यांनी लज्जित व्हावे. 9गुलामांना, सर्व बाबतीत
त्यांच्या मालकांच्या अधीन राहण्यासाठी व त्यांना संतोष
देण्याविषयी व हुज्जत न घालण्याविषयी शिकीव. 10तसेच
चोरी करू नये तर पूर्णपणे विश्वासूपणा दाखविण्यास सांग.
यासाठी की, त्यांनी आपला तारणारा देव याच्या
शिकवणुकीला सर्व बाबतीत सन्मान मिळवून द्यावा.

11कारण सर्व माणसांना देवाची तारक कृपा प्रगट झाली
आहे. 12ती आम्हाला शिकविते की, आपण अभक्ति व
ऐहिक गोष्टींची हाव यांचा नकार करावा आणि या सध्याच्या
जगात आपण सुज्ञपणाने व नीतीने वागावे, व देवाप्रती
आपली भक्ती प्रकट करावी. 13आणि आपली धन्य आशा
म्हणजे आपला महान देव व आपला तारणारा येशू ख्रिस्त
याच्या गौरवी प्रकट होण्याच्या दिवसाची आतुरतेने वाट
पाहावी. 14त्याने स्वत:ला आमच्यासाठी दिले यासाठी की
सर्व दुष्टतेपासून त्याने खंडणी भरून आम्हांस सोडवावे व
चांगली कृत्ये करण्यासाठी आवेशी असलेले असे जे केवळ
आपले लोक त्यांना स्वत:साठी शुद्ध करावे.

15या गोष्टीविषयी बोध करीत राहा आणि कडक शब्दात
कानउघाडणी करीत राहा आणि हे पूर्ण अधिकाराने कर.
कोणीही तुला तुच्छ मानू नये.

## जगण्याचा योग्य मार्ग

3 सत्ताधीश, आणि अधिकारी यांच्या अधीन
राहण्या विषयी व त्यांच्या आज्ञा पाळण्याविषयी व
प्रत्येक चांगले काम करण्यास तयार राहण्याविषयी,
2कोणाचीही निंदा न करण्याविषयी, भांडण टाळण्याविषयी
आणि सर्व माणसांना मोठी नम्रता दाखविण्याविषयी त्यांना
सतत आठवण करून देत राहा.

3मी हे सांगतो कारण आपणसुद्धा एके काळी मूर्ख,
आज्ञा न पाळणारे आणि बहकलेले असे होतो. आम्ही
सर्व प्रकारच्या वासनांची व विलासाची गुलामाप्रमाणे सेवा
करणारे होतो. आम्ही दुष्टतेचे व हेव्यादाव्याचे जीवन
जगत होतो. इतर लोक आमचा द्वेष करीत. आणि आम्ही
एकमेकांचा द्वेष करीत होतो. 4पण जेव्हा आमच्या
तारणाऱ्या देवाची कृपा व प्रीति मानवाप्रती प्रकट झाली,
तेव्हा 5त्याने आम्हाला तारले. देवाकडून निर्दोष म्हणवून
घेण्यासाठी आम्ही केलेल्या कोणत्याही कृत्यांनी नव्हे तर
त्याच्या दयेमुळे आम्ही तारले गेलो आणि ते आमच्याकडे
नव्या जन्माच्या स्नानाद्वारे आम्ही नवीन जन्म पावलो
आणि पवित्र आत्म्याद्वारे प्राप्त झालेले नवीकरण यांनी
तारले गेलो. 6देवाने तो पवित्र आत्मा आमचा तारणारा
येशू ख्रिस्त याच्या द्वारे विपुलपणे आम्हावर ओतला.
7यासाठी की, आता देवाकडून त्याच्या कृपेमध्ये आम्ही
निर्दोष घोषित केले जावे. अनंतकाळच्या जीवनाच्या आशेने
आम्ही त्याचे वारस व्हावे. 8ही शिकवण विश्वसनीय आहे.
आणि यावर जोर द्यावा असे मला वाटते. यासाठी की,
ज्यांनी देवावर विश्वास ठेवला आहे, त्यांनी चांगली कृत्ये
करण्याविषयी काळजी घ्यावी. या गोष्टी लोकांसाठी
चांगल्या व हिताच्या आहेत. 9परंतु मूर्खपणाचे वाद,
वंशावळीसंबंधी चर्चा, भांडणे, नियमशास्त्राविषयीचा झगडा
टाळ. कारण ते निष्फळ व निरर्थक असे आहेत. 10एकदोन
वेळा बोध करून, फूट पाडणाऱ्या व्यक्तीला टाळा. 11कारण
तुला माहीत आहे की, असा मनुष्य वाइटाकडे वाहवत
गेला आहे व तो पाप करीत आहे व त्याने स्वत:लाच
दोषी ठरविले आहे.

## लक्षात ठेवण्यासाठी काही गोष्टी

12जेव्हा मी अर्तमाला किंवा तुखिकाला तुझ्याकडे
पाठवीन तेव्हा मला भेटण्यासाठी निकपलिसास येण्याचा
तू होईल तितका प्रयत्न कर. कारण तेथे हिवाळा
घालविण्याचे मी ठरविले आहे. 13जेना वकील व अपुल्लो
यांना त्यांच्या प्रवासासाठी ज्याची गरज भासेल ती
पुरविण्यासाठी तू सर्वतोपरी प्रयत्न कर. यासाठी की, त्यांना
कशाचीही कमतरता भासू नये. 14आपल्या लोकांनी चांगली
कृत्ये करण्याविषयी शिकले पाहिजे यासाठी की तातडीच्या
गरजा भागविल्या जाव्यात, म्हणजे ते निष्फळ ठरणार
नाहीत.

15माझ्याबरोबरचे सर्वजण तुला सलाम सांगतात.
विश्वासामध्ये आम्हावर प्रेम करणाऱ्या सर्वांना सलाम
सांग. देवाची कृपा तुम्हा सर्वांबरोबर असो.

# पौलाचे फिलेमोनाला पत्र

ख्रिस्त येशूकरीता कैदी झालेला पौल, व आपला बंधु
तिमथ्य यांजकडून, आमचा प्रिय बंधु व सहकारी फिलेमोन
2 आणि आमची बहीण अप्फिया, अर्खिप्प, आमचा
सहसैनिक, आणि तुझ्या घरात जी मंडळी एकत्र येते,
यांना: 3 देव आमचा पिता याजपासून व प्रभु येशू ख्रिस्तापासून
कृपा व शांति असो.

### फिलेमोनचे प्रेम आणि विश्वास

4 जेव्हा मी प्रार्थनेत तुझी आठवण करतो, तेव्हा नेहमी
मी माझ्या देवाचे उपकार मानतो. 5 कारण तुझ्या प्रेमाविषयी
आणि तुझ्या विश्वासाविषयी, जो विश्वास तू प्रभु येशूवर
ठेवतोस त्याविषयी मी ऐकतो, ज्या देवाच्या सर्व लोकांसाठी
जे प्रेम तुझ्याकडे आहे, त्याविषयी मी ऐकतो, 6 मी अशी
प्रार्थना करतो की, ज्या विश्वासाचा सहभागी तू
आमच्याबरोबर आहेस, तो विश्वास आमच्यामध्ये
असलेल्या ख्रिस्त येशूमधील सर्व चांगल्या गोष्टी त्या
सखोलपणे समजण्यासाठी तुला मार्गदर्शन करोत. 7 तुझ्या
प्रेमामुळे मला मोठा आनंद आणि समाधान मिळाले आहे.
कारण बंधु, तुझ्या प्रयत्नांमुळे देवाच्या लोकांची अंत:करणे
संजीवित झाली आहेत.

### अनेसिमचा भाऊ म्हणून स्वीकार कर

8 म्हणून, जरी मी तुझा बंधु म्हणून तुला तुझे योग्य
कर्तव्य करण्याविषयी आज्ञा करून सांगण्याचे धैर्य असले,
तरी 9 प्रेमामुळे मी तुला आवाहन करणे पसंत करतो. मी
पौल, एक वृद्ध मनुष्य म्हणून जसा आहे तसा स्वत:ला
सादर करतो आणि आता ख्रिस्त येशूमधील कैदीसुद्धा
असलेला असा,

10 मी तुला माझ्या मुलासमान असलेला अनेसिम,
ज्याच्याशी मी तुरुंगात असताना पित्याप्रमाणे वागलो,
त्याजविषयी कळकळीने विनवितो की, 11 पूर्वी तो तुला
निरुपयोगी होता पण आता तो तुलाच नाही तर मलासुद्धा
उपयोगी आहे.* 12 मी त्याला तुझ्याकडे परत पाठवीत
आहे. मी असे म्हणायला हवे की, मी त्याला पाठवीत
असताना जणू काय माझे हृदयच पाठवित आहे. 13 त्याला
येथे माझ्याजवळ ठेवायला मला आवडेल यासाठी की
सुवार्तेमुळे मिळालेल्या तुरुंगवासामध्ये त्याने तुझ्या जागी
माझी मदत करावी. 14 परंतु तुझ्या संमतीशिवाय मला
काहीही करायचे नव्हते. यासाठी की तुझे कोणतेही चांगले
कार्य दडपणामुळे होऊ नये तर तुझ्या खुशीने व्हावे.

15 कदाचित त्याला थोड्या काळासाठी तुझ्यापासून दूर
घेतले जाणे यासाठी झाले असावे की, तू त्याला कायमचे
तुझ्याजवळ घ्यावे. 16 एक गुलाम म्हणून नव्हे, उलट
गुलामापेक्षाही चांगला एक भाऊ म्हणून घ्यावे. मी
त्याच्यावर खूप प्रेम करतो. पण तू त्याच्यावर त्याहीपेक्षा
अधिक प्रेम करशील, फक्त एक मनुष्य म्हणूनच नव्हे,
तर प्रभूमधील एक बंधु म्हणून. 17 तर जर मग तू मला
खरोखर भागीदार समजतोस, तर माझे स्वागत जसे तू
केले असतेस तसे त्याचे स्वागत कर. 18 आणि जर त्याने
तुझे काही नुकसान केले असेल किंवा काही देणे लागत
असेल तर ते माझ्या नावावर लाव.

19 मी, पौल, हे माझ्या स्वत:च्या हातांनी लिहीत आहे:
मी याची तुला परतफेड करीन. (मी तुला हे सांगण्याची
गरज नाही की, तुझे स्वत:चे जीवन तू मला देणे लागतोस.)
20 होय बंधु, प्रभूमध्ये मला तुझ्यापासून काही फायदा हवा
आहे. ख्रिस्तामध्ये माझे अंत:करण उल्हासित कर. 21 तुझ्या
आज्ञाधारकपणाविषयी मला खात्री आहे म्हणून मी तुला
लिहीत आहे. मला माहीत आहे की, मी सांगत असलेल्या
गोष्टीपेक्षा तू अधिक करशील.

22 शिवाय कृपा करून माझ्या विश्रांती करिता खोली
तयार करून ठेव. कारण माझा विश्वास आहे की, तुमच्या
प्रार्थनांचा परिणाम म्हणून मला सुरक्षितरीत्या तुमच्या
स्वाधीन करण्यात येईल. 23 येशू ख्रिस्तामध्ये माझ्यासह
बंदिवान एपफ्रास 24 तसेच मार्क, अरिस्तार्ख, देमास व
लूक जे माझे सहकारी आहेत, ते सलाम सांगतात. 25 प्रभु
येशू ख्रिस्ताची कृपा तुमच्या आत्म्याबरोबर असो. आमेन.

---

**पूर्वी तो ... उपयोगी आहे** पौल याठिकाणी अनेसिम हा शब्द दोन अर्थांनी वापरतो. अनेसिम म्हणजे उपयोगी.

# इब्री लोकांस पत्र

### देव त्याच्या पुत्राद्वारे बोलला आहे

1 भूतकाळात देव आपल्या पूर्वजांशी संदेष्ट्यांच्या द्वारे
पुष्कळ वेळा वेगवेगळ्या मार्गांनी बोलला. 2पण या
शेवटच्या दिवसांत तो आपल्याशी त्याच्या पुत्राद्वारे बोलला,
त्याने पुत्राला सर्व गोष्टींचा वारस म्हणून नेमले. देवाने हे
जगसुद्धा पुत्राकरवीच निर्माण केले. 3पुत्र हा देवाच्या
गौरवाचे तेज आहे. तो देवाच्या स्वभावाचे तंतोतंत प्रतिरूप
असा आहे. पुत्र आपल्या सामर्थ्यशाली शब्दाने सर्व गोष्टी
राखतो. पुत्राने लोकांना त्यांच्या पापांपासून शुद्ध केले,
नंतर तो स्वर्गातील सर्वश्रेष्ठ देवाच्या उजव्या बाजूला बसला.
4तो देवदूतांपेक्षा श्रेष्ठ झाला. त्याचे नावसुद्धा जे त्याला
मिळाले ते त्यांच्या नावापेक्षा श्रेष्ठ आहे.
5त्याने कोणत्याही देवदूताला म्हटले नाही की,

"तू माझा पुत्र आहेस; आज मी तुझा पिता झालो आहे."
*स्तोत्र. 2:7*

देवाने कोणत्याही देवदूताला म्हटले नाही की,

"मी त्याचा पिता होईन, व तो माझा पुत्र होईल."
*2 शमुवेल 7:14*

6आणि पुन्हा, देव जेव्हा त्याच्या पुत्राला जगामध्ये आणतो,
तो म्हणतो,

"देवाचे सर्व देवदूत त्याची उपासना करोत."
*अनुवाद 32:43*

7देवदूताविषयी देव असे म्हणतो,

"तो त्याच्या देवदूतांना वारा बनवितो, आणि त्याच्या
सेवकांना तो अग्नीच्या ज्वाला बनवितो."
*स्तोत्र. 104:4*

8 पण पुत्राविषयी तो असे म्हणतो,

"तुझे सिंहासन, हे देवा, तुझे सिंहासन सदासर्वकाळासाठी
आहे, आणि तुझे राज्य न्यायाचे असेल.
9नीति तुला नेहमी प्रिय आहे. अनीतीचा तू द्वेष करतोस.
म्हणून देवाने तुझ्या देवाने, तुझ्या सोबत्यांपेक्षा तुला
आनंददायी तेलाचा अभिषेक केला आहे."
*स्तोत्र. 45:6-7*

10आणि देव असेही म्हणाला,

"हे प्रभु, सुरुवातीला तू पृथ्वीचा पाया घातलास, आणि
आकाश तुझ्या हातचे काम आहे.
11ती संपुष्टात येतील पण तू सतत राहशील ते
कापडासारखे जुने होतील.
12तू त्यांना अंगरख्यासारखे गुंडाळशील, तू त्यांना
कपड्यासारखे बदलशील, पण तू नेहमी सारखाच राहशील,
आणि तुझी वर्षे कधीही संपणार नाहीत."
*स्तोत्र. 102:25-27*

13 तो कोणत्याही दूताला असे म्हणाला नाही,

"तुझ्या वैऱ्याला तुझ्या पायाखाली घालेपर्यंत तू माझ्या
उजवीकडे बैस."
*स्तोत्र. 110:1*

14सर्व देवदूत देवाच्या सेवेतील आत्मे नाहीत काय? आणि
तारणाचा वारसा ज्यांना मिळेल त्यांना मदत करायला ते
पाठविले जातात की नाही?

### आमचे तारण नियमशास्त्रापेक्षा मोठे आहे

2 त्यासाठी ज्या सत्याविषयी आपण ऐकलेले आहे
त्याकडे आपण अधिक काळजीपूर्वक लक्ष दिले
पाहिजे. यासाठी की, आपण त्यातून निसटून जाऊ नये.
2कारण नियमशास्त्र जे देवदूतांकरवी सांगितले गेले ते
इतके प्रभावी होते आणि जर प्रत्येक आज्ञाभंगाच्या व
प्रत्येक अवमानाच्या कृत्याला योग्य ती शिक्षा होते. 3तर
आपण अशा महान तारणाकडे लक्ष दिले नाही, मग
आपण शिक्षेपासून कसे सुटू? या तारणाची पहिली घोषणा
प्रभूने केली. ज्यांनी प्रभूचे ऐकले त्यांच्याकडून याची
खात्री पटली 4देवानेसुद्धा चिन्हांद्वारे, अद्भुत कृत्यांद्वारे,
आणि निरनिराळ्या चमत्कारांद्वारे, त्यांच्या साक्षीची भर
व त्याच्या इच्छेनुसार पवित्र आत्म्याची दाने वाटून दिली.

### त्यांचे तारण करण्यासाठी ख्रिस्त मनुष्यांसारखा झाला

5जे येणारे नवीन जग होते त्याचे सत्ताधीश म्हणून देवाने देवदूतांची निवड केली नाही, त्याच भविष्यकाळातील जगाविषयी आपण बोलत आहोत. 6पवित्र शास्त्रामध्ये एका ठिकाणी असे लिहिले आहे:

"मनुष्य कोण आहे की ज्याची तुला चिंता वाटते? किंवा मनुष्याचा पुत्र कोण आहे की ज्याचा तू विचार करावास?
7थोड्या काळासाठी तू त्याला देवदूतांपेक्षा कमी केले तू त्याला गौरव व सन्मान यांचा मुकुट घातला आहेस
8तू सर्व काही त्याच्या पायाखाली (अधिकाराखाली) ठेवलेस." *स्तोत्र. 8:4-6*

देवाने सर्व काही त्याच्या अधिपत्याखाली ठेवले आणि कोणतीही गोष्ट त्याच्या अधिपत्याखाली ठेवायची सोडली नाही. पण आता अजूनपर्यंत सर्व काही त्याच्या अधिपत्याखाली ठेवलेले आपण पाहत नाही.
9परंतु आपण येशूला पाहतो, ज्याला काही काळासाठी देवदूतांपेक्षा किंचित कमी केले होते. आता आम्ही त्याला, त्याने सहन केलेल्या मरणामुळे, गौरव व सन्मान यांचा मुगुट घातल्याचे पाहत आहोत. कारण देवाच्या कृपेमुळे येशूने सर्व मानवजातीसाठी मरण सोसले.
10देव असा आहे ज्याने सर्व गोष्टी निर्माण केल्या आणि सर्व गोष्टी त्याच्या गौरवासाठी आहेत. देवाला त्याच्या गौरवाचे भागीदार होण्यासाठी पुष्कळ पुत्र व कन्या पाहिजेत. म्हणून देवाने जे त्याला करायला पाहिजे होते ते केले. त्याने येशूला जो त्या लोकांना तारणापर्यंत नेतो त्याला परिपूर्ण केले. देवाने येशूला त्याच्या दु:खसहनाद्वारे परिपूर्ण तारणारा बनविले.
11जो लोकांना पवित्र करतो व ज्यांना पवित्र करण्यात आले आहे, ते सर्व एकाच कुटुंबाचे आहेत या कारणासाठी तो त्यांना बंधु आणि भगिनी म्हणण्यास लाजत नाही.
12येशू म्हणतो,

"मी तुझे नाव माझ्या बंधु आणि भगिनींना सांगेन मी सभेसमोर तुझी स्तुति गाईन."

*स्तोत्र. 22:22*

13तो आणखी म्हणतो,

"मी माझा विश्वास देवावर ठेवीन" *यशया 8:17*

आणि तो पुन्हा म्हणतो,

"येथे मी आहे आणि माझ्याबरोबर देवाने दिलेली मुले आहेत." *यशया 8:18*

14म्हणून मुले रक्त व मांस यांची बनलेली असल्याने त्यानेसुद्धा त्या रक्तात व मांसात त्यांच्यासमवेत भाग घेतला. येशूने हे यासाठी केले की, ज्याच्याकडे मरणाची सत्ता आहे, अशा सैतानाचा मरणाने नाश करावा.
15आणि जे लोक त्यांच्या सर्व आयुष्यात मरणाचे भय मनात ठेवून त्याचे गुलाम असल्यासारखे जगत होते त्यांना मुक्त करावे.
16कारण हे स्पष्ट आहे की, तो काही देवदूतांना मदत करत नाही, उलट अब्राहामाचे जे वंशज आहेत त्यांना तो मदत करतो,
17या कारणासाठी देवाच्या सेवेतील दयाळू व विश्वासू असा मुख्य याजक होण्यासाठी आणि लोकांच्या पापांसाठी प्रायश्चित्त करण्यासाठी येशूला सर्व गोष्टींमध्ये आपल्या बांधवांसारखे होणे अत्यंत आवश्यक होते.
18कारण ज्याअर्थी त्याला स्वत:ला परीक्षेला व दु:खसहनाला तोंड द्यावे लागले, त्याअर्थी ज्यांना आता परीक्षेला तोंड द्यावे लागत आहे त्यांना मदत करण्यास तो समर्थ आहे.

### येशू मोशेपेक्षा महान आहे

3 म्हणून पवित्र बंधूनो, ज्यांना देवाने बोलाविलेले आहे, त्यांनी येशूविषयी विचार करावा. तो देवाचा प्रेषित (प्रतिनिधी) आणि आमच्या विश्वासाचा मुख्य याजक आहे.
2ज्या देवाने त्याला प्रेषित व मुख्य याजक म्हणून नेमले त्याच्याशी येशू विश्वासू होता, जसा देवाच्या संपूर्ण घराण्यात मोशे देवाशी विश्वासू होता.
3ज्याप्रमाणे घरापेक्षा घर बांधणाराला अधिक मान असतो, त्याप्रमाणे येशू हा मोशेपेक्षा अधिक सन्मानास पात्र गणला गेला.
4कारण प्रत्येक घर बांधणारा कोणीतरी असतो, पण देवाने सर्व काही बांधलेले आहे.
5देवाच्या संपूर्ण घराण्यात मोशे हा सेवक म्हणून अधिक विश्वासू होता, देव ज्या गोष्टी पुढील काळात सांगणार होता, त्याविषयी त्याने लोकांना साक्ष दिली.
6परंतु ख्रिस्त हा पुत्र म्हणून देवाच्या घराण्यात विश्वासू आहे आणि जर आम्ही आपला विश्वास व आशा यांचा अभिमान बाळगतो व धीर धरतो, तर आपणही त्याचे घर आहोत.

### आपण सतत देवाला अनुसरले पाहिजे

7म्हणून, पवित्र आत्मा म्हणतो, त्याप्रमाणे,

"आज, जर तुम्ही देवाची वाणी ऐकाल,
8तर आपली अंत:करणे कठीण करू नका. ज्याप्रमाणे तुम्ही अरण्यामध्ये देवाची परीक्षा पाहण्यासाठी देवाविरुद्ध बंडखोरी केली,
9जेथे तुमच्या वाडवडिलांनी माझी परीक्षा पाहिली व मला कसोटीस लावले, तेथे त्यांनी चाळीस वर्षे सामर्थ्यशाली कामे पाहिली.

10त्यामुळे मी या पिढीवर रागावलो आणि म्हणालो, 'या
लोकांच्या मनात नेहमी चुकीचे विचार येतात, या लोकांना
माझे मार्ग कधीही समजले नाहीत'
11म्हणून रागाच्या भरात मी शप वाहून म्हणालो, 'हे
लोक मी देऊ केलेल्या विसाव्याच्या ठिकाणी कधीच
प्रवेश करणार नाहीत.'"

*स्तोत्र. 95:7-11*

12सावध असा, बंधूंनो, तुमच्यापैकी कोणाचीही
अंत:करणे दुष्ट व अविश्वासू असू नयेत, ती जिवंत
देवापासून दूर नेतात. 13उलट, 'आज' म्हटलेला काळ
आहे तोपर्यंत, प्रत्येक दिवशी एकमेकांना उत्तेजन द्या,
यासाठी की तुमच्यापैकी कोणाचीही पापामुळे फसगत
होऊन तुमची अंत:करणे कठीण होऊ नयेत. 14कारण
आपण सर्व जण ख्रिस्तामध्ये त्याच्यावरील विश्वासाचे
वाटेकरी आहोत. जर आम्ही सुरुवातीला धरलेला आमचा
विश्वास शेवटपर्यंत दृढ धरून राहिलो, तर 15पवित्र शास्त्रात
लिहिल्याप्रमाणे:

"आज जर तुम्ही त्याची वाणी ऐकाल, तेव्हा तुम्ही
देवाविरुद्ध बंड केलेत; तशी आपली अंत:करणे कठीण
करू नका."

*स्तोत्र. 95:7-8*

16ज्यांनी देवाची वाणी ऐकली पण त्याच्याविरुद्ध बंड
केले असे कोण होते? तेच लोक नव्हते का, ज्यांना
मोशेने इजिप्त देशातून बाहेर नेले होते? 17आणि तो (देव)
कोणावर चाळीस वर्षे रागावला होता? ते सर्व तेच नव्हते
काय, ज्यांनी पाप केले आणि ज्यांची प्रेते अरण्यात पडली
होती.
18कोणाविषयी देवाने अशी शपथ वाहिली की ते माझ्या
विसाव्याच्या ठिकाणी प्रवेश करणार नाहीत? ज्यांनी त्याच्या
आज्ञा मोडल्या तेच नव्हते काय? 19म्हणून आपण पाहतो
की, ते लोक देवाच्या विसाव्याच्या ठिकाणी त्यांच्या
अविश्वासामुळे येऊ शकले नाहीत.

4 ज्याअर्थी देवापासून मिळालेले अभिवचन जे त्याच्या
विसाव्याच्या ठिकाणी प्रवेश करण्यासाठीचे आहे,
ते अजून तसेच आहे. म्हणून तुमच्यापैकी कोणीही ते
चुकवू नये म्हणून काळजी घ्या. 2कारण आम्हालासुद्धा
सुवार्ता सांगितली गेली आहे ज्याप्रमाणे ती इस्राएल लोकांना
सांगण्यात आली होती. परंतु जो संदेश त्यांनी ऐकला
त्यापासून त्यांना फायदा झाला नाही कारण तो संदेश
त्यांनी ऐकला पण त्यांनी विश्वासाने स्वीकारला नाही.
3ज्या आम्ही विश्वास ठेवला ते पवित्र शास्त्रात
लिहिल्याप्रमाणे त्या विसाव्याच्या ठिकाणी प्रवेश करणार
आहोत. जसे देवाने म्हटले आहे,

"म्हणून मी माझ्या रागाच्या भरात अशी शपथ वाहून
म्हणालो, 'ते माझ्या विसाव्याच्या ठिकाणी कधीच प्रवेश
करणार नाहीत'"

*स्तोत्र. 95:11*

जगाच्या निर्मितीपासूनचे त्याचे काम संपलेले होते तरी तो
असे म्हणाला. 4कारण पवित्र शास्त्रात तो सातव्या दिवसा
बद्दल असे बोलला आहे की: "आणि सातव्या दिवशी
देवाने त्याच्या सर्व कामापासून विश्रांति घेतली." * 5आणि
पुन्हा या वचनांमध्ये तो म्हणतो, "ते माझ्या विसाव्याच्या
ठिकाणी कधीही प्रवेश करणार नाहीत"
6ज्यांना अगोदर सुवार्ता सांगण्यात आली होती त्यांचा
त्यांच्या अविश्वासामुळे त्यात प्रवेश झाला नाही, तरी हे
खरे आहे की, काही जणांचा त्या विसाव्यात प्रवेश होणार
आहे. 7त्यांच्यासाठी देवाने पुन्हा एक वेळ निश्चित केली
असून त्याला तो "आज" असे म्हणतो, अगोदरच उद्धृत
केलेल्या उताऱ्यामध्ये म्हटल्याप्रमाणे देव त्या दिवसाविषयी
पुष्कळ वर्षांनी दाविदाद्वारे बोलला:

"आज, जर तुम्ही त्याची वाणी ऐकाल, तर आपली
अंत:करणे कठीण करू नका." *स्तोत्र. 95:7-8*

8कारण जर यहोशवा त्यांना देवाने दिलेल्या विसाव्याच्या
ठिकाणी घेऊन गेला, तर देव दुसऱ्या दिवसाबद्दल पुन्हा
बोलला नसता. 9म्हणून देवाच्या लोकांसाठी अजूनही
सातवा म्हणजे विसाव्याचा दिवस आहे. 10कारण जो कोणी
देवाच्या विसाव्याच्या ठिकाणी प्रवेश करतो, तो त्याच्या
स्वत:च्या कामापासून विसावा घेतो. ज्याप्रमाणे देवाने
त्याच्या कामापासून विसावा घेतला होता. 11म्हणून त्या
विसाव्याच्या ठिकाणी प्रवेश करण्यासाठी आपण सर्वतोपरी
प्रयत्न करू या. यासाठी की, कोणीही इस्राएल लोकांनी
आज्ञाभंग केल्याप्रमाणे त्यांचे अनुकरण करू नये.
12कारण देवाचे वचन जिवंत आणि कार्य करणारे
आहे आणि कोणत्याही दुधारी तरवारीपेक्षा अधिक धारदार
आहे. ते आपला आत्मा, जीव, सांधे, आणि मज्जा यांना
भेदून आरपार जाणारे आहे. ते अंत:करणाचे विचार व
कल्पना यांचे परीक्षक असे आहे. 13आणि कोणतीही
अशी निर्मित गोष्ट नाही की जी त्याच्यापासून लपलेली
आहे आणि ज्याच्यापाशी आम्हांला सर्व गोष्टींचा हिशेब
द्यावयाचा आहे. त्याच्यासमोर सर्व गोष्टी उघड व स्पष्ट
अशा आहेत.

### देवासमोर येण्यास येशू आपणांस मदत करतो

14म्हणून, ज्याअर्थी आम्हाला येशू देवाचा पुत्र हा महान
मुख्य याजक लाभला आहे व जो स्वर्गात गेला आहे,

---

**आणि ... घेतली** उत्पति 2:2

असा जो विश्वास आपण गाजवितो तो अखंडपणे भक्कम धरू या. 15कारण आपल्याला लाभलेला महान याजक असा नाही, जो आपल्या अशक्तपणाबद्दल सहानुभूति दर्शविण्यास असमर्थ आहे. पण आपल्याला असा याजक लाभला आहे की, जो आमच्यासारखाच सर्व प्रकारच्या मोहाच्या अनुभवातून गेला. तरीही तो पूर्णपणे निष्पाप राहिला. 16म्हणून आपण त्याच्या कृपेच्या सिंहासनाजवळ ठाम निर्धाराने जाऊ या. यासाठी की, आमच्या गरजेच्या वेळी साहाय्य मिळावे म्हणून आम्हाला दया व कृपा प्राप्त व्हावी.

5 प्रत्येक मुख्य याजकाची निवड लोकांमधून होते. आणि लोकांच्या वतीने त्यांच्या पापांसाठी जी दाने व अर्पणे देवाला सादर केली जातात, त्या कामाकरिता मुख्य याजक नेमलेला असतो. 2प्रत्येक मुख्य याजक हे जे चुका करतात व जे अज्ञानी आहेत त्यांच्याशी सौम्यपणे वागण्यास असमर्थ असतो कारण तो स्वत: दुबळा असतो. 3आणि त्या दुबळेपणामुळे त्याने त्याच्या पापांसाठी तसेच लोकांच्या पापांसाठी अर्पणे केलीच पाहिजेत. 4आणि कोणीही मुख्य याजकपणाचा बहुमान स्वत:च्या पुढाकाराने घेत नसतो, तर अहरोनाला होते तसे त्यालाही देवाचे पाचारण असणे आवश्यक असते. 5त्याचप्रमाणे, ख्रिस्ताने मुख्य याजक होण्याचा गौरव स्वत:हून आपणावर घेतले नाही, परंतु देव ख्रिस्ताला म्हणाला,

"तू माझा पुत्र आहेस आज मी तुला जन्म दिला आहे."
*स्तोत्र. 2:7*

6दुसऱ्या शास्त्रभागात तो असे म्हणतो,

"मलकीसदेकाप्रमाणे तू अनंतकाळासाठी याजक आहेस"
*स्तोत्र. 110:4*

7येशूच्या पृथ्वीवरील जीवनाच्या काळात, त्याने देवाकडे मोठ्याने ओरडून आणि रडून प्रार्थना व विनंत्या केल्या. जो देव त्याला मृत्युपासून वाचवू शकत होता. आणि देवाविषयीच्या त्याच्या सन्माननीय आदरामुळे येशूच्या प्रार्थना ऐकल्या गेल्या.

8जरी तो पुत्र होता, तरी त्याने ज्या गोष्टी सोशिल्या त्यापासून तो आज्ञाधारकपणा शिकला. 9आणि नंतर त्याला परिपूर्ण केल्यावर, जे त्याच्या आज्ञा पाळतात त्यांच्यासाठी अनंतकाळच्या तारणासाठी तो उगम झाला 10व मलकीसदेकाच्या संप्रदायास अनुसरून देवाकडून तो प्रमुख याजक म्हणून नियुक्त झाला.

11याविषयी सांगण्यासारखे पुष्कळ आहे, पण तुम्हांला ते स्पष्ट करणे कठीण आहे. कारण तुम्ही ऐकण्यात खूप मंद झाला आहात. 12आतापर्यंत तुम्ही शिक्षक व्हायला हवे होते, तरी देवाच्या शिक्षणाचे प्राथमिक धडे पुन्हा तुम्हाला कोणीतरी शिकविण्याची गरज आहे. तुम्हांला दुधाची गरज आहे, सकस अन्नाची नव्हे! 13कारण जो कोणी अजून दुधावरच जगतो त्याला वचनाच्या पोक्त शिक्षणाची काहीही माहिती नसते. कारण अजून तो बाळच असतो. 14परंतु याउलट सकस अन्न हे प्रौढांसाठी योग्य असते. ख्रिस्ती लोकांची इंद्रिये ख्रिस्ती जीवनाच्या सरावामुळे चांगले व वाईट यांतील भेद ओळखण्यास तयार झालेली असतात.

6 म्हणून ख्रिस्ताविषयीची प्राथमिक माहिती आपण मागे सोडून देऊ व प्रौढतेप्रत जाऊ. 2पुन्हा एकदा देवावरचा विश्वास, बाप्तिस्म्याविषयीची* शिकवण, डोक्यावर हात ठेवणे, मृतांचे पुनरुत्थान आणि अनंतकाळचा न्यायनिवाडा, देवावरील विश्वास, आपल्या निर्जीव गतजीवनाचा पश्चात्ताप या मूलभूत गोष्टींचा पाया आपण पुन्हा घालू नये. 3आणि जर देवाची इच्छा असेल तर आपण पूर्ण ख्रिस्तीपणापर्यंत जाऊ. 4ज्यांना स्वर्गीय दानांचा अनुभव आलेला आहे व जे पवित्र आत्म्याचे भागीदार झाले आहेत, त्यांना पुन्हा पश्चात्तापाकडे नेणे अशक्य आहे. 5तसेच देवाच्या वचनाची गोडी अनुभवली आहे, व येणाऱ्या युगाच्या सामर्थ्याचा अनुभव आहे आणि 6त्यानंतर ख्रिस्तापासून जर ते दूर गेले तर त्यांना पश्चात्तापाकडे वळविणे अशक्य आहे, कारण त्याच्या स्वत:च्या हानीकरता ते देवाच्या पुत्राला पुन्हा वधस्तंभावर खिळतात व लोकांच्या अवकृपेच्या समोर त्याला आणतात.

7जी जमीन वेळोवेळी पडणाऱ्या पावसाचे पाणी पिते व ज्या लोकांकडून तिची लागवड होते त्यांच्यासाठी धान्य उपजविते तिला देवाकडून आशीर्वाद प्राप्त होतो. 8पण जी जमीन काटे व कुसळे उपजविते, ती निरुपयोगी आहे व तिला शाप मिळण्याची भिति असते; तिचा अग्नीने नाश होईल.

9बंधूंजनहो, आम्ही या गोष्टी तुम्हाला सांगत आहोत, पण खरोखर आम्ही तुमच्याकडून अधिक चांगल्याची अपेक्षा करतो. आम्हांला अशी खात्री आहे की, ज्या तारणाचा भाग असलेल्या गोष्टी आहेत त्या तुम्ही कराल. 10कारण तुम्ही केलेली पवित्रजनांची सेवा, त्या सेवेत तुम्ही अजूनही दाखवीत असलेले सातत्य, तुमचे काम व त्याच्या लोकांना दानाद्वारे व इतर मदत करण्याद्वारे तुम्ही त्याच्यावर केलेले प्रेम ही सर्व विसरण्याइतका देव अन्यायी नाही. 11पण आमची अशी इच्छा आहे की, तुमच्या आशेच्या पूर्तीची पूर्ण खात्री होण्याकरिता तुमच्यातील प्रत्येकाने शेवटपर्यंत कार्याची अशीच आवड दाखवावी. 12आम्हांला असे वाटते की, तुम्ही आळशी बनू नये. तर जे लोक विश्वासाद्वारे व धीराद्वारे देवाने दिलेल्या अभिवचनाचे

**बाप्तिस्मा** या ठिकाणी याचे दोन अर्थ होऊ शकतात. दोन्हीपैकी एक. (1) याचा ख्रिस्ती बाप्तिस्मा (काही क्षणाकरिता पाण्यात बुडविणे किंवा (2) यहूदी विधिपूर्वक धुण्याची पद्धत.

फळ मिळवितात अशा लोकांचे अनुकरण करणारे तुम्ही
व्हावे.
13जेव्हा देवाने अब्राहामाला वचन दिले, तेव्हा त्याच्यापेक्षा
कोणी मोठा नसल्याने देवाने स्वतःच्याच नावाने शपथ
वाहिली. 14तो म्हणाला, "मी तुला भरपूर आशीर्वाद देईन
आणि मी तुझ्या वंशजांना सतत बहुगुणित करीत राहीन."
15म्हणून धीराने वाट पाहिल्यानंतर देवाने जे वचन
त्याला दिले होते ते त्याला प्राप्त झाले. 16लोक, नेहमी
शपथ वाहताना आपल्यापेक्षा जो मोठा असतो त्याच्या
नावाचा उपयोग करतात. कारण शपथ ही विदित केलेल्या
सत्याची खात्री पटविणे व सर्व वादाचा शेवट करणे यासाठी
असते. 17आपल्या योजनेचे कधीही न बदलणारे स्वरूप
वचनाच्या वारसदारांना कळावे अशी देवाची इच्छा आहे.
म्हणून त्याने वाहिलेल्या शपथेच्या द्वारे याबाबत हमी दिली.
18देवाने असे केले यासाठी की, ज्यांच्याविषयी लबाडी
करणे देवासाठी अशक्य आहे अशा दोन न बदलणाऱ्या
कृतींमुळे (त्याचे वचन व शपथ) जे आपण आश्रयाकरिता
निघालो आहोत, त्या आपणांस त्या आशेसंबधाने अधिक
उत्तेजन प्राप्त व्हावे. 19आम्हांला ही आशा जणू काय भक्कम,
सुरक्षित अशा नांगरासारखी आत्म्याला आहे व ही आशा
मंदिराच्या पडद्यामागील आतील बाजूस प्रवेश करते, 20जेथे
आमच्यापुढे धावत येशू आमच्यासाठी आत गेलेला आहे.
तो मलकीसदेकाप्रमाणे अनंतकाळासाठी मुख्य याजक
झाला आहे.

## मुख्य याजक मलकीसदेक

7 हा मलकीसदेक शालेमाचा राजा होता. आणि तो
सर्वोच्च देवाचा याजक होता. राजांचा पराभव करून
अब्राहाम परतत असताना मलकीसदेक त्याला भेटला.
मलकीसदेकाने त्याला आशीर्वाद दिला. 2व अब्राहामाने
आपल्या सर्वस्वाचा दहावा भाग त्याला (मलकीसदेकाला)
दिला. मलकीसदेकाच्या नावाचा अर्थ "नीतिमत्त्वाचा राजा"
त्याचप्रमाणे तो शालेमाचा राजा असल्याने त्याचा अर्थ
"शांतीचा राजा" असा होतो. 3मलकीसदेकाचे आईवडील
किंवा त्याचे पूर्वज, त्याचा जन्म किंवा मृत्यूची नोंद आढळत
नाही. देवपुत्राच्या प्रतिमेशी तो हुबेहूब मिळताजुळता
असल्यामुळे तो देखील अनंतकाळासाठी याजकच राहणार
आहे.
4यावरून तुम्ही पाहता की, मलकीसदेक किती महान
पुरुष होता! मूळ पुरुष अब्राहाम यानेसुद्धा आपल्या लुटीतील
दहावा भाग त्याला दिला. 5आणि लेवीचे वंशज जे याजक
झाले त्यांनी मोशेच्या नियमशास्त्रातील आज्ञेप्रमाणे
लोकांकडून (आपल्या सहोदरांकडून), जरी ते अब्राहामाचे
वंशज होते तरी, दशांश गोळा करावा. 6मलकीसदेक
लेव्याच्या वंशजांपैकी नव्हता, पण तरीही त्याने
अब्राहामाकडून दशमांश घेतला. आणि ज्याला देवाकडून
अभिवचन मिळाले होते, त्याला (अब्राहामाला) त्याने
आशीर्वाद दिला. 7यामध्ये कोणत्याही प्रकारचा संशय नाही
की, श्रेष्ठ व्यक्ती कनिष्ठाला आशीर्वाद देते. 8एका बाबतीत
म्हणजेच लेव्यांच्या बाबतीत, जो मनुष्य मरतो तो दशमांश
गोळा करतो, पण दुसऱ्या बाबतीत म्हणजे मलकीसदेकाच्या
बाबतीत, पवित्र शास्त्रात लिहिल्याप्रमाणे दशमांश अशा
व्यक्तीने घेतला की जी अजूनही जिवंत आहे. 9एखादा
असेही म्हणू शकतो की, लेवी जे दशमांश गोळा करीत,
प्रत्यक्षात तेही अब्राहामाद्वारे मलकीसदेकाला दशमांश देत.
10कारण जेव्हा मलकीसदेक अब्राहामाला भेटला त्यावेळी
लेवी जणू त्याचा पूर्वज अब्राहाम याच्या शरीरात बीजरूपाने
होता.
11लेवीय वंशजांच्या याजकीय पद्धतीने लोकांना
नियमशास्त्र दिले गेले पण तशा प्रकारच्या याजकीय पद्धतीने
लोक धार्मिकदृष्ट्या परिपूर्ण बनू शकले नसते. म्हणून
आणखी एका याजकाच्या येण्याची आवश्यकता होती. तो
अहरोनासारखा नसून मलकीसदेकासारखा हवा होता.
12कारण जेव्हा याजकपणात बदल होतो तेव्हा
नियमशास्त्रसुद्धा बदलणे अपरिहार्य होते. 13कारण या
सर्व गोष्टी ज्याच्याबद्दल सांगितल्या आहेत, तो लेवी वंशापेक्षा
वेगळ्या वंशाचा आहे. व त्याच्या (लेवीच्या) वंशातील
कोणीही वेदीजवळ अशा प्रकारची याजकीय सेवा केलेली
नाही. 14हे स्पष्ट आहे की, आमचा प्रभु यहूदा वंशातील
होता आणि या वंशासंबंधी याजकपणाबद्दल मोशेने काहीही
सांगितले नाही.

## येशू हा मलकीसदेक याजकासारखा आहे

15आणि जेव्हा या दुसऱ्या प्रकारचा नवीन याजक
मलकीसदेकासारखा येतो तेव्हा ही गोष्ट आणखी स्पष्ट
होते. 16मानवी नियमशास्त्राच्या हुकूमाने येशूला याजक
करण्यात आले नव्हते तर अक्षय जीवनाच्या सामर्थ्याच्या
आधारे त्याला याजक करण्यात आले. 17कारण
अशाप्रकारे त्याच्याविषयी पवित्र शास्त्रात लिहिले आहे:
"तू मलकीसदेकासारखा अनंतकाळासाठी याजक
आहेस"*
18जुना नियम बाजूला ठेवण्यात आला आहे, कारण
तो दुबळा व निरुपयोगी होता. 19कारण नियमशास्त्रामुळे
कोणतीच गोष्ट पूर्ण झाली नाही आणि आता एक अधिक
चांगली आशा आम्हांला देण्यात आली आहे, जिच्यामुळे
आम्ही देवाजवळ येतो. 20हेसुद्धा महत्त्वाचे आहे की देवाने
येशूला मुख्य याजक करताना शपथेशिवाय केले नाही.
जेव्हा इतरांना याजक करण्यात आले तेव्हा त्यांना
शपथेशिवाय याजक करण्यात आले. 21पण येशू जेव्हा
याजक बनला तेव्हा तो शपथेने बनला. ज्याने त्याला
सांगितले की,

---

**तू ... आहेस** स्तोत्र. 110:4

"प्रभूने शपथ वाहिली आहे, आणि तो आपले मत बदलणार नाही: 'तू अनंतकाळचा याजक आहेस.'"

*स्तोत्र. 110:4*

22याचा अर्थ असा की, येशू हा अधिक चांगल्या कराराची खात्री आहे. 23तसेच, इतर पुष्कळ मुख्य याजक होते. परंतु मरणामुळे पुढे ते याजकपद चालवू शकले नाही. 24त्याचे याजकपद कायमचे आहे, कारण तो सर्वकाळ राहतो. 25म्हणून, जे त्याच्याद्वारे देवाकडे येतात त्यांना तो अनंतकाळासाठी तारण्यास समर्थ आहे. कारण त्यांच्यासाठी मध्यस्थी करण्यास तो सदैव जिवंत आहे.

26म्हणून येशू अगदी आपल्या गरजांस अनुरूप असा मुख्य याजक आहे, ज्याची आम्हाला गरज आहे. तो पवित्र, निष्कपट आणि निष्कलंक आहे; दोषविरहित आणि शुद्ध आहे, तो पाण्यांपासून वेगळा केलेला आहे. त्याला आकाशाहूनही उंच केलेले आहे.

27दुसरे मुख्य याजक जसे दररोज अर्पणे अर्पण करतात तसे करण्याची त्याला गरज नाही. जे इतर याजक पहिल्यांदा त्यांच्या पापांसाठी व मग लोकांच्या पापांसाठी जसे अर्पण करतात तसे त्याला करण्याची गरज नाही. त्याने जेव्हा स्वत:ला अर्पण केले त्याचवेळी एकदाच व कायमचेच अर्पण केले आहे. 28कारण नियमशास्त्र मानवी दुर्बलता असलेल्या मनुष्याची मुख्य याजक म्हणून नेमणूक करते. परंतु नियमशास्त्रानंतर शपथेचे वचन देण्यात आल्यामुळे पुत्र हा सर्वकाळासाठी परिपूर्ण असा मुख्य याजक झाला.

## येशू आपला मुख्य याजक

8 आम्ही जे सांगत आहोत त्याचा मुद्दा असा आहे की: असा मुख्य याजक आम्हांला लाभलेला आहे की, जो स्वर्गामध्ये देवाच्या सिंहासनाच्या उजव्या बाजूस बसतो, 2आणि कोणत्याही मानवनिर्मित मंडपात नव्हे, तर प्रभु परमेश्वराने बनविलेल्या खऱ्याखुऱ्या मंदिराच्या परमपवित्रस्थानात तो मुख्य याजकाची सेवा करतो. 3प्रत्येक मुख्य याजक जो नेमलेला असतो, त्याला दाने व अर्पणे सादर करावी लागतात. म्हणून आपल्या ह्या मुख्य याजकालादेखील काहीतरी सादर करणे जरुरीचे होते. 4जर तो पृथ्वीवर असता तर तो मुख्य याजकदेखील झाला नसता. कारण तेथे अगोदरचे नियमशास्त्राप्रमाणे दानांचे अर्पण करणारे आहेत. 5ते जी कामे करतात, ती स्वर्गातील गोष्टींची नक्कल आणि छाया अशी आहेत. परमेश्वराचा मंडप घालीत असताना देवाने मोशेला जो आदेश दिला, तशी ही सेवा आहे, कारण देव म्हणाला, "तुला पर्वतावर मी जो नमुना दाखविला त्या सूचनांबरहुकूम प्रत्येक गोष्ट कर."

6परंतु येशूला नेमून दिलेली याजकीय सेवा मुख्य याजकांच्या सेवेहून जशी फारच वरच्या दर्जाची आहे, तसाच येशू ज्या नवीन कराराचा मध्यस्थ आहे, तो करार अगोदरच्या करारापेक्षा अधिक वरच्या दर्जाचा आहे, कारण तो करार अधिक चांगल्या वचनांच्या पायावर उभा आहे.

7जर पूर्वीचा करार दोषविरहित असता तर त्याच्या जागी दुसऱ्या कराराची गरज भासली नसती. 8परंतु देवाला लोकांमध्ये दोष आढळला. तो म्हणाला, "परमेश्वर म्हणतो,

असे दिवस येत आहेत, जेव्हा मी इस्राएल लोकांबरोबर नवा करार करीन व यहूदाच्या घराण्याशी नवा करार करीन.

9ज्याप्रमाणे मी त्यांच्या पूर्वजांशी केला तशा प्रकारचा हा करार असणार नाही. त्या दिवशी मी त्यांच्या हाताला धरून इजिप्त देशातून बाहेर आणले, ते माझ्याशी केलेल्या कराराशी विश्वासू राहिले नाही, त्यामुळे मी त्यांच्याकडे पाठ फिरवली.

10परमेश्वर म्हणतो, "त्या दिवसांनंतर मी इस्राएल लोकांबरोबर असा करार करीन; मी माझे नियम त्यांच्या अंत:करणात घालीन, त्यांच्या हृदयांवर ते लिहीन, मी त्यांचा देव होईन, ते माझे लोक होतील.

11तुमच्या प्रभूला ओळखा असे एखाद्या मनुष्याने आपल्या बंधूला अथवा आपल्या देशबांधवाला सांगण्याची गरज पडणार नाही, कारण त्यांच्यातील कनिष्ठापासून वरिष्ठांपर्यंत सर्वजण मला ओळखतील.

12कारण मी दयाळूपणे यापुढे त्यांचे अपराध माफ करीन. त्यांची पापे विसरून जाईन." *यिर्मया 31:31-34*

13या कराराला नवीन करार म्हटले म्हणून त्याने पहिला करार जुना ठरविला. जे जुने ते निकामी ठरते व नाहीसे होऊन जाते.

## जुन्या कराराप्रमाणे उपासना

9 पहिल्या करारात उपासनेसंबंधी काही नियम होते आणि मनुष्यांनी बनविलेले एक पवित्रस्थान होते. 2कारण दीपस्तंभ व अर्पणाच्या विशेष भाकरी ठेवण्यासाठी पहिल्या मंडपामध्ये एक मेज ठेवण्यात आला होता. हा जो पहिला मंडप होता त्याला पवित्र स्थान असे म्हणतात. 3दुसऱ्या पडद्यामागे एक खोली (मंडप) होती, त्याला परमपवित्रस्थान म्हणत* 4त्यामध्ये ऊद जाळण्यासाठी सोन्याची वेदी होती. आणि कराराची पेटी (कोष).* ही पेटी (कोष) संपूर्ण सोन्याने मढवलेली होती त्या पेटीत (कोषात) एका सोन्याच्या भांड्यात मान्ना होता, तसेच अहरोनाची काठी जिला पाने फुटलेली होती व कराराच्या दगडी पाट्या होत्या. 5या पेटीवर (कोषावर) गौरवाचे

---

**परमपवित्रस्थान म्हणत** अती पवित्र ठिकाण. ज्या ठिकाणी देव मुख्य याजकाला भेटे असे म्हणत.

**पेटी (कोष)** लाकडी पेटी जी सोन्याने मढवलेली होती व जिच्यात देवाने दिलेल्या दहा आज्ञा दिलेल्या दगडी होत्या.

करूबीम दयासनावर* सावली करीत होते. परंतु या
गोष्टींबाबत सविस्तर चर्चा आता आपण करू शकत नाही.
6या व्यवस्थेनुसार याजकगण आपल्या कर्तव्यकर्मासाठी
पहिल्या मंडपात प्रवेश करीत असत. 7पण केवळ एकटा
मुख्य याजकच वर्षातून एकवेदाच दुसऱ्या खोलीत
(मंडपात) जाई, शिवाय तो रक्त घेतल्याशिवाय आत जात
नसे. ते रक्त तो स्वत:साठी (स्वत:च्या पापांसाठी) व
लोकांच्या अज्ञानाच्या पापांसाठी अर्पण करायला आत
जात असे. 8याद्वारे पवित्र आत्मा हे दर्शवितो की, पहिला
मंडप उभा आहे तोपर्यंत परमपवित्रस्थानात जाण्याचा मार्ग
खुला नाही. 9हे सर्व आजच्या काळात प्रतिकात्मक आहे.
याचा अर्थ असा की, देवाला दिलेली दाने व त्याला वाहिलेली
अर्पणे यामुळे उपासकाची सदसद्विवेकबुद्धि परिपूर्ण होऊ
शकत नाही. 10हे विधी केवळ बाह्य बाबी म्हणजे अन्न व
पाणी तसेच निरनिराळ्या प्रकारच्या औपचारिक
धुण्याबाबत संबंधित आहेत.

## नव्या कराराप्रमाणे उपासना

11पण आता ख्रिस्त हा घडून आलेल्या चांगल्या गोष्टींचा
मुख्य याजक म्हणून आला आहे. तो मनुष्याच्या हातांनी
बांधला नव्हता अशा महान तसेच सर्व दृष्टींनी परिपूर्ण
अशा मंडपामध्ये, या निर्मितीमधील, 12बकरे किंवा वासरू
यांचे रक्त घेऊन नव्हे, तर आपले स्वत:चेच रक्त घेऊन
परमपवित्रस्थानात गेला; व त्याने सर्व काळासाठी स्वत:च
एकदाच अर्पण करून आपल्याला कायमचे तारण मिळवून
दिले. 13कारण बकरे व बैल यांचे रक्त; तसेच कालवडीची
राख त्यांच्यावर शिंपडले तर त्याची अपवित्र शरीरे शुद्ध
होतात, 14तर ख्रिस्ताचे रक्त देवासाठी त्याहून कितीतरी
अधिक परिणामकारक अर्पण ठरू शकेल! ख्रिस्ताने
सदाजीवी आत्म्याच्याद्वारे आपल्या स्वत:चे डागविरहित
आणि परिपूर्ण असे अर्पण केले. त्याचे रक्त आपल्या
निर्जीव कर्मांमुळे मरून गेलेली आपली सदसद्विवेकबुद्धि
शुद्ध करील. अशासाठी की, आपण जिवंत देवाची उपासना
करू शकू.
15पहिल्या काळात ज्या चुका झाल्या, त्या चुकांपासून
सुटका व्हावी म्हणून देव आपल्या वचनानुसार
अनंतकालच्या वतनासाठी ज्या लोकांना बोलावितो,
त्यांच्याकरिता ख्रिस्त हा नवीन कराराचा मध्यस्थ झाला
आहे.
16जेथे मृत्यूपत्र केलेले आहे तेथे ते करून ठेवणाराचा
मृत्यू झाला आहे, हे सिद्ध होणे जरुरीचे असते. 17कारण
मृत्युपत्र करणारा जिवंत आहे तोपर्यंत मृत्युपत्र अंमलात
येऊ शकत नाही. 18म्हणून रक्त सांडल्याशिवाय पहिला
करारदेखील अंमलात आला नव्हता. 19कारण
नियमशास्त्राची प्रत्येक आज्ञा सर्व लोकांसमोर जाहीर
केल्यानंतर मोशेने पाण्याबरोबर वासराचे व बकऱ्याचे
रक्त तसेच किरमिजी लोकर आणि एजोबाच्या फांद्या हे
सर्व बरोबर घेतले; आणि ते त्याने नियमशास्त्राच्या
पुस्तकावर आणि सर्व लोकांवर शिंपडले. 20तो म्हणाला,
“जो करार पाळण्याची देवाने तुम्हाला आज्ञा केली होती
त्या कराराचे हे रक्त आहे.” 21त्याचप्रमाणे त्याने मंडपावर
व उपासनेसाठी वापरण्यात येणाऱ्या सर्व वस्तूंवर ते रक्त
शिंपडले. 22खरे पाहता, नियमशास्त्राप्रमाणे जवळजवळ
प्रत्येक गोष्ट रक्ताने धुतलीच पाहिजे आणि रक्त
सांडल्याशिवाय क्षमा मिळत नाही.

## ख्रिस्ताचे अर्पण पाप नाहीसे करते

23म्हणून स्वर्गातील गोष्टींच्या नमुन्याप्रमाणे असलेल्या
वस्तू यज्ञाच्या द्वारे शुद्ध करणे जरुरीचे होते. पण त्याहूनही
अधिक चांगल्या यज्ञाने स्वर्गीय गोष्टीच्या प्रतिमा शुद्ध
केल्या जातात. 24कारण ख्रिस्ताने मानवी हातांनी केलेल्या
पवित्रस्थानात पाऊल ठेवले असे नाही, तर ते स्थान
खऱ्या वस्तूची केवळ प्रतिमाच आहे. देवाच्या समोर हजर
होण्यासाठी खुद्द स्वर्गात त्याने प्रवेश केला. 25जे त्याचे
स्वत:चे नाही असे रक्त घेऊन जसा मुख्य याजक
परमपवित्रस्थानात दरवर्षी जातो तसा ख्रिस्त पुन्हा पुन्हा
परमपवित्रस्थानात गेला नाही. 26तसे असते तर ख्रिस्ताला
जगाच्या स्थापनेपासून स्वत:चे अर्पण पुष्कळ वेळा करावे
लागले असते. परंतु आता युगाच्या शेवटी आपल्या स्वत:ला
अर्पण करून पाप नाहीसे करण्यासाठी तो एकदाच प्रकट
झाला आहे. 27आणि जसे लोकांना एकदाच मरण व
नंतर न्यायासनासमोर येणे नेमून ठेवलेले असते, 28तसाच
ख्रिस्त पुष्कळ लोकांची पापे नाहीशी करण्याकरिता
अर्पणरूपाने केवळ एका वेळेस दिला गेला आणि परत
एकदा, दुसऱ्या वेळेस, त्यांची पापे नाहीशी करावी म्हणून
नव्हे, परंतु जे त्याची आतुरतेने वाट पाहतात त्यांच्यासाठी
दिसेल.

## ख्रिस्ताचे अर्पण आम्हाला परिपूर्ण करते

10 कारण नियमशास्त्र हे भविष्यकाळात येणाऱ्या
चांगल्या गोष्टींची केवळ एक छाया आहे. त्या
सत्याचे ते खरे स्वरूप नव्हे. म्हणून देवाची उपासना
करण्यासाठी जे त्याच्याजवळ येतात त्यांना नियमशास्त्र
त्याच अर्पणांमुळे जी वर्षानुवर्षे पुन्हा पुन्हा केली जातात,
ते कदापि परिपूर्ण करू शकत नाही. 2जर नियमशास्त्र
लोकांना परिपूर्ण करू शकले असते तर यज्ञ अर्पण
करण्याचे थांबले नसते का? कारण उपासना करणारे,
कायमचेच शुद्ध झाले असते आणि त्यानंतर आपल्या
पापांच्या बाबतीत दोषी ठरले नसते.

---

**दयासन** कराराच्या पवित्र कोषाचा वरचा भाग. ज्या जागी
लोकांच्या पापाचे प्रायश्चित्त म्हणून याजक वर्षातून एकदा पशूचे
रक्त टाकीत असे ती जागा.

3पण त्याऐवजी ते यज्ञ दरवर्षी पापांची आठवण करून
देतात. 4कारण बैलांच्या किंवा बकऱ्याच्या रक्ताने पाप
नाहीसे होणे शक्य नाही.
5म्हणून ख्रिस्त जेव्हा या जगात आला, तेव्हा तो म्हणाला,

"तुला यज्ञ किंवा अर्पणे नको होती, पण तू माझ्यासाठी
शरीर तयार केले.
6होमार्पणांनी व पापार्पणांनी तुला आनंद वाटला नाही.
7मग मी म्हणालो, 'हा मी आहे! नियमशास्त्राच्या
गुंडाळ्यामध्ये माझ्याबद्दल लिहून ठेवले आहे, देवा, तुझी
इच्छा पूर्ण करण्यास मी आलो आहे.'" *स्तोत्र. 40:6-8*

8पहिल्याने तो म्हणाला, "तुला यज्ञांनी, अर्पणांनी,
होमार्पणांनी व पापार्पणांनी संतोष वाटत नाही." (जरी
नियमशास्त्रानुसार ही अर्पणे आवश्यक ठरतात
तरीदेखील.) 9मग तो म्हणाला, "हा मी आहे! तुझी इच्छा
पूर्ण करण्यास मी आलो आहे." अशा रीतीने त्याने दुसरी
व्यवस्था करण्यासाठी पहिली रद्द केली. 10देवाच्या
इच्छेनुसार येशू ख्रिस्ताच्या देहाच्या एकदाच झालेल्या
अर्पणाद्वारे आपण शुद्ध करण्यात आलो.
11प्रत्येक यहूदी याजक उभा राहतो आणि दररोज त्याची
धार्मिक कामे करत असतो आणि ज्यामुळे पाप नाहीसे
होत नाही असे यज्ञ तो वारंवार अर्पण करतो. 12परंतु
आपल्या पापांसाठी येशूने त्याच्या देहाचे एकमेव अर्पण
केले. कारण ते सर्वकाळासाठी चांगले होते. तो आता
देवाच्या उजवीकडे बसला आहे. 13आणि आता त्याच्या
शत्रूला त्याच्या पायाखाली घालीपर्यंत तो वाट पाहत आहे.
14कारण अनंतकाळच्या त्याने केलेल्या एका यज्ञाच्या
द्वारे त्याने ज्यांना शुद्ध केले, त्यांना परिपूर्ण केले.
15पवित्र आत्माही याबाबत आपल्याला साक्ष देतो.
पहिल्यांदा तो असे म्हणतो,

16"त्या दिवसानंतर मी त्यांच्याशी हा करार करीन,
असे प्रभु म्हणतो, मी माझे नियम त्यांच्या अंत:करणात
ठेवीन आणि ते त्यांच्या मनावर लिहीन. *यिर्मया 31:33*

17 मग तो म्हणतो,

आणि मी त्यांची पापे व नियमविरहित कृत्ये कधीही
आठवणार नाही." *यिर्मया 31:34*

18जेथे या पापांची क्षमा झाली आहे, तेथे पापाच्या आणखी
अर्पणाची आवश्यकता भासणार नाही.

## देवाच्या जवळ या

19म्हणून बंधु आणि भगिनींनो, येशूच्या रक्ताद्वारे आपण
बिनधास्तपणे परमपवित्र स्थानामध्ये प्रवेश करतो.
20त्याच्या शरीराद्वारे, त्याने उघडलेल्या नवीन आणि जिवंत
अशा मार्गामुळे आपण न भीता परमपवित्रस्थानात पाऊल
ठेवू शकतो. 21आणि देवाच्या घराण्यावर आपल्याला महान
असा मुख्य याजक मिळाला आहे. 22म्हणून आपण आपली
मळीन विवेकबद्धि शुद्ध करण्यासाठी आपल्या मनावर
केलेल्या येशूच्या रक्तसिंचनाने आणि आपली शरीरे पवित्र
पाण्याने धुतल्याने आपण विश्वास, आश्वासन तसेच
तळमळ यांनी भरलेल्या अंत:करणाने देवाच्या जवळ जाऊ.
23आपल्याला जी आशा आहे तिला आपण चिकटून राहू
कारण ज्याने आपल्याला अभिवचन दिले, तो विश्वासू
आहे. 24आपण एकमेकांस समजून घेऊ व प्रेम आणि
चांगली कामे करण्याकरिता एकमेकांना उत्तेजन देऊ.
25आणि काही जणांना जी वाईट सवय असते तसे आपण
एकत्र येण्याचे बंद करू नये, परंतु एकमेकांना उत्तजेन
देऊ या, आणि तो दिवस* जवळ येत असताना तसे
उत्तेजन देण्याची अधिकच गरज आहे.

## ख्रिस्तापासून दूर जाऊ नका

26सत्याचे ज्ञान प्राप्त झाल्यानंतरसुद्धा जर आपण
जाणूनबुजून पाप करीत राहिलो, तर मग पापांसाठी यापुढे
आणखी अर्पण करण्याचे बाकी राहिले नाही.
27पण जे देवाला विरोध करतात त्यांना भयंकर अशा
न्यायनिवाड्याशिवाय व भयंकर अशा भस्म करणाऱ्या
अग्नीशिवाय दुसरे काही शिल्लक राहिले नाही. 28जो
कोणी मोशेचे नियमशास्त्र नाकारतो त्याला दोघा किंवा
तिघांच्या साक्षीच्या आधारे कसलीही दया न दाखविता
मारतात. 29तर मग ज्याने देवाच्या पुत्राला पायाखाली
तुडविले, ज्या रक्ताने त्याला शुद्ध केले त्या रक्ताला अपवित्र
ठरविले आणि ज्याने कृपेच्या आत्म्याचा अपमान केला,
त्या मनुष्याला कितीतरी अधिक शिक्षा मिळेल याचा
विचार करा! 30कारण त्याला ओळखतो तो म्हणतो, "सूड
घेणे माझ्या हाती आहे; मी परतफेड करीन."* पुन्हा तो
असे म्हणतो, "प्रभू आपल्या लोकांचा न्याय करील."*
31जीवंत देवाच्या हाती सापडणे किती भयंकर गोष्ट आहे.

## तुम्ही आपला आनंद व धैर्य गमावू नका

32ते पूर्वीचे दिवस आठवा, जेव्हा नुकताच तुम्हाला
सुवार्तेचा प्रकाश प्राप्त झाला होता, तेव्हा तुम्ही भयंकर
दु:खे सोसली. 33काही वेळा जाहीरपणे तुमचा अपमान
करण्यात आला. आणि वाईट शब्द वापरण्यात आले. तर
काही वेळा ज्यांना अशा रीतीने वागणूक मिळाली त्यांचे
सहभागी व्हावे लागले. 34एवढेच नाही, तर त्यांच्यासाठी
तुम्ही झीजदेखील सोसली. जे तुरूंगात होते त्यांना तुम्ही

---

**तो दिवस** कदाचित ख्रिस्त पुन्हा येईल ती वेळ.

**सूड ... करीन** अनुवाद 32:35

**प्रभु ... करील** स्तोत्र 35:14

मदत केली. त्यांच्या दु:खात सहभागी झाला आणि जे तुमच्याकडे होते ते तुमच्याकडून घेण्यात आले तरी तुम्ही आनंदी होता. कारण तुमच्याजवळ अधिक चांगली व सर्वकाळ टिकणारी संपत्ती आहे, हे तुम्ही जाणून होता.

**35**म्हणून तुमच्यामध्ये जो दृढ विश्वास होता तो सोडू नका. कारण त्यापासून तुम्हाला मोठा लाभ होणार आहे. **36**तुम्ही धीर धरणे जरूरीचे आहे. म्हणजे जेव्हा तुम्ही देवाची इच्छा पूर्ण करून त्याने तुम्हांला दिलेल्या त्याच्या वचनाप्रमाणे तुम्ही प्रतिफळ मिळवावे. **37**आता अगदी थोडक्या अवधीनंतर,

“जो येणारा आहे, तो येईल, तो उशीर लावणार नाही.
**38**परंतु माझा धार्मिक पुरुष विश्वासाने वाचेल आणि जर तो पाठ फिरवील तर माझ्या जिवाला संतोष होणार नाही.”
*हबक्कूक 2:3-4*

**39**परंतु पाठ फिरवून नष्ट झालेल्यांपैकी आपण नाही, तर आपल्या जिवाचे तारण साधून विश्वास बागळणाऱ्यांपैकी आहोत.

## विश्वास

**11** आता विश्वास म्हणजे, आम्ही जी आशा धरतो त्याबद्दलची खात्री, म्हणजे ज्या गोष्टी आपण पाहू शकत नाही त्याबद्दल भरंवसा असणे. **2**यासाठीच म्हणजे त्यांच्या विश्वासासाठीच देवाने पूर्वीच्या लोकांना उंचावले होते. **3**विश्वासामुळेच आम्हांला समजते की, या जगाची निर्मिती देवाच्या आज्ञेने झाली. म्हणून जे काही आता दिसते ते जे दिसत नव्हते त्यापासून निर्माण केले गेले. **4**विश्वासामुळेच हाबेलाने काईनापेक्षा अधिक चांगला यज्ञ देवाला अर्पण केला. देवाने हाबेलाची दाने मान्य केल्यामुळे विश्वासाच्याद्वारे तो धार्मिक म्हणून उंचावण्यात आला, आणि जरी तो मेला असला तरी तो आपल्या विश्वासामुळे अजून बोलतो.

**5**विश्वासामुळे हनोखाला देवाकडे नेण्यात आले, यासाठी की, त्याला मरणाचा अनुभव आला नाही व तो कोणाला सापडला जाऊ नये म्हणून देवाने त्याला दूर नेले. पण तो वर घेतला जाण्यापूर्वी त्याच्याबद्दल साक्ष देण्यात आली की, तो देवाला संतोषवीत असे. **6**आणि विश्वासाशिवाय देवाला संतोषविणे अशक्य आहे. कारण जो कोणी देवाकडे येतो त्याने असा विश्वास धरला पाहिजे की देव आहे आणि जे त्याला शोधतात त्यांना तो बक्षीस देतो. **7**ज्या गोष्टी अजून पाहिल्या नव्हत्या, अशा गोष्टींच्या बाबतीत नोहाला सावधान करण्यात आले होते तेव्हा त्याने विश्वासाने त्याची दखल घेतली. आणि आपल्या कुटुंबाचा बचाव करण्यासाठी जहाज बांधले, विश्वासामुळेच त्याने जगाचा धिक्कार केला आणि विश्वासामुळे लाभणाऱ्या धार्मिकतेचा तो वारस बनला.

**8**जेव्हा देवाने अब्राहामाला पाचारण केले तेव्हा विश्वासानेच त्याने आज्ञापालन केले. आणि त्याला वतन म्हणून जी जागा मिळणार होती त्या जागेकडे तो गेला. आपण कोठे जात आहोत हे त्याला ठाऊक नसतानादेखील तो बाहेर पडला. **9**विश्वासाने तो वचनदत्त देशात एखाद्या उपऱ्यासारखा राहिला. इसहाक व याकोब यांच्यासारखा तोदेखील तंबूत राहिला. कारण ते दोघेही अब्राहामाला दिलेल्या त्याच वचनाचे वारसदार होते. **10**ज्या नगराला मजबूत पाया आहे व ज्याचा प्रयोजक बांधकाम कारागीर स्वत: देव आहे अशा नगराची ते वाट पाहात होते.

**11**आपण दिलेल्या वचनाबाबत देव विश्वासू आहे हे जाणून सारा ही जरी वांझ होती आणि अब्राहामाचे वय लेकरे होण्याच्या अगदी मर्यादेपलीकडे गेले होते, तरी विश्वासाने मुलाला जन्म देण्याची शक्ति त्यांना मिळाली. **12**आणि जवळजवळ मरावयास टेकलेल्या अशा एका अब्राहामापासून आकाशातील ताऱ्यांच्या संख्येएवढी आणि समुद्रकिनाऱ्यावरील वाळूच्या कणांइतकी अगणित संतति जन्मास आली. **13**हे सर्व लोक विश्वासात मरण पावले. देण्यात आलेल्या वचनांचे प्रतिफळ त्यांना प्राप्त झाले नव्हते. परंतु त्यांनी विश्वासाने ते दुरूनच पाहिले व त्याचे स्वागत केले आणि त्यांनी उघडपणे कबूल केले की ते परके आणि प्रवासी आहेत. **14**जे लोक अशा गोष्टी बोलतात ते हेच दर्शवितात की ते त्यांच्या वतनासाठी देश पाहत आहेत. **15**ते जर आपण सोडून आलेल्या देशाबद्दल विचार करीत असते तर त्यांना त्या देशात परत जाण्याची संधी मिळाली असती **16**परंतु ते लोक त्याहून अधिक चांगल्या देशाची म्हणजे स्वर्गाच्या वतनाची इच्छा धरून होते. म्हणून देवाला त्यांचा देव म्हणवून घ्यायला लाज वाटली नाही. कारण त्याने त्यांच्यासाठी एक नगर तयार केले आहे.

**17**जेव्हा देवाने अब्राहामाची परीक्षा पाहिली, तेव्हा विश्वासाने आपला पुत्र इसहाक याला अर्पण केले. होय, ज्याला अभिवचने दिली होती, तो आपला एकुलता एक पुत्र अर्पण करण्यास तयार झाला होता. **18**आणि देवाने त्याला सांगितले होते की, “इसहाकाकडूनच तुझ्या वंशाची वाढ होईल.”*

**19**अब्राहामाचा असा विश्वास होता की, देव मनुष्याला मरणातून पुन्हा उठवू शकतो आणि अलंकारिक भाषेत बोलायचे झाले तर इसहाक त्याला जसा काय मरणातून परत मिळाला.

**20**इसहाकाने विश्वासाने याकोबाला व एसावाला पुढील काळासाठी आशीर्वाद दिले. **21**विश्वासाने याकोब, जेव्हा तो मरत होता, तेव्हा त्याने योसेफाच्या प्रत्येक मुलाला आशीर्वाद दिला आणि आपल्या काठीवर तो टेकला असताना त्याने देवाची उपासना केली. **22**आपल्या आयुष्याच्या शेवटी योसेफ विश्वासाने इस्राएल लोक इजिप्त

---

**इसहाकाकडून ... होईल** उत्पत्ति 2:12

देशाच्या बाहेर जाण्याबाबत बोलला आणि त्याच्या
अस्थिसंबंधी काय करायचे याच्या सूचना त्याने दिल्या.
23जेव्हा मोशे जन्मला तेव्हा विश्वासाने त्याच्या
आईवडिलांनी त्याला तीन महिने लपवून ठेवले कारण
त्यांनी पाहिले की ते बाळ सुंदर आहे आणि राजाज्ञेची
त्यांना भीति वाटली नाही.
24विश्वासाने मोशेने जेव्हा तो मोठा झाला, तेव्हा फारोच्या
कन्येचा पुत्र म्हणवून घेण्याचे नाकारले. 25पापाचे
अल्पकाळ टिकणारे सुख भोगण्यापेक्षा देवाच्या
लोकांबरोबर त्रास सहन करण्याचे त्याने निवडले. 26इजिप्त
देशातील संपत्तीपेक्षा ख्रिस्तासाठी अपमान सहन करणे हे
अधिक मौल्यवान आहे, असे त्याने मानले. कारण तो
पुढे मिळणाऱ्या बक्षीसाकडे पाहत होता. 27राजाच्या रागाची
भिति न बाळगता, मोशेने इजिप्त देश सोडला. जणू काय
न दिसणाऱ्या देवाला पाहत असल्यासारखा त्याने धीर
धरला. 28नाश करणाऱ्याने (देवदूताने) इस्राएल लोकांच्या
प्रथम जन्मलेल्या मुलांपैकी एकालाही हात लावू नये म्हणून
त्याने विश्वासाने वल्हांडण सण पाळला आणि रक्त शिंपडले.
29विश्वासाने त्यांनी जणू काय कोरड्या जमिनीवरून
चालावे, तसा तांबडा समुद्र पार केला. पण जेव्हा इजिप्तच्या
लोकांनी तसे करण्याचा प्रयत्न केला तेव्हा ते बुडाले.
30लोकांनी विश्वासाने सात दिवस फेऱ्या मारल्यावर
यरीहोची भिंत पडली. 31राहाब वेश्येच्या विश्वासामुळेच
ज्या लोकांनी आज्ञा मोडली त्यांच्याबरोबर ती मारली
गेली नाही कारण तिने हेरांचे शांतीने स्वागत केले.
32मी आणखी काय सांगू? गिदोन, बाराक, शमशोन,
इफ्ताह, दावीद, शमुवेल आदि संदेष्टे यांच्याबाबत सांगू
लागलो तर वेळ पुरणार नाही. 33लोकांनी विश्वासाने
राज्ये जिंकली, न्याय स्थापित केला, आणि त्यांना देवाची
अभिवचने मिळाली, त्यांनी सिंहांची तोंडे बंद केली. 34त्यांनी
अग्निचे सामर्थ्य नष्ट केले. तरवारीने मरण्यापासून
बचावले. अशक्तपणात त्यांनी सामर्थ्य मिळविले. ते लढाईत
सामर्थ्यशाली ठरले. आणि त्यांनी परकी सेना मागे हटविली.
35स्त्रियांना त्यांचे मरण पावलेले पुन्हा जिवंत असे मिळाले,
इतरांना वेदना सोसाव्या लागल्या कारण त्यांनी अधिक
चांगले पुनरुत्थान मिळावे म्हणून सुटका करून घेण्यास
नकार दिला. 36काहींना निंदा व चाबकाचा मार सहन
करावा लागला. तर काहींना बेड्या व तुरूंगवास भोगावे
लागले. 37त्यांना दगडमार झाला. करवतीने त्यांना
चिरण्यात आले. त्यांना तरवारीने मारण्यात आले. ते मेंढ्यांचे
व बकऱ्यांचे कातडे पांघरून फिरत राहिले. ते निराधार
झाले. त्यांना अती दबावाखाली भारी पीडा देण्यात आल्या.
38त्यांच्यासाठी जग योग्य नव्हते. ते जंगलात, डोंगरकपारीत,
गुहांमधून व जमिनीतील बिळांतून लपून फिरत राहिले.
39या लोकांना त्यांच्या विश्वासाविषयी चांगले बोलण्यात
आले पण देवाने त्यांना जे अभिवचन दिले होते ते त्यांना
मिळाले नाही. 40देवाने आमच्यासाठी काहीतरी अधिक
चांगली योजना तयार केली होती यासाठी की
आमच्याबरोबर त्यांनाही परिपूर्ण करावे.

## येशूचे उदाहरण आपणसुध्दा अनुसरावे

12 म्हणून, विश्वास धरणारे पुष्कळ ढगांसारखे
साक्षीदार सभोवती असल्याने आपल्याला अडथळा
आणणाऱ्या सर्व गोष्टी तसेच सहजासहजी गुंतविणारे पाप
आपण दूर फेकू या व जी शर्यत आपल्यासमोर आहे ती
शर्यत आपण चिकाटीने पूर्ण करू. 2जो आमचे विश्वासात
नेतृत्व करतो आणि पूर्णत्वास नेतो त्या येशूवर आपले
लक्ष केंद्रित करू या. जो आनंद त्याच्यासमोर होता त्यासाठी
येशूने वधस्तंभ सहन केला होता. वधस्तंभावरील निंदास्पद
मरणाला त्याने तुच्छ मानले आणि आता त्याने देवाच्या
सिंहासनाजवळील उजवीकडे जागा घेतली आहे. 3तुम्ही
खचून जाऊ नये आणि धीर सोडू नये म्हणून पापी लोकांचा
मोठ्या प्रमाणातील विरोध सहन केला. त्याचा विचार
करा. 4पापाविरुद्धच्या तुमच्या युद्धात तुम्ही रक्त सांडेपर्यंत
अजून झगडा दिला नाही. 5ज्याच्याकडून तुम्हांला उत्तेजन
मिळेल असा जो शब्द (मुले) तुम्हाला उद्देशून वापरण्यात
आला आहे त्याचा कदाचित तुम्हाला विसर पडलेला दिसतो:
"माझ्या मुला, प्रभूच्या शिस्तीचा अनादर करू नको,
आणि जेव्हा तो तुला ताव्यावर आणतो, तेव्हा तू धीर
सोडू नको
6कारण ज्याच्यावर प्रभु प्रेम करतो, त्यांना तो शिस्त
लावतो आणि ज्यांना तो आपले पुत्र म्हणून स्वीकारतो,
त्यांना तो शिक्षा करतो."

*नीतिसूत्रे 3:11-12*

7हा कठीण समय आहे म्हणून शिस्त सहन कर. ते
असे दर्शविते की, देव तुम्हांला मुलांसारखी वागणूक देत
आहे; कारण असा कोणता मुलगा आहे ज्याला वडील
शिस्त लावीत नाहीत? 8जर तुम्हांला शिस्त लावलेली
नाही तर जसा इतर सर्व मुलांचा अनुभव असतो तसे
तुम्ही अनौरस मुले आहात आणि तुम्ही खरे पुत्र नाही.
9याशिवाय आम्हा सर्वांना जगिक पिता असताना त्यांनी
आम्हाला शिस्त लावली आणि त्याबद्दल आम्ही त्यांचा
आदर राखला. तर मग आम्ही आमच्या आध्यात्मिक
पित्याच्या किती तरी अधिक प्रमाणात अधीन होऊन
जगले पाहिजे बरे? 10आमच्या मानवी वडिलांनी त्यांच्या
दृष्टीने अती उत्तम अशी शिस्त थोड्या काळासाठी लावली.
पण देव आम्हाला आमच्या चांगल्यासाठी शिस्त लावतो,
यासाठी की, त्याच्या पवित्रपणात आपणही वाटेकरी व्हावे.
11शिक्षेने शिस्त लावण्याच्या वेळेस कोणतीही शिक्षा चांगली
वाटत नाही, तर दुःखाची वाटते. पण नंतर ज्या लोकांना
शिस्तीचे धडे शिकायला मिळाले आहेत, त्यांना
धार्मिकपणाच्या आणि शांतीच्या जीवनाची फळे चाखण्याची
संधि मिळते.

### आपण कसे जगतो याविषयी जागरूक राहा

12म्हणून तुमचे गळून गेलेले हात उंच करा आणि तुमचे अशक्त गुडघे बळकट करा! 13तुमच्या पावलांकरिता सरळ रस्ता तयार करा, यासाठी की, लंगडे पाय निकामी होऊ नयेत, तर उलट ते बरे व्हावेत.

14सर्व लोकांबरोबर शांतीने राहण्याचा प्रयत्न करा व पवित्र जीवन जगण्याचा प्रयत्न करा. कारण त्याशिवाय (पवित्रतेशिवाय) कोणालाही प्रभूला पाहता येणार नाही. 15कोणीही देवाची कृपा चुकवू नये, यासाठी तिकडे लक्ष द्या आणि इकडे लक्ष द्या की, कोणतेही कडूपणाचे मूळ वाहून त्यापासून समस्या निर्माण होऊ नये व इतर लोकांची मने कलुषित करू नये, म्हणून जपा. 16कोणीही व्यभिचारी असू नये किंवा एका जेवणापायी आपला वडीलकीचा हक्क विकून टाकणाऱ्या एसावासारखे जगिक विचाराचे असू नये याकडे लक्ष द्या. 17नंतर तुम्हाला माहीत आहे जेव्हा त्याला वारसहक्काने आशीर्वाद अपेक्षित होता, तेव्हा तो नाकारण्यात आला. जरी त्याने रडून आशीर्वाद मिळविण्याचा प्रयत्न केला. तरी आपल्या वडिलाचे मन तो बदलू शकला नाही.

18ज्या पर्वताला हाताने स्पर्श करता येतो; जो अग्नीच्या ज्वालांनी पेटलेला आहे, जो अंधार, दु:ख व वादळ यांनी भरलेला आहे. अशा पर्वताकडे तुम्ही आला नाही. तर एका नविन ठिकाणी आला आहात. 19कर्ण्याच्या आवाजाजवळ तुम्ही आला नाहीत किंवा शब्द उच्चारणाऱ्याच्या वाणी याजवळ तुम्ही आला नाही. असा आवाज ज्यानी ऐकला त्यानी अशी विनंती केली की, त्यांनी यापुढे आणखी वाणी ऐकवू नये. 20कारण ते जी आज्ञा केली होती सहन करू शकले नाहीत. "जर एखाद्या प्राण्याने जरी पर्वताला स्पर्श केला तरी त्याला दगडमार करण्यात यावा."*

21खरोखर ते दृश्य इतके भयंकर होते की, मोशे म्हणाला, "भीतीमुळे मी थरथर कांपत आहे."*

22परंतु तुम्ही सीनाय पर्वताजवळ जिवंत देवाच्या नगराजवळ आणि स्वर्गीय यरुशलेम येथे आलेले आहात आणि तुम्ही आनंदाने जमा झालेल्या हजारो देवदूतांजवळ आलेले आहात. 23आणि तुम्ही प्रथम जन्मलेल्या मुलांच्या मंडळीकडे, ज्यांची नावे स्वर्गात लिहिली आहेत अशांकडे आला आहात, आणि तुम्ही देव जो सर्वांचा न्यायाधीश आहे त्याच्याकडे आला आहात, आणि तुम्ही नीतिमान लोकांच्या आत्म्यांकडे जे पूर्ण आहेत त्यांच्याकडे आला आहात. 24आणि तुम्ही जो नव्या कराराचा मध्यस्थ येशू त्याच्याकडे आला आहात, आणि तुम्ही शिंपडण्यात आलेल्या रक्ताकडे आलात की जे रक्त हाबेलाच्या रक्तापेक्षा अधिक चांगल्या गोष्टी सांगते.

25जो बोलतो त्याचे ऐकण्यासाठी नकार देऊ नका. त्याविषयी खात्री असू द्या. ज्याने पृथ्वीवर त्यांना सावध राहण्याविषयी सांगताना त्याचे ऐकायचे नाही असे ज्यांनी ठरविले ते लोक जर सुटू शकले नाहीत तर मग जो स्वर्गातून सावध करतो, त्याच्याकडे दुर्लक्ष केले तर आम्हाला सुटकेसाठी कोणता मार्ग राहीला बरे?

26त्यावेळेस त्याच्या आवाजाने भूमि हादरली पण आता त्याने असे अभिवचन दिले आहे की, "पुन्हा एकदा मी केवळ पृथ्वीच नव्हे तर आकाशही हादरवून टाकीन."*

27"पुन्हा एकदा" हे शब्द हेच दर्शवितात की, ज्या गोष्टी उत्पन्न केलेल्या आहेत त्या काढून टाकण्यात येतील. ज्या गोष्टी हलविता येत नाहीत त्या तशाच राहतील. 28म्हणून, आम्हाला अढळ असे राज्य देण्यात येत असताना आपण त्याविषयी कृतज्ञता बाळगू या, आणि आदराने व भयभीत होऊन देवाला मान्य होईल अशी त्याची उपासना करू. 29कारण आपला देव भस्म करणारा अग्नि आहे.

13 ख्रिस्तामध्ये एकमेकांवर अखंडपणे बंधु व भगिनीसारखी प्रीति करा. 2पाहुणचार करण्याचे विसरू नका. असे करण्याने काहींनी त्यांच्या नकळत देवदूतांचे स्वागत केले आहे. 3तुम्ही स्वत: त्यांच्याबरोबर तुरुंगात होता असे समजून जे तुरुंगात आहेत त्यांची आठवण करा. तुम्हीही देहात असल्याने जे दु:ख भोगीत आहेत त्यांची आठवण ठेवा.

4सर्वांनी लग्नाचा आदर करावा. व वैवाहिक अशुद्धता असू नये. कारण जे व्यभिचारी व विषयवासनेबद्दल भ्रष्ट आहेत अशा लोकांचा देव न्याय करील. 5आपले जीवन पैशाच्या लोभापासून दूर ठेवा व तुमच्याकडे जे आहे त्यातच समाधान माना. कारण देवाने असे म्हटले आहे,

> "मी कधीही तुला सोडणार नाही, मी कधीही तुला त्यागणार नाही" *अनुवाद 31:6*

6म्हणून आपण खात्रीने म्हणू शकतो

> "देव माझा साहायकर्ता आहे, मी भिणार नाही. मनुष्य माझे काय करणार?" *स्तोत्र. 118:6*

7ज्यांनी तुम्हांला देवाचा संदेश दिला त्या पुढाऱ्यांची आठवण ठेवा. त्यांच्या जीवनातील निष्पत्ती पाहा. आणि त्यांच्या विश्वासाचे अनुकरण करा. 8येशू ख्रिस्त काल, आज आणि युगानुयुगे सारखाच आहे.

9निरनिराळ्या तऱ्हेच्या विचित्र शिकवणुकींमुळे बहकून जाऊ नका. अन्नाच्या विधीने नव्हे, तर देवाच्या कृपेने आपली हृदये बळकट केलेली फार बरी. कारण

---

**जर एखाद्या ... याव** निर्गम 19:12-13

**भीतीमुळे ... आहे** अनुवाद 9:19

**पुन्हा ... टाकीन** हाग्गय 2:6

अन्नाच्या विधींचे पालन करण्याने कोणाचेही हित झालेले नाही. 10ज्या वेदीवरील अन्न खाण्याचा किंवा सहभागी होण्याचा अधिकार मंडपात सेवा करणाऱ्यांनाही नाही. अशी वेदी आपल्याकडे आहे. 11यहूदी मुख्य याजक प्राण्यांचे रक्त परमपवित्रस्थानात पापाचे अर्पण म्हणून घेऊन जातात. परंतु केवळ प्राण्यांची शरीरे छावणीच्या बाहेर नेऊन जाळतात. 12म्हणून येशूने सुद्धा स्वतःच्या रक्ताने लोकांना शुद्ध करावे यासाठी नगराच्या वेशी बाहेर दुःख सोसले. 13म्हणून आपण छावणीच्या बाहेर जाऊ आणि येशूच्या अपमानाचे वाटेकरी होऊ. 14कारण कायमस्वरूपी असे नगर आपल्याला येथे नसले तरी भविष्यकाळात येणारे जे नगर आहे त्याच्याकडे आपण पाहत आहोत. 15तर मग आपण येशूच्या द्वारे स्तुतीचा यज्ञ सातत्याने करू या. म्हणजे त्याचे नाव आपल्या ओठांनी सतत घेऊ या. 16आणि इतरांसाठी चांगले ते करण्यास आणि दानधर्म करण्यास विसरू नका. कारण अशा अर्पणाने देवाला संतोष होतो.

17आपल्या पुढाऱ्यांच्या आज्ञा पाळा आणि त्यांच्या अधीन असा. ज्यांना हिशेब द्यावयाचा असतो त्यांच्याप्रमाणे तुमच्या जीवासंबंधाने ते जागरूक असतात. त्यांच्या आज्ञा पाळा यासाठी की, त्यांनी त्यांचे काम दुःखाने न करता आनंदाने करावे.

18आमच्यासाठी प्रार्थना करा. आमची सदसद्विवेक बुध्दि शुद्ध आहे याविषयी आमची खात्री आहे आणि सर्व बाबतीत जे नेहमी बरोबर आहे तेच सदैव करीत राहावे अशी आमची इच्छा आहे.

19मी तुम्हांला विनंति करतो की, देवाने मला लवकरच तुमच्याकडे परत पाठवावे म्हणून प्रार्थना करा.

20ज्या शांतीच्या देवाने आपल्या मेंढरांचा (म्हणजे आपल्या लोकांचा) मेंढपाळ, आपला प्रभु येशू ख्रिस्त याला रक्ताच्या युगानुयुगाच्या नव्या कराराद्वारे उठविले. 21त्याची इच्छा पूर्ण करायला तुम्हांला चांगल्या गोष्टींनी सिद्ध करो आणि येशू ख्रिस्ताच्या द्वारे त्याला संतोष देणारे काम आपल्यामध्ये करो. त्याला युगानुयुगे गौरव असो. आमेन.

22बंधुजनहो, हा जो बोधपर संदेश मी थोडक्यात लिहिला आहे, तो धीर धरून ऐका अशी विनंति तुम्हांला करतो. 23आपला बंधु तीमथ्य हा तुरूंगातून सुटला आहे. जर तो लवकर माझ्याकडे आला, तर जेव्हा मी तुम्हाला भेटायला येईन तेव्हा तो मजकडे येईल. 24तुमच्या सर्व पुढाऱ्यांना व देवाच्या सर्व संतांना सलाम सांगा, इटली येथील सर्वजण तुम्हांला सलाम सांगतात.

25देवाची कृपा तुम्हां सर्वांबरोबर असो. आमेन.

# याकोबाचें पत्र

1 देवाचा आणि प्रभु येशू ख्रिस्ताचा सेवक, याकोब याजकडून, देवाच्या लोकांचे “बारा वंश” जे जगभर विखुरलेले आहेत त्यांना सलाम!

### विश्वास आणि शहाणपण

2माझ्या बंधूंनो, ज्या ज्या वेळी तुमच्यावर निरनिराळ्या परीक्षा येतील तेव्हा तुम्ही स्वत:ला अत्यंत सुदैवी समजा, 3कारण तुम्हांला माहीत आहे की, तुमच्या विश्वासाच्या परीक्षेमुळे धीर निर्माण होतो. 4आणि त्या धीराला परिपूर्ण काम करू द्या. यासाठी की तुम्ही प्रौढ, परिपूर्ण व कोणत्याही बाबतीत कमतरता नसलेले असे व्हावे. 5म्हणून जर तुमच्यातील कोणी शहाणपणात उणा असेल तर त्याने ते देवाकडे मागावे. जो सर्व लोकांना उदार हस्ते देतो, आणि जो दोष शोधीत नाही, असा देव ते त्याला देईल. 6पण त्याने विश्वासाने मागितले पाहिजे व संशय धरू नये. कारण जो संशय धरतो तो वाऱ्यामुळे इकडेतिकडे हेलकावणाऱ्या समुद्रातील लाटेसारखा आहे. 7अशा मनुष्यांने असा विचार करू नये की, प्रभूपासून त्याला काही प्राप्त होईल. 8कारण तो द्विधा आहे आणि तो जे करतो त्या सर्वांत तो अस्थिर आहे.

### खरी संपत्ती

9गरिबीत असलेल्या बंधूने, देवाने त्याला आध्यात्मिक संपत्ती दिलेली आहे याविषयी अभिमान बाळगावा. 10आणि श्रीमंत बंधूने देवाने त्याला दीनतेत आणले याचा अभिमान बाळगावा. कारण तो एखाद्या रानफुलासारखा नाहीसा होतो. 11सूर्य त्याच्या प्रखर उष्णतेसह वर येतो आणि झुडपे वाळून जातात. मोहोर गळून पडतो व त्याचा लोभसवाणा पेहराव नाहीसा होतो. त्याचप्रमाणे श्रीमंत मनुष्यदेखील त्याच्या उद्योगात असताना नाहीसा होईल.

### परिक्षा देवापासून येत नाही

12धन्य तो पुरूष जो त्याच्या परीक्षेत टिकतो, कारण जेव्हा ती परीक्षा तो उत्तीर्ण होईल, तेव्हा त्याला विजेत्याचा मुगूट मिळेल. तो मुगुट देवाने जे त्याच्यावर प्रेम करतात त्यांना देण्याचे अभिवचन दिले आहे. 13कोणीही, जेव्हा तो परीक्षेत पडतो, तेव्हा असे म्हणू नये की, “हे संकट देवाने माझ्यावर आणले.” कारण देवाला वाईट गोष्टींचा मोह पडणार नाही आणि तो कोणालाही मोहात पाडत नाही. 14तर प्रत्येक जण त्याच्या स्वत:च्या इच्छेनुसार मोहात पडतो. तो आकृष्ट केला जातो व मोहात पडतो. 15मनात वासना निर्माण झाली की, तिच्या पोटी पापाचा जन्म होतो व पापाची जेव्हा पूर्ण वाढ होते तेव्हा ते मरणाला जन्म देते.

16माझ्या प्रिय बंधूंनो, स्वत:ची फसवणूक होऊ देऊ नका. 17प्रत्येक उत्तम व परिपूर्ण देणगी वरून येते. स्वर्गीय प्रकाश ज्याने निर्माण केला त्या पित्यापासून ती येते. आणि ज्याच्यावर तारांगणाच्या हालचालीचा काहीही परिणाम होत नाही, अशा पित्यापासून ती देणगी येते. 18सत्याच्या संदेशाद्वारे आपण त्याची मुले व्हावे ही त्याची इच्छा पूर्ण होण्यासाठी आपली निवड केली आहे. पित्याने निर्माण केलेल्या सर्व गोष्टींमध्ये आपण “प्रथम फळ” व्हावे यासाठी त्याने असे केले.

### ऐकणे आणि आज्ञा पाळणे

19माझ्या प्रिय बंधूंनो, हे लक्षात ठेवा: प्रत्येक मनुष्य ऐकण्यास तत्पर असावा, बोलण्यात सावकाश असावा आणि रागावण्यात मंद असावा. 20कारण मनुष्याच्या रागामुळे देव ज्या नीतीमत्त्वाची अपेक्षा करतो ते निर्माण होत नाही. 21म्हणून तुमच्यासभोवतीच्या सर्व अमंगळ गोष्टींपासून पूर्णपणे स्वत:ची सुटका करून घ्या. आणि जी तुमच्या आत्म्याचे तारण करण्यास समर्थ आहे ती देवाची शिकवण तुमच्या अंत:करणात मुळावलेली आहे ती लीनतेने स्विकारा. 22देवाची शिकवण काय सांगते त्याप्रमाणे नेहमी करा व फक्त ऐकूच नका तर त्याप्रमाणे करा कारण जर तुम्ही फक्त ऐकता तर तुम्ही स्वत:ची फसवणूक करता. 23जो कोणी देवाचे वचन ऐकतो परंतु त्यानुसार वागत नाही, तो आरशामध्ये आपले नैसर्गिक तोंड पाहणाऱ्यासारखा आहे. 24तो मनुष्य स्वत:कडे लक्षपूर्वक पाहतो. नंतर निघून जातो आणि आपण कसे होतो ते लगेच विसरून जातो. 25पण देवाचे परिपूर्ण व लोकांना स्वतंत्र बनविणारे जे नियम आहेत, त्यांच्याकडे जो बारकाईने पाहतो, सतत अभ्यास करतो आणि वचन ऐकून ते विसरून न जाता त्यानुसार चालतो, तो मनुष्य जे काही करतो त्यामध्ये आशीर्वादित होईल.

## देवाच्या उपासनेचा मार्ग

26जर एखादा मनुष्य स्वत:ला धार्मिक समजतो आणि
तरी स्वत:च्या जिभेवर ताबा ठेवीत नाही, तर तो स्वत:ला
फसवितो. त्या व्यक्तीची धार्मिकता निरर्थक आहे. 27अनाथ
व विधवा यांच्या संकटात जो त्यांची काळजी घेतो, व
स्वत:ला जगातील बिघडलेल्या वातावरणापासून दूर ठेवतो.
अशा मनुष्याची धार्मिकता देवासमोर शुद्ध व निर्दोष ठरते.

## सर्व लोकांवर प्रेम करा

2 माझ्या बंधूंनो, गौरवी प्रभु येशू ख्रिस्तावरील
विश्वासाची व पक्षपातीपणाची सांगड घालू नका.
2समजा एक मनुष्य सोन्याची अंगठी व सुंदर कपडे घालून
तुमच्या सभेला आला व एक गरीब मनुष्य अव्यवस्थित
कपडे घालून आला. 3आणि समजा चांगला पोशाख घालून
आलेल्या मनुष्याला तुम्ही विशेष मानसन्मान दाखवून
त्याला म्हणाला, “येथे ज्या चांगल्या खुर्च्या आहेत त्यापैकी
एखाद्या खुर्चीवर बसा.” आणि समजा तुम्ही त्या गरीब
माणसाला म्हणाला, “तिकडे उभा राहा.” किंवा “माझ्या
पायाजवळ बस.” 4तर या बाबतीत तुम्ही दोघांत पक्षपातीपणा
दाखविलात की नाही? आणि तुम्ही आपल्या मनात वाईट
कल्पना बाळगणारे न्यायाधीश ठरलात की नाही?
5माझ्या प्रिय बंधूंनो, ऐका! देवानेच जगाच्या
दृष्टिकोनातून गरीब असले त्यांना विश्वासात श्रीमंत
होण्यासाठी निवडले नाही काय, आणि जे त्याच्यावर प्रीति
करतात त्यांना देवराज्याचे वारस म्हणून निवडण्याचे
अभिवचन दिले नाही का? 6पण तुम्ही तर गरीब मनुष्याला
तुच्छ लेखिले! तुमची पिळवणूक करणारे श्रीमंत लोकच
नाहीत काय आणि तुम्हाला न्यायालयात नेणारे तेच लोक
नाहीत काय? 7ख्रिस्ताच्या उत्तम नावाची, जे नाव तुम्हाला
देण्यात आले त्याची निंदा हेच श्रीमंत लोक करीत नाहीत
का?
8जर तुम्ही पवित्र शास्त्रातील महान आज्ञा “आपल्या
शेजाऱ्यावर आपल्यासारखीच प्रीति करा” पाळता तर तुम्ही
योग्य करता. 9पण जर तुम्ही पक्षपात करता, तर तुम्ही
पाप करता आणि नियम मोडण्याचा दोष तुमच्यावर येतो.
10कारण जर कोणी संपूर्ण नियमशास्त्राचे पालन करतो
पण एका नियमाबाबतीत चुकतो, तर तो संपूर्ण
नियमशास्त्राबाबतीत दोषी ठरतो. 11कारण “व्यभिचार करू
नको” असे जो म्हणाला, “तो असे सुद्धा म्हणाला की,
“खून करू नको.” म्हणून जर तुम्ही व्यभिचार करीत
नाही पण खून करता तर तुम्ही नियमशास्त्र मोडता.
12अशा लोकांसारखे बोला व वागा की, ज्यांचा न्याय
अशा नियमांमुळे होणार आहे की, ज्यामुळे स्वातंत्र्य मिळेल.
13जो दयाळूपणे वागला नसेल त्याचा न्यायही देव त्याच्यावर
दया न दाखविताच करील. पण दया न्यायावर विजय
मिळविते!

## विश्वास व चांगली कामे

14माझ्या बंधूंनो, जर एखादा म्हणतो की, मी विश्वास
धरतो पण तशी कृती करीत नाही तर त्याचा काय उपयोग?
तो विश्वास त्याला तारू शकणार नाही. शकेल का?
15जर एखादा बंधु किंवा भगिनी यांना कपड्यांची
आवश्यकता असेल व त्यांना रोजचे अन्नसुद्धा मिळत
नसेल 16आणि तुमच्यापैकी एखादा त्यांना म्हणतो, “देवबाप
तुम्हांला आशीर्वाद देवो! उबदार कपडे घाला आणि चांगले
खा.” पण तुम्ही त्यांच्या शरीराला जे आवश्यक ते देत
नाही, तर तो काय चांगले करतो?
17त्याचप्रमाणे विश्वासाबरोबर जर कृतीची जोड नसेल
तर तो केवळ एक मृत असाच विश्वास असेल. 18पण
एखादा म्हणेल, “तुझ्याकडे विश्वास आहे तर माझ्याकडे
काम आहे.” कृतीशिवाय तुझा विश्वास दाखव, आणि
माझा विश्वास मी माझ्या कृतीने दाखवीन. 19तुम्ही असा
विश्वास धरता का की, फक्त एकच देव आहे? उत्तम!
भुतेदेखील असा विश्वास धरतात व थरथर कापतात.
20अरे मूढ माणसा, कृतीशिवाय विश्वास व्यर्थ आहे
याचा तुला पुरावा पाहिजे काय? 21आपला पूर्वज अब्राहाम
याने त्याचा पुत्र इसहाक याला वेदीवर परमेश्वराला अर्पण
करण्याची तयारी दर्शविली, तेव्हा त्याच्या या कामामुळे
तो देवाच्या दृष्टीत नीतिमान ठरला नाही काय? 22तू
पाहतोस की त्याच्या कृतीमध्ये विश्वाससुद्धा बरोबरीने
कार्यरत होता व त्याचा विश्वास त्याच्या कृतीमुळे पूर्ण
झाला. 23आणि अशा रीतीने पवित्र शास्त्र जे सांगते, ते
परिपूर्ण झाले की, “अब्राहामाने देवावर विश्वास ठेवला
आणि त्याचा विश्वास हा त्याचे नीतिमत्त्व मोजला गेला.”*
आणि त्या कारणामुळे त्याला “देवाचा मित्र” असे म्हटले
गेले. 24केवळ विश्वासामुळे नव्हे, तर त्याच्या कृतीमुळे
मनुष्य देवासमोर नीतिमान ठरविला जातो, हे तुम्ही पाहता.
25त्याचप्रमाणे राहाब वेश्येने इस्राएली हेरांना आसरा
देऊन, काही वेळानंतर निराळ्या वाटेने तेथून निसटून
जाण्यासाठी मदत केली. तेव्हा ही कृती तिचे नीतिमत्त्व
मानले गेले नाही काय?
26म्हणून, ज्याप्रमाणे शरीर हे आत्म्याशिवाय मेलेले
आहे, त्याचप्रमाणे विश्वास हा कृत्यांवाचून मेलेला असा
आहे.

## ज्या गोष्टी आपण बोलतो त्यावर ताबा ठेवणे

3 माझ्या बंधूंनो, तुमच्यापैकी पुष्कळजण शिक्षक होऊ
पाहत नाहीत काय? तुम्हांला माहीत आहे की, जे
आपण शिक्षक आहोत त्या आपला काटेकोरपणे न्याय
होईल. 2मी तुम्हाला सावध करीत आहे, कारण आपण
पुष्कळ पापे करतो आणि जर कोणी त्याच्या बोलण्यात
चुका करीत नाही तर तो परिपूर्ण मनुष्य आहे. 3आपण

---

**आब्राहामाने ... गेला** उत्पत्ति 25:6

घोड्यांच्या तोंडांना लगाम घालतो यासाठी की, त्यांनी
आपल्या आज्ञा पाळाव्यात. आणि अशा प्रकारे आपण
त्यांचे संपूर्ण शरीर नियंत्रणात ठेऊ शकतो. 4किंवा जहाजाचे
उदाहरण घ्या. जरी ते खूप मोठे असले व जोरदार वाऱ्यामुळे
चालविले जाते तरी ते लहान सुकाणूद्वारे ताब्यात ठेवता
येते व सुकाणूधर नावाड्याच्या इच्छेला येईल तिकडे नेता
येते. 5त्याचप्रकारे जीभ ही शरीराचा लहानसा भाग आहे,
पण ती मोठमोठ्या गोष्टी केल्याची बढाई मारते.

फक्त विचार करा, कितीतरी मोठे जंगल लहानशा
आगीने पेट घेते! 6होय, जीभ ही ज्वाला आहे. आपल्या
शरीराच्या सर्व अवयवामध्ये वाईट गोष्टींची ती खाणच
आहे. जीभ ही आपल्या सर्व शरीराला विटाळविणारी
आहे. ती आपल्याला अपवित्र करते. आपल्या सर्व
अस्तित्वालाच ती आग लावते. ती नरकाच्या ज्वालांनी
जीवन पेटवते. 7पशू, पक्षी, सरपटणारे जीवजंतु, साप आणि
समुद्रातील निरनिराळ्या जातीचे जीव माणूस पाळू शकतो
आणि प्रत्यक्षात त्याने तसे केले आहे. 8पण कोणताही
मनुष्य आपली जीभ ताब्यात ठेवू शकत नाही. ती फार
चंचल, भयंकर, हिंस्र, दुराचारी आणि जहाल विषाने
भरलेली असते.

9आपला प्रभु आणि स्वर्गीय पिता याची स्तुति आपण
आपल्या जिभेने करतो आणि जे मानव देवाच्या प्रतिमेचे
बनविलेले आहेत, त्यांना जिभेने शापही देतो! 10एकाच
तोंडातून आशीर्वाद निघतात व शापही निघतात. माझ्या
बंधूंनो, हे असे असू नये. 11एकाच झऱ्यातून गोड व कडू
पाणी येऊ शकत नाही. 12माझ्या बंधूंनो, अंजिराच्या झाडाला
जैतुनाची फळे येतील काय? किंवा द्राक्षवेलीला अंजिर
लागतील काय? कधीच नाही. तसेच खारट पाण्याच्या
झऱ्यातून गोड पाणी येऊ शकणार नाही.

## खरे शहाणपण

13तुमच्यामध्ये कोण शहाणा व ज्ञानाने भरलेला आहे?
त्याने त्याचे शहाणपण त्याच्या चांगल्या वागणुकीने
दाखवावे. नम्रतेने केल्या जाणाऱ्या कृतीद्वारे त्याने आपले
शहाणपण दाखवावे. 14पण जर तुमच्या हृदयात कटूरता,
मत्सर व स्वार्थी उद्देश असतील तर तुम्ही तुमच्या
शहाणपणाची फुशारकी मारू शकणार नाही. कारण तसे
करणे म्हणजे खोटेपणाच्या आड सत्य लपविण्यासारखे
आहे. 15कारण अशा प्रकारचे शहाणपण वरून, स्वर्गातून
आलेले नाही, तर ते पृथ्वीवरचे आहे. अधार्मिक आणि
सैतानी आहे.

16कारण जेथे मत्सर व स्वार्थी ध्येये आढळतात तेथे
अव्यवस्थितपणा व सर्व प्रकारचे वाईट व्यवहारही
आढळतात. 17पण वरून लाभलेले शहाणपण मुळात शुद्ध,
शांतिदायक, समजूतदारपणाचे आणि मनमोकळे असून ते
दयेचे व चांगली कामे यांना उत्तेजन देणारे असते. तसेच ते
पक्षपात न करणारे व कळकळीचे असते. 18जे लोक
शांततेच्या मार्गाने शांति स्थापन करण्याचा प्रयत्न करतात
त्यांना सरळ, नीतिपूर्ण वागण्यामुळे मिळणाऱ्या चांगल्या
गोष्टींचा लाभ होतो.

## स्वत:ला देवाला द्या

4 तुमच्यामध्ये भांडणे व झगडे कोठून येतात?
तुमच्यामध्ये ज्या स्वार्थी भावना संघर्ष करतात
त्यामधून ते येत नाही काय? 2तुम्हांला काही गोष्टी पाहिजे
असतात पण त्या तुम्हांला मिळत नाही, म्हणून तुम्ही खून
करता व दुसऱ्या लोकांचा मत्सर करता पण तरीही
तुम्हांला पाहिजे ते मिळत नाही. म्हणून तुम्ही भांडण व
झगडे करता. तुम्हाला पाहिजे त्या गोष्टी मिळत नाहीत
कारण तुम्ही देवाला मागत नाही.

3आणि जेव्हा तुम्ही मागता, तेव्हा तुम्हाला काहीही
मिळत नाही, कारण तुम्ही चुकीच्या उद्देशाने मागता,
यासाठी की तुम्हाला जे काही मिळेल ते तुमच्या स्वत:च्या
सुखासाठी वापरता.

4अप्रामाणिक लोकांनो, तुम्हाला हे माहीत नाही का
की, जगाशी मैत्री हे देवाबरोबरचे वैर आहे. जो मनुष्य
जगाशी मैत्री करतो तो देवाशी वैर करतो. 5पवित्र शास्त्र
सांगते त्यात काही अर्थ नाही काय? जेव्हा ते म्हणते, की
देवाने जो आत्मा आमच्यात ठेवला आहे तो आमची हेव्याने
वाट पाहतो.*

6पण देव आम्हांवर त्याहूनही मोठी कृपा करतो.
त्यासाठीच पवित्र शास्त्र म्हणते, "देव गर्विष्ठाचा विरोध
करतो, पण नम्र जनांवर तो दया करतो."* 7म्हणून
स्वत:ला देवाच्या स्वाधीन करा. सैतानाला विरोध करा.
आणि तो तुमच्यापासून पळून जाईल. 8देवाजवळ या, आणि
तो तुमच्याजवळ येईल. पाप्यांनो, तुमचे हात स्वच्छ करा.
आणि तुमची अंत:करणे शुद्ध करा, जे तुम्ही द्विबुद्धीचे
आहात.

9दु:खी व्हा, शोक करा, आणि रडा! तुमचे हसणे
दु:खात बदलो. तुमच्या आनंदाचे खेदात रूपांतर होवो.
10तुम्ही प्रभूसमोर नम्र व्हा म्हणजे तो तुम्हांला उच्च स्थान
देईल.

## तुम्ही न्यायाधीश नाही

11बंधूंनो, एकमेकांविरुद्ध वाईट बोलण्याचे थांबवा. जो
त्याच्या भावाविरुद्ध बोलतो किंवा जो त्याच्या भावाचा
न्याय करतो तो नियमशास्त्राविरुद्ध बोलतो. आणि तो
नियमशास्त्राचा न्याय करतो. आणि जर तुम्ही नियम
शास्त्राचा न्याय करता तर तुम्ही नियमशास्त्र जे सांगते ते
करीत नाही व तुम्ही न्यायाधीश आहात.

---

**देवाने ... वाट पाहतो** किंवा आत्मा जो देवाने ठेवला तो हेव्याने भरला आहे.

**देव ... दया करतो** नीतिसूत्रें 3:34

12नियमशास्त्र देणारा न्यायाधीश फक्त एकच आहे.
फक्त देवच तारण करण्यास व नाश करण्यास समर्थ
आहे. तू जो तुझ्या शेजाऱ्याचा न्याय करतोस तो तू स्वत:ला
कोण समजतोस?

### देवाला तुमच्या जीवनाची योजना करू द्या

13ऐक, तू म्हणतोस, "आज किंवा उद्या आपण या शहरी
किंवा त्या शहरी जाऊ व तेथे आपण एक वर्ष घालवू
आणि आपण तेथे व्यापार करू व पैसा कमवू." 14तुला हे
देखील माहीत नाही की, उद्या तुझे काय होईल. अखेर
तुझे जीवन तरी काय आहे? कारण थोड्या काळपर्यंत
दिसणारे आणि मग अदृष्य होणारे असे धुके तुम्ही आहात.
15त्याऐवजी, तुम्ही नेहमी असे म्हणा, "जर प्रभूची इच्छा
असेल तर आपण जगू आणि आपण हे किंवा ते करू."
16पण तुम्ही तर घमेंड बाळगता आणि बढाई मारता आणि
अशी बढाई मारणे वाईट आहे. 17म्हणून जर तुम्हांला
चांगले कसे करायचे हे माहीत असूनही जर ते तुम्ही
करीत नाही, तर तुम्ही पाप करता.

### स्वार्थी श्रीमंत लोकांना शिक्षा होईल

5 श्रीमंत लोकहो ऐका! तुमच्यावर जी संकटे येत
आहेत त्याबद्दल रडा व आक्रोश करा. 2तुमची
संपत्ति नाश पावली आहे. व तुमच्या कपड्यांना कसर
खाऊन टाकीत आहेत. 3तुमच्या सोन्याचांदीवर गंज चढला
आहे. त्याच्यावर चढलेला गंज तुमच्याविरुद्ध साक्ष देईल
आणि तुमचे शरीर अग्नीसारखे खाऊन टाकील. अशा
युगामध्ये तुम्ही तुमचे धन साठवून वेगळे ठेवले आहे,
ज्याचा शेवट जवळ आला आहे! 4पहा! तुमच्या शेतात
कापणी करणाऱ्या मजुरांची मजुरी जी तुम्ही अडवून
धरलीत ती ओरडून दु:ख करीत आहे आणि कापणी
करणाऱ्यांचे रडणे प्रभु परमेश्वराच्या सैन्याच्या कानी
पोहोंचले आहे. 5जगात असताना तुम्ही ऐषारामात जगला
आणि मन मानेल तसे वागला. वधावयाच्या दिवसासाठी
खाऊनपिऊन तयार केलेल्या पशूसारखे तुम्ही पुष्ट झालात.
6जे लोक तुम्हाला काहीही विरोध करीत नाही अशा
निरपराध लोकांना तुम्ही दोषी ठरविले आहे आणि त्यांची
हत्या केली आहे.

### धीर धरा

7यासाठी बंधूंनो, प्रभूच्या येण्यापर्यंत धीर धरा, लक्षात
ठेवा की, शेतकरी आपल्या शेतातील मोलवान पिकाची
वाट पाहतो. तो धीराने त्याची वाट पाहतो. पहिला व
शेवटचा पाऊस मिळेपर्यंत वाट पाहतो. 8तुम्हीसुद्धा धीराने
वाट पाहिली पाहिजे. धैर्य धरा, कारण प्रभूचे दुसरे आगमन
जवळ आले आहे. 9बंधूंनो, एकमेकांविरुद्ध कुरकूर
करण्याचे थांबवा, यासाठी की तुम्ही दोषी ठरू नये. पहा!
न्यायाधीश दाराजवळ आत येण्यासाठी तयारीत उभा आहे.
10बंधूंनो, दु:ख सहन करीत देवाच्या नावाने लोकांशी
धीर धरून बोलणाऱ्या संदेष्ट्याचे उदाहरण तुम्ही
आपल्यासमोर ठेवा. 11त्यांनी दु:ख सहन केले म्हणून
आपण त्यांना धन्य समजतो, हे लक्षात ठेवा. तुम्ही ईयोबाच्या
धीराविषयी ऐकले आहे आणि तुम्हांला माहीत आहे की,
प्रभूने ईयोबाच्या वतीने त्याचा शेवट कसा केला. प्रभु
दयाळू आणि खूप कनवाळू आहे, ह्या गोष्टीचे त्याने
प्रात्यक्षिक दाखविले. 12याहीपेक्षा अधिक महत्त्वाचे म्हणजे
बंधूंनो, स्वर्गाच्या किंवा पृथ्वीच्या नावाने शपथ वाहायचे
थांबवा किंवा इतर कोणत्याही प्रकारची शपथ वाहू नका.
तुमचे "होय" हे "होयच" असू द्या. तुमचे "नाही" हे "नाहीच"
असू द्या, यासाठी की तुम्ही देवाच्या परीक्षेत येऊ नये.

### प्रार्थनेचे सामर्थ्य

13तुमच्यातील कोणी संकटात आहे काय? त्याने प्रार्थना
करावी. कोणी आनंदी आहे काय? त्याने स्तुतिगान करावे.
14तुमच्यापैकी कोणी आजारी आहे काय? त्याने मंडळीतील
वडिलांना बोलवावे व त्यांना त्याच्यासाठी प्रार्थना करण्यास
सांगावे, आणि प्रभूच्या नावाने त्याच्यावर तेल लावावे
15विश्वासाने केलेली प्रार्थना आजारी मनुष्याला बरे करील
व प्रभु त्याला उठविल. जर त्याने पापे केली असतील तर
प्रभु त्याची क्षमा करील. 16म्हणून एकमेकांकडे आपल्या
पापांची कबुली द्या आणि एकमेकांसाठी प्रार्थना करा.
यासाठी की, तुम्ही बरे व्हावे. नीतिमान मनुष्याची प्रार्थना
सामर्थ्ययुक्त व परिणामकारक असते. 17एलीया हा
आपल्यासारख्या स्वभावाचा मनुष्य होता. पाऊस पडू नये
म्हणून त्याने कळकळीने प्रार्थना केली आणि नंतरची
साडेतीन वर्षे देशात पाऊस पडला नाही. 18मग त्याने पुन्हा
प्रार्थना केली व आकाशाने पाऊस दिला आणि पृथ्वीने
आपले धान्य उपजविले. 19माझ्या बंधूंनो, जर तुमच्यापैकी
कोणी चुकला किंवा सत्यापासून दूर भटकला असेल
आणि जर कोणी त्याला परत आणले तर पापी मनुष्याला
चुकीच्या मार्गावरून तो परत आणतो. 20तो त्याचा जीव
मरणाच्या दाढेतून सोडवितो. आणि त्याच्या पुष्कळ पापांची
क्षमा होते.

# पेत्राचें पहिले पत्र

## येशू ख्रिस्ताचा प्रेषित पेत्र याजकडून

1 देवाचे निवडलेले लोक जे या जगात प्रवासी आहेत, जे पंत, गलतिया, कप्पदुकिया, आशिया व बिथुनिया प्रांतात विखुरलेले आहेत त्या यहूदी लोकांना,
2देवपित्याने फार पूर्वीच केलेल्या योजनेप्रमाणे आत्म्याच्याद्वारे तुम्ही पवित्र व्हावे, येशू ख्रिस्ताच्या आज्ञेत राहावे आणि येशूचे रक्त तुमच्यावर शिंपडून तुम्हांला शुद्ध करावे, याकरीता तुम्हाला निवडले आहे. त्या तुम्हाला देवाची कृपा व शांति भरपूर प्रमाणात लाभो.

## जिवंत आशा

3आमच्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या पित्याची, देवाची स्तुति असो! त्याच्या महान दयेमुळे त्याने आमचा नवा जन्म होऊ दिला, आणि येशूला मेलेल्यातून उठविण्याने जिवंत व नवीन आशा दिली.
4आणि ज्याचा कधी नाश होत नाही, ज्याच्यावर काही दोष नाही, व जे कधी झिजत नाही असे वतन स्वर्गात आपल्यासाठी राखून ठेवले आहे.
5आणि शेवटच्या काळात प्रगट करण्यात येणारे तारण तुम्हाला मिळावे म्हणून विश्वासाच्या द्वारे, देवाच्या सामर्थ्याने तुमचे रक्षण केले आहे.
6वेगवेगळ्या प्रकारच्या पीडांनी काही काळापर्यंत तुम्ही दु:खी होणे जरी जरुरीचे असले, तरी यामुळे आनंद करीत आहा.
7नाशवंत सोने शुध्द करण्याकरिता अग्नित टाकले जाते. त्याहून अधिक मौल्यवान अशा तुमच्या विश्वासाची कसोटी व्हावी, आणि येशू ख्रिस्ताच्या परत येण्याच्या वेळी तो खरा ठरावा आणि तुम्हाला स्तुति, गौरव व सन्मान मिळावा याची आवश्यकता आहे.
8जरी तुम्ही येशूला पाहिले नाही, तरी तुम्ही त्याच्यावर प्रीति करता. जरी आता तुम्ही त्याच्याकडे पाहू शकत नसला तरी तुम्ही त्याच्यावर विश्वास ठेवता आणि तुम्ही व्यक्त करता येणार नाही, अशा गौरवी आनंदाने भरला आहात.
9तुमच्या विश्वासाचे ध्येय जे तुमच्या आत्म्याचे तारण ते तुम्हाला प्राप्त होत आहे.
10तुमच्याकडे येणार असलेल्या कृपेसंबंधी ज्या संदेष्ट्यांनी भविष्य वर्तविले होते त्यांनी त्या तारणाबाबत फार मन:पूर्वक शोध घेतला व काळजीपूर्वक चौकशी केली.
11ख्रिस्ताचा आत्मा त्यांच्यामध्ये राहात होता. ते शोध घेत होते की कोणत्या वेळी व कोणत्या परिस्थितीत ख्रिस्ताच्या दु:खाचा व गौरवाचा शोध घेण्यास आत्मा सुचवीत आहे.
12स्वर्गातून पाठविलेल्या आत्म्याद्वारे ज्यांनी शुभवर्तमान तुमच्याकडे आणले. त्यांनीच तुम्हांस आता या गोष्टी विदित केल्या. त्याच गोष्टी कळविण्याची जी सेवा ते करीत होते, ती स्वत:साठी नाही, तर आमच्यासाठी करीत होते, त्या गोष्टी बारकाईने पाहण्यासाठी देवदूतसुद्धा उत्सुक आहेत.

## पवित्र जीवनाकरिता पाचारण

13म्हणून मानसिकदृष्ट्या सावध असा आणि पूर्णपणे आत्मसंयमन करा. जेव्हा येशू ख्रिस्त प्रकट होईल तेव्हा तुम्हाला जे आशीर्वाद देण्यात येतील त्यावर तुमची आशा केंद्रित करा.
14आज्ञाधारक मुलांप्रमाणे वागा व तुम्ही अज्ञानी असताना, तुम्हांला पूर्वी ज्या दुष्ट इच्छा होत्या त्याप्रमाणे तुमच्या जीवनाला आकार देण्याचे थांबवा.
15त्याऐवजी ज्या देवाने तुम्हाला पाचारण केले तो पवित्र आहे, तुम्हीसुद्धा प्रत्येक गोष्ट जी तुम्ही कराल त्यात पवित्र असा.
16कारण असे लिहिले आहे: “पवित्र व्हा, कारण मी पवित्र आहे.”*

17आणि ज्याप्रमाणे, देवाला तुम्ही पिता म्हणून हाक मारता, जो लोकांचा नि:पक्षपातीपणे, प्रत्येकाच्या कृत्यांप्रमाणे न्याय करतो, म्हणून या परक्या भूमीवर तुम्ही वास्तव्य करीत असताना, या काळात देवाबद्दलच्या आदरयुक्त भीतीमध्ये आपले जीवन जगा.
18तुम्हांला माहीत आहे की, सोने किंवा चांदी अशा कोणत्याही नाश पावणाऱ्या वस्तूंनी निरर्थक जीवनापासून तुमची सुटका करण्यात आली नाही. जी तुम्हांला तुमच्या पूर्वजापासून मिळाली आहे.
19तर कसलाही डाग किंवा दोष नसलेल्या कोकऱ्यासारख्या ख्रिस्ताच्या बहुमोल रक्ताने तुमची सुटका केली आहे.
20जगाच्या निर्मितीच्या अगोदर ख्रिस्ताची निवड करण्यात आली होती. पण तुमच्याकरिता या शेवटच्या दिवसात त्याला प्रकट करण्यात आले.
21ज्या देवाने त्याला मेलेल्यांतून उठविले व त्याला गौरव दिले त्या देवावर तुम्ही विश्वास ठेवणारे झाला आहात. म्हणून तुमचा विश्वास आणि आशा देवामध्ये आहे.

22आता तुम्ही स्वत:ला शुद्ध केले आहे. सत्याची आज्ञा पाळून शेवटपर्यंत प्रामाणिक बंधुप्रीति करा. एकमेकांवर

---

**पवित्र ... आहे** लेवीय 11:44,45; 19:2; 20:7

शुद्ध हृदयाने प्रीति करण्याकडे लक्ष द्या. 23जे बीज नाशवंत
आहे त्यापासून तुमचा नवा जन्म झाला नाही तर जे बीज
अविनाशी त्यामुळे झाला आहे. तुमचा नवा जन्म देवाच्या
वचनाद्वारे जे जिवंत आहे व टिकते त्यापासून झाला आहे.
24म्हणून पवित्र शास्त्र सांगते,

“सर्व लोक गवतासारखे आहेत आणि त्यांचे सर्व वैभव
गवतातील रानफुलासारखे आहे. गवत सुकते, फूल गळून
पडते,
25परंतु आमच्या प्रभूचे वचन अनंतकाळ टिकते.”
*यशया 40:6-8*

आणि हाच तारणाचा संदेश आहे. जो तुम्हाला सांगितला
गेला.

## जिवंत धोंडा व पवित्र राष्ट्र

2 म्हणून सर्व प्रकारची दुष्टता, तसेच फसवणूक,
ढोंगीपणा हेवा, निंदा यापासून सुटका करून घ्या.
2नुकत्याच जन्मलेल्या लहान बाळासारखे तुम्ही शुद्ध
आध्यात्मिक दूधाची इच्छा धरा. यासाठी की त्यापासून
तुमची वाढ होईल व तुमचे तारण होईल. 3आता “प्रभु
चांगला आहे याचा अनुभव तुम्ही घेतला आहे.”*
4जिवंत धोंडा जो प्रभु येशू त्याच्याकडे या. जो जगातील
लोकांकडून नाकारला गेला. पण जो देवाला बहुमोल
असा आहे आणि ज्याला देवानेच निवडले आहे. 5तुम्हीसुद्धा,
जिवंत धोंड्याप्रमाणे आध्यात्मिक मंदिर बांधण्यासाठी रचिले
जात आहा. पवित्र याजकगणांप्रमाणे सेवा करण्यासाठी,
ज्यांचे काम म्हणजे आध्यात्मिक अर्पणाचा देवासमोर यज्ञ
करणे असे आहे. जे देवाला, येशू ख्रिस्ताद्वारे मान्य आहे.
6म्हणून खालील उतारा पवित्र शास्त्रात नमूद केला आहे:

“पहा सियोनात मी कोनशिला बसवितो, जी मौल्यवान
व निवडलेली आहे आणि जो कोणी त्यावर विश्वास
ठेवतो तो कधीही लज्जित होणार नाही.”
*यशया 28:16*

7तुम्ही जे या धोंड्यावर विश्वास ठेवता, त्या तुम्हांला तो
मौल्यवान आहे. पण जे विश्वास धरीत नाहीत त्यांना,

“बांधणाऱ्यांनी नापंसत केलेला धोंडा तोच कोनशिला
झाला आहे.” *स्तोत्र. 118:22*

8तो असा झाला,

“एक धोंडा जो लोकांना अडखळवितो आणि एक खडक
जो लोकांना पाडतो.” *यशया 8:14*

ते लोक अडखळतात कारण ते देवाची आज्ञा पाळत
नाहीत. त्यांना त्याच्यासाठी नेमलेले आहे.
9पण तुम्ही निवडलेले लोक आहात. तुम्ही राज्याचे
याजक आहात, तुम्ही पवित्र राष्ट्र आहात, तुम्ही देवाचे
असलेले लोक आहात, यासाठी की, ज्या देवाने तुम्हाला
अंधारातून काढून त्याच्या अद्भुत प्रकाशात आणले त्याची
सामर्थ्यशाली कृत्ये तुम्ही प्रकट करावी. 10एकवेळ तुम्ही
लोक नव्हता पण आता तुम्ही देवाचे लोक आहात. एके
काळी तुम्हाला करुणा दाखविण्यात आली नव्हती पण
आता तुम्हाला देवाची करुणा दाखविण्यात आली.

## देवासाठी जगा

11प्रियजनहो, मी तुम्हाला तुम्ही जणू काय प्रवासी आणि
या जगात परके असल्यासारखा बोध करतो की, तुमच्या
आत्म्याच्या विरुद्ध नेहमी लढत राहणाऱ्या शारीरिक
वासनांपासून तुम्ही दूर राहा. 12जरी विदेशी लोक तुमच्यावर
टीका करतात आणि अपराध केल्याबद्दल दोष देतात तरी
तुम्ही आपले वागणे इतके चांगले ठेवा की, तुमची चांगली
कामे पाहून विदेशी लोकांनी देवाच्या परत येण्याच्या दिवशी
त्याला गौरव द्यावे.

## प्रत्येक मानवी अधिकाऱ्याची आज्ञा पाळा

13प्रभूकरिता प्रत्येक मानवी अधिकाऱ्याच्या अधीन
असा. 14राजाच्या अधीन असा, जो सर्वोच्च अधिकारी
आहे आणि राज्यपालांच्या अधीन असा. कारण अयोग्य
करणाऱ्यांना शिक्षा देण्यासाठी आणि चांगली कामे
करणाऱ्यांना शाबासकी देण्यासाठी प्रान्ताधिपतीने त्यांना
पाठविले आहे. 15म्हणून जेव्हा तुम्ही चांगले काम करता
तेव्हा मूर्ख लोकांचे अविचारी बोलणे तुम्ही बंद करता
आणि हीच देवाची इच्छा आहे. 16मुक्त लोकांसारखे जगा.
पण तुमच्या मुक्तपणे जगण्याच्या नावाखाली वाईट गोष्टींना
वाव देऊ नका. उलट देवाचे सेवक असल्याप्रमाणे जगा.
17सर्व लोकांचा आदर करा. ख्रिस्तातील तुमच्या बंधूवर्गावर
प्रीति करा. देवाप्रती भीतीयुक्त आदर असू द्या. राजाला
मान द्या.

## ख्रिस्ताच्या दुःखसहनाचे उदाहरण

18घरातील गुलामांनो, संपूर्ण आदराने तुमच्या
मालकाच्या अधीन असा. जे चांगले आणि दयाळू आहेत
त्यांच्याशीच नव्हे तर जे कठोरतेने वागतात त्यांच्यासुद्धा
अधीन असा. 19कारण हे प्रशंसनीय आहे. जर एखादा
त्याच्या अंत:करणात असलेल्या देवाच्या इच्छेसंबंधाने
जागरूक आहे व अन्यायामुळे त्याला दु:ख सोसावे लागते.
20कारण जर तुम्ही केलेल्या चुकीबद्दल तुम्हांला मार
मिळाला आणि तुम्हांला तो सहन करावा लागतो, तर ते
देवासमोर मान्य आहे. 21यासाठी देवाने आपल्याला
बोलावले आहे; कारण ख्रिस्ताने देखील आपल्यासाठी

---

**प्रभु … आहे** स्तोत्र. 34:8

दु:ख सहन केले आणि आपण त्याच्या पावलांवर पाऊल टाकून चालावे, म्हणून स्वत:च्या अशा वागण्याने आपल्यासमोर उदाहण ठेवले.

22"त्याने कोणतेही पाप केले नाही, त्याच्या मुखात कपट नव्हते." *यशया 53:9*

23जेव्हा लोकांनी त्याचा अपमान केला तेव्हा त्याने उलट अपमान केला नाही. जेव्हा त्याने दु:ख सहन केले तेव्हा त्याने धमकी दिली नाही. परंतु जो न्यायाने निवाडा करतो त्या देवाच्या हाती स्वत:ला सोपवून दिले. 24त्याने स्वत: आमची पापे वाहिली त्याच्या शरीरावर घेऊन वधस्तंभावर वाहिली, यासाठी की आम्ही आमच्या पापाला मरावे. आणि नीतीमत्त्वासाठी जगावे. त्याला झालेल्या जखमांमुळे तुम्हाला आरोग्य मिळाले. 25तुम्ही मेंढराप्रमाणे बहकत होता. पण आता तुमच्या जीवनाचा जो मेंढपाळ व संरक्षक त्याच्याकडे परत आला आहात.

## पत्नी आणि पती

3 त्याचप्रमाणे, पत्नींनो, आपल्या पतींच्या अधीन असा. यासाठी की, त्यांच्यापैकी काहींनी जर देवाची आज्ञा पाळली नाही तर काही न बोलताही आपल्या सद्‌वर्तनाने त्यांची मने जिंकता येतील. 2जेव्हा ते तुमचे शुद्ध आणि आदरयुक्त वागणे पाहतील 3तुमची सुंदरता बाह्यस्वरूपाची नसावी म्हणजे वेगवेगळ्या प्रकारे केस सुशोभित करण्याने, सोन्याचे दागिने वापरण्याने किंवा चांगले कपडे घातल्याने आलेली नसावी. 4त्याऐवजी तुमची सुंदरता अंत:करणाची, जी कधीही नाश पावत नाही, अशी असली पाहिजे ती सौम्य, शांत स्वभावाची असली पाहिजे जी देवाच्या दृष्टीने अतिमौल्यवान आहे. 5पूर्वीच्या काळातील ज्या पवित्र स्त्रिया होऊन गेल्या, त्यांनी अशाच प्रकारे आपल्या सर्व आशा देवावर केन्द्रीत करून आपली स्वत:ची सुंदरता वाढीस लावली त्या स्त्रिया आपल्या पतींच्या अधीन असत. 6साराने अब्राहामाची आज्ञा पाळली आणि अब्राहामाला आपला मालक मानले. जर तुम्ही चांगली कामे करता व कशाचीही भीति मनात बाळगत नाही तर तुम्ही तिच्या म्हणजे सारेच्या मुली आहात. 7तसेच पतींनो, तुम्ही आपल्या पत्नींबरोबर समंजसपणाने राहा. त्या जरी अबला असल्या तरी त्या देवाच्या कृपेमध्ये तुमच्याबरोबरच वारस आहेत हे लक्षात घेऊन त्यांच्याविषयी आदर बाळगा, म्हणजे तुम्ही ज्या प्रार्थना देवाला सादर करता त्यात कसलीही बाधा येणार नाही.

## चांगल्या कामासाठी दु:ख सोसणे

8शेवटी सारांश हा की, तुम्ही सर्वजण एकमेकांशी विचार व भावना यांच्या ऐक्याने, सहानुभूतीने आपल्या भाऊबहिणींशी प्रेमाने, दयाळूपणे आणि नम्रतेने राहा. 9वाइटाची परतफेड वाइटाने करू नका, किंवा अपमानाची फेड अपमानाने करू नका. उलट, त्या व्यक्तीसाठी देवाकडे आशीर्वाद मागा. कारण देवाने तुम्हाला हे करण्यासाठीच बोलाविले होते. यासाठी की, तुम्हाला देवाचा आशीर्वादाचा वारसा मिळावा. 10पवित्र शास्त्र म्हणते,

"ज्याला जीवनाचा आनंद उपभोगायचा आहे, व चांगले दिवस पहावयाचे आहेत, त्याने आपली जीभ वाईट बोलण्यापासून आवरली पाहिजे, आणि त्याने आपल्या ओठांनी खोट्या गोष्टी बोलू नयेत.
11दुष्टतेपासून त्याने दूर व्हावे व चांगले ते करावे. त्याने शांतीचा शोध करून ती मिळविली पाहिजे
12जे नीतिमान लोक आहेत त्यांच्यावर प्रभुची नजर असते आणि त्यांच्या प्रार्थना तो कान देऊन ऐकतो पण जे वाईट गोष्टी करतात त्यांच्याकडे प्रभु पाठ फिरवितो." *स्तोत्र. 34:12-16*

13जे चांगले ते करण्यास तुम्ही उत्सुक असाल तर अशी कोण व्यक्ती आहे जी तुम्हाला इजा करण्याचा प्रयत्न करील? पण, 14जे योग्य ते करूनसुद्धा जर तुम्हांला दु:ख सहन करावे लागते, तर तुम्ही धन्य आहात. म्हणून "त्या लोकांची भीति बाळगू नका किंवा गर्भगळित होऊ नका"*
15पण आपल्या अंत:करणात ख्रिस्त हा प्रभु आहे असा आदर बाळगा तुमच्यामध्ये जी आशा आहे, तिच्याविषयी तुम्हांला कोणी विचारले तर त्याचे समर्थन करण्यास सदैव तयार राहा. 16पण हे सौम्यतेने व आदराने करा. ख्रिस्तामध्ये जगत असताना तुमच्या चांगल्या वागणुकीवर जे आरोप करतात त्यांना लाज वाटेल, अशा रीतीने तुम्ही आपली विवेकबुद्धी शुद्ध राखा. 17कारण चांगले काम करूनदेखील आपण दु:ख सोसावे अशी जर देवाची इच्छा असेल तर वाईट करून दु:ख भोगण्यापेक्षा ते अधिक चांगले. 18ख्रिस्तदेखील आपल्या पापांसाठी एकदाच मरण पावला. एक नीतिमान दुसऱ्या अनीतिमानांसाठी मरण पावला. यासाठी की, तुम्हाला देवाकडे जाता यावे. त्याच्या शरीरासंबंधी म्हटले तर त्याला मारले गेले पण त्याच्या आत्म्यासंबंधी म्हटले तर त्याला पुन्हा जीवन दिले गेले. 19आत्मिक रूपाने देखील ख्रिस्त बंदिवासात असलेल्या आत्म्यांकडे गेला व सुवार्ता सांगितली. 20फार पूर्वी नोहाच्या काळात जेव्हा जहाज बांधले जात होते आणि देव धीराने वाट पाहत होता, त्यावेळी ज्यांनी देवाची आज्ञा पाळली नाही, तेच हे आत्मे होत. फक्त थोडकेच म्हणजे आठ लोकच जहाजात गेले व त्यांचा पाण्यापासून बचाव झाला. 21ते पाणी आत्मा चिन्हात्मकरीत्या बाप्तिस्म्याचे ज्यामुळे आता तुमचे तारण होते त्याचे प्रतीक आहे. बाप्तिस्मा म्हणजे शरीरावरील धूळ काढणे नव्हे, तर तो देवाकडे

**त्या लोकांची ... नका** यशया 8:12

शुद्ध विवेक मिळावा म्हणून केलेला करार आहे. हे सर्व येशू ख्रिस्ताच्या मरणातून पुन्हा उठण्यामुळे घडू शकले. 22तो स्वर्गात गेलेला आहे आणि देवाच्या उजव्या हाताशी बसला आहे. देवदूत, अधिकार आणि सामर्थ्य हे सर्व त्याच्या अधीन आहेत.

## बदललेली जीवने

4 ख्रिस्ताने जसा शारीरिक दु:खसहनाचा अनुभव घेतला, तसेच तुम्हीसुद्धा ख्रिस्ताची जशी चित्तवृत्ति होती तशा प्रकारच्या चित्तवृत्तीने सज्ज व्हा. मी असे म्हणतो कारण ज्याने शारीरिक दु:खसहनाचा अनुभव घेतला आहे तो पाप करण्याचे सोडून देतो. 2म्हणून तो या जगात राहत असता आपल्या उरलेल्या पृथ्वीवरील जीवनात मानवी वासनांच्या आहारी जाणार नाही तर देवाची इच्छा पूर्ण करण्याकडे लक्ष देईल. 3कारण तुम्ही आजपर्यंत विदेशी लोकांसारखे आयुष्य जगत आला म्हणजे तुम्ही कामातुरपणाच्या कृतीत चालला, देहवासना, मद्यपान, बदफैलीपणा, रंगेलपणा आणि अमंगळ मूर्तिपूजा यात बेभान जीवन जगलात. 4आता तुम्ही त्यांच्यासारखे वाहवत जात नाही याचे त्यांना आश्चर्य वाटते. म्हणून तुम्हांस शिव्याशाप देतात.

5ते त्यांच्या वागणुकीचा हिशोब येशू ख्रिस्त जो जिवंतांचा आणि मेलेल्यांचा न्याय करण्यास तयार आहे, त्यास देतील. 6कारण जे मेलेले आहेत त्यांनासुद्धा सुवार्ता सांगण्यात आली होती यासाठी की, मनुष्यांप्रमाणेच शारीरिकदृष्ट्या त्यांचा न्याय व्हावा आणि आध्यात्मिकदृष्ट्या देवासमान सार्वकालिक जीवन जगावे.

## देवाने दिलेल्या देणग्यांचे चांगले कारभारी व्हा

7सर्व गोष्टींचा शेवट होण्याची वेळ जवळ आली आहे. म्हणून पूर्णपणे सावधानतेने वागा आणि प्रार्थना करण्यास सतत तयार राहा. 8सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही की, एकमेकांवर सात्याने प्रेम करा. कारण प्रेम पापाच्या राशीवर पांघरूण घालते. 9कुरकूर न करता एकमेकांचा पाहूणचार करा. 10तुमच्यातील प्रत्येकाने देवाकडील कारभारी या नात्याने तुम्हाला प्राप्त झालेल्या विविध दानांचा एकमेकांची सेवा करण्यासाठी काळजीपूर्वक वापर. करावा वेगवेगळी दाने असलेला कारभारी करतो तसा करावा. 11सर्व बाबतीत येशू ख्रिस्ताच्या द्वारे देवाला गौरव मिळावे यासाठी जो भाषण करतो त्याने देवापासून आपल्याला वचन आले आहे असे बोलावे; जो सेवक आहे त्याने देवाने पुरविलेल्या सामर्थ्यानुसार सेवा करीत राहावे. यासाठी की सर्व गोष्टीत येशू ख्रिस्ताद्वारे देवाला गौरव दिले जावे. कारण गौरव व सामर्थ्य अनंतकालासाठी त्याचीच आहेत. आमेन.

## ख्रिस्ती म्हणून दु:ख सहन करणे

12प्रिय मित्रांनो, तुमच्यावर मोठे संकट येऊन तुमची कसोटी होते तेव्हा नवल वाटून घेऊ नका. 13त्याऐवजी, तुम्ही ख्रिस्ताच्या दु:खसहनाचे भागीदार झाल्याबद्दल आनंद करा. यासाठी की, जेव्हा त्याचे गौरव प्रकट होईल तेव्हा तुम्ही आनंदाने आरोळी मारावी. 14जर तुम्ही ख्रिस्ताचे अनुयायी आहात म्हणून कोणी तुमचा अपमान केला तर तुम्ही धन्य आहात. कारण देवाचा गौरवी आत्मा तुमच्यावर विसावतो. 15म्हणून, तुमच्यातील कोणास खुनी, चोर, भ्रष्टाचारी किंवा इतरांच्या खाजगी व्यवहारात लुडबूड करणारा म्हणून दु:ख सोसावे लागू नये. 16पण जर तुम्ही ख्रिस्ती म्हणून दु:ख सहन केले तर तुम्हांला त्याबद्दल लाज वाटण्याचे मुळीच कारण नाही. तर तुम्हांला "ख्रिस्ती" हे नाव मिळाल्याने देवाला गौरव द्यावे. 17कारण देवाच्या घराण्यापासून सुरूवात करून न्यायनिवाडा व्हावा अशी वेळ आली आहे. आणि त्याचा आरंभ पहिल्यांदा आपल्यापासून होईल, तर देवाच्या सुवार्तेचा सन्मान करण्याचे जे नाकारतील त्या लोकांचा शेवट कसा होईल बरे?

18आणि "जर चांगल्या माणसाचे तारण होणे अवघड आहे तर मग जो अधार्मिक व पापी मनुष्य आहे त्याचे काय होईल?"*

19तर मग ज्यांना देवाच्या इच्छेनुसार दु:ख सोसावे लागते, त्यांनी आपल्या निर्माणकर्त्या देवाच्या हाती आपले जीवन सोपवून द्यावे आणि त्यांनी चांगली कामे करीत राहावे.

## देवाचा कळप

5 आता मी तुमच्यातील वडीलजनांना आवाहन करतो (मी स्वत: एक वडील आहे आणि ख्रिस्ताच्या दु:खसहनाचा साक्षीदार आहे, तसेच भविष्यकाळात प्रकट होणाऱ्या गौरवाचा भागीदारसुद्धा आहे.) 2तुमच्या देखभालीसाठी असलेल्या देवाच्या कळपाचे संगोपन करा. व त्याचा सर्वांगीण काळजीवाहक असल्यासारखे त्या कळपाचे पालनपोषण करा. तुम्हांला बळजबरीने करायला सांगितले म्हणून नाही, तर देवाला पाहिजे म्हणून स्वसंतोषाने कळपाचे पालनपोषण करा. तुम्ही पैशाचे लोभी आहात म्हणून काम करू नका तर तुम्ही सेवा करण्यास अधीर आहात म्हणून सेवा करा. 3आणि ज्यांची काळजी घेण्याची कामगिरी तुमच्यावर सोपविली आहे, त्यांच्याशी एखाद्या हुकूमशहाप्रमाणे वागू नका, तर तुमच्या सर्व कळपापुढे एक उदाहरण होईल असे वागा. 4आणि जेव्हा तुमचा मुख्य मेंढपाळ येईल, तेव्हा तुम्हाला कधीही नाश न

---

**जर ... होईल** नीतिसूत्रे 11:31

पावणारा गौरवी मुगुट देईल. 5त्याचप्रकारे तरुण बंधुनो,
वडीलजनांच्या अधिन असा. आणि तुम्ही सर्वजण लीनतेचा
पोशाख घालून एकमेकाशी विनयाने वागा कारण

"देव गर्विष्ठ लोकांचा विरोध करतो, पण दीनावर कृपा करतो." *नीतिसूत्रे 3:34*

6देवाने योग्य वेळी तुम्हांस उंच करावे यासाठी देवाच्या
बलशाली हाताखाली लीनतेने राहा. 7तुमच्या सर्व चिंता
देवावर टाका, कारण तो तुमची काळजी घेतो, 8सावध
आणि जागरूक असा. तुमचा वैरी जो सैतान तो गर्जना
करीत फिरणाऱ्या सिंहासारखा कोणाला गिळावे म्हणून
सगळीकडे फिरत असतो.
9त्याचा विरोध करा आणि तुमच्या विश्वासात खंबीर
राहा. कारण तुम्हाला माहीत आहे की, जगभर असलेल्या
बंधूभगिनींना अशाच प्रकारचे दु:ख सहन करावे लागले,
जसे तुम्ही सध्या अनुभवीत आहात.
10परंतु काही काळ दु:ख सहन केल्यानंतर सर्व कृपेचा
उगम जो देव, ज्याने येशू ख्रिस्ताच्या अनंतकाळच्या गौरवात
भागीदार होण्यासाठी तुम्हाला पाचारण केले तो स्वत:
तुम्हाला पुन्हा खंबीरपणे उभे करील. तुम्हाला सामर्थ्य
देईल. तुम्हाला स्थिरता देईल. 11त्याचे सामर्थ्य अनंतकाळचे
आहे! आमेन.

### शेवटचा सलाम

12तुम्हाला देवाच्या खऱ्या कृपेची साक्ष द्यावी व तुम्हाला
उत्तेजन द्यावे म्हणून मी हे पत्र सिल्वानच्या हातून थोडक्यात
लिहीत आहे कारण सिल्वान हा आपला विश्वासू भाऊ
आहे. असे मी समजतो. देवाच्या खऱ्या कृपेत दृढ राहा.
13तुमच्याबरोबरच देवाने निवडलेली बाबेल येथील
मंडळी तुम्हांला सलाम सांगते, तसेच ख्रिस्तातील माझा
पुत्र मार्क तुम्हांला सलाम सांगतो. 14तुम्ही एकमेकांना
प्रीतीच्या चुंबनाने सलाम करा. तुम्ही जे सर्व ख्रिस्तामध्ये
आहात त्या तुम्हांबरोबर शांति असो.

# पेत्राचें दुसरे पत्र

1 ख्रिस्त येशूचा दास व प्रेषित असलेल्या शिमोन
पेत्राकडून,
देवाकडून, ज्यांना तारणारा येशू ख्रिस्त याच्या द्वारे,
मौल्यवान विश्वास आमच्या बरोबरीनेच मिळाला आहे
अशांना, 2देव आणि आपला प्रभु येशू याच्या ओळखीमुळे
तुम्हाला देवाची कृपा व शांति विपुल प्रमाणात लाभो.

### प्रत्येक गोष्ट जी आम्हांला पाहिजे ती देवाने दिलेली आहे

3जे काही जीवनासंबंधी व देवाच्या भक्तीसंबंधी आहे ते
सर्व आम्हाला येशूच्या दैवी सामर्थ्याने दिले आहे. कारण
ज्याने आम्हाला त्याच्या स्वत:च्या गौरवाने व चांगुलपणाने
बोलविले आहे त्याला आम्ही ओळखतो. 4या गोष्टींच्या
म्हणजे गौरव व चांगुलपणा यांच्याद्वारे देवाने आपल्याला
फार महान आणि मौल्यवान असे आशीर्वादाचे अभिवचन
दिले आहे यासाठी की, त्यांच्याद्वारे आम्ही देवासारखे व्हावे
आणि जगातील दुष्ट लोकांच्या वासनांमुळे नाशापासून
सुटका करून घ्यावी. 5म्हणून या कारणासाठी आपल्या
कडून होता होईल ते प्रयत्न करून देण्यात उदारपणाची,
विश्वासात चांगुलपणाची, चांगुलपणात ज्ञानाची, 6ज्ञानात
आत्मसंयमनाची, आत्मसंयमात धीराची आणि धीरात
देवाच्या प्रामाणिक सेवेची भर घाला 7आणि देवाच्या
प्रामाणिक सेवेस बंधुप्रीतीची व बंधुप्रीतीस प्रीतीची जोड द्या.
8जर या सर्व गोष्टी तुमच्यात असतील व या गोष्टी वाढत
असतील तर त्या तुम्हाला क्रियाशील व फळ देणारे लोक
करून आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या ज्ञानात परिपूर्ण
करतील. 9पण ज्याच्या अंगी हे गुण नसतील तो पायापुरते
पाहणारा व आंधळा ठरेल. आणि त्याच्या गतकाळातील
पापापासून त्याला शुद्ध केल्याचा विसर त्याला पडला
आहे. 10म्हणून बंधूंनो, तुम्हाला देवाने खरोखरच पाचारण
केले आहे आणि निवडले आहे, हे दाखविण्यासाठी अधिक
उत्सुक असा. कारण जर तुम्ही या गोष्टी करता तर
तुम्ही कधीही अडखळणार नाही आणि पडणार नाही.
11आणि अशा प्रकारे आपला प्रभु व तारणारा येशू ख्रिस्त
याच्या अनंतकाळच्या राज्यात उदारपणे तुमचे स्वागत
करण्यात येईल.
12या कारणासाठी, या गोष्टींची मी तुम्हांला सतत आठवण
करून देत राहीन. जरी तुम्हांला त्या माहीत असल्या
आणि तुमच्याप्रत आलेल्या सत्यात तुम्ही चांगले
स्थिरावलेले असला, 13तरी हे सांगणे मी अगदी योग्य
समजतो की, जोपर्यंत या शरीराने मी जिवंत आहे तोपर्यंत
तुम्हांला आठवण करून देऊन जागे ठेवणे योग्य आहे.
14कारण मला माहीत आहे की आपल्या प्रभू येशू ख्रिस्ताने
मला हे स्पष्ट केले आहे की, लवकरच मला हे शरीर
सोडावे लागणार आहे.* 15म्हणून या जीवनातून गेल्यानंतर
या गोष्टींची आठवण करून देण्यासाठी मी सर्व प्रसंगी
प्रयत्नांची पराकाष्ठा करीन.

### आम्ही ख्रिस्ताचे वैभव पाहिले

16कारण आपल्या प्रभु येशूच्या सामर्थ्ययुक्त
आगमनाविषयी जेव्हा आम्ही तुम्हांला सांगितले, तेव्हा
अक्कलहुशारीने बनवलेल्या भाखडकथांवर आम्ही
विसंबून राहिलो नाही. उलट आम्ही आमच्या डोळ्यांनी
त्याची महानता पाहिली.
17कारण त्याला सन्मान व गौरव ही देवपित्याकडून
प्राप्त झालीत, तेव्हा उदात्त गौरवाने अशी वाणी त्याच्याकडे
आली: “हा माझा प्रिय पुत्र आहे याजविषयी मी संतुष्ट
आहे.”
18आणि त्याच्याबरोबर पवित्र डोंगरावर असताना* ही
वाणी स्वर्गातून येत असताना आम्ही स्वत: ऐकली.
19आम्ही संदेष्ट्यांचे भविष्यवचन अती विश्वसनीय असे
समजून त्यास मान देतो. त्याकडे लक्ष देऊन तुम्ही फार
चांगले करता, कारण अगदी अंधारात प्रकाशणाऱ्या
दीपाप्रमाणे ते दिसते म्हणून दिवस उजाडून प्रभात तारा
तुमच्या अंत:करणात प्रकाशेपर्यंत तुम्ही त्याकडे ध्यान
देऊन पाहाल तर चांगले होईल.
20प्रथम तुम्ही हे समजले पाहिजे की, पवित्र शास्त्रातील
कोणतेही भविष्यवचन कोणाही मनुष्याच्या बुद्धीने उकलत
नाही. 21कारण एखाद्या मनुष्याला पाहिजे म्हणून
भविष्यवाणी झालेली नाही, तर जे लोक पवित्र आत्म्याने
प्रेरित झालेले होते. त्यांनीच ती लोकांपर्यंत पोहचविलेली
आहे.

---

**लवकरच ... आहे** योहान 21:18-19.

**आणि ... असताना** मत्तय 17:1-9.

## खोटे शिक्षक

2 तरीही देवाच्या लोकांमध्ये खोटे संदेष्टे होऊन गेले तसे तुमच्यामध्ये खोटे शिक्षक असणार. ते लोकांमध्ये विध्वंसक विचार पसरवतील. आणि ज्या प्रभूने त्यांच्यासाठी स्वातंत्र्य विकत घेतले त्याचा ते स्वीकार करणार नाहीत. असे करण्याने ते स्वत:वर ताबडतोब नाश ओढवून घेतील. 2तसेच पुष्कळ लोक प्रखर लैंगिक वासनांच्या आहारी जाऊन अनैसर्गिक शरीर व्यवहारात गुरफटतील. त्यांच्यामुळे खऱ्या मार्गाची निंदा होईल 3त्यांच्या अधाशीपणामुळे त्यांनी तयार केलेल्या शिकवणुकीने पैशांसाठी तुमची पिळवणूक करतील. फार पूर्वी देवाने त्यांना दिलेली शिक्षा ही पोकळ धमकी नाही तर त्यांचा नाश त्यांची वाट पाहत आहे.

4कारण देवाने, ज्या देवदूतांनी पाप केले त्यांनादेखील सोडले नाही, तर न्यायाचा दिवस येईपर्यंत त्यांना अधोलोकाच्या गडद अंधारात टाकले. 5देवाने प्राचीन काळातील जगाचीसुद्धा गय केली नाही; तेव्हा त्याने नोहाचे, ज्याने लोकांना योग्य रीतीने राहण्यासाठी उपदेश केला व त्याच्याबरोबर इतर सात लोकांचे संरक्षण केले आणि अधार्मिक लोकांनी भरलेल्या या जगावर पाण्याचा महापूर आणला. 6देवाने सदोम व गमोरा या शहरांना जाळून बेचिराख करण्याची शिक्षा दिली व भविष्यकाळात अनैतिक लोकांचे काय होईल हे या उदाहरणाने दाखवून दिले. 7आपल्या अनीतिच्या वागण्याने ज्या बेबंद लोकांनी लोटासारख्या चांगल्या माणसाला कष्टविले, त्याची देवाने सुटका केली. 8दिवसेंदिवस त्या लोकांमध्ये राहत असताना, त्या नियमविरहीत लोकांमुळे जे तो पाहत व ऐकत होता त्यामुळे त्या चांगल्या मनुष्याला आपले धार्मिक हृदय, फाटून जाते की काय असे त्याला वाटत होते. 9अशा प्रकारे, प्रभुला, धार्मिक लोकांची त्यांच्या दु:खापासून सुटका कशी करायची हे माहीत आहे आणि त्याला माहीत आहे की न्यायाच्या दिवसापर्यंत दुष्ट लोकांना शिक्षेसाठी कसे ठेवायचे. 10विशेषत: जे पापमय वासनांच्या भ्रष्ट मार्गाने गेले आहेत, आणि प्रभुचा अधिकार असताना देखील उद्धटपणे व मन मानेल तसे वागणारे ते लोक गौरवी देवदूतांची निंदा करायला भीत नाहीत.

11याउलट देवदूत जे या लोकांपेक्षा सामर्थ्याने व बळाने महान आहेत, ते देवासमोर या लोकांविरुद्ध अपमानास्पद गैर काही बोलत नाहीत. 12परंतु हे लोक ज्यांना पकडून मारून टाकावे अशा देहस्वभावानुसार चालणाऱ्या बुद्धीहीन पशूंसारखे आहेत. ज्या गोष्टींबद्दल ते अज्ञानी आहेत, त्याविरुद्ध हे लोक बोलतात. ज्याप्रमाणे प्राण्यांचा नाश केला जातो, त्याचप्रमाणे (खोट्या शिक्षकांचाही) नाश केला जाईल. 13आणि त्यांनी इतरांना दुखावल्याचे आणि अन्यायाचे फळ म्हणून त्यांनाही दुखाविण्यात येईल. भर दिवसा वाईट गोष्ट करण्यात आनंद आहे असे ते लोक मानतात. ते डाग आणि कलंक असे आहेत, ते तुमच्याबरोबर मेजवानीत सामील होताना आपल्या कपटाच्या आनंदात बेभान होतात. 14त्यांची पापी नजर प्रत्येक स्त्रीकडे कामूकतेने वळते व असले पाप करायचे ते कधीही सोडत नाहीत. डळमळीत मनाच्या लोकांना ते भुरळ घालून पापात ओढतात त्यांची मने अधाशीपणात तरबेज झालेली असतात. ते लोक शापित आहेत. 15सरळ वाट सोडून ते भलतीकडे भरकटत गेले आहेत. बौराचा पुत्र बलाम याच्यासारखी वाट त्यांनी धरली आहे. बलामाला अयोग्य गोष्टी करण्याकरिता लाच घेणे आवडत असे. 16परंतु त्याच्या दोषामुळे त्याची कानउघडणी करण्यात आली. कधीही बोलू न शकणाऱ्या गाढवाने माणसासारखे बोलून संदेष्ट्याच्या वेडगळपणास आवर घातला.

17हे खोटे शिक्षक पाणी नसलेले कोरडे झरे व वादळाने पांगविलेले ढग आहेत. खोल अंधारात त्यांच्यासाठी जागा राखून ठेवली आहे. 18ते पोकळ बढाया मारतात व जे लोक चुकीचे जीवन जगणाऱ्यांच्या संगतीपासून सुटकेचा प्रयत्न करू लागले आहेत, अशांची फसवणूक करून देहवासनांच्या अनैतिकतेचा मोह टाकतात. 19हे जे खोटे शिक्षक आहेत ते लोकांना मोकळीक देण्याचे वचन देतात परंतु ते स्वत:च नाशवंत जीवनाचे दास आहेत. कारण एखाद्या मनुष्यावर ज्या गोष्टीचा पगडा बसलेला असतो त्याचा तो गुलाम बनतो. 20म्हणून आपला प्रभू व तारणारा येशू ख्रिस्त यांची ज्या लोकांना ओळख होते, त्यांची जगाच्या दूषित वातावारणापासून सुटका होते. परंतु नंतर पुन्हा एकदा जगाचे अशुद्ध वातावरण या लोकांवर आपला पगडा बसविते. मग त्यांची शेवटची स्थिती अगोदरच्या स्थितीहून जास्तच वाईट होते. 21त्यांना जर चांगला मार्ग माहीत झाला नसता तर चांगले झाले असते कारण चांगला मार्ग माहीत होणे आणि त्या लोकांना दिलेल्या पवित्र शिक्षणापासून त्यांनी वळणे, यापेक्षा (अगोदरची स्थिती चांगली होती.) 22त्यांच्या बाबतीत जे घडले ते या खऱ्या म्हणीत सांगितले आहे: “आपल्याच ओकीकडे परतणारा कुत्रा” आणि दुसऱ्या म्हणीत: “स्वच्छ केले तरी चिखलात लोळणारे डुक्कर.”

## येशू परत येईल

3 प्रिय मित्रांनो, हे दुसरे पत्र मी तुम्हाला लिहिले आहे. दोन्ही पत्रांमध्ये या गोष्टींची आठवण करून देण्यासाठी तुमची शुद्ध मने जागी करण्याचा प्रयत्न केला आहे. 2देवाच्या पवित्र संदेष्ट्यांनी वापरलेले शब्द आणि तुमच्या प्रेषितांकडून आपल्या प्रभु व तारणाऱ्याने दिलेल्या आज्ञांची तुम्ही आठवण करावी अशी माझी इच्छा आहे. 3पहिल्यांदा आम्ही जे तुम्हाला सांगितले ते तुम्ही समजून घेतले पाहिजे, ते म्हणजे, शेवटच्या दिवसांत थट्टेखोर लोक येतील जे आपल्या इच्छेप्रमाणे वागतील. 4आणि म्हणतील, “ख्रिस्ताच्या येण्याविषयीच्या अभिवचनाचे काय झाले? आम्हाला ते जाणून घ्यायचे आहे, कारण आमचे पूर्वज

मेल्यापासून प्रत्येक गोष्ट जगाच्या निर्मितीच्या पासून जशी
चालत आली तशीच ती आजसुद्धा घडत आहे.” [5]पण
जेव्हा ते असे म्हणतात, तेव्हा ते मुद्दामच विसरतात की,
फार पूर्वीपासून आकाश व पृथ्वी अस्तित्वात होती, जी
देवाच्या शब्दाने पाण्यामधून आकारास आली. [6]जेव्हा
मागे जग अस्तित्वात होते तेव्हा याच घटकामुळे महापूर
येऊन पृथ्वीचा नाश झाला. [7]परंतु आता जे आकाश व
पृथ्वी आहेत ती याच शब्दाने अग्निद्वारे नष्ट होण्यासाठी
राखून ठेवली आहेत. त्यांना त्याच दिवसासाठी राखून
ठेवण्यात आले आहे, जेव्हा अधार्मिक लोकांचा न्याय
होऊन त्यांचा नाश होईल.

[8]परंतु, प्रिय मित्रांनो, ही एक गोष्ट विसरू नका की,
प्रभूला एक दिवस एक हजार वर्षांसारखा आणि एक
हजार वर्षे एका दिवसासारखी आहेत.* [9]देव त्याच्या
अभिवचनाची परिपूर्ती करण्यासाठी उशीर लावणार नाही.
जसे काही लोकांना वाटते, परंतु तो आमच्याशी धीराने
वागतो. कारण आपल्यापैकी कोणाचा नाश व्हावा असे
त्याला वाटत नाही. वास्तविक सर्व लोकांनी पश्चात्ताप
करावा असे त्याला वाटते.

[10]परंतु प्रभूचा दिवस एका चोरासारखा येईल, त्यादिवशी
आकाश मोठ्या गर्जनेने नाहीसे होईल व आकाशातील
सर्व गोष्टी जळून नाहीशा होतील आणि पृथ्वीवरील लोक
व त्यांची कामे उघडकीस येतील.* [11]जर अशा प्रकारे
सर्व गोष्टींचा नाश होणार आहे तर तुम्ही कोणत्या प्रकारचे
लोक असायला पाहिजे याचा विचार करा. तुम्ही आपले
जीवन पवित्रतेने जगावे व देवाच्या सेवेत रममग्र असावे.
[12]तुम्ही प्रभुच्या येण्याच्या दिवसाची वाट पाहावी यासाठी
की देवाच्या येण्याचा दिवस अधिक लवकर यावा. त्या
गर्जनेने (आवाजाने) आकाश पेटून नष्ट होईल व
आकाशातील सर्व गोष्टी आगीत वितळतील. [13]पण देवाच्या
वचनाप्रमाणे, जेथे चांगुलपणा वास करतो असे नवे आकाश
व नवी पृथ्वी यांची आपण वाट पाहू. [14]म्हणून प्रिय मित्रांनो,
ज्याअर्थी तुम्ही या गोष्टींची वाट पाहत आहात, त्याअर्थी
आपणास प्रभूसमोर डागरहित, दोषरहित व शांतता
टिकविण्यांचा आटोकाट प्रयत्न करा. [15]आणि ही गोष्ट
मनामध्ये ठेवा की, आपल्या प्रभूचा धीर म्हणजे तारण,
ज्याप्रमाणे आपला प्रिय बंधु पौल याला देवाने दिलेल्या
शहाणपणामुळे त्याने तुम्हांला लिहिले.

[16]त्या पत्रात, जसे इतर सर्व पत्रांत असते, त्याप्रमाणे तो
या गोष्टीविषयी सांगतो. त्याच्या पत्रामध्ये काही गोष्टी
आहेत ज्या समजण्यास कठीण आहेत. अज्ञानी व चंचल
मनाचे लोक पवित्र शास्त्रातील इतर गोष्टींप्रमाणे या
गोष्टींचादेखील विपर्यास करून गैरअर्थ लावतात व
परिणामी आपला स्वत:चा नाश करून घेतात. [17]यासाठी,
प्रिय मित्रांनो, तुम्हाला या गोष्टी अगोदरच माहीत असल्याने
स्वत:चे रक्षण करा. यासाठी की, नियमशास्त्रविरहित
लोकांच्या चुकीमुळे तुम्ही भरकटत जाऊ नये आणि
तुमची जी विश्वासाविषयीची अढळ भूमिका आहे,
तिच्यापासून विचलित होऊ नये म्हणून संभाळा. [18]परंतु
आपला प्रभु व तारणारा येशू ख्रिस्त याच्या कृपेत आणि
त्याच्याकडून मिळणाऱ्या ज्ञानात वाढत राहा. त्याला आता
आणि अनंतकाळपर्यंत गौरव असो.

---

**प्रभूला … आहेत** नीतिसूत्रे 9:4.

**आणी … येतील** काही प्राचीन प्रतीत ‘जळून नाहीशा होतील’ किंवा ‘अदृष्य होतील.’

# योहानाचें पहिले पत्र

1 जगाच्या सुरुवातीपासून हे होते. हे आम्ही ऐकले आहे.
आम्ही आमच्या डोळ्यांनी ते पाहिले आहे. आम्ही ते
निरखून पाहिले आहे. आम्ही ते आमच्या हातांनी चाचपले
आहे. जो शब्द जीवन देतो त्याविषयी आम्ही बोलत आहोत.
2ते जीवन आम्हास प्रकटविण्यात आले. आम्ही ते पाहिले
आहे; त्याविषयी आम्ही साक्ष देतो; आणि त्या अनंतकाळच्या
जीवनाविषयी आम्ही तुम्हांला घोषणा करीत आहोत. ते
जीवन पित्याबरोबर होते आणि ते आम्हाला प्रकटविण्यात
आले.
3आम्ही ते पाहिले आहे व ऐकले आहे आणि आम्ही
आता ते तुम्हालाही घोषित करीत आहोत, यासाठी की
तुमचीही आमच्यासह सहभागिता असावी. आमची
सहभागिता तर देवपिता व त्याचा पुत्र येशू ख्रिस्त याजबरोबर
आहे. 4म्हणून आम्ही तुम्हांला या गोष्टींविषयी लिहीत
आहोत. यासाठी की तुमचा आनंद पूर्ण व्हावा.

### देव आमच्या पापांची क्षमा करतो

5आणि हा संदेश आहे जो आम्ही येशू ख्रिस्ताकडून
ऐकला आहे आणि जो आम्ही तुम्हाला घोषित करीत
आहोत. देव प्रकाश आहे आणि त्याच्यामध्ये मुळीच अंधार
नाही.
6जर आम्ही म्हणतो की, आमची देवाबरोबर सहभागिता
आहे पण पापाच्या अंधारामध्ये आम्ही राहतो तर आम्ही
खोटे बोलत आहोत व आम्ही सत्याला अनुसरत नाही.
7पण जर आम्ही प्रकाशात चालतो, जसा देव प्रकाशात
आहे तर आमची विश्वासणारे या नात्याने एकमेकांबरोबर
सहभागिता आहे. आणि देवाचा पुत्र येशू याचे रक्त आम्हाला
सर्व पापांपासून शुद्ध करते.
8जर आम्ही असे म्हणतो की, आमच्यामध्ये कोणतेही
पाप नाही, तर आम्ही स्वत:ला फसवीत आहोत. आणि
आमच्यामध्ये सत्य नाही. 9जर आम्ही आमची पापे कबूल
करतो, तर आमच्या पापांपासून आम्हांला क्षमा करण्यास
देव विश्वासू व न्यायी आहे. आणि आमच्या सर्व
अनीतीपासून तो आम्हाला शुद्ध करतो. 10जर आम्ही
म्हणतो की आम्ही पाप केले नाही तर आम्ही देवाला
लबाड ठरवितो. आणि त्याचा संदेश आमच्या अंत:करणात
नाही.

### येशू आमचा साहाय्यकर्ता

2 माझ्या प्रिय मुलांनो, तुम्ही पाप करू नये यासाठी
मी तुम्हांला या गोष्टी लिहीत आहे, पण जर एखादा
पाप करतो तर पित्याकडे आमच्या वतीने विनवणी करणारा
मध्यस्थ आमच्याकडे आहे. तो येशू ख्रिस्त आहे, जो
नीतिमान आहे. 2तो अर्पण आहे जो आमचे पाप
आमच्यापासून काढून घेतो आणि केवळ आमचेच पाप
नव्हे तर सगळ्या जगाचे पाप काढून घेतो.
3जर आम्ही त्याच्या आज्ञा पाळतो तर हाच मार्ग आहे
ज्याविषयी आम्हाला खात्री आहे की, आम्ही देवाला खऱ्या
अर्थाने ओळखले आहे. 4जो असे म्हणतो की, "मी देवाला
ओळखतो!" आणि त्याच्या आज्ञा पाळत नाही तर तो
लबाड आहे; आणि त्याच्यामध्ये सत्य नाही. 5पण जर
कोणी देवाची शिकवण पाळतो, तर देवाविषयीचे त्याचे
प्रेम त्याच्यामध्ये पूर्ण झाले आहे. हाच मार्ग आहे ज्याद्वारे
आम्ही खात्री बाळगू शकतो की, आम्ही देवामध्ये आहोत.
6मी देवामध्ये राहतो असे जो म्हणतो, त्याने जसा येशू
जगला तसे जगले पाहिजे.

### इतर लोकांवर प्रेम करा अशी देवाने आज्ञा दिली

7प्रिय मित्रांनो, मी तुम्हांला नवी आज्ञा लिहीत नाही तर
जुनीच आज्ञा लिहीत आहे, जी तुम्हांला सुरूवातीपासूनच
देण्यात आली होती. 8ती जुनी आज्ञा म्हणजे जो संदेश
तुम्ही ऐकला आहे तीच आज्ञा आहे. शिवाय नवीन
आज्ञेप्रमाणे मी तिजविषयी लिहीतो कारण या गोष्टीविषयीचे
सत्य ख्रिस्ताच्या जीवनामध्ये आणि तुमच्या जीवनामध्ये
दर्शविण्यात आली. कारण अंधार नाहीसा होत आहे व
खरा प्रकाश अगोदरपासूनच प्रकाशत आहे.
9जो असे म्हणतो की तो प्रकाशात आहे आणि तरीही
आपल्या भावाचा द्वेष करतो तो अजूनसुद्धा अंधारात आहे.
10जो आपल्या भावावर प्रेम करतो तो प्रकाशाता राहतो,
आणि त्याच्या जीवनामध्ये अशी कोणतीही गोष्ट नसते,
जी एखाद्याला पापात पडण्यास भाग पाडते.
11पण जो आपल्या भावाचा द्वेष करतो तो अंधारात
आहे. तो अंधारात जगत आहे व तो कोठे जात आहे हे
त्याला कळत नाही. कारण अंधारामुळे तो आंधळा झालेला
आहे.

12प्रिय मुलांनो, मी तुम्हांला लिहीत आहे, कारण
ख्रिस्तामुळे तुमच्या पापांची क्षमा झालेली आहे.
13वडिलांनो, मी तुम्हांला लिहितो कारण जो
सुरुवातीपासून अस्तित्वात आहे, त्याला तुम्ही ओळखता.
तरुणांनो, मी तुम्हांला लिहीत आहे, कारण दुष्टावर तुम्ही
जय मिळविला आहे.
14मुलांनो, मी तुम्हांला लिहीत आहे, कारण तुम्हांला
पिता माहीत आहे. वडिलांनो, मी तुम्हांला लिहिले, कारण
जो सुरूवातीपासून अस्तित्वात आहे. त्याची तुम्हांला ओळख
झाली आहे. तरुणांनो, मी तुम्हांला लिहिले, कारण तुम्ही
सशक्त आहात; देवाचे वचन तुमच्यामध्ये राहते, कारण
तुम्ही दुष्टावर मात केली आहे.

15जगावर किंवा जगातील गोष्टींवर प्रेम करू नका.
जर कोणी जगावर प्रेम करतो, तर पित्याविषयी त्याच्या
अंत:करणात प्रेम नाही. 16कारण जगात जे सर्व काही
आहे, ते म्हणजे पापी देहाला संतोषविणारी लैंगिक वासना,
डोळ्यांची वासना, व संसाराविषयीची फुशारकी हे
पित्यापासून नाहीत, तर जगापासून आहेत. 17जग व जगातील
वासना नाहीशा होत आहेत. पण जो देवाच्या इच्छेप्रमाणे
करतो तो अनंतकाळपर्यंत जगेल.

## ख्रिस्ताच्या शत्रूंना अनुसरू नका

18माझ्या मुलांनो, शेवट जवळ आला आहे आणि तुम्ही
ऐकल्याप्रमाणे ख्रिस्तविरोधी येत आहेत आणि आताही
पुष्कळ ख्रिस्तविरोधी दिसू लागले आहेत. त्यामुळेच
आम्हाला कळते की, शेवट जवळ आला आहे. 19ते
आमच्यातूनच बाहेर निघाले, पण ते खऱ्या अर्थाने
आमच्यातील नव्हतेच. मी हे म्हणतो कारण जर ते खरेच
आमच्यातील असते तर ते आमच्यात राहिले असते. पण
ते गेले यासाठी की, त्यांना आम्हांला दाखवायचे होते की
त्यांच्यातील कोणीच आमचा नव्हता.
20पण जो पवित्र असा ख्रिस्त याने तुमचा आत्म्याने
अभिषेक केला आहे, म्हणून तुम्हा सर्वांना सत्य माहीत
आहे. 21मी तुम्हांला सत्य माहीत नाही म्हणून लिहीत
नाही पण तुम्हांला ते माहीत आहे कारण सत्यापासून
कोणतेच असत्य येत नाही.
22येशू हा ख्रिस्त नाही असे म्हणणारा खोटा नाही काय?
असा मनुष्य ख्रिस्तविरोधी आहे. तो पिता आणि पुत्र या
दोघांनाही नाकारतो. 23जो पुत्राचा नाकार करतो त्याला
पिताही नसतो, पण जो पुत्राला मानतो त्याला पिताही असतो.
24तुमच्या बाबतीत जे तुम्ही सुरूवातीपासून ऐकले आहे,
त्यामध्येच राहा. सुरूवातीपासून जे तुम्ही ऐकले त्यात जर
तुम्ही राहाल, तर तुम्ही पुत्रामध्ये व पित्यामध्ये राहाल.
25आणि देवाने आम्हांला जे देण्याचे अभिवचन दिले आहे:
ते म्हणजे अनंतकाळचे जीवन होय. 26जे तुम्हाला
फसविण्याचा प्रयत्न करीत आहेत त्यांच्याविषयी मी तुम्हांला
या गोष्टी लिहीत आहे. 27पण तुमच्याबाबतीत म्हटले तर,
ज्या (पवित्र व्यक्तीकडून) तुम्हांला अभिषेक करण्यात
आला तो तुमच्यामध्ये राहतो. म्हणून दुसऱ्या कोणी तुम्हांला
शिकवावे याची गरज नाही. त्याऐवजी ज्या आत्म्यासह
तुमचा अभिषेक (पवित्र व्यक्तीकडून) झाला या सर्व
गोष्टींविषयी तो तुम्हांला शिकवितो आणि लक्षात ठेवा
की, तो खरा आहे आणि खोटा मुळीच नाही. जसे त्याने
तुम्हाला जे करण्यास शिकविले आहे तसे तुम्ही ख्रिस्तामध्ये
राहा.
28म्हणून आता, प्रिय मुलांनो, ख्रिस्तामध्ये राहा. यासाठी
की, जेव्हा ख्रिस्त प्रकट होईल, तेव्हा आम्हांला दृढविश्वास
मिळेल व जेव्हा तो परत येतो तेव्हा त्याच्याद्वारे आम्ही
लज्जित केले जाणार नाही. 29जर तुम्हांला माहीत आहे
की, ख्रिस्त नीतिमान आहे तर जे लोक चांगले काम
करतात ते देवाचे पुत्र आहेत हे देखील तुम्हाला कळेल.

## आपण देवाची मुले आहोत

3 पित्याने आपल्यावर जे महान प्रेम केले आहे
त्याविषयी विचार करा. आम्हांला देवाची मुले
म्हणण्यापर्यंत त्याने प्रेम केले! आणि आम्ही खरोखरच
(देवाची मुले) आहोत! या कारणामुळे जग आम्हाला
ओळखत नाही, कारण त्यांनी (जगाने) ख्रिस्ताला ओळखले
नाही. 2प्रिय मित्रांनो, आता आम्ही देवाची मुले आहोत,
आणि भविष्यकाळात कसे असेल ते अजून माहीत करून
देण्यात आले नाही. तरीही आम्हाला माहीत आहे की,
जेव्हा ख्रिस्त पुन्हा येईल, तेव्हा आम्ही त्याच्यासारखे असू.
कारण तो जसा आहे तसे आम्ही त्याला पाहू. 3आणि ज्या
प्रत्येकाने ही आशा ख्रिस्तावर ठेवली आहे, तो स्वत:ला
शुद्ध करतो, जसा ख्रिस्त शुद्ध आहे. 4प्रत्येकजण जो पाप
करतो तो देवाचा नियम मोडतो. कारण पाप हे नियमभंग
आहे. 5लोकांचे पाप घेऊन जाण्यासाठी ख्रिस्त प्रकट झाला
हे तुम्हांस माहीत आहे, आणि त्याच्यामध्ये कोणतेही पाप
नाही.
6प्रत्येकजण जो ख्रिस्तामध्ये राहतो तो पाप करीत राहात
नाही. प्रत्येकजण जो पाप करीत राहतो त्याने त्याला
पाहिले नाही, आणि त्याला तो ओळखत सुद्धा नाही.
7प्रिय मुलांनो, तुम्हांला कोणी फसवू नये. जो योग्य ते
करतो तो जसा ख्रिस्त चांगला आहे तसा चांगला आहे.
8जो पापमय जीवन जगतच राहतो तो सैतानाचा आहे,
कारण सैतान सुरुवातीपासून पाप करीत आहे आणि
सैतानाची कामे नष्ट करावी या उद्देशानेच देवाचा पुत्र
प्रकट झाला.
9जो देवाचा पुत्र झाला आहे तो कोणीही पाप करीत
नाही. कारण खुद्द देवाचे बी त्या व्यक्तीमध्ये असते. त्यामुळे
तो पापात राहू शकत नाही. कारण तो देवाचे मूल बनला
आहे. 10जी देवाची मुले आहेत व जी सैतानाची मुले
आहेत, त्यांना तुम्ही अशा प्रकारे सांगू शकता: प्रत्येकजण

जे योग्य ते करीत नाही आणि जो त्याच्या भावावर प्रेम
करीत नाही तो देवाचा नाही.

### आम्ही एकमेकांवर प्रीति केली पाहिजे

11आपण एकमेकांवर प्रीति करावी, ही शिकवण आपण
सुरूवातीपासून ऐकली आहे. 12काईन जो त्या दुष्टाचा
(सैतानाचा) होता तसे आम्ही असू नये कारण त्याने त्याच्या
भावाला मारले आणि कोणत्या कारणासाठी त्याने त्याला
मारले? त्याने तसे केले कारण त्याची स्वत:ची कृत्ये दुष्ट
होती, तर त्याच्या भावाची कृत्ये चांगली होती.
13बंधूनो, जर जग तुमचा द्वेष करते तर त्याचे आश्चर्य
मानू नका. 14आपल्याला माहीत आहे की, आपण मरणातून
जीवनात गेलो आहोत. कारण आपण आपल्या बंधूवर
प्रीति करतो. जो प्रीति करीत नाही तो मरणात राहतो.
15जो कोणी आपल्या भावाचा द्वेष करतो, तो खुनी आहे.
आणि तुम्हांला माहीत आहे की, खुनी माणसाला त्याच्या
ठायी असलेले अनंतकाळचे जीवन मिळत नाही. 16अशा
रीतीने ख्रिस्ताने आपल्यासाठी स्वत:चा जीव दिला. यामुळे
प्रेम काय आहे ते आपल्याला समजते. म्हणून आपण
देखील आपल्या भावासाठी जीव दिला पाहिजे. 17जर
कोणाजवळ जगिक संपत्ती आहे आणि त्याचा भाऊ गरजेत
आहे हे तो पाहतो पण तरीही त्याच्यावर दया करीत नाही
तर त्याच्यामध्ये देवाची प्रीती राहते असे आपण कसे म्हणू
शकतो? 18प्रिय मुलांनो, आपली प्रीति केवळ शब्दांनी
बोलण्याएवढीच मर्यादित नसावी तर ती कृती सहीत व
खरीखुरी असावी.
19आम्ही सत्याचे आहोत ते यावरून आम्हांस कळेल
आणि अशाप्रकारे देवासमोर आमच्या अंत:करणाची खात्री
पटेल 20जेव्हा जेव्हा आमचे अंत:करण आम्हांला दोष
देईल, हे यासाठी की आमच्या अंत:करणापेक्षा देव महान
आहे. आणि सर्व काही (तो) जाणतो.
21प्रिय मित्रांनो, वाईट करण्याबद्दल जर आमची
अंत:करणे आम्हांला दोष देत नाहीत तर देवाकडे
जाण्यासाठी आम्हांला खात्री आहे. 22आणि देवाकडे आम्ही
जे मागतो ते आम्हाला प्राप्त होते. कारण आम्ही त्याच्या
आज्ञा पाळतो, आणि त्याला जे संतोषकारक आहे ते
आम्ही करीत आहोत. 23तो आम्हांला अशी आज्ञा करतो
की येशू ख्रिस्ताच्या नावावर आम्ही विश्वास ठेवला पाहिजे
आणि एकमेकांवर प्रीति केली पाहिजे, जशी येशूने
आम्हांला आज्ञा केली आहे. 24जो देवाची आज्ञा पाळतो
तो त्याच्यामध्ये राहतो आणि देव त्या व्यक्तीमध्ये राहतो.
देव आमच्यामध्ये राहतो हे आम्हांला यावरून समजते,
त्याने दिलेल्या आत्म्यामुळे आम्हाला हे समजते.

### खोट्या शिक्षकांविरुद्ध योहानाचा इशारा

4 प्रिय मित्रांनो, प्रत्येक संदेष्ट्याचा आत्म्यावर विश्वास
ठेवण्याची सवय लावून घेऊ नका. त्याऐवजी नेहमी
त्या आत्म्यांची परीक्षा करा व ते (खरोखर) देवापासून
आहेत का ते पाहा. मी हे तुम्हांला सांगतो कारण जगात
पुष्कळ खोटे संदेष्टे निघाले आहेत. 2अशा प्रकारे तुम्ही
देवाचा आत्मा ओळखू शकता: प्रत्येक संदेष्ट्याचा आत्मा
जो कबूल करतो की, “येशू ख्रिस्त या जगात मानवी
रूपात आला.” तो देवापासून आहे. 3आणि प्रत्येक
संदेष्ट्याचा आत्मा जो येशूविषयी कबुली देत नाही तो
देवापासून नाही. अशी व्यक्ति म्हणजे ख्रिस्तविरोधी होय.
ज्याच्या येण्याविषयी तुम्ही ऐकले आहे. तो अगोदरच जगात
आला आहे. 4माझ्या मुलांनो, तुम्ही देवाचे आहात, म्हणून
तुम्ही ख्रिस्तविरोध्याच्या अनुयायांना जिंकले आहे, कारण
जगामध्ये जो सैतान आहे त्याच्यापेक्षा जो तुमच्यामध्ये आहे
तो महान देव आहे. 5ते लोक म्हणजे ख्रिस्ताचे शत्रू जगाचे
आहेत यासाठी की ते जगापासूनच्या गोष्टी बोलतात व
जग त्यांचे ऐकते. 6पण आम्ही देवाचे आहोत. जो देवाला
ओळखतो तो आपले ऐकतो. परंतु जो देवाचा नाही तो
आपले ऐकत नाही. अशा रीतीने सत्य प्रकट करणारा
आत्मा आणि लोकांना दूर नेणारा आत्मा कोणता हे
आपण ओळखू शकतो.

### प्रीति देवापासून येते

7प्रिय मित्रांनो, आपण एकमेकांवर प्रीति करू या, कारण
प्रीती देवाकडून येते, आणि प्रत्येकजण 8जो प्रीति करतो
तो देवाचे मूल होतो आणि देवाला ओळखतो. जो प्रीति
करीत नाही, त्याची देवाशी ओळख झालेलीच नाही. कारण
देव प्रीति आहे. 9अशा प्रकारे देवाने त्याची आम्हावरील
प्रीति दर्शविली : त्याने आपला एकुलता एक पुत्र या
जगात पाठविला यासाठी की त्याच्याद्वारे आम्हाला जीवन
मिळावे. 10आम्ही देवावर प्रीति केली असे नाही तर त्याने
आम्हांवर प्रीति केली व आपल्या एकुलत्या एका पुत्राला
आमच्या पापाकरिता प्रायश्चित्त म्हणून पाठविले; यामध्ये
खरी प्रीति आहे.
11प्रिय मित्रांनो, जर देवाने आमच्यावर अशा प्रकारे
प्रीति केली तर आम्ही एकमेकांवर प्रीति केलीच पाहिजे.
12देवाला कोणी कधीही पाहिले नाही. पण जर आपण
एकमेकांवर प्रीति करीत राहिलो तर देव आमच्यामध्ये
राहतो व त्याची आम्हांवरील प्रीति पूर्णत्वास आणलेली
आहे. 13अशा प्रकारे आम्हांला समजू शकते की देव
आमच्यामध्ये राहतो व आम्ही त्याच्यामध्ये राहतो: त्याने
त्याचा आत्मा आमच्यात राहू दिला आहे. 14ही गोष्ट
आम्ही पाहिली आहे व आम्ही साक्ष देतो की, जगाचा
तारणारा होण्यासाठी पित्याने पुत्राला पाठविले आहे. 15जर
कोणी “येशू हा देवाचा पुत्र आहे” हे कबूल करतो तर देव
त्या व्यक्तीमध्ये राहतो आणि ती व्यक्ति देवामध्ये रहाते.
16आणि म्हणून आम्ही ओळखतो आणि त्या प्रीतीवर आम्ही
विश्वास ठेवतो की, जी देवाने आमच्यावर केली. देव
प्रीति आहे. आणि जो प्रीतीत राहतो तो देवामध्ये राहतो

आणि देव त्या व्यक्तीमध्ये राहतो 17अशा प्रकारे
आमच्याबाबतीत प्रीति पूर्ण होते यासाठी की न्यायाच्या
दिवशी आम्हाला दृढविश्वास प्राप्त व्हावा. अशा प्रकारचा
आत्मविश्वास आमचा आहे कारण या जगामध्ये जे जीवन
आम्ही जगत आहोत ते ख्रिस्ताच्या जीवनासारखे आहे.
18प्रीतीमध्ये कोणतीही भिति नसते. उलट पूर्ण प्रीति भीतीला
घालवून देते. प्रीति शिक्षेशी संबंधित आहे. आणि जो भीतीमय
जीवन जगतो तो प्रीतीत पूर्ण झालेला नाही.

19आम्ही प्रीति करतो कारण देवाने आमच्यावर
पहिल्यांदा प्रीति केली. 20जर एखादा म्हणतो, "मी देवावर
प्रीति करतो," पण त्याच्या भावाचा द्वेष करतो, तर तो
खोटे बोलतो. मी हे म्हणतो कारण ज्याला त्याने पाहिलेले
आहे अशा भावावर जर एखादा प्रीति करीत नाही, तर
ज्या देवाला त्याने पाहिले नाही त्याच्यावर तो प्रीति करू
शकत नाही! 21आम्हांला ख्रिस्ताकडून ही आज्ञा मिळाली
आहे: जो देवावर प्रीति करतो त्याने त्याच्या भावावर प्रीति
केलीच पाहिजे.

## देवाची मुले जगाविरुद्ध विजयी होतात

5 प्रत्येकजण जो विश्वास ठेवतो की येशू हा ख्रिस्त
आहे तो देवाचे मूल झालेला आहे. आणि प्रत्येकजण
जो पित्यावर प्रीति करतो तो त्याच्या मुलावरही प्रीति
करतो. 2अशा प्रकारे आम्ही ओळखतो की आम्ही देवाच्या
पुत्रावर प्रीति करतो: देवावर प्रीति करण्याने व त्याच्या
आज्ञा पाळण्याने. 3देवाप्रती असलेली आमची प्रीति आम्ही
त्याच्या आज्ञापालनाकडून दाखवू शकतो आणि त्याच्या
आज्ञा फार अवजड नाहीत. 4कारण प्रत्येकजण जो देवाचा
मूल होतो तो जगावर विजय मिळवितो. आणि यामुळे
आम्हांला जगावर विजय मिळाला: आमच्या विश्वासाने.
5येशू हा देवाचा पुत्र आहे असा विश्वास धरणाऱ्याशिवाय
जगावर विजय मिळविणारा कोण आहे?

## देवाने आम्हाला त्याच्या पुत्राविषयी सांगितले

6येशू ख्रिस्त आमच्याकडे पाणी व रक्त यांच्यासह आला.
तो केवळ पाण्याद्वारेच आमच्याकडे आला असे नाही तर
पाणी आणि रक्ताद्वारे आला. व आत्मा ही साक्ष देतो,
कारण आत्मा सत्य आहे. 7साक्ष देणारे तीन साक्षीदार
आहेत: 8आत्मा, पाणी आणि रक्त, आणि तिघेही एकच
साक्ष देतात. 9जर आम्ही मनुष्यांनी दिलेली साक्ष स्वीकारतो,
तर देवाने दिलेली साक्ष त्यांच्या साक्षीहून अधिक महान
आहे हे आपण ओळखले पाहिजे. देवाने आपणास दिलेली
साक्ष ही त्याच्या एकुलत्या एका पुत्राविषयीची आहे. 10जो
कोणी देवाच्या पुत्रावर विश्वास ठेवतो त्याच्या स्वत:मध्ये
ही साक्ष आहे. जो देवाच्या साक्षीवर विश्वास ठेवीत नाही,
त्याने देवाला लबाड ठरविले आहे. कारण देवाने आपल्या
स्वत:च्या पुत्राबाबत दिलेल्या साक्षीवर त्याने विश्वास ठेवला
नाही.

11आणि देवाची जी साक्ष आहे ती ही आहे की, देवाने
आपल्याला अनंतकाळचे जीवन दिले आहे आणि हे जीवन
त्याच्या पुत्रामध्ये आहे. 12ज्याच्याजवळ पुत्र आहे त्याला
खरे जीवन आहे पण ज्याच्याजवळ पुत्र नाही त्याला खरे
जीवन नाही.

## आता आपल्याला अनंतकाळचे जीवन आहे

13जे देवाच्या पुत्राच्या नावावर विश्वास ठेवतात त्यांना
मी या गोष्टी लिहीत आहे, यासाठी की, तुम्हाला
अनंतकाळचे जीवन आहे, याविषयी तुम्ही निश्चिंत असावे,
14आणि आम्हांला देवामध्ये खात्री आहे की, जेव्हा आम्ही
एखाद्या गोष्टीसाठी त्याच्या इच्छेप्रमाणे प्रार्थना करतो, तेव्हा
तो आमचे ऐकतो. 15आणि आम्हांला हे माहीत आहे की
जर तो आमचे ऐकतो, तर कोणत्याही कारणासाठी जरी
आम्ही प्रार्थना केली, तर आम्हांस माहीत आहे की, जे
काही आम्ही मागितले आहे ते आम्हांला मिळालेच आहे.

16जर एखाद्याला त्याचा भाऊ पापांत पडलेला दिसला
आणि त्याचा परिणाम अनंतकाळचे मरण नसेल तर त्या
भावासाठी त्याने प्रार्थना करावी. आणि देव त्याला जीवन
देईल. ज्या गोष्टीचा परिणाम अनंतकाळचे मरण नाही
अशा पापामध्ये पडणाऱ्यासाठी जे जीवन (देव देतो) त्या
जीवनाविषयी मी हे बोलत आहे. ज्या पापाचा परिणाम
मरण आहे. अशा तऱ्हेच्या पापाबाबत तुम्ही प्रार्थना करावी
असे मी म्हणत नाही. 17सर्व अनीति हे पाप आहे, पण
असे पाप आहे ज्याचा परिणाम मरण नाही.

18आम्ही जाणतो की, जो कोणी देवाचे मूल झाला आहे
तो पाप करीत रहात नाही. जो देवापासून जन्मला आहे.
देव स्वत: त्याचे संरक्षण करतो आणि सैतान त्याला हात
लावू शकत नाही. 19आम्हाला माहीत आहे की आम्ही
देवाचे आहोत, जरी संपूर्ण जग हे त्या सैतानाच्या
नियंत्रणाखाली आहे.

20पण आम्हाला माहीत आहे की देवाचा पुत्र आला
आहे व त्याने आम्हाला समजबुद्धी दिलेली आहे, यासाठी
की, जो खरा आहे त्या देवाला आम्ही ओळखावे. आणि
आपणास माहीत आहे की, त्याचा पुत्र येशू ख्रिस्त आला
आहे व जो खरा देव आणि देवाचा पुत्र येशू ख्रिस्त याजमध्ये
आम्ही राहात आहोत. पिता हा खरा देव आहे आणि तो
अनंतकाळचे जीवन आहे. 21माझ्या मुलांनो, स्वत:ला
मूर्तिपूजेपासून दूर राखा.

# योहानाचें दुसरे पत्र

वडिलाकडून,*
देवाने निवडलेल्या बाईना* व तिच्या मुलांना,
सत्यात सहभागी असलेल्या लोकांप्रमाणे ज्यांच्यावर मी
प्रीति करतो, आणि तुमच्यावर प्रीति करणारा मी एकटाच
नाही, तर ज्यांची सत्याशी ओळख झाली आहे असे
सर्वजणसुद्धा प्रीति करतात. 2या सत्यामुळे जे आमच्यामध्ये
असते, ते आमच्यामध्ये अनंतकाळपर्यंत राहील.
3देवपित्यापासून आणि पित्याचा पुत्र प्रभु येशू ख्रिस्त
याजपासून कृपा, दया व शांति ही सत्यात व प्रीतित
आपणाबरोबर राहोत.
4पित्याने आपल्याला दिलेल्या आज्ञेप्रमाणे तुमची काही
मुले सत्यात चालतात असे मला दिसून आले म्हणून मला
फार आनंद झाला.
5आणि आता, बाई, कुरिया, मी तुला नम्रपणे विनंति
करतो की, आपण एकमेकांवर प्रीति करावी. मी ही तुला
नवी आज्ञा करतो असे नाही, तर जी प्रारंभापासून तुला
देण्यात आलेली होती. 6आणि त्याच्या आज्ञेत राहणे
म्हणजेच प्रीति करणे होय. हीच आज्ञा आहे जी तुम्ही
सुरुवातीपासून ऐकली आहे: की तुम्ही प्रीतीचे जीवन जगावे.
7येशू मानवी देह धारण करून या जगात आला या
गोष्टीवर विश्वास न ठेवणारे अनेक फसवे भोंदू लोक
जगात निघाले आहेत. असा फसविणारा भोंदू मनुष्य हाच
ख्रिस्तविरोधी होय. 8सावध असा! यासाठी की ज्यासाठी
आम्ही काम केले ते तुम्ही हातचे जाऊ देऊ नये तर
त्याचे पूर्ण प्रतिफळ तुम्हांला मिळावे.
9जो मनुष्य ख्रिस्ताविषयीच्या शिकवणुकीप्रमाणे चालत
नाही, तर तिचे उल्लंघन करतो, त्याला देव मिळाला
नाही. जो कोणी ख्रिस्ताविषयीच्या शिकवणुकीप्रमाणे
चालतो त्याला देवपिता व पुत्र असे दोन्ही मिळाले आहेत.
10जर एखादा मनुष्य तुमच्या घरी आला आणि ख्रिस्ताची
शिकवण आचरणात आणीत नसला तर त्याला आपल्या
घरात घेऊ नका. किंवा त्याला सलामही करू नका.
11कारण अशा मनुष्याला जो कोणी सलाम करतो तो
त्याच्या वाईट कामांमध्ये सहभागी होतो.
12मला जरी अनेक गोष्टी तुम्हांला लिहायच्या आहेत
तरी त्या तुम्हांला मी शाई व लेखणीने लिहू इच्छित नाही.
तर त्याऐवजी तुम्हांला भेटावे व प्रत्यक्ष सर्व काही बोलावे
अशी आशा मनात बाळगून आहे. म्हणजे आपला आनंद
त्यामुळे परिपूर्ण होईल. 13देवाने निवडून घेतलेल्या तुमच्या
बहिणीची* मुले तुम्हांला सलाम सांगतात.

**वडील** याचा अर्थ कदाचित योहान प्रेषित असेल. वडील म्हणजे वयस्कर मनुष्य. तसेच मंडळीतील खास साहाय्यक असाही अर्थ.

**बाई** या ठिकाणी याचा अर्थ मंडळी असा असेल व तिची मुले म्हणजे मंडळीचे सभासद.

**बहीण** पहिल्या वचनातील बाईची बहीण. याचा अर्थ कदाचित दुसरी स्त्री किंवा मंडळी होऊ शकेल.

# योहानाचें तिसरे पत्र

वडिलाकडून,*

माझा प्रिय मित्र गायस ज्याच्यावर मी सत्यामध्ये* प्रीति करतो त्यास,

2माझ्या प्रिय मित्रा, जसे आध्यात्मिक जीवनात तुझे चांगले चालले आहे हे मला माहीत आहे तसेच इतर बाबतीतही तुझे चांगले चालावे आणि तुझे आरोग्य चांगले असावे अशी मी प्रार्थना करतो.
3जेव्हा काही बंधु आले आणि सत्यात तू सातत्याने कसे चालतोस याविषयी त्यांनी साक्ष दिली आणि तू सत्याविषयीच्या विश्वासूपणाबद्दल मला सांगितले तेव्हा मला फार आनंद झाला.
4माझी मुले सत्यात चालतात हे ऐकून जितका आनंद मला होतो तितका कशानेही होत नाही.

5माझ्या प्रिय मित्रा, आपल्या बंधूंच्या परक्यांच्या कल्याणासाठी जे काही करणे तुला शक्य आहे ते तू विश्वासूपणे करीत आहेस.
6जे बंधु आले व ज्यांनी तू दाखविलेल्या प्रीतिविषयी मंडळीसमोर साक्ष दिली, त्यांच्या पुढील वाटचालीकरिता देवाला आवडेल अशा प्रकारे
7शक्य ते सर्व कर, कारण ते ख्रिस्ताच्या सेवेसाठी दौऱ्यावर निघाले आहेत व अविश्वासणाऱ्यांकडून त्यांनी काहीही स्वीकारले नाही.
8म्हणून आम्ही विश्वासणाऱ्यांनी त्यांना मदत केलीच पाहिजे. यासाठी की आम्ही सत्यासाठी एकमेकांचे भागीदार होऊ.

9मी मंडळीला पत्र लिहिले पण दियत्रेफस ज्याला त्यांचा नेता व्हायचे आहे व जे सांगतो ते तो स्वीकारीत नाही.
10या कारणामुळे जेव्हा मी येतो तेव्हा तो जे करीत आहे ते दाखवून देईन. तो वाईट शब्दांनी खोटेपणाने माझ्याविरुद्ध बोलत आहे व एवढ्यावरच तो समाधान मानीत नाही, तर त्यात भर म्हणून बंधूंचा तो स्वीकार करीत नाहीच उलट मंडळीतील जे लोक त्यांचा स्वीकार करू इच्छितात त्यांना अडथळा करतो, आणि त्यांना मंडळीबाहेर घालवितो!

11माझ्या प्रिय मित्रा, जे चांगले आहे त्याचे अनुकरण कर. वाइटाचे अनुकरण करू नको. जे चांगले आहे ते जो करतो, तो देवाचा आहे. जो वाईट करतो त्याने देवाला पाहिले नाही.

12प्रत्येक जण देमेत्रियाविषयी चांगली साक्ष देतात व सत्यदेखील तसेच सांगते. आणि आम्ही देखील त्याच्याविषयी तसेच म्हणतो, आणि तुम्हांला माहीत आहे की, आमची साक्ष खरी आहे.

13मला तुला पुष्कळ गोष्टी लिहावयाच्या आहेत पण मला शाई व लेखणीने तुला लिहावे असे वाटत नाही.
14त्याऐवजी, तुला लवकर भेटण्याची मला आशा आहे. मग आपल्याला समोरासमोर बोलता येईल.
15तुझ्याबरोबर शांति असो. तुझे सर्व मित्र तुला सलाम सांगतात. तेथील सर्व मित्रांना नावाने आमचा सलाम सांग.

---

**वडील** हा योहान प्रेषित असावा. मंडळीतील खास मदतनीस. वडीलधारी व्यक्ति.

**सत्य** सत्य किंवा ख्रिस्ताविषयाची ‘सुवार्ता’ जी वार्ता विश्वासणाऱ्यांना एकत्र बांधते.

# यहूदाचें पत्र

येशू ख्रिस्ताचा सेवक आणि याकोबाचा भाऊ असलेल्या
यहूदाकडून,
देवाने ज्या तुम्हांला पाचारण केले आहे त्यांस, देवपिता
तुमच्यावर प्रीती करतो व येशू ख्रिस्ताद्वारे तुम्ही सुरक्षित
ठेवले जात आहात.
2देवाची करुणा, शांति आणि प्रीती तुम्हांला अधिकाधिक
लाभो.

### जे चुका करतात त्यांना देव शिक्षा करील

3प्रिय मित्रांनो, जरी मली तुम्हांला आपल्या समाईक
तारणाविषयी लिहिण्याची आतुरतेने तयारी करीत होतो
तरी एका गोष्टीविषयी मला लिहावेसे वाटते. ते म्हणजे
देवाने आपल्या संतांना, एकदा दिलेला विश्वास
टिकविण्यासाठी लढत राहा. 4याचे कारण ज्यांच्याविषयी
पवित्र शास्त्रात फार पूर्वीच लिहिले आहे की अशी माणसे
तुमच्यात चोरून शिरली आहेत. ते अधार्मिक लोक आहेत.
अनीतीने वागण्यासाठी देवाची दया हे निमित्त आहे असे ते
मानतात. आणि आमचा प्रभु व एकमेव धनी अशा प्रभु
येशू ख्रिस्ताला ते मानत नाहीत, जी शिक्षेसाठी यापूर्वीच
नेमलेली होती, अशी ही माणसे आहेत.
5जरी तुम्हांला या गोष्टी माहीत असल्या तरी मला
तुम्हांला आठवण करून द्यावीशी वाटते की, ज्या प्रभूने
आपल्या लोकांना एकदा इजिप्त देशातून सोडवून
आणल्यानंतर ज्यांनी त्याच्यावर विश्वास ठेवण्याचे
नाकारले; अशांचा त्याने नंतर नाश केला 6तसेच ज्या
देवदूतांनी आपली सार्वभौम सत्ता टिकवली नाही, परंतु
आपली रहाण्याची जागा सोडून दिली, त्यांची देखील तुम्हाला
आठवण करून द्यायला पाहिजे. देवाने त्यांना सर्वकालच्या
बंधनांनी जखडून काळोखात ठेवले यासाठी की शेवटच्या
महान दिवशी त्यांचा न्याय करता यावा. 7त्याचप्रमाणे, या
देवदूतांसारखीच सदोम व गमोरा आणि त्या शहराच्या
आसपासच्या नगरांनी लैंगिक अनीतीचे आचरण केले
आणि अस्वाभाविक लैंगिक संबधाच्या मागे ती लागली.
अनंतकाळच्या अग्निच्या शिक्षेसाठी ती राखून ठेवली
आहेत. एक उदाहरण म्हणून ती आपल्यासमोर ठेवली
आहेत. 8अगदी तशाच प्रकारे, हे लोक जे तुमच्या गटात
आले ते स्वप्नांनी बहकले व त्यांनी आपली शरीरे विटाळली
आहेत. ते प्रभूचा अधिकार बाजूला ठेवतात व ते गौरवी
थोरामोठ्यांविरूद्ध (देवदूतांविरूद्ध) निंदानालस्तीची भाषा
वापरतात. 9मीखाएल जो मुख्य देवदूत, याने जेव्हा मोशेच्या
शरीराविषयी सैतानाबरोबर वाद घातला तेव्हा त्यानेसुद्धा
त्याच्याविरुद्ध अपमानास्पद आरोप करण्याचे धाडस केले
नाही. तो फक्त म्हणाला, “प्रभु तुला धमकावो.”
10पण हे लोक, ज्या गोष्टी त्यांना समजत नाहीत त्यांची
हे निंदा करतात. आणि जनावरासारखे केवळ मूळ
स्वभावाला अनुसरून जे काही त्यांना समजते. अगदी
त्याच गोष्टीमुळे ते नाश पावतात. 11या लोकांसाठी हे
फार वाईट आहे! काईनाने जो मार्ग धरला तोच यांनी
धरलेला आहे. आपला फायदा व्हावा म्हणून ते बलामाप्रमाणे
गोंधळून मोकाट धावत सुटले आहेत आणि कोरहाच्या
बंडाळीत भाग घेणाऱ्या लोकांचा नाश झाला तसाच या
लोकांचा देखील नाश होत आहे. 12हे लोक तुमच्या
भातामध्ये दडलेले धोकादायक खडे, असल्यासारखे आहेत.
ते खुशाल तुमच्याबरोबर जेवणखाणे करतात, ते फक्त
स्वत:च चरत राहाणारे असे मेंढपाळ आहेत, ते पाणी
नसलेल्या ढगांसारखे असून ते वाऱ्यामुळे वाहवत जातात.
ते लोक म्हणजे हिवाळ्यातील फळहीन व समूळ उपटली
गेलेली आणि दोनदा मेलेली झाडे आहेत. 13ते लोक
आपल्या लज्जास्पद कामामुळे फेसाळणाऱ्या समुद्राच्या
लाटांप्रमाणे आहेत, ते जणू काळ्याकुट्ट अंधारात दडलेले
तारे असे आहेत.
14हनोख, आदामापासूनचा सातवा मनुष्य यानेसुद्धा या
लोकांविषयी असेच भाकीत केले आहे: “पाहा हजारो
पवित्र देवदूतांसह प्रभु येत आहे. 15तो अखिल जगातील
लोकांचा न्याय करील आणि सर्व लोकांना त्यांनी केलेल्या
अधर्माच्या कामासाठी आणि देवाची चाड न बाळगणाऱ्या
पापी लोकांनी त्याच्याविरुद्ध जे कठोर, वाईट शब्द आपल्या
तोंडावाटे काढले त्याकरीता तो त्यांना दोषी ठरवील.”
16हे लोक कुरकुर करणारे व दोष दाखविणारे आहेत,
ते आपल्या वासनांप्रमाणे चालणारे आणि आपल्या तोंडाने
बढाया मारणारे लोक आहेत. ते आपल्या फायद्यासाठी
इतरांचा तोंडपूजेपणा करतात.

### सावधानतेचा इशारा आणि करावयाच्या गोष्टी

17पण, तुम्ही प्रियजनहो, आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या
प्रेषितांनी पूर्वी सांगितलेले शब्द आठवा. 18त्यांनी सांगितले,

"काळाच्या शेवटी देवाविषयी थट्टेने बोलणारे लोक
असतील, ते त्यांच्या स्वत:च्याच अधार्मिक इच्छांच्या मागे
जातील."  19असे लोक फूट पाडतात. ते त्यांच्या मूळ
स्वभावाप्रमाणे चालतात. त्यांना आत्मा नाही.
20पण तुम्ही प्रिय मित्रांनो, आपल्यापवित्र शिकविण्यात
आलेल्या विश्वासात परस्परांना आध्यात्मिक रीतीने
बळकट करा. पवित्र आत्म्याने युक्त होऊन प्रार्थना
करा.
21आणि तुम्हांला अनंतकाळच्या जीवनात घेऊन
जाणाऱ्या आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या कृपेची वाट पाहत,
देवाच्या प्रीतीत स्वत:ला राखा. 22विश्वासात डळमळीत
असलेल्या लोकांवर दया करा.
23त्यांना अग्नीतून ओढून काढून वाचवा. पण
दया दाखविण्याच्या वेळी काळजी घ्या. आणि त्यांच्या दैहिक
पापामुळे मळीन झालेल्या कपड्यांचा तिरस्कार करा.

## देवाची स्तुति करा

24आता, तुम्ही पडू नये म्हणून तुम्हाला राखावयास जो
समर्थ आहे आणि तुम्हाला आपल्या गौरवी समक्षतेत शुद्ध
असे सादर करायला जो मोठ्या आनंदाने तयार आहे,
त्याला आणि आपले तारण करणारा जो 25एकच देव
आहे, त्याला आपला प्रभु येशू ह्रख्रिस्त याच्याद्वारे गौरव,
मान, पराक्रम आणि अधिकार काल, आज आणि
अनंतकाळ असो. आमेन.

# योहानाला झालेले प्रकटीकरण

## योहान या पुस्तकाविषयी सांगतो

1 हे येशू ख्रिस्ताचे प्रकटीकरण आहे. ज्या गोष्टी
लवकरच घडणे आवश्यक आहे, ते आपल्या सेवकांना
दाखविण्यासाठी देवाने येशूला हे देवापासून प्राप्त झाले
ख्रिस्ताने त्याच्या देवदूताला पाठवून या सर्व गोष्टी योहानाला
दाखविण्यास सांगितले. 2योहानाने जे काही पाहिले त्या
सर्व गोष्टींविषयी साक्ष दिली की येशू ख्रिस्ताने हे त्याला
सांगितले; देवाकडून आलेला हा संदेश आहे. 3जी व्यक्ती
देवाकडून आलेल्या या संदेशाचे शब्द उघडपणे वाचते ती
धन्य आहे. आणि जे लोक हा संदेश ऐकतात आणि
त्यामध्ये लिहिलेल्या गोष्टी पाळतात ते धन्य आहेत. कारण
आता जास्त वेळ उरला नाही.

## योहान येशूचा संदेश मंडळ्यांना कळवितो

4योहानाकडून, आशिया* प्रांतातील सात मंडळ्यांना:
जो आहे, जो होता व जो येणार आहे त्या एकापासून
(देवापासून): आणि त्याच्या सिंहासनासमोरील सात
आत्म्यांकडून तुम्हांस कृपा व शांति असो. 5आणि येशू
ख्रिस्त विश्वासू साक्षी आहे, जो मेलेल्यांमधून उठविले
गेलेल्यांमध्ये पहिला आहे. पृथ्वीवरील राजांचा तो सत्ताधीश
आहे. आणि जो येशू आमच्यावर प्रेम करतो, ज्या येशूने
आम्हाला आमच्या पापांपासून त्याच्या रक्ताने मुक्त केले;
6ज्याने आम्हांला राज्य आणि देवपित्याची सेवा करणारे
याजक बनविले त्या येशूला गौरव व सामर्थ्य
अनंतकाळपर्यंत असोत! आमेन.

7पहा, येशू ढगांसह येत आहे! प्रत्येक व्यक्ति त्याला
पाहील, ज्यांनी त्याला भोसकले ते सुद्धा त्याला पाहतील.
पृथ्वीवरील सर्व लोक त्याच्यामुळे आक्रोश करतील. होय,
असेच होईल! आमेन.

8प्रभु देव म्हणतो, "मी अल्फा आणि ओमेगा* आहे.
मी जो आहे, जो होतो आणि जो येत आहे. मी सर्वसमर्थ
आहे."

9मी योहान आहे, आणि मी तुमचा बंधु आहे. आपण
ख्रिस्तामध्ये एकत्र आहोत आणि आपण या गोष्टींमध्ये
वाटेकरी आहोत. दु:खसहनात, राज्यात, धीराने सहन
करण्यात, येशूच्या सत्यात आणि देवाच्या संदेशात मी
विश्वासू होतो त्यामुळे मी पात्म* नावाच्या बेटावर होतो.
10प्रभूच्या दिवशी आत्म्याने माझा ताबा घेतला. माझ्या
मागे मी एक मोठा आवाज ऐकला. तो आवाज कर्ण्यासारखा
ऐकू आला. 11तो आवाज म्हणाला, "तू या सर्व गोष्टी
पाहतोस त्या तू पुस्तकात लिही, आणि सात मंडळ्यांना
पाठव: इफिस, स्मुर्णा, पर्गम, थुवतीरा, सार्दीस,
फिलदेल्फिया आणि लावदिकीया."

12माझ्याबरोबर कोण बोलत आहे हे पाहण्यासाठी मी
मागे वळलो, जेव्हा मी मागे वळालो तेव्हा मी सोन्याच्या
सात दीपसमया पाहिल्या. 13मी कोणाला तरी दीपस्तंभामध्ये
पाहिले जो "मनुष्याच्या पुत्रासारखा" होता. त्याने लांब
पायघोळ झगा घातला होता. त्याने सोन्याचा पट्टा छातीवर
बांधला होता. 14त्याचे डोके आणि केस बर्फासारख्या
पांढऱ्या लोकरीप्रमाणे शुभ्र होते. त्याचे डोळे अग्नीच्या
ज्वालेसारखे होते.

15त्याचे पाय भट्टीत गरम झाल्यानंतर चमकणाऱ्या
पितळासारखे होते. त्याचा आवाज पुराचे पाणी जसा आवाज
करते तसा होता. 16त्याच्या उजव्या हातात सात तारे होते.
त्याच्या तोंडातून दोन्ही बाजूंनी तीक्ष्ण धार असणारी तरवार
निघाली. तो दिवसाच्या मध्यान्ही अतिशय प्रखर तेजाने
प्रकाशणाऱ्या सूर्यासारखा दिसत होता.

17जेव्हा मी त्याला पाहिले, तेव्हा मी मेलेल्या माणसा
सारखा त्याच्या पायाजवळ पडलो त्याने त्याचा उजवा हात
माझ्यावर ठेवला आणि म्हणाला, "घाबरू नको! मी पहिला
आणि शेवटला आहे. मी जिवंत आहे, 18मी मेलो होतो,
पण पाहा; मी अनंतकाळासाठी जिवंत आहे! आणि माझ्या
जवळ मरणाच्या व अधोलोकाच्या किल्ल्या आहेत.
19म्हणून ज्या गोष्टी तू पाहतोस त्या लिही. ज्या गोष्टी
आता घडत आहेत त्या लिही. आणि ज्या गोष्टी नंतर
घडणार आहेत त्याही लिही. 20जे सात तारे तू माझ्या
हातात पाहिलेस आणि ज्यात सात सोन्याच्या दीपसमया तू
पाहिल्यास त्यांचा गुपित अर्थ हा आहे: सात दीपसमया या
सात मंडळ्या आहेत. आणि सात तारे हे सात मंडळ्यांचे
देवदूत आहेत.

---

**आशिया** आशिया मायनरचा पश्चिम भाग (सध्याचे तुर्कस्तान)

**अल्फा आणि ओमेगा** ग्रीक मूळाक्षरातील पहिले आणि शेवटचे अक्षर याचा अर्थ प्रारंभ आणि शेवट आहे.

**पात्म** तुर्कस्तानजवळच्या अगीयन समुद्रातील एक लहानसे बेट.

## इफिस येथील मंडळीला

2 “इफिस येथील मंडळीच्या दूताला हे लिही: “जो
आपल्या उजव्या हातात सात तारे धरतो आणि सात
सोनेरी दीपसमयांमधून चालतो त्याचे हे शब्द आहेत: 2तू
काय करतोस ते मला माहीत आहे. तू खूप काम करतोस
व धीर धरतोस हे मला माहीत आहे. मला हे माहीत आहे
की दुष्ट मनुष्यांचा तू स्वीकार करीत नाहीस आणि जे
स्वत:ला प्रेषित समजतात पण जे तसे नाहीत त्यांची कसोटी
तू घेतलेली आहेस आणि ते खोटे आहेत हे तुला समजले
आहे. 3माझ्या नावासाठी तू धीर धरलास. माझ्या नावामुळे
तू दु:ख सोसलेस आहे आणि तू थकला नाहीस.

4“तरीही तुझ्याविरुद्ध माझे म्हणणे आहे: तू तुझी पहिली
प्रीति सोडली आहेस. 5ज्या उंचीवरून तू पडलास ते लक्षात
आण! पश्चात्ताप कर व प्रथम जी कामे केलीस ती पुन्हा
कर. जर तू पश्चात्ताप केला नाहीस, तर मी येईन आणि
तुझी दीपसमई तिच्या ठिकाणाहून काढून टाकीन. 6पण
असे काही आहे जे तू करतोस, तू निकलाईतांच्या*
कृत्यांचा द्वेष करतोस, मीही त्यांच्या कृत्यांचा द्वेष करितो.

7“आत्मा मंडळ्यांना काय म्हणतो हे ज्याला कान आहेत
तो ऐको! जो विजय मिळवितो त्याला मी जीवनाच्या झाडाचे
(फळ) खाण्याचा अधिकार देईन. ते झाड देवाच्या
सुखलोकात आहे.

## स्मुर्णा येथील मंडळीला

8“स्मुर्णा येथील मंडळीच्या दूताला हे लिही: “जो पहिला
आणि शेवटला आहे त्याचे हे शब्द आहेत, जो मेला होता
पण पुन्हा जीवनात आला. 9मला तुमचे क्लेश आणि
गरिबी माहीत आहे. तरीही तुम्ही श्रीमंत आहात! ज्या
वाईट गोष्टी लोक बोलतात त्याविषयी मला माहीत आहे,
ते म्हणतात आम्ही यहूदी आहोत, पण ते नाहीत. ते सैतानाची
सभा आहेत. 10जे दु:ख तुला सहन करायचे आहे त्याविषयी
घाबरू नकोस. मी तुला सांगतो, तुम्हांपैकी काहींना तुमची
परीक्षा पाहण्यासाठी सैतानाकडून तुरूंगात टाकतील आणि
तुम्ही दहा दिवस छळ सहन कराल. पण तरीही मरेपर्यंत
विश्वासू राहा आणि मग मी तुम्हांला जीवनाचा मुगुट
देईन.

11“आत्मा मंडळ्यांना काय म्हणतो हे ज्याला कान
आहेत तो ऐको. जो विजय मिळवितो त्याला दुसऱ्या मरणाची
इजा होणारच नाही.

## पर्गम येथील मंडळीला

12“पर्गम येथील मंडळीच्या दूताला लिही: ज्याच्याकडे
दोन्ही बाजूंनी धार असणारी तीक्ष्ण तरवार आहे, त्याचे हे
शब्द आहेत, 13मला माहीत आहे जेथे सैतानाचे सिंहासन
आहे तेथे तुम्ही राहता. तरीही तुम्ही माझ्या नावात दृढ
आहात. अंतिपाच्या काळामध्येसुद्धा माझ्यावर तुमचा
असलेला विश्वास तुम्ही नाकारला नाही. अंतिपा माझा
विश्वासू साक्षीदार होता. तो तुमच्या शहरात मारला गेला.
सैतान जेथे राहतो असे ते तुमचे शहर आहे.

14“तरीही तुमच्याविरुद्ध माझे म्हणणे आहे: तुमच्यात
असे लोक आहेत की जे बलामाची शिकवण आचरणात
आणतात. बलामाने बालाकाला इस्राएल लोकांना पाप
करायला कसे लावायचे ते शिकविले. त्या लोकांनी लैंगिक
पापे करून आणि मूर्तीला वाहिलेले अन्न खाऊन पाप
केले. 15त्याचप्रमाणे निकलाईताची शिकवण आचरणारे
तुमच्यामध्येसुद्धा काहीजण आहेत. 16म्हणून पश्चात्ताप
करा! नाहीतर मी लवकरच तुमच्याकडे येईन आणि
आपल्या तोंडातील तरवारीने त्यांच्याशी लढेन.

17“आत्मा मंडळ्यांना काय म्हणतो हे ज्याला कान
आहेत तो ऐको. जो विजय मिळवितो त्याला मी लपवून
ठेवलेल्या मान्यातून काही देईन. मी त्याला पांढरा दगड
(खडा) देईन ज्यावर नवीन नाव लिहिलेले असेल. ज्याला
तो प्राप्त होईल त्यालाच ते समजेल.

## थुवतीरा येथील मंडळीला

18“थुवतीरा येथील मंडळीच्या दूताला लिही: “देवाचा
पुत्र हे सांगत आहे, ज्याचे डोळे अग्नीच्या ज्वालेसारखे
आहेत आणि ज्याचे पाय चमकणाऱ्या पितळासारखे आहेत.
19मला तुमची कामे, तुमचे प्रेम आणि विश्वास, तुमची
सेवा आणि धीर माहीत आहे. आणि तुम्ही पहिल्यापेक्षा
आता जास्त करीत आहात हे माहीत आहे.

20तरीसुद्धा तुमच्याविरुद्ध माझे म्हणणे आहे: इजबेल
नावाची स्त्री जी स्वत:ला संदेष्टी म्हणविते आणि ती तिच्या
शिकवणीने माझ्या सेवकांना अनैतिक लैंगिक पाप व
मूर्तीसमोर ठेवलेले अन्न खावयास मोहविते. तरी तुम्ही
तिला खुशाल तसे करू देता. 21मी तिला तिच्या अनैतिक
लैंगिक पापाविषयी पश्चात्ताप करण्यासाठी वेळ दिला आहे.
परंतु ती तसे करायला तयार नाही. 22म्हणून मी तिला
दु:खाच्या बिछान्यावर खिळवीन आणि जे तिच्याबरोबर
व्यभिचाराचे पाप करतात त्यांना भयंकर दु:ख भोगावयास
लावीन. जर ती तिच्या मार्गापासून पश्चात्ताप पावली नाही
23तर मी तिच्या अनुयायांना ठार मारून टाकीन. मग सर्व
मंडळ्यांना हे कळेल की मी तो आहे जो अंत:करणे
आणि मने पारखतो. तुमच्या कृतींप्रमाणे मी प्रत्येकाला
तुमचा मोबदला देईन.

24“पण थुवतीरा येथील मंडळीतील जे दुसरे लोक आहेत
जे तिची शिकवण आचरीत नाहीत त्यांना मी सांगतो की,
ज्या तुम्ही सैतानाची म्हणविलेली खोल गुपिते जाणली
नाहीत, त्या तुमच्यावर मी दुसरे ओझे लादणार नाही.
25मी येईपर्यंत जे तुमच्याकडे आहे त्याला धरून राहा.

---

**निकलाईतांच्या** चुकीच्या कल्पना अनुसरणारा समूह.

26“जो विजय मिळवितो व शेवटपर्यंत माझ्या इच्छेप्रमाणे करतो त्याला मी राष्ट्रांवर अधिकार देईन.

27‘तो त्यांच्यावर लोहदंडाने अधिकार गाजवील मातीच्या भांड्यासारखा तो त्यांचा चुराडा करील.’ *स्तोत्र. 2:9*

जसा पित्याकडून मला अधिकार प्राप्त झाला आहे, 28तसा मीसुद्धा त्याला पहाटेचा तारा देईन. 29आत्मा मंडळ्यांना काय म्हणतो हे ज्याला कान आहेत तो ऐको.

### सार्दीस येथील मंडळीला

3 “सार्दीस येथील मंडळीच्या दूताला लिही: “जो देवाचे सात आत्मे धरतो व सात तारे धरतो त्याचे हे शब्द आहेत. मला तुमची कामे माहीत आहेत, जिवंत असण्याबद्दल तुमचा लौकिक आहे. पण तुम्ही मेलेले आहात. 2जागे व्हा! जे उरलेले आहेत आणि मरणाच्या ह्यमार्गावर आहेत त्यांना मजबूत करा. कारण माझ्या देवाच्या दृष्टीने तुमची कृत्ये पूर्ण झाल्याचे मला आढळले नाही. 3म्हणून लक्षात ठेवा, जे तुम्हाला प्राप्त झालेले आहे आणि जे तुम्ही ऐकले आहे त्याप्रमाणे वागा. आणि पश्चात्ताप करा. पण जर तुम्ही जागे होत नाही, तर मी एखाद्या चोरासारखा येईन आणि तुम्हाला हे कळणार नाही की मी नेमक्या कोणत्या वेळेला तुमच्याकडे येईन.

4तरी तुमच्यात थोडे लोक आहेत जे सार्दीसमध्ये आहेत ज्यांनी स्वत:ला स्वच्छ राखले आहे. ते लोक माझ्याबरोबर चालतील. ते पांढरी वस्त्रे घालतील कारण ते पात्र आहेत. 5प्रत्येक व्यक्ति जी विजय मिळविते, ती त्यांच्यासारखी पांढरी वस्त्रे परिधान करील. मी त्या व्यक्तीचे नाव जीवनाच्या पुस्तकातून काढणार तर नाहीच पण माझ्या पित्यासमोर व त्याच्या देवदूतांसमोर त्याचे नाव स्वीकारीन. 6आत्मा मंडळ्यांना काय म्हणतो हे ज्याला कान आहेत तो ऐको.

### फिलदेल्फिया येथील मंडळीला

7“फिलदेल्फिया येथील मंडळीच्या दूताला लिही:

“जो पवित्र, सत्य, जो दाविदाची किल्ली ठेवतो त्याचे हे शब्द आहेत, जे तो उघडतो, ते कोणी बंद करू शकणार नाही आणि जे तो बंद करतो ते कोणी उघडू शकणार नाही. 8मला तुमची कामे माहीत आहेत, पाहा मी तुमच्यासमोर दार उघडे करून ठेवले आहे. जे कोणीही बंद करू शकणार नाही. मला माहीत आहे की, तू दुर्बळ आहेस, तरी तू माझा शब्द पाळला आहेस, आणि माझे नाव नाकारले नाहीस. 9जे सैतानाच्या सभास्थानाचे आहेत, ते स्वत:ला यहूदी समजतात पण ते यहूदी नाहीत तर ते खोटारडे आहेत. मी त्यांना तुमच्याकडे आणून तुमच्या पाया पडायला लावीन. आणि त्यांना समजेल की मी तुमच्यावर प्रीति केली आहे. 10धीराने सहन करण्याविषयी तुम्ही माझी आज्ञा पाळली आहे. म्हणून सर्व जगावर जो संकटाचा समय येणार आहे त्यापासून मी तुम्हांला राखीन. हा त्रास जे लोक या पृथ्वीवर राहातात त्यांची परीक्षा होण्यासाठी होईल.

11“मी लवकर येत आहे. जे तुझ्याकडे आहे त्याला घट्ट धरून राहा यासाठी की कोणीही तुझा मुगुट घेऊ नये. 12जो विजय मिळवितो त्याला मी माझ्या देवाच्या मंदिराचा खांब बनवीन. तो पुन्हा कधीही त्याला सोडणार नाही. मी त्याच्यावर माझ्या देवाचे नाव व माझ्या देवाच्या शहराचे नाव नवे यरुशलेम असे लिहीन. जे माझ्या देवापासून स्वर्गातून खाली येत आहे. आणि मी त्याच्यावर माझे नवे नाव लिहीन. 13आत्मा मंडळ्यांना काय म्हणतो हे ज्याला कान आहेत तो ऐको.

### लावदिकीया येथील मंडळीला

14“लावदिकीया येथील मंडळीच्या दूताला लिही:

“जो आमेन* आहे, विश्वासू आणि खरा साक्षीदार आहे, देवाच्या निर्मितीवरील सत्ताधीश आहे त्याचे हे शब्द आहेत. 15मला तुमची कामे माहीत आहेत तुम्ही थंडही नाही व गरमही नाही. माझी अशी इच्छा आहे की, तुम्ही दोन्हींपैकी एक काहीतरी असावे! 16पण, तुम्ही कोमट असल्याने– मी तुम्हांला तोंडातून (थुंकून) टाकणार आहे. 17तुम्ही म्हणता, ‘मी श्रीमंत आहे, मी संपत्ति मिळविली आहे. आणि मला कोणत्याही गोष्टीची गरज नाही. पण तुम्हाला याची जाणीव होत नाही की, तुम्ही नीच, नराधम, दयनीय, गरीब, आंधळे व ओंगळ आहात. 18मी तुम्हाला सल्ला देतो की, अग्नीत शुद्ध केलेले सोने माझ्याकडून विकत घ्या, म्हणजे तुम्ही श्रीमंत व्हाल. आणि शुभ्र वस्त्रे विकत घ्या व तुमची लज्जास्पद नग्नता तुम्ही झाका. आणि स्पष्ट दिसावे म्हणून डोळ्यात घालण्यास अंजन विकत घ्या.

19“ज्यांच्यावर मी प्रेम करतो, त्यांना दटावतो व शिस्त लावतो म्हणून कसोशीचे प्रयत्न करावयास लागा आणि पश्चात्ताप करा. 20मी येथे आहे! मी दाराजवळ उभा राहतो व दार ठोठावतो. जर कोणी माझा आवाज ऐकतो आणि दार उघडतो, तर मी आत येईन आणि त्याच्याबरोबर जेवीन व तोही माझ्याबरोबर जेवेल. 21“जो विजय मिळवील त्याला मी माझ्या सिंहासनावर बसण्याचा अधिकार देईन ज्याप्रमाणे मी विजय मिळविला आणि माझ्या पित्याच्या सिंहासनावर बसलो. 22आत्मा मंडळ्यास काय म्हणतो, हे ज्याला कान आहेत तो ऐको.”

### योहान स्वर्ग पाहतो

4 तेव्हा मी पाहिले आणि स्वर्गात दार माझ्यासमोर उघडलेले दिसले. आणि अगोदर जसा आवाज मी

---

**आमेन** या ठिकाणी येशूचे नाव म्हणून वापरले आहे. याचा अर्थ जे सत्य आहे त्याचे जोरदारपणे समर्थन करणे.

माझ्याशी बोलताना ऐकला होता तसाच आवाज मी ऐकला.
तो आवाज कर्ण्याच्या आवाजासारखा होता. तो आवाज
म्हणाला, "इकडे ये, आणि मी तुला यानंतर जे घडणार
आहे ते दाखवितो."
2त्याच क्षणी आत्म्याने माझा ताबा घेतला. तेथे स्वर्गात
माझ्यासमोर सिंहासन होते. कोणी एक त्यावर बसलेले
होते. 3त्यावर जो बसला होता तो यास्फे व सार्दी या
रत्नांसारखा होता आणि सिंहासनाभोवती पाचूसारखे
दिसणारे मेघधनुष्य होते. 4सिंहासनाभोवती चोवीस आसने
होती, आणि त्या आसनांवर शुभ्र कपडे घातलेले व
डोक्यावर सोन्याचा मुगुट असलेले चोवीस वडील बसले
होते. 5सिंहासनापासून विजा व भिन्न आवाज निघत होते.
शिवाय गडगडाट निघत होते. सिंहासनासमोर सात दिवे
जळत होते. ते देवाचे सात आत्मे होते. 6तसेच सिंहासनासमोर
काचेच्या समुद्रासारखे काहीतरी दिसत होते. ते
स्फटिकासारखे स्पष्ट होते.
मध्यभागी, सिंहासनाभोवती चार जिवंत प्राणी होते आणि
ते डोळ्यांनी भरले होते. पुढे डोळा, मागे डोळे. 7पहिला
जिवंत प्राणी सिंहासारखा होता. दुसरा बैलासारखा होता.
तिसऱ्याचा चेहरा मनुष्यासारखा होता. आणि चवथा उडत्या
गरूडासारखा होता. 8त्या प्रत्येक जिवंत प्राण्याला सहा
पंख होते. व त्यांना सगळीकडे डोळे होते. त्यांच्या
पंखाखालीसुद्धा डोळे होते. दिवस व रात्र न थांबता ते
म्हणत होते:

"पवित्र, पवित्र, पवित्र, हा प्रभु देव सर्वसमर्थ जो होता,
जो आहे, आणि जो येणार आहे."

9जेव्हा जेव्हा ते जिवंत प्राणी सिंहासनावर बसलेल्याचा
गौरव, सन्मान व उपकारस्तुति करीत होते आणि व जो
सिंहासनावर बसलेला होता तो अनंतकाळपर्यंत जगत
राहणारा आहे, 10तेव्हा तेव्हा जो सिंहासनावर बसला होता
आणि अनंतकाळपर्यंत राहतो त्याच्यासमोर चोवीस वडील
पाया पडत होते आणि त्याची उपासना करीत होते. ते
आपले मुगुट सिंहासनासमोर ठेवत होते. व म्हणत होते
की:

11"आमचा प्रभु आणि देव! तू गौरव, सन्मान आणि
सामर्थ्य प्राप्तकरून घेण्यास योग्य आहेस. तू सर्व काही
तयार केलेस तुला वाटत होते म्हणून सर्व काही अस्तित्वात
आले आणि करण्यात आले."

5 मग मी, जो सिंहासनावर बसला होता त्याच्या उजव्या
हातात गुंडाळी पाहिली. गुंडाळीवर दोन्ही बाजूंनी
लिहिले होते. आणि ती गुंडाळी सात शिक्के मारून बंद
केली होती. 2आणि मी एक सामर्थ्यशाली देवदूत पाहिला.
तो देवदूत मोठ्या आवाजात म्हणाला, "गुंडाळीचे शिक्के
तोडून ती उघडण्यास कोण पात्र आहे?" 3परंतु स्वर्गात,
पृथ्वीवर किंवा पृथ्वीखाली कोणीही ते शिक्के तोडण्यास
आणि त्यामध्ये पाहण्यास समर्थ नव्हता. 4मी खूप रडलो
कारण ती गुंडाळी उघडून आतमध्ये काय आहे हे पाहण्याच्या
योग्यतेच कोणीही नव्हते.
5पण वडीलांपैकी एकजण मला म्हणाला, "रडू नकोस!
पहा, यहूदा वंशाचा सिंह, दाविदाचा अंकुर हा विजयी
झाला आहे. तो गुंडाळी उघडण्यास व तिचे सात शिक्के
उघडण्यास समर्थ आहे."
6मग मी एक कोकरा पाहिला. सिंहासनाच्या मध्यभागी
उभा असलेला व त्याच्या भोवती चार जिवंत प्राणी असलेले
मी पाहिले. व वडीलही त्याच्याभोवती होते. कोकरा
बांधल्यासारखा दिसत होता. त्याला सात शिंगे आणि सात
डोळे होते. आणि हे जणू देवाचे सात आत्मे असून ते सर्व
जगभर पाठविले होते. 7कोकरा आला आणि त्याने जो,
सिंहासनावर बसला होता, त्याच्या उजव्या हातातून ती
गुंडाळी घेतली. 8आणि जेव्हा त्याने ती घेतली तेव्हा चार
जिवंत प्राणी व चोवीस वडीलजन कोकऱ्यासमोर उपडे
पडले. प्रत्येकाजवळ वीणा व प्रत्येकाच्या हातात सुवासिक
उदाने भरलेल्या सोन्याच्या वाट्या होत्या. या वाट्या म्हणजे
देवाच्या लोकांच्या प्रार्थना होत्या. 9आणि त्यांनी नवे गाणे
गाईले:
"तू गुंडाळी घेण्यास आणि तिचे शिक्के उघडण्यास समर्थ
आहेस, कारण तुला वधण्यात आले आणि तू आपल्या
रक्ताने मनुष्यांना प्रत्येक वंशातून, वेगवेगळ्या भाषा
बोलणाऱ्या जमातीतून, आणि राष्ट्रांतून विकत घेतले.
10तू त्यांना राज्य आणि पृथ्वीवर आपल्या देवासाठी
याजक बनविले आणि नंतर ते पृथ्वीवर सत्ता गाजवितील"

11मग मी पाहिले सिंहासन आणि, चार जिवंत प्राणी व
वडीलजन यांच्या सभोवती अगणित देवदूतांची वाणी ऐकली,
त्यांची संख्या अयुतांची अयुते व हजारो हजार होती. 12देवदूत
मोठ्या आवाजात म्हणाले,

"जो वधलेला कोकरा होता तो सामर्थ्य, संपत्ति, शहाणपण
आणि शक्ति, सन्मान, गौरव आणि स्तुतीस पात्र आहे!"

13प्रत्येक निर्माण केलेली वस्तु आकाशात व पृथ्वीवर,
पृथ्वीखाली व समुद्रातील अवघ्यांना मी असे गाताना ऐकले
की,

"जो सिंहासनावर बसतो त्याला व कोकऱ्याला स्तुति,
सन्मान, गौरव आणि सामर्थ्य अनंतकाळपर्यंत असो!"

14चार जिवंत प्राणी म्हणाले, "आमेन!" मग वडीलजनांनी
खाली पडून त्याला अभिवादन केले.

6 मग मी पाहिले की, कोकऱ्याने सात शिक्क्यांपैकी एक उघडला. मी त्या चार जिवंत प्राण्यांपैकी एकाला ढगाच्या गडगडाटासारखे बोलताना ऐकले. तो म्हणाला, "ये!" 2मी पाहिले आणि तेथे माझ्यासमोर पांढरा घोडा होता. घोडेस्वाराने धनुष्य धरले होते. त्याला मुगुट देण्यात आला होता. तो निघाला, शत्रूचा पराभव करीत निघाला, तो विजय मिळविण्यासाठी निघाला.

3जेव्हा कोकऱ्याने दुसरा शिक्का उघडला, तेव्हा मी दुसऱ्या प्राण्याला बोलताना ऐकले. तो म्हणाला, "ये!" 4मी पाहिले तेव्हा लाल रंग असलेला दुसरा घोडा निघाला. घोडेस्वाराला पृथ्वीवरून शांति काढून घेण्याचा अधिकार दिला होता. म्हणजे लोकांनी आपापसांत एकमेकाला ठार करावे. त्याला मोठी तरवार देण्यात आली होती.

5जेव्हा कोकऱ्याने तिसरा शिक्का उघडला, तेव्हा मी तिसऱ्या जिवंत प्राण्याला बोलताना ऐकले, "ये!" मी पाहिले तेव्हा माझ्यासमोर काळा घोडा होता व घोडेस्वाराच्या हातात तराजू होते असे मला दिसले 6मग मी जणू काय चारही जिवंत प्राणी बोलल्यासारखा आवाज ऐकला. ते म्हणत होते, "एक किलो गहू एका दिवसाच्या मजुरीइतके, आणि तीन किलो बार्ली एका दिवसाच्या मजुरीइतकी, मात्र तेल व द्राक्षारस वाया घालवू नका."

7जेव्हा त्याने चौथा शिक्का उघडला, तेव्हा मी चौथ्या जिवंत प्राण्याचा आवाज ऐकला. तो म्हणाला, "ये आणि पाहा!" 8मी पाहिले तेव्हा माझ्यासमोर फिक्या रंगाचा घोडा मला दिसला. त्यावरच्या घोडेस्वाराचे नाव मृत्यु होते. आणि त्याच्या मागोमाग अधोलोक चालला होता. आणि त्यांना पृथ्वीच्या चौथ्या भागावर (पृथ्वीच्या पाव भागावर) लोकांना तरवारीने मारण्याचा, दुष्काळाने आणि पटकीने मारण्याचा व पृथ्वीवरील जंगली हिंस्र प्राण्यांकडून मारण्याचा अधिकार दिला होता.

9जेव्हा त्याने पाचवा शिक्का उघडला तेव्हा मी काही आत्मे वेदीखाली पाहिले. त्यांना देवाच्या वचनासाठी आणि त्यांनी राखलेल्या साक्षीमुळे ठार मारण्यात आले होते.

10ते मोठ्या आवाजात म्हणाले, "पवित्र आणि सत्य प्रभु, कोठपर्यंत तू पृथ्वीवरील लोकांचा न्याय करणार नाहीस आणि आम्हाला ठार मारल्याबद्दल त्यांना शिक्षा करणार नाहीस?" 11त्या प्रत्येक आत्म्याला मग एक एक पांढरा शुभ्र झगा देण्यात आला. आणि त्यांना सांगण्यात आले की, त्यांचे काही बांधव ख्रिस्ताच्या सेवेत आहेत व यांना जसे मारण्यात आले, तसे त्यांनाही मारण्यात येईल व ते पूर्ण होईपर्यंत त्यांनी थोडा वेळ थांबावे.

12मग कोकऱ्याला सहावा शिक्का उघडताना मी पाहिले. तेव्हा मोठा भूकंप झाला, सूर्य मेंढीच्या केसांपासून बनविलेल्या काळ्या कापडासारखा झाला. पूर्ण चंद्र रक्तासारखा लाल झाला. 13ज्याप्रमाणे अंजिराचे झाड वारा आला म्हणजे अंजिरे खाली पाडते तसे आकाशातून तारे पृथ्वीवर पडले. 14जसे गुंडाळी गुंडाळतात तसे, आकाश गुंडाळले गेले. आणि प्रत्येक पर्वत व बेट त्याच्या स्थानावरून हलविले गेले.

15मग सर्व लोक गुहेत, पर्वतांच्या, खडकांच्या मागे लपले. त्यामध्ये जगातील राजे, सत्ताधीश, सेनापती, श्रीमंत लोक आणि सामर्थ्यशाली लोक होते. प्रत्येक व्यक्ति, गुलाम किंवा स्वतंत्र लपून बसली. 16लोक पर्वतांना आणि खडकांना म्हणाले, "आमच्यावर पडा. जो सिंहासनावर बसला आहे त्याच्या चेहऱ्यासमोरून आम्हांला लपवा. कोकऱ्याच्या रागापासून आम्हाला लपवा. 17कारण त्याच्या रागाचा मोठा दिवस आला आहे. त्यासमोर कोणीच टिकाव धरू शकत नाही!"

## इस्राएलचे एकशे चव्वेचाळीस हजार लोक

7 यानंतर मी चार देवदूतांना पृथ्वीच्या चार कोपऱ्यांना उभे राहिलेले पाहिले. देवदूतांनी पृथ्वीचे चारही दिशांचे वारे अडविले होते. जमिनीवर, समुद्रावर किंवा कोणत्याही झाडावर वारा वाहू नये म्हणून ते वाऱ्याला थोपवीत होते. 2तेव्हा मी आणखी एक देवदूत पूर्वेकडून वर येताना पाहिला. या देवदूताकडे जिवंत देवाचा शिक्का होता. या देवदूताने त्या चार देवदूतांना मोठ्या आवाजात बोलाविले. हे चार देवदूत असे होते की ज्यांना देवाने पृथ्वी व समुद्राला इजा करण्याचे सामर्थ्य दिले. देवदूत त्या देवदूतांना म्हणाला, 3"जमिनीला, किंवा समुद्राला किंवा झाडांना, जे देवाची सेवा करतात त्या लोकांना आम्ही शिक्का मारेपर्यंत इजा करू नका." 4मग मी ज्यांना शिक्का मारला होता त्यांची संख्या ऐकली. इस्राएल लोकांच्या प्रत्येक वंशावर शिक्का मारला, ते एकशे चव्वेचाळीस हजार होते.

| | | |
|---|---|---|
| 5 | यहूदा वंशातील | 12,000 लोकांना |
| | रऊबेन वंशातील | 12,000 लोकांना |
| | गाद वंशातील | 12,000 लोकांना |
| 6 | अशेर वंशातील | 12,000 लोकांना |
| | नफताली वंशातील | 12,000 लोकांना |
| | मनश्शे वंशातील | 12,000 लोकांना |
| 7 | शिमोन वंशातील | 12,000 लोकांना |
| | लेवी वंशातील | 12,000 लोकांना |
| | इस्साखार वंशातील | 12,000 लोकांना |
| 8 | जबुलून वंशातील | 12,000 लोकांना |
| | योसेफ वंशातील | 12,000 लोकांना |
| | बन्यामिन वंशातील | 12,000 लोकांना |

## मोठा समुदाय

9यानंतर मी पाहिले, तेव्हा अफाट लोकसमुदाय मला दिसला. तेथे इतके लोक होते की, कोणालाही ते मोजता आले नसते. ते प्रत्येक राष्ट्राचे, वंशाचे, जमातीचे, आणि भाषेचे लोक होते. हे लोक सिंहासनासमोर आणि

कोकऱ्यासमोर उभे होते. त्या सर्वांनी पांढरे शुभ्र झगे घातले होते आणि त्यांच्या हातात झावळ्याच्या फांद्या होत्या. 10ते मोठ्याने ओरडत होते, “तारण आमच्या देवाचे आहे. व आमच्या कोकऱ्याचे आहे, जो सिंहासनावर बसतो.” 11सर्व देवदूत सिंहासनाभोवती उभे होते आणि वडिलजनांच्या आणि चार प्राण्यांच्या भोवती उभे होते. ते सिंहासनासमोर पालथे पडले आणि त्यांनी देवाची आराधना केली. 12ते म्हणाले, “आमेन! स्तुति गौरव, शहाणपण, आभार, सन्मान, सामर्थ्य आणि पराक्रम अनंतकाळासाठी आमच्या देवाची आहेत. आमेन!”

13मग वडीलांपैकी एकाने मला विचारले, “हे पांढरे झगे घातलेले कोण आहेत? व कोठून आले आहेत?”

14मी म्हणालो, “महाराज, आपणाला माहीत आहे.”

आणि तो वडील म्हणाला, “हे लोक मोठ्या त्रासातून बाहेर आलेले आहेत, त्यांनी त्यांची वस्त्रे कोकऱ्याच्या रक्तात धुतली आहेत. आता स्वच्छ व शुभ्र झाले आहेत. 15म्हणून आता हे लोक देवाच्या सिंहासनासमोर आहेत. हे लोक देवाची त्याच्या मंदिरात रात्रंदिवस सेवा करतात आणि जो सिंहासनावर बसलेला आहे, तो त्यांचे रक्षण करील. 16त्या लोकांना पुन्हा केव्हाच भूक लागणार नाही. त्यांना पुन्हा केव्हाच तहान लागणार नाही. सूर्यामुळे त्यांना बाधा होणार नाही. कोणतीही उष्णता त्यांना जाळून टाकणार नाही. 17सिंहासनाच्या मध्यभागी असलेला कोकरा त्यांचा मेंढपाळ असेल. ज्या झऱ्यांचे पाणी जीवन देते तेथे तो त्यांना नेईल. आणि देव त्यांच्या डोळ्यांतील सर्व अश्रु पुसून टाकील.”

## सातवा शिक्का

# 8

कोकऱ्याने सातवा शिक्का उघडला. तेव्हा स्वर्गात अर्धा तासपर्यंत सर्वत्र शांतता होती. 2आणि मी सात देवदूतांना देवासमोर उभे असलेले पाहिले. त्यांना सात कर्णे दिले होते.

3दुसरा देवदूत आला आणि वेदीजवळ उभा राहिला. या देवदूताकडे सोनेरी धूप ठेवण्याचे भांडे होते, त्यांच्याकडे धूप प्रार्थनेसह अर्पण करण्यासाठी दिले होते. ह्या प्रार्थना देवाच्या पवित्र लोकांच्या होत्या. देवदूताने त्याचे अर्पण सिंहासनासमोर सोनेरी वेदीवर ठेवले. 4धुपाचा धूर देवदूताच्या हातातून देवाच्या सिंहासनासमोर गेला. धूर देवाच्या लोकांच्या प्रार्थनेसह गेला. 5मग देवदूताने धुपाटणे घेऊन, वेदीवरील अग्नीने ते भरले व ते पृथ्वीवर टाकले तेव्हा विजा चमकू लागल्या. मेघांचा गडगडाट व इतर आवाज झाले. आणि भूकंप झाला.

## सात देवदूत त्यांचे कर्णे वाजवितात

6मग सात देवदूत त्यांचे कर्णे वाजविण्यास तयार झाले. 7पहिल्या देवदूताने कर्णा वाजविला आणि रक्तमिश्रित गारा व अग्नि पृथ्वीवर टाकण्यात आले. तेव्हा पृथ्वीचा एक तृतीयांश भाग आणि एक तृतीयांश झाडे व सर्व हिरवे गवत जळून गेले.

8दुसऱ्या देवदूताने त्याचा कर्णा वाजविला. तेव्हा अग्नीने जळत असलेल्या मोठ्या डोंगरासारखे काहीतरी समुद्रात टाकले गेले. आणि एक तृतीयांश समुद्राचे रक्त झाले. 9आणि एक तृतीयांश समुद्रातील जीव मेले. आणि एक तृतीयांश जहाजे नष्ट झाली.

10तिसऱ्या देवदूताने त्याचा कर्णा वाजविला तेव्हा एक मोठा तारा मशालीप्रमाणे पेटलेला आकाशातून पडला. तो तारा नद्यांच्या एक तृतीयांश भागावर पडला आणि झऱ्यांच्या एक तृतीयांश भागावर पडला. 11त्या ताऱ्याचे नाव कडूदवणा आणि एक तृतीयांश पाणी कडू झाले. ते कडू असलेले पाणी पिऊन पुष्कळ लोक मेले.

12चौथ्या देवदूताने त्याचा कर्णा वाजविला. तेव्हा सूर्याच्या एक तृतीयांश भागावर आघात झाला. चंद्राच्या एक तृतीयांश भागावर व ताऱ्यांच्या एक तृतीयांश भागावर आघात झाला. त्यामुळे त्याचा एक तृतीयांश भाग काळा झाला. दिवसाचा एक तृतीयांश काळा भाग झाला. रात्रीचा एक तृतीयांश भाग काळा झाला.

13मी पाहत असताना, आकाशात उंचावर मी गरूडाला उडताना पाहिले. गरूड मोठ्या आवाजात म्हणाला, “संकट! संकट! संकट, पृथ्वीवर राहणाऱ्या लोकांवर संकट येत आहे. हे संकट तीन देवदूतांनी कर्णा वाजविल्यावर येईल.”

# 9

पाचव्या देवदूताने त्याचा कर्णा वाजविला, तेव्हा मी आकाशातून एका ताऱ्याला पृथ्वीवर पडताना पाहिले. अथांग दऱ्याकडे नेणाऱ्या खोल बोगद्याची किल्ली त्याला देण्यात आली. 2मोठ्या भट्टीतून धूर यावा तसा त्या बोगद्यातून धूर येऊ लागला. बोगद्यातून येणाऱ्या धुरामुळे सूर्य आणि आकाश काळे झाले 3मग धुरातून टोळधाड पृथ्वीवर आली. त्यांना पृथ्वीवरील विंचवासारखा दंश करण्याचा अधिकार दिला होता. 4टोळांना सांगण्यात आले होते की त्यांनी गवताला, रोपांना किंवा झाडांना हानि पोहचवू नये. ज्या लोकांच्या कपाळावर देवाचा शिक्का मारण्यात आला नसेल त्यांनाच चावण्यास त्यांना सांगण्यात आले होते. 5या टोळांना लोकांना वेदना देण्यासाठी पाच महिने वेळ दिला होता. अधिकार दिला होता. पण त्यांना लोकांना ठार मारण्याचा अधिकार देण्यात आला नव्हता. त्यांच्या दंशाने ज्या वेदना होत त्या वेदना विंचवाने डंख मारल्यावर होतात तशा होत होत्या. 6या दिवसात अनेक जण मरण्यासाठी मार्ग शोधण्याचा प्रयत्न करतील पण त्यांना तो सापडणार नाही. त्यांना मरावेसे वाटेल पण मरण त्यांच्यापासून लपून राहील.

7युद्धासाठी तयार असलेल्या घोड्यांसारखे टोळ दिसत होते. त्यांच्या डोक्यांवर त्यांनी सोनेरी मुगुटासारखे काही घातले होते. त्यांचे चेहरे मनुष्यांच्या चेहऱ्यासारखे दिसत होते. 8त्यांचे केस स्त्रियांच्या केसांसारखे होते. त्यांचे दात सिंहाच्या दातांसारखे होते. 9त्यांची छाती लोखंडी

उरस्त्राणासारखी (चिलखतासारखी) दिसत होती आणि
त्यांच्या पंखांचा आवाज युद्धात वेगाने धावणाऱ्या अनेक
घोडयांच्या रथासारखा होता. 10 त्यांना विंचवासारख्या
शेपट्या व नांग्या होत्या. लोकांना पाच महिने वेदना देण्याची
त्यांच्या शेपटीत ताकद होती. 11 टोळांचा एक राजा होता.
हा राजा अथांग दऱ्याचा दूत होता. यहूदी भाषेत त्याचे
नाव अबद्दोन, आणि ग्रीक भाषेत त्याचे नाव अपुल्लोन
(विध्वंसमूलक) होते. 12 पहिले मोठे संकट आता येऊन
गेले होते. आणखी दोन मोठी संकटे येणार आहेत.

13 सहाव्या देवदूताने त्याचा कर्णा वाजविला. तेव्हा मी
देवासमोर असलेल्या सोनेरी वेदीवरून चारपैकी एका
शिंगापासून येणारा आवाज ऐकला. 14 तो आवाज त्या
सहाव्या दूताला ज्याच्याकडे कर्णा होता त्याला म्हणाला,
"फरात नदीवर बांधून ठेवलेले चार देवदूत सोड." 15 ते
चार देवदूत या घटकेसाठी, या दिवसासाठी, या महिन्यासाठी,
या वर्षासाठी तयार ठेवले होते. पृथ्वीवरील एक तृतीयांश
लोकांना मारण्यासाठी हे देवदूत सोडण्यात आले.
16 घोडदळाची संख्या मी ऐकली. तो 200,000,000 इतके
घोडदळ होते. 17 माझ्या दृष्टान्तात मी घोडे आणि घोड्यांवर
असलेले स्वार पाहिले. ते अशा प्रकारे दिसत होते: तांबड्या
रंगाचे, गडद निळे आणि पिवळे असे त्यांचे उरस्त्राण
(चिल खत) होते. घोड्यांची मस्तके सिंहाच्या मस्तकासारखी
दिसत होती. घोड्यांच्या तोंडांतून अग्नि, धूर व गंधरस येत
होते. 18 घोडयांच्या तोंडातून येणाऱ्या या तीन पीडा –
अग्नि, धूर व गंधरस यामुळे पृथ्वीवरील एक तृतीयांश
लोक मारले गेले. 19 घोड्यांची शक्ति त्यांच्या तोंडात तशी
त्यांच्या शेपटीतसुद्धा होती. त्या शेपट्या सापासारख्या असून
त्यांना दंश करण्यासाठी डोके होते. ते लोकांना जखमी
करीत असत. 20 इतर लोकांना या वाईट गोष्टींमुळे मारले
गेले नाहीत. पण तरीही या लोकांनी आपली अंत:करणे
व जीविते बदलली नाहीत. आणि आपल्या हातांनी ज्या
गोष्टी ते करीत होते त्यापासून वळले नाहीत. ते सैतानाची
म्हणजे सोने, चांदी, तांबे, दगड आणि लाकूड यांच्या मूर्तींची,
ज्या पाहू शकत नाहीत, ऐकू शकत नाहीत व चालू
शकत नाहीत, अशांची भक्ति करण्याचे त्यांनी थांबविले
नाही. 21 या लोकांनी इतरांना मारण्यापासून आपली
अंत:करणे बदलली नाहीत खून चेटके तसेच लैंगिक
पापांपासून आणि चोरीपासून परावृत्त झाले नाहीत.

## देवदूत आणि लहान गुंडाळी

10 मग मी आणखी एक शक्तीशाली देवदूत स्वर्गातून
येताना पाहिला. तो ढगांनी आच्छादलेला होता.
त्याच्या डोक्यावर मेघधनुष्य होते. त्याचा चेहरा सूर्यासारखा
होता, त्याचे पाय जणू काय अग्नीचे खांब होते. 2 त्याने
लहान गुंडाळी धरली होती, जी त्याच्या हातात उघडी
होती. त्याने त्याचा उजवा पाय समुद्रात ठेवला होता व
डावा पाय जमिनीवर ठेवला होता. 3 आणि त्याने सिंहाच्या
गर्जनेसारखी मोठ्याने गर्जना केली. जेव्हा तो ओरडला,
तेव्हा त्या सात मेघगर्जनांनी आपापले शब्द उच्चारले.
4 जेव्हा त्या सात मेघगर्जना बोलल्या, त्यावेळी मी लिहिणार
एवढ्यात मला आकाशातून वाणी आली, ती म्हणाली,
"सात मेघगर्जनांनी काढलेले शब्द बंद करून ठेव. ते
लिहू नको."

5 मग ज्या देवदूताला मी समुद्रात व जमिनीवर पाहिले
होते त्याने आपला उजवा हात स्वर्गाकडे उचलला. 6 जो
अनंतकाळ जगतो, ज्याने आकाश व त्यातील सर्व काही
बनविले, पृथ्वी व तीवरील सर्व काही बनविले, समुद्र व
त्यातील सर्व काही बनविले, त्याच्या नावाने शपथ वाहिली.
आणि म्हणाला, "आता आणखी विलंब होणार नाही! 7 पण
जेव्हा सातवा देवदूत कर्णा वाजविण्याच्या तयारीत असेल
त्या दिवसात देवाची गुप्त योजना पूर्ण होईल. त्याचे सेवक
जे संदेष्टे (भविष्यवादी) त्यांना दिलेल्या वचनानुसार घडून
येईल."

8 तेव्हा आकाशातून झालेली वाणी जी मी ऐकली होती
ती पुन्हा मला बोलली, "जा, गुंडाळी घे, जी गुंडाळी समुद्र
व जमीन यावर उभ्या असलेल्या देवदूताच्या हातात उघडी
आहे ती घे."

9 म्हणून मी त्या देवदूताकडे गेलो व मला ती लहान
गुंडाळी दे असे म्हणालो. तो मला म्हणला, "ही घे, आणि
ही खा. ती खाल्ल्याने तुझे पोट कडू होईल. पण तुझ्या
तोंडाला मात्र ते मधासारखे गोड लागेल." 10 मी ती लहान
गुंडाळी देवदूताच्या हातून घेतली व खाऊन टाकली. माझ्या
तोंडात मला ती मधासारखी गोड वाटली. पण जेव्हा ती मी
खाल्ली, तेव्हा माझे पोट कडवट झाले. 11 तेव्हा मला
सांगण्यात आले, "तू पुन्हा पुष्कळ लोकांना, राष्ट्रांना,
वेगवेगळ्या भाषा बोलणाऱ्यांना व राजांना संदेश सांगितले
पाहिजेत."

## दोन साक्षीदार

11 मग मला मोजमाप करण्यासाठी वापरण्यात
येण्यासारखी काठी देण्यात आली. आणि मला
सांगण्यात आले, "जा आणि देवाचे मंदीर, वेदी व तेथील
उपासकांचे मोजमाप कर. 2 पण बाहेरचे अंगण सोडून दे.
त्याचे मोजमाप करू नको. कारण ते विदेशी लोकांना
दिलेले आहे. ते बेचाळीस महिने पवित्र शहर तुडवितील.
3 आणि मी माझ्या दोन साक्षीदारांना सामर्थ्य देईन. ते
देवाचा संदेश 1,260 दिवस देतील. ते तागाची वस्त्रे*
घालतील." 4 हे दोन साक्षीदार म्हणजे दोन जैतुनाची झाडे
आहेत. आणि पृथ्वीच्या प्रभूसमोर असणाऱ्या दीपसमया
आहेत. 5 जर एखाद्या व्यक्तीने त्या साक्षीदारांना दुखविण्याचा
प्रयत्न केला तर त्यांच्या तोंडातून अग्नि निघून त्यांच्या

**तागाची वस्त्रे** जाडेभरडे तागाचे वस्त्र. दु:ख व्यक्त करण्यासाठी काही वेळा लोक ते वापरतात.

शत्रूंना भस्म करीत राहत असे. जो कोणी त्यांना इजा
करण्याचा प्रयत्न करीत असे त्याला अवश्य मरावे लागे.
6या साक्षीदारांना ते संदेश देत असताना पाऊस पडला तर
तो थांबविण्याचे सामर्थ्य आहे. त्या साक्षीदारांना पाण्याचे
रक्त करण्याचे सामर्थ्य आहे. पृथ्वीवर प्रत्येक प्रकारचे
संकट पाठविण्याचे सामर्थ्य आहे आणि त्यांना पाहिजे
तितके वेळा ते हे करू शकतात.

7आणि जेव्हा दोन साक्षीदार त्यांचा संदेश देण्याचे
संपवतील तेव्हा त्या अभांग दऱ्यातून येणारा प्राणी त्यांच्याशी
लढाई करील. प्राणी त्यांचा पराभव करील व, त्यांना
मारून टाकील. 8त्या साक्षीदारांची शरीरे मोठ्या शहराच्या
रस्त्यावर पडतील. त्या शहरांचे नाव सदोम आणि इजिप्त
असे आहे. शहरांच्या या नावांना विशेष अर्थ आहे. या
शहरातच आपल्या प्रभूला वधस्तंभावर मारण्यात आले.
9साडेतीन दिवसांपर्यंत प्रत्येक वंशाचे. जमातीचे, भाषेचे
आणि राष्ट्राचे लोक त्या साक्षीदारांच्या शरीरांकडे पाहतील.
पण त्यांना पुरण्यास नकार देतील. 10पृथ्वीवर राहणारे
लोक त्या दोन साक्षीदारांच्या मृत्यूने आनंद पावतील ते
मेजवान्या आयोजित करतील व एकमेकांना भेटी
पाठवतील. ते असे करतील कारण या दोन साक्षीदारांनी
पृथ्वीवर राहणाऱ्या लोकांना अतोनात क्लेश दिले होते.

11पण साडेतीन दिवसांनंतर देवाकडील जीवनाच्या
श्वासाने त्या साक्षीदारांमध्ये प्रवेश केला. आणि ते त्यांच्या
पायांवर उभे राहिले. ज्या सर्व लोकांनी त्यांना पाहिले ते
सर्व घाबरून गेले.

12मग त्या दोन साक्षीदारांनी स्वर्गातून मोठा आवाज
ऐकला. तो म्हणाला, "इकडे वर या!" मग ते दोन साक्षीदार
ढगातून स्वर्गात गेले. त्यांच्या शत्रूंनी त्यांना वर जाताना
पाहिले.

13त्याच वेळेला मोठा भूकंप झाला. एक दंशाश शहर
नष्ट झाले व भूकंपात सात हजार लोक मारले गेले. जे
लोक मेले नाहीत ते खूप घाबरले होते. त्यांनी स्वर्गातील
देवाला गौरव दिले.

14दुसरे मोठे संकट संपले. तिसरे मोठे संकट लवकरच
येत आहे.

## सातवा कर्णा

15सातव्या देवदूताने त्याचा कर्णा वाजविला. तेव्हा स्वर्गात
मोठ्याने आवाज झाले. ते आवाज म्हणाले:

"जगाचे राज्य आता आमच्या प्रभूचे व त्याच्या ख्रिस्ताचे
झाले आहे. आणि तो अनंतकाळपर्यंत राज्य करील."

16मग जे चोवीस वडील सिंहासनावर बसले होते, ते
आपल्या चेहऱ्यावर पडले त्यांनी आणि देवाची भक्ती
केली. हे वडील देवासमोर त्यांच्या सिंहासनावर बसले.
17ते म्हणाले:

"आम्ही तुझे आभार मानतो. सर्वसमर्थ प्रभु देवा, तूच
एक आहेस की जो तू आहेस व होतास. आम्ही तुझे
उपकार मानतो कारण तुझे महान सामर्थ्य वापरून सत्ता
चालविण्यास सुरुवात केलीस

18जगातील लोक रागावले पण आता तुझा राग आला
आहे, आता मेलेल्या माणसांचा न्याय करण्याची वेळ आली
आहे. तुझे सेवक, संदेष्टे यांना बक्षीस देण्याची वेळ आली
आहे. आणि तुझ्या पवित्र लोकांना बक्षिस देण्याची वेळ
आली आहे. जे लहानमोठे लोक तुझा आदर करतात,
त्यांना बक्षिस देण्याची वेळ आली आहे. जे पृथ्वीचा नाश
करतात, त्यांचा नाश करण्याची वेळ आली आहे!"

19मग देवाने स्वर्गातील मंदिर उघडले. तेव्हा तेथे
कराराचा कोश दिसला आणि विजा चमकू लागल्या.
गोंगाट, गडगडाट, भूकंप व गारांचे वादळ झाले.

## स्त्री आणि प्रचंड साप

12 आणि मग एक अद्‌भुत महान चिन्ह आकाशात
दिसले. तेथे एक स्त्री होती. ती सूर्याचा पेहराव
केलेली होती. चंद्र तिच्या पायाखाली होता. तिच्या डोक्यावर
बारा ताऱ्यांचा मुगुट होता. 2ती स्त्री गरोदर होती. ती
(बाळाला) जन्म देणार असल्याने वेदनांनी ओरडली. 3मग
दुसरे एक चिन्ह आकाशात दिसले: तेथे फार मोठा तांबडा
साप होता. त्या सापाला सात डोकी होती व त्या सातही
डोक्यांवर एक एक मुगूट होता. त्या सापाला दहा शिंगे
सुद्धा होती. 4त्या सापाने आपल्या शेपटीच्या फटकाऱ्याने
एक तृतीयांश तारे झटकून पृथ्वीवर खाली टाकून दिले.
जी स्त्री बाळाला जन्म देणार होती त्या स्त्रीच्या समोर तो
प्रचंड साप उभा राहिला. त्या सापाला त्या स्त्रीने जन्म
दिलेल्या बाळाला खायचे होते. 5त्या स्त्रीने एका मुलाला
जन्म दिला. तो मुलगा लोखंडी दंडाने सर्व राष्ट्रांवर सत्ता
चालविणार होता. तिच्या मुलाला देवाकडे व त्याच्या
सिंहासनाकडे नेण्यात आले. 6ती स्त्री देवाने तिच्यासाठी
अरण्यात तयार केलेल्या ठिकाणाकडे पळून गेली. तेथे
त्या स्त्रीची एक हजार दोनशे साठ दिवस काळजी घेण्यात
येईल.

7मग स्वर्गात एक युद्ध झाले. मीखाएल * आणि त्याचे
दूत त्या प्रचंड सापाविरुद्ध लढले. साप व त्याचे दूत हे
सुद्धा त्यांच्याशी लढले. 8पण साप तितका बलवान नव्हता.
प्रचंड साप व त्याच्या दूतांना स्वर्गातील त्यांचे स्थान गमवावे
लागले. 9सापाला आकाशातून खाली फेकण्यात आले.
तो प्रचंड साप, सैतान म्हटलेला तोच तो जुनाट साप होय.
तो संपूर्ण जगाला चकवतो. त्या सापाला त्याच्या दूतांसह
पृथ्वीवर टाकण्यात आले.

---

**मीखाएल** मुख्य देवदूत. देवाच्या इतर दूतांचा पुढारी
(यहूदा 9)

10मग मी आकाशातून एक मोठी वाणी ऐकली. ती म्हणाली, "तारण, सामर्थ्य, आमच्या देवाचे राज्य आणि त्याच्या ख्रिस्ताचा अधिकार ही आली आहेत. कारण आमच्या भावांना दोष लावणारा जो अहोरात्र आमच्या देवासमोर त्यांना शिव्याशाप देत होता, याला खाली फेकण्यात आले आहे. आमच्या देवासमोर तो आमच्या भावांवर दिवस आणि रात्र दोषारोप करीत होता, त्याचा 11आमच्या भावांनी कोकऱ्याच्या रक्ताने आणि जे सत्य ते सांगत होते, त्या सत्याने पराभव केला. त्यांनी त्यांच्या जिवांवर अति प्रेम केले नाही. ते मरणाला भ्याले नाही, 12म्हणून आकाशांनो, व जे तुम्ही तेथे राहता ते तुम्ही आनंदी असा. पण पृथ्वी व समुद्राचे वाईट होईल. कारण सैतान खाली तुमच्याकडे गेला आहे. तो रागाने भरलेला आहे. त्याला माहीत आहे की त्याच्याकडे जास्त वेळ नाही."

13जेव्हा त्या प्रचंड सापाने पाहिले की त्याला पृथ्वीवर खाली फेकण्यात आले आहे तेव्हा ज्या स्त्रीने मुलाला जन्म दिला होता, तिच्या मागे तो लागला. 14मग सापासमोरून तिच्यासाठी अरण्यात तयार केलेल्या ठिकाणी उडून जाता यावे म्हणून त्या स्त्रीला मोठ्या गरूडाचे पंख देण्यात आले होते. मग त्या ठिकाणी साडेतीन वर्षेपर्यंत तिचे पोषण केले जाते. 15मग त्या सापाने आपल्या तोंडातून नदीसारखे पाणी ओतले. सापाने ते पाणी स्त्रीकडे ओतले यासाठी की तिने त्या पाण्यात वाहत जावे. 16पण पृथ्वीने तिला मदत केली. पृथ्वीने तिचे तोंड उघडले व त्या प्रचंड सापाच्या तोंडातून आलेली नदी तिने गिळून टाकली. 17मग तो साप त्या स्त्रीवर फार रागावला. मग तो साप त्या स्त्रीच्या इतर मुलांशी युद्ध करण्यास दूर निघून गेला. तिची मुले ही आहेत जी देवाच्या आज्ञेचे पालन करतात आणि येशूने शिकविलेले सत्य त्यांच्याकडे आहे.

18तो प्रचंड साप समुद्रकिनाऱ्यावर उभा राहिला.

## दोन प्राणी

13 मग मी एक श्वापद समुद्रातून वर येताना पाहिले. त्याला दहा शिंगे आणि सात डोकी होती. त्याच्या शिंगांवर दहा मुकुट होते आणि प्रत्येक डोक्यावर देवनिंदाव्यंजक नाव लिहिले होते. 2हा पशू चित्त्यासारखा दिसत होता. त्याचे पाय अस्वलाच्या पायासारखे होते. त्याला सिंहाच्या तोंडासारखे तोंड होते. त्या प्रचंड सापाने त्या प्राण्याला त्याची शक्ति, त्याचे सिंहासन आणि मोठा अधिकार दिला.

3त्या प्राण्याच्या डोक्यांपैकी एक डोके जबर जखमी झालेले दिसत होते. पण ती जखम बरी झाली. जगातील सर्व लोक चकित झाले आणि ते सर्व त्या श्वापदाच्या मागे गेले. 4लोकांनी त्या प्रचंड सापाची उपासना केली कारण त्याने त्याची शक्ति त्या श्वापदाला दिली होती. लोकांनी त्या प्राण्याची उपासना केली. त्यांनी विचारले, "या प्राण्याइतका सामर्थ्यशाली कोण आहे? त्याच्याविरुद्ध कोण लढाई करू शकेल?"

5त्या श्वापदाला मोठ्या अवास्तव गोष्टी बोलण्याची मुभा देण्यात आली व देवाविरुद्ध अनेक दुर्भाषणयुक्त गोष्टी तो बोलला. त्या प्राण्याला बेचाळीस महिने त्याचे सामर्थ्य वापरण्यास सांगण्यात आले. 6त्या प्राण्याने देवाविरुद्ध वाईट गोष्टी बोलण्यासाठी तोंड उघडले. त्या प्राण्याने देवाच्या नावाविरुद्धसुद्धा वाईट गोष्टी बोलण्यास कमी केले नाही. व देव राहतो त्या ठिकाणाबद्दल सुध्दा वाईट गोष्टी तो बोलला. व जे सर्व स्वर्गात राहतात त्यांच्याविषयी वाईट गोष्टी बोलल्या. 7देवाच्या पवित्र लोकांविरुद्ध युद्ध करण्यास व त्यांना पराभूत करण्यास त्या प्राण्याला शक्ति देण्यात आली. त्या प्राण्याला प्रत्येक वंश, जमात, भाषा आणि राष्टांतील लोकांवर अधिकार देण्यात आला आहे. 8आणि जगाच्या निर्मितीपासून ज्यांची नावे वधलेल्या कोकऱ्याच्या जीवनाच्या पुस्तकात लिहिली नाहीत, ते सर्व त्या पशूची भक्ति करतील. 9"ज्याला कान आहेत तो ऐको.

10जर एखादा मनुष्य दुसऱ्यास कैदी बनवतो तर तो मनुष्यही कैदी बनविण्यात येतो. जर एखादा मनुष्य तलवारीने मरतो तर त्या मनुष्याला तलवारीनेच मारण्यात येते.

याचा अर्थ असा की देवाच्या पवित्र लोकांनी धीर व विश्वास धरला पाहिजे."

11मग मी एक दुसरे श्वापद पृथ्वीतून वर येताना पाहिले. त्याला कोकऱ्यासारखी दोन शिंगे होती. पण ते प्रचंड सापासारखे बोलत होते. 12हा प्राणी पहिल्या प्राण्यासमोर उभा राहतो व पहिल्या प्राण्याकडे जी शक्ति होती तीच तो वापरतो. पृथ्वीवर राहणाऱ्या सर्व लोकांनी पहिल्या प्राण्याची उपासना करावी यासाठी तो आपली शक्ति वापरतो. पहिला प्राणी असा होता की त्याला प्राणघातक अशी जखम होती जी बरी झाली होती. 13हे दुसरे श्वापद मोठी चिन्हे करते. लोक पाहत असताना तो स्वर्गातून पृथ्वीवर अग्नीसुद्धा येईल असे करतो 14आणि त्याला पहिल्या श्वापदासमोर चिन्हे करण्याचा अधिकार दिला होता म्हणून ते म्हणजे जे श्र्वापद जखमी होऊनही वाचले, त्याची मूर्ति बनवून त्याची भक्ति करावी अशी पृथ्वीवर राहणाऱ्या लोकांना आज्ञा करतो. 15दुसऱ्या प्राण्याला पहिल्या प्राण्याच्या मूर्तीला जीवन देण्यासाठी शक्ति देण्यात आली. मग ती मूर्ती बोलेल व जे लोक तिची भक्ति करीत नाहीत त्यांना ठार मारण्याची आज्ञा देईल. 16दुसऱ्या प्राण्याने सर्व लोकांना– लहान मोठ्या, श्रीमंत आणि गरीब, स्वतंत्र व दास – बळजबरी केली की, त्यांनी त्यांच्या उजव्या हातावर किंवा कपाळावर चिन्ह करून घ्यावे. 17यासाठी की, चिन्ह असल्याशिवाय कोणीही व्यक्तीने विकू नये किंवा विकत घेऊ नये. हे चिन्ह म्हणजे त्या प्राण्याचे नाव किंवा त्याच्या नावाची

संख्या आहे. 18ज्या माणसाला समजबुद्धी आहे, त्याने त्या प्राण्याच्या संख्ये अर्थ शोधावा. ही संख्या मनुष्यांची संख्या आहे. त्यांची संख्या आहे 666.

## मुक्त केलेल्याचे गीत

14 मग मी पाहिले, आणि तेथे माझ्यासमोर कोकरा होता. तो सियोन पर्वतावर*उभा होता. त्याच्याबरोबर 1,44,000 लोक होते. त्यांच्या कपाळांवर त्याचे आणि त्याच्या पित्याचे नाव लिहिलेले होते. 2आणि आकाशातून पुराच्या लाटांचा लोंढा आल्यासारखा आवाज, ढगांचा मोठा गडगडाटाचा आवाज ऐकला. जो आवाज मी ऐकला तो जणू काय अनेक लोक आपल्या वीणा वाजवीत आहेत तसा आवाज होता.

3ते लोक सिंहासनासमोर आणि चार जिवंत प्राण्यांसमोर आणि वडिलांसमोर नवे गीत गात होते. जे लोक पृथ्वीपासून मुक्त करण्यात आलेले, असे 1,44,000 तेच हे गाणे शिकू शकले. त्यांच्याशिवाय दुसरे कोणीही ते गीत शिकू शकले नाही. 4हे लोक असे होते की त्यांनी स्त्रियांशी वाईट कर्म करून स्वत:ला भ्रष्ट केले नाही. त्यांनी स्वत:ला शुद्ध राखले. कोकरा जेथे गेला तेथे ते गेले. हे पृथ्वीवरील लोकांमधून खंडणी भरून मुक्त केलेले होते. देवाला आणि कोकऱ्याला अर्पिलेले ते पहिले आहेत. 5त्याच्या मुखान असत्य कधी आढलेले नाही खोटे बोलण्याबद्दल ते निर्दोष होते.

## तीन देवदूत

6मग मी आणखी एक देवदूत हवेत उंच उडताना पाहिला. पृथ्वीवरील लोकांना सांगण्यासाठी म्हणजे प्रत्येक राष्टाच्या, वंशाच्या, भाषेच्या आणि जमातीच्या लोकांना सांगण्यासाठी त्या देवदूताकडे अनंतकाळचे शुभवर्तमान होते. 7देवदूत मोठ्या आवाजात म्हणाला, "ज्याने आकाश, पृथ्वी, समुद्र, व पाण्याचे झरे निर्माण केले, त्या देवाचे भय धरा आणि त्याची स्तुति करा. देवाने न्याय करावा अशी वेळ आली आहे. देवाची उपासना करा." 8मग पहिल्या देवदूताच्या मागे दुसरा देवदूत गेला आणि म्हणाला, "तिचा नाश झालेला आहे! बाबेल हे मोठे शहर नष्ट झाले आहे. त्या नगरीने सर्व राष्टांना तिच्या व्यभिचाराचा द्राक्षारस व देवाचा राग प्यायला लावला."

9तिसरा देवदूत पहिल्या दोन देवदूतांच्या मागे गेला. तिसरा देवदूत मोठ्या आवाजात म्हणाला: "जो माणूस प्राण्याची आणि प्राण्याच्या मूर्तीची उपासना करतो, त्याला त्याच्या कपाळावर किंवा हातावर प्राण्याची खूण करू देतो, 10तो मनुष्य देवाच्या रागाच्या सर्व शक्तीनिशी बनवलेला द्राक्षारस पिईल. त्या व्यक्तीला पवित्र देवदूतांसमोर व कोकऱ्यासमोर जळत्या गंधकाने पीडले जाईल. 11आणि त्यांच्या जळत्या वेदनांतून अनंतकाळसाठी धूर निघेल. जे लोक प्राण्याची उपासना करतात आणि त्याच्या मूर्तीची उपासना करतात किंवा ज्यांना त्याच्या नावाचे चिन्ह आहे. त्यांना रात्र असो किंवा दिवस असो, विश्रांति मिळणार नाही." 12याचा अर्थ असा की, देवाच्या पवित्र लोकांनी धीर धरला पाहिजे. त्यांनी देवाच्या आज्ञा पाळल्या पाहिजेत. आणि येशूमधील त्यांचा विश्वास टिकवला पाहिजे.

13मग मी स्वर्गातून एक आवाज ऐकला. तो आवाज म्हणाला, "हे लिही: येथून पुढे, जे प्रभूमध्ये मेलेले आहेत, ते त्यांच्या श्रमापासून विश्रांति घेतील."

आत्मा म्हणतो, "होय, हे खरे आहे. ते लोक आपल्या कठीण कामापासून विश्रांति पावतील. त्यांनी केलेल्या गोष्टी त्यांच्याबरोबर राहतील."

## पृथ्वीची कापणी

14मी पाहिले आणि तेथे माझ्यासमोर पांढरा ढग होता. त्या ढगावर बसलेला मनुष्याच्या पुत्रासारखा दिसत होता. त्याच्या डोक्यावर सोनेरी मुगुट आणि त्याच्या हातात धारदार विळा होता. 15मग आणखी एक देवदूत मंदिरामधून बाहेर आला व ढगावर बसलेल्यास मोठ्याने म्हणाला, "तुझा विळा घे व (पृथ्वीवरून) पीक गोळा कर. कापणीची वेळ आली आहे. पृथ्वीचे फळ पिकले आहे." 16मग जो ढगावर बसला होता त्याने त्याचा विळा पृथ्वीवर चालविला. आणि पृथ्वीची कापणी केली.

17मग दुसरा देवदूत स्वर्गातील मंदिरातून बाहेर आला. या देवदूताकडेसुद्धा धारदार विळा होता. 18मग आणखी एक देवदूत वेदीकडून आला. या देवदूताचा अग्नीवर अधिकार होता. या देवदूताने धारदार विळा असलेल्या देवदूताला बोलाविले. तो म्हणाला, "तुझा धारदार विळा घे आणि पृथ्वीवरील द्राक्षाचे घड काढ. पृथ्वीची द्राक्षे पिकली आहेत. 19देवदूताने त्याचा विळा पृथ्वीवर चालवला. देवदूताने पृथ्वीची द्राक्षे गोळा केली आणि देवाच्या क्रोधाच्या घाण्यात टाकली. 20ती द्राक्षे द्राक्षाच्या कुंडात शहराबाहेर तुडविली गेली. त्यातून रक्त वाहिले. त्याचा प्रवाह घोड्याच्या डोक्यापर्यंत पोहोंचेल इतका असून तो 200 मैलांपर्यंत वाहत गेला.

## शेवटच्या पीडेसह देवदूत

15 मग मी आणखी एक अद्भुत चिन्ह स्वर्गात पाहिले. ते महान आणि चकित करणारे होते. तेथे सात देवदूतांनी सात पीडा आणल्या होत्या. या शेवटच्या पीडा होत्या कारण त्यानंतर देवाचा क्रोध नाहीसा होणार आहे.

2मी अग्नि काचेच्या समुद्रात मिसळल्यासारखा पाहिला. सर्व लोकांनी ज्यांनी त्या प्राण्यावर, त्याच्या मूर्तीवर आणि त्याच्या नावाच्या संख्येवर विजय मिळविला होता ते सर्व समुद्राजवळ उभे होते. या लोकांकडे देवाने दिलेली वीणा

---

**सियोन पर्वत** यरुशलेमचे दुसरे नाव. याचा अर्थ आध्यात्मिक शहर जेथे देवाचे लोक त्याच्याबरोबर राहतील.

होती. 3त्यांनी देवाचा सेवक मोशे याचे गीत आणि कोकऱ्याचे गीत गाईले:

“प्रभु देवा, सर्वसमर्था तू महान आणि अद्भुत गोष्टी करतोस. राष्ट्रांच्या राजा, तुझे मार्ग योग्य व खरे आहेत
4हे प्रभु, सर्व लोक तुला घाबरतील सर्व लोक तुझ्या नावाची स्तुति करतील. फक्त तूच पवित्र आहेस सर्व लोक येऊन तुझी उपासना करतील कारण तुझी नीतीमत्त्वाची कृत्ये प्रकट झाली आहेत.”

5त्यानंतर मी स्वर्गामध्ये मंदिर (साक्षीचा मंडप)* पाहिले. मंदिर उघडे होते. 6आणि सात पीडा आणणारे सात देवदूत मंदिराबाहेर आले. त्यांनी स्वच्छ चमकदार तागाचे कपडे घातले होते. त्यानी त्यांच्या छातीवर सोन्याच्या पट्ट्या बांधल्या होत्या.

7मग सात देवदूतांना चार जिवंत प्राण्यांपैकी एकाने सात सोनेरी वाट्या दिल्या जो देव अनंतकाळपर्यंत राहतो त्याच्या रागाने त्या वाट्या भरल्या. 8आणि देवाच्या तेजामधून व पराक्रमामधून निघालेल्या धुराने मंदिर भरले. आणि कोणीही सात देवदूतांच्या सात पीडा पूर्ण होईपर्यंत मंदिरात प्रवेश करू शकले नाही.

## देवाच्या रागाने वाट्या भरल्या

16 मग मी मंदिरातून एक मोठा आवाज ऐकला. तो सात देवदूतांना म्हणाला, “जा, पृथ्वीवर देवाच्या रागाच्या सात वाट्या ओता.”

2पहिला देवदूत गेला आणि त्याने जमिनीवर त्याची वाटी ओतली. तेव्हा सर्व लोकांना ज्यांच्यावर श्वापदाचे चिन्ह होते आणि जे त्याच्या मूर्तीची पूजा करीत होते त्यांना अतिशय कुरूप आणि वेदना देणारे फोड आले.

3दुसऱ्या देवदूताने त्याची वाटी समुद्रावर ओतली. मग समुद्र रक्तासारखा, मेलेल्या माणसाच्या रक्तासारखा झाला. समुद्रातील प्रत्येक जीवधारी प्राणी मेले.

4तिसऱ्या देवदूताने त्याची वाटी नद्या व झऱ्यांवर ओतली. तेव्हा नद्यामझरे व रक्तमय झाले. 5मग मी पाण्याच्या देवदूताला हे बोलताना ऐकले:

“केवळ तूच एक आहेस, जो तू आहेस आणि जो तू होतास. तू पवित्र आहेस. जे न्याय तू दिलेस ते योग्य दिलेस.
6लोकांनी तुझ्या पवित्र लोकांचे रक्त सांडले. तुझ्या संदेष्ट्यांचे रक्त सांडले आता तू त्या लोकांना रक्त प्यावयास दिले आहेस. कारण ते याच पात्रतेचे आहेत.”

7त्यानंतर मी वेदीला असे बोलताना ऐकले की,

“होय, प्रभु देवा सर्वसमर्था, तुझा न्याय खरा आणि योग्य आहे.”

8चौथ्या देवदूताने त्याची वाटी सूर्यावर ओतली. सूर्याला लोकांना अग्नीने जाळून टाकण्याची शक्ती दिली होती. 9भयंकर अशा उष्णतेमुळे लोक जळाले. त्या लोकांनी देवाच्या नावाला शिव्याशाप दिले की ज्याला या संकटांवर ताबा आहे. पण लोकांनी पश्चात्ताप करण्याचे नाकारले व देवाचे गौरव करण्याचे नाकारले.

10पाचव्या देवदूताने त्याची वाटी श्वापदाच्या सिंहासनावर ओतली. आणि प्राण्याच्या राज्यावर अंधार पसरला. दु:खामुळे लोक त्यांच्या जिभा चावत होते. 11लोकांनी स्वर्गाच्या देवाला शाप दिले, कारण त्यांना वेदना होत होत्या व फोड आले होते. पण लोकांनी आपल्या पापकृत्यांपासून पश्चात्ताप करण्याचे नाकारले.

12सहाव्या देवदूताने त्याची वाटी फरात नदीवर ओतली. नदीतील पाणी सुकून गेले. त्यामुळे पूर्वेकडून येणाऱ्या राजांसाठी रस्ता तयार झाला. 13तेव्हा मी तीन अशुद्ध आत्मे जे बेडकासारखे दिसत होते ते पाहिले. ते प्रचंड सापाच्या मुखातून बाहेर आले. श्वापदाच्या मुखातून बाहेर आले, खोट्या संदेष्ट्याच्या मुखातून बाहेर आले. 14हे सर्व दुष्ट आत्मे सैतानाचे आत्मे आहेत. ते चमत्कार करतात, हे आत्मे सगळ्या जगातील राजांकडे जातात व त्यांना सर्वसमर्थ देवाच्या महान दिवशी लढाईसाठी एकत्र जमवतात.

15“पाहा, जसा चोर येतो तसा मी येईन. तेव्हा लोकांसमोर आपली लज्जा दिसू नये म्हणून जो जागा राहील. आणि आपले कपडे तयार ठेवतो तो धन्य.”

16मग दुष्ट आत्म्यांनी हर्मगिदोन* नावाच्या ठिकाणी सर्व राजांना एकत्र आणले.

17मग सातव्या देवदूताने त्याची वाटी हवेत ओतली. तेव्हा मंदिरातून सिंहासनाजवळून मोठा आवाज आला. तो म्हणाला, “हे पूर्ण झाले आहे.” 18मग विजा चमकू लागल्या. गोंगाट, गडगडाट व फार प्रचंड भूकंप झाला. लोक पृथ्वीवर असल्यापासून असला प्रचंड भूकंप कधी झालाच नव्हता. 19महान शहर तीन विभागात विभागले गेले. राष्ट्रांतील शहरे नष्ट झाली. आणि देव महान बाबेलला विसरला नव्हता. त्याने त्यांच्या भयंकर रागाच्या द्राक्षारसाचा पेला बाबेलला दिला. 20प्रत्येक बेट नाहीसे झाले. आणि पर्वत पूर्णपणे नष्ट झाले. 21लोकांवर आकाशातून गारांचा वर्षाव झाला. या प्रत्येक गारा 100 पौंड* वजनाच्या होत्या. या

---

**साक्षीचा मंडप** इस्राएल लोक इजिप्तमधून बाहेर आल्यानंतर देवाने हा मंडप बांधण्यास सांगितले ते देवाच्या समक्षतेचे व उपासनेचे ठिकाण होते (निर्गम 25–27; 35–38).

**हर्मगिदोन** हा शब्द हिब्रू भाषेतील आहे. देव व सैतान यांच्यातील शेवटचे युध्द.

**100 पौंड** सुमारे एक मण (चाळीस किलो).

गारांच्या संकटामुळे लोकांनी पश्चात्ताप करण्याऐवजी देवाला शाप दिले कारण ही पीडा खरोखरच महाभयंकर होती.

### श्वापदावर बसलेली तुच्छ स्त्री

17 सात वाट्या असलेल्या सात देवदूतांपैकी एक जण माझ्याकडे आला आणि मला म्हणला, "ये, मी तुला त्या अति नीच वेश्येला झालेली शिक्षा दाखवतो. ती बहुत जलांवर बसली आहे. 2पृथ्वीवरील राजांनी तिच्याशी व्यभिचार केला. आणि तिच्या लैंगिक पापाच्या द्राक्षारसाने पृथ्वीवरील लोक धुंद झाले आहेत."

3मग देवदूताने मला आत्म्याद्वारे वाळवंटात नेले. तेथे मी एका स्त्रीला किरमिजी रंगाच्या श्वापदावर बसलेले पाहिले. त्या श्वापदाच्या अंगावर वाईट नावे लिहिली होती. त्या श्वापदाला सात डोकी आणि दहा शिंगे होती, 4त्या स्त्रीने किरमिजी व जांभळी वस्त्रे घातली होती. तिने घातलेल्या सोने, जवाहिर व मोत्यांनी ती चमकत होती. तिच्या हातात सोन्याचा पेला होता, हा पेला वाईट गोष्टींनी आणि तिच्या लैंगिक पापांच्या अशुद्धतेने भरला होता. 5तिच्या कपाळावर नाव लिहिले होते. त्या नावाला गुपित अर्थ आहे. त्यावर असे लिहिले होते:

**मोठी बाबेल**
**वेश्यांची व पृथ्वीवरील**
**ओंगळ गोष्टींची माता**

6मी पाहिले ती स्त्री रक्तसेवनाने मस्त झाली होती. ती देवाच्या पवित्र लोकांचे रक्त प्याली होती. ज्या लोकांनी येशूविषयी सांगितले त्यांचे रक्त ती प्याली होती.

जेव्हा मी तिला पाहिले तेव्हा फार आश्चर्यचकित झालो. 7मग देवदूत मला म्हणाला, "तू आश्चर्यचकित का झालास? मी तुला त्या स्त्रीचे आणि ती ज्या श्वापदावर बसली आहे, ज्याला सात डोकी व दहा शिंगे आहेत त्याचे रहस्य सांगतो.

8जो श्वापद तू पाहिला तो (पूर्वी) होता, आता तो नाही. आणि तो तळविरहित बोगद्यातून येईल आणि नष्ट केला जाईल. पृथ्वीवर राहणारे लोक ज्यांची नावे जीवनाच्या पुस्तकात पृथ्वीच्या स्थापनेपासून लिहिलेली नाहीत ते जेव्हा श्वापदाला पाहतील, तेव्हा ते आश्चर्यचकित होतील कारण तो (पूर्वी) होता, आता तो नाही आणि तरी तो येईल.

9"यासाठी शहाणपण असलेल्या बुद्धीची आवश्यकता आहे. सात डोकी या सात टेकड्या आहेत, ज्यावर ती स्त्री बसते.

10"ते सात राजेसुद्धा आहेत. त्यापैकी पाच राजे पतन पावले आहेत. एक आहे आणि एक अजून आला नाही. पण जेव्हा तो येईल तेव्हा तो फारच थोडा वेळ थांबेल. 11जो प्राणी (पूर्वी) होता आणि जो आता नाही तो आठवा राजा आहे. आणि तो त्या सात राजांपासून आहे. आणि तो आपल्या नाशाकडे जात आहे.

12"जी दहा शिंगे तू पाहिलीस ते ज्यांना अजून सत्ताधिकार मिळाला नाही, असे दहा राजे आहेत. पण त्यांना श्वापदाबरोबर एका घटकेसाठी राजासारखा अधिकार मिळेल. 13त्यांचा एकच हेतू आहे. आणि ते त्यांची शक्ती व अधिकार श्वापदाला देतील. 14ते कोकऱ्याबरोबर युद्ध करतील पण कोकरा त्यांच्यावर मात करील. कारण तो प्रभूंचा प्रभु व राजांचा राजा आहे. आणि त्याच्याबरोबर त्याने बोलाविलेले, निवडलेले, विश्वासू अनुयायी असतील."

15मग देवदूत मला म्हणाला, "जे पाण्यांचे प्रवाह तू पाहिले, ज्यावर वेश्या बसली होती, ते म्हणजे पुष्कळ लोक, समुदाय, राष्ट्रांचे व भाषा बोलणारे लोक आहेत. 16तो श्वापद आणि दहा शिंगे तू पाहिलीस ते त्या वेश्येचा तिरस्कार करतील. ते तिला ओसाड, उजाड करतील आणि तिला नग्न सोडून देतील, ते तिचे मांस खातील, व अग्नीने तिला जाळतील. 17देवाचे वचन पूर्ण होईपर्यंत, देवाने त्या श्वापदाला सत्ता चालविण्याचा अधिकार देण्याचे कबूल केले आहे. देवाने त्याचा हेतु पूर्ण करण्याचे त्यांच्या मनात घातले आहे. 18जी स्त्री तू पाहिलीस ती मोठी नगरी आहे, जी पृथ्वीवरच्या राजांवर सत्ता गाजवील."

### बाबेलचा नाश होतो

18 यानंतर मी दुसऱ्या एका देवदूताला आकाशातून खाली येताना पाहिले. त्याच्याकडे मोठे अधिकार होते. आणि त्याच्या गौरवाने पृथ्वी झळाळत होती. 2प्रचंड आवाजात तो ओरडला:

"पडली! महान बाबेल पडली! ती दुष्ट आत्म्यांचे घर बनली आहे. आणि प्रत्येक दुष्ट आत्म्याचा आश्रय आणि प्रत्येक अशुद्ध, धिक्कारलेल्या पक्षांचा आश्रय झाली आहे.
3कारण तिच्या व्यभिचाराचा द्राक्षारस जो वेड लावणारा आहे तो सर्व राष्ट्रांनी प्याली आहेत. पृथ्वीवरील राजांनी तिच्याशी व्यभिचार केला आहे आणि पृथ्वीवरील व्यापारी तिच्या अति संपत्तीने व ऐषारामाने श्रीमंत झाले आहेत."

4मग मी दुसरा एक आवाज आकाशातून ऐकला. तो म्हणाला:

"माझ्या लोकांनो, तिच्यातून बाहेर या यासाठी की तिच्या पापात तुमचा वाटा असू नये यासाठी की तुमच्यावर तिच्या कोणत्याही पीडा येऊ नयेत.
5कारण तिची पापे स्वर्गाला भिडली आहेत. आणि देवाला तिच्या अपराधांची आठवण झाली आहे.
6तिने ज्याप्रमाणे तुम्हाला दिले आहे, तसे तुम्ही तिचे परत करा. तिने जे काही केले आहे त्याच्या दुप्पट तुम्ही

तिच्यासाठी करा तिने दुसऱ्यांना दिले त्याच्या दुप्पट प्रमाणात तेज मद्य तिच्या प्याल्यात भरा.
7तिने स्वत:ला जसे गौरव आणि ऐषाराम दिला तितक्या प्रमाणात तुम्ही तिला छळ व दु:ख द्या. ती तिच्या अंत:करणात गर्वाने म्हणते, 'मी राणीसारखी सिंहासनावर बसते, मी विधवा नाही.' आणि मी केव्हाच शोक करणार नाही.
8म्हणून एका दिवसात तिच्या पीडा तिच्यावर येतील. (त्या पीडा म्हणजे): मृत्यू, शोक आणि दुष्काळ ती आगीत भस्म होऊन जाईल कारण सामर्थ्यशाली प्रभु देव तिचा न्याय करील."

9पृथ्वीवरील ज्या राजांनी त्या स्त्रीशी व्यभिचार केला, आणि जे तिच्या विलासाच्या दिवसाचे भागीदार झाले, ते ती जळत असताना निघणारा धूर पाहून रडतील आणि तिच्याबद्दल शोक करतील. 10तिच्या शारीरिक पीडांच्या भीतीमुळे ते राजे दूर उभे राहतील. आणि ओरडतील:\

"भयंकर! भयंकर, हे महान नगरी बाबेल, सामर्थ्याच्या शहरा! एका तासात तुझा न्याय तुझ्यावर येईल!"

11पृथ्वीचे व्यापारी तिच्यासाठी रडतील आणि शोक करतील, कारण आता त्यांचा माल कोणीही घेणार नाही.
12तो माल असा: सोने, चांदी, मौल्यवान रत्ने, मोती, तागाचे तलम कापड, किरमिजी, रेशमी व जांभळे कापड, निरनिराळ्या प्रकारचे सुगंधी लाकूड, सर्व प्रकारची हस्तीदंती पात्रे, मोलवान लाकडे, तांब्याची, लोखंडाची व संगमरवरी पाषाणाची पात्रे. 13दालचिनी, उटणे ऊद, धूप, द्राक्षारस व जैतुनाचे तेल, मैदा व गहू, गुरेढोरे व मेंढरे, घोडे व रथ, दासदासी, मानवी जीव.

14"बाबेल, ज्या उत्तम गोष्टींची तुला अपेक्षा होती, त्या गोष्टी आता तुझ्यापासून गेल्या आहेत तुझी सर्व श्रीमंती व वैभव नाहीसे झाले आहे. त्याची तुला परत कधी भरपाई होणार नाही."

15ज्या व्यापाऱ्यांनी असा माल विकला, आणि त्यांची संपत्ति तिच्यापासून मिळविली ते तिच्या पीडेच्या भीतीमुळे दूर उभे राहतील. ते रडतील व शोक करतील. 16आणि ओरडतील:

"भयंकर! भयंकर, हे महानगरी, तलम तागाचे, किरमिजी व जांभळे पोशाख नेसून जी नगरी सजली होती सोने, मौल्यवान रत्ने व मोती यांनी ती झगमगत होती!
17एका तासात अशा प्रकारची प्रचंड संपत्ति नष्ट झाली!"

प्रत्येक तांडेल, जलप्रवासी तसेच खलाशी आणि समुद्रावर पोट भरणारे सर्व लोक त्या नगरीपासून दूर राहतील.
18आणि ती जळत असताना तिचा धूर ते पाहतील तेव्हा ते ओरडून म्हणतील, "या नगरीसारखी दुसरी एवढी महान नगरी झाली नाही." 19मग ते आपल्या डोक्यात धूळ घालतील आणि शोक करतील.

"भयंकर! भयंकर! हे महान नगरी, ज्या सर्वांकडे समुद्रात जहाजे आहेत ते तिच्या संपत्तीमुळे श्रीमंत झाले एका तासात तिचा सर्वनाश झाला.
20हे स्वर्गा, तिच्याबद्दल आनंद कर! संतानो, प्रेषितांनो आणि संदेष्ट्यांनो आनंद करा! तिने ज्या प्रकारे तुम्हाला नागविले त्याबद्दल देवाने तिचा न्याय केला आहे."

21मग एका बलवान देवदूताने जात्याच्या मोठ्या तळीसारखा धोंडा उचलून तो समुद्रात टाकून दिला. आणि म्हणाला :

"अगदी अशीच महान बाबेल नगरी जोराने खाली फेकण्यात येईल आणि परत ती कधीही कोणाला सापडणार नाही.
22वीणा वाजविणाऱ्यांचा, संगीत वाजविणाऱ्यांचा, बासरी वाजविणाऱ्यांचा आणि कर्णा वाजविणाऱ्यांचा आवाज परत कधी तुझ्या येथे ऐकू येणार नाही. कोणताही कारागिरीचा व्यापारी तुझ्यामध्ये आढळणार नाही तुझ्या येथे जात्याचा आवाज कधी ऐकू येणार नाही.
23दिव्याचा प्रकाश तुझ्यामध्ये पुन्हा कधी प्रकाशणार नाही तुझ्या येथे वधूवरांचा आवाज पुन्हा कधी ऐकू येणार नाही तुझे व्यापारी जगातील मोठी माणसे होती तुझ्या जादूटोण्यामुळे सर्व राष्टे बहकली गेली
24त्या नगरीमध्ये संदेष्ट्यांचे देवाच्या पवित्र लोकांचे आणि जगात ज्यांची हत्या करण्यात आली अशांचे रक्त सांडल्याचे दिसून आले."

## स्वर्गात लोक देवाची स्तुति करतात

19 यानंतर मी मोठ्या जनसमुदायाच्या गर्जनेसारखा स्वर्गातून आवाज ऐकला. ते म्हणत होते:

"हालेलुया! तारण, गौरव आणि सत्ता आमच्या देवाची आहेत
2कारण त्याचे न्यायनिवाडे खरे आणि योग्य आहेत ज्या मोठ्या वेश्येने आपल्या व्यभिचारी वागण्याने सर्व पृथ्वी भ्रष्ट केली, तिला देवाने शिक्षा केली आहे. त्याच्या सेवकाच्या रक्ताचा त्याने सूड घेतला आहे."

3ते पुन्हा म्हणाले,

"हालेलुया! तिच्यापासून निघालेला धूर अनंतकाळ वर जातो."

4मग चोवीस वडीलजन आणि चार जिवंत प्राणी जो देव सिंहासनावर बसला आहे त्याच्या पाया पडले व त्यांनी त्याची उपासना केली. ते म्हणाले:
"आमेन, हालेलुया!"
5मग सिंहासनावरून एक वाणी झाली, ती म्हणाली,

"देवाच्या सर्व सेवकांनो, त्याची स्तुति करा, जे तुम्ही त्याचे भय धरता ते तुम्ही सर्व लहानथोर देवाची स्तुति करा!"

6नंतर मोठ्या लोकसमुदायाच्या गर्जनेसारखा आवाज मी ऐकला, तो आवाज महापूराच्या आणि मेघांच्या मोठया गडगडाटासारखा होता. तो लोकसमुदाय असे मोठ्याने म्हणत होता की:

"हालेलुया! कारण आमच्या सर्वसमर्थ देवाने सत्ता गाजविण्यास सुरूवात केली आहे.
7आपण उल्हास करू व आनंदात राहू! आणि त्याचे गौरव करू कारण कोकऱ्याचे लग्न जवळ आले आहे. आणि त्याच्या वधूने स्वत:ला नटवून तयार केले आहे
8तिला स्वच्छ, चमकणारे तागाचे कपडे नेसायला दिले आहेत."

(देवाच्या पवित्र लोकांनी केलेली नीतीमत्त्वाची कामे म्हणजेच तलम तागाचे कपडे आहेत)
9नंतर तो देवदूत मला म्हणाला, "हे लिही, ज्यांना कोकऱ्याच्या लग्नाच्या मेजवानीचे आमंत्रण दिले आहे, ते धन्य!" तो मला म्हणाला, "हे देवाचे खरेखुरे शब्द आहेत."
10यावर मी देवदूताच्या पायावर डोके ठेवून त्याची उपासना करू लागलो; परंतु देवदूत म्हणाला, "असे करू नको. मी तर तुझ्याबरोबरीचा आणि येशूच्या सत्याबाबत साक्ष देण्याची जबाबदारी तुझ्या ज्या भावांवर आहे, त्यांच्या बरोबरीचा एक सेवक मात्र आहे. देवाची उपासना कर! येशूच्या सत्याचे शिक्षण देणे हाच देवाच्या संदेशाचा आत्मा आहे."

## पांढऱ्या घोड्यावरचा स्वार

11नंतर माझ्यासमोर स्वर्ग उघडलेला मी पाहिला; आणि माझ्यासमोर एक पांढरा घोडा होता. त्या घोड्यावर बसलेल्याचे 'नाव विश्वासू आणि खरा' असे होते; कारण तो न्यायाने निवाडा करतो आणि न्यायाने लढाई करतो.
12त्याचे डोळे अग्नीच्या ज्वालेसारखे आहेत. आणि त्याच्या डोक्यावर अनेक मुगुट आहेत. त्याचे नाव त्याच्यावर लिहिले आहे. ते नाव काय आहे हे त्याच्याशिवाय इतर कोणालाही माहीत नाही. 13त्याने आपल्या अंगात रक्तामध्ये भिजविलेला झगा घातला होता. त्या स्वाराचे नाव "देवाचा शब्द" असे आहे. 14स्वच्छ आणि पांढरे शुभ्र कपडे घातलेले स्वर्गातील सैन्य पांढऱ्या घोड्यांवर बसून त्याच्या मागे येत होते. 15त्याच्या तोंडातून एक धारदार तरवार येते जिच्याने तो राष्ट्रांना नमवील. आणि लोखंडी दंडाने तो त्यांच्यावर सत्ता गाजवील. सर्वसमर्थ देवाच्या अतीकोपाची द्राक्षे तो द्राक्षकुंडामध्ये तुडवील. 16त्याच्या झग्यावर आणि त्याच्या मांडीवर हे नाव लिहिले आहे:

## राजांचा राजा आणि प्रभूंचा प्रभु

17नंतर सूर्यात उभा राहिलेला एक देवदूत मी पाहिला. तो मोठ्याने ओरडून आकाशामध्ये उडणाऱ्या सर्व पक्ष्यांना म्हणत होता, "या! देवाच्या महान मेजवानीसाठी जमा व्हा! 18म्हणजे राजे, सरदार आणि प्रसिद्ध माणसांचे मांस तुम्हांला खावयाला मिळेल. घोड्यांचे आणि त्यांच्यावर स्वार झालेल्यांचे, तसेच स्वतंत्र व गुलाम, लहान व थोर अशा सर्व लोकांचे मांस तुम्हालां खावयाला मिळेल."
19मग मी ते श्वापद आणि पृथ्वीवरील राजे आपापले सैन्य घेऊन जमा झालेले पाहिले. घोडेस्वाराबरोबर व त्याच्या सैन्याबरोबर लढाई करण्यासाठी ते जमा झाले होते. 20त्या श्वापदाला पकडण्यात आले. त्या प्राण्याच्या समक्ष ज्या खोट्या संदेष्ट्याने चमत्कार केले होते, त्याला देखील प्राण्याबरोबर पकडण्यात आले. प्राण्याचा शिक्का अंगावर असलेल्या आणि त्याच्या मूर्तीची उपासना करणाऱ्या लोकांना त्या खोट्या संदेष्ट्याने चमत्कार दाखवून फसविले. त्या दोघांना (प्राणी आणि खोटा संदेष्टा यांना) धगधगत्या गंधकाच्या अग्नीने भरलेल्या तळ्यात जिवंत असे टाकण्यात आले. 21शिल्लक राहिलेले सैन्य, घोडेस्वाराच्या तोंडामधून निघालेल्या तरवारीने ठार मारण्यात आले. आणि साऱ्या पक्ष्यांनी त्या सैनिकांचे मांस पोटभर खाल्ले.

## एक हजार वर्षे

20 आणि मी एक देवदूत स्वर्गातून खाली येताना पाहिला. त्याच्या हातात खोल बोगद्याची किल्ली आणि एक मोठा साखळदंड होता. 2त्या देवदूताने त्या जुनाट अजगराला म्हणजे सैतानाला धरले आणि एक हजार वर्षासाठी साखळदंडाने बांधून ठेवले. 3त्याने एक हजार वर्षे पुरी होईपर्यंत राष्टांना आणखी फसवू नये, म्हणून त्या देवदूताने त्याला खोल बोगद्यात टाकून दिले. आणि त्या दाराला कुलूप लावून शिक्का मारला. त्या काळांनंतर पुन्हा थोडा काळ त्याला मोकळे सोडण्यात येणार होते.
4नंतर ज्यांच्यावर लोक बसलेले आहेत, अशी काही सिंहासने मी पाहिली. या लोकांना न्यायनिवाडा करण्याचा अधिकार देण्यात आला होता आणि येशूबाबतच्या सत्याविषयी साक्ष दिल्यामुळे व प्रभु देवाच्या संदेशामुळे ज्या लोकांना जिवे मारण्यात आले, त्यांचे आत्मे मी पाहिले.

त्या लोकांनी श्वापदाची अथवा त्याच्या मूर्तीची उपासना केली नव्हती, आणि त्यांच्या कपाळावर किंवा हातावर त्या जनावराचा शिक्का मारलेला नव्हता. ते परत जिवंत झाले. आणि त्यांनी ख्रिस्ताबरोबर एक हजार वर्षे राज्य केले. **5**(इतर जे मेले होते, ते एक हजार वर्षे पुरी होईपर्यंत परत जिवंत झाले नाही) जे पहिले पुनरुत्थान ते हेच होय. **6**ज्याला पहिल्या पुनरुत्थानात भाग आहे, तो धन्य! त्या लोकांवर दुसऱ्या मरणाची सत्ता चालणार नाही; उलट ते लोक देवाचे आणि ख्रिस्ताचे याजक होतील; आणि ते त्याच्याबरोबर एक हजार वर्षे राज्य करतील.

**7**नंतर, जेव्हा एक हजार वर्षे संपतील, तेव्हा सैतानाला त्याच्या तुरुंगवासातून सोडण्यात येईल, **8**आणि जगाच्या चारही कोपऱ्यात पसरलेल्या राष्ट्रांना फसविण्यासाठी सैतान बंदीवासातून बाहेर पडेल. त्याने फसवून गोग व मागोग यांना लढाईसाठी एकत्र आणले. त्यांची संख्या सागराच्या वाळूच्या संख्येइतकी आहे. **9**ते सैतानाचे सैनिक जगाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत चाल करून आले आणि त्यांनी देवाच्या लोकांच्या छावणीला व प्रिय नगराला वेढा दिला. परंतु स्वर्गातून अग्नि खाली उतरला आणि त्यांना जाळून त्यांची राख केली. **10**मग ज्याने त्यांना फसविले होते, त्याला त्या धगधगत्या सरोवरामध्ये, श्वापद आणि खोटा संदेष्टा यांना टाकले होते त्या गंधकाच्या तळ्यात टाकण्यात येईल. आणि त्यांना अनंतकाळ रात्रंदिवस पीडा होत राहील. **11**नंतर एक मोठे पांढरे सिंहासन आणि त्याच्यावर जो बसला होता. त्याला मी पाहिले. त्याच्या समोरून पृथ्वी आणि आकाश ही पळून गेली. आणि त्यांच्यासाठी कोठेच जागा नव्हती. **12**नंतर मेलेले लहानथोर लोक सिंहासनासमोर उभे राहिलेले मी पाहिले. अनेक पुस्तके उघडलेली होती. आणि आणखी एक, म्हणजे जीवनी पुस्तक उघडले होते. आणि त्या पुस्तकात लिहिलेल्या त्या मेलेल्या लोकांच्या कृतीप्रमाणे त्यांचा न्यायनिवाडा करण्यात आला. **13**सागराने आपल्यामधील मेलेले लोक बाहेर सोडून दिले. तसेच मरण आणि अधोलोक यांनी आपल्यामधील मेलेले लोक सोडून दिले. आणि प्रत्येक मनुष्याचा न्याय ज्याच्या त्याच्या कृत्यानुसार करण्यात आला. **14**नंतर मरण व अधोलोक यांना अग्नीच्या तळ्यात टाकण्यात आले. हे अग्नीचे तळे म्हणजे दुसरे मरण होय. **15**आणि जर कोणाचे नाव जीवनी पुस्तकात सापडले नाही, तर त्याला अग्नीच्या तळ्यात टाकण्यात येत होते.

### नवीन यरुशलेम

**21** मग मी नवीन स्वर्ग आणि नवीन पृथ्वी* पाहिली. कारण पहिले आकाश आणि पहिली पृथ्वी ही नाहीशी झाली होती. आणि कोणताही समुद्र राहिला नव्हता. **2**पवित्र नगर यरुशलेम देवापासून खाली उतरताना मी पाहिले. ते नगर– यरूशलेम, वरासाठी सजविलेल्या वधूसारखे दिसत होते. **3**आणि स्वर्गातील सिंहासनापासून झालेली मोठी वाणी मी ऐकली. ती वाणी म्हणाली, “आता माणसांच्या बरोबर देवाची वस्ती आहे. आणि तो त्यांच्या बरोबर राहील. आणि तो त्यांचा देव होईल. **4**तो त्यांच्या डोळ्यांतील अश्रु पूसून टाकील. आणि येथून पुढे मरण असणार नाही. शोक करणे, रडणे आणि अथवा दुःखसहन् करणे राहणार नाही. कारण सर्व जुन्या गोष्टी नाहीशा झालेल्या आहेत.”

**5**जो सिंहासनावर बसलेला होता, तो म्हणाला, “पाहा मी सर्व काही नवीन करीत आहे!” मग तो पुढे म्हणाला, “लिही! कारण हे शब्द विश्वास ठेवण्याला योग्य आणि खरे आहेत.”

**6**नंतर तो मला म्हणाला, “पूर्ण झाले आहे! मी अल्फा व ओमेगा, आरंभ व शेवट आहे. जो कोणी तहानेला आहे, त्याला मी जीवनी पाण्याच्या झऱ्यातील पाणी फुकट देईन. **7**जो विजय मिळवितो, त्याला या सर्व गोष्टी मिळतील, मी त्याचा देव होईन, व तो माझा पुत्र होईल. **8**परंतु भित्रे, विश्वास न ठेवणारे अमंगळ, खुनी, व्यभिचारी, (म्हणजे लैंगिक अनीतीने वागणारे लोक), चेटकी, मूर्तिपूजा करणारे आणि सर्व खोटे बोलणारे अशा सर्वांना अग्नीने व गंधकाने धगधगणाऱ्या तळ्यामध्ये जागा मिळेल. हे दुसरे मरण आहे.”

**9**मग ज्या देवदूतांच्या हातात सात पीडांनी भरलेल्या सात वाट्या होत्या. त्यांच्यापैकी एक देवदूत आला, आणि तो मला म्हणाला, “इकडे ये! जी कोकऱ्याची वधु आहे, ती मी तुला दाखवितो.” **10**मी आत्म्याने भरून गेलो असता देवदूत मला एका उंच पर्वतावर घेऊन गेला. आणि त्याने पवित्र नगर, यरुशलेम, स्वर्गातून देवापासून खाली उतरताना मला दाखविले. **11**ते नगर देवाच्या गौरवाने झळकत होते. त्याचे तेज एखाद्या मोलवान रत्नासारखे होते; स्फटिकासारख्या चमकत असणाऱ्या यास्फे रत्नासारखे होते. **12**त्या नगराच्या सभोवती मोठमोठ्या उंच भिंती होत्या. आणि त्याला बारा वेशी होत्या. त्या बारा वेशींजवळ बारा देवदूत उभे होते. आणि त्या वेशींवर इस्राएलाच्या बारा वंशांची नावे लिहिलेली होती. **13**त्या नगराला पूर्व दिशेला तीन, उत्तर दिशेला तीन, दक्षिण दिशेला तीन आणि पश्चिम दिशेला तीन वेशी होत्या. **14**नगराच्या भिंतीना बारा पाये होते. त्या पायांवर कोकऱ्याच्या बारा प्रेषितांची नावे लिहिलेली होती.

**15**नगराची, वेशीची आणि भिंतीची लांबी–रूंदी मोजता यावी म्हणून जो देवदूत माझ्याशी बोलला, त्याच्याजवळ सोन्याची एक मोजपट्टी होती. **16**नगर चौरस आकाराचे होते. त्याची लांबी व रूंदी सारखीच होती. देवदूताने सोन्याच्या मोजपट्टीने नगराचे माप मोजून पाहिले. ते पंधरा हजार

---

**नवीन स्वर्ग आणि नवीन पृथ्वी** यशया 65:17; 66:22 2 पेत्र 3:13

मैल* भरले. नगराची लांबी, रूंदी व उंची समसमान होत्या. 17नंतर देवदूताने नगराच्या भिंतीचे माप घेतले. ते मनुष्याच्या हाताने 72 मीटर (216 फूट)* भरले. देवदूताच्या हाताने देखील माप तेवढेच भरले. 18नगराच्या भिंती यास्फे रत्नाच्या होत्या. आणि नगर शुद्ध सोन्याचे, चमकाणाऱ्या काचेसारखे होते. 19नगराचे पाये प्रत्येक प्रकारच्या मोलवान अशा रत्नांनी सजविले होते. पहिला पाया यास्फे रत्नाचा होता. दुसरा नीळ, तिसरा शिवधातु, चौथा पाचू (पाच), 20पाचवा गोमेद, सहावा सार्दी, सातवा लसणा, आठवा वैडूर्य, नववा पुष्कराज, दहावा सोनलसणी, अकरावा याकिंथ, बारावा पद्मराग रत्नाचा होता. 21बारा वेशी बारा मोत्यांनी बनविल्या होत्या. आणि प्रत्येक वेस एकाएका रत्नाची होती. नगरातील रस्ता शुद्ध सोन्याचा, काचेसारखा स्पष्ट होता. 22त्या नगरात मला कोठेही मंदीर दिसले नाही; 23प्रभु देवाचे जे तेज ते अखिल नगराला उजेड पुरवीत होते, आणि कोकरा हा त्याचा दिवा आहे. 24राष्ट्रे त्या दिव्याच्या प्रकाशात चालतील. आणि जगातील राजे आपले वैभव त्या नगराकडे आणतील. 25त्या नगराच्या वेशी दिवसा कधीही बंद केल्या जाणार नाहीत आणि तेथे कधीही रात्र असणार नाही. 26राष्टांचे वैभव आणि संपत्ती त्या नगरात आणण्यात येतील. 27जे अशुद्ध आहे, ते त्या नगरात प्रवेश करू शकणार नाही. अथवा लाजिरवाणे काम अगर लबाडी करणाऱ्याचा शिरकाव त्या नगरात होणार नाही. कोकऱ्याच्या जीवनाच्या पुस्तकात ज्या लोकांची नावे नोंदविली आहेत, केवळ तेच लोक त्या नगरात जाऊ शकतील.

22 नंतर देवदूताने मला जीवनाच्या पाण्याची एक नदी दाखविली. ती नदी स्फटिकासारखी स्पष्ट होती. ती नदी देवाच्या आणि कोकऱ्याच्या राजासनापासून उगम पावत होती. 2आणि नगराच्या रस्त्यांच्या मधोमध वाहत होती. नदीच्या दोन्ही काठांवर उगवलेली झाडे जीवनाची झाडे होती. त्यांच्यातील प्रत्येक झाड दरमहा आपले फळ देते. झाडांची पाने राष्ट्रांना आरोग्य देण्यासाठी उपयोगी पडत होती. 3त्या नगरात यापुढे कसलाही शाप असणार नाही. देवाचे सेवक त्याची उपासना करतील. 4आणि ते त्याचे मुख पाहतील. व त्यांच्या कपाळावर देवाचे नाव लिहिलेले असेल. 5त्या नगरात यापुढे कधीही रात्र होणार नाही. लोकांना प्रकाश मिळविण्यासठी ह्यापुढे कुठल्याही दिव्याची अथवा सूर्याची गरज पडणार नाही; कारण प्रभु देव आपला प्रकाश त्यांना पुरवील. आणि ते लोक अनंतकाळ राज्य करतील. 6नंतर देवदूत मला म्हणाला, "हे शब्द विश्वासयोग्य आणि खरे आहेत. जो प्रभु संदेष्ट्यांच्या आत्म्यांचा प्रभु आहे, त्याने आपला दूत पाठविला. ज्या गोष्टी लवकर घडून आल्या पाहिजेत, त्या आपल्या सेवकांना दाखवून देण्यासाठी त्याने आपला दूत पाठविला आहे." 7"पाहा, मी लवकर येत आहे. या पुस्तकातील संदेशवचनांचे जो पालन करतो, तो धन्य!"

8ज्या मनुष्याने या गोष्टी ऐकल्या आणि त्यांनी पाहिल्या, तो मनुष्य मी, योहान आहे. मी जेव्हा या गोष्टी ऐकल्या आणि पाहिल्या, तेव्हा या गोष्टी मला दाखवीत असलेल्या देवदूताच्या पाया पडून मी त्याची उपासना करू लागलो. 9परंतु तो देवदूत मला म्हणाला, "असे करू नको. मी तुझ्याबरोबर आणि तुझे भाऊ संदेष्टे, जे ह्या पुस्तकात नमूद केलेल्या वचनांचे पालन करतात, त्यांच्याबरोबर काम करणारा देवाचा एक सेवक आहे. देवाची उपासना कर!" 10नंतर देवदूत मला म्हणाला, "भावी काळाबाबतच्या या पुस्तकातील संदेश गुप्त ठेवू नकोस; कारण या गोष्टी घडून येण्याची वेळ आता जवळ आली आहे. 11जो मनुष्य अयोग्य वागतो. तो आणखी चुकीचे वर्तन करीत राहू दे! जो मलिन आहे, त्याला आणखी मलिन राहू दे! जो मनुष्य पवित्र आहे, त्याला आणखी पवित्रपणाने चालू दे."

12"पाहा! मी लवकर येत आहे, आणि माझे वेतन तुमच्याकरिता घेऊन येईन. प्रत्येकाला त्याच्या कर्मानुसार मी फळ देईन. 13मी अल्फा व ओमेगा, पहिला व अखेरचा, आरंभ आणि शेवट आहे.

14"जे आपले झगे साफ धुतात, ते धन्य! त्यांना जीवनी झाडाचे फळ खाण्याचा आणि वेशीतून नगरामध्ये जाण्याचा हक्क राहील. 15परंतु "कुत्रे" चेटकी, जादूटोणा करणारे, व्यभिचारी, मूर्तिपूजा करणारे, आणि निरनिराळ्या रीतीने लबाडी करणारे व लबाड बोलणारे बाहेर राहतील.

16"तुमच्या आपापल्या मंडळ्यांसाठी याबाबतीत साक्ष देण्याकरिता आपला देवदूत मी, येशूने पाठविलेला आहे. मी दाविदाच्या कुळातील एक अंकुर व वंशज आणि पहाटेचा तेजस्वी तारा आहे." 17आत्मा आणि नवरी असे म्हणतात की, "ये! आणि जो कोणी हे ऐकतो, तो असे म्हणो की, "ये!" आणि जो तहानेला आहे, तो येवो, ज्या कोणाला पाहिजे, तो फुकट दिले जाणारे जीवनी पाणी घेवो. 18या पुस्तकात भाविष्यकाळाबाबत नमूद केलेली वचने जो ऐकतो, त्याला मी गंभीरपणे सावधान करतो: जर कोणी ह्यामध्ये भर घालील, तर या पुस्तकात लिहिलेल्या पीडा देव त्याच्यावर आणील. 19आणि जो कोणी भविष्यकाळाबाबत संदेश देणाऱ्या या पुस्तकामधून काही काढून टाकील, त्याचा ज्यांच्याबाबत या पुस्तकात लिहिले आहे, त्या जीवनाच्या झाडाचा आणि पवित्र नगराचा वाटा देव काढून घेईल.20जो येशू या गोष्टीविषयी साक्ष देतो, तो म्हणतो, "होय, मी लवकर येतो."

आमेन, ये प्रभु येशू, ये!

21प्रभु येशूची कृपा देवाच्या सर्व लोकांबरोबर असो.

---

**मैल** मुळात बारा हजार स्टेडिया.

**मीटर** मुळात 144 क्युबिट.

# License Agreement for Bible Texts

***World Bible Translation Center***
***Last Updated: September 21, 2006***



**These Scriptures:**

- Are copyrighted by World Bible Translation Center.
- Are not public domain.
- May not be altered or modified in any form.
- May not be sold or offered for sale in any form.
- May not be used for commercial purposes (including, but not limited to, use in advertising or Web banners used for the purpose of selling online add space).
- May be distributed without modification in electronic form for non-commercial use. However, they may not be hosted on any kind of server (including a Web or ftp server) without written permission. A copy of this license (without modification) must also be included.
- May be quoted for any purpose, up to 1,000 verses, without written permission. However, the extent of quotation must not comprise a complete book nor should it amount to more than 50% of the work in which it is quoted. A copyright notice must appear on the title or copyright page using this pattern: "Taken from the HOLY BIBLE: EASY-TO-READ VERSION™ © 2006 by World Bible Translation Center, Inc. and used by permission." If the text quoted is from one of WBTC's non-English versions, the printed title of the actual text quoted will be substituted for "HOLY BIBLE: EASY-TO-READ VERSION™." The copyright notice must appear in English or be translated into another language. When quotations from WBTC's text are used in non-saleable media, such as church bulletins, orders of service, posters, transparencies or similar media, a complete copyright notice is not required, but the initials of the version (such as "ERV" for the Easy-to-Read Version™ in English) must appear at the end of each quotation.

Any use of these Scriptures other than those listed above is prohibited. For additional rights and permission for usage, such as the use of WBTC's text on a Web site, or for clarification of any of the above, please contact World Bible Translation Center in writing or by email at distribution@wbtc.com.

World Bible Translation Center
P.O. Box 820648
Fort Worth, Texas 76182, USA
Telephone: 1-817-595-1664
Toll-Free in US: 1-888-54-BIBLE
E-mail: info@wbtc.com

**WBTC's web site –** World Bible Translation Center's web site: http://www.wbtc.org

**Order online –** To order a copy of our texts online, go to: http://www.wbtc.org

**Current license agreement –** *This license is subject to change without notice. The current license can be found at:* http://www.wbtc.org/downloads/biblelicense.htm

**Trouble viewing this file –** If the text in this document does not display correctly, use Adobe Acrobat Reader 5.0 or higher. Download Adobe Acrobat Reader from:
http://www.adobe.com/products/acrobat/readstep2.html

**Viewing Chinese or Korean PDFs –** To view the Chinese or Korean PDFs, it may be necessary to download the Chinese Simplified or Korean font pack from Adobe. Download the font packs from:
http://www.adobe.com/products/acrobat/acrrasianfontpack.html